

श्री

# भारत वर्षीय
# प्राचीन ऐतिहासिक कोश.

हा ग्रंथ

रघुनाथ भास्कर गोडबोले

मराठी भाषेच्या नवीन कोशाचे कर्ते यांनीं सन १८७६ सालीं केला.

तो

रा. रा. शंकर नरहर जोशी, यांनीं सन १९२८ मध्यें चित्रशाळा प्रेस, १०२६ सदाशिव पेठ पुणें, येथें छापून प्रसिद्ध केला.

शके १८५०.

---

सन १९२८.

किंमत ३ रुपये.

# प्रस्तावना.

ग्रंथास प्रस्तावना लिहिल्यानें त्यांत विषय काय आहे तो वाचकांस उत्तम प्रकारें दाखवितां येतो, असें जाणून सर्व देशांतील ग्रंथकार त्याच्या त्याच्या महत्त्वानुरूप ती प्राचीन काळापासून लिहीत आले; त्या योग्य लेखनसंप्रदायाप्रमाणें, मीहि या ग्रंथाची प्रस्तावना थोडीशी येथें लिहून वाचकांस सादर करितों.

या ग्रंथाचें नांव 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश' असें आहे. याचा अर्थ असा होय कीं, भरतवर्षांत पूर्वी आपणामध्यें जे जे प्रख्यात लोक होऊन गेले त्यांचा, त्यांच्या स्त्रिया, त्यांचे पुत्र, त्यांचा धर्म, त्यांचे देश व राजधान्या, तसेच त्या देशांतील नद्या व पर्वत इत्यादिकांसहित, त्यांच्या जन्मापासून मरणापर्यंत जो इतिहास तो. यांत ज्या ज्या नांवावर जो जो इतिहास आहे, तो तो, समग्र लिहिण्याचें हें स्थळ नसल्यामुळें त्याचा त्याचा दर्शक जो मूळ ग्रंथ, तो त्यापुढें प्रसंगानुरूप अध्याय व श्लोकाच्या आंकड्यासहित लिहून दाखविला असून सारांशानें लिहिला आहे; आणि श्रुतिस्मृतींस विरुद्ध किंवा पूर्वापर ग्रंथसंगतीस विरुद्ध अतएव कृतक (कोणी मनानें रचून नवा घातलेला) अथवा हस्तदोषादिकांनीं अन्यथा लिहिला गेलेला तितका सूक्ष्मदृष्टीनें गाळून टाकून, व त्याची जुळणी करतांना अरबी व फारसी भाषेचे शब्द त्यांत अगदीं न येऊं देऊन, लिहिण्याविषयीं अतिशय सावधपणा ठेविला आहे.

अशा जातीचा ग्रंथ स्वदेशांत असणें अतिशय उपयुक्त व महत्त्वाचें कार्य असतां, आजपर्यंत हा आमच्यांत लिहिला गेला नाहीं, त्याविषयींचें कोणास आश्चर्य होऊं नये; त्याचें कारण असें आहे:— कलियुग लागल्यावर थोडक्याच अवकाशानें आपण सर्व भरतखंडाच्या ज्या भूभागांत राहतों, येथें वेदविरुद्ध यास्तव कुत्सित असें बौद्धमत उत्पन्न होऊन त्यास कित्येक मूर्ख राजे अनुसरले, व अनुकूल कालाच्या योगानें त्यांची सत्ताहि अतिशय वाढली;तथापि ती, कुमारिल भट्टानें कुमारीपासून द्वितीयार्थक हिमालय पर्वतापर्यंत दक्षिणोत्तर आणि कोंकणी समुद्रापासून वंगालच्या समुद्रापर्यंत पूर्वापर, शास्त्रीय वादविवादांनीं त्यांस जिंकून नाहींशी केल्यावर,शंकराचार्यांनींहि तिचें राहिलेंसाहिलें बीज व अन्य पाखंडें निःशेष करून वर लिहिलेल्या मर्यादेंत दिशापरत्वें चार मठ स्थापिले. तेणेंकरून बरीच स्वस्थता झालेली दृढ होत आहे तों, पुनः बौद्धमत पश्चिमेकडून मारवाडांत व तेथून गुजराथेंत शिरलें, आणि लागलेंच मागून यवन लोकहि इकडे आले. त्या योगानें अशी कांहीं धामधूम या देशांत झाली कीं, धर्मसंबंधानें आमच्यावर त्यांचा अतिशय बलात्कारहि झाला. तेव्हां अर्थातच हा ग्रंथ लिहिण्यास कोणास कसा अवसर सांपडेल ? मात्र सांप्रतच्या राज्यांत कित्येक अंशांनीं तसा प्रकार नसून, अशा जातीचा ग्रंथ लिहिण्याविषयीं त्यांचा प्रतिबंध नसतां विद्याहि पुष्कळ वाढली असें असून, जेव्हां कोणाकडून हा स्तुत्य उद्योग झाला नाहीं, तेव्हां असें वाटतें कीं ज्याप्रमाणानें येथें विद्या वाढली, त्याच प्रमाणानें द्विजसमागमें वैदिक धर्मविषयक अश्रद्धाहि वाढली असावी; आणि त्याच कारणामुळें तो उद्योग झाला नसावा. यांत असा उद्योग न झाल्याचा तादृश मला खेद वाटत नाहीं; परंतु वर लिहिल्याप्रमाणेंच जर लोकांची स्थिति झाली असेल, तर ती मात्र मनांत येऊन खेद झाल्यावांचून राहणार नाहीं.

देशामध्यें अशा जातीचा ग्रंथ असल्यापासून जे लाभ आहेत, त्यांत पहिला हा होय कीं, आमच्या संस्कृत भाषेंत जे प्राचीन इतिहासांचे ग्रंथ आहेत, त्यांत ज्या गोष्टी श्लोकबद्धसरणीमुळें मुग्ध (मोघम) लिहिल्या असतात, म्हणजे पांडव अज्ञातवासार्थ मत्स्यदेशांत गेले, चंपराजानें चंपानगरीं स्थापिली, जनकराजा याज्ञवल्क्य ऋषीस शरण गेला, परंतु मत्स्यदेश तीन चार असल्यामुळें कोणत्या मत्स्यदेशांत पांडव गेले ? चंप दोन असल्यामुळें कोणत्या चंपराजानें चंपानगरी स्थापिली, व जनकराजे अनेक असल्यामुळें कोणता जनकराजा, याज्ञवल्क्यास कधीं शरण गेला ? त्या सर्वांची निश्चयात्मक टीका, टीकाकारांस लिहिण्यास सापडते. हें साधन आमच्या देशांत अवश्य पाहिजे असतां, तें नसल्याकारणानें, आजपर्यंत जेवढ्या म्हणून टीका झाल्या आहेत, त्यांचे कर्ते न्याय, मीमांसा व व्याकरण, या विषयांतून उत्तम प्रवीण असतांहि इतिहासविषयक टीका लिहितांना त्यांस श्लोकांतील एक दोन अक्षरांपुढें इति म्हणजे जसें (पृथुरिति) (धृतराष्ट्रेति) इतकेंच लिहून अंकांच्या ओळीच्या ओळी मांडून ठेऊन स्वस्थ बसावें लागलें असल्याचें भारत पाहिलें म्हणजे ध्यानांत येतें म्हणून ही अडचण ज्याच्या योगानें दूर होत्ये त्या ग्रंथाचा हा सामान्य उपयोग आहे काय ?

दुसऱ्या लाभाच्या पोटांत अनेक गोष्टी आहेत त्या येणेंप्रमाणें.—प्रथम तर जसें भाषेस व्याकरण व तिचा कोश असल्यानें तींत अन्य भाषांतील शब्द न मिसळतां तिची शुद्धता राहून दृढत्व असतें, त्याचप्रमाणें इतिहासासंबंधीं कोश वारंवार अवलोकनांत असल्यानें प्राचीन इतिहासांत ग्राह्य व त्याज्य गोष्टी कोणत्या आहेत त्या समजून येऊन देशसुधारणेस अतिशय मोठा उपयोग होतो, इत्यादि विचार मनांत आणून मी हा ग्रंथ वेदशास्त्रसंपन्न रामशास्त्री यांच्या साह्यानें सात वर्षें श्रम घेऊन सिद्ध केला. यांतील मतें व त्यांचें प्रतिपादन माझें स्वतःचें नाहीं. म्हणून विचारी आर्य विद्वज्जन यास आपल्या उदार आश्रयास पात्र करून घेतील असा भरंवसा आहे.

रघुनाथ भास्कर गोडबोले.
म० न० को० कर्ते.





# प्रकाशकाचे दोन शब्द.



अव्वल इंग्रजींतील जाड्या विद्वानांपैकीं प्रस्तुत प्राचीन भारतवर्षीय कोशाचे कर्ते वे० शा० सं० रघुनाथ भास्कर गोडबोले एक होत. आपले वेद, पुराणें, रामायणादि इतिहास, इत्यादिकांत ज्या अनेक राजे, ऋषि, इत्यादिकांच्या कथा आलेल्या आहेत त्या सर्व वाचून त्यांची विचिकित्सक नजरेनें छाननी करून त्रोटक स्वरूपांत तत्तत्कथादिकांच्या मूळ आधारांचे दाखले देऊन त्या एकत्र संग्रहित करण्याचें अतिशय परिश्रमाचें व उपयुक्त काम वे० शा० सं० रा० गोडबोले यांनीं प्रस्तुत कोशांत केलेलें आहे. त्यामुळें त्यांचा हा कोश प्राचीन भारतवर्षाच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या विद्वानांस तत्तद्व्यक्तींच्या कालनिर्णयादि बाबतींत तर अतिशय मार्गदर्शक होईलच, परन्तु इतर वाङ्मयप्रेमी लोकांनाही पुराणादि प्रसिद्ध अशा कोणत्याही विवक्षित व्यक्तींची साधार माहिती स्वल्प सायासानें मिळविण्यास हा कोश एक उत्कृष्ट साधन होईल. उदाहरणार्थ, आपण शाकुन्तल वाचीत असतां त्यांत दुर्वास ऋषींचा उल्लेख आला, व दुर्वासाविषयीं काय माहिती किंवा कथा प्रचलित आहेत, हें जाणण्याची आपणास इच्छा झाली तर सर्व महाभारत धुंडाळीत न बसतां आपणांस ती माहिती प्रस्तुत कोशांत ' दुर्वास ' हा शब्द काढल्यानें ताबडतोब मिळेल.

अशी या कोशाची महती आहे. पण तो आलीकडे कित्येक वर्षें दुर्मिळ होऊन बसला होता, व म्हणून त्याचें आम्हीं हें पुनर्मुद्रण अतिशय काळजीपूर्वक रीतीनें रा० गोडबोल्यांच्या पहिल्या आवृत्तीवरून केलें आहे. सर्वांसच हा कोश संग्रहीं ठेवतां यावा म्हणून त्याची किंमत त्याच्या विस्ताराच्या मानानें आम्हीं अतिशय अल्प म्हणजे तीन रुपये ठेवली आहे. महाराष्ट्रीय रसिकांस त्याची योग्यता पटून ते त्यास उदार आश्रय देतील व आपल्यांतील एका मूल्यवान ग्रंथाचें पुनरुज्जीवन करण्याचें श्रेय संपादितील अशी आशा आहे.

तारीख १ एप्रिल, १९२८.

म्यानेजर, चित्रशाळा, पुणें.





॥ श्री ॥

# भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश.

## अ.

**अकर्दम**–पूर्वी, ज्या तमसा नदीतीरीं, वाल्मीकि ऋषीचा आश्रम होता, तेथील प्रसिद्ध तीर्थ. (वा० रा० बाल० स० ४).

**अकंपन**–कोणी एक राजर्षि, हा कोणत्या कालीं, व कोणत्या कुलांत जन्मला, तें कांहीं आढळत नाहीं, मात्र इतकेंच आढळतें कीं, याला, परम पराक्रमी हरि या नामेंकरून एकच पुत्र होता. तो एका युद्धांत दुर्दैवानें मरण पावला असतां, यास परम दुःख होऊन, हा शोक करीत आहे तों, तेथें नारद ऋषि प्राप्त झाले, व त्यांनीं, मृत्यु अनिवार्य आहे, त्याविषयींची मूळ कथा सांगून, याचें समाधान केलें. ( भार० द्रोण० अ० ५२-५४ ).

२–रावणदूत एक राक्षस. जनस्थानीं, खरादिक राक्षसांचा वध रामचंद्रानें केला, तें वृत्त प्रथमतः रावणास यानें कळविलें होतें. शूर्पणखेनें मागून कळविलें. (वा० रा०अर० स० ३१ ). रामरावणयुद्धांत हा असून, पुढें मारुतीच्या हातून मरण पावला होता. ( वा० रा० युद्ध० स० ५६ ).

**अकपि**–गत झालेल्या चौथ्या तामस मन्वंतरांत, जे सप्तर्षि होऊन गेले, त्यांतील एक. ( मत्स्य० अ० ९ ).

**अकल्मष**–तामस मनूच्या पुत्रांतील एक. (मत्स्य०अ०९).

**अकूपार**–इंद्रद्युम्न सरोवरांतील एक अतिप्रसिद्ध कांसव.

**अकृतव्रण**–जामदग्न्य रामाचा सहचर एक ब्रह्मर्षि, हा, युधिष्ठिरानें केलेल्या राजसूय यज्ञांत, उपद्रष्टा नांवाचा ऋत्विज झाला होता. ( भार० वन० अ० ११५ ).

**अकोप**–दशरथ राजाच्या अष्टप्रधानांतील एक. ( वा० रा० बाल० स० ७ ). यास, अशोक असेंही नामांतर आढळतें.

**अक्रिय**–( सो० वं० ) आयु राजाच्या पांच पुत्रांतील जो चौथा रंभ ना० राजा, त्याच्या कुलांत जन्मलेल्या गंभीर राजाचा पुत्र. याची संतति तपानें ब्राह्मण झाली होती.

**अक्रूर**–विष्णूचा एक पार्षद.

२–( सो० वं० ) आयुपुत्र नहुष राजा, त्याच्या, यदुना० पौत्राच्या कुलांतील सात्वत वंशांत जन्मलेल्या श्वफल्क राजाच्या तेरा पुत्रांतील एक. यास, प्राधान्येंकरून श्वाफल्कि असें म्हटलेलें असून, याला, रत्ना, उग्रसेना, अश्विनी, इ० स्त्रिया, आणि देववान्, उपदेव, इ० पुत्र होते. कृष्ण आणि बलराम, या दोघांस गोकुलांतून मथुरेस आणायासाठीं, यासच कंसानें पाठविलें होतें. व त्याप्रमाणें हा, त्यांस घेऊन आला होता. याचें विशेष वृत्त स्यमंतक मण्याच्या प्रसंगांत आढळतें. ( स्यमंतकमणि श० पहा. )

**अंग**–उत्तानपादवंशीय उल्मुक राजापासून, पुष्करिणी ना० त्याच्या स्त्रीच्या ठायीं झालेल्या साहा पुत्रांतील ज्येष्ठ. यास सुनीथा नांवाची स्त्री, आणि तिचे ठायीं झालेला वेन ना० अतिदुष्ट पुत्र होता. (स्वायंभू०वं०).

२–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न ययातिपुत्र अनु ना० राजा, तद्वंशीय बलि राजाच्या साहा पुत्रांतील ज्येष्ठ. हा, बलीच्या क्षेत्रांत, दीर्घतमा ऋषीपासून झाला होता, आणि यास, दधिवाहन नामांतरानें खनपान नांवाचा पुत्र होता.

३–भारतीय युद्धांतील दुर्योधनपक्षीय म्लेच्छजातीय राजा, हा, कर्णाचा मांडलिक असून, भीमसेनाच्या हातून मरण पावला होता. ( भार० द्रोण अ० २६ ).

४–सरयू, आणि भागीरथी, या दोन नद्यांमध्यें असणारा भारतवर्षीय देश. येथें, रुद्राच्या तृतीय नेत्राग्नीनें कामदेव भस्म होऊन, अनंगत्व पावला असतां, पुनः सांग होण्याचें वरप्रदानही त्याला येथेंच प्राप्त झालें, म्हणून यास हें नांव पडलें होतें. ( वा० रा० बाल० स० २३ ). या देशास कामाश्रम असें नामांतर असून, पांडवांच्या वेळेस येथें कर्ण राजा होता. हा, इंद्रप्रस्थापासून पूर्वेस दूर अंतरावर असणारा जो मगध देश, त्याच्या अलीकडे असल्याचें भारतांत लिहिलें आहे.

(भार० सभा० अ० ३०) याची राजधानी चंपा-नगरी. (२ चंपा श० पहा.)

**अंगद**–वालीपासून, त्याची स्त्री तारा, तिच्या ठायीं झालेला पुत्र. हा रामचंद्राच्या साह्यार्थ बृहस्पतीच्या अंशानें जन्मला होता म्हणून, भाषण करण्यांत परम चतुर असे. वाली मरण पावला, त्या कालीं हा, वयानें विशेष मोठा नव्हता म्हणून, त्यानें रामास याच्या संरक्षणाविषयीं अतिशय अगत्यानें सांगितलें होतें, त्यावरून रामानें, किष्किंधेच्या राज्यासनावर सुग्रीवास स्थापिलें असतां,यास युवराज्याचा अधिकार देवविला होता. (२ वालि श० पहा.)

पुढें, अल्पच कालानें, रामचंद्रानें, सुग्रीवाकडून चारी दिशांस, सीताशुद्धीसाठीं वानर पाठविले, त्यांत मारुति इ० वानरांत, यास प्रमुख करून दक्षिण दिशेस पाठविलें होतें. तिकडे हा गेला असतां, एक मास अतिक्रांत झाला तरी, यास सीतेचा शोध लागेना, म्हणून यानें प्राणत्यागाचा निश्चय केला. इतक्यांत संपाति ना० पक्षिराजाची भेट होऊन, सीता लंकेंत असल्याचा यास शोध लागला, त्यावरून यानें, मरणापासून निवृत्त होऊन, मारुतीस लंकेंत पाठविलें, व तो सीताशुद्धि करून आल्यावर हा, रामाकडे किष्किंधेस परत आला.

नंतर सकल वानरांसहित रामचंद्र लंकेस गेल्यावर, युद्ध आरंभण्यापूर्वीं, हा, रामाकडून रावणाकडे साम करण्यासाठीं गेला होता. परंतु याच्या हितोपदेशाचा रावणानें अनादर केल्यामुळें, हा परत येतांच, उभयपक्षीं युद्धाची सिद्धता होऊन, त्यास आरंभ झाला, त्याप्रसंगीं यानें, विकट, कंपन, प्रजंघ, इ० अनेक महान् महान् राक्षसांस मारून, रामाचें उत्तम साह्य केलें होतें.

रावणाचा वध करून, रामचंद्र अयोध्येस गेल्यावर, अकरा सहस्र वर्षें त्यानें राज्य करून, निजधामास जाण्याचें मनांत आणिलें असतां, त्यासमागमें सुग्रीव गेला, तेव्हां हाच किष्किंधेचा राजा झाला होता.

२–(सू० वं०) दशरथपुत्र जो लक्ष्मण, त्यापासून उर्मिलेस झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यानें स्थापिलेल्या नगरीचें नांव अंगदीया असें होतें, व तेथेंच हा राज्य करीत असे.

३–भारतीय युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा, हा त्याच युद्धांत मरण पावला होता. (भार० द्रोण० अ० २५).

**अंगदीया**–लक्ष्मणपुत्र अंगदाची नगरी, ही कारपथ देशाची राजधानी असून, हिला अश्वनगर असें नामांतर होतें. (वा० रा० उत्तर० स० १०२).

**अंगना**–भारतवर्षीय महानदी. (भार० भीष्म० अ० ९.)

**अंगलेपा**–भारतवर्षीय पश्चिमदिशेकडील नगरी, ही, कोणत्या देशाची राजधानी, त्याविषयींचा ग्रंथांत कोठेंही उल्लेख नाहीं.

**अगस्ति**–अगस्त्यकुलोत्पन्न एक ऋषि, व त्याचें कुल ते.

**अगस्त्य**–स्वायंभू मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र जो पुलस्त्य ऋषि, त्यापासून कर्दम प्रजापतीची कन्या हविर्भुवा, तिच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. याच्या दुसऱ्या सहोदराचें नांव विश्रवाऋषि असें होतें. (१ पुलस्त्य श० पहा.)

२–पूर्वी कित्येक असुर समुद्रामध्यें लपून राहून, इंद्रादिक देवांस, ऋषींस, व इतर प्रजांस, अतिशय पीडा देत, ती, समुद्र शोषिल्यानें नाहींशी होऊन, सकल प्रजेसहित आपण सुखी होऊं, असें मनांत आणून, इंद्रानें, अग्नि आणि वायु यांस समुद्र शोषण्याची आज्ञा केली. तिचा त्यांनीं अनादर केल्यामुळें, त्यानें सक्रोध होऊन, दोघांसही शाप दिला होता कीं, तुम्हांस मृत्युलोकीं जन्म घडेल. त्याप्रमाणें ह्या चालू वैवस्वत मन्वंतरांत, त्या उभयतांस मित्रावरुणापासून एकाच देहानें जन्म घडलें, त्यासच अगस्त्य असें नांव होतें. येथें यास कनिष्ठ भ्राता वसिष्ठ ऋषि होता. मित्रावरुणांनीं, आपलें तेज कुंभांत सोडिलें होतें, त्यापासून अगस्त्य आणि वसिष्ठ उत्पन्न झाले होते म्हणून, त्यास मैत्रावरुणि, कुंभयोनि, अशीं नांवें पडलीं होतीं. (मत्स्य० अ० २०१).

हा अगस्त्य, महातपस्वी, व विरक्त असल्यामुळें विवाह करणार नव्हता. परंतु पितरांच्या आज्ञेमुळें निरुपाय होऊन, विदर्भ देशाधिपतीची कन्या लोपामुद्रा ती, यानें, आपणास स्त्री केली होती. (लोपामुद्रा श० पहा.) पुढें अगस्त्य, तिजपासून पुत्रोत्पत्तीची इच्छा करूं लागला असतां, ऐश्वर्ययुक्त होऊन आपणाशीं संभोग करावा, असा तिचा हेतु आहेसा जाणून, हा द्रव्ययाचनेसाठीं श्रुतर्वा राजाकडे गेला. (श्रुतर्वा श० पहा.)

श्रुतर्वा राजाकडून, याची द्रव्यकामना सिद्ध न झाल्यामुळें, त्याच्या सांगण्यावरून, त्यासहित हा, ब्रध्नश्व राजाकडे गेला, (ब्रध्नश्व श० पहा.) तेथेंही तसेंच झाल्यामुळें, हा, त्या उभयांसहित त्रसद्दस्युना०

राजाकडे गेला. ( २ त्रसद्दस्यु श० पहा. ) तेथें तीच स्थिति अवलोकन करून, हा, पुढें काय करावें म्हणून चिंतन करीत आहे तों, त्रसद्दस्यूनें विनंति केली कीं, इल्वल ना० असुर मोठा संपत्तिमान् आहे, यास्तव, त्यास जिंकल्यास अपार द्रव्य मिळेल. त्यावरून हा, तिघांही राजांस समागमें घेऊन इल्वलाकडे गेला, आणि त्यास जिंकून, लागत होतें तितकें द्रव्य आपण घेऊन, व त्या राजांसही देऊन त्यांस मार्गस्थ केल्यावर, आपण आपल्या आश्रमास आला, आणि आणलेलें द्रव्य लोपामुद्रेस देऊन, तिचें चित्त यानें संतुष्ट केलें. ( २ इल्वल श० पहा. )

पुढें, लोपामुद्रेस अगस्त्यापासून गर्भधारण झालें, व तीं, दृढस्यु, आणि दृढास्य, या दोन पुत्रांस क्रमेंकरून प्रसवली. या दोन पुत्रांत, दृढस्यु हा, इध्मवाह या नांवानें अतिप्रसिद्ध होता.

अगस्त्य ऋषि, स्त्री व पुत्र यांसाहित, आश्रमधर्म चालवीत असतां, कालकेय ना० असुरांनीं, जनांस अत्यंत पीडा दिली, तेव्हां यानें महान् ऋषींच्या प्रार्थनेवरून, समुद्रदिकाचें शोषण करून, कालकेयांचा नाश केला व सकल जनांस स्वस्थ केलें. तेणेंकरून इंद्राचाही संतोष झाला. ( १ कालकेय श० पहा. )

याच्या कुलांत, मुख्यत्वेंकरून हा, व याचे दोन पुत्र, असे तिघे मंत्रद्रष्टे असून, इंद्रवाहु, मयोभुव, आणि महेंद्र, हेही आणखी तिघे होते. तसेंच वंशवृद्धि करणारे, **अगस्ति, पूर्णमास, सांभवाह, सोमवाह, यज्ञवाह, दर्भवाह, सारवाह, हिमोदक, पाणिक**, आणि **इध्मवाह**, असे दहा होते. त्यांमध्यें पहिला जो अगस्ति, त्याचे वंशज, करंभ, कौशल्य, करट, सुमेधस, दुसरा मयोभुव, गांधारकायण, पौलस्त्य, पौलह, आणि क्रतु ऋषीचे वंशज, इत्यादिक सर्व, **आगस्त्य, माहेंद्र**, आणि **मायोभुव**, या तीन प्रवरांचे होते. दुसरा पूर्णमास, त्याचे वंशज **आगस्त्य, पौर्णमास, पारण**, या तीन प्रवरांचे होते. याचप्रमाणें सांभवाहादिक अवशिष्टांचे वंशज, क्रमेंकरून, **आगस्त्य, दार्ढ्यच्युत, सांभवाह. आगस्त्य, दार्ढ्यच्युत, सोमवाह. आगस्त्य, दार्ढ्यच्युत, यज्ञवाह. आगस्त्य, दार्ढ्यच्युत, दर्भवाह. आगस्त्य, दार्ढ्यच्युत, सारवाह. आगस्त्य, हैमवर्चि, हैमोदक. आगस्त्य, पैनायक, पाणिक**, आणि **आगस्त्य, दार्ढ्यच्युत, इध्मवाह**. अशा तीन तीन प्रवरांचे होते. क्वचित् इध्मवाहवंशजांस, आगस्त्य एवढा एकच प्रवर होता.

वर, अगस्तिकुलांतील ऋषि सांगतांना, पौलस्त्य, पौलह, आणि क्रतु ऋषींचे वंशज, जरी आगस्त्य गोत्री सांगितले आहेत, तरी ते अगस्त्यकुलोत्पन्न असे समजूं नयेत. तर त्यांत, क्रतु ऋषि अनपत्य होता, व पुलस्त्य, आणि पुलह, यांची संतति दुष्ट होती, म्हणून त्यांनीं, तिचा त्याग करून, अगस्त्यपुत्र दृढस्यु, यास पुत्रत्वेंकरून मानिलें होतें, त्यामुळें, ते आपणांस आगस्त्य म्हणवीत असत असें समजावें.

अगस्त्य ऋषि उत्तम तत्त्ववेत्ता होता. याशिवाय त्याच्या अंगीं परोपकारबुद्धि असून, धनुर्वेदामध्यें तर त्याची गणना उत्तम कोटींत असे. यानें, देवांच्या प्रार्थनेवरून, प्राणिमात्रांस विंध्यपर्वतापासून झालेलें विघ्न निवारण करण्यासाठीं, काशीवासही सोडून देणें पत्करला. ( विंध्य श० पहा.) तसाच दाशरथि राम, दंडकारण्यांत चालला असतां, तोही याच्या दर्शनास येऊन, याचा प्रसाद संपादन करून, नंतर पुढें गेला. ( राम श० पहा.)

**अगस्त्यतीर्थ**–दक्षिण समुद्राकडील एक प्रसिद्ध तीर्थ. ( नारीतीर्थ श० पहा.)

**अगस्त्यवट**–हिमालयावरील एक पवित्र स्थळ.

**अंगार**–एक राजा. याचें कुल आढळत नाहीं. मात्र याचें, मांधाता ना० राजाशीं मोठें युद्ध झालें होतें. त्यावरून हा, चालूं मन्वंतरांत झाला होता असें दिसतें. ( भार० शांति० अ० २९ ).

**अंगारक**–मंगळ नांवाचा ग्रह तो. हा, पूर्वीचा शिवपार्षद वीरभद्र होय. ( मत्स्य० अ० ७१ ).

२–सौवीर देशींचा एक सामान्य राजपुत्र तो. ( ३ जयद्रथ श० पहा. )

**अंगारका**–एक राक्षसी होती.

**अंगारपर्ण**–एक गंधर्व. हा, एकदां आपल्या कुंभीनसी आदिकरून स्त्रियांसहवर्तमान, रात्रिभागीं भूमीवरील आपल्या क्रीडावनांत क्रीडा करीत असतां, त्या स्थानावरून पांडवांस त्यांच्या मातेसह, यानें जातांना पाहिलें. पांडव रात्रिभागीं जाण्याचें कारण असें होतें कीं, ते लाक्षागृहांतून सुरक्षित निघाल्यावर, कांहीं काळपर्यंत एकचक्रा ना० नगरींत राहून, कौरवांस न कळावें या हेतूस्तव तेथून निघून, द्रौपदीस्वयंवराकरितां, गुप्तरूपानें पांचालपुराकडे चालले होते. तेव्हां अंगारपर्णानें, त्यांस

दटावून पुसलें कीं, तुम्ही मनुष्य असतां, व हा समय, तुमचा फिरण्याचा नसतां, कोठे चालला तें सांगा, नाहींतर मशीं युद्ध केल्याशिवाय, मी तुम्हांस जाऊं देणार नाहीं. तेव्हां, अर्जुन पुढें होऊन म्हणाला कीं, मी युद्धास सिद्ध आहें. त्यावरून अर्जुनाचें व याचें, बरेंच भाषण होऊन, थोडें युद्धही झालें. त्यांत अर्जुन हा मोठा योद्धा आहे, असें त्यास दिसून आल्यावरून त्यानें,आपल्या जवळची सूक्ष्मपदार्थदर्शक चाक्षुषी विद्या अर्जुनास देऊन, व त्याजवळची अग्निशिरास्त्र विद्या आपल्यास घेऊन, पांडवांशीं स्नेह संपादिला. नंतर त्यांस बरेंच दूरवर पोहोंचवून परतण्यास निघाला तेव्हां, तुम्ही इतःपर पुरोहितावांचून असें कधींही फिरत जाऊं नका, व धौम्य ऋषीस पुरोहित करा, असे सांगून आपल्या क्रीडास्थानास परत आला. ( भार० आदि० अ० १७०).

२–अंगारपर्णाचें वन तें.

**अंगारवाहिका**–भारतवर्षीय नदी. उगमादिकांचा ग्रंथांत उल्लेख आढळत नाहीं. (भार० भीष्म० अ० ९).

**अंगिरा**–स्वायंभुव मन्वंतरामध्यें, ब्रह्मदेवानें प्रजोत्पादनार्थ जे दश मानसपुत्र उत्पन्न केले होते, त्यांतील एक. हा ब्रह्मदेवाच्या मुखापासून उत्पन्न झाला होता. ( भाग०३ स्कं०अ० १२ श्लोक २२-२४) कर्दम प्रजापतीची कन्या श्रद्धा, ती याची स्त्री असून, तिचे ठायीं याजपासून बृहस्पति, उतथ्य, संवर्त, असे तीन पुत्र आणि सिनीवाली, कुहू, राका, अनुमति, अशा चार कन्या झाल्या होत्या. हा प्रायः स्वायंभुव मन्वंतर संपेपर्यंत होता असें वाटतें. पुढें त्याच मन्वंतरांत, सर्व ब्रह्ममानसपुत्र, कांहीं कारणास्तव महादेवाच्या शापानें मरण पावले, त्यांत हाही मरण पावला होता. ( महर्षि श० पहा. )

२–उत्तानपादवंशीय उल्मुक राजापासून, पुष्करिणी स्त्रीच्या ठायीं झालेल्या साहा पुत्रांतील पांचवा. ( स्वायंभू० वं०)

३–पूर्वीचे ब्रह्ममानसपुत्र, महादेवाच्या शापानें मरण पावले असतां, ब्रह्मदेवानें, त्यांस पुनः प्रजोत्पादन व्हावें एतदर्थ, या चालू वैवस्वत मन्वंतरारंभीं उत्पन्न केलें. त्यांत हा, वरुणाच्या यज्ञांत जे तीन ऋषि निर्माण झाले होते, त्यांतील एक असून, याला वारुणि अंगिरा अशी संज्ञा होती, व यास, त्या यज्ञांतील अग्नीनें, आपल्याकरितां पुत्रत्वेंकरून ग्रहण केलें होतें. ( मत्स्य० अ० १९४). त्यामुळें, मुख्य अग्नि, कांहीं कालपर्यंत भूमीवरून गुप्त झाला असतां, यानें स्वतः अग्नि होऊन, त्याचा अधिकार चालविला होता. ( भार० वन० अ० २१७).

यास, याच मन्वंतरांतील मरीचि ना० ऋषीची कन्या सुरूपा, ती स्त्री असून बृहस्पति, उतथ्य, पयस्य, शांति, घोर, विरूप, संवर्त, आणि सुधन्वा, असे आठ पुत्र झाले होते. ( भार० अनुशा० अ० ८५). हा, प्रस्तुतच्या मन्वंतरांत, प्रतिश्रावणमासीं असणाऱ्या द्वादशादित्यांतील एका आदित्यासमागमें संचार करण्यास असतो. ( नभ श० पहा. )

या अंगिरा ऋषीस, सुरूपा ना० स्त्रीपासून प्रथमतः आंगिरस नांवाचे दाहा देव उत्पन्न झाले होते. त्यांचीं नांवें, आत्मा, आयु, दम, दक्ष, सद, प्राण, हविष्मान् गविष्ठ, ऋत, आणि सत्य, अशीं होतीं. ( मत्स्य० अ० १९५).

याच्या कुलांत, यासुद्धां मंत्रद्रष्टे तेहेतीस ऋषि झाले होते. त्यांचीं नांवें अशीं होतीं.–मुख्य हा स्वतः, दुसरा तृत, तिसरा भरद्वाज, चौथा लक्ष्मण, ५ कृतवाच, ६ गर्ग, ७ स्मृति, ८ संकृति, ९ गुरुवीत, १० मांधाता, ११ अंबरीष, १२ युवनाश्व, १३ पुरुकुत्स, १४ स्वश्रव, १५ सदस्यवान्, १६ अजमीढ, १७ अस्वहार्य, १८ उत्कल, १९ कवि, २० पृषदश्व, २१ विरूप, २२ काव्य, २३ मुद्गल, २४ उतथ्य, २५ शरद्वान्, २६ वाजिश्रवा, २७ अपस्यौष, २८ सुचित्ति, २९ वामदेव, ३० ऋषिज अ० उशिज, ३१ बृहच्छुक्ल, ३२ दीर्घतमा आणि, ३३ कक्षिवान्. ( मत्स्य० अ० १४४ ).

याच्या कुलाच्या, केवलांगिरस, गौतमांगिरस, आणि भरद्वाजांगिरस, अशा मुख्य तीन वंशमालिका आहेत. यांतलि पहिलींत, हारीत, कुत्स, कण्व, रथीतर, विष्णुवृद्ध, आणि मुद्गल, असे भेद साहा. त्या प्रत्येकाचे प्रवर येणेंप्रमाणें.—हारितकुलोत्पन्न, **आंगिरस, आंबरीष, यौवनाश्व,** या तीन प्रवरांचे. कुत्सकुलोत्पन्न, **आंगिरस, मांधात्र, कौत्स,** या तीन प्रवरांचे. याचप्रमाणें कण्वकुलोत्पन्न, **आंगिरस, अजामीढ, काण्व.** रथीतरकुलोत्पन्न, **आंगिरस, वैरूप, रथीतर.** आणि **आंगिरस, वैरूप, पार्षदश्व.** अशा उभय त्रिप्रवरांचे. विष्णुवृद्धकुलोत्पन्न **आंगिरस, पौरुकुत्स, त्रासदस्यु** आणि मुद्गलकुलोत्पन्न, **आंगिरस, भार्म्याश्व, मौद्गल्य,** व **आंगिरस, तार्वि, मौद्गल्य,** अशा दोन भेदांनीं त्रिप्रवरांचे होत.

दुसरी, गौतमांगिरसवंशमालिका. तिचे भेद दाहा. ते असेः—आयास्य, शारद्वत, कौमंड, दीर्घतमस, करेणुपालि, वामदेव, औशनस, राहूगण, सोमराजक आणि वृहदुक्थ यांची प्रवरव्यवस्था अशीः—आयास्यकुलोत्पन्नः—**आंगिरस, आयास्य, गौतम.** शारद्वतकुलोत्पन्न, **आंगिरस, गौतम, शारद्वत.** कौमंडकुलोत्पन्न **आंगिरस औतथ्य, काक्षिवत्, गौतम, कौमंड. आंगिरस, औतथ्य, गौतम, औशिज, काक्षिवत्.** आणि **आंगिरस, आयास्य, औशिज, गौतम, काक्षिवत्.** अशा तीन भेदांनीं पंचप्रवरांचे. अथवा, **आंगिरस, औतथ्य, काक्षिवत्.** आणि **औतथ्य, गौतम, कौमंड,** अशा दोन भेदांनीं त्रिप्रवरांचे होत. दीर्घतमसकुलोत्पन्न, **आंगिरस, औतथ्य, काक्षिवत्, गौतम, दैर्घतमस,** असे पंचप्रवरांचे, किंवा, **आंगिरस, औतथ्य, दैर्घतमस,** अशा त्रिप्रवरांचे होत. करेणुपालिकुलोत्पन्न, **आंगिरस, गौतम, करेणुपाल.** वामदेवकुलोत्पन्न **आंगिरस, वामदेव्य, गौतम** आणि **आंगिरस, वामदेव्य, वार्हदुक्थ,** अशा दोन भेदांनीं त्रिप्रवरांचे होत. औशनसकुलोत्पन्न, **आंगिरस, गौतम, औशनस.** राहूगणकुलोत्पन्न, **आंगिरस, राहूगण, गौतम.** सोमराजककुलोत्पन्न, **आंगिरस, सोमराजक, गौतम.** आणि वृहदुक्थकुलोत्पन्न, **आंगिरस, वार्हदुक्थ, गौतम.** अशा क्रमानें तीन प्रवरांचे होत.

तिसरी, भरद्वाजांगिरसवंशमालिका. तिचे भेद चार-ते असे.—भारद्वाज, गर्ग, ऋक्ष, आणि कपि. त्यांची प्रवरव्यवस्था अशी.—यांत भारद्वाजकुलोत्पन्न ऋषि, व त्यांचे प्रवर असे.—उतथ्य दुसरा, गौतम दुसरा, तौलेय, अभिजित्, सार्द्धनेमि, लौगाक्षि, क्षीर, कौष्ठिकी, राहुकर्णि, सौपुरि, कैराति, सामलोमकि, पौषजिति, भार्गवत्, ऐरीडव, कारोटक, सजीवी, उपबिंदु, सुरैषि वाहिनीपति, वैशालि, क्रोष्टा, आरुणायनि, सोमोत्रायनि, कासोरु, कौशल्य, पार्थिव, रौहिण्यायनि, रेवाग्नि, मूलप, पांडु, क्षपाविश्वकर, अरि, आणि पारिकारारि. हे सर्व **आंगिरस, औतथ्य, औशिज,** या तीन प्रवरांचे होत. गर्गकुलोत्पन्न, **आंगिरस, वार्हस्पत्य, भारद्वाज, शैन्य, गार्ग्य,** अशा पांच, किंवा, **आंगिरस, शैन्य, गार्ग्य,** अशा तीन प्रवरांचे होत. यांत, **आंगिरस, तैत्तिरी, कापिभुव,** असाही एक भेद आहे. ऋक्षकुलोत्पन्न, **आंगिरस, वार्हस्पत्य, भारद्वाज, वांदन, मातवचस,** असे पांच, किंवा, **आंगिरस, वांदन, मातवचस,** असे तीन मिळून उभय भेदानें अशा प्रवरांचे होत. कपिकुलोत्पन्न, **आंगिरस, आमहय्य, औरक्षय्य,** अशा तीन प्रवरांचे होत.

आणखी यांतच कित्येक ऋषि आढळतात. ते असे.—आत्रेयायनि, सौवेष्ट्य, अग्निवेश्य, शिलास्थलि, वालिशायनि, ऐकेपि, वाराही, बाष्कलि, सौटि, त्रिकर्णि, प्रावहि, आश्वलायनि, दुसरा वाराहि, बर्हिसादि, शिखाग्रीवि, काराकि, महाकापि, उडुपति, कौंचकि, धूमित, पुष्पान्वेषि, ब्रह्मतन्वि, सोमतन्वि, सालडि, बालडि, देवरारि, देवस्थानि, हारिकर्णि, सरद्रवि, प्रावेपि, सायसुग्रीवि, गोमेदगंधिक, मत्स्याच्छाद्य, मूलहर, फलाहार, गंगोदधि, कौरुपति, कौरुक्षेत्रि, नायकि, जैत्यद्रोणि, जैव्हलायनि, आपस्तंबि, मौंजवृष्टि, मार्ष्टपिंगलि, पैल, शालंकायनि, द्व्याख्येयव, आणि मारुत, हे सर्व, **आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज** या तीन प्रवरांचे होत.

कपीतर, स्वस्तितर, दाक्षि, शक्ति,पतंजलि, भूयसि, जलसंधि, बिंदु, मादि, कुसीदाकि, ऊर्व, राजकेशी, वौषडि, शंसपि, शालि, कलशीकंठ, कारीरय, काव्य, धान्यायनि, भावास्यायनि,भारद्वाजि, सौबुधि, लध्वि, देवमति, दुसरा अंगिरा, दम, बाह्य, उरुक्षय, परस्परायणि, अपर्णि, लौक्षि, गार्ग्य, हरि, गालवि, पूतिमाष, आणि तंडि. हे सर्व, **आंगिरस, सांकृत्य, गौरवीति** अशा तीन प्रवरांचे होत.

विष्णुवृद्धि, शिवमति, जतृण, कतृण, पुत्रव,आणि वैरपरायण, हे **आंगिरस, मात्स्यदग्ध, मौद्गल्य,** या तीन प्रवरांचे. हंसजिव्ह, अग्निजिव्ह, देवजिव्ह, विराडप, अपाग्नेय, अश्वयु, परण्य, स्तावि, दुसरा मौद्गल्य, हे, **आंगिरस, तांडि, मौद्गल्य,** या तीन प्रवरांचे. अपांडु, गुरु, शाकटायन, प्रागाथ, मानारि, मार्कंड, अमरण, शिव, कटु, मर्कटप, नाडायन, श्यामायन, हे, **आंगिरस, आजमीढ, काट्य,** या तीन प्रवरांचे होत.

**आंगिरस, भारद्वाज, बार्हस्पत्य मैत्रावर, मानव,** आणि **आंगिरस, बार्हस्पत्य भारद्वाज, मौद्गल्य, शैशिर,** असे पंचप्रवरांचे दोन भेद, अंगिराकुलांतीलच होत, परंतु गार्ग्य, ऋक्ष, भरद्वाज, हुत, आक्षील, आणि शौंग हे अंगिरसगोत्रांत परगोत्रांतून आल्यामुळें, द्व्यामुष्यायण म्हणजे द्विगोत्री असे समजावेत.

४–एक ब्रह्मर्षि, हा, जनमेजयाच्या सर्पसत्रांत ब्रह्मा नांवाचा ऋत्विज झाला होता. ( ६ जनमेजय श० पहा. )

**अंगोरिष्ट**–एक राजर्षि, याचें कुल आढळत नाहीं.

**अग्नि**–ब्रह्मदेवानें, जीं पंचमहाभूतें निर्माण केलीं,त्यांतील तेज ना० तिसऱ्या महद्भूताची मूर्तिमान् देवता. स्वायंभुव मन्वंतरांत, जो ब्रह्ममानसपुत्र दक्ष प्रजापति होता,त्याच्या सोळा कन्यांतील जी स्वाहा ना० कन्या ती याची स्त्री होती. आणि तिजपासून यास, स्वारोचिष ना० पुत्र, व सुच्छाया ना० कन्या झाली होती. त्यांतून कन्या, उत्तानपादपुत्र जो ध्रुव, त्याच्या शिष्ट ना० पुत्रास दिली असून पुत्र जो होता तो दुसरा मनु झाला होता. याशिवाय, पावक, पवमान्, आणि शुचि, असे याचे तीन पुत्र असून, त्यांपासून पंचेचाळीस अग्निदेवता, कार्यांच्या भिन्नतेनुरूप, भिन्न नामांनीं प्रसिद्ध आहेत. ( भाग० अष्टम० अ० १ ).

चालू वैवस्वत मन्वंतरामध्यें, वरुणानें ( आप ना० महद्भूताच्या मूर्तिमान् देवतेनें ) ब्रह्मदेवास ऋत्विज करून, यज्ञ केला असतां त्यांत तीन ऋषि निर्माण झाले, त्यांतून भृगु ऋषीस, वरुणानें, कवि ऋषीस, ब्रह्मदेवानें, पुत्रत्वेंकरून ग्रहण केलें. त्याचप्रमाणें यानेंही अंगिरा ऋषीस, पुत्रत्वानें ग्रहण केलें होतें. या अग्नीस, ब्रह्मदेवानें कल्पारंभीं, पूर्व आणि दक्षिण, या दोन दिशांमधील दिशेचें स्वामित्व दिलें होतें म्हणून, याच्या संबंधानें त्या दिशेस आग्नेयी दिशा, असें नांव पडलेलें अजून चालत आहे.

पूर्वी, श्वेतकी राजानें, अपरिमित यज्ञ केले. त्यांतील हविभक्षणानें यास जाड्य होऊन, त्याचा निरासोपाय विचारण्यास हा ब्रह्मदेवाकडे गेला, त्या काला, भूमीवर द्वापरयुग समाप्त होत आलें होतें, असें जाणून, त्यांनीं यास सांगितलें कीं, प्रस्तुत भूमीवर कृष्णार्जुन अवतरले आहेत, त्यांकडे तूं जाऊन खांडव ना० वन भक्षणार्थ माग. म्हणजे तें तूं भाक्षिल्यानें, झालेल्या व्याधीपासून त्वरित मुक्त होशील. त्यावरून ब्राह्मणवेषानें, यानें, कृष्णार्जुनांकडे येऊन, तें वन भक्षणार्थ मागितलें. त्या कालीं उभयतांनीं, तथास्तु म्हणून सांगितलें कीं, आम्हापाशीं रथादि साहित्याची न्यूनता आहे, तेवढी कृपा करून देण्यांत यावी. त्यावरून अग्नीनें, वरुणाजवळून कपिध्वजयुक्त एक दिव्य रथ, व गांडीव नांवाचें धनुष्य, मागून आणून अर्जुनास, आणि वज्रनाभ नांवाचें चक्र, व कौमोदकि ना० गदा, कृष्णास दिली. तेणेंकरून उभयतांही संतुष्ट होऊन, त्यांनीं यास वनांत प्रवेश करून, तें भक्षण्याची आज्ञा केली. त्यावरून, तें वन अग्नि यथेच्छ भक्षण करूं लागला. हें वर्तमान इंद्रास कळतांच, तो अग्नीचें निवारण करण्यास आला असतां, कृष्णार्जुनांनीं त्याचा पराभव करून, परत लाविलें. त्यामुळें अग्नीनें, तें वन पंधरा दिवसपर्यंत आतृप्त भक्षण करून झालेल्या जाड्यापासून मुक्त झाला. ( भार० आदि० अ० २२४–२२५ ).

२–गत झालेल्या तामस ना० चौथ्या मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक ऋषि ( मत्स्य० अ० ९ ).

३–चौदाव्या इंद्रसावर्णि मन्वंतरांत, जे सप्तर्षि होणार आहेत, त्यांत होईल ऋषि तो. ( इंद्रसावर्णि श० पहा. )

**अग्निकेतु**–रावणपक्षीय दोन राक्षस. हे दोघेही युद्धांत रामाच्या हातून मरण पावले होते. (वा० रा० युद्ध० स० ९ आणि स० ४३ ).

**अग्निजिव्ह**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा. )

**अग्नितीर्थ**–यमुनेच्या दक्षिणभागीं असणारें भारतवर्षीय तीर्थ.

**अग्निधारा**–गौतमवनासमीपचें भारतवर्षीय तीर्थ.

**अग्निभू**–षडानन. ( कार्तिकेय श० पहा. )

**अग्निवर्ण**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ध्रुवसंधि राजाचा पौत्र, व सुदर्शन राजाचा पुत्र तो, यास, शीघ्र नांवाचा पुत्र होता.

**अग्निवेश्य**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा. )

२–( सू० वं० ) नरिष्यंतकुलोत्पन्न देवदत्त राजाचा पुत्र, यास जातूकर्ण्य, व कानीन अशीं नामांतरें ग्रंथांत असून, हा, तपानें ब्राह्मण झाला होता. त्यामुळें याजपासून झालेल्या संततीस, अग्निवेश्यायन असें नांव पडलें होतें.

३–अगस्त्य ऋषीचा एक शिष्य, यापासून द्रोणाचार्यानें धनुर्वेदाची शिक्षा व ब्रह्मशिर ना० अस्त्र, संपादन केलें होतें. हा अग्निवेश्य ऋषि, पांडवांसमागमें कांहीं-काळ द्वैतवनांत होता.

४–भारती युद्धांत, पांडवांकडे या संज्ञेचे जे राजे होते, तो प्रत्येक.

**अग्निशर्मायण**–एक ब्रह्मर्षि, व त्याचा वंशज तो. ( २ कश्यप श० पहा. )

**अग्निशिर**–काम्यक वनाच्या उत्तरेकडे असणारें तीर्थ.

येथें संजयपुत्र, संजय ना० राजानें, शम्याक्षेप नांवाचा यज्ञ केला होता. तसेंच भरत राजानेंही एकशें अठेचाळीस यज्ञ केले होते. ( भार० वन० अ० ९० ).

२–एका अस्त्रविशेषाचें नांव.

**अग्निष्टुत**–( १ अग्निष्टोम श० पहा. )

**अग्निष्टोम**–चक्षुर्मनूस नड्वलेपासून झालेल्या अक्रा पुत्रांतील सातवा. यास, ग्रंथांतरीं अग्निष्टुत असें म्हटलें आहे. ( स्वायंभूमनु श० पहा.)

२–एका यज्ञविशेषाचें नांव.

**अग्निष्वात्त**–पितृगणांतलि एका भेदविशेषाचे पितर. हे, कश्यप ऋषींचे पुत्र असून, मुख्यत्वेंकरून देवांस पूज्य आहेत. ( मत्स्य० अ० १४–१५ ).

**अघ अ० अघासुर**–कंसाचा अनुचर एक राक्षस. हा बकासुर, आणि पूतना राक्षसी, यांचा भ्राता होता. कंसानें, यास गोकुलांत कृष्ण, व बलराम, यांच्या नाशार्थ पाठविलें असतां, यानें, तेथें जाऊन, चार योजनें लांबीचा सर्पदेह धारण केला, व कृष्ण, आणि इतर गोप यांच्या गायी चारण्याच्या मार्गांत आपलें शरीर पसरिलें. तसेंच आपलें मुख यानें इतकें विस्तीर्ण केलें होतें कीं, ती मोठी गुहा, व गायी चारण्यास योग्य स्थल आहे, असें संपूर्ण गोपांस वाटून, ते तींत गायींसहवर्तमान प्रवेशले. हें, कृष्णानें दुरून अवलोकन करून, तो तत्काल तेथें आला, व याच्या मुखांत प्रवेशून, मोठा देह धारण करून, त्यानें याचें मुख फाडिलें. तेणेंकरून हा तत्काल मरण पावला. ( भाग० दशम० अ० १२ ).

**अघमर्षण**–एक ऋषि, व त्याचें कुल. ( १ विश्वामित्र श० पहा. )

२–एक ऋषि. ( २ अत्रि श० पहा.)

३–विंध्यपर्वतासमीपचें एक तीर्थ. येथें प्राचेतस दक्षानें दीर्घ कालपर्यंत तप केलें होतें. ( भाग० षष्ठ० अ० ४ ).

**अचल**–दुर्योधनाचा मातुल जो शकुनि, त्याचा भ्राता. हा, वृषक आदिकरून आपल्या पन्नास बंधूंसहवर्तमान भारती युद्धांत अर्जुनाच्या हातून मरण पावला होता. ( भार० द्रोण० अ० ३० ).

**अचला**–महेंद्रपर्वतापासून निघालेली भारतवर्षीय नदी. ( मत्स्य० अ० ११३ ).

**अच्युत**–ज्यास च्युति म्हणजे पतन नाहीं, असा जो परमात्मा तो.

**अच्युतायु**–भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा, दीर्घायु ना० राजाचा पिता. हा, अर्जुनाच्या हातून मरण पावला होता. ( भार० द्रोण० अ० ९३ ).

**अच्छोद**–हिमालयावरील सरोवर.

**अच्छोदका**–भारतवर्षीय नदी. ग्रंथांत उगम आढळत नाहीं. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**अच्छोदा**–पितरांची मानसकन्या. ( आमावसु श० पहा.)

२–भारतवर्षीय नदी. उगम आढळत नाहीं. ( भारत. भीष्म० अ० ९ ).

**अज**–ज्यास जन्म नाहीं असा परमात्मा.

२–प्रियव्रतवंशीं ऋषभदेवकुलांत जन्मलेला जो प्रतिहर्त्ता ना० राजा, त्यापासून स्तुतिसंज्ञक भार्येच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. ( स्वायंभूम० वं० पहा. )

३–एक ऋषि, व त्याचें कुल. ( १ विश्वामित्र श० पहा.)

४–(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न रघुराजाचा पुत्र. याचा पुत्र दशरथ राजा.

५–(विदे० वं०) ऊर्ध्वकेतु ना० जनकाचा पुत्र, व पुरुजित् जनकाचा पिता.

६–(सो० वं०) विजयकुलोत्पन्न जन्हु राजाचा पुत्र जो पूरुराजा, त्यासच हें नामांतर.

७–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा. ( भार० उद्योग० अ० १७१ ).

**अजक**–दनुपुत्र एक दानव.

२–( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न बलाकाश्व राजाचा पुत्र, कुश अ० कुशिक राजाचा पिता.

**अंजक**–दनुपुत्र एक दानव.

**अजगव**–महादेवाच्या धनुष्याचें मुख्यत्वेंकरून नांव, यांशिवाय मांधाता राजा, व पृथुराजा, यांचींही धनुष्यें याच नांवाचीं असत. यांत महादेवाच्या धनुष्यास पिनाक अशी विशेष संज्ञा आहे.

**अजन**–तेरा सैंहिकेयांतील एक असुर. ( २ सैंहिकेय श० पहा. )

**अंजन**–अष्टदिग्गजांतील पश्चिम दिग्गज. आणि भारतवर्षीय पर्वत, यावर असित ऋषीचा आश्रम होता.

**अंजनपर्वा**–भीमसेन पांडवाचा पौत्र, व घटोत्कचाचा पुत्र तो. हा, जयद्रथवधानंतर रात्रियुद्ध झालें, त्यांत अश्वत्थाम्याच्या हातून मरण पावला होता. ( भार० द्रोण० अ० १५६ ).

**अंजना**–कुंजर ना० वानराची कन्या, व केसरी वानराची स्त्री, ही, पूर्वीची पुंजिकस्थलि ना० अप्सरा असून, शापानें या जन्मास पृथिवीवर आली होती. एकदां, ही, पर्वतशिखरावर स्थित असतां, वायूच्या योगानें हिचें वस्त्र किंचित् उडालें, तेणेंकरून हिचे शरीरावयव वायुदेवतेच्या दृष्टीस पडून, त्यास कामाविर्भाव झाला, व तो हिला आलिंगन द्यावयासाठीं प्रकट होऊन, हिचें समीप उभा राहिला. तें अवलोकन करून, ही त्यास म्हणाली कीं, माझ्या पातिव्रत्याचा भंग करूं नको. तें हिचें भाषण ऐकून तो हीस म्हणाला, भय पावूं नको, स्वस्थ ऐस, मी तुझ्या पातिव्रत्याचा भंग करीत नाहीं. मात्र माझ्या संकल्पापासून तुला, मत्तुल्य परमपराक्रमी असा पुत्र होईल. इतकें बोलून, वायु अंतर्धान पावला असतां, ही, कालेंकरून पतीपासून गर्भिणी होऊन, पुत्रास प्रसवली. तो पुत्र मारुत म्हणजे वायु त्याच्या प्रसादानें झाला, म्हणून त्याचें नांव मारुति असें पडलें. ( वा० रा० किष्किं० स० ६६ ).

**अजनाभपर्वत**–जंबुद्वीपस्थ एक पर्वत.

**अजनाभवर्ष**–प्रियव्रतपुत्र अग्नीध्र राजा, त्याच्या नाभि ना० ज्येष्ठ पुत्राचा वर्ष तो, यासच भरतवर्ष असें नांव पुढें पडलें, तें अजून चालत आहे. (भरतवर्ष श० पहा.)

**अजःपाति**–एक ब्रह्मर्षि, व त्याचें कुल. ( कृष्णपराशर श० पहा ).

**अजमीढ**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा. )

२–( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न जन्हुराजाचा पुत्र पूरु, त्याचें नामांतर.

३–( सो० वं० ) नहुषपुत्र ययाति राजा, त्याच्या पुरु ना० पुत्राच्या वंशांत जन्मलेल्या हस्तिराजाच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. यास, नीलिनी, भूमिनी, धूमिनी, आणि केशिनी, अशा चार स्त्रिया होत्या. व त्यांपासून झालेल्या संततीस, अजमीढ असें साधारण नांव होतें. याच्या वंशाची वृद्धि करणारे प्रियमेध, ऋक्ष, बृहदिषु, आणि नील, असे चार पुत्र होते. त्यांतून पहिल्याची संतति तपानें ब्राह्मण झाली, दुसऱ्याच्या वंशांत जरासंधादि राजे, व कौरवपांडव झाले, तिसऱ्याच्या वंशास बार्हदिषव राजे अशी संज्ञा होती, व चौथ्याच्या वंशांत, द्रुपदादिक पांचाल राजे, आणि मुद्गलसंज्ञक ब्राह्मण झाले होते.

**अजस्य**–एक ऋषि.

**अजातशत्रु**–ज्याचें कोणाशींहीं शत्रुत्व नाहीं तो. ही संज्ञा, भारतामध्यें युधिष्ठिरास फार आढळते.

**अजामिल**–पूर्वी, कान्यकुब्ज देशांत राहणारा एक ब्राह्मण होता. यानें मातापितरांचा, व विवाहित स्त्रीचा त्याग करून, एक शूद्र स्त्री बाळगून, तिच्याशीं विषयसेवन करण्यांत आपलें अमूल्य आयुष्य प्रायः घालविलें. एकदां यानें, तिला झालेल्या संततींतील नारायण ना० कनिष्ठ पुत्रास सहजरीत्या हाक मारण्याच्या संधीस, विष्णुदूतांचा, व यमदूतांचा संवाद श्रवण केला. तो केवळ, याच्याच विषयींचा असल्यामुळें, यास अनुताप होऊन, यानें, त्या दासीचा, व तिच्या संततीचा तत्काळ त्याग करून, उर्वरित आयुष्य गंगाद्वारीं जाऊन भगवद्ध्यानांत घालविलें. त्या योगानें देहप्राणाच्या वियोगांतीं, यास उत्तम लोकाची प्राप्ति झाली. ( भाग० षष्ठ० अ० १–२ ).

**अजामुखी**–लंकेंतील अशोकवनिकेंत, सीतासंरक्षणार्थ असलेल्या राक्षसींतील एक राक्षसी. (वा० रा० सुंदर० स० २४ ).

**अजित्** अ० **अजित**–परमात्मा.

२–चाक्षुष मन्वंतरांतील विष्णूचा अवतार. ( चक्षुर्मनु श० पहा. )

**अजिव्हिका**–लंकेच्या अशोकवनिकेंतील राक्षसी. (भार० वन० अ० २८० ).

**अजीगर्त**–भृगुकुलोत्पन्न एक ब्राह्मण. यास, शुनःपुच्छ, शुनःशेप, शुनोलांगूल, असे तीन पुत्र होते. त्यांतील मध्यमपुत्र शुनःशेप त्यास, यानें, वरुणास बलि देण्याकरितां हरिश्चंद्रराजास विकलें होतें. ( हरिश्चंद्र श० पहा. )

**अजैकपात**–एक रुद्र. ( एकादशरुद्र श० पहा. )

**अजैकपाद**–एक यज्ञकर्मसंबंधीं अग्नि आहे.

**अटवीपुरी**–पांडवांच्या वेळेस कलिंग देशाच्या दक्षिणेस असणारी नगरी.

**अट्टहास**–भारतवर्षीय तीर्थ.

**अठिद**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**अणिमा**–अष्टमहासिद्धींतील एक सिद्धि.

**अणिमांडव्य**–मांडव्य ऋषीसच नामांतर. ( मांडव्य श० पहा. )

**अणुह**–( सो० वं० ) नहुषकुलोत्पन्न ययातिपुत्र पूरुराजा, तद्वंशीय विभ्राज अ० पार राजाचा पुत्र, यास, ग्रंथांतरीं नीप, असें नामांतर असून, पृथुसेनाचा हा, कनिष्ठ

बंधु होता, व याला, शुक्राचार्याची कन्या कृत्वी अ० कीर्तिमती, ती स्त्री होती. ( नीप श० पहा.)

**अंतक**–जगसंहारकर्त्री परमेश्वराची मूर्ति. ही संज्ञा यमधर्मासही आहे.

**अंतर्गिरि व बहिर्गिरि**–देश वि०, ज्यामध्यें अनेक पर्वत असतात, तो अंतर्गिरि; व ज्यास अनेक पर्वतांचें आवरण असतें, तो बहिर्गिरि; हे दोन देश जवळ जवळ असल्याविषयीं भारतांत लिहिलें आहे. ( भार०सभा० अ० २७ ).

**अंतचार**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**अंतर्धान**–उत्तानपादवंशीय वेनपुत्र पृथुराजा,त्याच्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ जो विजिताश्व, त्यासच हेंही नांव होतें. हें नांव यास, अंतर्हित होण्याच्या शक्तीमुळें पडलें होतें. ( स्वायंभूस० वं० )

**अंतरिक्ष**–स्वायंभू मनूच्या वंशांत जन्मलेल्या, ऋषभदेवाच्या शतपुत्रांतील, जे नऊ पुत्र ब्रह्मवेत्ते होते, त्यांतील एक ( ऋषभदेव श० पहा. )

२– ( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न पुष्कर अ० किन्नराश्व राजाचा पुत्र तो. यास, सुतपा, सुषेण, आणि सुमित्र, असे तीन पुत्र होते.

३–मुरना० असुराच्या सात पुत्रांतील दुसरा. हा, कृष्णाच्या हातून मरण पावला होता. ( नरकासुर श० पहा. )

**अंतरिक्ष**–चालू वैवस्वत मन्वंतरांतल्या, तेराव्या चौकडींत झाला होता व्यास तो. ( व्यास श० पहा. )

**अतिकाय**–धान्यमालिनी ना० स्त्रीपासून, रावणास झालेला पुत्र. याचें शरीर, अतिस्थूल होतें म्हणून यास हें नांव पडलें होतें. यानें ब्रह्मदेवाचें आराधन करून तो प्रसन्न झाल्यावर, अस्त्रें, कवचें, दिव्यरथ, आणि सुरांसुरांपासून अवध्यत्व इ० संपादिलें होतें म्हणून इंद्राचा पराभव केला, व वरुणास जिंकून त्याचा पाशही आणिला. रावणास याचें मोठें साह्य होतें. कुंभकर्ण मरण पावल्यावर, हा, युद्धार्थ रामासंमुख आला असतां, लक्ष्मणानें, याशीं घोर युद्ध करून, यास मारिलें. ( वा० रा० युद्ध० स० ७१ ).

**अतिथि**–अत्रिकुलांतील एक ऋषि, व त्याचें कुल. ( २ अत्रि श० पहा. )

२–( सू० वं० ) यक्ष्वाकुकुलोत्पन्न दाशरथि रामाचा पौत्र, व कुशाचा पुत्र तो. याचा पुत्र निषध.

**अतिनामा**–चाक्षुष मन्वंतरांतल्या सप्तऋषींतील एक.

**अंतिनार**–अंतिभार राजासच नामांतर होतें.

**अतिबाहु**–प्राधेपासून झालेल्या गंधर्वांतील एक.

**अतिभानु**–सत्यभामा आणि कृष्ण यांचा पुत्र.

**अंतिभार**–( सो० वं० ) नहुषकुलोत्पन्न ययातिपुत्र पूरु, त्याच्या वंशांत जन्मलेल्या रौद्राश्वर राजाचा पौत्र, व ऋतेयूचा पुत्र तो. यास, अंतिनार, मतिनार, अशीं नामांतरें ग्रंथांतरीं आढळतात. व याला मनस्विनी ना० स्त्रीपासून, सुमति, ध्रुव, आणि अप्रतिरथ, असे तीन पुत्र झाले होते.

**अतिरात्र**–चक्षुर्मनूस, नड्वलेपासून झालेल्या अक्रा पुत्रांतील आठवा. ( स्वायंभूस० वं० ).

२–यज्ञविशेषाचें नांव.

**अतीताध्यात्म**–यजुर्वेदोपनिषत्.

**अत्यग्निष्टोम**–यज्ञवि०.

**अत्युष्ण**–भारतवर्षीय तीर्थ.

**अत्रि**–स्वायंभुव मन्वंतरांमध्यें, प्रजोत्पादनार्थ, ब्रह्मदेवानें जे दश मानसपुत्र निर्माण केले होते, त्यांतील हा एक असून ब्रह्मदेवाच्या नेत्रांपासून उत्पन्न झाला होता. व यास कर्दम प्रजापतीच्या कन्यांतील अनसूया ना० कन्या, ती स्त्री होती. तसेंच तिचे ठायीं दत्त, दुर्वासा, आणि सोम, असे तीन पुत्र झाले होते. पुढें त्याच मन्वंतरांत, सर्व ब्रह्ममानसपुत्र महादेवाच्या शापानें मरण पावले, त्यांत हाही मरण पावला होता. ( महर्षि श० पहा. )

२–पूर्वीचे ब्रह्मपुत्र मरण पावले असतां, ब्रह्मदेवानें,त्यांस, चालू वैवस्वत मन्वंतरारंभीं, पुनः उत्पन्न केलें, त्यांत हा, ब्रह्मदेवानें स्वतः यज्ञ केला, त्यांतील अग्नीच्या अर्चि ( ज्वाला ) त्यांपासून उत्पन्न झाला होता. येथेंही यास, अनसूयाच स्त्री होती. मात्र दत्त, दुर्वासा, सोम, आणि अर्यमा, असे चार पुत्र, व अमला ना० महाब्रह्मनिष्ठ कन्या, अशीं अपत्यें होतीं. हा प्रस्तुत, प्रतिज्येष्ठमासीं असणाऱ्या द्वादशादित्यांतलि एका आदित्यासमागमें संचार करीत असतो. ( ५ शुक्र श० पहा. )

दाशरथि राम, दंडकारण्यांत चालला असतां याच्या आश्रमास गेला होता.त्या कालीं यानें,त्याचें उत्तम प्रकारानें आदरातिथ्य केलें होतें. तसेंच अनसूयेनेंही सीतेचें आतिथ्य करून, तिला पातिव्रत्यविषयक नीति सांगितली होती. पुढें, राम जाण्यास निघाला असतां, सीताही निघाली तेव्हां, तिला, मार्गसंबंधीं श्रम, व राक्षसांपासून भीति इ० होऊं नयेत, म्हणून अनसूयेनें अंगरागादिक उत्तम उत्तम वस्तु दिल्या. नंतर अत्रीनें

सीता व लक्ष्मण यांसहित रामास दंडकारण्याचा मार्ग दाखवून, मार्गस्थ केलें. (वा० रा० अयो० स० ११७–११९ ).

याच्या कुलांत यासहित मंत्रद्रष्टे ऋषि साहा होते. ते असे.–मुख्य स्वतः हा, अर्चनन, श्यावाश्व, गविष्ठिर, कर्णक, आणि पूर्वातिथि. (मत्स्य० अ० १४४).

याच्या वंशाची वृद्धि करणारे ऋषि नऊ. ते असे.–अत्रि, गविष्ठिर, वाद्भुतक, मुद्गल, अतिथि, वामरथ्य, सुमंगल, बीजवाप, आणि धनंजय.यांत अत्रिवंशांतील ऋषि, व त्यांची प्रवरव्यवस्था अशी.—उद्दालकि, शोण, कर्णिरथ, शौक्रतु, गौरग्रीव, गौराजिन, चैत्रायण, अर्द्धपण्य, वामरथ्य, गोपन, तार्किबिंदु, कर्णजिव्ह हरप्रीति, नैद्राणि, शाकलायनि, तैलप, वैलेय, दुसरा अत्रि, गोणिपति, जलद, भगपाद, सौपुष्पि, आणि छंदोगय हे सर्व, **आत्रेय, श्यावाश्व, आर्चनानस**, अशा तीन प्रवरांचे होते.

गविष्ठिरकुलोत्पन्न, दाक्षि, बालि, पर्णवि, ऊर्णनाभि, शिलार्दनि, बीजवापि, शिरीष, मौंजकेश, दुसरा गविष्ठिर, आणि भलंदन हे सर्व, **आत्रेय, गाविष्ठिर, पौर्वातिथ** आणि **आत्रेय, गाविष्ठिर, आर्चनानस** अशा दोन भेदांनीं त्रिप्रवरांचे होते. वाद्भुतककुलोत्पन्न **आत्रेय, आर्चनानस, वाद्भुतक** अशा त्रिप्रवरांचे. मुद्गलोत्पन्न, **आत्रेय, आर्चनानस, पौर्वातिथ**, अशा त्रिप्रवरांचे. धनंजयकुलोत्पन्न **आत्रेय, आर्चनानस, धानंजय**, अशा त्रिप्रवरांचे. आणि **अतिथि, वामरथ्य, सुमंलग, बीजवाप**, या चारहि कुलोत्पन्नांस **आत्रेय, आर्चनानस, आतिथ**, आणि **आत्रेय, आर्चनानस, गाविष्ठिर**, अशा दोन भेदांनीं तीन प्रवर असतात. मात्र यांत सुमंगलकुलास, **आत्रेय, सुमंगल, श्यावाश्व** असा विशेष असतो.

कालेय, वालेय, वामरथ्य, धात्रेय, मैत्रेय, कौद्रेय शौत्रेय, इत्यादिक, ऋषि, अत्रीच्या कन्यावंशांतील होत म्हणून, यांस **आत्रेय वामरथ्य, पौत्री**, असे तीन प्रवर असतात. ( मत्स्य० अ० १९६ ). या कन्याकुलांतील वंशांशीं, विश्वामित्र आणि वासिष्ठ, यांतील कुलोत्पन्नांचा विवाह होत नाहीं.

३--चालू वैवस्वत मन्वंतरांतल्या एकोणिसाव्या चौकडींत झालेला व्यास. ( व्यास श० पहा. ) हा व्यास होऊन गेलेला अत्रि, अमुक असा निश्चय करतां येत नाहीं, म्हणून असें वाटतें कीं, वसिष्ठ आणि अंगिरा, या दोन कुलांत दोन अत्रि आढळतात, त्यांतील एक असावा.

४–चालू मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक. हाही वर सांगितलेल्या दोहोंतील एक असावा.

५--गौतम ऋषीचा मित्र एक ऋषि, हा द्वितीयार्थक जो शुक्र त्याच्या चार पुत्रांत दुसरा पुत्र अत्रि आहे, तोच असावा असें वाटतें. हा अत्रि, एकदां वेनकुलोत्पन्न एका राजाच्या यज्ञांत द्रव्ययाचनेकरितां गेला, आणि तेथें राजाची यानें तूं केवळ ईश्वरच आहेस, अशी स्तुति केली. तिचा गौतमानें बाह्यात्कारीं तिरस्कार करून यास म्हटलें कीं, राजाची ईश्वराशीं साम्यता करून, स्तुति करणें योग्य नाहीं. तेव्हां, दोघांतून कोणाचें म्हणणं खरें, असा त्या सभेंत वाद पडला. शेवटीं यथार्थ निर्णय व्हावा म्हणून, कांहीं सदस्य सनत्कुमारांकडे गेले व झालेलें वर्तमान त्यांनीं त्यांस सांगितलें, तें ऐकून सनत्कुमारांनीं अत्रीचें म्हणणें खरें असें सांगतांच,त्यांनीं परत येऊन, तें म्हणणें राजास कळविलें, त्यावरून राजा संतुष्ट होऊन, त्यानें यास इच्छेपेक्षां अधिक द्रव्य देऊन मार्गस्थ करतांच हा आपल्या आश्रमास परत आला. ( भार० वन० अ० १८५ )

**अथर्वण**–चार वेदांतलि चौथा, व त्याची मूर्तिमान् देवता तो. याचा उपवेद स्थापत्य, म्हणजे शिल्पादिक विद्या तीसहित हा ब्रह्मदेवाच्या उत्तर मुखांतून निघाला ( १ वेद श० पहा. )

२.–स्वायंभुव मन्वंतरांतील ऋषि, हा, ब्रह्ममानसपुत्रच असून, कर्दम प्रजापतीची कन्या शांति, ती याची स्त्री होती. यास चित्ति म्हणून दुसरी एक स्त्री होती. तिचे ठायीं यापासून, धृतव्रत, दध्यंच आणि अथर्वशिरा, असे तीन पुत्र झाले होते. त्या तिघांस, जरी आथर्वण असें साधारण नांव होतें, तरी दुसऱ्या दध्यंच ना० पुत्रास, दध्यङ्ङाथर्वण म्हणण्याची रूढि ग्रंथांत विशेष आढळत्ये, हा अथर्वण ऋषि, ब्रह्मविद्यासंबंधानें त्या वेळच्या स्वर्गांतलि यज्ञ ना० इंद्राचा सहाध्यायी होता, व दोघांसही ब्रह्मदेवाचेंच गुरुत्व होतें.

**अथर्वशिखा**—अथर्वणवेदोपनिषत्.

**अथर्वशिर**— ,, ,,

**अथर्वशिरा**—अथर्वण ऋषीच्या तीन पुत्रांतील तिसरा.

**अथर्वा**—अथर्वण ऋषीसच म्हणतात.

**अथर्वा**–अथर्वण वेद; परंतु मुख्यत्वेंकरून उपनिषद्भागास संज्ञा आहे

२--एक ब्रह्मर्षि, नहुषाराजा इंद्रपदापासून भ्रष्ट होऊन, मुख्य इंद्र स्वपदारूढ झाल्यावर यानें, त्याचें यश उत्तम प्रकारें करून गायिलें, त्यावरून इंद्रानें संतोषून त्यास हें नांव दिलें, व अथर्वण वेदाचें आचार्यत्व देऊन

यज्ञामध्यें यास हविर्भागही कल्पिला ( भार० उद्यो० अ० १८ ); याचें मूळचें नांव काय, तें आढळत नाहीं.

**अथौजा**–वैशाख मासींच्या सूर्यासमागमें असणारा यक्ष. ( ३ माधव श० पहा ).

**अदिति**–कश्यप ऋषीच्या तेरा स्त्रियांतील ज्येष्ठ. ही प्राचेतस दक्षाची कन्या असून, हिला आदित्यसंज्ञक बारा देव हे पुत्र होते.

**अदृश्यंति**–मैत्रावरुणि वसिष्ठाचा पुत्र जो शक्ति ना० ऋषि, त्याची स्त्री, व पराशर ऋषीची माता ती.

**अद्भुत**–नवव्या दक्षसावर्णि मन्वंतरांत, स्वर्गांत होईल इंद्र तो.

**अद्रिका**–स्वर्गांतील एक अप्सरा. ही, शापास्तव जलांत मत्स्यी झाली असतां, हिच्या उदरीं, मत्स्यराज ना० पुत्र व मत्स्यगंधिनी ना० कन्या, असें मिथुन झालें होतें. ( २ उपरिचरवसु श० पहा ).

**अंध**–भारतवर्षीय नद.

**अंधक अ० अंधकासुर**–एक असुर. हा, एकेकाळीं, महादेव, पार्वतीसहित क्रीडा करीत असतां, तिचें हरण करण्यास उद्युक्त झाला; त्यावरून महादेवाचें व याचें अवंती देशांतील महाकाल ना० वनांत मोठें घोर युद्ध झालें, त्यांत याच्या रक्तापासून, अनेक अंधक उत्पन्न होऊं लागले, असें पाहून, महादेवानें याचें रक्त वरच्यावरच नाहींसें करण्यासाठीं, मातृगण उत्पन्न केला, तथापि तें निःशेष होईना. म्हणून, विष्णूनें शुष्करेवती ना० देवता उत्पन्न करून, तिजकडून तें रक्त अगदीं निःशेष करविलें, तेणेंकरून इतर अंधक नाश पावून, एकच मूळचा अवशेष राहिला. व नंतर त्यास मारावें इतक्यांत, त्यानें महादेवाचें अतिशय करुणास्वरानें स्तवन केलें, त्यावरून महादेव प्रसन्न होऊन, त्यांनीं त्यास आपलें गणत्व दिलें. ( मत्स्य० अ० १७८ ). याचा पुत्र आडी असूर.

२–महिषासुराच्या सेनेंतील एक प्रमुख असुर. ( २ महिषासुर श० पहा ).

३–( सो० वं० ) नहुषपुत्र ययातिराजा, त्याच्या क्रोष्टा ना० यदुपुत्राच्या वंशांत जन्मलेला सात्वत राजा, त्याच्या सात पुत्रांतलि साहवा. यास,कुकुर, भजमान्, शुचि, आणि कंबलबर्हिष, असे चार पुत्र होते. या अंधकाचें कुल यदुवंशांत मोठें प्रसिद्ध होतें.

४–( सो० वं० ) वरील अंधकाच्या कुलांत जन्मलेल्या अनुराजाचा पुत्र, यास दुंदुभि ना० एक पुत्र होता.

**अंधकूप**–एक नरक आहे. पशुपक्ष्यादि अज्ञान प्राण्यांस, जो कोणी पीडा देऊन त्यांची हिंसा करितो, तो या नरकास जाऊन, तेथें तसेंच दुःख भोगितो.

**अंधच्छाय**–कश्यपकुलोत्पन्न एक ऋषि.

**अंधतामिस्त्र**–एक नरक आहे. जीं कोणी मनुष्यें, परस्त्रीच्या पतीची, किंवा परपुरुषाच्या स्त्रीची वंचना करून, तिचा, अथवा त्याचा, उपभोग घेतात, तीं, या नरकास जाऊन अनेक क्लेश भोगितात.

**अधर्म**–ब्रह्मदेवाच्या पृष्ठभागापासून, धर्माचा विरोधी उत्पन्न झालेला पुरुष. याची स्त्री मृषा असून, तिच्याठायीं यापासून दंभ आणि माया, असें मिथुन उत्पन्न झालें. तें निर्ऋति ना० राक्षसाधिपतीनें आपल्यास घेतलें. कारण तो अप्रज होता. पुढें त्या मिथुनापासून लोभ, आणि निकृति, हें मिथुन उत्पन्न होऊन तेथून क्रमानें क्रोध व हिंसा, कलि व दुरुक्ति, मृत्यु व भीति, आणि निरय व यातना, याप्रमाणें उत्पन्न झालीं. ( भाग० चतुर्थ० अ० ८ ).

२–वरुणास ज्येष्ठेपासून झालेला पुत्र, यास निर्ऋति नांवाची स्त्री होती.

**अधिपुरुष**–स्वायंभू मनूस संज्ञा. ( मत्स्य० अ० ३ ).

**अधिरथ**–( सो० वं० ) ययातिपुत्र अनुराजा त्याच्या कुलांत जन्मलेल्या सत्कर्मा अ० सत्यकर्मा राजापासून, विवाहविधीनें वरलेल्या ब्राम्हणीच्या ठायीं झालेला पुत्र तो. हा, सूतकर्म करणारा झाला, व यास, राधा नांवाची स्त्री असून, यास पुढें नदीमध्यें कर्ण हा पुत्र सांपडला होता. मी येथें सत्कर्मा या नांवावरून, यानें ब्राम्हणीशीं विवाह केला असावा, अशी कल्पना केली आहे, मूळांत नाहीं.

**अधिराज्यदेश**–भारतवर्षीय देश. हा, दाक्षिणमत्स्य देशाच्या दाक्षिणेस असून पांडवांच्या वेळेस येथें दंतवक्र नांवाचा राजा होता. ( भार० सभा० अ० ३१ ).

**अधिवंग**–गौतमवनासमीपचें भारतवर्षीय तीर्थ.

**अधृष्या**–भारतवर्षीय नदी. उगमादिक आढळत नाहींत. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**अंध्र**–( सो० वं० ) ययातिपुत्र अनुराजा त्याच्या कुलांत उत्पन्न झालेल्या बलि ना० राजाच्या साहा पुत्रांतील कनिष्ठ.

२–आंध्र शब्द पहा.

**अनंग**–महादेवानें भस्म केल्यावर, हें नांव मदनास पडलें होतें.

२–रामायणांतील एक वानर.

**अनंगा**–भारवर्षीय नदी. उगम आढळत नाहीं. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**अनघ**–एक गंधर्व.

२–एक राजर्षि. कुल आढळत नाहीं.

**अनघा**–शाकद्वीपांतील महानदी.

**अनंत**–ज्याचा देशानें, कालानें, वस्तूनें, परिच्छेद होऊन अंत होत नाहीं, असा जो व्यापक, नित्य, आणि सर्वात्मरूप, परमात्मा तो.

२–कश्यप आणि कद्रू, यांपासून झालेल्या नागांतील एक.

३–शेष ना० नागास ही संज्ञा क्वचित् आढळत्ये.

**अनंगभागी**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**अनंतविजय**–युधिष्ठिराचा, युद्धकालीं वाजविण्याचा शंख.

**अनंती**–शतरूपेस नामांतर.

**अनमित्र**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ऋतुपर्ण राजा, त्याच्या अनरण्य ना० पुत्राचा पौत्र, व निघ्न राजाचा पुत्र तो.

२–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वत राजा, त्याच्या वृष्णि ना० पुत्राच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. यास निम्न, शिनि, आणि वृष्णि, असे तीन पुत्र होते.

**अनरण्य**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न युवनाश्व राजा, त्याच्या वंशांत जन्मलेल्या पुरुकुत्स राजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ जो त्रसद्दस्यु ना० राजा, त्याचा द्वितीय पुत्र. यास हर्यश्व, आणि बृहदश्व, असे दोन पुत्र होते. हा राजा, अयोध्येंत राज्य करीत असतां, रावण पृथिवी जिंकीत अयोध्येस आला, तेव्हां याचें रावणाशीं घोर युद्ध झालें. त्यांत रावणाचें बल विशेष असल्यामुळें, याची सेना नष्ट होऊन, हा रणांत भूमीवर पडला, व आतां प्राण सोडणार तों, यानें रावणास शाप दिला कीं, माझें तप, दान, सत्य, हीं जर यथार्थ असतील, तर माझा वंशज तुझा सकुल नाश करील. ( वा० रा० उत्तर० स० १९ ).

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ऋतुपर्ण राजा, त्याचा पौत्र, व सर्वकाम अ० सर्वकर्मा, याच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यास पुत्र होता, त्याचें नांव निघ्न होतें.

**अनर्वा**—वृत्रासुरानुयायी असुर. ( भाग० षष्ठ० अ० १० ).

**अनल**–एक वसु आहे. ( अष्टवसु श० पहा ). हा, कुमार, शाख, विशाख, नैगमेय, अशा चार पुत्रांचा पिता असून, प्रस्तुतच्या चालू मन्वंतरांत आग्नेयी दिशेचा स्वामी आहे. ( अष्टदिक्पाल श० पहा ).

२–बिभीषणाच्या चार राक्षस अमात्यांतील एक. (मालेय श० पहा ).

**अनला**–द्वितीयार्थक रोहिणीच्या दोन कन्यांतील दुसरी. हिची कन्या शुकी.

२–माल्यवान् राक्षसास, सुंदरी ना० भार्येपासून झालेली कन्या, व विश्वावसु राक्षसाची स्त्री. (वा० रा० उत्तर० स० ६१ ) हिची कन्या कुंभीनसी.

**अनवद्या**–कश्यप आणि प्राधा यांपासून झालेल्या अप्सरांतील एक.

**अनसूय**–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**अनसूया**–कर्दम ऋषीस देवहूतीपासून झालेल्या नऊ कन्यांतील एक. ही, स्वायंभू मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र अत्रि ऋषि, त्याची स्त्री. ( १ अत्रि श० पहा ).

२–चालू जें वैवस्वत मन्वंतर, त्यांतील ब्रह्ममानसपुत्र अत्रिऋषींची स्त्री, मात्र, ही कोणाची कन्या, तें ग्रंथांत आढळत नाहीं. अध्यात्मरामायणांत, अत्रीची उक्ति, रामास अशी आहे.

भार्या मेऽतीव संवृद्धा ह्यनसूयेतिविश्रुता ।
तपश्चरतिसुचिरं धर्मज्ञा धर्मवत्सला ॥ ८४ ॥
अंतस्तिष्ठति तां सीता पश्यत्वरिनिषूदन ॥८५॥
( अध्या० रा० अयो० स० ९ ).

अनसूया ही, परमपतिव्रता, व महातपस्विनी होती. हिचा विशेष इतिहास असा आढळतो कीं, एकदां, दशवर्षात्मक अनावृष्टि झाली असतां, हिनें, स्वतपोबलानें, फलें, मूलें, व उदक निर्माण करून, बहुत प्राण्यांस वांचविलें होतें. दुसरें असें कीं, मांडव्य ऋषीस शूलावर चढविलें असतां, त्या शूलास अंधकारामुळें एका ऋषिपत्नीचा धक्का लागला; त्यावरून मांडव्यानें तिला शाप दिला कीं, तूं सूर्योदय होतांच विधवा होशील. तो ऐकून तिनें, सूर्योदयच होऊं दिला नाहीं. त्यामुळें प्राणिमात्रांचे व्यवहार कुंठित झाले. तेव्हां आतां काय करावें, असा विचार, संपूर्ण ऋषि करीत असतां, अनसूया ही, त्या ऋषिपत्नीची परम प्रिय सखी आहे, असें त्यांस समजलें. नंतर, सर्व ऋषि, देवांस पुढें करून हिला शरण आले, व सर्व वृत्त निवेदन केलें, ती त्यांचीं प्रार्थना हिनें मान्य करून, आपल्या तपःसामर्थ्यानें, सखीस वैधव्य न येऊं देतां सूर्यास उदयास आणून, सर्व जगतास सुखी केलें. ( वा० रा० अयो० स० ११७ ).

**अनाधृष्य**–धृतराष्ट्र राजाच्या शतपुत्रांतील एक.

**अनिर्देश्य**–यज्ञसंबंधीं एका अग्नीचें नांव.

**अनिरुद्ध**–ज्याचा निरोध होत नाहीं, असा परमात्मा.

२–(सा० वं०) यदुकुलोत्पन्न जो वसुदेवपुत्र कृष्ण, त्याचा पौत्र, व प्रद्युम्नाचा पुत्र तो. यास, प्राद्युम्नि असें ग्रंथांत स्थलविशेषीं म्हटलें असून, हा, नागायुत बली, व महारथी होता. रुक्मिराजाची पौत्री रोचना, ती याची स्त्री होती. या विवाहसमयीं वराच मोठा कलह झाला होता. (२ रोचना श० पहा). यास, रोचनेपासून वज्र ना० पुत्र झाला होता. (भाग० दशम० अ० ९०). बाणासुराची कन्या उषा, ती याची दुसरी स्त्री होती, त्याही विवाहांत, बाणासुराशीं यादवांचें मोठें युद्ध झालें होतें. (उषा श० पहा).

**अनिल**–एक वसु आहे. (अष्टवसु श० पहा.) हा, प्रस्तुतच्या मन्वंतरांत वायवी दिशेचा स्वामी आहे. (अष्टदिक्पाल श० पहा).

२–कृष्णापासून मित्रविंदेस झालेल्या पुत्रांतील एक.

**अनीह**–(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न दाशरथ रामाच्या वंशांत जन्मलेल्या देवानीक राजाचा पुत्र, यास, अहीनर इ० नामांतरें असून, पारियात्र, व सहस्राश्व, असे दोन पुत्र होते.

**अनु**–(सो० वं०) नहुषपुत्र ययातिराजा, त्यास शर्मिष्ठेपासून झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. यानेंही, यदूप्रमाणेंच पित्याची जरा ग्रहण केली नाहीं, म्हणून यास, मुख्य राज्याधिकार नसून, हा, उत्तरेकडे म्लेंच्छावर आधिपत्य पावला होता. (मत्स्य० अ०३४). याला, सभानर, चक्षु आणि परोक्ष, असे तीन पुत्र होते.

२–(सो० वं०) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्या मघवंशांत जन्मलेल्या, क्रथकुलांतील कुरुवश राजाचा पुत्र, यास पुरुहोत्र नांवाचा पुत्र होता.

३–(सो० वं०) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्या मघकुलोत्पन्न क्रथवंशांत जन्मलेल्या, सात्वतपुत्र अंधककुलांतील कपोतरोमा राजाचा पुत्र, यास अंधक नांवाचाच पुत्र होता.

**अनुपावृत्त**–भारतवर्षीय देश. (भार० भीष्म० अ० ९).

**अनुमति**–कर्दमकन्या श्रद्धा, तिच्याठायीं अंगिराऋषीपासून झालेल्या चार कन्यांतील कनिष्ठ. (१ अंगिरा श० पहा).

२–द्वादशादित्यांतील धाता ना० आदित्याची स्त्री ती.

३–शाल्मलीद्वीपांतील एक महानदी.

४–एक ब्रह्मर्षि. (३ भृगु श० पहा).

**अनुम्लोचा**–एक अप्सरा. (नभस्य श० पहा).

**अनुयायी**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**अनुराधा**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

**अनुह्राद**–हिरण्यकशिपूस कयाधूच्या ठायीं झालेल्या चार पुत्रांतील एक. यास, सूर्मि नांवाची स्त्री, व तिच्याठायीं झालेले बाष्कल, आणि महिष असे दोन पुत्र होते.

**अनुविंद**–वसुदेवभगिनी राजाधिदेवी, तिचेठायीं तिचा पति अवंत्यराजा जयसेन, त्यापासून झालेल्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. हा, विंदाचा भ्राता असून भारती युद्धांत दुर्योधनाकडे असतां, अर्जुनाच्या हातून मरण पावला होता. (भार० द्रोण० अ० ९९).

२–केकयराजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ, व विंदाचा भ्राता. हा भारती युद्धांत पांडवांकडे होता.

३–धृतराष्ट्र राजाच्या शतपुत्रांतील एक.

**अनुशाल्व**–सौभपति शाल्वराजाचा भ्राता. यानें, आपला सहोदर शाल्व यास कृष्णानें मारिलें होतें, त्या द्वेषास्तव संधि पाहून त्यास मारावें, असें मनांत धरिलें होतें म्हणून, पांडवांच्या अश्वमेधकालीं, कृष्ण, त्याच्या स्त्रियांपुत्रांसहवर्तमान हस्तिनापुरास आला असें ऐकून, आपल्या सुतार ना० सेनापतीकडून सेना सिद्ध करवून, हस्तिनापुरासमीप, तीसहित गुप्तरूपानें येऊन निवेश केला. नंतर गुप्त वृत्त आणवितां, यास असें कळलें कीं, कृष्ण, आणि पांडव आपापल्या परिवारासहवर्तमान अश्वमेधार्थ आणलेला श्यामकर्ण अश्व, आनंदानें पाहात बसले आहेत. म्हणून तेथें त्वरेनें येऊन कोणी पाहतात न पाहतात तों अश्वाचें हरण करुन, यानें पलायन केलें. तेव्हां भीमसेन सेनेसहित याच्या पाठीस लागला, व प्रद्युम्न, आणि वृषकेतु, त्यांनीं तर यास धरून आणण्याविषयीं कृष्णानें मांडलेले विडेच उचलले, पुढें पांडववीरांचें व याचें मोठें युद्ध झालें. त्यांत प्रद्युम्न पराभव पावला. परंतु वृषकेतूनें याशीं घोर युद्ध करुन, यास धरून कृष्णाजवळ आणिलें, त्यावरून यास वाटलें कीं, आतां कृष्ण आपणास निःसंशय मारितो, म्हणून यानें मरणभीतीनें कृष्णाशीं सख्य करून, अश्व परत दिला; आणि अश्वमेधास साह्य करण्याचें वचनही देऊन, आपल्या स्वनगरास गमन केलें (जैमिनी अश्व० अ० १२—१४).

**अनुष्णा**–भारतवर्षीय नदी. (भार० भीष्म० अ० ९).

**अनुसूया**–अनसूया शब्द पहा.

**अनूचाना**–कश्यप आणि प्राधा यांपासून झालेल्या अप्सरांतील एक.

**अनूदर**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**अनूपदेश**–भारतवर्षीय देश. याची राजधानी माहिष्मती नगरी असून, तींत सहस्रार्जुन राहून पूर्वी राज्य करीत असे. ( भार० भीष्म० अ० ९ ) पांडवांच्या वेळेस येथें नील राजा असून तो पांडवांकडे होता.

**अनूपकदेश**–भारतवर्षीय देश. याची सीमा, व येथें राजा कोण होता, तें आढळत नाहीं; परंतु तोही भारती युद्धांत पांडवांकडे होता. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**अनेना**–( सू० वं० ) इक्ष्वाकुराजाचा प्रपौत्र, विकुक्षि अ० शशाद राजाचा पौत्र व ककुत्स्थ राजाचा पुत्र, यास, सुयोधन, आणि काकुत्स्थ अशीं नामांतरें असून पुत्राचें नांव पृथु असें होतें.

२–( सो० वं० ) पुरूरवा राजाचा पौत्र, व आयुराजाच्या पांच पुत्रांतील कनिष्ठ. याच्या पुत्राचें नांव शुद्ध असें होतें.

**अनौपम्या**–बाणासुराची स्त्री.

**अन्नपूर्णा**–काशीक्षेत्रांतील एक देवता.

**अन्ह**–एक वसु ( अष्टवसु श० पहा ). यास ग्रंथांतरीं आप, सावित्र, अशीं नामांतरें आढळतात.

**अपर्णा**–महादेवाची पत्नी सती, दक्षयज्ञांत मरण पावल्यावर, हिमालयाच्या उदरीं जन्मली. तेथें तिनें पूर्व पतीचीच प्राप्ति व्हावी म्हणून, वृक्षाचीं पर्णें भक्षून तप आरंभिलें, तथापि त्याची प्राप्ति होईना, तेव्हां, पर्णेंही सोडिलीं, आणि तप चालविलें, त्या योगानें तिचा हेतु सिद्ध होऊन, तिला हें नांव पडलें.

**अपर्णि**–एक ब्रह्मर्षि. ( ३ आंगिरा श० पहा ).

**अपरउत्तरउलूक**–मोदापुराच्या उत्तरेकडील भारतवर्षीय देश. उत्तरेकडे उलूक देश दोन असल्यामुळें, दुसऱ्यास हें नांव आहे, व हा दिशाक्रम इंद्रप्रस्थ नगर मध्य मानून, या ग्रंथांत धरिला आहे. ( भार० सभा० अ० २७ ).

**अपरउत्तरकुलिंद**–उत्तरेकडे, दोन कुलिंद देशांतलि असणाऱ्या दुसऱ्याचें हें नांव होय, हा देश, कालकूट, व सुमंडल, यांच्यामध्यें असून, दिशाक्रम वर लिहिल्याप्रमाणेंच आहे. ( भार० सभा० अ० २६ ).

**अपरतंगण**–एकाच दिशेकडे असणाऱ्या दोन तंगण देशांतील दुसऱ्याचें नांव. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**अपरताल**–वरप्रमाणेंच दुसरा ताल देश तो. हा अयोध्येकडे, केकय देशांतून यावयास निघालें असतां, मार्गामध्यें प्रथम लागतो. ( वा० रा० अयो० स० ६६ ).

**अपरदक्षिणकुंतिराष्ट्र**–इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेकडील दुसरा कुंतिराष्ट्र देश तो. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**अपरदक्षिणनिषाद**–पांडवांच्या वेळेस दक्षिणेकडील जे म्लेंच्छ राजे होते, त्यांच्या देशाच्या दक्षिणेस, व पुरुषाद लोकांच्या देशाच्या उत्तरेस हा देश होता. ( भार० सभा० अ० ३१ ).

**अपरदक्षिणपांड्य**–इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेकडील दुसरा पांड्यदेश. हा, पांडवांच्या वेळेस द्रविड देशाच्या दक्षिणेस असल्याचें भारतांत लिहिलें आहे. ( भार० सभा० अ० ३१ ).

**अपरदक्षिणमत्स्य**–इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेकडील दुसरा मत्स्यदेश. ( भार० सभा० अ० ३१ ).

**अपरदक्षिणसेक**–इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेकडील दुसरा सेक देश तो. ( भार० सभा० अ० ३१ ).

**अपरनंदा**–हिमालयावरील भारतवर्षीय तीर्थ.

**अपरपूर्वविदेह**–इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील दुसरा विदेहदेश. याची राजधानी मिथिला नगरी असून, पांडवांच्या वेळेस तींत, जनकवंशांतील बहुलाश्वना० जनक राज्य करीत होता. विदेहवंशीयांचा हाच देश होय, असा निश्चय करण्यास दोन प्रमाणें सबळ आहेत; त्यांतून पहिलें हें कीं, विश्वामित्र ऋषि, आपल्या यागसंरक्षणार्थ, दशरथ राजापासून रामलक्ष्मणांस मागून घेऊन, आपल्या आश्रमास जात असतां, मलद, आणि करूषक, हे दोन देश, त्यास मध्यें लागले. तेथें रामानें ताटकेचा वध केल्यावर, तो आपल्या आश्रमास गेला, व यज्ञ सिद्धीस गेल्यानंतर, पुढें तसाच रामलक्ष्मणांस समागमें घेऊन, सीतास्वयंवराकरितां मिथिला नगरीस गेला. दुसरें प्रमाण असें कीं, युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञकाळीं, भीमसेन पूर्वदिशा जिंकीत चालला असतां, मलद इ० देश जिंकून नंतरच विदेह देशास गेला होता. ( भार० सभा० अ० ३० ).

**अपरपूर्वसुह्म**–इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील दुसरा सुह्म देश तो. ( भार० सभा० अ० ३० ).

**अपरबल्लव**–एकाच दिशेकडील दोन बल्लव ना० देशांतील दुसरा बल्लवदेश तो.( भार० भीष्म० अ०९ ).

**अपराजित**–एकादश रुद्रांतील एक. हें नांव, भारतांत लिहिलेल्या रुद्रांतील कोणत्याचें, याचा निश्चय करतां येत नाहीं.

२–कृष्ण, आणि लक्ष्मणा, यांचा पुत्र.

३–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**अपराजिता**–शाकद्वीपांतील नदी.

**अपरांतदेश**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**अपस्यौष**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**अपांडु**– " " "

**अपांतरतम**–एक ब्रह्मर्षि. ( १ सारस्वत श० पहा ).

**अपांन्हद**–भारतवर्षीय तीर्थ.

**अपोहय**–एक ब्रह्मर्षि. ( नीलपराशर श० पहा ).

**अप्रतिरथ**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुवलाश्वराजा, त्यास नामांतर. ( भार० वन० अ० २०४ ).

२–( सो० वं० ) ययातिपुत्र पुरुराजा, त्याच्या रौद्राश्वपुत्र ऋतेयूच्या वंशांत जन्मलेल्या अंतिभार राजाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. यास, कण्व ना० पुत्र होता.

**अप्सरोयुग**–भारतवर्षीय तीर्थ.

**अंबर**–वृत्रासुरानुयायी असुर. ( भाग० षष्ठ० अ० १० )

**अंबरीष**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

२–(सू० वं०) वैवस्वत मनूचा नववा पुत्र नभग त्याचा पौत्र व नभाग राजाचा पुत्र तो. हा, परमदानशूर, व भगवद्भक्त असून, पराक्रमीही इतका होता कीं, यानें भूमीचा जय साता दिवसांत करून. तिचें आधिपत्य संपादिलें होतें. ( भार० शांति० अ० १२४ ). यास, विरूप, केतुमान्, आणि शंभु, असे तीन पुत्र होते व याला, क्वचित् नाभाग असेंही म्हटलेलें आहे. ( भार० द्रोण० अ० ६४ ).

एकदां यास, नित्याप्रमाणें कार्तिक मासांतील, देवत्रयांचें त्रिदिनात्मक व्रत असतां, द्वादशीच्या दिवशीं, याच्या घरीं दुर्वासऋषि अतिथि प्राप्त झाला. त्याची यानें पूजा करून,त्यास भोजनार्थ राहून घेतलें. दुर्वासही, तथास्तु म्हणून, उर्वरित आन्हिक करण्यास नदीतीरीं गेला. त्या दिवशीं द्वादशी थोडी होती, तें दुर्वासास विदित नसून यानेंही त्यास सुचवावें, तेंही सुचविलें नाहीं. त्यामुळें दुर्वास, आपलें आन्हिक सावकाशपणें आटोपून येत आहे तों, द्वादशी अतिक्रांत होत चालली असें जाणून, यानें देवास नैवेद्य समर्पण केला, व व्रतभंग होऊं नये अशा उद्देशानें भोजन न करतां, द्वादशींत देवाचें तीर्थ प्राशन करून पारणें केलें. हें दुर्वासानें जाणून, त्यानें आपल्या जटेंतलि केंसापासून एक कृत्या निर्माण करून यावर सोडिली. इतक्यांत, विष्णूच्या सुदर्शन चक्रानें येऊन, त्या कृत्येचा नाश केला, व तें दुर्वासावर धांवलें; परंतु त्याच्या तपःप्रभावानें त्याच्या अंगास स्पर्श करण्यास समर्थ झालें नाहीं. नंतर दुर्वास तेथून निघाला असतां, चक्रही त्यामागें निघालें. तें पाहून, हा विष्णूकडे गेला. तेव्हां विष्णूनें सांगितलें कीं, तूं अंबरीषाकडेसच परत जा, व तो तुजकरतां निराहार राहिला आहे, त्याचें समाधान कर, म्हणजे हें चक्र तुला सोडील. त्यावरून दुर्वास अंबरीषाकडे परत आला. या गोष्टीस एक संवत्सर झालें असतांही, अंबरीषानें, भोजन केलें नव्हतें. दुर्वासास पाहतांच, यास परम हर्ष होऊन, यानें सुदर्शनाची बहुता प्रकारें स्तुति केली. तेणेंकरून तें संतुष्ट होऊन स्वस्थळीं जातांच,यानें दुर्वासास उत्तम प्रकारचें यथेच्छ भोजन देऊन आपणही भोजन केल्यावर, दुर्वासास मार्गस्थ करून स्वस्थ राहिला. (भाग० नवम० अ० ४–६

३–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न मांधाता राजास, बिंदुमती, भार्येच्या ठायीं झालेल्या, तीन पुत्रांतील दुसरा, यास, धर्मसेन असें नामांतर असून, पुत्र यौवनाश्व नांवाचा होता.

४–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न त्रिशंकु राजा, त्याच्या दोन पुत्रांतील दुसरा, यास श्रीमती ना० कन्या होती ती, नारद आणि पर्वत ऋषि, यांच्या वादांत विष्णूस प्राप्त झाली. हा विष्णू द्वादशादित्यांतील असणें योग्य दिसतें. ( वा० रा० अद्भुत्तोत्तर० स० ३–४ )

५–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न भगीरथ राजाचा पौत्र, व नाभ अ० नाभाग राजाचा पुत्र. याच्या पुत्राचें नांव सिंधुद्वीप असें होतें.

**अंबष्ठ**–भारतवर्षीय देश, हा इंद्रप्रस्थास अनुलक्षून, पश्चिमेकडे शिबिदेशाच्या पश्चिमेस पांडवांच्या वेळेस असल्याविषयीं भारतांत लिहिलें आहे. ( भार० सभा० अ० ३२ ). ब्राह्मणापासून वैश्यजातीय स्त्रीच्याठायीं झालेली संतति, तिला अंबष्ठ असें म्हटलें आहे. त्यांचा हा देश असावा आणि त्यावरून यास असें नांव पडलें असावें.

२– भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. अर्जुनाच्या हातून मरण पावला होता. ( भार० द्रोण० अ० ९३ ).

**अंबा**–पार्वतीस नांव आहे.

२–सत्यलोकांतील श्रेष्ठ अप्सरा ती.

३–काशीराजाच्या तीन कन्यांतील ज्येष्ठ, व अंबिका, आणि अंबालिका, यांची भगिनी. हिचें उभय भगिनींसहित स्वयंवर आरंभलें असतां, अनेक देशींचे राजे काशीस गेले होते. त्यांत भीष्म हाही होता. परंतु तेथें कोणी पण नव्हता म्हणून, जो बलवान् असेल,

त्यानें ह्या कन्या हरण कराव्या, असें होतांच, शाल्वप्रमुख सर्व राजांचा पराभव करून, भीष्मानें तिघींचेंही हरण केलें, व हस्तिनापुरास घेऊन येऊन, त्यांस सत्यवतीसमीप दिलें. पुढें तिघींचा विचित्रवीर्याशीं विवाह होणार, इतक्यांत हिनें, भीष्मास व सत्यवतीस प्रार्थिलें कीं, मी मनेंकरून शाल्वराजास वरिलें आहे. यास्तव मला त्याकडे पोहोंचवाल तर बरें पडेल. त्यावरून सत्यवतीच्या अनुमोदनानें भीष्मानें हिला शाल्वाकडे पाहोंचविलें; परंतु त्यानें हिचा अंगीकार केला नाहीं, म्हणून ही पुनः हस्तिनापुरास आली. तों इकडे हिच्या उभय भागिनींचा विचित्रवीर्याशीं विवाह होऊन गेला.

शाल्वाकडून अंबा परत आल्यावर, भीष्मास म्हणूं लागली कीं, तूं मला जिंकून आणिल्यामुळें, शाल्वानें माझा अंगीकार केला नाहीं, यास्तव आतां माझा स्वीकार तुलाच केला पाहिजे. तेव्हां भीष्म म्हणाला, तें होणार नाहीं. कारण, मी यावज्जीव विवाह करणार नाहीं, असें पित्यास वचन दिलें आहे, तें माझ्यानें मोडवणार नाहीं. यास्तव, तुला वाटेल तसें कर, मजकडून ना नाहीं. ( येथें सहजींच मनांत कल्पना येत्ये कीं, भीष्मास जर, वचनप्रतिबंधामुळें, विवाह करण्यास प्रत्यवाय होता, तर त्यानें हिचा विवाह विचित्रवीर्याशीं कां केला नाहीं ? त्यास, असें वाटतें कीं, हिनें मनें करून अन्यास वरिलें होतें म्हणून, ही तत्प्रयूक्त दोषानें युक्त झाली असल्यामुळें त्यानें तसें केलें नसावें ).

तूं पाहिजे तसें कर, असें हिला भीष्मानें निक्षून सांगितल्यावर, ही परम खिन्न होऊन तेथून निघाली, आणि मार्गानें विचार करूं लागली कीं, आतां पुढें काय करावें. शेवटीं हिनें निश्चय केला कीं, पित्याकडे न जातां, आपल्या आयुष्याचा व्यय तपांत करावा, असें म्हणून, जातां जातां, मार्गामध्यें हिला, शैखावत्य ऋषींचा आश्रम लागला. तेथें जाऊन, हिनें, आपलें सर्व वृत्त, त्या ऋषींस निवेदन केलें. नंतर त्यांनीं अभय दिल्यावरून, हिनें तेथें तपास आरंभ केला.

एकदां असें झालें कीं, हिचा मातामह होत्रवाहन ना० राजा, मृगयेकरितां याच अरण्यांत आला असतां, श्रमानें श्रांत झाल्यामुळें, याच आश्रमांत आला. तेथें त्यानें हिला पाहतांच ओळखिलें. त्यावरून तो हिला पुसूं लागला कीं, तूं इकडे कशी आलीस ? तुला तर भीष्मानें जिंकून नेलें होतें. तेव्हां हिनें आपलें साकल्य वर्तमान मातामहास निवेदन केलें. तें ऐकून तो तसाच हिला घेऊन जामदग्न्य रामाकडे गेला, आणि हिचा त्यास सविस्तर वृत्तांत सांगून, प्रार्थना करून म्हणाला कीं, भीष्म, हिला वरील असें करणें आपणाकडे आहे. त्यावरून रामासही, हिची दया येऊन, त्यानें होत्रवाहनास वचन दिलें कीं, तुझ्या म्हटल्याप्रमाणें मी करितों. कारण तो रामाचा परम मित्र होता.

जामदग्न्य रामानें, होत्रवाहनास मार्गस्थ करून, लागलीच हिला समागमें घेतलें, आणि हस्तिनापुराच्या बाह्य प्रदेशीं उतरून, आपण येथें आल्याचें वृत्त भीष्मास सांगून पाठविलें. त्यावरून भीष्म उपायन घेऊन, दर्शनास आला, व आणिलेलें उपायन समर्पण करून, विनयपूर्वक पुसूं लागला कीं, कां येणें झालें, व काय आज्ञा आहे. तें ऐकून रामानें त्यास, अंबेस तूं वरिलें पाहिजेस म्हणून आज्ञा केली. तेव्हां भीष्मानें आपली प्रतिज्ञा निवेदन करून, रामास विनंति केली कीं, माझी प्रतिज्ञा शेवटास नेणें आपणाकडे आहे.

भीष्माची प्रतिज्ञा ऐकून, रामासही संकट झालें असावें; परंतु होत्रवाहनास वचन दिल्यामुळें, तो भीष्मास म्हणाला कीं, जर तूं हिशीं विवाह करीत नाहींस, तर मशीं युद्ध कर. त्यावरून भीष्मास विचार पडला कीं, आतां कसें करावें. मग जें होईल तें होवो, असा विचार करून, तो युद्धास सिद्ध झाला. तेव्हां उभयतांचें मोठ्या निकराचें युद्ध झालें. त्यांत कोणाचाच पराजय दिसेना. इतक्यांत हें वर्तमान गंगेस ( भीष्माच्या मातेस ) व जमदग्निप्रभृति रामाच्या पितरांस कळतांच, ते तेथें आले, व त्यांनीं, आपआपल्या पुत्रांचें निवारण करून, युद्ध समाप्त करविलें. त्यावरून भीष्म आपल्या मातेस, आणि गुरु जो राम त्यास, नमस्कार करून, व त्यांचा आशीर्वाद घेऊन, स्वनगरांत प्रविष्ट होतांच, रामही, अंबेस, माझा जेवढा प्रयत्न होता, तेवढा मी तुजकरितां केला; परंतु तुझ्या दुर्दैवानें सिद्धीस गेला नाहीं, यास माझा उपाय नाहीं, असें म्हणून, आपल्या पितरांस नमस्कार करून, स्वकीयाश्रमास जाता झाला.

याप्रमाणें हिची निराशा झाल्यावर, ही अधिकच खवळली, आणि भीष्मास मारण्याची प्रतिज्ञा करून, हिनें रुद्राचें तीव्र आराधन आरंभिलें. हें वृत्त गंगेस कळून, ती तेथें गेली असतां, हिचें व गंगेचें बरेंच भाषण झालें. त्यांत गंगेनें हिला शाप देऊन गमन केलें. तरी हिनें तप करण्याचें सोडिलें नाहीं.

काहीं कालानें, हिचें तप पूर्ण होतांच तेथें रुद्र प्रकट झाला, आणि हिला इष्ट वर माग असें म्हणाला. तेव्हां हिनें, मी भीष्मास मारावें असें मागितलें; परंतु त्यानें, हें तुला या जन्मांत होणें अशक्य आहे, तर पुढील जन्मीं, तूं द्रुपदराजाची शिखंडिनी नांवानें कन्या होऊन कांहीं प्रसंगानें तेथें पुरुषत्व पावशील आणि या जन्मांतील स्मरणपूर्वक भीष्मास मारशील, असा हिला वर देऊन तो अंतर्धान पावला. पुढें हिच्या प्रारब्धाचा लवकरच क्षय होऊन, देहास पात झाला असतां, रुद्रवराप्रमाणेंच ही द्रुपदराजाची शिखंडिनी ना० कन्या होऊन जन्मास आली आणि हिलाच पुढें शिखंडी असें नांव प्राप्त झालें. ( भार० उद्योग० अ० १७३–१८७ ).

अंबाजन्म–भारतवर्षीय तीर्थ.

अंबायवीया–सत्यलोकांतील एक अप्सरा.

अंबालिका–काशीराजाच्या तीन कन्यांतलि कनिष्ट. ही अंबेची भगिनी असून विचित्रवीर्य ( भीष्माचा सावत्र भ्राता ) त्याची कनिष्ठ स्त्री होती. ही अनपत्य असतांच हिचा पति मरण पावला तेव्हां सत्यवतीनें ( भीष्माच्या सापत्न मातेनें ), हिचे ठायीं संतति उत्पन्न करण्यास त्यास सांगितलें. परंतु त्यानें तें, आपल्या प्रतिज्ञेस्तव मान्य केलें नाहीं. त्यावरून तिनें आपणास कौमारदशेंत झालेल्या कृष्णद्वैपायन पुत्राचें स्मरण केलें, त्या कालीं तो तेथें तत्काल प्रकट झाला. त्यास पाहून, तिनें विचित्रवीर्याच्या मरणाचा, व तो अनपत्य असल्याचा वृत्तांत सांगितला, आणि हिच्या ठायीं पुत्र निर्माण करण्याची आज्ञा केली. तीवरुन त्यानें हिच्या ठायीं गर्भ स्थापन केला असतां, कालेंकरून पांडवांचा पिता जो पंडु राजा त्याप्रत ही प्रसवली. ( भार० आदि० अ० १०५-१०६ ).

अंबिका–काशीराजाच्या तीन कन्यांतलि मध्यम ती. ही, अंबेची कनिष्ठ आणि अंबालिकेची ज्येष्ठ भगिनी असून, विचित्रवीर्याची ज्येष्ठ स्त्री होती. हीही, कनिष्ठ भगिनीप्रमाणेंच अनपत्य होती म्हणून, हिच्याठायीं कृष्णद्वैपायनानें गर्भ स्थापन केला असतां, दुर्योधनादिकांचा पिता जो धृतराष्ट्र, त्याप्रत ही प्रसवली. ( भार० आदि० अ० १०५-१०६ ).

अंबुधारा–नवव्या दक्षसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या ऋषभ ना० विष्णु अवताराची माता.

अंबुमती–भारतवर्षीय तीर्थ.

अंबुवाहिनी–भारतवर्षीय नदी.(भार० भीष्म०अ०९ ).

अभय–स्वायंभू मन्वंतरांतील धर्म ऋषीचा पुत्र याची माता दया.

२–प्रियव्रतपुत्र इध्मजिव्ह, त्याच्या सात पुत्रांतील कनिष्ट. हा प्लक्षद्वीपांतील सातव्या वर्षाचा अधिपति होता म्हणून, त्या वर्षास याचेंच नांव पडलें होतें.

३–प्लक्षद्वीपांतील सातवा वर्ष.

४–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा. )

५–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा. )

६–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

अभया–क्रौंच द्वीपांतील नदी.

अंभिणी–एक देवकन्या. ब्रह्मविद्यासंबंधानें सूर्याची शिष्य.

अभिभू–काशीराजाचा पुत्र, पांडवपक्षीय भारती युद्धांतील राजा. ( भार० द्रोण० अ० २३ ).

अभिमति–अष्टवसूंतील एका वसूची स्त्री.

अभिमन्यु–साहवा चक्षुर्मनु त्याच्या पुत्रांतील एक.

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, त्याच्या वंशांत जन्मलेल्या कुरुपुत्र जन्हुराजाच्या कुलांतील पंडुपुत्र जो अर्जुन, त्याचा पुत्र. हा, अष्टवसूंतील सोम ना० वसूचा पुत्र वर्चा, त्याच्या अंशानें कृष्णभगिनी सुभद्रा, तिचेठायीं अर्जुनापासून झाला होता. (भार० आदि० अ० ६७). हा जन्मला त्या वेळींच दीर्घबाहु, वीर, आणि महाक्रोधी, असा दिसला, म्हणून यास हें नांव ठेविलें होतें.

यानें, अर्जुनापासून दशविध धनुर्वेद, तसीच मानुष आणि दिव्य अस्त्रविद्या संपादिली होती. तींत हा इतका प्रवीण होता कीं, बलरामानेंही, याचें हस्तचापल्य, आणि अस्त्रयोजनापरिज्ञान, हीं पाहून, संतुष्ट होत्साता, यास रौद्र ना० उत्तम धनुष्य दिलें होतें. याचा बसण्याचा रथ परम भव्य असे, व त्यास हा, कपिल वर्णाचे पिंगट अश्व जोडी. याच्या रथाचा ध्वज शार्ङ पक्ष्याचा असून, रथ हांकण्यांत परम कुशल, असा याचा सारथि सुमित्र नांवाचा होता ( भार० द्रोण० अ० २३ ).

हा, अर्जुनाप्रमाणेंच पराक्रमी होता; किंबहुना अधिक म्हटल्यासही साजेल. म्हणूनच यास, चक्रव्यूह भेदून परत येण्याचें परिज्ञान पूर्ण नसतांही, तें अघटित कर्म यानें करण्याचें स्वीकारलें. तो इतिहास असा.–कौरवपांडवांचें युद्ध उपस्थित झालें असतां, भीष्म शरपंजरीं पडून द्रोणाचार्याचें युद्ध प्रवृत्त झालें, त्यांत युद्धाचा प्रथम दिवस समाप्त झाल्यावर, द्रोणास वाटलें कीं, पांडवसेनेंत अर्जुन असतां, मी

वृद्ध असल्यामुळें त्यापुढें टिकेन असें होणार नाहीं. तेव्हां यास काय करावें, असा विचार आचार्य करीत आहे तों, दुर्योधन त्याच्या शिबिरांत प्राप्त होऊन म्हणाला का, मी उदयीक अर्जुनास, संशप्तकांकडे सेनेच्या बाहेर युद्धास गुंतविण्याची योजना केली आहे, तर आपण संपूर्ण बलानें युद्ध करून, युधिष्ठिरास धरून माझ्या हातीं द्यावें. ही गोष्ट द्रोणास इष्ट होतीच; म्हणून त्यानें, उत्तम आहे असें म्हणून, दुर्योधनास जाण्याची आज्ञा देऊन तो निद्रेस गेला.

दुसऱ्या दिवशीं दुर्योधनानें, रात्रीं बोलल्याप्रमाणेंच केलें असें पाहून, द्रोणाचार्यानें, इतर पांडववीरांस दुर्भेद्य, अशा चक्रव्यूहाची रचना केली; ती युधिष्ठिरानें अवलोकन करून, व कृष्णार्जुन उभयतां संशप्तकांकडे गेले असें जाणून, तो भीमसेनास म्हणूं लागला कीं, आतां पुढें कसें करावें, या व्यूहाचा भेद करण्यास, कृष्ण, अर्जुन, आणि प्रद्युम्न, तिघे मात्र जाणतात; त्यांतून प्रद्युम्न तर द्वारकेस असल्यामुळें मुळींच येथें नसून, कृष्णार्जुन दोघे असूनही आज नसल्याप्रमाणेंच झाले आहेत. इतकें बोलून युधिष्ठिर स्तब्ध राहिला, व भीमसेनही, त्याचें भाषण श्रवण करून चिंतेंत पडला.

याप्रमाणें उभयतां चिंतेंत आहेत तों, अभिमन्यु तेथें आला, आणि त्यांस चिंताग्रस्त पाहून, चिंतेचें कारण विचारूं लागला. तेव्हां त्यांनीं, तूं बाल आहेस, तुला सांगून फल नाहीं असें जरी म्हटलें, तरी यानें मला सांगाच असा आग्रह धरिला, त्यावरून युधिष्ठिरानें, चक्रव्यूहाचा भेद करण्यास आपल्या सेनेंत कोणी नाहीं, म्हणून चिंता करीत आहों असें सांगितलें. तें ऐकून हा म्हणाला, चक्रव्यूह भेदून आंत प्रवेश कसा करावा, हें मीं श्रवण केलें असल्यामुळें जाणतों; परंतु माघारें बाहेर कसें यावें, तें अश्रुत म्हणून जाणत नाहीं. तथापि आपण माझ्या पाठीवर असाल तर हा व्यूह मी भेदीन. त्यावरून भीमास धीर येऊन, तो यास म्हणाला कीं, असें आहे तर, मी कित्येक वीरांसहित तूं जाशील त्याच मार्गानें तुझ्या मागून येतों. म्हणजे जरी तुला परत येण्याचें परिज्ञान नाहीं, तरी आम्ही जवळ असल्यामुळें तुला भीति होऊं देणार नाहीं.

असें भीमसेन बोलतांच, अभिमन्यूनेंही आंत जाण्याचें स्वीकारून, प्रतिज्ञेसरपूर्वक भाषण केलें कीं, जर मी अर्जुनापासून सुभद्रेच्याठायीं यथार्थ जन्मलों असेन, तर या व्यूहाचा आज भेद करीन. हे सर्व शत्रु माझा पराक्रम अवलोकन करोत, त्यावरून युधिष्ठिरानें यास आलिंगन दिलें, व विजयी होऊन सत्वर परत ये, असा आशीर्वाद देऊन, यास संभाळण्याविषयीं भीमास सांगितल्यावर याला व्यूहांत प्रवेश करण्याची आज्ञा दिली.

नंतर, युधिष्ठिरास, व भीमसेनास, क्रमानें वंदन करून, हा, आपल्या रथांत येऊन बसला, आणि आपल्या सारथ्यास म्हणाला, व्यूहद्वारावर द्रोणाचार्य उभे आहेत, तिकडे माझा रथ ने. त्यावरून सारथ्याचें व याचें बरेंच भाषण होऊन याच्या वीरश्री-अवलोकनानें, त्यास संतोष होत्साता, त्यानें इतक्या चातुर्यानें व त्वरेनें रथ हांकिला कीं, याचा व्यूहांत प्रवेश न होऊं देण्याविषयीं, द्रोणाचार्यांस अवसरच न सांपडतां, अभिमन्यु हा, कौरवसेनेंत निर्विघ्न प्रविष्ट झाला. अभिमन्यु व्यूहांत जातांच, भीमादिकही पाठोपाठ गेले. हें, कौरवसेनेंतील वीरांनीं अवलोकन करून, यावर ते मोठ्या आवेशानें धांवले. त्या काळीं उभयतांचें अत्यंत तुमुल युद्ध झालें; त्यांत अभिमन्यूनें, कित्येकांचे बाहु, व कित्येकांचीं शिरें, धनुष्यें, तोडून भूमीवर पाडून, सेनाही इतकी नष्ट केली कीं, मोठमोठे योद्धे, परम जर्जर होऊन, त्या रणांतून पळून जावें, असा विचार करूं लागले.

अभिमन्यूचें असें अद्भुत कर्म द्रोणाचार्यानें दुरून पाहून, तो अभिमन्यु होता तिकडे आला, आणि त्यानें सर्व वीरांस आज्ञा केली कीं, तुम्ही दुर्योधनास संभाळा, मी याशीं युद्ध करितों. असें म्हणून कित्येक योद्धयांसहवर्तमान तो याशीं युद्ध करूं लागला. त्यांत हा, सर्व योद्धयांशीं युद्ध करण्यास टिकला होत्साता, यानें, अश्मक ना० राजास ठार मारिलें, व शल्यास मूर्च्छित पाडून, त्याचा बंधु अंगावर आला असतां, सेनेसहित त्याचाही वध केला. इतकें पाहतांच, मोठ्या रोषानें कर्ण यावर धांवला, त्याशींही यानें, इतक्या निकरानें युद्ध केलें कीं, त्याला सुद्धां याशीं युद्धप्रसंग नको असें वाटूं लागलें.

याप्रमाणें युद्ध करीत असतां, हा व्यूहांत इतका दूर गेला कीं, तो भीमादिकांपासून बराच लांबला, तथापि ते यास दिसत असल्यामुळें, यानें धैर्य न सोडतां, युद्ध चालविलें, व असंख्य वीर मारिले. असें द्रोणाचार्यानें याचें युद्धकौशल्य पाहून तो कृपा-

चार्यास म्हणूं लागला कीं, मला हा प्रतिअर्जुनच आहे असें वाटतें, आणि त्यामुळें यावर शस्त्रच धरूं नये असा मोह उत्पन्न होतो. हें आचार्याचें भाषण सत्यच होईल कीं काय असें दुर्योधनास वाटून, तो चिंताग्रस्त झाला. असें पाहून दुःशासन यावर मोठ्या त्वरेनें धांवला. त्यास पाहून अभिमन्यूनें, त्याशीं कांहीं भाषण करुन, त्यास इतकें मूर्च्छित केलें कीं, त्याच्या सारथ्यास तो मरणच पावला असा भास होऊन, त्यानें त्याचा रथ रणांतून माघारा परतविला.

दुःशासनाची अशी अवस्था पाहून पुनः कर्ण याच्यावर चालून आला. त्यास अभिमन्यूनें पीडित करुन, तो पाहत असतां, त्याचा बंधु राधेय यास एकाएकीं ठार मारिलें; त्यावरुन कर्ण परम खिन्न होऊन, शोकाकुलित झाला आहे तों, अभिमन्यु कौरवसेनेचा नाश करीत, व सहस्रावधि योद्धे मारीत, इतका व्यूहांत दूर गेला कीं, भीमसेनादिक यास, व हा त्यांस, दिसेनासा झाला. तथापि त्यांनीं येऊन यास सत्वर गांठावें, म्हणून यानें इतका निष्कंटक मार्ग करुन ठेविला होता कीं, जयद्रथ, जर मध्यें आला नसता, तर त्यांनीं यास सहज गांठलें असतें. परंतु याच्या दुर्दैवानें, रुद्रवरेंकरुन युक्त झालेल्या जयद्रथानें मध्यें येऊन, भीमादिकांचा पराभव करुन, त्यांस याच्यापर्यंत जाऊंच दिलें नाहीं. ( ३ जयद्रथ श० पहा ).

इकडे अभिमन्यु भीमादिक येण्याची मार्गप्रतीक्षा करीत आहे तों, कर्णपुत्र वृषसेन यावर धांवला. त्याचा यानें पराभव करुन, व सातों, सत्यश्रवा, शल्यपुत्र रुक्मरथ, व त्याचे शतबंधु, दुर्योधनपुत्र लक्ष्मण, आणि क्राथ राजाचा पुत्र, इतक्यांस मोठमोठे योद्धे पहात असतां, व त्यांचें संरक्षण करीत असतां, ठार मारिलें. त्यावरुन, द्रोण, कृप, कर्ण, अश्वत्थामा, बृहद्बल राजा, आणि कृतवर्मा यादव, हे साहा महारथी, यावर चालून आले आणि सर्व मिळून एकट्यावर बाणवृष्टि करूं लागले. त्या सर्वांचेंही यानें निवारण करुन, व सर्वांस व्यथित करुन, बृहद्बल राजाचा तर प्राणच घेतला, आणि दहा सहस्र रथी मारुन भूमीवर पाडिले.

असें अभिमन्यूचें विलक्षण कर्म पाहून, कर्ण द्रोणाचार्यास म्हणूं लागला कीं मला वाटतें, आज याच्या हातून आपण वांचूं असें दिसत नाहीं. तें ऐकून द्रोणाचार्यानें कर्णादिक महारथ्यांशीं अमुकानें अमुक, याप्रमाणें एकामागें एक प्रत्येकानें कार्य केल्यास हा मरेल, येऱ्हवीं मरणार नाहीं, असा संकेत करुन, त्यानें स्वतः प्रथम याचें कवच तोडून भूमीवर पाडलें, व रथाचे अश्व मारिले. इतक्यांत कर्णानें धनुष्य तोडून, कृतवर्म्यानें सारथि, व चक्ररक्षक, यांस मारिलें.

अभिमन्यु विरथी झाला असतां, त्यानें हातांत खड्ग आणि चर्म ( ढाल ) घेतलें, व पादचारीच युद्ध करूं लागला. तें पाहून द्रोणानें खड्ग, व कर्णानें चर्म अशीं अनुक्रमें तोडिलीं, तेव्हां यानें रथचक्र हातांत घेतलें. तेंही द्रोणानें त्वरेनें तोडतांच, यानें क्रोधानें गदा घेतली, व त्या आवेशांत अश्वत्थाम्याच्या रथाचे अश्व व सारथि, यांस मारुन, बहुतेक गांधार, व आणखी कित्येक सैनिक यांचे प्राण घेतले.

याप्रमाणें चाललें आहे तों, दुःशासनाचा पुत्र यावर धांवला. त्या काळीं दोघांचेंही बरेंच युद्ध झालें. परंतु अभिमन्यु युद्ध करतां करतां, अतिशय श्रमला होता, त्यामुळें दौःशासनीनें याच्या आंगावर गदेचा प्रहार करतांच, हा मूर्च्छा येऊन पडला. तथापि सावध होऊन उठत आहे तों, पुनः त्यानें याच्या मस्तकावर तिचा प्रहार केल्यामुळें हा भूमीवर पडून मरण पावला.

अभिमन्यूची आकृति, त्याचा मातुल जो कृष्ण, त्याप्रमाणेंच असून, वीर्य, आणि शौर्य हेंही तसेंच होतें. याशिवाय हा कृष्णास जितका प्रिय असे, तितकाच किंबहुना कांहीं अधिक बलरामासही प्रिय होता. यास स्त्रिया दोन होत्या, त्यांत पहिली वत्सला, ती बलरामाची कन्या.व दुसरी उत्तरा विराट राजाची कन्या. हा मरण पावला, त्यावेळेस उत्तरा गर्भवती असून,तिला जो पुढें पुत्र झाला, तोच परीक्षित् राजा प्रख्यात आहे. (भार०द्रोण०अ० ३५–४९ ).

**अभिमान**–स्वायंभू मन्वंतरांतील जो धर्मऋषि, त्याचा पुत्र; याची माता उन्नति.

**अभिसार**–भारतवर्षीय देश. ( भार० सभा० अ० २७).

**अभिसारीपुरी**–अभिसार देशाची राजधानी. येथील राजा चित्रसेन. ( ३ चित्रसेन श० पहा ).

**अभूतरजस्**–रैवतमन्वंतरांतील देववि०.

**अंभोरुह**–विश्वामित्राच्या पुत्रांतील एक. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**अमरकंटक**–भारतवर्षीय भरतखंडस्थ सामान्य पर्वत. हा कालिंग देशांत असून एक योजन चौरसचौरस आहे.

व यापासून नर्मदा नदी निघाली आहे. ( मत्स्य० अ० ११३ ).

**अमरण**–एक ब्रह्मर्षि. ( २ अत्रि श० पहा ).

**अमरव्हद**–भारतवर्षीय तीर्थ.

**अमरावती**–इंद्राची स्वर्गातील नगरी.

**अमर्क**–द्वितीयार्थक उशना ऋषीच्या दोन पुत्रांतील दुसरा. ( शंडामर्क श० पहा ).

**अमर्षण**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न रामचंद्रपुत्र कुश, त्याच्या नभ ना० राजाच्या वंशांत जन्मलेल्या संधि राजाचा पुत्र. याचा पुत्र महस्वान् ना० राजा.

**अमल**–धृष्टबुद्धि प्रधानाचा कनिष्ठ पुत्र. ( १ चंद्रहास श० पहा ).

**अमला**–वैवस्वतमन्वंतरांतील अत्रि ऋषीची कन्या, ही मोठी ब्रह्मनिष्ठ होती.

**अमार्गपथ**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**अमितौजा**–केतुमान् ना० असुरांशानें जन्मलेला भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. ( भार० उद्यो० अ० १७१ ).

**अमित्राजित्**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्ष राजा, त्याचा पौत्र, व सुतपा राजाचा पुत्र तो.

**अमूर्तरजा**–( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न कुश अ० कुशिक राजा, त्याच्या चार पुत्रांतील दुसरा. यास क्वचित् मूर्तय असेंही म्हटलें आहे.

२–एक राजर्षि, याचें मुख्य नांव गय. ( ६ गय श० पहा ).

**अमूर्तरया**–( सू० वं० ) इलकुलोत्पन्न गय राजाचा वंशज तो.

**अमृत**–प्रियव्रतपुत्र इध्माजिव्ह, त्याच्या सात पुत्रांतील साहवा. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२–प्लक्ष द्वीपांतील साहवा वर्ष.

३–चतुर्दश रत्नांतील अमरकारक रस वि० रूप रत्न.

**अमृतनाद**–मुख्य यजुर्वेदोपनिषत्, हीस नाद असेंही म्हटलें आहे.

**अमृतप्रभ**–आठव्या सावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या देवांतील एका प्रकारचे देव ते.

**अमृतबिंदु**–मुख्य यजुर्वेदोपनिषत्, हिला बिंदु असें म्हटलें आहे.

**अमृतौघा**–क्रौंच द्वीपांतील नदी.

**अमोघ**–बृहस्पतीपासून तारेस झालेल्या स्वाहा ना० कन्येच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ.

**अय**–दुसऱ्या स्वारोचिष मन्वंतरांतील प्रजाप्रति तो. हा, वसिष्ठाचा पुत्र. ( १ वसिष्ठ श० पहा ).

**अयति**–नहुष राजाच्या साहा पुत्रांतील चौथा.

**अयन**–देववि०. ( साध्यदेव श० पहा ).

**अयःपान**–एक नरक आहे. तीन वर्णांतील जे पुरुष, अ० त्यांच्या स्त्रिया, सुरापान किंवा अविधीनें सोमपान करितात, त्यांस लोहरसाचें पान करवून, यमदूत येथें यातना करतात.

**अयवाह**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ०९).

**अयःशिरा**–कश्यपापासून दनूस झालेल्या दानवांतील एक.

**अयास्य**–अंगिरसगोत्रोत्पन्न एक ऋषि, याच्या वंशजांस आयास्य असें म्हटलें आहे. हा, हरिश्चंद्र राजाच्या यज्ञांत उद्गाता झाला होता. ( भार० सभा० अ० १२ ).

**अयुत**–( सो० वं० ) पुरुकुलोत्पन्न अजमीढवंशांतील, जन्हुकुलांत जन्मलेल्या राधिक राजाचा पुत्र. याचा पुत्र क्रोधन राजा.

**अयुताजित्**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या वंशांत जन्मलेल्या सात्वत राजाच्या भजमान् पुत्रापासून दुसऱ्या स्त्रीस झालेल्या तीन पुत्रांतील कनिष्ठ.

**अयुतायु**–( सू० वं० ) इक्ष्वाकुलोत्पन्न सिंधुद्वीप राजाचा पुत्र, याचा पुत्र ऋतुपर्ण राजा.

२–( सो० वं० ) नहुषकुलोत्पन्न पूरु राजा, त्याच्या उपरिचर वसुराजकुलांत जन्मलेल्या श्रुतश्रवा राजाचा पुत्र. यास निरमित्र ना० पुत्र होता.

**अयोध्या**–वैवस्वत मनूनें, आपणास राहण्यासाठीं स्थापिलेली नगरी. ही, जरी ग्रंथामध्यें कोसलदेशाची राजधानी मुख्य म्हटली आहे, तरी इंद्रप्रस्थाच्या पूर्वेस दिशाभेदानें दोन कोसल देश आहेत त्यांतील आग्नेय कोसलाचीच राजधानी होय. दशरथ राजाच्या वेळेस, ही नगरी बारा योजनें लांब, व तीन योजनें रुंद होती. ( वा० रा० बाल० सर्ग ५ ). दशरथाच्या मरणानंतर, या नगरींत दाशरथि रामानें, अकरा सहस्र वर्षें राज्य केलें, व निजधामास जातांना, हिच्यांतील प्राणिमात्रास आपल्यासमागमें नेलें, त्यामुळें ही बहुतकालपर्यंत शून्य पडून राहिली होती. परंतु पुढें सूर्यवंशीय ऋषभ ना० राजानें, हींत पुनः वसती केली. ( वा० रा० उत्तर० स० १११ ).

**अयोबाहु**–धृतराष्ट्र राजाच्या शतपुत्रांतील एक.

**अयोमुख**–दनुपुत्र दानवांतील एक दानव.

२–भरतवर्षाच्या दक्षिणेकडील एक सामान्य पर्वत. ( वा० रा० किष्किंधा० ).

**अयोमुखी**–एक राक्षसी. पंचवटींतून सीता हरण झाल्यावर, तिचा शोध करीत, रामलक्ष्मण क्रौंचारण्यांतून चालले असतां, मातंगाश्रमाकडे गेले.तेथें, ही लक्ष्मणाकडे येऊन, त्यास वरण्याची इच्छा दर्शवूं लागली, तेव्हां त्यानें शूर्पणखेप्रमाणेंच हिची अवस्था केली असतां, हिनें तेथून पलायन केलें. ( वा० रा० अर० स० ६९ ).

**अरजा**–भृगुवंशज भार्गवकन्या, हिचें कौमार्य, दंडक राजानें नष्ट केलें होतें. ( दंडक श० पहा ).

**अरट्ट**–भारतवर्षीय देश. ( वाहीक श० पहा ). येथील अश्वांची उत्तम कोटींत ख्याति आहे.

**अरंतुक**–एक ऱ्हद. ( २ कुरुक्षेत्र श० पहा ).

**अरालि**–एक विश्वामित्रपुत्र.

**अरि**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**अरिघ्न**–रावणपक्षीय राक्षस.

**अरिजित्**–भद्रेपासून झालेला कृष्णपुत्र.

**अरिद्योत्**–( सो० वं० ) नहुषकुलोत्पन्न यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या सात्वतकुलांतील अंधकवंशांत जन्मलेल्या दुंदुभि राजाचा पुत्र, याचा पुत्र पुनर्वसु ना० राजा.

**अरिमर्दन**–( सो० वं० ) सात्वतकुलोत्पन्न वृष्णिपुत्र श्वफल्क राजा, याच्या तेरा पुत्रांतील एक.

**अरिमेजय**–एक यादव.

**अरिष्ट**–बलींदैत्याच्या शतपुत्रांतील एक.

२–दनुपुत्र दानव एक.

३–कंसाच्या आज्ञेनें वृषभरुप धारण करुन, कृष्णनाशार्थ गोकुलांत आलेला राक्षस; हा, कृष्णाच्या हातून मरण पावला. ( भाग० दशम अ० ३६ ).

४– लंकेंतील एक पर्वत. हा दश योजनें विस्तीर्ण, व तीस योजनें उंच होता. सीताशुद्धि झाल्यावर, मारुति किष्किंधेस यावयास निघाला असतां,उड्डान साधण्यासाठीं तो यावर उभा राहिला, त्याकाळीं हा भूमींत गेला तो गेलाच.

( वा० रा० सुंदर० अ० ५६ ).

**अरिष्टनेमि**–कश्यप ऋषीस नामांतर.(भार० शांति० अ० २०८ श्लो० ८ ).

२– विनतेस कश्यपापासून झालेला पुत्र. याला तार्क्ष्य नामांतर आहे. मुख्यत्वेंकरुन गरुडास नांव असावें

३– पौषमासांतील गंधर्व. ( सहस्य श० पहा).

४– प्राचेतस दक्षाच्या चार कन्यांचा पति

५– ( विदे० वं० ) पुरुजित् जनकाचा पुत्र, याचा पुत्र श्रुतायु जनक.

६– अज्ञातवासकाळीं, तंतिपाल या नामाप्रमाणेंच, सहदेवानें हेंही नांव धारण केलें होतें. (भार०विराट० अ० १० )

**अरिष्टसेन**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. ( भार० शल्य० अ० ६ )

**अरिष्टा**–ग्रंथांतरीं आढळत्ये जी कश्यप ऋषीची स्त्री ती. परंतु भारतोक्त तेरा स्त्रियांतील हें नांव कोणतीचें तो निर्णय होत नाहीं.

**अरुज**–रावणपक्षीय राक्षस.

**अरुण**–पांचव्या रैवतमनूच्या दश पुत्रांतील एक.

२– कश्यप ऋषीपासून विनतेस झालेला पुत्र. गरुडाचा ज्येष्ठ भ्राता. विनतेनें याचें अंड अपूर्णकाळीं फोडल्यामुळें, हा चरणहीन जन्मला होता. यास अनूरु, विपाद अशीं नामें आहेत. यानें आपल्या मातेस शाप दिला होता कीं, मला तूं अपूर्ण जन्मविलेंस, यास्तव तुला सपत्नीचें ( सवतीचें ) दास्य प्राप्त होईल. परंतु तिनें प्रार्थना केल्यावरुन, पुनः यानें तिला उःशाप दिला कीं, दुसरा पुत्र तुला होईल तो, तुझी त्यांतून मुक्तता करील. हा प्रस्तुत सूर्यसारथ्य करुन आहे. ( भार० आदि० अ० २४ ). यास श्येनी ना० स्त्री, व तिजपासून झालेले संपाति, आणि जटायु, असे दोन पुत्र होते.

३— गौतमगोत्रोत्पन्न ऋषि, यास क्वचित अरुणि असेंही म्हटलेलें आढळतें. याचा जो पुत्र आरुणि ऋषि, तोच उद्दालक या नांवानें प्रसिद्ध आहे.

४– ( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न पहिला अनरण्य ना० राजा, त्याच्या हर्यश्व ना० पुत्रापासून, दृषद्वती स्त्रीच्या ठायीं झालेला पुत्र; यास निबंधन अ० त्रिबंधन नांवाचा पुत्र होता.

५– विप्रचित्ति ना० दानववंशांत जन्मलेला दानव. यानें गायत्रीजपानें तीस सहस्र वर्षेपर्यंत तीव्र तप करुन ब्रह्मदेवाचें आराधन केलें. त्यावरुन यास ब्रह्मदेव प्रत्यक्ष होऊन वर माग असें म्हणाले असतां, यानें अमरत्व मागितलें. तें अप्राप्त आहे, दुसरें कांहीं माग, असें त्यांनीं म्हटल्यावर, यानें, स्त्री, पुरुष, द्विपद, चतुष्पद, यांतून कोणाच्याही हातून मला मृत्यु नसावा, म्हणून मागितलें. तेव्हां दिलें असें म्हणून ब्रह्मदेव सत्यलोकीं गेले. पुढें, यानें आपलें असुरमंडळी जमवून, त्रैलोक्यास

पीडा आरंभिली, व दिग्पालादिकांस जिंकून त्यांचे अधिकार आपणच चालवूं लागला, त्या योगानें सर्वांस त्रास होऊन, देव, ऋषि, आदिकरून पुढें कसें करावें असा विचार करूं लागले. तों एकाएकीं आकाशवाणी झाली कीं, या दानवास, गायत्रीचा त्याग घडल्याशिवाय, मरण येणार नाहीं. तीं ऐकून, सर्वांनीं या कार्यासिद्धिसाठीं, बृहस्पतीची योजना केली. त्यावरून बृहस्पति, तथास्तु म्हणून याकडे आला. त्यास यानें पाहून म्हटलें कीं, मी आपल्या पक्षाचा नसतां, आपलें येणें इकडे झालें, हें आश्चर्य आहे. तेव्हां बृहस्पति बोलला, अरुणा, असें कसें म्हणतोस ? तूं तर आमच्याच पक्षाचा आहेस. कसा म्हणशील तर एक, ज्या गायत्री देवीची आम्ही उपासना करितों, तिचाच, तूंही उपासक आहेस अर्थात् तूं आमच्याच पक्षाचा निश्चयेंकरून होस. हें बृहस्पतीचें भाषण, यास मोहानें विपरीत वाटून, देवांच्या विरुद्ध पक्षाचा जो मी, त्या मला, त्यांची उपास्य देवता असणें अयोग्य, अशी कुबुद्धि उत्पन्न होऊन, यानें गायत्रीचा त्याग केला. तेणेंकरून तिचा क्षोभ झाला, व हा तत्काळ नाश पावला. ( देवीभा० दशम० अ० १३ ).

६– कृष्णानें मारलेला असुर. ( नरकासुर श० पहा ).

७– महारथी असा एक कृष्णाचा प्रपौत्र तो.

८– हिमालयाचें शिखरवि०. हें कैलास शिखराच्या पश्चिमेस आहे.

९– अकराव्या धर्मसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षींतील एक.

**अरुणा**–कौरवपांडवांची युद्धभूमि जें कुरुक्षेत्र, त्यांतील हिमप्रस्थ ना० स्थलासमीप असणारी नदी. हिच्याच संनिध सरस्वती नदीच्या सप्तप्रवाहांतील ओघवती ना० प्रवाह आहे. ( भार० शल्य० अ०५ ).

२– प्लक्षद्वीपांतील एक नदी.

३– प्राधेपासून झालेल्या अप्सरांतील एक.

**अरुणायनि**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा).

**अरुणि**–ब्रह्ममानसपुत्र. ( भाग० चतु० अ० ८ ).

२– तृतीयार्थक अरुण ऋषि, त्यासच नांव.

**अरुंधती**–स्वायंभू मन्वंतरांतील जो वसिष्ठ ऋषि, त्याची स्त्री ही कर्दम प्रजापतीपासून देवहूतीस झालेल्या नऊ कन्यांतील एक होती. ( १ कर्दम श० पहा. )

२– चालू वैवस्वत मन्वंतरांतील जो मैत्रावरुणि वसिष्ठ ऋषि, त्याची स्त्री; ही कोणाची कन्या तें आढळत नाहीं. मात्र नारदाची भगिनी, इतकेंच आढळतें. ( २ नारद श० पहा. ) हिला, वसिष्ठापासून झालेला पुत्र, तोच शक्ति ऋषि. ( मत्स्य० अ० २०० ).

३– प्राचेतस दक्षाची कन्या, धर्मऋषीच्या दाहा स्त्रियांतील एक हिलाच ककुब अ० ककुभ असें नामांतर असे. हिला संकट ना० पुत्र, व कीकट पौत्र होता. ( भाग० ६ स्कं० अ० ६ ).

**अरुंधतीवट**–भारतवर्षीय तीर्थ.

**अरूपा**–प्राधेस कश्यपापासून झालेल्या अप्सरांतील एक–

**अर्क**–सूर्यास नांव आहे.

२–( सो० वं० ) नहुषकुलोत्पन्न ययातिपुत्र पूरु राजा, त्याच्या अजमीढ कुलांतील नील राजाचा वंशज पूरुज राजा त्याचा पुत्र. यास भर्म्याश्व अ० भद्राश्व ना० पुत्र होता.

३–रामसेनेंतील एक वानर. ( वा०रा०युद्ध०स०४).

**अर्कपर्ण**–मुनीना० भार्येस कश्यपापासून झालेल्या देवगंधर्वांतील एक. यास तृणप असें नामांतर आहे.

**अर्चि**–वेनराजाचा देह मथन केला असतां, तेथून जें मिथुन उत्पन्न झालें, त्यांतील स्त्री ती. हीच, त्या मिथुनांतील पुरुष जो पृथु राजा, त्याची स्त्री झाली. ( २ पृथु श० पहा ).

२–कृशाश्व ऋषीच्या दोन स्त्रियांतील पहिली. धूम्रकेश ऋषीची माता.

**अर्चिमाली**–सीताशुद्धीसाठीं, पश्चिमेकडे गेलेल्या वानरांतील एक. ( वा० रा० किष्किं० स० ४२ ).

**अर्चिष्मती**–बृहस्पतीची दुसरी स्त्री शुभा, तिच्या सात कन्यांतील चौथी.

**अर्चिष्मान्**–रामसेनेंतील वानर.

**अर्जुन**–पांचव्या रैवतमनूच्या पुत्रांतील एक.

२–( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजित्, त्याच्या हैहयकुलांत जन्मलेल्या धनक राजाचा पौत्र, व कृतवीर्य राजाचा पुत्र तो. यास कार्तवीर्य, आणि सहस्रार्जुन, अशीं नामें होतीं. ( कार्तवीर्य श० पहा ).

३–( सो०वं० ) नहुषकुलोत्पन्न ययातिपुत्र पूरु, त्याच्या अजमीढवंशांत जन्मलेल्या जन्हुराजकुलांतील शंतनूच्या पंडु ना० पौत्रापासून, पृथा अ० कुंती भार्येच्या ठायीं झालेल्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. हा दुर्वास ऋषीच्या मंत्रप्रभावेंकरून कुंतीच्या उदरीं इंद्रांशानें जन्मला होता. ( भार० आदि० अ० ११८-१२४ ).

अर्जुनानें, युधिष्ठिरादि चौघे बंधु, तसेच दुर्योधनादिक शत बंधु, यांसहित द्रोणाचार्यांजवळ शस्त्रास्त्रविद्या संपादन केली होती, व हा, त्या विद्येंत परम निपुण होता म्हणून, सर्व शिष्यांहून, द्रोणाचें प्रेम यावर

विशेष असे. एकदां द्रोणानें, सर्वांची परीक्षा पाहिली तींत हाच उत्तम असा ठरल्यावर, सर्वांस आचार्यानें द्रुपद राजास, आपणाजवळ बांधून आणण्याची गुरुदक्षिणा मागितली. तेव्हां, सर्वही शिष्य पांचालदेशीं गेले. त्यांत हाही गेला असून, तेथें मोठा युद्धप्रसंग झाला. परंतु द्रुपदराजा महापराक्रमी असल्यामुळें, त्यास कोणाच्यानेंही बांधवलें नाहीं. शेवटीं यानें पुढें होऊन, द्रुपदाशीं युद्ध केलें, व त्यास पराजित करुन रथाशीं बांधून, द्रोणाचार्यास आणून समर्पिलें. (द्रोणाचार्य श० पहा ).

पुढें, दिवसेंदिवस सर्वच मोठे होत चालले असतां, कौरवपांडवांचे वारंवार कलह होऊं लागले असें पाहून, धृतराष्ट्रानें पांडवांस वारणावत नगरींत ठेवण्याचा निश्चय केला. तेथें दुर्योधनानें धृतराष्ट्रास न कळूं देतां, लाक्षागृह निर्माण करवून, पांडवांस त्यांत दग्ध करण्याचा केलेला विचार विदुरास कळल्यामुळें,मातेसहित पांडव, त्यांतून सुरक्षित निघून, द्रौपदीस्वयंवराकरितां विप्रवेषानें चालले तों, रात्रिसमयीं अंगारपर्ण गंधर्वाची मार्गांत गांठ पडली. तेव्हां तो यांस आडवूं लागला. त्यावरुन अर्जुनाचें व त्याचें युद्ध झालें. त्यांत त्याचा पराजय झाल्यामुळें अर्जुनाशीं त्यानें सख्य केलें. ( १ अंगारपर्ण श० पहा ).

नंतर, तेथून बंधूसहवर्तमान अर्जुन पांचालपुरास गेला, व तेथें त्यानें, मत्स्ययंत्राचा भेद करुन द्रौपदीस वरिलें. ( द्रुपद श० पहा ). हें वर्तमान धृतराष्ट्रास कळल्यावर, त्यांनें, पांडवांस सन्मानपूर्वक पुनः हस्तिनापुरास नेलें, व त्यांस अर्ध राज्य देऊन, इंद्रप्रस्थांत ठेविलें असतां, अर्जुन तेथें बंधूसहवर्तमान सुखानें राहिला. एकदां असें झालें कीं,युधिष्ठिर आणि द्रौपदी, रात्रीं एकांतांत असतां, यास, याच्या धनुष्याची गरज लागली, आणि तें तर त्याच एकांतस्थलांत होतें. तें यानें, तेथें जाऊन आणल्यामुळें, यास तीर्थयात्रेस जावें लागलें. ( भार० आदि० अ० २१३ ) (पांचांतून जो कोणी, त्यांतून एकाचा, व द्रौपदीचा, समागम पाहील त्यानें तीर्थयात्रा करावी असा नियम होता ). त्याप्रमाणें हा, तीर्थयात्रा करीत फिरत असतां, उलूपीशीं याचा समागम झाला. ( उलूपि श० पहा ). तसेंच यांस चित्रांगदेनेंही वरिलें. ( २ चित्रांगदा श० पहा ). नंतर तेथून, हा निघाला असतां, याच्या हातून ग्राह ( पांच अप्सरा सुसरी ) त्यांचें विमोचन झालें. ( नारीतीर्थ श० पहा ). त्यापुढें हा, द्वारकेस फिरत फिरत गेला असतां, याचा सुभद्रेशीं विवाह होऊन, तीर्थयात्रा समाप्त होतांच, इंद्रप्रस्थास परत आला. ( सुभद्रा श० पहा ).

अर्जुन इंद्रप्रस्थास आल्यावर, खांडववन भक्षणार्थ मागण्यासाठीं, ब्राह्मणवेषानें अग्नि याकडेस आला. त्यापासून यास रथ, व गांडीव धनुष्य यांचा लाभ होऊन, यानें, त्यास तें वन भक्षणार्थ दिलें. (१ अग्नि श० पहा ). त्यांत, यानें, कृष्णाच्या साह्यानें, मयासुराचें रक्षण करुन इंद्रादिदेव युद्धास आले असतां, त्यांचा पराभव केला. तथापि इंद्र, यावर संतुष्ट होऊन, यास वरदानादिक देऊन स्वलोकीं गेला. ( भार० आदि० अ० २२४–२३४ ).

तदनंतर, अर्जुनाचे उपकार स्मरुन, मयासुरानें, पांडवांस सभा करुन दिल्यावर, राजसूय यज्ञ करण्याचा युधिष्ठिरानें निश्चय केला. परंतु त्यास द्रव्य पाहिजे, म्हणून त्यानें, आपल्या चौघां भ्रात्यांस चारी दिशांचा जय करुन, द्रव्य आणण्याची आज्ञा केली असतां, हा उत्तर दिशा जिंकण्यास गेला. तो याचा दिग्विजय याप्रमाणें.—

अर्जुन, प्रथम इंद्रप्रस्थाहून, म्हणजे आपल्या कुरुदेशाहून निघाला, तो त्याच्या उत्तरेस कुलिंद ना० देश आधीं लागतो तेथें गेला. तेथून क्रमानें उत्तर आनर्त, कालकूट, अपर उत्तर कुलिंद, व सुमंडल, हे देश त्यानें जिंकले. नंतर पुढें शाकलद्वीप देशींचा राजा प्रतिविंध्य, त्याशीं याचें बरेंच युद्ध होऊन, त्यास जिंकून यानें समागमें घेतल्यावर, प्राग्ज्योतिष पुरीच्या भगदत्त राजाकडे हा गेला. ही प्राग्ज्योतिष पुरी, प्राग्ज्योतिष देशाचीच राजधानी असावी, व हा देश, ( मूळचा ज्योतिष नांवानें प्रख्यात असून, ) कुरुदेशाच्या उत्तरेस खरा, परंतु कांहींसा पूर्वेकडे असल्याकारणानें, त्याला प्राग्ज्योतिष असें नांव पडलें असावें. प्राग्ज्योतिष देश, जरी किरात देश, व चीन देश, यांहून भिन्न आहे, तरी त्यांच्या आश्रयानें बलाढ्य असल्यामुळें, त्याचा राजा भगदत्त त्यानें अर्जुनाशीं आठ दिवस युद्ध केलें. परंतु अर्जुनापुढें त्याचा निरुपाय होऊन, त्यानें अर्जुनास, कांहीं नम्रता, व कांहीं इंद्राशीं सख्य असल्याचें नातें सांगितल्यावरुन, अर्जुनानेंही, असें आहे तर, मी तुला आज्ञा करितों असें नव्हे, तर प्रीतिपूर्वकच युधिष्ठिराच्या यज्ञाकरितां करभार मागतों, असें बोलून, त्यापासून कर घेतला. ( भार० सभा० अ० २६ ).

याप्रमाणें भगदत्त राजास जिंकून, व त्यानें संतोषानें करभार दिला, तेणेंकरून आभारी होऊन, अर्जुन पुनः उत्तरेकडे निघाला. जातां जातां, अंतर्गिरि, बहिर्गिरि व उपगिरि, हे देश त्यानें जिंकून, व तेथील राजांपासून करभार घेऊन, त्यांच्या प्रीतिसंपादनानें त्यांसहवर्तमान, उलूकदेशाच्या बृहंत राजाकडे गेला. तो पर्वतवासी राजा, अर्जुन आला असें ऐकून, त्याशीं युद्धास आला; परंतु उपाय चालेना असें पाहून, त्यानें अर्जुनास करभार दिला. नंतर त्यासहित सेनाबिंदु राजास जिंकून, मोदापुरचे वामदेव, आणि सुदामा, यांस अर्जुनानें जिंकलें. पुढें, अपरउत्तरउलूक, पंचगणदेश, आणि देवप्रस्थ येथील सेनाबिंदु राजा ( हा दुसरा सेनाबिंदु ) यांसहित पौरवेश्वर जो विश्वगश्व ना० राजा तो, पर्वतवासी दस्यु राजे, आणि उत्सवसंकेत सप्तगण, यांसही जिंकून, त्यांपासून करभार घेतला. नंतर काश्मीर देश, दाहा मांडलिक राजांनीं युक्त लोहित देश, त्रिगर्त देश, दार्व, कोकनद देश, येथील राजांनीं, अर्जुनास करभार दिल्यावर, अभिसार देशाची राजधानी अभिसारी पुरी तेथील चित्रसेन राजास जिंकून, उरगापुरीवासी रोचमान राजा, त्यासही अर्जुनानें जिंकलें, व त्यापासून करभार घेतला. त्यापुढें सिंहपुर येथील, चित्रायुध राजास जिंकून, उत्तरसुह्म, व उत्तरचोल, हेही देश अर्जुनानें जिंकले. तेथून पुढें महाशूर बाल्हीक राजास वश करून, कांबोज देशासहित दरद देशींचे रहिवासी जिंकून, व ज्यांनीं, प्रागुत्तर दिशेचा (ऐशानी दिशेचा) आश्रय केला, अशा दस्यु राजांसही अर्जुनानें जिंकलें. त्यापुढें, लोहदेशवासी, परमकांबोज, यांस जिंकून, उत्तरेकडील ऋषिक राजे, यांजकडे अर्जुन गेला. ( ऋषिकदेश, हाच प्रस्तुत रशिया अशा नांवानें, प्रसिद्ध असेल. ) तेथें अर्जुनाचा, व ऋषिक राजाचा, मोठा भयंकर संग्राम झाला. परंतु अर्जुनानें, त्यास जिंकून, शुकोदरवर्णाचे आठ, व मयूरासारखे कांहीं, असे अत्यंत त्वरित चालणारे अश्व करार्थ घेऊन, हिमवान् पर्वत, व त्यावरील देश जिंकून, श्वेतपर्वत ना० त्याच्या शिखरावर तो प्रविष्ट झाला. यावरून मुख्य हिमालयपर्वत, ऋषिक ( रशिया ) देशाच्या उत्तरेकडे दूर आहे असें सिद्ध होतें, व त्या वेळेस तेथपर्यंत जाण्यास जलमार्गही नव्हता. ( भार० सभा० अ० २७ ).

अर्जुन श्वेतपर्वताचें अतिक्रमण करून, द्रुमपुत्रानें रक्षित अशा, किंपुरुष वर्षांतील देशांत गेला. तेथें द्रुमपुत्रास जिंकून व त्यापासून करभार घेऊन, गुह्यकांनीं रक्षित जो हाटक देश, तेथें जाऊन, व त्यांपासून सामोपायानेंच कर घेऊन, मानससरोवर व ऋषिकुल्यानदी, यांस त्यानें पाहिलें. नंतर त्यांस व गंधर्वांनीं रक्षित अशा देशांस जिंकून त्यांपासून तित्तिरि पक्ष्याप्रमाणें चित्रविचित्र रंगाचे मंडुकाख्य ना० अश्व करार्थ घेतल्यावर, उत्तरेकडे असणाऱ्या हरिवर्षास तो प्राप्त झाला, व तोही देश जिंकावा म्हणून उद्युक्त झाला आहे तों, यानें तेथें, ज्यांचीं शरीरें मोठीं व जे मोठे बलवान्, अशा द्वारपालांस अवलोकन केलें. तेव्हां ते यास, हर्षित अंतःकरणानें असें बोलते झाले.—

### श्लोक.

पार्थ नेदं त्वया शक्यं पुरं जेतुं कथंचन ।
उपावर्तस्व कल्याण पर्याप्तमिदमुच्यते ॥ ९ ॥
इदं पुरं यः प्रविशेद्ध्रुवं न स भवेन्नरः ।
प्रियामहे त्वया वीर पर्याप्तो विजयस्तव ॥ १० ॥
प्रविष्टोपि हि कौंतेय नेह द्रक्ष्यसि किंचन ।
नहि मानुषदेहेन शक्यमत्राभिवीक्षितुम् ॥ १२ ॥
ततस्तानब्रवीद्राजन्नर्जुनः प्रहसन्निव ।
प्रार्थिवत्त्वं चिकीर्षामि धर्मराजस्य धीमतः ॥ १४ ॥
न प्रवेक्ष्यामि वो देशं विरुद्धं यदि मानुषैः ।
युधिष्ठिराय यत्किंचित्करपण्यं प्रदीयताम् ॥ १५ ॥
ततोदिव्यानि वस्त्राणि दिव्यान्याभरणानिच ।
क्षौमाजिनानि दिव्यानि तस्य ते प्रददुः
करम् ॥ १६ ॥
एवं स पुरुषव्याघ्रो विजित्य दिशमुत्तराम् ।
संग्रामान्सुबहून्कृत्वा क्षत्रियैर्दस्युभिस्तथा ॥ १७ ॥
वृतः सुमहता राजन् बलेन चतुरंगिणा ।
आजगाम पुनर्वीरःशक्रप्रस्थं पुरोत्तमम् ॥ २० ॥

याप्रमाणें, उभयतांचा संवाद होऊन त्यांनीं कर दिला असतां, अर्जुन इंद्रप्रस्थास परत आला, व आणलेलें सर्व युधिष्ठिरास अर्पण करून, स्वमंदिराप्रत जाता झाला. ( भार० सभा० अ० २८ ).

राजसूययज्ञ समाप्त झाल्यावर, पांडवांचें ऐश्वर्य दुर्योधनास सहन न होऊन त्यानें यांची सर्व संपत्ति द्यूतमिषानें हरण केली, व यांस वनवासास घालविलें ( भार० वन० अ० २ ). तेथें द्वैतवनांतून पांडव काम्यक वनांत गेल्यावर, हा, आणखी कांहीं दिव्यास्त्रें संपादन करावीं म्हणून, हिमालयावर गेला. तेथें किरातरूपधारी महादेवाशीं याचें युद्ध होऊन त्याच्या प्रसन्नतेनें यास अस्त्रप्राप्ति झाली व याचें, इंद्रलोकीं

गमन झालें. हा इंद्रलोकीं असतां, यानें, चित्रसेन गंधर्वापासून, गीतनृत्यकला संपादन केली. त्यांतच यास, उर्वशीचा शाप, तूं षंढ होशील असा झालेला, विराटगृहीं उपयोगीं पडला. ( इंद्रकील श० पहा. )

पुढें इंद्रानें, पांडव गंधमादनपर्वतीं होते तेथें यास त्यांजवळ पोहोंचविलें. कारण त्या वेळेस पांडव, तीर्थयात्रा करीत तेथेंच आले होते. ( भार० वन० अ० १६४ ) पुढें यानें, निवातकवच मारिले. (निवातकवच श० पहा ). तसेंच कालकेयही मारिले. (२ कालकेय श० पहा ).

वनवास सरल्यावर, अज्ञातवासाचा विचार झाला असतां, अर्जुन हा, विराटगृहीं नटरूपानें प्रवेशला. ( भार० विराट० अ० ११ ). यानें, तेथें आपल्यास बृहन्नटा असें नांव स्वीकारलें होतें. व विराटकन्या उत्तरा, तिला गीत, व नृत्य, शिकवून राहिला असे. नंतर दक्षिणेकडे गोग्रहणनिमित्तानें सुशर्म्याकडे विराटराजा युद्धास गेला असतां, उत्तरेकडून येऊन, दुर्योधनानें गायींचें हरण केलें, त्या कालीं विराटपुत्र उत्तराचें यानें सारथ्य स्वीकारून तिकडे गमन केलें. व दुर्योधनादिकांस जिंकून गायी परत आणिल्या. ( बृहन्नटा श० पहा ).

अज्ञातवास सरून पांडव प्रकट झाल्यावर, अर्जुनाच्या संतोषार्थ, विराटानें आपली कन्या उत्तरा, तिला यानें वरावें म्हणून आग्रह केला असतां, यानें, त्यास सांगितलें कीं, तिला मी कन्येप्रमाणें मानून विद्या शिकविली आहे, यास्तव तसें होणार नाहीं. त्यावरून विराटानें उत्तरा अभिमन्यूस दिली. ( भार० विराट० अ० ७१-७२ ). पुढें युधिष्ठिरानें कृष्णास, साम करण्यासाठीं दुर्योधनाकडे पाठविलें. त्या कालीं कृष्णानें सर्वांचीं अनुमतें विचारल्यावर, यासही तुझें मत काय म्हणून पुसलें असतां, यानें युधिष्ठिरानें सांगितल्याप्रमाणें कर, परंतु होईल तेथपर्यंत युद्धाचा प्रसंग आण, असें आपलें मत दिलें. ( भार० उद्यो० अ० ७८ ).

पुढें साम न होतां युद्धच उपस्थित झालें असतां, यास, स्वजनास मारणें हा अधर्म असें वाटून, हा, युद्ध करणें जो क्षत्रियाचा धर्म, तो टाकण्यास, व भिक्षावृत्तीनें उपजीवन करणें, हा ब्राह्मणाचा धर्म स्वीकारण्यास मोहानें उद्युक्त झाला, असें पाहून, कृष्णानें तो याचा मोह, गीतेचा उपदेश करून घालवून यास युद्ध करण्यास उभें केलें. ( भार० भीष्म० अ० २५-४२ ). पुढें यानें, शिखंडीस निमित्तमात्र उभें करून, भीष्मास रणभूमीवर पाडल्यावर, द्रोणाचार्य युद्धास उभा राहिला. त्यासही पराजित केलें असतें, परंतु दुर्योधनानें, यास संशप्तकांकडे युद्धास गुंतविल्यामुळें, द्रोणाचार्यानें रचलेल्या चक्रव्यूहांत, याचा परमपराक्रमी पुत्र अभिमन्यु सांपडून मरण पावला. ( २ अभिमन्यु श० पहा). अभिमन्यूच्या मरणानें यास परम दुःख झालें, व त्याच्या मरणास कारण, जयद्रथानें व्यूहांत जाण्यास भीमादिकांस केलेला प्रतिबंध, असें यानें पूर्ण जाणून, त्याच्या वधाची प्रतिज्ञा केली, व ती कृष्णाच्या साह्यानें दुसरेच दिवशीं जयद्रथास मारून सिद्धीस नेली. ( ३ जयद्रथ श० पहा ).

धृष्टद्युम्नाच्या हातून, द्रोणाचार्य मरण पावल्यावर, कर्ण युद्धास प्राप्त झाला. त्याशीं याचें मोठेंच युद्ध होऊन, त्यास शेवटीं यानें मारिलें. ( कर्ण श०पहा ). यानें, अश्वत्थाम्याचा मस्तकमणि, त्यानें शिबिरांत रात्रीं निजलेल्या बालकांचा व वीरांचा प्राण घेतला, या अपराधामुळें काढून घेऊन त्यास गुरुपुत्र म्हणून जीवदान देऊन सोडिलें. ( १ अश्वत्थामा श० पहा ).

संपूर्ण कौरव नष्ट होऊन त्यांचें और्ध्वदेहिक झाल्यावर, युधिष्ठिरास राज्य प्राप्त झालें; परंतु त्यास गोत्रवधाचें पाप मला घडलेलें कसें निवृत्त होईल, म्हणून शोक झाला असता, कृष्णानें त्याचें बहुता प्रकारें सांत्वन केलें; तथापि त्याची तळमळ न्यूनच होईना, असें पाहून, त्यानें त्यास बंधूंसहित भीष्माकडे नेलें. ( उत्तरायण निघेपर्यंत, भीष्म रणामध्यें शरपंजरावर, इच्छामरणी असल्यामुळें प्राण धारण करून राहिला होता. ) तेव्हां भीष्मानें, त्यास बहुतां प्रकारें नीति सांगून अश्वमेधाची आज्ञा केली, व त्याचें समाधान केलें. एकदां युधिष्ठिर अर्जुनादि बंधूंसहित भीष्ममुखींची नीति श्रवण करून, हस्तिनापुरास येण्यास निघाला असतां, मार्गांत सूर्यास्ताचा समय होत आला असें पाहून, व दृषद्वतीचें तीर अवलोकन करून, कृष्णार्जुनादिकांसहित, तेथें संध्योपासन करण्यास थांबला, व तें झाल्यावर हस्तिनापुरांत प्रवेशला. याविषयीं भारतांत लिहिलें आहे तें असें.—

॥ दृषद्वतीं चाप्यवगाह्य सुव्रताः
कृतोदकार्थाः कृतजप्य मंगलाः ॥
उपास्य संध्यां विधिवत्परंतपा
स्ततःपुरं ते विविशुर्गजाव्हयम् ॥ ३० ॥

( भार० शांति० अ० ५८ ).

यावरून अर्जुन, त्याचे बन्धु, व कृष्ण, वेळच्या-

वेळीं संध्योपासन करण्यास किती तत्पर असत, हें ध्यानांत येईल. अर्जुन जसा नित्यकर्मास जपत असे, तसाच कसाही प्रसंग असतां, ईश्वरोपासनेसही जपत असे. याविषयीं असें आढळतें कीं, कर्णाचें व याचें युद्ध चाललें असतां, एके दिवशीं उभय सैनिकांनीं अस्तमान होत आला म्हणून आपआपल्या सेनेचा अवहार केला, व स्वस्वशिबिरांत गमन केलें. नंतर अर्जुनानें कृष्णासहित रात्रीचें नित्यकृत्य उरकून निद्रा केली, व प्रातःकालीं ते उभयतां, याप्रमाणें विधि करून युद्धास गेले.—

अथ पुरुषवरौ कृतान्हिकौ, भवमभिपूज्य यथाविधि प्रभुम् ॥ अरिवधकृतनिश्चयौ द्रुतं । तव बलमर्जुनकेशवौ सृतौ. ( भार० कर्ण० अ० ३० ). संजयधृतराष्ट्रसंवाद.

कांहीं कालानें उत्तरायण निघून, भीष्मनिधन झाल्यावर, युधिष्ठिरानें अश्वमेधाचा विचार करून यज्ञदीक्षा घेतली, व भूमीवर श्यामकर्ण अश्व सोडिला. ते समयीं त्याच्या संरक्षणार्थ, प्रद्युम्न, अनिरुद्ध, सात्यकि, कृतवर्मा, मेघवर्ण, वृषकेतु, यौवनाश्व, अनुशाल्व, इ० वीर समागमें घेऊन अर्जुन निघाला तो, प्रथम हस्तिनापुराहून दक्षिण दिशेस माहिष्मती नगरीच्या नीलध्वज राजाच्या नगराकडे अश्व गेल्यामुळें, त्यानें अश्व धरिला असतां, मागें होतांच म्हणून, याचें व नीलराजाचें युद्ध झालें. त्यांत त्याचा पराभव होऊन, तो अर्जुनासमागमें निघाला. ( जैमिनि अश्व० १५ ).

तेथून अर्जुन निघाल्यावर,त्यास मार्गांत उद्दालक ऋषीचा आश्रम लागून,त्यांतील एका शिळेस अश्व. चिकटला असें यानें पाहिलें, तेव्हां अर्जुन भयभीत होऊन, त्याच अरण्यांत रहाणाऱ्या सौभरी ऋषीस शरण गेला, त्यावरून त्या ऋषीनें उद्दालकाची कथा यास सांगून, याचाच हस्तस्पर्श शिळेस करवितांच अश्व तेथून मोकळा झाला. ( २ उद्दालक श० पहा. ) नंतर अश्व तेथून निघाला तो, हंसध्वज राजाच्या चंपकानगरीस गेला. तेथें त्याशीं अर्जुनाचें सख्य होऊन, तो राजा अर्जुनासमागम निघाला. ( हंसध्वज श० पहा ). त्यापुढें अश्व, स्त्रीराज्यांत गेला असतां, तेथील राणी प्रमीला तिनें त्यास धरिलें. तिला अर्जुनानें वरून हस्तिनापुरास पाठविलें. ( प्रमीला श० पहा ). तदनंतर, कर्णप्रावरण इत्यादि लोकांचे देश उल्लंघून, भीषण राक्षसाच्या नगरीस अश्व गेला. (भीषण श० पहा). तेथून पुढें बभ्रुवाहन ( अर्जुनाचा पुत्र ) त्याच्या मणिपुरनगरीस अश्व गेला. ( बभ्रुवाहन श० पहा ). त्यापुढें मयूरध्वज,व त्याचा पुत्र ताम्रध्वज, यांची गांठ पडून, त्यांचें कृष्णानें सत्व पाहिलें. ( मयूरध्वज श० पहा ). तेथून वीरवर्म्याची सारस्वतपुरी, तेथें युद्ध झालें. ( वीरवर्मा श० पहा ). त्यापुढें चंद्रहास राजाच्या नगरास अश्व गेला. ( चंद्रहास श० पहा ). नंतर तेथून अश्व उलटला, व उत्तर दिशेकडे गेला, व तेथें बकदाल्भ्य ऋषीचें अर्जुनास दर्शन झालें. ( बकदाल्भ्य श० पहा ). तदनंतर वर्ष पूर्ण होत आलें असें जाणून सिंधुदेशाच्या राजधानीस अश्वास घेऊन अर्जुन आला व तेथील दुःशलेच्या पुत्रास, व तीस, समागमें घेऊन, हस्तिनापुरास परतला असतां, युधिष्ठिरास भेटून, त्याकडून यानें अश्वमेध पूर्ण करविला.

अर्जुनाची अंगकांति श्यामवर्ण असून, गजराजाप्रमाणें त्याची आकृति दीर्घ होती. तसेंच याचे स्कंध उच्च, होतसाते वक्षस्थल विशाल,व नेत्र कमलासारखे असत. ( भार० आश्रम० अ० २५ श्लोक ७ ). यास, द्रौपदीपासून झालेला श्रुतकीर्ति, उलपीपासून इरावान्, चित्रांगदेपासून बभ्रुवाहन, आणि सुभद्रेपासून अभिमन्यु, असे चार पुत्र होते. हा गुणांनीं उत्तम होता, त्यावरून याला दाहा नांवें, पृथक् पृथक् पडलीं असत. याचा बसण्याचा रथ विजय नांवानें प्रसिद्ध असून, त्यावर ध्वज सजीव कपीचा असे. तसेंच रथास चार अश्व असून, युद्धसमयीं याचें सारथ्य स्वतः कृष्ण करी. यापासून धनुर्वेदाची शिक्षा अभिमन्यूस तर मिळालीच होती. त्याशिवाय, सात्यकी व प्रद्युम्न, हेही दोघे त्या विद्येंत याचे नामांकित शिष्य होते. (भार० मौसल० अ० ६ श्लो० ६–८ ).

कृष्ण निजधामास गेल्यावर,यास जो शोक झाला, तो सांगतां येत नाहीं. तथापि यानें तसेंच धैर्य धरून, द्वारकेस गमन केलें, आणि अवशिष्ट कृष्णस्त्रिया, व वज्रनामेंकरून त्याचा प्रपौत्र, यांस समागमें घेऊन, हस्तिनापुरास आल्यावर,इंद्रप्रस्थाच्या राज्यावर वज्राची, व हस्तिनापुरच्या राज्यावर परीक्षितीची, स्थापना करून युधिष्ठिरादि बंधूसमागमें हा, निजधामास गेला. ( भार० स्वर्गारोहण० अ० ३ ).

४—कृष्णबलरामांचा सखा गोकुलांतील एक गोप. ( भाग० दशम० अ० २२ श्लो० ३१ ).

**अर्जुनक**—एक लुब्धक. यानें, गौतमी ना० वृद्ध ब्राह्मणीचा पुत्र, सर्पदंशानें मरण पावून त्यासाठीं ती शोक करीत असतां, त्या सर्पास धरून आणिलें, व त्यास कोणत्या रीतीनें मारूं म्हणून तिला विचारिलें,

तेव्हां तिनें यास म्हटलें कीं, संपूर्ण प्राणी कर्मपरतंत्र आहेत, म्हणून माझा पुत्र, तो त्याच्याच कर्मानें मरण पावला असल्यामुळें, या सर्पास सोडून दे. ( भार० अनु० अ० १ ).

**अर्जुनतीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ.

**अर्जुनपाल**–( सो० वं० ) वसुदेवाचा अनुज शमीक, त्यास सुदामिनीपासून झालेल्या दोन पुत्रांतील एक.

**अर्थ**–स्वायंभू मन्वंतरांतील धर्मऋषि, त्यास बुद्धिभार्येपासून झालेला पुत्र.

२–चतुर्विध पुरुषार्थांतील दुसरा.

**अर्थसाधक**–राष्ट्रवर्द्धन शब्द पहा.

**अर्थसिद्धि**–साध्यनामक देवांचा पुत्र.

**अर्द्धकील**–एक सरोवर. ( दर्भि श० पहा ).

**अर्द्धपण्य**–एक ब्रह्मर्षि. ( २ अत्रि श० पहा ).

**अर्द्धस्वन**– ” ”

**अर्बुद**–एक यादव, आणि त्याचें कुल.

२–तीर्थवि०.

**अर्यमा**–एक आदित्य. ( द्वादशादित्य श० पहा ). हा, वैशाखमासींचा प्रमुख सूर्य असून, कधीं कधीं यम नसल्यास, त्याचा अधिकार या मन्वंतरांत चालवीत असतो.

२–पितरसमुदायांतलि एक प्रमुख. यमाच्या पूर्वी कल्पारंभीं, हाच दक्षिण दिक्पाल होता.

३–द्वितीयार्थक अत्रि ऋषीचा पुत्र. ( भार० शांति० अ० २०८ ).

**अर्वावसु**–रैभ्य ऋषीच्या दोन पुत्रांतील दुसरा, हा गुणांनीं बहुतच उत्तम असे. ( यवक्रीत श० पहा ).

**अर्वि**–श्वाऋषीच्या २ दोन पुत्रांतील ज्येष्ठ. ( वीतहव्य श० पहा ).

**अर्ष्टिषेण**–भृगुकुलोत्पन्न ऋषि. ( भार०शल्य०अ०४० ). याचा युधिष्ठिराशीं संवाद झाला होता. ( भार०वन० अ० १५९ ). याचा जो वंशज, तो आर्ष्टिषेण समजावा.

**अर्हन्**–ऋषभदेव राजर्षि, अंतर्निष्ठ होऊन नग्न होत्साता, उन्मत्त, व जडचर्येनें भूमीवर संचार करीत असतां, पूर्ण देहविस्मृति पावून, कुटकाचलसंबंधीं अरण्यांतील दावाग्नींत त्याचें शरीर भस्म झालें, ती त्याची दीक्षा ऐकून, कोकवक अ० कोंकवेंक प्रदेशाचा हा राजा, यानें तसी अंतर्निष्ठता न संपादितां, बाह्य कर्माचा मात्र त्याग करून, ती दीक्षा घेतली. तेंच नास्तिकधर्माचें मूळ. ( भाग० पंचम० अ० ६ गद्य १० ).

**अलकनंदा**–भगवत्पदीच्या चार प्रवाहांतलि, आपण राहतों या दिशेकडील प्रवाह. ( भाग० पंचम० अ० १७ गद्य ९ ). कुबेराची हिमालयावरील अलकानगरी, तिच्या बाह्य प्रदेशीं हाच प्रवाह आहे. अलकनंदेस महानदी असेंही म्हटलें आहे. ( भार० वन० अ० १४२ ).

**अलर्क**–(सो० वं०)दिवोदास राजाचा पौत्र, प्रतर्दनाच्या पुत्रांतील ज्येष्ठ. याच्या पुत्राचें नांव संतति.

२–एक राजा.वंश आढळत नाहीं. हा, मन मोठें बलवान् आहे असें जाणून, त्याचें बल क्षीण करण्यासाठीं, त्यावर बाण सोडूं लागला असतां, तें, यापुढें मूर्तिमान् होऊन, यास असें म्हणूं लागले. नेमे बाणास्तरिष्यंति मामलर्क कथंचन तवैव मर्म भेत्स्यंति भिन्नमर्मा मरिष्यसि ७ अन्यान्बाणान्समीक्षस्वयैस्त्वंमांसूदयिष्यसि तच्छ्रुत्वाप्यविचिंत्याथ ततो वचनमब्रवीत् ८. ( भार० अश्वमे० अ० ३० ).

यांतील भाव–या बाह्य बाणांनीं मला मारूं जाण्यांत तूंच मरशील; यास्तव जेणेंकरून मी मरेन तसे बाण पहा. हा अलर्क मदलसेचा पुत्र असावा असें वाटतें. कारण मदलसा एक मोठी ब्रह्मनिष्ठ राजपत्नी होती. तिनें आपले कांहीं पुत्र ब्रह्मोपदेशानें विरक्त करून, अरण्यांत पाठविले होते. अलर्क मात्र पतीच्या प्रार्थनेवरून, उपदेशावांचून ठेविला होता,तोच तिच्या मागें वरील विचार करीत असावा.

३– एक राजर्षि, वंश आढळत नाहीं. यानें एका अंध ब्राह्मणास आपले नेत्र देऊन डोळस केलें होतें, असा हा समर्थ व उदार होता (वा० रा० अयो० स० १२).

**अलका**–हिमालयावरील कुबेरनगरी.

**अलंपुर**–भारतवर्षीय क्षेत्र, व तीर्थ.

**अलंबुध**– ” ”

**अलंबुष**–बकासुराचा बंधु दुर्योधनपक्षीय राक्षस. ( भार० उद्योग० अ० १६७ ). हा भारती युद्धांत घटोत्कचाच्या हातून मृत्यु पावला होता. ( भार० द्रोण० अ० १०९ ).

२– जटासुराचा पुत्र, हा दुर्योधनपक्षाकडून पित्यास भीमानें मारल्याचें वैर स्मरून, युद्ध करीत असतां, रात्रियुद्धांत घटोत्कचानेंच यास मारिलें. ( भार० द्रोण० अ० १७४ ).

३– दुर्योधनपक्षीय राजा, यास सात्यकीनें मारिलें. ( भार० द्रोण० अ० १४० ).

**अलंबुषा**–स्वर्गीच्या अप्सराकन्यांतील एक.

**अलब्ध**–एक ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा. )

**अलय**–एक राजर्षि. कुल आढळत नाहीं.

**अलायुध**–एक राक्षस. द्रोणयुद्धकालीं रात्रियुद्धांत, घटोत्कच आणि कर्ण, यांचा घोर संग्राम चालला असतां, द्रोणादिकांस इतकें भय उत्पन्न झालें कीं, आज कर्ण घटोत्कचाच्या हातून वांचत नाहीं. इतक्यांत हा राक्षस दुर्योधनास येऊन म्हणाला कीं, मला आज्ञा देशील तर, मी घटोत्कचासहित पांडवांचा नाश करीन. त्यावरून दुर्योधनानें यास आज्ञा दिली असतां, हा, प्रथम भीमाशीं युद्धास प्रवृत्त झाला. याचा रथ घटोत्कचाप्रमाणेंच शत अश्वांचा होता, व यानें भीमास इतकें जर्जर केलें कीं, कृष्णानें घटोत्कचास हाक मारून, याशीं युद्ध करण्यास सांगितलें. त्यावरून घटोत्कचानें कर्णाशीं युद्ध करणें सोडून याशीं युद्ध आरंभिलें, त्यांत हा घटोत्कचाच्या हातून मरण पावला. ( भार० द्रोण०अ० १७६--१७८ ).

**अलुकी**–एक ऋषि. ( ३ भृगु श० पहा. )

**अलोलुप**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**अवगाह**–वृष्णिकुलोत्पन्न एक यादव.

**अवगाहन**–वसुदेवास वृकदेवीपासून झालेला पुत्र.

**अवटनिरोधन**–एक नरक आहे. जे प्राणी महानुगर्तेत प्राण्यास लोटून देतात, ते या स्थळीं घोर यातना भोगितात.

**अवटोदा**–भारतवर्षीय नदी. (भार० भीष्म० अ० ९ ).

**अवंति**–भारतवर्षीय देश, हा सेक, अपरसेक देश, व नर्मदा नदी, यांच्या दक्षिणेस असून, येथें पांडवांच्या वेळेस विंद, आणि अनुविंद असे उभय भ्राते राज्य करीत होते. याची मुख्य राजधानी अवंतिका नगरी. ( भार० सभा० अ० ३१ ).

**अवंतिका**–अवंतिदेशाची राजधानी.

**अवत्सार**–वत्सार शब्द पहा.

**अवधूत**–बालोन्मत्तपिशाचवृत्तीनें भूमीवर संचार करणारा दत्तात्रेयनामा ब्राह्मण याचा प्रल्हादाशीं संवाद. ( भार० शांति० अ० १७९ ) तसाच यदुराजाशींही याचा संवाद झाला होता. ( भाग० एकादश० अ० ७–९ ).

२– मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**अवरोधन**–गय राजास, गयंतीपासून झालेल्या तीन पुत्रांतील कनिष्ठ ( स्वायंभू० वं० )

**अविकंपन**–ज्येष्ठ ऋषींचा शिष्य एक ब्राह्मण.

**अविंध्य**–लंकेंतील एक वृद्ध सदाचरणी राक्षस. हा परमनीतिमान् असे. यानें, रावणास, सीता रामचंद्रास परत द्यावी म्हणून बहुत वेळ सांगितलें असतां, त्यानें ऐकिलें नाहीं. ( वा० रा० सुंदर० अ० ३७ ). हा, रामाचें कुशल वृत्त आणवून त्रिजटेकडून सीतेस, वारंवार कळवीत असे. ( भार० वन० अ० २८० ).

**अविमुक्त**–काशीक्षेत्रास नांव आहे. कुरुक्षेत्रासही म्हटलेलें आढळतें. ( भार० वन० अ० ८३ श्लो० २४ ).

**अविस्थल**–भारतवर्षीय नगर.

**अविज्ञात**–प्रियव्रत राजर्षीचा पौत्र, यज्ञबाहूच्या सात पुत्रांतील कनिष्ठ. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे. स्वायंभू० वं० ).

२– शाल्मली द्वीपांतील सातवा वर्ष.

**अवीचि**·एक नरक आहे. हा खोल असून तेथें खालीं जललहरि उठतातशा वाटाव्या, परंतु असावी पाषाणमय भूमि, जे प्राणी मिथ्या साक्ष इ० मिथ्या कर्मे करतात, ते येथें यातना भोगितात.

**अवीक्षित्**– ( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न करंधम राजर्षीचा पुत्र. यास कारंधम असें म्हटलें असून, याच्या पुत्राचें नांव मरुत्त राजा. ( भार० अश्वमे० अ० ४ श्लोक १६ ).

**अव्यक्त**–सामवेदोपनिषत्.

**अव्यय**–बारा भार्गव देवांतील एक. ( ३ भृगु श०पहा).

**अंश**–प्रथमार्थक अंशुमान् त्यासच नांव.

**अंशनिभ्रम**–रावणपक्षीय राक्षस, यास युद्धांत द्विविद वानरानें मारिलें. ( वा० रा० युद्ध० स० ४३ ).

**अंशु**–कृष्णबलरामांचा गोकुलांतील सखा. ( भाग० १ स्कं० अ० २२).

**अंशुधानपुर**–भागीरथीच्या तीरचें पुरवि०

**अंशुमती**–भारतवर्षीय नदी. हें नांव कालिंदी नदीस आढळतें. ( वा० रा० अयो० स०५५ श्लोक६ ).

**अंशुमान्**–एक आदित्य. ( द्वादशादित्य श० पहा. ) यास क्रिया नांवाची स्त्री होती. २– ( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न सगर राजाचा पौत्र, व असमंजाचा पुत्र. असमंजा वनांत गेल्यावर सगरानें अश्वमेधीय अश्व सोडलेला शोधून आणण्याची याला आज्ञा केली. त्या काळीं, हा अश्व शोधीत चालला असतां यानें, कपिलाश्रम पाहिला. तेथें साठ सहस्र सगरपुत्र ( आपले पितृव्य ) चुलते भस्म झालेले तेही पाहिले. ( सगर श० पहा ). पुढें हा त्यांच्या उद्धाराचा विचार करीत असतां, यानें कपिलापुढें उभें राहून, त्याची स्तुति आरंभिली; परंतु तो समाधिस्थ असल्यामुळें, त्यानें याची स्तुति जाणली नाहीं. इतक्यांत गरुडानें तेथें येऊन, यास सांगितलें कीं,

भागीरथीच्या जलस्पर्शावांचून यांचा उद्धार होणार नाहीं. यास्तव तसा कांहीं उपाय पहा. ( गरुड हा त्या सगरपुत्रांचा मातुल होता, परंतु त्या नात्याचा संदर्भ आढळत नाहीं). पुढें गरुड गेल्यावर, कपिलमुनि समाधींतून उठले व त्यांनीं यास, आपल्यापुढें स्तुति करितांना पाहिलें. त्यावरून प्रसन्न होऊन यास आज्ञा केली कीं, हा तुझ्या पितामहाचा ( अजाचा ) अश्व घेऊन जा, आणि त्याकडून यज्ञ समाप्त करीव. आतां पितृव्यांचा उद्धार कसा व्हावा म्हणशील तर, भागीरथीची प्रार्थना कर म्हणजे तिच्या जलस्पर्शानें यांचा उद्धार होईल. असें कपिलांचें सुप्रसन्नतेचें भाषण ऐकून, यानें त्यांस नमस्कार केला व अश्व घेऊन येऊन आपल्या सगर पितामहाचा, अश्वमेध यज्ञ त्याकडून समाप्त करविला. नंतर सगर, यासच राज्यावर स्थापून, अरण्यांत गेला असतां, यानेंही लागलेंच प्रधानावर राज्य सोंपून भागीरथीच्या प्राप्तीसाठीं, आपलें सर्व आयुष्य तपांत घालविलें. परंतु ती सिद्धि होण्यापूर्वींच हा मरण पावला. यास पितरांची कन्या यशोदा ती स्त्री असून, तिचेठायीं झालेला दिलीप नांवाचा पुत्र होता, तोच पुढें राज्याधिकारी झाला. ( भार० वन० अ० १०७ ) ( वा० रा० बाल० स० ४१–४२ ).

३–द्रौपदीस्वयंवरास गेलेल्या राजांतील एक.

४–पांडवपक्षीय राजा, भारती युद्धांत कर्णानें मारला.

**अशोक**–अकोप प्रधानासच नांव. ( वा० रा० युद्ध० स० १२९ श्लो० ११ ).

२–दुर्योधनपक्षीय राजा. ( भार० आदि० अ०६७).

३–काम्यकवनाच्या दक्षिणेकडील भारतवर्षीय तीर्थ.

**अशोकवनिका**–फलपुष्पांनीं युक्त असें, स्त्रियांसह विहार करण्याचें रमणीय स्थल. ययाति राजा देवयानीसह हींत रहात असे. ( मत्स्य० अ० ३१ ).

२–रावणानें सीतेस ठेविलें होतें, तें स्थळ.

३–अयोध्येंत, सीतेसह रामाचें विहारस्थल होतें तें. ( वा० रा० उत्तर० स० ४२ ).

**अश्म**–अश्मकप्रथमार्थी पहा.

**अश्मक**–एक ब्राह्मण. याचें जनक राजाशीं सुखदुःखनिवृत्ति कशानें होत्ये, याविषयीं संभाषण झालें होतें. ( भार० शांति० अ० २८ ).

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न मित्रसह राजा, ज्यास कल्माषपाद असें पुढें नाम प्राप्त झालें, त्याचा पुत्र. याची उत्पत्ति अशी झाली होती कीं, मित्रसहास ब्राह्मणीच्या शापामुळें, स्त्रीसमागम करतां येईना, आणि राज्यास तर अधिकारी पाहिजे, म्हणून त्यानें, आपल्या क्षेत्रांत, वसिष्ठ ऋषीकडून गर्भ स्थापन करविला. तो गर्भ सात वर्षें झालीं तथापि बाहेर येईना, म्हणून मदयंतीनें, अश्मा ( दगड ) त्यानें उदरविदारण करून, त्या गर्भास बाहेर काढिलें. तोच, जो पुत्र जन्मास आला, त्यास हें नांव पडलें ( भाग० नवम० अ० ९ ). या अश्मकानें मोठा झाल्यावर पौदन्य नांवाची पुरी स्थापिली. यास, उत्तरा ना० स्त्री असून, तिजपासून झालेला मूलक नांवाचा पुत्र होता. त्यासच पुढें नारीकवच असें नांव पडलें होतें.

३–दुर्योधनपक्षीय राजा, यास, अभिमन्यूनें मारिलें होतें. ( भार० द्रोण० अ० ३८ ).

४–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**अश्मकेश्वर**–अश्मक ना० देशाचा राजा.

**अश्मनगर**–कालकेय असुरांचें पुर. ( वा० रा० उत्तर० स० २३ ).

**अश्मरथ्य**–एक ऋषि. ( १ विश्वामित्र श० पहा ). याचे वंशज तें आश्मरथ्य होत.

**अश्व**–दनुपुत्र एक दानव.

**अश्वकेतु**–मगधदेशोत्पन्न दुर्योधनपक्षीय राजा.

**अश्वग्रीव**–दनुपुत्र एक दानव.

**अश्वचक्र**–कृष्णपुत्र सांब त्यानें मारलेला एक राजा. ( भार० वन० अ० १२० श्लोक १४ ).

**अश्वतर**–कद्रुपुत्र एक नाग. ( ऊर्ज श० पहा ).

**अश्वतीर्थ**–नैमिषारण्यांतील भारतवर्षीय तीर्थ.

**अश्वत्थामा**–भरद्वाज ऋषीचा पुत्र द्रोणाचार्य, त्यापासून शरद्वान ऋषीची कन्या कृपी, तिचेठायीं झालेला पुत्र. यानें जन्मकालीं अश्वासारखा शब्द केल्यामुळें, यास हें नांव पडलें होतें. यास कधीं कधीं द्रौणी असेंही म्हटलेलें आढळतें. हा, वेदवेदांगपारग उत्तम प्रकारचा असून, सरहस्य धनुर्वेद तर, पित्यापासून संपादून, त्यांतही उत्कृष्ट प्रवीण होता. द्रोणाचार्य, कौरवपांडवांस धनुर्वेद शिकविण्याच्या संबंधानें, भीष्माचा आश्रित झाला होता, तो जसा शेवटपर्यंत होता, तसाच हाही त्याचाच आश्रित असे.

कालांतरानें, कौरवपांडवांचें युद्ध उपस्थित झालें असतां, याचा पिता, भीष्माच्या तंत्रानें दुर्योधनपक्षाकडे होता, त्यामुळें हाही तिकडेच होऊन, यानें, पांडवांशीं मोठें युद्ध चालविलें. पुढें, याचा

पिता द्रोणाचार्य, योगधारणेनें प्राणोत्क्रमण करीत असतां, त्यास, धृष्टद्युम्नानें मारिलें, तें यास सहन न होऊन, यानें क्रोधेंकरून, पांडव आणि त्यांची सेना, तिजवर नारायणास्त्र सोडिलें, त्या योगानें ते सर्व मरावेच, परंतु, निःशस्त्र होऊन स्वस्थ बसल्यास, नारायणास्त्राचें त्यावर बळ चालत नाहीं, हें मर्म कृष्णास विदित होतें म्हणून, सर्व सेनेसहित पांडवांनीं, आपआपलीं शस्त्रास्त्रें भूमीवर ठेवल्यामुळें, याचें अस्त्र व्यर्थ गेलें. त्यावरून यास, असें कसें झालें, म्हणून आश्चर्य झालें आहे इतक्यांत, व्यास (कृष्ण द्वैपायन) तेथें प्रकट झाले, आणि त्यांनीं, यास समजावून सांगितलें कीं, कृष्णार्जुन हे उभयतां, भूभार हरणार्थ नरनारायणच अवतरले आहेत, यास्तव त्यांस अपाय कोणापासून कधींच होणार नाहीं. म्हणून तूं झाल्या गोष्टीचें आश्चर्य न मानतां, स्वस्थ असावेंस. इतकें बोलून, ते अंतर्धान पावले. (भार० द्रोण० अ० २०१).

यास, युद्ध करणें तादृश आवडत नसे असें दिसतें. त्याविषयीं असें आढळतें कीं, भीष्म आणि द्रोण, हे रणांत पडल्यावर, हा दुर्योधनास असें म्हणाला.—

**श्लोक.**

अथाब्रवीत् द्रोणसुतस्तवात्मजं करं करेण प्रतिपीड्य सांत्वयन् ॥ प्रसीद दुर्योधन शाम्य पांडवैरलं विरोधेन धिगस्तु विग्रहम् ॥ २० ॥ हतो गुरुर्ब्रह्मसमो महास्त्रवित्तथैव भीष्मप्रमुखा महारथाः ॥ अहं त्ववध्यो मम चापि मातुलः प्रशाधि राज्यं सह पांडवैश्चिरम् ॥२१॥ (भार० कर्ण० अ० ८८). संजयधृतराष्ट्रसंवाद.

हें म्हणणें, मरणभीतीनें म्हटलें, असें दुर्योधनास न वाटावें, म्हणून यानें दुसऱ्या श्लोकाच्या अर्धांत, मी, व माझा मातुल कृपाचार्य, ह्या आम्हां उभयतांस चिरंजीवी असल्यामुळें, मरणभीति नाहीं, असें सुचविलें आहे. परंतु हें याचें हितकर वाक्य दुर्योधनानें ऐकिलें नाहीं.

पुढें कर्ण, आणि शल्य, हेही रणांत पडल्यावर, भीमाचें दुर्योधनाशीं युद्ध प्रवृत्त झालें, त्यांत, दुर्योधनाचे प्राण मात्र अवशेष राहून, तो रणांत पडला असतां, अश्वत्थामा त्याकडे गेला, आणि त्यास म्हणाला कीं, तूं मला अजून सांगशील तर, मी पांचालांसह, पांडवांस मारून येतों. त्यावरून तो तथास्तु म्हणाला असतां, हा, तिकडे जाण्यास सिद्ध झाला. (भार० शल्य० अ० ६५).

अश्वत्थामा, कृपाचार्य आणि कृतवर्मा या उभयतांसह, रात्रीं एका वटवृक्षाखालीं, पुढें कसें करावें म्हणून विचार करीत बसला असतां, श्रमामुळें त्या दोघांस निद्रा लागली. हा मात्र जागृत होता. इतक्यांत त्या वृक्षावर, विश्रांतीस राहिलेल्या काकसमुदायांत, एका उलूकानें येऊन, सहस्रावधि काक मारून खालीं पाडिले, आणि तो निघून गेला. त्यावरून यास, आपणही असेंच केल्यास कार्य चांगलें साधेल असें स्फुरून, उभयतांस जागृत करून हा विचार यानें कळविला. परंतु, तो त्यांस मानला नाहीं, असें पाहून, हा एकटाच, पांडवांच्या शिबिराकडे जाण्यास निघाला, त्यावरून तेही निरुपाय होऊन, त्यामागें जात आहेत तों, हा, शिबिरद्वारासमीप जाऊन पोहोंचला, परंतु तेथें कोणी दिव्य पुरुष उभा असलेला यानें पाहिल्यामुळें, त्यास उल्लंघून आंत प्रवेश करण्यास याचें धैर्य होईना. तथापि धैर्य धरून, यानें त्यावर अस्त्र टाकलें. तें त्यानें ग्रासलें असें पाहून, आणखी कित्येक अस्त्रें यानें त्यावर सोडिलीं, त्यांचीही तीच दशा पाहून, हा, रुद्र आहे असें यानें समजून, त्याची स्तुति आरंभिली. तीवरून तो प्रसन्न होऊन, त्यानें यास एक उत्तम खड्ग देऊन, शिबिरांत जाण्यास मार्गही दिला. इतक्यांत कृपाचार्य आणि कृतवर्मा येऊन पोहोंचले असें पाहून, त्यास द्वार रक्षण्यास सांगून, हा एकटाच आपण आंत प्रविष्ट झाला.

हा शिबिरांत जाऊन पाहतो तों, त्यास तेथें एकही पांडव दृष्टीस पडला नाहीं. परंतु धृष्टद्युम्नादिक वीर व पांडवांचे कुमर, त्यास मात्र, त्यानें निद्रित पाहिले. नंतर त्वरा करावी या हेतूनें, यानें प्रथमतः आपल्या पित्याचा वैरी जो धृष्टद्युम्न, त्यास केवळ निमित्तास मात्र जागें करून, तो अर्धा जागा होऊन, अरे कोण आहे थांब, इतकें म्हणत आहे तों, त्याचा मस्तक खड्गानें छेदिला. याचप्रमाणें उत्तमौजा, युधामन्यु, इ० वीर, तसेच द्रौपदीचे पांच पुत्र, यांचीही तीच अवस्था केली. त्यामुळें शिबिरांत बरीच गडबड होऊन, कांहीं सामान्य वीर बाहेर पडतात तों त्या सर्वांस कृपाचार्य व कृतवर्मा, यांनीं आडवून ठार मारिलें.

तदनंतर अश्वत्थाम्यानें, मारलेल्या वीरांचीं शिरें घाईघाईनें दुर्योधनास दाखविण्यास घेतलीं, व तेथून त्वरेनें कृप आणि कृतवर्मा यांसहित, रणांगणांत दुर्योधनासमीप येऊन, असें बोलला.

दुर्योधन जीवसि त्वं वाक्यं श्रोत्रसुखं शृणु ।
सप्तपांडवतः शेषा धार्तराष्ट्रास्त्रयो वयम् ॥ ४८ ॥
ते चैव भ्रातरः पंच वासुदेवोथ सात्यकिः ।
अहं च कृतवर्मा च कृपः शारद्वतस्तथा ॥ ४९ ॥
( भार० सौप्तिक० अ० ९ ).

पांडवांसुद्धां त्यांचे वीर सात, आणि आपले तीन, इतकेच मात्र अवशेष राहून, इतर सर्व मरण पावले. असें अश्वत्थाम्याचें भाषण दुर्योधनानें ऐकून, त्यास संतोष झाला; परंतु द्रौपदीच्या निद्रित बालकांचीं शिरें, यानें आणलेलीं पाहून त्यास संतोष झाला नाहीं.

इकडे प्रातःकाळीं, हें रात्रींचें वृत्त अर्जुनास कळतांच, तो रथांत बसून याच्या मागें लागला, तेव्हां हाही रथारूढच पळत सुटला; परंतु याच्या रथाचे अश्व अत्यंत श्रमले होते, त्यामुळें अर्जुनानें यास गांठून धरिलें, व त्यास घेऊन द्रौपदीकडे तो आला. नंतर यास मारावें किंवा कसें, असें त्यानें कृष्णास पुसलें असतां, त्यानें मारूं नये असें आपलें अनुमत दिलें. इतक्यांत द्रौपदीही म्हणाली कीं, हा गुरुपुत्र असल्यामुळें, यास मारणें अनुचित असून, जसी, मी माझ्या बालकांकरितां शोक करीत आहें, असीच याची माताही, याकरितां शोक करील म्हणून यास सोडावें हेंच बरें. त्यावरून अर्जुनानें, याच्या मस्तकावर स्वतःसिद्ध असणारा भूषणरूप दिव्यमणि, तो काढून घेऊन, यास परम अपमानपूर्वक शिबिराबाहेर घालवून दिलें.

असा अपमान पावून अश्वत्थामा तेथून निघाल्यामुळें, त्यास अनिवार क्रोध आला, व त्या आवेशांत, त्यानें पांडवांचा समूळ नाश करण्याकरतां ब्रह्मशिरास्त्र त्यांवर सोडलें. ( भार० सौप्तिक० अ० १३ ). पुढें तें अस्त्र, उत्तरेच्या गर्भांत प्रवेश करून, त्यास पीडा देऊं लागलें असें कृष्णानें जाणून, आपल्या अलौकिक सामर्थ्यानें, त्या अस्त्राचा पराजय केला, व गर्भाचें संरक्षण केलें. ( भार० सौप्तिक० अ० १५ ).

अश्वत्थाम्याचे गुण, विशेष वर्णन करण्यासारखे नाहींत.मात्र यास काय तो बलवान् मीच, असा पराकाष्ठेचा अभिमान असे. त्याविषयीं एक गोष्ट अशी आढळत्ये कीं,हा एकदां द्वारकेस गेला असतां, कृष्णानें याचें पूजन करून,आसनावर बसविलें. नंतर आगतस्वागताच्या गोष्टी झाल्यावर,यानें कृष्णास असें म्हटलें कीं, जें चक्र तूं आपल्या हातांत वागवितोस, तें तुला शोभा देत नाहीं, यास्तव तें तूं मला द्यावेंस. त्यावरून कृष्णानें, याचा अभिप्राय काय तो ओळखून, चक्र यापुढें ठेविलें, आणि सांगितलें कीं,हें घेऊन जावें. पुढें हा,तें घेऊन जाण्यासाठीं उचलूं लागला असतां, यास मुळीं तें जागचेंच हालवेना, म्हणून यानें बळही करून पाहिलें. तथापि अवस्था तीच. यावरून हा विमनस्क होऊन, मुकाट्यानेंच तेथून चालता झाला. ( भार० सौप्तिक० अ०.१२ ).

सांप्रत हा, चिरंजीवी असल्यामुळें पृथिवीवर आहे, व हें प्रस्तुत चाललेलें कलियुग सरल्यावर, कृत आणि त्रेतायुग सरलें असतां, द्वापारामध्यें, द्रौणी या नांवानें व्यास होणार असून, आठव्या सावर्णि मन्वंतरांत तर, अश्वत्थामा या नांवानें सप्तर्षीत एक होईल. ( व्यास श० पहा ). ( मत्स्य० अ०९ )

२–अक्रूर यादवाच्या पुत्रांतील एकाचें नांव.

३–मालवदेशाधिपति इंद्रवर्मा ना० राजाचा नामांकित गज. हाच, भारती युद्धांत मेला असतां,द्रोणाचार्यास, आपलाच पुत्र अश्वत्थामा मरण पावला, असें उलटें समजलें, व त्यावरूनच त्यानें भूमीवर शस्त्र ठेवून,योगधारणा केली असतां, धृष्टद्युम्नानें त्यास मारिलें.

**अश्वनगर**–अंगदीया पुरीचेंच नांव.

**अश्वनदी**–कुंतीनें कर्णास,ज्या नदींत सोडिलें होतें ती.

**अश्वपति**–दनुपुत्र एक दानव.

२–मद्रदेशाचा प्राचीन काळीं होता राजा तो, सावित्रीचा पिता. ( ४ सावित्री श० पहा ).

३–केकय देशाचा राजा, यास, युधाजित् ना० पुत्र, व कैकयी ना० कन्या, अशीं दोन अपत्यें होतीं, हीच कैकेयी, रामचंद्राचा पिता दशरथ त्याची स्त्री.(वा० रा० अयो० स० १ ).या राजाची स्त्री म्हणजे कैकेयीची माता, परमसाहसी होती.त्याविषयीं अशी कथा आढळत्ये कीं, या राजास संपूर्ण पक्ष्यांची भाषा समजत असल्यामुळें, त्यास एकदां जृंभ पक्ष्याच्या कांहीं चमत्कारिक भाषणश्रवणानें हास्य आलें.तेव्हां ती समीप होती म्हणून,तिनें यास त्याचें कारण विचारिलें. राजा म्हणाला, हें मी सांगतांच मरेन, असें आहे, त्यावरून तें मला पत्करलें असें ही म्हणाली. तें तिचें भाषण एकून, तिला राजानें घरांतून घालवून दिलें होतें. ( वा० रा० अयो० स० ३५ ).

**अश्वमेधक**– ( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न सहस्रानीक राजाचा पुत्र, याचा पुत्र असीमकृष्ण.

**अश्वमेधपुरी**–पूर्वदशार्ण देशाच्या पूर्वेस असणारी नगरी, ही कोणत्या देशाची राजधानी, तें कांहीं आढळत

नाहीं. परंतु पांडवांच्या वेळेस येथें रोचमान राजा होता. ( भार० सभा० अ० ३० ).

**अश्वरथा**–हिमालयावरील एक नदी. ( भा० वन० अ० १६० ).

**अश्ववती**–भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**अश्वशंकु**–दनूस झालेल्या दानवांतील एक.

**अश्वशिरा**–अश्विनीकुमारांनीं अश्वाचें शीर जोडून ज्या दध्यंच ऋषीपासून ब्रह्मविद्या संपादिली त्यावरून त्यास हें नांव पडलें होतें.

२–दनुपुत्र एक दानव.

**अश्वसेन**–कद्रूपुत्र तक्षक ना० नागाचा पुत्र अर्जुनानें खांडववन अग्नीस दिलें, त्या काळीं तें वन पेटलें असें पाहून, हा, बाल असल्यामुळें, याची माता यास मुखांत धरून बाहेर निघूं लागली. तें पाहून अर्जुनानें तिला मारलें. हा मात्र कसा वांचला असेल तो असो, तेंच वैर मनांत धरून, अर्जुनाचें कर्णाशीं युद्ध चाललें असतां, हा कर्णाच्या बाणावर अर्जुनास मारण्याकरितां गुप्तरूपानें जाऊन बसला होता; परंतु कृष्णानें तें जाणून, अर्जुनाच्या रथाचे अश्व त्या संधीस त्यांनीं गुडघे भूमीस टेंकावे, असे खालीं दावल्यामुळें, अर्जुनाच्या कंठावर यानें पडावयाचें तें चुकून, मुगुटावर पडला, तेणेंकरून मुगुट तत्काळ भस्म झाला.

२–सत्येस कृष्णापासून झालेला पुत्र, हा महारथी होता.

**अश्विनी**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक. तशीच अक्रूराच्या स्त्रियांतील एक.

**अश्विनीकुमार**–आश्विनेय शब्द पहा.

**अश्विनीतीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ.

**अष्टउपद्वीप**–जंबुद्वीपाच्यो आसमंतात्, क्षार समुद्रामध्यें, आठ उपद्वीपें आहेत तीं. त्यांचीं नावें–स्वर्णप्रस्थ, चंद्रशुक्र अ० शुक्र, आवर्त्तन, रमणक, मंदरहरिण, पांचजन्य, सिंहल, आणि लंका. ( भाग० पंचम० अ० १९ श्लोक ३० ). ( देवी भा० अष्टम० अ० ११ श्लोक ३०–३२ ).

**अष्टक**–विश्वामित्र ऋषीस, माधवीपासून झालेला पुत्र. ( ३ गालव श० पहा ). हा मोठा वेदवेदांगपारंग असून, यानें एकदां स्वतः यज्ञ केला, त्याकाळीं याच्या यज्ञास बहुत ऋषि व राजे आले होते. पुढें हा, यज्ञ समाप्त झाल्यावर, आपले तिघे बंधु, प्रतर्दन, वसुमना, आणि शिबी, यांसहित रथांत बसून, कोठें जात असतां, मार्गांत नारदास पाहिल्यावरून त्यास यानें रथांत घेतलें आणि पुसूं लागला कीं, स्वर्गांत गेल्यावर, आम्हा चौघांतून आधीं कोण पतन पावेल तें सांगा. तेव्हां नारद म्हणाला, तूं बहुत गोप्रदानें केलीस, परंतु तीं, मीं केलीं असा तुझ्याठायीं अभिमान असल्यामुळें, प्रथमतः तूं पतन पावशील.

प्रतर्दन हा, ब्राह्मणानें मार्गांत अश्व मागितला असतां, देईन असें म्हणाला; परंतु ब्राह्मणानें आतांच दे, असें म्हटल्यावरून, रथाचा अश्व सोडून त्यास देतांच, आणखी तीन ब्राह्मण प्राप्त झाले व त्यांनींही अश्व मागितले. त्यावरून तिघांस तीन अश्व देऊन, स्वतः रथ ओढीत घरीं आला, व ब्राह्मणास कोणत्या वेळेस काय मागावें, याचें परिज्ञान नसतें, असें याच्या मनांत आल्यामुळें हा, तुझ्या मागून पतन पावेल.

वसुमना, याच्या रथाची स्तुति ब्राह्मणानें केली, तविरून त्याचें मन रथावर गेलें, असें यानें जाणूनही, त्यास रथ दिला नाहीं, यास्तव हा, प्रतर्दनाच्या मागून पतन पावेल. केवळ एक शिबिमात्र तेथें राहील. ( भार० वन० अ० १९८ ).

हा अष्टक, विश्वामित्रकुलांतील प्रवरप्रवर्तक आणि मंत्रद्रष्टा असून, हा आपल्या तिघां बंधूसहित अरण्यांत तप करीत असतां, ययातिराजा, आत्मश्लाघेनें स्वर्गांतून पतन पावला होता त्यास यानें बंधूसहित आपलें पुण्य देऊन स्वर्गास पाठविलें. (ययाति श० पहा).

**अष्टका**–एक श्राद्धदेवता आहे. प्रस्तुत तें देवतात्व अच्छोदेकडे आहे.

**अष्टकुलाचल**–भारतवर्षीय भरत खंडांत, जे आठ उपपर्वत आहेत, ते असे.–उपगिरि हिमालय, पारियात्र, ऋष्यवान्, अ० ऋक्षवान्, विंध्याद्रि, सह्याद्रि, मलय, महेंद्राचल, आणि शुक्तिमान्.

**अष्टदिक्पाल**–कल्पारंभीं, पूर्वादि दिशाक्रमानें ईशान्यदिशेपर्यंत दिक्पाल, इंद्र, अग्नि, पितर, निर्ऋति, वरुण, वायु, सोम किं० वैश्रवण आणि ईशान, असे आठ होते, व त्यावरूनच, त्यांचीं नांवें त्या त्या दिशेस अजून चालत आहेत. परंतु चालू मन्वंतरांत अष्टदिक्पाल आहेत, ते असे. द्वादशादित्यांतील इंद्र अ० शक्र नांवाचा आदित्य, अनल ना० वसु, सूर्यपुत्र यम, निर्ऋति ना० रुद्र, वरुण ना० आदित्य, अनिल ना० वसु, वैश्रवण अ० कुबेर, आणि ईश्वर ना० रुद्र, असे पूर्वादि दिशांचे आठ दिक्पाल आहेत.

**अष्टदिग्गज**–ऐरावत, पुंडरीक, वामन, कुमुद, अंजन, पुष्पदंत, सार्वभौम, आणि सुप्रतीक, असे पूर्वादि अष्टदिशांस, पृथिवीचे आधारभूत, आठ गज आहेत ते.

**अष्टनाग**–अनंत, वासुकि, तक्षक, कर्कोटक, शंख, कुलिक, पद्म, आणि महापद्म.

**अष्टभैरव**—असितांग, रुरु, चंड, क्रोध, उन्मत्त, कुपति अ० कपाली, भीषण, आणि संहार.

**अष्टमर्यादागिरि**—हिमालय, हेमकूट, निषध, गंधमादन, नील, श्वेत, शृंगवान, आणि माल्यवान्. हे आठ महागिरि जंबुद्वीपांत नऊ जे, भरतादि वर्ष आहेत, ते होण्यास कारण होत.

**अष्टमहासिद्धि**—अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्या, ईशित्वा, आणि वशित्वा या आठ सिद्धि, ईश्वरास मात्र आहेत, म्हणूनच तो उत्पत्ति, स्थिति, आणि संहार करण्यासाठीं,—गुणानुसार जीं, ब्रह्मा, विष्णु, आणि महेश,—जेव्हां नामें धारण करितो तेव्हां, तेथें सहजीं असतात.

**अष्टवसु**—चालू वैवस्वत मन्वंतरांतील जो धर्मऋषि, त्यापासून प्राचेतस दक्षकन्या वसु, तिच्याठायीं झालेले वसुसंज्ञक आठ देव ते. हे प्रस्तुत सप्तविध देवांतील पांचवे देव असून, यांचीं नांवें धर, ध्रुव, सोम, अन्ह, अनिल, अनल, प्रत्यूष, आणि प्रभास, अशीं आहेत. (भार० आदि० अ० ६६ ). पुराणांतरीं, हींच नांवें कित्येकांचीं कांहीं असून, कांहीं वेगळीं आहेत, मग तीं तसीं कां पडलीं, त्याचें कारण कळत नाहीं; परंतु आठ संख्येविषयीं मात्र अगदीं गोंधळ नाहीं.

**अष्टावक्र**—कहोड अ० कहोल ऋषीचा पुत्र, हा कोणत्या ऋषिकुलांतला होता, तें आढळत नाहीं. एकदां कहोड, आपल्या सुजाता ना० स्त्रीसहवर्तमान, आश्रमधर्म चालवीत असतां, अध्ययनाची आवृत्ति करीत होता, इतक्यांत हा, याची माता सुजाता गर्भिणी होती, तिच्या उदरांतून पित्यास बोलला कीं, अजून तुम्हास आवृत्तिच करावी लागत्ये काय ? हें त्याचें भाषण ऐकून, कहोडानें यास शाप दिला कीं, तूं आठ ठिकाणीं वक्र असा होशील. म्हणून यास असें नांव पडलें होतें.

कहोड ऋषीस, वरुणपुत्र बंदी, यानें वादांत पराजित करून, उदकांत बुडविल्यावर, सुजाता आपला पिता उद्दालक ऋषि, त्याच्या आश्रमीं यासहित जाऊन राहिली. एकदां हा, आपला मातुल श्वेतकेतु, त्यासह क्रीडा करीत असतां, श्वेतकेतु, जसा आपल्या पित्यास, तात म्हणाला, तसाच हाही म्हणाला. त्यावरून श्वेतकेतु, यास म्हणाला, कीं, हा तात माझा आहे, तुझा नव्हे, यास्तव तूं याच्या अंकावर वसूं नको. तें मातुलाचें भाषण यास विपरीत वाटलें. कारण, याच्याठायीं पिता, व मातामह अशी स्वाभाविक भेदबुद्धि नव्हती.

मातुलानें केलेल्या भाषणाचें यास वाईट वाटून, हा तत्काळ मातेकडे आला, आणि तिला पुसूं लागला कीं, माझा पिता कोण, व तो कोठें आहे, तें मला सांग. असें याचें भाषण सुजातेनें ऐकून, तिला अनिवार रुदन आलें. आणि तिनें यास, त्याला बंदीनें उदकांत बुडविल्याचें वृत्त कथन केलें. तें ऐकून, व बंदी जनकसभेंत अजून आहे, असें जाणून, यानें, मातुलांस समागमें घेतलें. आणि ऐंद्रद्युम्निनामा जनक, त्याच्या नगरास हा आला. नंतर राजद्वारासमीप येऊन, आंत प्रवेश करणार इतक्यांत, द्वारपालानें यास प्रतिबंध केला. त्यावरून द्वारपालाचें व याचें बरेंच संभाषण होऊन, त्याचें यानें शास्त्रसंमत वाक्यांनीं खंडन केलें असतां, द्वारपालानें उभयतांस आंत जाऊं दिलें.

नंतर हा सभेंत गेला, आणि बंदीशीं वाद करून, त्यांत यानें त्यास जिंकलें. पुढें बंदीस उदकांत बुडवावें, असें यानें जनकास सांगितलें असतां, बंदी अष्टावक्रास बोलला कीं, तुझा पिता मरण पावला असेल, अशी भीति तूं बाळगूं नको. आजपर्यंत जे सहस्र ब्राह्मण मी वादाच्या मिषानें उदकांत बुडविले, ते सर्व स्वस्थ असू ; वरुण जो माझा पिता, त्याच्या यज्ञास पाठविले आहेत. प्रस्तुत येथील यज्ञ समाप्त झाला आहे, व सर्व ब्राह्मण सत्वरच येथें परत येतील, त्यांत तुझा पिताही येईल. असें बोलून बंदी उगाच राहिला. व जनक राजानेंही, याचा सत्कार करून, याच्या मातुलासह यास राहून घेतलें. अल्पच कालानें, बंदी म्हणाल्याप्रमाणें सर्व ब्राह्मण परत आले, त्यांत कहोडही आला. त्यास पाहून, मातुलासहित अष्टावक्र, जनक राजाकडून सन्मान पावून, पित्यासमागमें आश्रमाकडे येण्यास निघाला. मार्गांत मधुविला नदी लागली; तेथें कहोडानें, अष्टावक्रास स्नान करण्यास सांगून, त्यास सरल केलें. तेव्हांपासून तीस समंगा असें नांव पडलें. नंतर पित्यासहित हा, मातेस येऊन भेटला, व मातामहाची आज्ञा घेऊन, आपल्या पूर्वाश्रमास गेला. असा हा अष्टावक्र परम समर्थ असून, ब्रह्मतत्त्वज्ञानसंपन्नहि होता. (भार० वन० अ० १३२–१३४.)

**असकृत**—भृगु ऋषीपासून, पुलोमेस झालेल्या पुत्रांतील एक. च्यवनादिक सात पुत्रांत, हें नामांतर कोणाचें तें कळत नाहीं.

**असमंजा**—( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न सगर राजास केशिनी भार्येच्या ठायीं झालेला पुत्र. हा योगभ्रष्ट

असल्यामुळें याची गृहांत राहण्याची इच्छा नव्हती, म्हणून हा बुद्धिपूर्वक असमंजसपणानें वागे. तो असा कीं, नगरींतील जनांचीं मुलें, खेळाच्या मिषानें नगराबाहेर नेऊन, सरयू नदींत बुडवी. याप्रमाणें बहुत मुलें, बुडाल्यामुळें, नगरांत मोठा बोभाटा झालेला राजास कळला. त्यावरून त्यानें यास राज्यांतून निघून जाण्याची आज्ञा केली. तेव्हां हा पित्यांस वंदन करून तत्काळ निघाला तो सरयू कांठीं आला, आणि बुडवलेलीं मुलें, योगसामर्थ्यानें बाहेर काढून नगरांत पाठवून देऊन, आपण अरण्यांत चालता झाला. यास, अंशुमान् या नामेंकरून एक प्रख्यात पुत्र होता.

२–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा. त्याच्या कुलांत जन्मलेला सात्वतपुत्र जो अंधक त्याचा पौत्र, आणि कंवलबर्हिषाचा पुत्र. याचा पुत्र तमोजा.

**असिक्नी**–प्राचेतस दक्षाची स्त्री. ही, पंचजनप्रजापतीची कन्या म्हणून, हिला पांचजनी असें म्हटलेलें आहे. ( भाग० षष्ठ० अ० ४ ).

२–भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**असित**–मरीचिकुलोत्पन्न एक ऋषि. याची स्त्री, हिमालयाची कन्या एकपर्णा.

२–मांधाता राजाच्या हातून पराभव पावलेला एक राजा. ( भार० शांति० अ० २९ ).

३–जनमेजयाच्या सर्पसत्रांतील एक सदस्य ऋषि.

४–काम्यक वनाच्या पश्चिमेकडील एक पर्वत. येथें कक्षसेन ऋषीचा आश्रम असे.

**असिता**–अप्सराविं०.

**असितांग**–अष्टभैरवांतील एक.

**असिपत्रवन**–तीक्ष्ण धारांच्या खड्गांचें वन. हा एक नरक आहे. जे, वेदबाह्य वर्तन करून, पाखंडमार्गानें चालतात, त्यांस येथें यातना भोगाव्या लागतात.

**असिलोमा**–दनुपुत्र एक दानव.

**असी**–काशीक्षेत्रांतील एक भागीरथीस भिळणारी नदी.

**असीमकृष्ण**–( सो० वं० ) जनमेजयवंशांतील अश्वमेधक राजाचा पुत्र. याचा पुत्र, निमिचक्र.

**असुर**–अग्निविं० ( भार० उद्यो० अ० ९९ ).

**असुरथ**–एक यादव.

**असुरा**–प्राधाकन्या एक अप्सरा.

**असूर्तरजस**–मूर्तय राजास नामांतर. ( मूर्तय श०पहा ).

**अस्ति**–जरासंध राजाच्या दोन कन्यांतील ज्येष्ठ. हिची कनिष्ठ भगिनी प्राप्ति असून, ती व ही, दोघी कंसाच्या स्त्रिया होत्या. कंसास कृष्णानें मारल्यावर, ही भगिनीसहित, पितृगृहीं येऊन राहिली होती. ( भाग० दशम० अ० ५० ).

**अस्वहार्य**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**अहंयाति**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न संयाति राजाचा पुत्र याचा पुत्र. रौद्राश्व.

**अहर**–दनुपुत्र दानवांतील एक.

**अहल्या**–ब्रह्मदेवाची मानसकन्या, गौतम ऋषीची स्त्री. इंद्रानें हिचें घर्षण केलें होतें, त्यामुळें इंद्रास त्यानें शाप देऊन, हिलाहि शिला होशील असा शाप दिला होता. परंतु हिनें, उःशाप मागितल्यावरून त्यानें दाशरथि रामाच्या पदरजःकणानें पूर्ववत् होशील असा वर दिला होता. त्याचप्रमाणें हिचा पुढें उद्धार झाला. हिचा पुत्र शतानंद, तोच, विदेहवंशीय जनकाचा उपाध्याय. (वा० रा० बाल० स० ४८–४९). (वा० रा० उत्तर० स० ३० ).

२–सोमवंशीय पूरुकुलोत्पन्न विंध्याश्व राजा, त्यास मेनका अप्सरेपासून, झालेल्या मिथुनांतील कन्या. ही, त्याच मिथुनांतील पुत्र जो दिवोदास, त्याची भगिनी असून, दुसरा कोणी एक गौतम ऋषि, त्याची स्त्री होती. हिला पुत्र शतानंद, व चिरकारि, असे दोन होते.

**अहल्याह्रद**–गौतमवनांतील भारतवर्षीय तीर्थ.

**अहिच्छत्रा**–द्रुपद राजाची पूर्व नगरी.

**अहिर्बुध्न्य**–एक रुद्र. ( एकादशरुद्र श० पहा. )

२–यज्ञांतील अग्निविं०.

**अहिक्षत्र**–भारतवर्षीय नगर. (भार० वन० अ० २५४).

**अहीन**–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न क्षत्रवृद्ध राजा, त्याच्या वंशांत जन्मलेल्या सहदेव राजाचा पुत्र. याचा पुत्र जयसेन.

**अहीनगु**–अनीह राजास नामांतर.

**अहीनर**– ,, ,,

**अहोवीर्य**–ऋषि.

**अक्ष**–रावणापासून मंदोदरीस झालेला पुत्र. अशोकवनिकाभंगकालीं, प्रथमतः रावणानें, पांच राक्षससेनापति, मारुतीस धरण्याकरितां पाठविले होते. ते त्याच्या हातून मेल्यावर, यास पाठविलें असतां, हा, आठ अश्वांनीं युक्त अशा रथांत बसून, अशोकवनिकेंत गेला, व त्याशीं युद्ध करून, शेवटीं त्याच्याच हातून मरण पावला. ( वा० रा० सुंदर० स० ४७ ).

**अक्षमाला**–द्वितीयार्थक वसिष्ठ ऋषीची स्त्री.

**अक्षमालिका**–ऋग्वेदोपनिषत्.

**अक्षयवट**–भारतवर्षीय तीर्थ, व पवित्र स्थल.

**अक्षीण**–एक ऋषि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

## आ

**आकूति**–स्वायंभू मनूच्या तीन कन्यांतील पहिली. वरुचिऋषीची स्त्री. हिला यज्ञ आणि दक्षिणा, असें पुत्रकन्यारूप मिथुन झालें होतें. (भाग०तृतीय०अ०१२).

२–प्रियव्रत राजाच्या वंशांत जन्मलेल्या ऋषभ देवाच्या कुलांतील प्रसिद्ध जो विभुराजा, त्याच्या पृथुषेण ना० पुत्राची स्त्री. हिला नक्त नांवाचा पुत्र होता.

३–उत्तानपाद राजाच्या वंशांतील जो व्युष्ट ना० राजा, त्याची स्नुषा, व सर्वतेजस राजाची स्त्री. हिच्या पुत्राचें नांव चक्षु, तोच पुढें साहवा मनु झाला होता. ( भाग० चतुर्थ० अ० १३ ).

**आकृति**–एक कौशिकाचार्य. (गारुड विद्येचा आचार्य). युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ केला त्या काळीं, सहदेव दक्षिणदिशा जिंकण्यास गेला असतां, त्यानें यास जिंकून, यापासून करभार घेतला होता. ( भार० सभा० अ० ३१ ).

**आंगरिष्ट**–एक राजर्षि. याचें जन्म कोणत्या कुलांत झालें होत, तें ग्रंथामध्यें आढळत नाहीं. मात्र इतकेंच आढळतें कीं, याचा कामंद ऋषीशीं संवाद झाला होता. ( कामंद श० पहा ).

**आंगीरसी**–प्लक्ष द्वीपामध्यें, ज्या सप्त महानद्या आहेत म्हणून वर्णिलें आहे, त्यांतील एक.

**आग्नाप्रास्तेय**–एक ब्रह्मर्षि होता.(२ कश्यप श० पहा ).

**आग्नीध्र**–प्रियव्रत राजास, बर्हिष्मतीच्या ठायीं झालेल्या दाहा पुत्रांतील ज्येष्ठ तो. क्षारसमुद्रानें वेष्टित जें जंबुद्वीप, त्याचा हा अधिपति होता. यानें पूर्वचित्ति ना० अप्सरेशीं दाहा कोटि वर्षेपर्यंत यथेच्छ समागम करून, तिजपासून नाभि, किंपुरुष, हरि, इलाव्रत्त, रम्यक, हिरण्मय, कुरु, भद्राश्व, आणि केतुमाल असे नऊ पुत्र उत्पन्न केले होते. कांहीं कालानें ती अप्सरा दिव्यलोकीं निघून गेली असतां, हा, तिच्या विरहानें अत्यंत उदास झाला. नंतर यानें, आपल्या द्वीपाचे नऊ भाग, वर्ष अशा संज्ञेचे करून, तेथील आधिपत्य एकेक पुत्रांस दिलें, व अरण्यांत तपार्थ गमन केलें. ( भाग० पंचम० अ० १–२ ).

**आग्नीध्रक**–रुद्रसावर्णि नांवाचें जें पुढें बारावें मन्वंतर होणार आहे, त्यांतील सप्तर्षींत एक होईल ऋषि तो.

**आग्नेयकल्प**–ब्राह्ममासांतील अठरावा दिवस अ० कल्प. यांत प्रथम अग्नीचा अवतार झाला होता. ( ४ कल्प श० पहा ).

**आग्नेयकोसल**–इंद्रप्रस्थाच्या आग्नेयी दिशेकडे असणारा कोसलदेश तो. याची राजधानी अयोध्या, ती सरयु नदीच्या कांठीं आहे. पांडवांच्या वेळेस येथें बृहद्बल नांवाचा सूर्यवंशी राजा असून, त्याचा सहोदर दीर्घयज्ञ तो युवराजा होता. ( भार० सभा० अ० ३० ). ( वा० रा० अयोध्या० स० ६८ ).

**आग्नेय**–भारतवर्षीय देश. याची सीमा आढळत नाहीं. ( भार० वन० अ० २५४ ).

**आंध्रिक**–एक ऋषि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**आंजनेय**–अंजनेचा पुत्र जो मारुति, त्यासच म्हटलें आहे.

**आजमीढ**–सोमवंशीय जो अजमीढ राजा त्याच्या वंशजांस हें नांव संबोधनप्रसंगीं साधारण लागतें, परंतु विशेष रूढी, युधिष्ठिराविषयीं भारतांत फार आढळते.

**आजिहायन**–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**आज्यप**–पितृगणांतील एका भेदविशेषाचे पितर आहेत ते. हे, ब्रह्ममानसपुत्र जो पुलह ऋषि, त्याचे वंशज असून, यज्ञामध्यें आज्य ( शेळीच्या दुधापासून झालेलें तूप ) त्याचेंच पान करतात, म्हणून यांस असें नांव पडलें आहे. यांस सुस्वधा असेंहि कोठें कोठें म्हटलेलें आहे. आणि हे मुख्यत्वेंकरून, वैश्य जातीस पूज्य आहेत. ( मत्स्य० अ० १५ ).

**आडी**–अंधकासुराचा पुत्र तो. यानें उग्र तपेंकरून ब्रह्मदेवास प्रसन्न केलें, आणि अमरत्व मागितलें. तेव्हां त्यांनीं तें दुर्लभ आहे असें सांगितल्यावर, मी रूपांतर पावल्यावांचून मरूं नये एवढें द्या असें मागितलें. तें यास त्यांनीं तथास्तु वचनानें देऊन, स्वलोकीं गमन केल्यावर, आपल्या पित्यास मारणाऱ्या शिवाचें वैर उगवावें म्हणून, हा कैलासास गेला, आणि तेथें द्वारावर वीरक नांवाचा शिवगण होता, त्यानें आपल्यास आडवूं नये या हेतूनें सर्परूप धारण करून गुप्तरूपानें आंत शिरला. नंतर सर्परूप टाकून, पार्वतीचें रूप धारण करून शिवासमोर जात आहे तों, शिवांनीं तें कपट जाणलें, व यास, यानेंच संपादिलेल्या वरप्रदानाप्रमाणें तत्काळ वधिलें. ( मत्स्य० अ० १५५ ).

**आत्मभू–आत्मयोनि**–स्वयंभू जो ब्रह्मदेव त्यासच हीं नांवें आहेत.

**आत्मवान्**–एक ब्रह्मर्षि होता. ( ३ भृगु श० पहा ).

**आत्मा**–शरीरस्थ जीव अथवा कूटस्थ.

२–एक देवर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

आत्रेय-अत्रिकुलोत्पन्नांस हें नांव साधारण आहे.

२-वामदेव ऋषीचा एक शिष्य. (१परिक्षित् श० पहा).

३-जनमेजयसर्पसत्रांतील एक सदस्य.

आत्रेयायनि-एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

आत्रेयी-भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ).

आथर्वण-अथर्वण ऋषीचे धृतव्रतादिक तीन पुत्र त्यांतील प्रत्येक.

आदिकवि-ब्रह्मदेव आणि वाल्मीकि ऋषि, या दोघांसही म्हणतात.

आदित्य-सकलांचा जो आदि, असा परमात्मा तो.

२-स्वर्गामध्यें आदितिपुत्र बारा देव आहेत तो प्रत्येक.

आदित्यकेतु-धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक.

आदिदैत्य-हिरण्याक्षास म्हणतात; कारण हा, या कल्पारंभींच होऊन वराहाच्या हातानें मृत्यु पावला होता.

आदिवराह-हिरण्याक्षास मारण्याकरितां या चालू कल्पारंभींच झालेला अवतार. यास, श्वेतवाराह असेंहि म्हणतात.

आद्य-चाक्षुषमन्वंतरांतल्या पंचविध देवांतील एक प्रकारचे देव.

२-एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ). हा प्रथमार्थक उपरिचराच्या १६ ऋत्विजांत एक होता.

आंध्र-भारतवर्षीय देश. यास प्रस्तुत तैलंगण म्हणतात. क्वचित् अंध्र असाही प्रयोग आहे. ( भार० भीष्म० अ० ९ ).

आनक-(सो०वं०) यदुकुलोत्पन्न शूर राजास मारिषेपासून झालेल्या, दाहा पुत्रांतील चौथा. यास, कंका ना० स्त्रीपासून पुरुजित्, आणि सत्यजित् असे दोन पुत्र झाले होते.

आनकदुंदुभि-कृष्णपिता जो वसुदेव, त्यासच हें नांव. या नांवाचें प्रयोजन असें आहे कीं, याच्या जन्मकाळीं, देवांनीं दुंदुभिवादन केलें होतें.

आनंदक-भारतवर्षीय तीर्थ.

आनंदवन-काशीपुरीस नांव.

आनर्त-वैवस्वत मनूचा पौत्र. शर्याति राजाचा मध्यम पुत्र. आनर्त देश याच्याच नांवावरून प्रासिद्धीस आला. याचा पुत्र रेवत राजा.

२- भारतवर्षीय देश. हा उत्तर आणि पश्चिम अशा दिशाभेदानें दोन प्रकारचा आढळतो, म्हणून यास, तशींच नांवें या ग्रंथांत, इंद्रप्रस्थ मध्य मानून दिलीं आहेत.

आनीक-सिंधुदेशाधिपति जयद्रथाच्या साहा बंधूंतील एक. ( भार० वन० अ०२६५ ).

आप-अन्हवसूसच, पुराणांतरीं नांव. याच्या संततीच्या संख्येंत विकल्प आहे.

२- स्वारोचिष मन्वंतरांतील, वसिष्ठपुत्र प्रजापति तो.

आपगा-नदी, परंतु भागीरथीस विशेषेंकरून म्हटलेलें आढळतें.

२- वाहीक प्रदेशांतील एक नदी.

आपव-वसिष्ठ ऋषीस नामांतर. याचा आश्रम, सहस्रार्जुनाकडून दग्ध झाल्यामुळें, तुझे सहस्रही हात भग्न होतील, असा यानें त्यास शाप दिला होता. ( मत्स्य० अ० ४४ ).

आपस्तंब-भृगुकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि. हा तैत्तिरीयशाखी, व तिचा सूत्रकार होय. याच्या सूत्राप्रमाणें चालणाऱ्यांस, आपस्तंब असें म्हणतात. कश्यप ऋषीनें, दितीकडून पुत्रकामेष्टि करविली. तींत हा आचार्य होता, व त्याच इष्टीपासून मरुद्गण नांवाचे देव उत्पन्न झाले होते. ( मत्स्य० अ० ७ ). यावरून, हा, चालू मन्वंतरांत पुष्कळ प्राचीन आहे; किंबहुना, कल्पारंभींचाच असल्यामुळें, पुरातन आहे, असेंहि म्हटल्यास चालेल. याची, स्मृतिकारांत गणना आहे.

आपस्तंबी-आपस्तंबकुलोत्पन्न ऋषि.

२- अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

आपस्थूण-एक ब्रह्मर्षि.( ३ वसिष्ठ श० पहा ).

आपाग्नेय-ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

आपिकायनि-ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

आपिशलि- " "

आप्तोर्याम—देववि०.

२- यज्ञवि०

आप्नवान्-एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

आप्य-चाक्षुष मन्वंतरांतील देववि०.

आप्यायन-प्रियव्रत राजर्षीचा पौत्र. यज्ञबाहूच्या सात पुत्रांतील साहवा. याचा वर्ष, याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे. ( स्वायंभू० वं० ).

२- शाल्मली द्वीपांतील साहवा वर्ष.

आम्रवंती-भारतवर्षीय नगरी.

आभीर-भारतवर्षीय देश. ( भार० सभा० अ० ३२ ).

आम-प्रियव्रत राजर्षीचा पौत्र. धृतपृष्ठाच्या सात पुत्रांतील ज्येष्ठ. याचा वर्ष, याच्याच नांवानें प्रासिद्ध आहे. (स्वायंभू० वं० ).

२- क्रौंचद्वीपांतील पहिला वर्ष.

३- कृष्णास सत्येपासून झालेला पुत्र. हा, महारथी होता.

आमावसु-पितरवि०. हा, मोठा इंद्रियनिग्रही होता.

त्याविषयीं इतिहास असा आहे कीं, कोणी एका पितराची मानसकन्या अच्छोदा, तिनें याशीं एकेकाळीं कामबुद्धि केली. असें असतां, हा तिला वश झाला नाहीं. हें वर्तमान इतर पितरांस कळून, त्यांनीं याची स्तुति केली, व प्रसन्नांतःकरणानें, ज्या तिथिस हा ब्रह्मचर्यापासून ढळला नाहीं, ती तिथि, सर्व पितरांस प्रिय असो, असा आशीर्वाद देऊन, याच्याच नांवावरून, तिचें नांव आमावास्या ठेविलें. अच्छोदेस, तूं मृत्युलोकीं पतन पावशील असा शाप दिल्यावरून, ती मात्र पतन पावून, मत्स्यगंधा अ० सत्यवती, अशा ना० भूमीवर जन्मास आली होती. ती सांप्रत स्वर्गांत अष्टका ना० देवतेच्या स्थानीं आहे. ( मत्स्य० अ० ).

**आम्रातकेश्वर**–भारतवर्षीय तीर्थ.

**आयतायन**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**आयती**–मेरूची कन्या. ही नियतीची भगिनी व धाता ना० ऋषीची स्त्री.

**आयास्य**–गौतमांगिरसवंशांतील एक कुल. ( ३ आंगिरा श० पहा ).

**आयु**–( सो० वं० ) पुरूरवा राजास, उर्वशीपासून झालेल्या साहा पुत्रांतील ज्येष्ठ. यास नहुष, क्षत्रवृद्ध, रजी, रंभ, आणि अनेना, असे पांच पुत्र होते.

२– ( सो० वं० ) यदुपुत्र कोष्टा, याच्या वंशांतील पुरुहोत्र राजाचा पुत्र, याचा पुत्र सात्वत राजा.

३– वैवस्वत मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र क्रतु ऋषि, त्यास नामांतर. ( सहस्य श० पहा ).

४–दाहा आंगिरस देवांतलि एक. ( ३ अंगिरा श० पहा ).

५– एक प्रसिद्ध मंडूकांचा राजा.(१ पराक्षित् श०पहा).

६—कृष्णास भद्रेपासून झालेला पुत्र, हा महारथी होता.

**आयुर्दा**–शाकद्वीपांतील नदी.

**आयुर्वेद**–ऋग्वेदाचा उपवेद, व त्याची मूर्तिमान् देवता. हा, ब्रह्मदेवाच्या पूर्वमुखांतून, निघालेला होय.

**आयुष्मान्**–प्रऱ्हाद दैत्याच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ.

२– दक्षसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या विष्णु अवताराचा पिता.

**आरब्ध**–( सो० वं० ) द्रुह्युकुलोत्पन्न सेतु राजाचा पुत्र. याचा पुत्र गांधार राजा.

**आरणेय**–अरणीच्या ठायीं उत्पन्न झाल्यामुळें शुकाचार्यास नांव. ( देवी०.प्रथम० अ० १७ ).

**आरुणि**–अरुणि ऋषीचा पुत्र, व धौम्य ऋषीचा शिष्य. यासच उद्दालक असें नांव पुढें पडलें. ( १ उद्दालक श० पहा ).

२– सामवेदोपनिषत्.

**आरुषी**–च्यवनऋषीच्या दोन स्त्रियांतील ज्येष्ठ. ऊर्वऋषीची माता.

**आर्चनानस**–एक ब्रह्मर्षि. ( २ अत्रि श० पहा ).

**आर्चीक**–ऋचीक ऋषीचा जमदग्निप्रभृति वंशज तो. (भार० उद्योग० अ० ११७ ).

२–ऋचीक ज्या पर्वतावर राहात होता त्यास हें नांव पडलें होतें.

**आर्जव**–गांधार देशाधिपति शकुनीच्या साहा बंधूंतील एक–यास भारती युद्धांत इरावानानें मारिलें होतें. ( भार० भीष्म० अ० ९० ).

**आर्तभाग**–जरत्कारु ऋषीचा पुत्र. हें नांव आस्तिक ऋषीसच असावेसें वाटतें. दैवराति जनकाच्या सभेंत याज्ञवल्क्याशीं वाद करणारा, तो भिन्न असावा असें वाटतें.

**आर्तव**–वर्हिषद ना० पितरांस नामांतर.

**आर्द्र**–सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न जो इंदु राजा, त्याचें नामांतर.

**आर्द्रा**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

**आर्यक**–कद्रूपुत्र एक नाग. याची कन्या मारीषा, अ० भोजा, यदुकुलोत्पन्न शूर राजाची स्त्री, तिचेठायीं शूरास, पृथा ना० कन्या झाली होती. तिलाच पुढें कुंती नांव पडलें. ( कुंतिभोज श० पहा ). पृथा ही आर्यकाची पौत्री असल्यामुळें, तिच्या भीमसेन ना० पुत्रास, दुर्योधनादिक शतबंधूंनीं, विषयुक्त अन्न चारून, प्रमाण कोटीतीर्थांत बुडविलें असतां, त्यास नदींतील नागांनीं दंश केल्यामुळें, त्याचें विष उतरलें. परंतु त्यांनीं त्यास, मारावें अशा बुद्धीनें दंश केला होता. नंतर हा सावध झाला असतां, पुनः ते दंश करायास येतात, असें त्यानें पाहून तो त्यास मारूं लागला. हें वर्तमान आर्यकास कित्येक नागांनीं कळविल्यावरून, तो स्वतः तेथें आला, आणि पाहतो तों, तो भीम आहे असें त्यानें ओळखिलें. नंतर त्यास पाताळांत नेऊन यथेच्छ अमृतपान करविलें, आणि दाहा सहस्र नागांचें तुला बळ असो, असा आशीर्वाद देऊन, त्यास, हस्तिनापुरासमीप पोहोंचतें केलें. (भार० आदि० अ० १२८ ).

२–धर्मसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या विष्णु अवताराचा पिता.

**आर्यका**–क्रौंचद्वीपांतील नदी.

**आर्या**-पार्वतीस नांव आहे. स्कंदोत्पन्न मातृगणांतील एक देवता.

**आर्यावर्त**-पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत पूर्वापर, आणि उपगिरि हिमालयापासून, विंध्याचलापर्यंत दक्षिणोत्तर जो भारतवर्षीय प्रदेश तो. याविषयीं मनुस्मृतींत असें वाक्य आहे.

आसमुद्रात्तु वै पूर्वादासमुद्रात्तु पश्चिमात् ।
तयोरेवांतरं गिर्योरार्यावर्तं विदुर्बुधाः ॥

( मनुस्मृति० अ० २ श्लो० २२ ). ( वाल्मीकिरामायणांत वालकांडीं ३९ व्या सर्गांताहि, अशाच अर्थाचें वाक्य आहे ).

**आर्षभ**-ऋषभ देवाच्या भरतादि शतपुत्रांस संज्ञा.

**आर्षशृंगी**-भारती युद्धांतलि दुर्योधनपक्षीय राक्षस,अर्जुनपुत्र इरावान्, त्यास यानेंच मारिलें.

**आर्ष्टिषेण**-अर्ष्टिषेण ऋषीचा पुत्र अ० वंशज तो. याचा आश्रम हिमालयावर नरनारायणाश्रमासमीप होता. ( भार० वन० अ० १५६ ).

२-एक राजर्षि.

**आलक्षित**-किष्किंधेच्या पश्चिमेकडील वन. ( वा०रा० किष्किं० ).

**आवरण**-स्वायंभू मनूचा वंशज भरत, त्यास पंचजनी स्त्रीपासून झालेल्या पांच पुत्रांतील चौथा.

**आवर्तन**-अष्ट उपद्वीपांतील तिसरें.

**आवशीर**-भारतवर्षीय देश. (भार०वन०अ०२५४).

**आवसथ्य**-पवमान् अग्नीचा पुत्र.

**आविर्होत्र**-ऋषभ देवाच्या नऊ सिद्ध पुत्रांतील एक. ( ऋषभदेव श० पहा ).

**आविष्टायन**-एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**आवीक्षित्**-( सू० वं० ) अवीक्षित्पुत्र जो मरुत्त राजा, त्यासच नामांतर. हा, दिष्टकुलोत्पन्न समजावा.

**आवेद**-एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**आशावह**-एक यादव.

**आश्मरथ्य**-अश्मरथ्याचा वंशज, व तें कुल.

**आश्रायणि**-एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**आश्लेषा**-सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

**आश्वल** अ० **आश्वलायन**-एक ऋषि. हा शाकल्यशाखी, व त्या शाखेचा सूत्रकार होय. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**आश्वलायनि**-एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**आश्वलायनिन**-एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**आश्ववातायन**- ,, ,,

**आश्वायनि**-ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**आश्विनेय**-अश्विनीरूपधारी सूर्यपत्नी संज्ञा. तिचे ठायीं अश्वरूपधर सूर्यापासून झालेले दोन पुत्र ते. यांस अश्विनीकुमार असेंहि म्हणण्याची रूढी आहे. हे उभय, अश्विनीच्या नासिकाद्वारें प्रकटले, म्हणून यांस नासत्य असें म्हटलें आहे. हे प्रस्तुतच्या मन्वंतरांत, सप्तविध देवांतील साहावे देव असून, देवांचे वैद्य आहेत. म्हणून यांस, यज्ञामध्यें बराच कालपर्यंत हविर्भाग नसे. परंतु पुढें यांस तो, च्यवन भार्गवानें चालू केला. ( च्यवन श० पहा ).

हे दोघेहि नासत्यौ, अश्विनौ, दस्रौ अशा जरी साधारण नांवांनें प्रसिद्ध आहेत, तरी ज्येष्ठाचें नांव नासत्य, आणि कनिष्ठाचें दस्र, अशी व्यवस्था आढळत्ये. (भार०अनुशा०अ०१५०श्लो०१८).

**आषाढ**-दुर्योधनपक्षीय भारती युद्धांतील राजा.

**आसंग**-श्वफल्क यादवाच्या तेरा पुत्रांतील दुसरा. अक्रूराचा कनिष्ठ भ्राता.

**आसमंजा**-असमंजाचा पुत्र जो अंशुमान् राजा तो.

**आसारण**-यक्षवि० ( नभस्य श० पहा ).

**आसुरायण**-एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**आसुरि**-युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांतील एक ऋषि.

**आसुरी**-ऋषभदेववंशीय देवताजित् ना० राजाची स्त्री, देवद्युम्नाची माता.

**आस्तिक**-भृगुकुलोत्पन्न जरत्कारु ऋषीस, कश्यप कन्या मनसा, जिला जरद्गौरी अ०जरत्कारु अशीं नांवें होतीं, तिच्या ठायीं झालेला पुत्र. ( जरत्कारु श० पहा ). जरत्कारु अरण्यांत निघून गेल्यावर, त्याची स्त्री गर्भिणी होती, म्हणून तिला, परम संकट झालें कीं, आतां पुढें कसें करावें. तथापि ती, तसेंच धैर्य धरून, आश्रम सोडून निघाली, व हिमालयाच्या कैलास ना० शिखरावर जाऊन, तेथें शिवपार्वतींची सेवा करीत राहिली. शंकर तिच्या सेवेनें संतुष्ट होऊन, तिला त्यांनीं ज्ञानोपदेश केल्यावर, तिचे दिवस पूर्ण होऊन, ती प्रसूत झाली असतां, पुत्रास प्रसवली असें पाहून, व तिला केलेल्या उपदेशाचें, यानें, गर्भांतच तथ्यबुद्धीनें धारण केलें होतें असें जाणून, याचें नांव आस्तिक असें ठेविलें. पुढें हा, मातेसह तेथेंच असतां, मोठा होत चालला असें पाहून, शंकरांनीं त्याचा व्रतबंध करवून, यास वेदवेदांगें इ०कांत, निष्णात करविल्यावर, मृत्युंजय मंत्राचा अनुग्रह केला. त्याचें यानें, विधिपूर्वक उत्तमप्रकारें अनुष्ठान केलें. त्या योगानें हा, परमतेजस्वी होत्साता, दिवसेंदिवस अधिक प्रख्यातीस येऊं लागला. पुढें शंकरांनीं तिला सांगि-

तलें कीं, आतां तूं यास घेऊन, आपल्या पित्याच्या आश्रमास जा. त्यावरून तिनें ती आज्ञा मान्य करून, यास घेऊन, ती कश्यप ऋषीच्या आश्रमीं येऊन, तेथें सुखानें राहिली. ( देवीभा० नवम० अ० ४७–४८).

कालेंकरून जनमेजय राजानें, सर्पसत्र आरंभिलें, व सहस्रावधि नागकुळें जाळून मारिलीं. त्यामुळें, मोठमोठे नाग, आस्तिक जो आपला भागिनेय ( भाचा ) त्यास, आपल्या संरक्षणार्थ पाचारण करावें, असा विचार करीत आहेत तों, तक्षक ना० नागावर तर, तो मरणप्रसंग येऊन ठेपला. तो असा कीं, तक्षक, इंद्रास शरण जाऊन त्यामागें लपला असतां, सर्पसत्रांतील ऋत्विजांनीं, जनमेजयाच्या आज्ञेवरून त्याचें आवाहन केलें. तेणेंकरून तो येईना असें पाहून, ऋत्विजांनीं त्याचें कारण अंतर्दृष्टीनें पाहिलें. त्यांत त्यांस, तो इंद्राश्रित झाल्याचें समजलें. तेव्हां कसें करावें असा ते विचार करीत असतां, जनमेजयानें सांगितलें कीं, माझ्या पित्याचा वैरी, सत्वर आणा. मग त्याचा संरक्षक कोणीहि असो. तेव्हां ऋत्विजांनीं इंद्रासहित तक्षकाचें आवाहन करितांच, इंद्रानें तक्षकाचा त्याग केला. त्यामुळें तक्षक एकटाच कुंडाच्या उर्ध्वप्रदेशीं येऊन खिन्नवदन उभा राहिला.

इकडे असें झालें होतें कीं, सर्व नाग कश्यपऋषीकडे जाऊन, त्यांनीं आपल्या जरत्कारु भगिनीचा पुत्र जो आस्तिक त्यास, तक्षक कुंडावर येण्यापूर्वींच, जनमेजयाच्या सत्रांत तें समाप्त कराविण्यासाठीं पाठविलें होतें, व त्यानेंही तेथें जाऊन, जनमेजयाची इतकी स्तुति करून, त्यास संतुष्ट केलें होतें कीं, याचें इच्छित यास देऊन, नंतर काय करणें तें करावें, असा जनमेजयास, व ऋत्विजांस, याच्या मनोहर भाषणानें मोह पडला होता. इतक्यांत, तक्षक कुंडाच्या उर्ध्वभागीं आलेला पाहून, जनमेजयास हर्ष झाला, व त्या आनंदांत त्यानें, आस्तिकास काय इच्छा असेल तें माग असें म्हटलें. त्यावरून यानें आतां हें सत्र समाप्त करावें, येवढेंच मला द्या म्हणून मागितलें. तेणेंकरून राजा विमनस्क होऊन, दुसरें कांहीं मागण्याविषयीं प्रार्थूं लागला. परंतु हा दुसरें मागेचना असें पाहून, शेवटीं जनमेजयानें, सर्पसत्र समाप्त केलें, व हा, आपल्या मातेकडे परत आला. ( भार० आदि० अ० ५१–५३ ).

**आस्तिक**–आस्तिक ऋषि तोच.

**आहवनीय**–अग्निहोत्री याच्या यज्ञशालेंत पूर्व दिशेकडील कुंडांत असणारा अग्नि.

**आहुक**–(सो० वं० ) यदुराजाच्या सात्वत ना० कुलांत जन्मलेल्या पुनर्वसु राजाचा पुत्र. यास पुत्र अनेक होते, परंतु त्यांत, देवक आणि उग्रसेन, हेच नामांकित असत.

**आहुकी**–पुनर्वसु राजाची कन्या, आहुकाची भगिनी, हिचा पति कोण होता तें आढळत नाहीं.

**आक्षील**–भरद्वाजांगिरसवंशमालिकेंतील द्विगोत्रीय ऋषि. ( ३ अंगिरा श० पहा ).

---

## इ

**इडाविड**–सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न जो शतरथ राजा, त्याचें नामांतर. यास इलविल असेंही म्हटलेलें आहे. याचा पुत्र ऐडविड.

**इडाविडा**–इलविला शब्द पहा.

**इडस्पति**–बारा तुषित ना० देवांतील एक. ( तुषित श० पहा ).

**इंदिरा**–लक्ष्मी.

**इंदु**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न विश्वग राजाचा पुत्र. यास, चंद्र, व आर्द्र, अशीं दोन नामांतरें असून, युवनाश्व नांवाचा पुत्र होता.

**इंदुमती**–सिंहलद्वीपींच्या चंद्रसेन राजाची कन्या. ( २ मंदोदरी श० पहा ).

**इंदुमौली**–भूषणरूपानें मस्तकीं चंद्र असल्यामुळें, हें नांव शिवास आहे.

**इंद्र**–हें नांव साधारण आहे. ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत म्हणजे प्रातःकालापासून अस्तमानपर्यंतच्या कालांत, स्वर्गामध्यें चौदा इंद्र होऊन जातात. या प्रत्येक इंद्राचें नांव वेगवेगळें असतें. त्या सर्वांचीं नांवें अशीं.–पहिला इंद्र यज्ञ, २ रोचन, ३ सत्याजित, ४ त्रिशिख, ५ विभु, ६ मंत्रद्रुम, ७ पुरंदर, ८ बली, ९ अद्भुत, १० शंभु, ११ वैधृति, १२ ऋतधामा, १३ दिवस्पति, आणि १४ शुचि. यांत, सहा इंद्र कल्प आरंभल्यापासून होऊन गेले असून, प्रस्तुत स्वर्गामध्यें पुरंदर इंद्र आहे, व बलीपासून शुचीपर्यंत सात, कल्पसमाप्तीपर्यंत होणारे आहेत. इंद्राची जी स्त्री, ती इंद्राणी होय. हेंहि नांव, असेंच साधारण आहे.

२–आदित्यांतील पहिला. ( द्वादशादित्य श० पहा ). यास शक्र असेंही नामांतर आढळतें. हा चालू जें वैवस्वत मन्वंतर आहे, यांत पूर्वदिग्पाल असून प्रतिवर्षांतील श्रावण मासांत सूर्यमंडलावर अधिकारी होत असतो. ( नभ श० पहा ). यास, पौलोमी स्त्रीपासून जयंत, ऋषभ, आणि मीढुष, असे तीन पुत्र होते.

**इंद्रकील**–हिमालय पर्वताचें शिखर वि० पंडुपुत्र अर्जुन व युधिष्ठिर यांस, कृष्णद्वैपायन व्यासानें दिलेली प्रतिस्मृति ना० विद्या, ती त्यापासून ग्रहण करून, इंद्रास प्रसन्न करावें, व त्यापासून नूतन कित्येक शस्त्रास्त्रें संपादावीं म्हणून, तप करावें या हेतूनें, काम्यक वनांतून निघाला, तों हिमवान् पर्वताचीं गंधमादन आदिकरून शृंगें, उल्लंघून यावर आला. येथें इंद्र वृद्ध तपस्व्याचें रूप धरून बसला होता, त्यास अर्जुनानें पाहिलें, आणि वंदन करीत आहे तों, ब्राह्मण म्हणाला, तुझी काय इच्छा आहे? अर्जुन म्हणाला, मला इंद्रानें प्रसन्न होऊन शस्त्रास्त्रें द्यावीं, अशी माझी इच्छा आहे. म्हणून मी येथें तप करण्यास आलों आहें. त्यावरून इंद्रानें आपलें रूप प्रकट करून अर्जुनास दर्शन दिलें. ( भार० व० अ० ३७ ).

नंतर इंद्र, अर्जुनास म्हणाला कीं, तूं प्रथम येथें शिवाचें आराधन कर, आणि त्याचा प्रसाद संपाद. पुढें मी आपलीं शस्त्रास्त्रें तुला देईन, असें बोलून इंद्र अंतर्धान पावला असतां, अर्जुनानें तपास आरंभ केला. चार महिने झाल्यावर महादेवांनीं पाहिलें कीं, आतां अर्जुनाकडे जावें. इतक्यांत त्यांनीं अंतर्दृष्टीनें पाहिलें तों, मूक ना० दानव वराहरूप धारण करून अर्जुनाकडे जात आहे. तेव्हां त्यापासून अर्जुनास पीडा होऊं नये, व अर्जुनासहि प्रथमतः आपलें रूप ओळखतां येऊं नये, म्हणून किरातवेशानें या पर्वतावर प्रकट झाले, तों तो कपटी असुर, अर्जुनासमीप पोहोंचला असें पाहून, किरातरूपधारी शिवानें त्यावर बाण सोडिला. इकडून त्याच संधींत अर्जुनाचाहि बाण त्यावर गेला. त्यांतील प्रथम बाणानेंच तो असुर प्राणास मुकला. परंतु त्यानिमित्त, अर्जुनानें शिवास न ओळखल्यामुळें किराताशीं बराच वाद केला. त्याचीं उत्तरें किरातानें सम्यक दिलीं असतांहि, अर्जुनाचें व किराताचें युद्ध प्रवृत्त झालें. त्यांत अर्जुनानें किरातावर सोडलेलीं सर्व अस्त्रें, त्यानें सर्व ग्रासिलीं, व गांडीव धनुष्यहि ग्रासिलें. असें पाहून, अर्जुनास आश्चर्य झालें. तथापि त्यानें धैर्य धरून, किराताशीं बाहुयुद्ध आरंभिलें, त्यांतहि तो जर्जर होऊन, त्याचें सर्वांग रुधिरानें भरलें. मग, आपला विनाशकाळच उपस्थित झाला असावा, असें त्यास वाटून, त्यानें आराध्यदेवतेची नेत्र झांकून मनोमय पूजा आरंभिली, व ती समाप्त होतांच, नेत्र उघडून पाहूं लागला तों, मनोमय पुष्पें, जीं इष्टदेवतेस वाहिलीं होतीं, तीं सर्व किराताच्या मस्तकावर आहेत. त्यावरून अर्जुन चकित होऊन, आपल्या मनाशीं म्हणाला कीं, अरे, हा साक्षात् भगवान् शंकर असतां, मी त्यास न जाणून, हा त्याच्याशीं केवढा अन्याय केला, असें म्हणून त्यानें, किरातवेषधारी शिवास साष्टांग नमस्कार घातला. शिवानेंहि तें किरातरूप टाकून, त्यास आपल्या दिव्यरूपाचें दर्शन दिलें, आणि आपल्या अमृतमय हस्तानें त्याच्या शरीरास स्पर्श करून, त्यास रुधिरादि क्षतरहित केलें व आलिंगन देऊन, आपलें पाशुपतास्त्र त्यास देऊन, म्हणाला कीं, तूं यापुढें मोठा अजिंक्य वीर होशील. इतकें बोलून, त्यानें आपलें दिव्य स्वरूप अंतर्हित केलें. ( भार० वन० अ० ३८ ).

अर्जुनास, शिवाचें दर्शन, स्पर्शन, व वरदान, इत्यादिक झालेलें पाहून, तो आपणास कृतार्थ मानून आनंदांत मग्न आहे तों, तेथें लोकपाल प्रकट झाले, व त्यांनीं त्यास, आपआपलीं अस्त्रें दिलीं, तीं अशीं कीं, यमानें दंड, वरुणानें पाश, कुबेरानें कौबेरास्त्र, आणि इंद्रानें मातली सारथ्यास आज्ञा करून, आणविलेला रथ. त्यांत अर्जुनास बसवून, लागलेंच स्वलोकीं नेलें. ( भार० वन० अ० ४२ ). इंद्रानें अर्जुनास स्वलोकीं नेल्यावर, त्यास तेथें मनुष्यमानाचीं पांच वर्षें ठेवून घेतलें, व नानाविध शस्त्रास्त्रें त्यास देऊन, चित्रसेन गंधर्वाकडून, नृत्य व गायन, या दोन कलांमध्येंहि त्याला निष्णात करविलें. (भार० वन० अ० ४४ ).

नंतर स्वर्गांगनांचाहि भोग त्यास घडावा म्हणून, इंद्रानें त्याकडे जाण्यास उर्वशीस सांगितलें. त्याप्रमाणें ती त्याकडे गेली. परतु इंद्राच्या स्वर्गांगना आपल्या सर्व माता होत, असा याचा निश्चय होता, म्हणून त्यानें उर्वशीनें दिलेला शापहि ग्रहण केला. परंतु आपल्या निश्चयापासून ढळला नाहीं. ( भार० वन० अ० ४६ ).

पुढें इंद्र त्यावर प्रसन्न होऊन, त्यानें त्याचा वस्त्रभूषणादिकांनीं संतोष करून आपल्या रथांत बसविलें, आणि त्याचे युधिष्ठिरादि बंधु, तीर्थयात्रा करीत गंधमादन पर्वतावर आले होते, तेथें यास मातलीकडून पोहोंचतें करविलें. ( भार० वन० अ० १६४ ).

२– भारतवर्षीय तर्थि, व दुसरा एक पर्वत.

**इंद्रकौशिक**–एक ब्रह्मर्षि, व त्याचें कुल. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**इंद्रजानु**–अकरा कोटी वानरांचा स्वामी, असा रामसेनेंतील एक वानर.

**इंद्रजित्**–लंकाधिपति रावणास मंदोदरीपासून झालेला पुत्र. यानें, जन्मतांच मेघासारखी गर्जना केल्यामुळें, यास मेघनाद असें नांव ठेविलें होतें. ( अध्यात्म रा० उत्तर० स० २ ). मेघनाद हा, स्वभावतः भयंकर असे. यानें, वयेंकरून मोठा झाल्यावर, शुक्राचार्यांच्या साह्यानें निकुंभिला येथें, अश्वमेध, अग्निष्टोम, बहुसुवर्णक, राजसूय, गोमेध, वैष्णव, आणि माहेश्वर, असे सात यज्ञ केले, व शिवप्रसादानें दिव्य रथ, धनुष्यबाण, शस्त्रें, तामसी माया, इत्यादिक प्राप्त करून घेतलीं. यानें, आणखीहि कित्येक यज्ञ करावे असें मनांत आणिलें होतें. परंतु रावण देवांचा द्वेषी असल्यामुळें त्याला देवांस हविर्भाग देणें इष्ट नव्हतें. त्यामुळें त्यानें याचा निषेध केला असतां, यास स्वस्थ बसणें भाग पडलें. ( वा० रा० उत्तर० स० २५ ).

रावण, देवांस जिंकण्याकरितां, स्वर्गी गेला असतां, तेथें देवांचा व राक्षसांचा, घोर संग्राम झाला; त्यांत सुमाली ( रावणाचा मातामह ) मरण पावल्यामुळें राक्षसांचा पराजय होतो, असें दिसूं लागलें, तेव्हां त्वरेनें मेघनाद पुढें झाला तों, इंद्रपुत्र जयंत आपल्या गोमुख सारथ्यासह, रथांत बसून यापुढें आला. परंतु तो पराभव पावून माघारा फिरतांच, स्वतः इंद्रानें यावर चाल केली, असें यानें पाहून, हा स्वमायेनें गुप्त झाला, व इंद्रास आपल्या शस्त्रास्त्रांनीं जर्जर करून, बद्ध केलें. तेणेंकरून रावण हर्षित होऊन, जयशब्द करीत, त्यास घेऊन लंकेस गेला. इकडे इंद्र गेला असें पाहून संपूर्ण देव चिंताक्रांत होत्साते ब्रह्मदेवास शरण गेलें, त्यावरून ब्रह्मदेव, लंकेमध्यें मेघनादास प्रत्यक्ष होऊन, म्हणाले कीं, इंद्रास सोडून दे. तों ऐकून हा म्हणाला, मला अमरत्व द्यावें, म्हणजे यास सोडितों. ब्रह्मदेवानें उत्तर केलें, साकार पदार्थ, तितका नाशवंत आहे, यास्तव हें अमरत्व त्यास दुर्लभ असल्यामुळें, दुसरें कांहीं माग. त्यावरून, मी अग्नींत जेव्हां हवन करीन, तेव्हां त्यांतून अश्वांसहित दिव्य रथ निघत जावा, आणि त्यावर जोंपर्यंत मी आहें, तोंपर्यंत विजयी व अमर असावें, असा वर द्यावा असें म्हणतांच, ब्रह्मदेवांनीं तथास्तु म्हटलें, आणि इंद्रास सोडवून आणून, त्यास त्याच्या पदावर स्थापिलें. त्या दिवसापासून मेघनादास, इंद्रजित् असें नांव पडलें. ( वा० रा० उत्तर० स० २९–३० ).

रावणानें सीतेस लंकेंत आणिल्यावर, तिच्या शुद्धीसाठीं, मारुति तेथें गेला असतां, त्यानें, अशोकवनिकेचा भंग करून, अनेक राक्षस, व रावणाचा कनिष्ठ पुत्र अक्ष, यांस मारिलें. तेणेंकरून रावणास झालेलें दुःख दूर करावें म्हणून, हा, त्याकडे गेला, व त्यास, ब्रह्मास्त्रानें बद्ध करून रावणसभेस घेऊन आला. ( वा० रा० सुंदर० स० ४२ ).

सीताशुद्धि करून, मारुति किष्किंधेस परत गेल्यावर, वानरसेनेसहित रामचंद्र लंकेस आला असतां, युद्धप्रसंग उपस्थित होऊन, प्रथम दिवशीं हाच युद्धास उभा राहिला. तेव्हां अंगद पुढें होऊन, त्यानें याशीं अनिवार युद्ध केलें. त्यांत हा, अत्यंत श्रांत झाल्यामुळें, एकाएकीं अंतर्धान पावून रामसैन्यावर शस्त्रास्त्रांची वृष्टि करूं लागला, आणि कांहीं वेळपर्यंत स्तब्ध राहून रात्र होतांच, रामलक्ष्मणांस नागपाशानें बद्ध करून, सर्व वानरांस शरवृष्टीनें मूर्च्छित करीत होत्साता लंकेस परतला. (वा० रा० युद्ध० स० ४५).

पुढें देवांतकनरांतकादि रावणपुत्र, तसाच कुंभकर्ण, महापार्श्व, आणि महोदर, हे युद्धांत मरण पावल्यावर, रावणास अतिशय दुःख झालें. त्या काळीं, हा, त्याचें सांत्वन करून युद्धास निघाला, तों प्रथम निकुंभिलेस जाऊन, तेथें यानें आपलीं शस्त्रास्त्रें अभिमंत्रित केलीं. नंतर युद्धभूमिवर येऊन, रामसेनेस गुप्तरूपानें ताडन करूं लागला. त्यांत गंधमादन, गज, नल, मैंद, जांबवान्, नील, सुग्रीव, ऋषभ, अंगद, द्विविद, वेगदर्शी, हरिलोमा, विद्युद्दंष्ट्र, सूर्यानन, पावकाक्ष, केसरी, ज्योतिर्मुख आणि हनुमान्, इत्यादिक प्रमुख प्रमुख वानरांस, अतिशय पीडित करून, यानें भूमीवर मूर्च्छित पाडिलें, व सदुसष्ट कोटि वानर एका प्रहरांत मारून, रामलक्ष्मणांसहि मूर्च्छित करीत होत्साता, हा लंकेस रावणाकडे हर्षानें परतला. ( वा०रा०युद्ध०स०७३).

नंतर मकराक्ष युद्धास जाऊन, तोहि मरण पावला. तेव्हां, रावणानें यास पुनः युद्धास पाठविलें, त्या काळीं हा, नित्याप्रमाणें निकुंभिलेस जाऊन, रथांत बसून, रामसैन्यावर आला, व त्यास यानें अतिशय पीडा दिली. तिच्या योगानें ते सर्व व्यथित आहेत, तों यानें, मायिक सीता निर्माण करून, व ती मुखानें राम राम असा दीन शब्द करीत आपल्या रथांत आहे, असें सर्वांस दाखवून, ते पाहत असतां, तिचा वध केला. तें कृत्य सुग्रीवादिकांस सत्यच वाटून, ते शोकाकुलित झाले असें जाणून, आनंदाची गर्जना करीत हा लंकेस गेला. ( वा० रा० युद्ध० स० ८१ ).

इकडे बिभिषण, सुग्रीवादिकांचें सांत्वन करीत म्हणाला कीं, सीतेचा वध वास्तविक झाला नाहीं. ही

सर्व कृति, जी इंद्रजितानें तुम्हांस दाखविली, ती आसुरी माया आहे. असें त्यांचें समाधान केल्यावर, ते सर्व स्वस्थ होत आहेत, तों इंद्रजित् निकुंभिलेस गेला, आणि ब्रह्मदत्त वराप्रमाणें, तेथें त्यानें हवन आरंभिलें. त्यांत कोणाचा प्रवेश होऊन, त्यास विघ्न होऊं नये, अशी व्यवस्था जरी त्यानें जागोजाग राक्षसांची मंडलें स्थापून केली होती, तरी तें वृत्त विभीषणास कळलें, म्हणून त्यानें रामाची आज्ञा घेऊन, मोठ्या वानरसमुदायासहित लक्ष्मणास तिकडे पाठविलें, व मागून आपणहि गेला. नंतर मारुतिप्रमुख वानरांस, त्यानें असें सुचविलें कीं, जर हा यज्ञ, याचा शेवटास गेला, तर हा अजिंक्य होईल. यास्तव त्वरा करून, तुम्ही या यज्ञाचा विध्वंस करा. त्यावरून त्यांनीं, आसमंताद्भागीं संरक्षणास असलेल्या सर्व राक्षसांस मारून, यज्ञाचा भंग केला. तथापि याचा यज्ञ पूर्ण होत आला होता, म्हणून यानें, इतका नाश झाला तरी, तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. परंतु वानरांनीं, त्याच्या शरीरावर अनेक प्रहार करून, अग्निहि पाषाणादिकांच्या वृष्टीनें छिन्न केला. तेव्हां इंद्रजित् निरुपाय होऊन क्रोधानें उठला, व वानरांस मारूं लागला, आणि बहुतांस पीडित करून, त्याचा तेथें एक अदृश्य होण्याचा वटवृक्ष होता, तिकडे तो जाऊं लागला; परंतु विभीषणानें, मारुति इ० कांस, त्यास तिकडे जाऊं देऊं नका, असें सुचविल्यावरून ते यास मध्यें आडवे होऊन जाऊं देईनात, त्यावरून यानें जाणलें कीं, माझ्या गुप्त हवनस्थलाचें, व वटवृक्षादिकांचें, अभिज्ञान विभीषणानें शत्रूस करून दिलें, यांत संशय नाहीं. अस्तु, तस्मात् प्रथमतः आपल्यास हाच वध्य होय. असें म्हणून, विभीषणाचा धिक्कार करून त्याची यानें निर्भर्त्सना आरंभिली. ती अशी कीं, हे विभीषणा, तूं लंकेंत उत्पन्न होऊन ल्हानाचा थोर झालास, व युद्धप्रसंगीं राक्षसांचा स्वकीय पक्ष सोडून शत्रूस शरण गेलास, तूं माझ्या पित्याचा भ्राता प्रत्यक्ष असल्यामुळें, माझा पितृव्य [ चुलता ] असून, मी तुला पुत्राप्रमाणेंच असतां, मशीं द्रोह करितोस, यावरून या भूमंडळांत, तुजसारिखा दुसरा कोणी पापी नसेल. विभीषण म्हणाला, तुम्ही सर्व राक्षस दुष्ट, व अधर्मी आहां, म्हणून मी तुमचा पक्ष सोडला. इत्यादि प्रकारें उभयतांचें वरेंच भाषण झालें, इतक्यांत लक्ष्मण पुढें होऊन, त्यानें याशीं युद्ध आरंभिलें. त्यांत लक्ष्मणानें प्रथमतः याचा सारथि मारिला, म्हणून सारथ्य संभाळून हा लक्ष्मणाशीं युद्ध करीत आहे, तों प्रमाथी, रभस, शरभ, आणि गंधमादन, या चार वानरांनीं याच्या रथाचे चारी अश्व मारिले. तेव्हां इंद्रजित् दुसऱ्या रथांत बसून आला असें पाहून विभीषणानें लक्ष्मणास सुचविलें कीं, याशीं बहुत सावधपणानें युद्ध करावें. असें त्यानें लक्ष्मणास केलेलें प्रोत्साहन इंद्रजितानें ऐकून क्रोधानें त्यावर शक्ति सोडिली, ती लक्ष्मणानें मध्येंच छेदिली, म्हणून दुसरी यमदत्त शक्ति त्यावर टाकिली, तिचाहि लक्ष्मणानें छेद केला असतां, लक्ष्मणाचें व याचें तीन अहोरात्र भयंकर युद्ध झालें. शेवटीं इंद्रजित् मरत नाहीं असें पाहून लक्ष्मणानें ऐंद्रास्त्र हातांत घेतलें, आणि प्रतिज्ञा केली कीं, जर श्रीराम, धर्मात्मा आणि सत्यप्रतिज्ञ असेल, तर या बाणानें इंद्रजित् मरण पावो. असें म्हणून तो त्यावर सोडतांच, याचें किरीटकुंडलयुक्त मस्तक तत्काळ तुटून पृथिवीवर पडलें. ( भार० वन० अ० २८८-२८९ ). तें पाहतांच देवांस व महर्षींस आनंद होऊन, त्यांनीं लक्ष्मणावर पुष्पवृष्टि केली. इंद्रजित् मरण पावतांच, शेष राक्षसांतून कांहीं राक्षस वानरांनीं मारिलें, व कांहीं लंकेंत पळून जाऊन, त्यांनीं इंद्रजिताच्या मरणाचें वृत्त रावणास कळविलें. इकडे इंद्रजिताचें मस्तक रामास दाखवावें म्हणून वानरांनीं सुवेलाचलीं नेलें. इ० ( वा० रा० युद्ध० स० ८६-९२ ). इंद्रजितास सुलोचना, या नांवाची स्त्री होती. २-दनुपुत्र एक दानव.

**इंद्रजिव्ह**-रावणपक्षीय राक्षस. (वा० रा० सुंद० स० ६).

**इंद्रतापन**-वरुणलोकांतलि असुरवि०

**इंद्रदमन** -सोमवंशोत्पन्न एक राजर्षि, ( भार० शांति० अ० २३५ ).

**इंद्रदेश**-विदेहकुलोत्पन्नांचा इंद्रपर्वतासमीपचा देश. याची मुख्य नगरी सांकाश्या व तेथें पूर्वीं सुधन्वा राजा होता, त्यास जिंकून हा देश विदेह राजानें आपणाकडे घेतला होता. ( ३ सुधन्वा श० पहा ).

**इंद्रद्युम्न**-एक राजर्षि. हा स्वर्गांतून पतन पावला असतां, मार्कंडेय ऋषीच्या आश्रमीं येऊन त्यास पुसूं लागला कीं, आपण चिरंजीवी आहां, तस्मात् मला जाणतच असाल. त्यांनीं उत्तर केलें, मी तुला जाणत नाहीं; परंतु हिमवान् पर्वतावर प्रावारकर्णनामा उलूक आहे, तो मजपेक्षां पुरातन असल्यामुळें, कदाचित् तो तुला जाणत असल्यास, त्यास विचार. त्यावरून या राजानें अश्वाचें रूप धारण करून मार्कंडेयास आपल्या पाठीवर बसविलें, आणि प्रावारकर्णाकडे येऊन त्यास तोच प्रश्न केला. त्याचें त्यानें असें उत्तर सांगितलें कीं, इंद्रद्युम्न नामें सरोवराच्या कांठीं नाडीजंघनामा बक मजपेक्षां

पुरातन आहे, तो तुला जाणत असेल तर पहा; मी तुला जाणत नाहीं. असें ऐकतांच त्यासहि राजानें समागमें घेतलें, व नाडीजंघाकडे तो आला. तेथेंहि त्यास असाच प्रश्न राजानें करितांच, त्यानें सांगितलें कीं, या सरोवरांत अकूपार ना० मजपेक्षांहि अति पुरातन कच्छप ( कांसव ) आहे, त्यास मी हांक मारितों. तो तुला जाणत असेल तर न कळे. असें म्हणून त्यानें त्यास हांक मारिली. तो बाहेर आल्यावर, मला तूं जाणतोस काय ? म्हणून राजानें प्रश्न केल्यावरून, अकूपार म्हणाला, होय, मी तुला जाणतों. नंतर त्यानें सर्वांस सांगितलें कीं, या राजानें मोठमोठे बहुत यज्ञ केले, व त्या यज्ञांत ज्या दक्षिणा दिल्या, त्यावेळीं सोडलेल्या उदकांचेंच हें सरोवर झालें. असा हा राजा अत्यंत पुण्यवान् आहे. इतकें बोलतांच विमान आलें. तें पाहून राजानें मार्कंडेय ऋषि, व उलूक, यांस स्वस्थळीं पोहोंचवून, आपण स्वर्गास गमन केलें. यांत तात्पर्य, जो कोणी आपल्या गुणांची आपण स्तुति न करितां, ज्याची प्रशंसा दुसरे करितात, त्यासच महत्त्व प्राप्त होतें, अन्यथा लघुत्व येतें. ( भार० वन० अ० १९९ ).

२–स्वायंभू मन्वंतरांतील अगस्त्य ऋषीनें तूं गजयोनि पावशील, म्हणून ज्यास शाप दिला होता, तो राजा. हा पांड्य देशाचा अधिपति होता. याची गजयोनींतून मुक्तता, हरि ना० विष्णूचा अवतार चवथ्या तामस मन्वंतरांत झालेला, त्यानें केली होती. ( ३ हरि श० पहा ).

३–विदेहवंशीय एक जनक. याचा पुत्र ऐंद्रद्युम्नि, हा राजा वंशावळींत नाहीं.

४–पांडवांसमागमें द्वैतवनांत एक ऋषि होता तो.

५–एक सरोवरवि० ( १ इंद्रद्युम्न श० पहा ).

**इंद्रपर्वत**–इंद्रदेशसंबंधीं पर्वत. यावर पांडवांच्या वेळेस किराताधिपति सात राहात असत. ( भार० सभा० अ० ३० ).

**इंद्रप्रमति** अ० **इंद्रप्रमदि**–एक ब्रह्मर्षि. ( ३ वासिष्ठ श० पहा ). यास कपिंजल्य, त्रिमूर्ति अशीं नामांतरें असून, याचा पुत्र भद्र ना० ऋषि होता.

**इंद्रप्रस्थ**–पुरवि० द्रौपदीचें स्वयंवर होऊन, पांडव द्रुपदपुरांत प्रकट झाल्यावर, धृतराष्ट्रानें त्यांस हस्तिनापुरीं आणविलें, आणि आपल्या पुत्रांचा व त्यांचा, कलह वाढूं नये म्हणून त्यांस अर्ध राज्य देऊन, खांडवप्रस्थ ना० वनांत नगर वसवून रहावयास सांगितलें. त्यावरून पांडव येथें आले, आणि कृष्णद्वैपायन व्यासांनीं सांगितलेल्या मुहूर्तावर तेथें नगर स्थापिलें. तें अति सुशोभित झालें म्हणून त्यास इंद्रप्रस्थ अ० शक्रप्रस्थ असें नांव ठेविलें (भार० आदि० अ० २०७). मयासुरनिर्मित सभा यांतच होती, व राजसूययज्ञ याच स्थळीं झाला. हें नगर हस्तिनापुरापासून किती दूर होतें, तें ग्रंथांत आढळत नाहीं; परंतु कुरु देशाची राजधानी जशी हस्तिनापुर, तसेंच हेंहि नगर होतें.

**इंद्रबाहु**–एक ब्रह्मर्षि. ( २ अगस्त्य श० पहा ).

**इंद्रमाली**–उपरिचर राजास नामांतर. ( २ उपरिचर वसु श० पहा ).

**इंद्रवर्मा**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. याजवळ अश्वत्थामा नांवाचा एक नामांकित गज होता.

**इंद्रवाह**–( सू० वं० ) इक्ष्वाकु राजाचा पौत्र, व विकुक्षि राजाचा पुत्र, जो ककुत्स्थ त्यास हें नामांतर होतें. (ककुत्स्थ श० पहा).

**इंद्रशत्रु**–हें नांव मुख्यत्वेंकरून वृत्रासुरास आहे.

**इंद्रसावर्णि**–चालू श्वेतवाराह कल्प; याच्या अंतीं होणारा चौदावा मनु तो. यास विष्वक्सेन असेंही म्हणतील. उरु, गंभीरबुद्धि, इ० यास पुत्र होतील. याच्या कालसत्तेस इंद्रसावर्णि मन्वंतर असें नांव चालेल, व त्यांत अग्नि, बाहु, शुचि, शुद्ध, मागध, इ० सप्तर्षि होऊन, पवित्र, चाक्षुष, इ० देव, आणि त्यांचा स्वामी स्वर्गांत शुचि नांवाचा इंद्र होईल. तसाच सत्रायण ऋषीपासून, वितानेच्या ठायीं, बृहद्भानु नामेंकरून विष्णूचा अवतार होईल. हें मन्वंतर सरतांच, ब्रह्मदेवाची रात्र प्रवृत्त होऊन, कल्प सरेल. ( भाग० अष्टम० अ० १३ ).

**इंद्रसेन**–धर्म ऋषीस भानु ना० स्त्रीपासून झालेला पुत्र जो देवऋषभ, त्याचा हा पुत्र. ( देवऋषभ श० पहा ).

२–( सू० वं० ) नरिष्यंतकुलोत्पन्न कूर्च ना० राजाचा पुत्र, याचा पुत्र वीतिहोत्र.

३–( सो० वं० ) पूरुकुलांत जन्मलेल्या अजमीढपुत्र नीलवंशांतील मुद्गल राजाचा पौत्र, ब्रह्मिष्ठाचा पुत्र. याचा पुत्र विंध्याश्व राजा.

४–नल राजास दमयंतीपासून झालेला पुत्र. ( ५ नल श० पहा ).

५–सुतलांतील दैत्यवि० ( भाग० दशम० अ० ८५ ).

६–प्लक्षद्वीपांतील पर्वत.

७–युधिष्ठिराचा सारथि.

**इंद्रसेना**–मुद्गल ऋषीची स्त्री नारायणी, तिलाच म्हटलेलें आहे.

२–नल राजास दमयंतीपासून झालेली कन्या.

**इंद्रस्पृक**–ऋषभ देवाच्या नऊ खंडाधिपति पुत्रांतील एक. याचा खंड याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२–भरतवर्षसंबंधीं जे नऊ खंड आहेत, त्यांतील आठवा.

**इंद्राणी**–इंद्राची स्त्री ती, हें नांव साधारण आहे. आजपर्यंत साहा इंद्र होऊन गेले, त्यांचीं नांवें जशीं पृथक् पृथक् आढळतात, तशीं इंद्राणीचीं आढळत नाहींत; तरी त्यांचीं पृथक् पृथक् नांवें असावींत असें वाटतें. कारण सांप्रतच्या इंद्राणीस शची असें नांव आहे.

२–सप्त मातृगणांतील साहावी.

**इंद्रोतःशौनक**–एक ऋषि. जनमेजय ना० एका राजास ब्रह्महत्या घडली असतां, त्यानें तिची निवृत्ति व्हावी, म्हणून आपल्या पुरोहितास प्रार्थिलें; परंतु त्यानें तें अमान्य केल्यामुळें, या ऋषीस राजा शरण आल्यावरून, यानें त्याकडून यज्ञ करवून, व त्यास पुनीत करून, स्वर्गी पाठविलें. ( भार० शांति० अ० १५२).

**इध्म**–बारा तुषित देवांतील एक. ( तुषित श० पहा ).

**इध्मजिव्ह**–प्रियव्रत राजर्षीच्या दाहा पुत्रांतील दुसरा. हा, इक्षुरसोदानें वेष्टित जें प्लक्षद्वीप, त्याचा स्वामी होता. यानें आपल्या द्वीपाचे वर्षसंज्ञक सात भाग करून शिव, यवया, सुभद्र, शांत, क्षेम, अमृत आणि अभय, या सात पुत्रांस क्रमानें त्यांचींच नांवें त्यांस देऊन, विभागून दिले होते.

**इध्मवाह**–अगस्त्यपुत्र दृढस्यु, त्यासच हें नामांतर. ( दृढस्यु श० पहा ).

**इरा**–कश्यप ऋषीची स्त्री इला, तीसच हें नामांतर.

**इरागर्भशिरा**–दनुपुत्र एक दानव.

**इरावती**–अर्जुनपौत्र परीक्षित् राजा, त्याची स्त्री. ही विराटपुत्र उत्तराची कन्या होय.

२–भारतवर्षीय नदी. ( भार० कर्ण० अ० ४४ श्लो० ३२ ).

**इरावान्**–अर्जुनास, उलूपीपासून झालेला पुत्र. हा भारती युद्धांत पांडवांकडे होता. ( भार० भीष्म० अ० ४५ ).यास दुर्योधनपक्षीय आर्षशृंगी राक्षसानें मारिलें. ( भार० भीष्म० अ० ९० ).

**इल**–वैवस्वत मनूचा, कुत्सित पुरुषत्व पावलेला प्रथम पुत्र. हा, एकदां अश्वारूढ होऊन, वनांत मृगयेस गेला असतां, चुकून शरवण ना० वनांत गेला; परंतु तेथें जो पुरुष येईल, तो स्त्रीत्व पावेल असा पार्वतीचा शाप असल्यामुळें, बसण्याचा चंद्रप्रभ ना० अश्व, आणि सैन्य यांसहवतमान स्त्रीत्वास पावला. त्यामुळें हा तेथें ससैन्य भ्रमण करीत असतां, सोमपुत्र बुधानें यास पाहिलें. तेव्हां त्यानें, वनाच्या बाह्यप्रदेशीं, एक दिव्य आश्रम निर्माण करून, यास असें म्हणूं लागला कीं, हे स्त्रिये, होमाची वेळा झाली असून, तूं आश्रमांत कां येत नाहींस ? पतिव्रता स्त्रियांनीं, सूर्यास्तकालीं, आश्रम सोडून कधींहि बाहेर जाऊं नये. हा सदाचार तूं कसा जाणत नाहींस ? इत्यादिक भाषणांनीं, यास, मी पूर्वीचा कोण, ही स्मृति न राहिल्यामुळें, मी स्त्री असून ? याचीच धर्मपत्नी आहे, असा मोह पडला. त्यामुळें हा, त्या आश्रमांत जातांच, बुधानें यास वरिलें, व हाहि त्यांशीं संगत झाला असतां, अल्पच काळांत बुधापासून, यास पुरूरवा ना० पुत्र झाला. तोच सोमवंशीय राजांचा मूळ पुरुष.

हा, वैवस्वत मनूचा कुत्सित पुत्र असें वर लिहिलें आहे, त्याविषयींचा इतिहास असा.–वैवस्वत मनूस बराच कालपर्यंत पुत्र नव्हता, म्हणून त्यानें मित्रावरुणांच्या उद्देशानें पुत्रकामेष्टि करविली; परंतु त्याच्या श्रद्धा ना० स्त्रीनें, मला कन्येची इच्छा आहे, यास्तव होत्यास सांगितलें होतें कीं, कन्या होईल असें करा. त्यावरून त्या इष्टींत त्यानें कन्याप्रसवकारक मंत्र उच्चारून अग्नींत हवन केलें. त्यामुळें राजास कन्या झाली. असें पाहून मनूनें वसिष्ठ ऋषीस असें कां झालें म्हणून विचारिलें असतां, त्यांनीं सांगितलें कीं, होत्यानें केलेला मंत्रोच्चार, त्याचें वैपरीत्य यास कारण आहे. अस्तु, आतां तुला पुत्रच पाहिजे असेल, तर या कन्येस मी पुरुषत्व आणीन. असें म्हणून, वसिष्ठांनीं, आदिपुरुषाच्या उद्देशानें त्याची स्तुति केली, त्यावरून त्या कन्येस पुरुषत्व प्राप्त झालें असतां, त्यासच इल असें नांव ठेविलें होतें. हा इल मोठा होत असतां, वैवस्वत मनूस इक्ष्वाकुप्रभृति दाहा पुत्र झाले होते.

इल राजा, शरवणांत जाऊन स्त्रीत्व पावला, हें इक्ष्वाकु आदिकरून याच्या भ्रात्यांस विदित नसल्यामुळें, त्यांनीं याची बहुत कालपर्यंत येण्याविषयींची मार्गप्रतीक्षा केली; परंतु तो येत नाहीं असें पाहून, ते त्याच्या शोधास निघाले, आणि बहुत भूमि शोधून, याचा ठिकाण लागेना म्हणून फिरत फिरत शरवणवनासमीप आले, तों त्यांनीं तेथें याचा बसण्याचा चंद्रप्रभ ना० अश्व एकाएकीं अश्विनी झालेला पाहिला; त्यावरून ते सर्व चकित होऊन, असें होण्यास कारण काय असावें त्याचा शोध करूं लागले असतां,

त्यांस त्या कारणाचा शोध लागला. तो असा कीं, पार्वतीच्या शापानें असें कृत्य घडून आलें आहे.

नंतर त्या सर्वांनीं, हा पूर्ववत् व्हावा म्हणून, तेथें शिवाराधन आरंभिलें, त्यांत शिव प्रसन्न होऊन म्हणाले कीं, पार्वतीचा शाप समूळ मिथ्या होऊन यास पुरुषत्व येईल असें कधींहि होणार नाहीं. परंतु तुमच्या तपानें मी संतुष्ट झालों आहें, म्हणून यास एक मासपर्यंत पुरुषत्व, आणि एक मासपर्यंत स्त्रीत्व, असें प्राप्त होत जाईल. इतकें बोलून इल राजास पूर्ववत् पुरुष करून, शिवांनीं इक्ष्वाकुप्रभृति याचे भ्राते त्यांच्या स्वाधीन यास केलें, व आपण अंतर्धान पावले.

इल राजास, सुद्युम्न असें म्हटललें आहे, व पुरुषत्वकाळीं उत्कल, गये, आणि विमल, असे तीन, पुत्र झाले होते. ( भाग० नवम० अ० १ ).

**इलविल**–सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न शतरथ राजास नामांतर.

**इलाविला**–वैवस्वत मन्वंतरांतील विश्रवा ऋषीच्या स्त्रियांतील एक. हिला झालेला पुत्र तोच ऐडविड अ० ऐलविल अशा नांवानें प्रख्यात असून, पित्याच्या संबंधानें त्यासच वैश्रवण असें नांव होतें.

**इला**–वैवस्वतमनूची कन्या. ( इल श० पहा ).

२–उत्तानपादपुत्र ध्रुव त्याची दुसरी स्त्री, व वायूची कन्या, हिला एकच उत्कल ना० पुत्र होता.

३– इरा शब्द पहा.

४– वसुदेवाच्या स्त्रियांतील एक.

**इलावर्त**–ऋषभ देवाच्या शतपुत्रांत, जे नऊ पुत्र खंडाधिपति होते, त्यांतील एक. याचा खंड याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२– भरतवर्षांत जे नऊ खंड आहेत, त्यांतील एक.

**इलावृत्त**–प्रियव्रत राजाचा पौत्र, व आग्नीध्राचा पुत्र. याची स्त्री मेरूची कन्या लता ती होय. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध असून, हा तेथील अधिपति होता.

२– जंबुद्वीपाच्या नऊ वर्षांतलि एक वर्ष तो. हा मेरूच्या आसमंताद्भागीं अति निकट समचतुरस्राकृतीनें वसलेला असून, ही आकृति उत्पन्न करणारे, याच्या भोंवते नील, निषध, माल्यवान् आणि गंधमादन, असे चार महापर्वत आहेत.

**इलास्पद**–भारतवर्षीय तीर्थ.

**इल्वल**–हिरण्यकशिपूचा पौत्र, ऱ्हादास धमनीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

२–तेरा सैंहिकेयांतील पांचवा. हा, आणि याचा सहोदर वातापी, असे एकत्र होऊन नेहेमीं ब्राह्मणांस मारीत असत. त्याचें कारण असें होतें कीं, एकदां इल्वलानें, इंद्रतुल्यपराक्रमी पुत्र मला द्यावा, म्हणून कोणी एका ऋषीची प्रार्थना केली. तिचा त्यानें अंगीकार न केल्यामुळें, यानें, ब्राह्मणमात्रांशीं द्वेष धरिला, आणि त्यांस, आदरातिथ्यमिषानें मारूं लागला. तो असा कीं, कोणी ब्राह्मण आला म्हणजे, त्याचा यानें मनुष्यरूपानें आदर करून अर्चन करावें. नंतर मेष झालेल्या वातापीचा पाक करून, त्यास भोजन द्यावें. पुढें ब्राह्मण जाऊं लागला असतां, त्याचें शरीर विदारून वातापीनें बाहेर येतांच, ब्राह्मण तत्काळ मरण पावावा, अशा प्रकारें यानें सहस्रावधि ब्राह्मण मारिले.

एकदां अगस्त्य ऋषीस द्रव्याची अपेक्षा होती म्हणून, तो अनुक्रमानें श्रुतर्वा, ब्रध्नश्व, आणि त्रसद्स्यु, या तिघां राजांकडे गेला. परंतु तेथे द्रव्य न मिळाल्यामुळें, इल्वल हा अति धनवान् आहेसें कळल्यावरून त्यांसहित तो याकडे आला. त्यास पाहून, नित्याप्रमाणें यानें त्याचें कपटपूर्वक पूजन करून, भोजनास राहून घेतलें, आणि मेषरूप धरलेल्या वातापीच्या मांसाचा पाक करून त्यास त्रिवर्ग राजांसहित भोजन देण्यासाठीं पात्रें मांडलीं असतां, ते त्रिवर्ग राजे अगस्त्याकडे पाहूं लागले. त्यावरून अगस्त्य ऋषीनें, तेथील कपट ओळखून सर्व पाक आपण एकट्यानेंच भक्षिला, आणि वातापीस उदरांत जीर्ण केलें.

पुढें घटका झाली, दोन घटिका झाल्या, तथापि वातापी बाहेर येईना, असें पाहून, इल्वल समजला कीं, आज वातापीस मरण आलें यांत संशय नाहीं. आतां आपलाहि परिणाम असाच होईल म्हणून भयभीत होत्साता, अगस्त्यास शरण होऊन म्हणूं लागला कीं, मी अपराधी आहें; यास्तव क्षमा करून मजवर प्राणदानाचा अनुग्रह करावा, आणि काय इच्छा असेल, तिची मला आज्ञा व्हावी. त्यावरून अगस्त्य ऋषि म्हणाले कीं, तुला अभय आहे,मात्र इतकेंच कर कीं, आम्ही चवघेहि द्रव्यार्थी आहों. यास्तव तें देऊन आम्हांस मार्गस्थ कर.तेव्हां यानें,तथास्तु म्हणून,त्रिवर्ग राजांस गायी व सुवर्ण असंख्य देऊन अगस्त्य ऋषीस त्यांच्या द्विगुणित दिलें, आणि सर्वांस मार्गस्थ करून, ब्राह्मणांचा द्वेष सोडून देऊन सुखानें राहिला. यास वल्वल ना० पुत्र होता. ( भार० वन० अ० ९९ ).

**इष**-उत्तानपादवंशीय ध्रुवपुत्र वत्सर, त्यास स्वर्वीथी ना० भार्येपासून झालेल्या साहा पुत्रांतलि तिसरा.

२-उत्तम ना० मनूच्या पुत्रांतील एक.

३-वर्षांतील द्वादशमासानुक्रमानें सातवा मास. याची पूर्णिमा आश्विनी नक्षत्रानें युक्त असल्ये म्हणून, यास आश्विन असेंहि म्हटलेलें आहे. या मासांत, द्वादशादित्यांतलि त्वष्टा ना० आदित्य सूर्यमंडलावर या मन्वंतरांत प्रतिवर्षी अधिपति होत असतो, व त्यासमागमें त्या काळीं जमदग्निऋषि, तिलोत्तमा अप्सरा, धृतराष्ट्र गंधर्व, कंबल ना० नाग, शतजित् यक्ष, आणि ब्रह्मापेत राक्षस, इतके संचार करण्यास असतात. (भाग० द्वादश० अ० ११).

**इषिकहस्त**-एक ऋषि व त्याचें कुल. ( श्वेतपराशर श० पहा ).

**इषुपात्**-दनुपुत्र दानवांतील एक.

**इषुमान्**-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतान्वयांत जन्मलेला देवश्रवा, त्यापासून कंसावती भार्येच्या ठायीं जन्मलेल्या दोन पुत्रांतील दुसरा.

**इक्षु**-भारतवर्षीय इक्षुदा नदीसच नामांतर.

२-भारतवर्षीय नदी. ( २ महेंद्र श० पहा ).

**इक्षुदा**-भारतवर्षीय नदी. ( २ हिमालय श० पहा ).

**इक्षुमती**-संकाश्या नगरीसमीप असणारी भारतवर्षीय नदी. ( वा० रा० ).

**इक्षुरसोद**-सप्त महासागरांतील दुसरा. याचें प्लक्षद्वीपास वेष्टन असून, याची रुंदी त्याइतकीच दोन लक्ष योजनें आहे.

**इक्ष्वाकु**-वैवस्वत मनूच्या दहा पुत्रांतील ज्येष्ट. हा, त्याच्या ( क्षुत् ) शिंकेपासून झाला म्हणून, यास हें नांव होतें. ( भाग० ९ स्कं० अ० ६ श्लो० ४ ). ( देवीभा० ७ स्कं० अ० २ श्लो० २० ). यास, शतपुत्र होते, व त्यांत विकुक्षि, निमि, दंडक, आणि दशाश्व, हे चार अत्यंत प्रमुख होते. यानें, आपल्या सर्व पुत्रांस चोहोंदिशांकडे स्थापून, आपण मध्यें राहिला होता. तथापि विकुक्षि हा यौवराज्यावर असून, इतरहि प्रायः यासमीपच असत.

इक्ष्वाकु राजा अति प्रख्यात असून, याचें कुल सूर्यवंशांत अत्यंत प्रसिद्ध आहे. यानें, वसिष्ठापासून अध्यात्मविद्या संपादून परमपद प्राप्त करून घेतलें होतें. याच्या मागें, विकुक्षि, ज्यास शशाद असें नांव पडलें होतें, तो मुख्य राज्याधिकारी झाला होता.

---

## ई.

**ईजिक**-भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**ईडय**-आठव्या सावर्णि मनूच्या दाहा होणाऱ्या पुत्रांतील एक.

**ईश**-ईश्वर. २ महादेव. ३ ईशावास्य उपनिषत्.

**ईशान**-द्वितीयार्थक ईश्वर.

२-शाकद्वीपांतील एक पर्वत.

**ईशानकल्प**-दिवसानुक्रमानें ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील दाहावा दिवस. या कल्पारंभींच ईशानावतरण झालें होतें म्हणून यास हें नांव पडलें. (४ कल्प श० पहा).

**ईशान्यकोसल**-इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडे असणाऱ्या दोन कोसल देशांतील, ईशान्य दिशेकडे असणारा कोसल देश तो. यास उत्तर कोसल अ० काशी किंवा कांतिकोसल अशींहि नांवें आढळतात. ( भार० सभा० अ० ३० ). याची राजधानी श्रावस्ती नगरी.

**ईशावास्य**-यजुर्वेदोपनिषत्.

**ईश्वर**-जगताची उत्पत्ति, स्थिति आणि संहार करणारा मायोपाधिक परमात्मा तो.

२-ईशान्यदिग्पाल एक रुद्र. ( एकादशरुद्र श० पहा ).

३-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. हा क्रोधवश ना० असुरांशानें जन्मला होता. ( भार० आदि० अ० ६७ ).

---

## उ.

**उक्थ**-चालू मन्वंतरांतील बृहस्पतीची कन्या स्वाहा, तिचा पुत्र.

२-सामवेदास नांव. एका यज्ञविशेषासहि नांव आहे.

३-सूर्यवंशीय एक राजा. याचें नांव वंशमालिकेंत नाहीं.

**उख**-तैत्तिरीयशाखी एक ऋषि.

**उग्र**-महादेव.

२-वारुणि कवीच्या आठ पुत्रांतील कनिष्ठ.

३-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**उग्रतीर्थ**-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. (भार० आदि० अ० ६७ ).

**उग्रदंष्ट्री**-मेरूची कन्या, व आग्नीध्र राजाचा तृतीय पुत्र हरिवर्ष त्याची स्त्री. ( भाग० ५ स्कं० अ० २ ).

**उग्रमन्यु**-अर्जुनाच्या हातून मरण पावलेला, भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. (भार०कर्ण० अ०७७).

**उग्रवीर्य**-महिषासुरानुयायी एक असुर. ( २ महिषासुर श० पहा ).

**उग्रश्रवा**-लोमहर्षण ना० सूतसंज्ञक पुराणिकाचा पुत्र

तो. यास सौति अ० लोमहर्षणि असेंहि म्हणत असत.

२–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**उग्रसेन**–मुनी ना० कश्यप स्त्रीस झालेल्या देवगंधर्वांतील एक. हा सूर्याचा सहचर होय. ( नभस्य श० पहा ).

२–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वत राजा, त्याच्या अंधक ना० पुत्राच्या वंशांत जन्मलेल्या आहुक राजाच्या दोन पुत्रांतील दुसरा. यास कंस, सुनामा, न्यग्रोध, कंक, शंकु, सुहू, राष्ट्रपाल, सृष्टि, आणि तुष्टिमान्, असे नऊ पुत्र; तशांत कंसा, कंसावती, कंका, शूरभू, व राष्ट्रपालिका, अशा पांच कन्या होत्या. ह्या पांच वसुदेवाचे देवभागादि नऊ भ्रात्यांतील पांच भ्राते, त्यांच्या स्त्रिया होत्या. याचा ज्येष्ठ पुत्र कंस, अत्यंत दुष्ट असल्यामुळें त्यानें यास बंदींत ठेविलें. पुढें कंसास कृष्णानें मारिल्यावर, यास त्यानें पुनः मथुरेच्या राज्यावर स्थापिलें होतें. ( भाग० १० स्कं० अ० ४५ ).

३– धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

४–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

५–पांडवांतील अर्जुनाचा पौत्र जो परीक्षित् राजा, त्याच्या च्यार पुत्रांतील कनिष्ठ.

**उग्रसेना**–अक्रूर यादवाच्या स्त्रियांतील एक.

**उग्रायुध**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्ती राजा, त्याच्या देवमीढ ना० पुत्राच्या वंशांत जन्मलेल्या नीप राजाचा पुत्र, यास क्षेम्य ना० पुत्र होता.

२–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

३–दुर्योधनपक्षीय भारती युद्धांतील एक राजा.

४–कर्णाच्या हातून मरण पावलेला, पांडवपक्षीय एक राजा. ( भार० कर्ण० अ० ५६ ).

**उग्राय**–महिषासुरपक्षीय एक असुर. ( २ महिषासुर श० पहा ).

**उच्चैःश्रवा**–समुद्रमंथनकालीं निघालेल्या चतुर्दशरत्नांतील एक अश्व. ( भाग० अष्टम० अ० ८ ).

२–सूर्यरथास जो अश्व आहे त्याचें नांव. (२ मत्स्य अ० २४९ ).

**उज्जयन**–विश्वामित्रकुलोत्पन्न एक ऋषि.

**उज्जयिनी**–अवंतिका नगरीस प्रस्तुत म्हणतात.

**उज्जानक**–काश्मीर देशासमीपचें तीर्थवि० येथें स्कंदानें आपला क्रोध शांत केला. (भार०वन०अ०१३०).

**उज्जालक**–मरुधन्व देशासमीपच्या समुद्रभागास नांव. येथें उत्तंक ऋषीचा आश्रम होता.

**उज्जिहाना**–दक्षिण कोसल देशांतील नगरी.

**उडुपति**–नक्षत्राधिपति सोम तो.

२–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**उड्डकेरल**–द्रविड देशाच्या दक्षिणेकडील भारतवर्षीय देश. (भार०सभा०अ०३१).

**उतथ्य**–स्वायंभू मन्वंतरांतील अंगिरा ऋषींच्या ३ पुत्रांतील दुसरा.

२–वैवस्वत मन्वंतरांतील वारुणि अंगिरा ऋषींच्या ८ पुत्रांतील दुसरा.यानें सूर्यवंशीय मांधाता राजास राजनीति सांगितली होती. (भार०शांति०अ०८९-९१). याची स्त्री सोमकन्या भद्रा होय.

**उत्कल**–उत्तानपादपुत्र ध्रुवापासून इलेच्या ठायीं झालेला पुत्र. ध्रुव अरण्यांत तप करण्यासाठीं गेल्यावर, यास राज्य प्राप्त झालें; परंतु हा अंतर्निष्ठ व उदासीन असल्यामुळें, यानें तें स्वीकारलें नाहीं. ( भाग० ४ स्कं० अ० १३ ).

२–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

३–वृत्रासुरानुयायी असुर. यानें समुद्रमंथनानंतर देवदैत्य. युद्धप्रसंगीं, मातृगणांशीं युद्ध केलें होतें. ( भाग० ८ स्कं० अ० १० श्लोक ३३ ).

४–वैवस्वत मनूचा पौत्र. इल राजाच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.

५–भारतवर्षीय देश. ( भार०भीष्म०अ०९ ).

**उत्कला**–ऋषभदेववंशीय सम्राट् राजाची स्त्री, मरीचि राजाची माता.

**उत्कोचला**–पांडवांचा पुरोहित धौम्य ऋषि त्याच्या तपःस्थानासमीपचें तीर्थ.

**उत्तंक**–एक पुरातन ऋषि, याच्या साह्यानें सूर्यवंशीय कुवलाश्व राजानें, धुंधुना० दैत्यास मारिलें होतें. ( कुवलाश्व श० पहा ).

२–भृगुकुलोत्पन्न एक ऋषि. हा, गौतमकुलोत्पन्न धौम्य ऋषीचा शिष्य होय. यानें सूर्यवंशीय सौदास अ० मित्रसह ना० राजा, त्याच्या स्त्रीच्या कर्णांतील कुंडलें, गुरुपत्नीनें मागितल्यावरून तिला आणून दिलीं होती. त्यावरून धौम्यगुरूनें प्रसन्न होऊन, यास भार्यार्थ आपली कन्या दिली होती. ( भार०अश्व०अ०५३ ). धुंधु दैत्यास मारण्यास, याचें साह्य कुवलाश्व राजानें घेतलें होतें, असा लेख असंभाव्य दिसतो. कारण, कुवलाश्व राजा इक्ष्वाकुकुलांत अकरावा राजा असून, सौदास अ० मित्रसह अठ्ठेचाळिसावा आहे. तेव्हां अर्वाचीन राजाच्या स्त्रीचीं कुंडलें आणून गुरुपत्नीस दिल्यानंतर, प्राचीन राजास साह्य दिल्याचें कृत्य संभाव्य नाहीं, म्हणून, तो उत्तंक भिन्न होय.

३–वेद ना० ऋषीचा शिष्य. याचें मूळचें नांव उपमन्यु

असें होतें. हा गुरुकुलांत वास करीत असतां, वेद ऋषीनें यास, प्रातःकालीं अरण्यांत गायी नेऊन चारीत जाव्या, व सायंकालीं घरीं आणीत जाव्या, म्हणून आज्ञा केली होती. तीप्रमाणें हा चालत असे, व निर्वाहार्थ अरण्यांत राहणाऱ्या ऋषींच्या आश्रमीं मधुकरी करीत असे. एकदां गुरूंनीं, यास पुसलें कीं, तूं निर्वाह कसा करतोस ? त्यावरून यानें, मी मधुकरी मागून भक्षण करितों म्हणून सांगितलें. तें ऐकून गुरूंनीं यास म्हटलें कीं, शिष्यानें मधुकरी करून, गुरूस आणून समर्पावी, नंतर तींतून गुरूंनीं कृपा करून कांहीं दिल्यास, तीवर निर्वाह करावा. असें असतां, हा अविधि तूं कसा करतोस ? तेव्हां हा, तथास्तु म्हणून त्या दिवसापासून मधुकरी गुरूस आणून समर्पूं लागला. परंतु गुरूंनीं यास तींतून कांहींच दिलें नाहीं. असें यानें कित्येक दिवस पाहून, क्षुधानिवारणार्थ हा मातक्यान मधुकरी करून निर्वाह करूं लागला. या गोष्टीसहि बरेच दिवस लोटल्यावर, यास ग्लानिरहित अवलोकन करून, पुनः गुरूंनीं पुसलें कीं, निर्वाह कसा करतोस तें सांग. तेव्हां यानें वास्तविक होतें तें सांगितलें. तें ऐकून, ते यास म्हणाले असें इतःपर करूं नको. कारण, त्यांत अरण्यवासी ऋषींस आपल्यामुळें पिडा होत्ये. त्यावरून यानें, पुनः मधुकरी मागण्याचें सोडून दिलें, व तसाच उपवासी राहूं लागला. परंतु क्षुधा फारच बाधूं लागलेली पाहून, त्या गोसमुदायांतील एका गायीचें दुग्ध प्राशन करून निर्वाह करणें आरंभिलें. त्याचाही गुरूंनीं निषेध केल्यावर, गोवत्सांच्या मुखास लागलेला दुग्धफेन, त्यानें निर्वाह करीत असतां, त्याचाहि जेव्हां त्यांनीं निषेध केला, व क्षुधा आवरेनाशी झाली, तेव्हां हा, अर्कवृक्षाचीं पर्णें भक्षून दिवस काढूं लागला. त्या योगानें याच्या नेत्रांस मंदत्व येऊन, एके दिवशीं हा गायी संरक्षण करीत अरण्यांत फिरत असतां, याचे नेत्र एकाएकीं गेले, व सायंकालीं गुरुगृहीं गायी घेऊन येत असतां, एका कूपांत न दिसल्यामुळें पडला.

धेनु सर्व आल्या, परंतु उपमन्यु आला नाहीं असें पाहून, गुरु त्याच्या शोधास निघाले, व अरण्यांतून जातां जातां, हे उपमन्यो, हे उपमन्यो, अशा हाका मारूं लागले, तों एका कूपांतून यानें ओ दिलेली ऐकून, त्यास पुनः हांक मारून विचारूं लागले कीं, वत्सा, कोठें आहेस ? यानें उत्तर दिलें, मी या कूपांत पडलों आहें. त्यावरून वेदऋषि कूपासमीप येऊन म्हणाले कीं, वर ये. उपमन्यु म्हणाला, मी नेत्रहीन झालों आहें, तेव्हां वर कसा येऊं ? तें ऐकून त्यांनीं तत्काळ अश्विनीकुमारांचें आवाहन केलें, तों ते तत्क्षणींच प्रकट झाले, आणि उपमन्यूची दृढ गुरुभक्ति पाहून, यास त्यांनीं पूर्ववत् दृष्टि देऊन बाहेर काढिलें, व ( मांडीस धरून वर काढिलें असावें ) म्हणून यास उत्तंक असें नांव दिलें. ( भार० आदि० अ० ३ ).

अशा रीतीनें हा गुरुगृहीं राहून, वेदवेदांगांत पूर्ण झाला असतां, वेदऋषींनीं यास स्वगृहीं जाण्याची आज्ञा दिली. तेव्हां यानें, कांहीं गुरुदक्षिणा मागावी म्हणून जातांना त्यांस प्रार्थिलें; परंतु त्यांनीं मला कांहीं इच्छा नाहीं म्हणून सांगितल्यावरून, हा गुरुपत्नीकडे जाऊन, तसेंच म्हणूं लागला, तेव्हां तिनेंही अन्य कांहीं नको, परंतु देशील तर, सूर्यवंशीय पौष्य राजा ( पुष्य राजाचा पुत्र ध्रुवसंधि ) त्याच्या स्त्रीचीं कुंडलें आणून दे. असें ऐकून, हा त्या राजपत्नीकडे गेला, व तिजजवळ कुंडलें मागितलीं. तीं तिनें दिलीं असतां, हा, माघारा यावयास निघाला, तों मार्गांत तीं तक्षकानें हरण करून, एका बिळांत गमन केलें, त्यामागून इंद्राच्या साह्यानें हाही त्या बिळांत शिरून पाताळांत गेला, व तीं अग्नि इत्यादिकांच्या साह्यानें घेऊन येऊन गुरुपत्नीस समर्पण केलीं. नंतर हा तेथून निघून स्वगृहीं आला, परंतु गुरुपत्नीनें ज्या अवधींत कुंडलें आणावयास सांगितलीं होतीं, त्या अवधीस तक्षकानें विघ्न करून, गुरुपत्नीचा आपणावर कोप व्हावा, म्हणून जे श्रम दिले, त्याविषयीं याच्या मनांत दंश राहिला होता, म्हणून यानें पुढें तक्षकदंशानें परीक्षित् राजा मरण पावला असें ऐकून, जनमेजय राजाकडे गमन केलें, आणि त्यास उत्तेजन देऊन, त्याकडून सर्पसत्र करविलें. ( ६ जनमेजय श० पहा ).

**उत्तम**-( स्वायंभू० वं० ) प्रियव्रत राजास दुसऱ्या स्त्रीच्या ठायीं झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ; हा प्रस्तुतच्या श्वेतवाराहकल्पांत, जे चवदा मनु पृथिवीवर व्हावयाचे, त्यांत तिसरा होऊन गेला. यास इष, ऊर्ज, तर्ज, शुचि, शुक्र, मधु, माधव, नभस्य, नभ आणि सह, असे पवन, संजय, इ० नामांतरानें दहा पुत्र होते. त्यांत कनिष्ठ सह, तो मोठा उदार, व कीर्तिमान् होता. याच्या कालसततेस औत्तमी मन्वंतर असें नांव असून, त्यांत कौकुरुंडि, दालभ्य, शंख, प्रवहण, शिव, सित, आणि सस्मित, हे प्रमदादि नामांतरानें सप्तर्षि असत. सत्य, वेद, श्रुत, भद्र, इ०

भावनसंज्ञेचे देव असून, त्यांचा स्वामी सत्यजित् नांवाचा इंद्र त्यावेळेस स्वर्गांत होता. धर्म ना० एका ऋषीपासून त्याच्या सूनृताभार्येच्या ठायीं सत्यसेन नामेंकरून विष्णूचा अवतार होऊन, त्यानें इंद्राचें साह्य केलें होतें. ( भाग० ८ स्कं० अ० १ ). ( मत्स्य० अ० ९ ).

२-( स्वायं० मनुवंश ) उत्तानपाद राजाची दुसरी स्त्री सुरुचि, तिचा पुत्र. ध्रुवाचा सापत्न भ्राता. याचा विवाह होण्यापूर्वीच, हा अरण्यांत मृगयेस गेला असतां, तेथें यक्षांच्या हातून मरण पावला होता. ( १ ध्रुव श० पहा ).

३-भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**उत्तमा**-चालू जें वैवस्वत मन्वंतर, यांत एकविसाव्या चौकडींत ( पर्ययांत ) जो व्यास होऊन गेला तो. यास हर्यात्मा असें नामांतर होतें.( व्यास श० पहा ).

**उत्तमौजा**-पांचालदेशीय एक राजपुत्र. हा भारती युद्धांत पांडवांकडे होता. संपूर्ण भारती युद्ध झाल्यावर, हा, पांडवांच्या शिबिरांत निद्रित असतां, यास अश्वत्थाम्यानें मारिलें होतें. ( १ अश्वत्थामा श० पहा ).

**उत्तर**-कश्यपकुलोत्पन्न एक ऋषि.

२-पूर्व मत्स्यदेशाधिपति विराट राजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. यास भूमिंजय असेंही म्हणत असत. ( भार० विराट० अ० ३५ श्लो० ९ ). हा बाल असतां, विराट राजाचीं गोधनें कौरवांनीं हरिलीं. तेव्हां विराट सैन्य घेऊन तिकडे गेला, इतक्यांत दुर्योधन स्वतः दुसऱ्या दिशेकडून येऊन गोधनें हरण करीत नगरावर येऊं लागला. हें वर्तमान गोपांनीं येऊन यास नगरांत कळविलें. तेव्हां हा स्त्रियांच्या समाजांत बसला होता, व गोपांचें भाषण ऐकून म्हणूं लागला कीं, मला सारथि नाहीं, तेव्हां मी एकट्यानें काय करावें. जर सारथि मिळेल, तर मी आतांच शत्रूंस बांधून आणीन. त्यावरून याचें सारथ्य करण्याचें बृहन्नटेनें स्वीकारलें, व हा युद्धास गेला, व तिकडून बृहन्नटेच्या साह्यानें विजयी होऊन परत आला इ०. ( बृहन्नटा श० पहा ).

हा, भारती युद्धांत पांडवांकडे होता. व बहुत योद्ध्यांशीं युद्ध करून, शेवटीं शल्य राजाच्या हातून मरण पावला. ( भार० भीष्म० अ० ४७ ). याची स्त्री, हा मरण पावला त्यावेळीं गरोदर होती, व तिला पुढें इरावती ना० जी कन्या झाली होती, तीच पुढें अभिमन्युपुत्र परीक्षित् राजा त्यास दिली होती.

**उत्तरआनर्त**-भारतवर्षीय कुलिंद देशाच्या उत्तरेस असणारा देश. अर्जुनदिग्विजय पहा.

**उत्तरउत्सवसंकेत**-भारतवर्षीय देश. अर्जुनदिग्विजय पहा.

**उत्तरकांबोज**-बाल्हीक व दरद यांच्या उत्तरेस असणारा कांबोज देश. ( भार० सभा० अ० २७ ).

**उत्तरकिरात**-भारतवर्षीय देश. अर्जुनदिग्विजय पहा.

**उत्तरकुरु**-जंबुद्वीपांतील कुरु ना० जो वर्ष त्याचेंच नांव.

**उत्तरकोसल**-ईशान्यकोसलासच नांव.

**उत्तरत्रिगर्त**-भारतवर्षीय देश. अर्जुनदिग्विजय पहा.

**उत्तरमानस**-हिमालयस्थ मानससरोवर तें.

**उत्तरमालव**-भारतवर्षीय उत्तरेकडील मालव देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**उत्तरवेदी**-कुरुक्षेत्रासच नांव. ( २ कुरुक्षेत्र श० पहा ). यासच अंतर्वेदी प्रस्तुत म्हणत असतील.

**उत्तरश्रवण**-भारतवर्षीय एक खंड, परंतु हें कोणत्या खंडाचें नांव, याचा निर्णय होत नाहीं. ( मत्स्य० अ० ११३ ).

**उत्तरसुह्म**-भारतवर्षीय देश, अर्जुनदिग्विजय पहा.

**उत्तरा**-प्राचेतस दक्षानें सोमास दिलेल्या सत्तावीस कन्यांतील एक.

२-मत्स्यदेशाधिपति विराट राजाची कन्या. हिनें बाल्यावस्थेंत गीत, व नृत्य या दोनही कला बृहन्नटेपासून संपादिल्या होत्या. अज्ञातवास सरून विराटगृहीं पांडव प्रकट झाल्यावर, हिला अर्जुनानें वरावें अशी इच्छा विराटानें त्यास दर्शविली असतां, त्यानें तें म्हणणें अमान्य केलें, परंतु अभिमन्यूसाठीं त्यानें हिला मागितलें, त्यावरून हिचा अभिमन्यूशीं विवाह झाला ( भार० विराट० अ० ७१-७२ ).

भारती युद्धांत अभिमन्यु मरण पावला, त्या काळीं ही गर्भिणी होती; परंतु अश्वत्थाम्यानें निष्पांडवी पृथिवी व्हावी म्हणून, ब्रह्मास्त्र सोडिलें असतां, हिच्या गर्भास मुख्यत्वेंकरून तें पीडा देऊं लागलें, असें हिनें पाहून, कृष्ण द्वारकेस जाण्यास निघाला अशा संधीस त्याजवळ येऊन, प्रार्थना केली कीं, या अस्त्रापासून गर्भाचें संरक्षण करण्याचें पत्करल्याशिवाय, मी तुम्हास द्वारकेस जाऊं देणार नाहीं. त्यांवरून कृष्णास दया येऊन, त्यानें आपलें चक्र हिच्या गर्भसंरक्षणार्थ ठेविलें, तेव्हांपासून हिला, व हिच्या गर्भाला, पीडा होईनाशी होऊन, ही स्वस्थ मनानें अल्पच काळांत प्रसूत होऊन, परीक्षित् ना० पुत्रास प्रसवली. ( भाग० १ स्कं० अ० ८ ).

३-मेरु पर्वत जिकडे आहे ती दिशा.

**उत्तराभाद्रपदा**–प्राचेतस दक्षानें सोमास दिलेल्या सत्तावीस कन्यांतील एक.

**उत्तराषाढा**– " "

**उत्तानपाद**–स्वायंभू मनूच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ प्रियव्रत राजाचा कनिष्ठ बंधु. ( मत्स्य० अ० ४ ) यास सूनृता अ० सुनीती, आणि सुरुचि, अशा दोन स्त्रिया असून, पहिलीस कीर्तिमान् आणि ध्रुव, असे दोन पुत्र, व दुसरीस एकच उत्तम, मिळून तीन पुत्र होते. ( भाग० ४ स्कं० अ० ९ ). या दोन स्त्रियांत दुसरी सुरुचि, ती यास अत्यंत प्रिय असे. ( १ ध्रुव श० पहा ).

**उत्तानबर्हि**–वैवस्वत मनूचा पौत्र, व शर्याति राजाच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.

**उत्पलावती**–भारतवर्षीय नदी. ( ४ मलय श० पहा ).

**उत्पलावन**–भारतवर्षीय पांचालदेशांतील तीर्थ. येथें विश्वामित्रानें बहुत यज्ञ केले होते.

**उत्पलावर्तक**–भारतवर्षीय क्षेत्रवि०

**उत्पलिनी**–हिमालयाच्या पार्श्वभागीं असणाऱ्या नैमिषारण्यांतील नदी.

**उत्सवसंकेत**–भारतवर्षीय देश. याचे उत्तर आणि पश्चिम दिशाभेदानें दोन भेद आहेत.

**उदंक**–शुल्बऋषीचा पुत्र, यास शौल्वायन अ० शौल्वायनि असें म्हटलेलें आहे.

**उदक्स्वन**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र बृहदिषु, त्याच्या वंशांत जन्मलेल्या विपक्सेन राजाचा पुत्र. यास भल्लाद नांवाचा पुत्र होता.

**उदग्र**–एक असुर. ( २ महिषासुर श० पहा ),

**उदग्रज**–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**उदपान**–भारतवर्षीय तीर्थ. ( ४ त्रित श० पहा ).

**उदरशांडिल्य**–एक ब्रह्मर्षि.

**उदरेणु**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**उदवहि**–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**उदान**–शरीरस्थ पंचप्राणांतील कंठस्थानीं रहाणारा प्राणवायु.

**उदानकल्प**–दिवसानुक्रमानें ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील तेरावा दिवस. ( ४ कल्प श० पहा ).

**उदापेक्षी**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**उदावसु**–( विदे० वं० ) मिथिना० जनकाचा पुत्र. याचा पुत्र नंदिवर्धन.

**उदावहि**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**उद्गाता**–( स्वायंभू० वं० ) ऋषभदेवकुलांतील प्रतीह राजाच्या ३ पुत्रांतील कनिष्ठ. हा, यज्ञकर्मप्रिय असून, त्यांत परम निपुण होता, म्हणून यास असें नांव पडलें होतें. ( भाग० ५ स्कं० अ० १५ ).

**उद्गाह**–एक ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**उद्गीथ**–स्वायंभू मन्वंतरांतील मरीचि ऋषीस, ऊर्णेपासून झालेल्या ६ पुत्रांतील दुसरा. हाच पुढें जन्मांतरीं कृष्णाच्या बंधूंत जन्मास आला होता. ( १ ऊर्णा श० पहा ).

२–( स्वायंभू० वं० ) ऋषभदेवकुलोत्पन्न भूमाराजास, ऋषिकुल्या स्त्रीपासून झालेला पुत्र.

**उद्दाल**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**उद्दालक**–गौतमगोत्रोत्पन्न अरुणि ऋषीचा पुत्र व धौम्य ऋषीचा शिष्य. यास आरुणि असेंही म्हटलेलें आहे हा गुरुगृहीं असतां, धौम्यानें यास शेतावर जाऊन, त्यास, बांध घालण्यास सांगितलें. त्याप्रमाणें हा तेथें जाऊन, तो घालीत असतां, क्षेत्रांतील उदकप्रवाहाच्या वेगानें, मृत्तिकेचा केलेला बांध ठरेना, याप्रमाणें बहुत वेळां झालें असें पाहून यानें स्वतः बांधाच्या स्थानीं आडवें पडून उदक आडविलें, त्यामुळें यास गुरुगृहीं येतां येईना, या गोष्टीस बरेच दिवस लोटले असतां, धौम्यास आरुणीचें स्मरण होऊन, ते शेतावर आले, आणि पाहतात तों, हा आडवा पडून पाणी आडवून स्थित झाला आहे. त्यावरुन धौम्य संतुष्ट होऊन म्हणाले कीं, ऊठ व इकडे ये. त्याप्रमाणें हा उठतांच उदक पूर्ववत् वाहूं लागलें, त्याची व्यवस्था धौम्यांनीं केली. परंतु यास, त्या दिवसापासून, त्यांनीं उद्दालक असें नांव दिलें. कांहीं कालानें हा, परिपूर्ण वेदवेदांगपारग होऊन गुरूच्या आज्ञेनें स्वगृहीं आला, आणि विवाह करून गृहस्थाश्रम करूं लागला. यास श्वेतकेतु आणि नचिकेता असे दोन पुत्र, व सुजाता नामेंकरून एक कन्या होती. तीच कहोड ऋषीची स्त्री.

२–कोणी एक ऋषि, याचें कुल आढळत नाहीं. यास चंडी या नामेंकरून स्त्री होती, ती याचें कधींच ऐकत नसे, यानें तिला जें जें करावयास सांगावें, त्याच्या विपरीत तें तें तिनें करीत असावें, त्यामुळें हा इतका त्रासला होता कीं, स्त्री नसती तरी बरें झालें असतें, असें यास वाटूं लागलें. एकदां कांहीं कार्य तिनें विपरीत केल्यामुळें, हा खिन्न होऊन बसला आहे इतक्यांत, याच्या आश्रमीं कौंडिन्य ना० ऋषि प्राप्त झाले. त्यांस हा याचा सर्व वृतांत विदित होतांच, त्यांनीं यास अशी युक्ति सांगितली कीं, जें कार्य तुझ्या मनांतून स्त्रीनें करावें असें

असेल, तें तूं तिला करूं नको अथवा वाईट कर, असें सांगत जा, म्हणजे सर्व नीट होत जाईल. त्याप्रमाणें कौंडिन्य ऋषि गेल्यावर, हा करूं लागला असतां, कार्य मात्र याच्या मनाप्रमाणें होऊं लागलें.

कांहीं कालानें पितृतिथि आली, तेव्हां यानें, नित्यक्रमाप्रमाणें तिला विपरीत भाषण आरंभिलें कीं, उदयीक श्राद्ध कर्तव्य नाहीं, केलेंच तर, अंगहीन, अनाचारी, असे ब्राह्मण सांगेन, त्यांस कदन्न घालीन, दक्षिणा तर मुळींच देणार नाहीं. त्यावरून चंडीनें विद्वान् व सदाचारी असे ब्राह्मण सांगितले. उत्तम अन्नाचें त्यांस भोजन देऊन, पतीकडून त्यांस वस्त्रें, भूषणें, व उत्तम दक्षिणा देवविली. त्यावरून यास आल्हाद होऊन, भान न राहतां हा असें बोलला कीं, हे पिंड भागीरथीप्रवाहांत टाकावे. तेवढ्यावरून ते तिनें अमंगलस्थलीं टाकिले, असें यानें पाहतांच, क्रोधानें तिला म्हणाला कीं, दुष्टे, तूं शिला होऊन पडशील. तेव्हां तिनें प्रार्थना केली कीं, मी इतःपर असें करणार नाहीं. म्हणून यानें तिला उःशाप दिला कीं, कालांतरानें पांडवांचा अश्वमेधीय अश्व येथें येईल, व तो तुला चिकटेल, तेव्हां अर्जुनाच्या हस्तस्पर्शानें तुझा उद्धार होईल. त्याप्रमाणें तिचा पुढें उद्धार होऊन, उग्रस्वभावत्यागपुरःसर ती पूर्ववत् यास प्राप्त झाली. ( जैमि० अश्वमे० अ० १६ ).

**उद्दालकि**–एक ब्रह्मर्षि. ( २ अत्रि श० पहा ).

२–उद्दालकाच्या पुत्रांस हें नांव साधारण आहे.

**उद्धव**–विष्णूच्या पार्षदगणांतील एक.

२–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतान्वयांत जन्मलेला जो कृष्णपिता वसुदेव, त्याच्या देवभाग ना० कनिष्ठ भ्रात्यापासून, कंसा स्त्रीच्याठायीं झालेला पुत्र. हा परमबुद्धिमान् आणि नीतिमान् असल्यामुळें, कोणताहि मंत्र करणें झालें तर, यास पुसल्यावांचून कृष्ण करीत नसे. हा, सर्वकाल कृष्णासमागमें वर्ते, म्हणून याचें व कृष्णाचें परस्पर अत्यंत प्रेम असे. कृष्ण गोकुळांतून मथुरेस आल्यावर, त्यानें यास, नंदयशोदेस आपल्या वियोगापासून झालेल्या विरहाचा त्यांनीं त्याग करावा, म्हणून बोध करण्यास गोकुलास पाठविलें होतें. त्याप्रमाणें यानें तेथें जाऊन, बोधद्वारा त्यांचें समाधान केलें. मात्र गोपी याशीं बीभत्स भाषणें करूं लागल्या त्यामुळें, हा त्यांच्या नादीं न लागतां, माघारा मथुरेस आला. ( भाग० १० स्कं० अ० ४६–४७ ).

कांहीं कालानें कृष्ण निजधामास जाणार असें ऐकिल्यावरून, यानें मला समागमें न्यावें म्हणून कृष्णास प्रार्थिलें. त्यावरून कृष्णानें याची अनन्यता, व ज्ञानाधिकार पाहून, यास आत्मतत्त्वोपदेशानें शांत केलें. नंतर हा कृष्णाज्ञेप्रमाणें बदरीवनांत जाण्यास निघाला, व कृष्णनिधनावलोकनोत्तर तिकडे चालता झाला. ( भाग० ११ स्कं० ) आणि ( भाग ३ स्कं० अ० ३–४ ).

**उद्वलायन**–कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**उद्वह**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**उन्नति**–स्वायंभूमन्वंतरांतील धर्मऋषीच्या १३ स्त्रियांतील एक. हिचा पुत्र अभिमान.

**उन्माद**–कृष्णास मित्रविंदेपासून झालेला पुत्र. हा, महारथी होता.

**उन्मत्त**–अष्टभैरवांतील एक.

**उपगहन**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**उपगु**–वसिष्ठकुलोत्पन्न एक ऋषि.

**उपगुप्त**–( विदे० वं० ) सत्यरथ जनकाचा पुत्र, याचा पुत्र वस्वनंत.

**उपचित्र**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**उपदानवी**–मयासुराच्या तीन कन्यांतील ज्येष्ठ. हिरण्याक्षाची स्त्री.

**उपदेव**–सोमवंशीय देवक राजाच्या चार पुत्रांतील दुसरा.

२–अक्रूर यादवाच्या पुत्रांतील एक.

३–रुद्रसावर्णि मनूच्या पुत्रांतील एक.

**उपदेवा**–देवक यादवाची कन्या, कृष्णपिता वसुदेव त्याची स्त्री. हिला कल्प, वर्ष, इ० १० पुत्र होते.

**उपनंद**–नंदाचा गोकुलांत राहणारा सखा व हस्तक, असा प्रमुख गोपवि० (भाग० १० स्कं० अ० ११).

२–वसुदेवास मदिरा स्त्रीपासून झालेल्या चार पुत्रांतील दुसरा.

**उपनंदक**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**उपप्लव्य**–विराटनगरीसमीपचें स्थलवि० अज्ञातवासांतून पांडव प्रकट झाल्यावर या स्थलीं राहिले होते, व कौरव सामानें राज्य देत नाहींत असें ठरल्यावर, त्यांनीं येथेंच राहून युद्धाची सिद्धता केली. ( भार० उद्योग० अ० ८ ).

**उपबर्हिन**–क्रौंचद्वीपांतील महापर्वत.

**उपबिंदु**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**उपमन्यु**–वसिष्ठकुलोत्पन्न व्याघ्रपाद ना० ऋषि. त्याच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ, धौम्य ऋषीचा ज्येष्ठ भ्राता.

हा, बाल असतां, आपल्या भ्रात्यासहवर्तमान प्रायः स्वगृहींच क्रीडा करीत असे. एकदां बंधूसहित दुसऱ्या एका ऋषीच्या आश्रमांतील मुलांसमागमें क्रीडा करीत असतां, तेथें यानें धेनूस दोहन करितां पाहिलें, व क्षीर अवलोकन करून, तेथील मुलांच्या मातेनें आपल्या मुलांस तें दिलें, त्यांत यास व याच्या भ्रात्यासहि दिलें. तें भक्षण केल्यावर, हा स्वगृहीं आला, आणि मातेपाशीं तसेंच क्षीर मागूं लागला. तेव्हां याच्या मातेनें, आपल्या नित्याच्या क्रमाप्रमाणें उदकांत पिष्ट कालवून, यापुढें ठेविलें असतां, हें दुग्ध मला नको, तर, काल जसें मीं अमुक आश्रमीं भक्षण केलें, तसें दे, असें म्हणूं लागला. तें याचें भाषण ऐकून, माता खिन्न होऊन यास बोलली कीं, तसें दुग्ध मिळण्याजोगें तुमचें सुकृत नाहीं; कारण पूर्वजन्मीं तुम्हास ईश्वराराधन घडलें नाहीं. त्यावरून यानें ईश्वराराधन करून, आकल्प आयुष्य व क्षीरसागराचें आधिपत्य, अशीं संपादन केलीं. याची गणना शैवांत असून, कृष्णानेंहि यापासून शैवी दीक्षा घेतली होती. ( भार० अनुशा० अ० १४ ). हा तंडी ऋषीचा शिष्य.

२–वेदऋषीचा शिष्य. ( ३ उत्तंक श० पहा ).

३–वसिष्ठकुलोत्पन्न भद्रऋषीचा पुत्र.

४–कृष्णद्वैपायन व्यासाचा पुत्र, शुकाचार्याचा बंधु.

**उपयव**–एक ऋषि. ( श्वेतपराशर श० पहा ).

**उपयाज**–काश्यपकुलोत्पन्न ऋषि. ( याजोपयाज श० पहा ).

**उपरिचर**–( स्वायंभू० वं० ) उत्तानपादकुलोत्पन्न एक राजर्षि. एकदां देवराज इंद्र, आणि महर्षि, यांच्यामध्यें असा वाद पडला कीं, यज्ञांत पशुहिंसा करणें हें विहित कीं अविहित ? त्यांत विहितत्वाविषयीं इंद्राचा पक्ष असून, तद्विरुद्ध महर्षींचा होता. इतक्यांत हा तेथें साहजिक गेला असतां, उभय पक्षकारांनीं यास आपआपले पक्ष निवेदन करून, विचारिलें कीं, याविषयीं तुझें मत कसें आहे तें सांग. तेव्हां यानें सांगितलें, वेदामध्यें जे मंत्र आहेत, त्यांवरून पशुहिंसाचिन्ह स्पष्ट होतें. यास्तव इंद्राचा पक्ष सत्य आहे. असें ऐकून, महर्षींस कोप आला, आणि ते म्हणाले, तूं काम्यपक्ष मनांत धरून, जें उत्तर दिलेंस, तें जरी यथार्थ आहे, तरी मोक्षपक्षविवक्षा, काम्यानिषिद्धविवर्जित असल्यामुळें, येथें पशुहिंसा अवश्य आहेच असें नाहीं. यास्तव यथार्थ काय तें न समजून, तूं सिद्धांताप्रमाणें उत्तर दिलेंस, यामुळें, अधोलोकीं पतन पाव-शील. असें म्हणतांच हा, रसातलांत पतन पावला. ( मत्स्य० अ० १४२ ). याचें नांव वंशावळींत नाहीं; परंतु हा मोठा यज्ञप्रिय असून, यानें अनेक यज्ञ केले होते; ( भार० शांति० अ० ३३६ पहा ).

२–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न पुरुराजा, त्याच्या अजमीढकुलांतील सुधनुर्वंशांत जन्मलेल्या कृती राजाचा पुत्र. याचें मूळचें नांव वसु असें असून, उपरिचर हें मागून पडलें. तें पडण्यास कारण असें कीं, यानें आपल्या तपानें इंद्रास संतुष्ट केलें असतां, त्यानें आपल्या कंठांतील माला व एक विमान यास दिलें. त्या मालेनें हा अति तेजस्वी होत्साता, विमानांत बसून सर्वत्र संचार करूं लागल्यामुळें यास, इंद्रमाली व उपरिचरवसु अशीं नांवें पडलीं.

हा एकदां विमानारूढ होऊन, संचार करीत असतां, शुक्तिमती ना० नदीचा, कोलाहल पर्वतानें केलेला विरोध, याच्या दृष्टीस पडला, तेव्हां यानें, त्या पर्वतासमीप जाऊन, त्याचा निग्रह केला, व नदीस मोकळें केलें. त्यावरून ती नदी मूर्तिमान् होऊन याच्या पुढें आली, आणि आपल्या उदरीं निर्माण झालेलें मिथुन, तिनें यास आर्पिलें. तें घेऊन हा घरीं आला, व त्यांतील पुत्रास, यानें आपला सेनापति करून, गिरिका ना० जी कन्या होती, ती आपणास स्त्री केली.

पुढें कांहीं कालानें हा दूरच्या अरण्यांत मृगयेस गेला असतां, तेथें यास कामाविर्भाव होऊन, याचें रेत पतन पावलें. तें यानें द्रोणपुटांत घालून, आपल्या स्त्रीकडे नेऊन देण्यास एका श्येन पक्ष्यास आज्ञा केली. त्यावरून तो मुखांत द्रोण धरून अंतरिक्षांतून चालला आहे इतक्यांत, दुसऱ्या श्येन पक्ष्यास याच्या मुखांत कांहीं आमिष आहे असें वाटून, तो द्रोण ओढायास गेला, त्यामुळें तो खालीं नदी होती तींत पडून तें रेत, अद्रिका ना० अप्सरा शापानें तेथें मत्स्ययोनि पावली होती, तिच्या उदरांत प्रविष्ट झालें. त्यापासून तिच्या उदरीं मिथुन संभवून, ती गर्भाचा पूर्ण काल होण्याचे संधीस, धीवराच्या जालांत सांपडली. पुढें त्यानें तिचा, द्रव्यलोभानें छेद केला, तों आंतून मिथून निघालें, तें पाहून, त्यास आश्चर्य झालें, व तसाच तो हर्षानें निघून, उपरिचरवसु राजाकडे आला, व त्यास, त्यानें तें मिथून अर्पण केलें.

राजासही मत्स्यीच्या उदरांतून हें मिथून निघालेलें ऐकून, व प्रत्यक्ष पाहून, चमत्कार वाटला. मग त्यानें, त्यांतील पुत्र आपणाकरितां ठेवून घेऊन; त्याचें

नांव मत्स्यराज असें ठेविलें, व कन्या धीवरास परत दिली. तिचें त्यानें मत्स्यगंधा असें नांव ठेवून, पालन केलें. हिलाच पुढें, पराशर ऋषीच्या प्रसादानें योजनगंधा नांव पडलें, व शंतनु राजाची स्त्री झाल्यावर सत्यवती नांवानें ही प्रसिद्धीस आली. ( ४ सत्यवती श० पहा ).

या वसुराजास, गिरिकेपासून झालेले पुत्र, बृहद्रथ अ० महारथ, प्रत्यग्र अ० सत्यश्रवा, मावेल्ल किं० हरिवाहन, कुश अ० कुशांव, तसेंच मणिवाहन, चेदिप आणि मत्स्यराज, हेहीं त्याचेच पुत्र होते. त्यांत बृहद्रथास तर यानें मगध देशाचें राज्य दिलें होतें. (भार० आदि० अ० ६३ ).

**उपरिमंडल**–भृगुकुलोत्पन्न एक ऋषि.

**उपलप**–वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**उपलोम**– " "

**उपवेद**–आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद, आणि स्थापत्यवेद, हे ऋग्वेदादिकांचे अनुक्रमानें उपवेद असून, त्यांप्रमाणेंच ब्रह्मदेवाच्या पूर्वादि चार मुखांतून निघालेले होत. ( भाग० ३ स्कं० अ० १२ ).

**उपश्रुति**–रात्रीची अभिमानिनी देवता. ( भार० उद्योग० अ० १३ ).

**उपश्लोक**–ब्रह्मसावर्णि ना० दाहाव्या मनूचा पिता. ( ब्रह्मसावर्णि श० पहा ).

**उपसुंद**–एक असुर. ( सुंदोपसुंद श० पहा ).

**उपस्थल**–वसिष्ठकुलोत्पन्न एक ऋषि.

**उपावृत्त**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म अ० ९ ).

**उपावृद्धि**–वसिष्ठकुलोत्पन्न एक ऋषि.

**उपासंगधर**–एक यादव.

**उपेंद्र**–विष्णूस, इंद्राचें साह्य करण्याच्या कारणानें नांव आहे.

२–जसा मुख्य राजाच्या मागें, राजा होणारा युवराजा असतो, तसा इंद्राच्या मागें दुसरा होणारा जो इंद्रपदवीचा अधिकारी त्यास असें नांव असतें. सांप्रत जो पुरंदर ना० स्वर्गांत इंद्र आहे, त्याच्या मागें बली दैत्य इंद्र होणारा असल्यामुळें, प्रस्तुत हें नांव त्यास आहे.

**उपेंद्रा**–भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**उभयजात**–भृगुकुलोत्पन्न ब्रह्मर्षि.

**उभयस्पृष्टि**–शाकद्वीपांत असणारी नदी.

**उमा**–शिवच पति प्राप्त व्हावा, म्हणून पार्वती घोर तप करीत असतां, वत्से, असें तप करून शरीर कष्टवूं नको, असें तिला तिच्या मातेनें वारंवार म्हणावें, त्यावरून तिला असें नांव पडलें. कारण, यांत उ हा वर्ण संबोधनार्थी असून, मा हा निषेधार्थी आहे.

**उमावन**–चंपकानगरीसमीपचें सरोवर. ( जैमिनीअश्व० अ० २१ ).

**उमाक्षति**–एक ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**उम्लोचा**–अप्सरा.

**उरगापुरी**–रोचमान राजाची नगरी. अर्जुनदिग्विजय पहा.

**उरु**-इंद्रसावर्णि मनूच्या पुत्रांतील एक.

**उरुक्रम**–जगद्व्यापी परमात्मा.

२– द्वादशादित्यांतील एक, परंतु भारतोक्त आदित्यांतील हें नांव कोणाचें तो निर्णय करितां येत नाहीं.

**उरुक्रिय**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न, अभिमन्यूनें मारलेला बृहद्बल राजा, त्याचा पौत्र, व बृहद्रणाचा पुत्र. यास उरुक्षय असें नामांतर असून, वत्सवृद्ध अ० वत्सद्रोह ना० पुत्र होता.

**उरुवल्क**–वसुदेवास इलेपासून झालेल्या पुत्रांतील ज्येष्ठ.

**उरुशृंग**–शाकद्वीपांतील महापर्वत.

**उरुश्रवा**– ( सो० वं० )नरिष्यंतकुलोत्पन्न सत्यश्रव्याचा पुत्र. याचा पुत्र देवदत्त राजा.

**उरुक्षव**–एक ब्रह्मर्षि. ( आंगिरा श० पहा. )

२– उरुक्रिय राजास नामांतर.

**उर्मन**–देववि० ( साध्यदेव श० पहा ).

**उर्मिला**–एक गंधर्वी, सोमदेची माता.

२– सीरध्वज जनकाची औरस कन्या. दशरथपुत्र लक्ष्मणाची स्त्री.

**उर्वरा**–अप्सरा.

**उर्वशी**–अप्सरावि० नरनारायण ऋषि, बदरिकाश्रमीं तप करीत असतां,त्यांच्या ब्रह्मचर्याची परीक्षा पाहण्यासाठीं, तेथें, वसंत, काम, आणि कित्येक अप्सरा इंद्रानें पाठविल्या होत्या.त्यांनीं तेथें जाऊन, नृत्यगीतहावभावादि प्रकारांनीं,त्यांस मोहित करावें,म्हणून अनेक प्रकार केले; परंतु ते निष्फल झाले असें पाहून,त्यांची कामादिक स्तुति आरंभितात तों, नरनारायणांनीं, त्यांचें अत्यंत मृदु वाक्यांनीं आदरातिथ्य करून, कोणीकडे येणें झालें म्हणून पुसलें. त्यावरून कामादिक लज्जित झाले असून स्तब्ध उभे राहिले. इतक्यांत तेथें त्यांनीं, कित्येक स्त्रिया पाहिल्या. त्या इतक्या रूपवती होत्या, कीं, इंद्राकडून आलेल्या अप्सरा, त्यांपुढें निस्तेज दिसूं लागल्या. त्यावरून तर त्यांस अतिशयच लज्जा झाली, व त्यांनीं स्वर्गास परत जावें असें मनांत आणिलें. तें नरनारायणांनीं जाणून, त्यांस म्हटलें कीं,

या आमच्या आश्रमांतील स्त्रियांतून,आपल्यास पाहिजे असल्यास एकादी स्त्री इंद्राकरतां घेऊन जावी. त्याव-रून कामादिकांस हर्ष होऊन, नारायणाच्या ऊरुस-मीप स्थित असलेल्या स्त्रीची त्यांनीं इच्छा दर्शवि-तांच, ही न्या, असें नरनारायणांनीं म्हणतांक्षणींच, कामादिक त्यांस नमस्कार करून, तिला समागमें घेत होत्साते स्वर्गास गेले, आणि इंद्रासमीप जाऊन नर-नारायणांचें अद्भुत सामर्थ्य वर्णन करीत,हिला त्याच्या स्वाधीन केलें. हिचेंच नांव इंद्रानें, ऊरुसमीपस्थसंद-र्भामुळें उर्वशी असें ठेविलें.(भाग० ११ स्कं० अ०४).

२– प्राधाकन्या एक अप्सरा. ( ४ सह श० पहा ). केशी दैत्य हिला घेऊन पळत असतां, पुरुरव्यानें हीस सोडविलें होतें.

३– सोमवंशीय पुरुकुलोत्पन्न जन्हुवंशांत जन्मलेला प्रतीप राजा, अरण्यांत तप करीत असतां, गंगा ही मूर्तिमान् येऊन त्याच्या दक्षिणांकावर स्वेच्छेनें बसली, त्यामुळें तीस असें नांव पडलें. ( भार० शांति० अ० २९ ).

**उर्वशीपुलिन**–भारतवर्षीय तीर्थ.

**उर्वी**–पृथिवी रसातळास अधर्माच्या योगानें जाऊं लागली, त्या काळीं कश्यप ऋषींनें, तिला ऊरुवर धारण केल्यामुळें असें नांव पडलें. ( भार० शांति० अ० ४९ ).

**उलूक**–दुसऱ्या हिरण्याक्ष दैत्याच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ.

२– विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक. ( भार० शांति० अ० ४७ ).

३– द्रौपदीस्वयंवरांतील एक राजा. ( भार० आदि० अ० १८६ ).

४– शकुनीचा पुत्र. यास दुर्योधनानें युद्ध आरंभण्या-पूर्वी उपप्लव्य नगरीस पांडवांकडे पाठविलें होतें. ( भार० उद्योग० अ० १६०–१६३ ). हा परत जाऊं लागला, त्या वेळेस सहदेवानें, तुला व तुझ्या पित्यास मी युद्धांत मारीन, अशी प्रतिज्ञा केली होती. त्याप्रमाणेंच हा त्याच्या हातून मरण पावला होता. ( भार० शल्य० अ० २८ ). यास कैतव असेंहि म्हणत असत.

५– भारतवर्षीय देश. अर्जुनदिग्विजय पहा. येथें पांड-वांच्या वेळीं सेनाबिंदु राजा होता.

६– उलूक देशासमीपचा एक पर्वत. येथें पांडवांच्या वेळेस बृहंत राजा होता.

**उलूत**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ०९ ).

**उलूप**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**उलूपी**–ऐरावत ना० नागकुलांतील, कौरव्य नागाची कन्या. हिनें अर्जुनास वरिलें होतें. तो वृत्तांत असा.– इंद्रप्रस्थ नगरींत पांडव राहात असतां, एका ब्राह्म-णाचीं गोधनें तस्करांनीं, रात्रौ हरण केलीं. त्यावरून तो ब्राह्मण अर्जुनाकडे येऊन म्हणाला कीं, माझीं गोधनें सोडवून सत्वर आणून मला दे, तरच तूं क्षत्रिय खरा. तें मर्मभेदक भाषण अर्जुनानें ऐकून, आपले धनुष्यबाण पाहूं लागला तों, ते आपल्या समीप नसून, धर्मराज व द्रौपदी, ज्या स्थळीं एकांतांत होतीं, तेथें आहेत असें त्यास स्मरण झालें. नंतर विचार करूं लागला कीं, जर एकांतांत जावें, तर नारदोक्त नियमाप्रमाणें द्वादश वर्षें तीर्थयात्रा करीत हिंडावें लागेल, न जावें, तर आपण क्षत्रिय असतां, ब्राह्मणाचीं गोधनें तस्करांपासून न सोडविणें हें अयोग्य; यास्तव तीर्थयात्रेस जाणें पडलें तरी पडो, परंतु याचीं गोधनें यास आणून देणें हेंच कार्य श्रेष्ठ होय. असा निश्चय करून, तो एकांतांतून धनुष्यबाण घेऊन आला, आणि तस्कर कोणत्या मार्गानें गेले तें ब्राह्मणांस पुसून, त्यांमागें धांवला, व त्यांस गांठून, त्यापासून गोधनें परत आणून ब्राह्मणास दिलीं. त्यावरून ब्राह्मणानें संतुष्ट होऊन, अर्जुनास त्यानें स्वमंदिरीं जाण्यास आज्ञा दिली. नंतर अर्जुनानें मंदिरांत येऊन निद्रा केली, व प्रातःकाल होतांच, रात्रींचें वृत्त युधिष्ठिरास निवेदन करून तीर्थयात्रेस जाण्याची सिद्धता केली. तदनंतर तीर्थें हिंडत चालला असतां, गंगाद्वारीं गेला, व तेथें गंगेंत उत-रून स्नान करीत आहे तों, हिनें त्याच्या रूपास मोहित होऊन, त्यास ओढून पाताळांत नेलें. त्या-वरून अर्जुन हिला पुसूं लागला कीं, तूं कोण, व मला इकडे कां आणिलेंस ? हिनें उत्तर केलें, तुम्हास वरावें म्हणून मीं इकडे आणिलें असून, मी नाग-कन्या आहें. तें तिचें भाषण ऐकून, अर्जुन म्हणाला, मी बारा वर्षेंपर्यंत व्रतस्थ आहे. यास्तव तूं म्हणतेस तें कांहीं घडणार नाहीं. परंतु ही, चतुरच होती, म्हणून हिनें पुनः अर्जुनास प्रार्थना केली कीं, आपण म्हणतां तें सत्य जरी आहे, तरी हा आपला व्रतनियम द्रौपदीविषयक असल्यामुळें, येथें त्यास प्रत्यवाय नाहीं. त्यावरून अर्जुनानें तिला वरिलें. हिला जो त्या वेळेस अर्जुनापासून गर्भ राहिला, तोच पुढें इरावान् जन्मला. ( भार० आदि० अ० २१४ ).

युधिष्ठिरानें अश्वमेध केला त्या काळीं अर्जुन श्यामकर्णासमागमें असतां, मणिपुर नगरींत युद्धप्रसंगामध्यें त्याचें निधन झालें. त्या वेळेस हिनें त्यास सजीव केलें; ( बभ्रुवाहन श० पहा ). अर्जुन बंधूसहित महाप्रयाणास जेव्हां गेला, तेव्हां हिनें गंगेंत आपल्या देहाचा त्याग केला. ( भार० महाप्र० अ० १ ).

**उल्कामुख**–रामसेनेंतलि एक वानर. हा अंगदासमागमें दक्षिण दिशेस सीताशुद्धीसाठीं गेला होता. ( वा०रा० किष्किं० स० ४१ ).

**उल्बण**–स्वायंभुमन्वंतरांतल्या सप्तवसिष्ठपुत्रांतील चवथा. ( ऊर्जा० श० पहा ).

**उल्मुक**–( स्वायंभु०वं० ) चक्षुर्मनूस नड्वलेपासून झालेल्या अक्रा पुत्रांतील कनिष्ठ. यास पुष्करिणी ना० स्त्री होती, व तिजपासून अंग, सुमना, ख्याति, क्रतु, अंगिरा आणि गय, असे साहा पुत्र झाले होते. ( भाग० ४ स्कं० ).

२–वृष्णिकुलोत्पन्न यादव, भारती युद्धांत पांडवांकडे होता. ( भार० द्रोण० अ० ११ ).

**उशंगव**–एक राजर्षि. विशेष कांहीं आढळत नाहीं.

**उशना**–स्वायंभु मन्वंतरांतलि जो भृगुपुत्र कवि, त्याचा पुत्र. यास काव्य असें नांव असून, प्रियव्रत राजाची कन्या ऊर्जस्वती, ती याची स्त्री होती. यास भार्गव असेंहि म्हणण्याची रूढी होती; कारण हा भृगुवंशज होता.

२–वैवस्वत मन्वंतरांतील जो वारुणि कवि, त्याच्या आठ पुत्रांतील चौथा; यासही काव्य असें नांव असून, शुक्र असेंहि क्वचित् म्हटलेलें आहे. हा चालू मन्वंतराच्या तिसऱ्या पर्यायामध्यें [चौकडींत] व्यास होता. ( व्यास श० पहा ). हिरण्यकशिपूच्या वेळेस हा दैत्यांचा पुरोहित असून, प्रल्हादास अर्थ आणि काम पुरुषार्थपर बुद्धि शिकविण्याच्या प्रसंगीं, हा तपार्थ गेला होता म्हणून, याचे पुत्र शंडामर्क, ते पौरोहित्य चालवीत होते. याविषयीं असें आढळतें.––

**श्लोक.**

पौरोहित्याय भगवान् वृतः काव्यः किलासुरैः ।
शंडामर्कौ सुतौ तस्य दैत्यराजगृहांतिके ॥ १ ॥
इति तं चिंतया किंचिन्म्लानश्रियमधोमुखम् ।
शंडामर्कावौशनसौ विविक्त इति होचतुः ॥ ४८ ॥
इमं तु पाशैर्वरुणस्य बध्वा निधेहि भीतो न पलायते यथा ।
बुद्धिश्च पुंसो वयसार्यसेवया यावद्गुरु भार्गव आगमिष्यति ॥ ५० ॥

( भाग० सप्त० स्कं० अ० ५ ).

आतां येथें याचा, भृगुकुलाशीं कांहीं संबंध नसतां, याच्या शंडामर्कपुत्रांनीं हिरण्यकशिपूशीं भाषण करींत असतां, यास भार्गव असें कां म्हटलें, ही एक मोठीच शंका उत्पन्न होत्ये, तिचा परिहार होऊन समाधान झालें पाहिजे, तें, हा ग्रंथ पाहणारांनीं सुतपा राजाचा पुत्र बलि, याच्या नांवावर लिहिलेल्या श्लोक्तात्पर्यानें, करून घ्यावें.

३–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या वंशांत जन्मलेल्या धर्म ना० राजाचा पुत्र. याचा पुत्र रुचक अ० रुक्मकवच.

**उशिक**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्या मघकुलांतील रोमपाद अ० लोमपाद ना० राजा, त्याच्या कृति ना० पौत्राचा पुत्र. यास चेदि ना० पुत्र हाता.

**उशिज**–आंगिराकुलोत्पन्न मंत्रद्रष्टा ऋषि, यास ऋषिज असेंही नामांतर आढळतें. ( ३ अंगिरा श० पहा ). यास ममता ना० स्त्री असून, तिजपासून झालेला दीर्घतमा नांवाचा पुत्र होता.

**उशीनर**–भोजनगरीचा राजा, यास ययातिकन्या माधवी, तिजपासून शिबि ना० पुत्र झाला होता. ( ३ गालव श० पहा ).

२–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न महामना राजाच्या दोन पुत्रांतलि ज्येष्ठ. व यास सुरथा स्त्रीपासून शिबि, वन, शमि आणि दक्ष, असे चार पुत्र झाले होते.

३–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**उषस्त**–चक्रायण ऋषींचा पुत्र, यास चाक्रायण असेंहि म्हणत.

**उषा**–ऊषा शब्द पहा.

**उषान**–देववि० ( साध्यदेव श० पहा ).

**उष्णगिंग**–भारतवर्षीय तीर्थ. ( भार०वन०अ०१३५ ).

**उष्मप**–पितरावि०.

**उहाक**–वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

---

## ऊ.

**ऊर्ज**–ध्रुवपुत्र वत्सर यास, स्वर्वीथि भार्येपासून झालेल्या पुत्रांतील एक.

२–स्वारोचिष मन्वंतरांतल्या सप्तर्षींत होता एक ऋषि तो.

३–वर्षांतील द्वादश मासानुक्रमानें आठवा मास. याची पूर्णिमा कृत्तिकानक्षत्रानें युक्त असत्ये म्हणून, यास कार्तिक असेंही म्हणतात. यांत विष्णु ना० आदित्य

सूर्यमंडलाधिपति असून, त्यासमागमें संचार करण्यास, विश्वामित्र ऋषि, रंभा ना० अप्सरा, मखोपेत राक्षस, अश्वतर नाग, सत्याजित् यक्ष, आणि सूर्यवर्चा गंधर्व, इतके असतात. ( भाग० १२स्कं०अ०११ ).

**ऊर्जयोनि**–विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**ऊर्जस्वती**–प्रियव्रत राजास, बर्हिष्मतीपासून झालेली कन्या, ही, भृगुपुत्र कवि त्याच्या उशना ना०पुत्राची स्त्री होती. ( भाग० ५ स्कं० अ० १ ).

२–अष्टवसूंतील एका वसूची स्त्री ती.

**ऊर्जा**–स्वायंभू मन्वंतरांतील वसिष्ठ ऋषीची दुसरी स्त्री. हिला चित्रकेतु, सुरोचि, विरजामित्र, उल्वण, वसुभृत्, यान, आणि द्युमान्, असे सात पुत्र होते.

**ऊर्जित**–( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजित्, त्याच्या वंशांत जन्मलेल्या, कार्तवीर्य,राजाच्या सहस्र पुत्रांतील प्रमुख जे पांच, त्यांतील कनिष्ठ.

**ऊर्ण**–एक यक्ष. ( सहस्य श० पहा ).

**ऊर्णनाभ**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**ऊर्णनाभि**–अत्रिकुलोत्पन्न ऋषि.

**ऊर्णा**–स्वायंभू मन्वंतरांतील मरीचि ऋषीची दुसरी स्त्री. हिला, स्मर, उद्गीथ, परिष्वंग, पतंग, क्षुद्रभृत् आणि घृणि, असे साहा पुत्र होते. हे साहाही, एके काळीं ब्रह्मदेवास, निष्कारण हंसले, त्यावरून ब्रह्मदेवानें यांस शाप दिला होता कीं, तुम्ही दुष्ट योनि पावाल. त्यावरून, हे सर्व प्रथमजन्मीं अनुक्रमानें हिरण्यकशिपूचे पुत्र होऊन, तत्काळ मरण पावले. दुसऱ्या जन्मीं कालनेमीचे पुत्र होऊन तेथेंही तसेच मेले. नंतर तिसऱ्या जन्मीं, वसुदेवापासून देवकीच्या उदरीं कृष्णापूर्वीं जन्मून व क्रमानेंच एकामागें एक, कंसाच्या हातून मरण पावून नंतर उत्तमलोकीं गेले. ( भाग० १० स्कं० अ० ८५ ). ( देवीभा० ४ स्कं० अ० २२ ).

२–( स्वायंभू० वं० ) ऋषभदेवकुलोत्पन्न चित्ररथ राजाची स्त्री, हिचा पुत्र सम्राट्. ( भाग० ५ स्कं० अ० १५ ).

**ऊर्णायु**–प्राधेपासून झालेल्या देवगंधर्वांतील एक. ( २ देवगंधर्व श० पहा ). याची स्त्री मेनका. ( भार० उद्यो० अ० ११७ ).

**ऊर्ध्वकेतु**–( विदे० वं० ) सनद्वाज जनकराजाचा पुत्र. याचा पुत्र, अजनामा जनक.

**ऊर्ध्वग**–कृष्णास लक्ष्मणेपासून झालेला पुत्र. हा महारथी होता.

**ऊर्ध्वबाहु**–पांचव्या रैवत मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

**ऊर्ध्वरोमा**–कुशद्वीपांतील एक महापर्वत.

**ऊर्मिला**–उर्मिला शब्द पहा.

**ऊर्व**–वारुणिभृगूच्या सात पुत्रांतील ज्येष्ठ जो च्यवन ऋषि, त्याचा पुत्र. और्वऋषीचा पिता.

२–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**ऊर्वशी**–उर्वशी शब्द पहा.

**ऊषा**–बली दैत्याचा पुत्र जो बाणासुर त्याची कन्या. ही यौवनावस्थेंत आल्यावर, एकदां सख्यांसहित रात्रीं स्वमंदिरीं निद्रित असतां,तिला स्वप्नांत एका तरुण आणि अति सुंदर अशा पुरुषाशीं समागम घडला. पुढें जागृत झाल्यावर आपल्या मनाशीं विरहयुक्त कांहीं भाषण करीत आहे तों, हिची सखी चित्रलेखा, हिला पुसूं लागली कीं, तूं कोणासाठीं विरह करीत आहेस ? त्यावरून हिनें स्वप्नांतील वृत्त सांगून, तिला म्हटलें, जर तो पुरुष प्राप्त झाला तर बरें, नाहीं तर अवस्था ठीक नाहीं. तेव्हां तिनें त्रैलोक्यांतील पुरुषमात्रांचीं चित्रें काढून हिला प्रत्यहीं दाखवीत असावीं व त्यांत हिचा प्रियपुरुष नाहीं, असें समजल्यावर पुनः दुसरीं चित्रें काढून दाखवावीं, असा क्रम चालविला. असें होतां होतां, एकदां तिनें यादवकुळ लिहिलें, त्यांत प्रद्युम्नाचें चित्र पाहून, ही, लज्जित होत्साती, अनिरुद्धाचें चित्र पाहतांच, लज्जेनें अधोमुख होऊन, हाच हाच तो, असें म्हणून स्तब्ध राहिली. त्यावरून चित्रलेखेनें जाणलें कीं, कृष्णाचा पौत्र, व प्रद्युम्नाचा पुत्र जो अनिरुद्ध, त्याचाच हिला समागम घडला आहे. नंतर ती, योगबलानें द्वारकेस गेली, आणि रात्रीं पर्यंकावर अनिरुद्ध निद्रित होता, त्यास पर्यंकासहित उचलून शोणितपुरास उषेच्या मंदिरांत घेऊन येऊन, उषेस जागृत करून म्हणाली कीं, हा घे तुझा प्रियपुरुष. त्यावरून उषेस पराकाष्ठेचा आनंद, व चित्रलेखेच्या सामर्थ्याचें आश्चर्य होऊन, तिनें अनिरुद्धाशीं गांधर्वविवाह केला, व त्यासह गुप्तपणें चार महिनेपर्यंत रमत सुखानें राहिली.

एकदां असें झालें कीं, बाणासुरानें उषेच्या मंदिरसंरक्षणार्थ जे सेवक ठेविले होते, त्यांच्या दृष्टीस उषा सहजगत्या पडली, तों त्यांस तिचें चिन्ह कांहीं भिन्न

दिसलें, व त्यावरून त्यांनीं अनुमान बांधलें कीं, हिला निश्चयेंकरून पुरुषसमागम झाला आहे. नंतर, पुढेंमागें ही गोष्ट गुप्त ठेविल्यास, आपणांस बाधक होईल जाणून, त्यांनीं तें हृद्गत वृत्त बाणासुरास कळविलें. तें अशा रीतीनें कीं, आम्ही अहोरात्र उषेचें द्वार संरक्षण करीत असतों, तथापि स्त्रियांचें कपट अगाध आहे, कसें तर, तिच्या मंदिरांत कोणी तरी पुरुष निश्चयेंकरून आहे, त्याचा आपण शोध करावा. असें सेवकांचें भाषण श्रवण करून, त्यास पराकाष्ठेचा कोप आला, व तो लागलाच निघून उषेच्या मंदिरांत येऊन पाहतो तों, ती, व अनिरुद्ध द्यूत खेळत आहेत. मग काय पुसावें ? बाणासुराचा कोपाग्नि, अनिरुद्धास पाहण्यानें अतिशयच प्रज्वलित होऊन, तो त्या आवेशांत त्याच्या अंगावर धांवला. अनिरुद्धानें पाहिलें कीं, आतां स्वस्थ बसून उपयोग नाहीं, म्हणून तोही हस्तांत परिघ घेऊन उठला असतां, दोघांचें वरेंच युद्ध झालें, त्यांत बाणासुरानें, नागपाश टाकून, अनिरुद्धास बद्ध करून प्रतिबंधांत ठेविलें, आणि उषेच्या संरक्षणाची अधिक व्यवस्था ठेवून, स्वमंदिरीं गमन केलें.

इकडे द्वारकेंत, अनिरुद्ध पर्यंकावर निजलेला असतां, एकाएकीं नाहींसा झाल्यामुळें, यादवांस पराकाष्ठेचा शोक होऊन, त्यांनीं त्याचा बहुत शोध केला, परंतु त्याची वार्ता कोठूनही ऐकूं येईना. म्हणून सर्व निराश होऊन बसले आहेत तों, नारद ऋषि प्राप्त झाले. त्यांस त्यांनीं, अनिरुद्धाविषयीं पुसलें, तेव्हां त्यांनीं, शोणितपुरींत बाणासुरानें बद्ध करून ठेविला आहे म्हणून सांगितलें. त्यावरून प्रद्युम्न, युयुधान, गद, सांब, सारण, नंद, उपनंद आणि भद्र, इ० यादव, कृष्णबलराम यांसहित बारा अक्षौहिणी सैन्य घेऊन, शोणितपुरीवर आले, आणि त्यांनीं नगरास वेढा दिला. हें बाणासुरास कळतांच, तोही सैन्य सिद्ध करून, कुंभांड सेनापतीसह नगराबाहेर युद्धास आला. त्यासमागमें महादेवांनीं, बाणासुराच्या नगरसंरक्षणार्थ जो रुद्र सतत ठेवला होता, तोहि आला होता. नंतर उभयसैन्यें व सैनिक, यांचें मोठें तुमुल युद्ध झालें. त्यांत बाणासुराची सेना बहुतेक नष्ट होऊन, कृष्णानें बाणासुराचे चार हस्त अवशेष ठेवून, शेष सर्व हस्त तोडिले असें पाहून, बाणमाता कोटरा कृष्णापुढें आली, आणि तिनें [illegible] द्यावें म्हणून कृष्णाची प्रार्थना केली. त्यावरून कृष्णानें, मी यास मारीत नाहीं, म्हणून तिला अभय देऊन बाणासुरास सोडिलें.

नंतर बाणासुरानें नगरींत जाऊन, अनिरुद्धास पाशमुक्त केलें, आणि त्याचा वस्त्राभरणांनीं गौरव करून, ऊषेसहित रथांत बसवून, कृष्णास आणून समर्पिलें. तेणेंकरून कृष्ण, आणि बलराम संतुष्ट होऊन, बाणास निरोप देऊन द्वारकेस परत आले. (भाग० १० स्कं० अ० ६२-६३ ).

---

## ऋ

**ऋक्**-ऋग्वेद.

**ऋग्वेद**-चार वेदांतील पहिला. हा, ब्रह्मदेवाच्या पूर्वमुखांतून उत्पन्न झाला असून, याचा उपवेद आयुर्वेद आहे. हा वेद, आपल्या उपवेदासहित सत्यलोकीं, सर्वदा मूर्तिमान् असतो. ( १ वेद श० पहा ).

**ऋचीक**-वैवस्वताख्य चालू मन्वंतरांतील, वारुणि भृगूच्या सात पुत्रांतील ज्येष्ठ जो च्यवन ऋषि त्याचा प्रपौत्र. ऊर्वऋषीचा पौत्र, व और्व ऋषीचा पुत्र. यानें, बाल्यावस्थेपासून आपला काळ वेदानुष्ठान व तप यांत घालविल्यानंतर, यास, गृहस्थाश्रम करावा असें वाटून, विवाहार्थ कन्या मागण्यासाठीं हा गाधि, ना० राजाकडे गेला. तेव्हां राजानें याचा सत्कार करून, किमर्थ येणें केलें म्हणून विचारिलें. त्यावरून राजास यानें आपला हेतु कळविला. तो ऐकून राजास विचार पडला कीं, कसें करावें. इतक्यांत त्यास युक्ति सुचून, यास त्यानें म्हटलें कीं, जर मला आपण सहस्र श्यामकर्ण अश्व आणून द्याल, तर ही सत्यवती ना० माझी कन्या मी आपणास तत्काळ देईन. ( मनांत हेतु कीं, याच्यानें सहस्र श्यामकर्ण मला देवणार नाहींत, अर्थात् सत्यवती यास कोठून प्राप्त होणार ? ). असें राजाचें भाषण यानें ऐकून, तत्काळ वरुणाकडे गमन केलें, आणि त्याजवळ अश्व मागितले. त्यावरून, वरुण याचा पूर्वज असल्यामुळें, त्यानें यास तत्क्षणींच अश्व देऊन मार्गस्थ करितांच, हा, ते घेऊन गाधिराजाकडे येत होत्साता, त्यास ते आणून समर्पण केले. त्यावरून राजास आश्चर्य होऊन, त्यानें मोठ्या संतोषानें, आपली सत्यवती कन्या यास दिली, व अश्वहि परत केले.

ऋचीक ऋषि, सत्यवती भार्येस घेऊन निघाला, व [illegible] गार्हस्थ्य धर्म चालवूं लागला. असे वरेच दिवस लोटल्यावर, याचा मूळ पुरुष भृगु ऋषि,

स्वेच्छेनें संचार करीत याच्या आश्रमीं आला असतां, ऋचीकानें व त्याच्या स्त्रीनें, त्यास मोठ्या संतोषानें कित्येक दिवस राहवून घेतलें, व त्याची त्यांनीं इतकी उत्कृष्ट सेवा केली कीं, तो सत्यवतीस वर मागण्यास आज्ञा करूं लागला. तेव्हां सत्यवती नम्र होऊन, तिनें प्रार्थना केली कीं, माझी माता अपुत्रा असल्यामुळें, माझा पिता गाधि परमदुःखी आहे, यास्तव तिला, व मला पुत्र होतील, अशी कृपा व्हावी, येवढेंच मागणें आहे. त्या तिच्या विनंतीनें भृगु संतुष्ट होऊन, त्यानें विराटपुरुषाभिमंत्रणानें, ब्राह्मणोत्पत्तीसाठीं एक, व क्षत्रियोत्पत्तीसाठीं एक, असे दोन चरु सिद्ध करून तिला दिले. ते तिनें घेऊन त्यांतील मातेचा मातेस दिला, व आपला भक्षणार इतक्यांत, सत्यवतीच्या मातेस, तिच्या चरूंत कांहीं विशेष असेल असें वाटून, तिनें तीस आपला चरु दिला, व तिचा आपल्यास घेतला. नंतर दोघींनीं, ते विपर्यस्त चरु भक्षिले असतां, दोघीहि गर्भिणी झाल्या. अल्पच काळांत, सत्यवतीकडे भृगूनें पाहिलें असतां, त्यास चरूचा विपर्यास झाल्याचें कळून आलें. त्यावरून तो सत्यवतीस म्हणूं लागला कीं, तुम्ही दोघींनीं विपर्यस्त करून चरु भक्षिलेंत, हें ठीक केलें नाहीं. अस्तु, परंतु यापासून असें होईल कीं, क्षात्र स्वभावानें युक्त असा पुत्र तुला होऊन, तुझ्या मातेस ब्राह्मलक्षणाचा पुत्र होईल. त्यावरून सत्यवतीनें प्रार्थना केली कीं, आपण समर्थ आहां, त्या अर्थीं, अशा स्वभावाचा पुत्र, मला न होण्याविषयींचा मजवर अनुग्रह करावा. तेव्हां भृगु ऋषि म्हणाले, तुझा पुत्र चांगला होऊन, पौत्र मात्र तसा होईल. इतकें सांगून भृगु गेले असतां, सत्यवतीस जमदग्निप्रभृति शत पुत्र झाले, व ते सर्व भृगूच्या वराप्रमाणें शांति, दांति, इत्यादिक गुणांनीं युक्त होत्साते, जमदग्नीपासून रेणुकेस झालेला परशुराम, तो मात्र उग्रस्वभावी झाला. इकडे गाधीस विश्वामित्र झाला, व त्यानें आपल्या तपःप्रभावानें पुनः ब्राह्मणत्व संपादिलें. या ऋचीक ऋषीच्या कुळांत, जे जे ऋषि निर्माण झाले, त्या सर्वांस प्रायः आर्चीक असें म्हटलेलें आहे. ( भार० अनु० अ० ५०–५१ ).

**ऋजु**–वसुदेवदेवकींचा कंसानें मारलेला पुत्र.

**ऋणंजय**–एक ब्रह्मर्षि.

**ऋत**–देववि० ( ३ आंगिरा श० पहा ).

२–( विदे० वं० ) विजय ना० जनकाचा पुत्र. याचा पुत्र शुनकसंज्ञक जनक.

३–बाराव्या रुद्रसावर्णि मनूस नामांतर.

**ऋतंजय**–एक ब्रह्मर्षि.

**ऋतधामा**–कंकास कर्णिकेपासून झालेल्या दोन पुत्रांतील पहिला. कृष्णाचा चुलत भाऊ.

२–रुद्रसावर्णि मन्वंतरांत स्वर्गामध्यें होणारा इंद्र.

३–तेराव्या देवसावर्णि मनूस नामांतर.

**ऋतध्वज**–एक ब्रह्मर्षि.

**ऋतंभरा**–प्लक्षद्वीपांतील एक महानदी.

**ऋतसेन**–एक गंधर्व. ( ४ सह श० पहा ).

**ऋतु**–एक यक्ष. ( १ तपस्य श० पहा ).

**ऋतुपर्ण**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अयुतायु राजाचा पुत्र. हा अक्षविद्यादिकांत परम निपुण असे. वीरसेनपुत्र नल राजा तो याचा परममित्र होता. (५ नल श० पहा). यास पुत्र सर्वकाम अ० सर्वकर्मा नामांतरानें नल नांवाचा होता.

**ऋतुस्थला**–अप्सरावि०

**ऋतेयु**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्व राजास, घृताची अप्सरेपासून झालेल्या दाहा पुत्रांतील ज्येष्ठ. यास औचेयु असें पुराणांतरीं नामांतर आढळतें, आणि तक्षककन्या ज्वलना ती याची स्त्री असून, तिला यापासून अंतिभार ना० पुत्र झाला होता.

**ऋत्वा**–गंधर्ववि०

**ऋत्विक्**–सोमवंशीय सहदेवपुत्र सोमक राजा, त्याचा मंत्रि. ( १ सोमक श० पहा ). हें ऋत्विक्, विशेष नांव वाटत नाहीं.

**ऋद्धि**–कुबेराची स्त्री. ( १ वैश्रवण श० पहा ).

**ऋभ**–चाक्षुष मन्वंतरांतल्या पंचविध देवांतील तिसरे.

**ऋभु**–एक ब्रह्ममानसपुत्र. ( भाग० ४ स्कं० अ० ८ ). याचा शिष्य निदाघ ऋषि.

२–चाक्षुष मन्वंतरांतल्या पंचविध देवांतील या संज्ञेचे दुसरे देववि०

**ऋश्यकेतु**–कृष्णपौत्र अनिरुद्धास नांव.

**ऋश्यशृंग**–कश्यपकुलोत्पन्न विभांडक ऋषीचा पुत्र. एकदां विभांडक गंगातीरीं स्नानास गेला असतां, तेथें त्यानें उर्वशी अप्सरेस पाहिलें, तेणेंकरून त्यास कामाविर्भाव होऊन, त्याचें रेत जलांत पतन पावलें. इतक्यांत, कोणी देवकन्या शापानें मृगयोनि पावलेली, तेथें जलपानार्थ आली होती. तिच्या उदरांत तें, ती जलप्राशन करीत असतां प्रविष्ट झालें; त्यापासून हा उत्पन्न झाला. याची सर्व आकृति मनुष्यासारखीच होती, परंतु मस्तकावर ऋश्य ना० मृगविशेषाचें शृंग होतें, त्यामुळें यास असें नांव पडलें होतें. ती मृगी

यास प्रसवतांच उद्धरून स्वर्गास गेली असतां, विभांडकानें यास आश्रमीं आणून पाळिलें. यास विभांडकानें वेदवेदांगादिकांत चांगलें प्रविण केलें होतें. हा मातृयोनीप्रमाणें कांहींसा भीरु असून, सोळा वर्षांचें वय होईपर्यंत, पित्यावांचून व इतर पुरुषव्यक्तीवांचून, यानें अन्य कोणासच पाहिलें नव्हतें; त्यामुळें यास, स्त्रिया मुळींच विदित नव्हत्या.

कांहीं काळानें, अनुकुलोत्पन्न अंगराजा, तद्वंशीय बृहद्रथ अ० धर्मरथ ना० अंग देशाच्या राजाचा पुत्र, चित्ररथ राजा, ज्यास रोमपाद किं० लोमपाद म्हणत असत, त्याच्या देशांत आवर्षण पडलें. त्यावरून त्यानें ब्राह्मणांस पुसलें कीं, काय केलें असतां वृष्टि होईल ? तेव्हां ब्राह्मण म्हणाले, ऋश्यशृंगास येथें आणून, त्याचें पूजन करशील तर तत्काळ वृष्टि होईल. तें राजानें ऐकून, येथें तो कसा येतो, कारण त्याचा पिता विभांडक, महाक्रोधी आहे, अशा विचारांत राजा आहे तों, कांहीं वेश्यांनीं त्यास आणण्याचें पत्करलें. नंतर त्या, विभांडक आश्रमांत नाहीं अशी संधी पाहून तेथें गेल्या, व त्यास युक्तीनेंच राजाकडे घेऊन आल्या. त्यावरून राजास फार आनंद होऊन, त्यानें आपली कन्या शांता, यास विवाहविधीनें देऊन, याचें पूजन केलें, व तें करतांच राज्यांत अतोनात वृष्टि झाली. इकडे विभांडक आश्रमीं येतो. तों पुत्र नाहीं, त्यावरून तो मोठ्या आवेशानें राजाकडे आला; परंतु राजानें त्याचा सन्मान करून, ऋश्यशृंग पुत्र व शांता स्नुषा यांस, त्याकडे नमस्कारार्थ आणिलें. त्यांस पाहून विभांडकाचा कोप शांत झाला, व त्यानें पुत्रास सांगितलें कीं, तुला एक पुत्र होतांच, तूं पुनः सत्वर आश्रमास यावेंस. असें बोलून राजास आशीर्वाद देऊन परत गेला. नंतर कांहीं कालानें ऋश्यशृंगास शांतेच्या ठायीं पुत्र झाला असतां, तोही पित्याकडे लवकरच आला, (भार० वन० अ० ११०–११३).

यास, दशरथ राजानेंही पुत्रकामेष्टि करण्यासाठीं, आयोध्येस आणिलें होतें, व याच्या हातून इष्टि होतांच, त्यास पुत्र झाले होते. ( अध्या० रा० बाल० स० ३ ). हा ऋश्यशृंग, पुढील आठव्या सावर्णि मन्वंतरांत, जे सप्तर्षि होतील, त्यांतील एक ऋषि होणार आहे.

**ऋषभ**–एक महा तपस्वी ऋषि. हा हेमकूट पर्वताच्या ऋषभकूट ना० शृंगावर राहात असतां, याकडेस कित्येक जन निरर्थक जाऊं लागल्यामुळें, यास अत्यंत उद्वेग होऊं लागला, म्हणून यानें पर्वतास व वायूस आज्ञा केली कीं, जो कोणी मजकडे येऊं लागेल त्यावर तुम्ही पाषाणवृष्टी करून माघारें फिरवीत जावें. त्याप्रमाणें ज्या दिवसापासून होऊं लागलें, त्या दिवसापासून त्याकडे कोणी जाईनासें होऊन, त्यास उद्वेग होईनासा झाला. ( भार० वन० अ० ११० ).

२–एक ब्रह्मर्षि. यानें सुमित्र राजास, आशा किती मोठी असते, तीविषयीं निरुपण केलें होतें. (भार० शांति० अ० १२५–१२८).

३–वृत्रासुरानुयायी एक असुर तो.

४–द्वादशादित्यांतील इंद्र आदित्याचा पुत्र तो.

५–रामसेनेंतील एक वानर. यानें महापार्श्वास मारिलें होतें. ( वा० रा० युद्ध० स० ७० ).

६–जरासंधपिता बृहद्रथ राजा, यानें ज्यास मारून, त्याच्या चर्माच्या दुंदुभी केल्या होत्या, तो असुर.

७–रामानें आयोध्येंतील संपूर्ण जन निजधामास नेले असतां, कित्येक कालपर्यंत ती शून्य होऊन पडली होती. पुढें ज्यानें तींत पुनः वस्ती केली, तो सूर्यवंशीय राजा. ( अयोध्या श० पहा ). या राजाचें नांव वंशावळींत आढळत नाहीं.

८–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न बृहद्रथ राजा, त्याच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ जो कुशाग्र राजा, त्याचा, पुत्र. यास सत्यहित ना० पुत्र होता.

९–मेरुकर्णिका पर्वतांतील एक.

१०–हिमालयाचें औषधियुक्त शृंगवि०. रामलक्ष्मण लंकेमध्यें युद्धांत मूर्छित झाले असतां, हें, मारुतीनें तेथें नेऊन, त्यांस सावध केलें होतें. ( वा० रा० युद्ध० स० ७४ ).

११–भारतवर्षीय दक्षिण दिशेकडील एक पर्वत. यावर शैलूष, ग्रामणी, शिक्ष, शुक आणि बभ्रु, असे पांच गंधर्व राहून, गोशीर्षक, इ० चतुर्विध, चंदनाचें रक्षण करीत असतात. ( वा० रा० किष्किं० स० ४१).

१२– कृष्णबलरामसखा एक गोपवि० ( भाग० १० १० स्कं० अ० २२ ).

१३– भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

१४– दक्षसावर्णि मन्वंतरांत होणारा विष्णूचा अवतार. ( दक्षसावर्णि श० पहा ).

**ऋषभकूट**–हेमकूटपर्वताचें शृंग, यावर ऋषभ ऋषीचा आश्रम असल्यामुळें, यास, हें नांव होतें. यावर देवांनीं कांहीं कालपर्यंत वास करून, अनेक यज्ञ केले होते.

**ऋषभतीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ.

**ऋषभदेव**–( स्वायंभु० वं० ) प्रियव्रत राजाचा ज्येष्ठ

पुत्र आग्नीध्र, त्याच्या नऊ पुत्रांतील आद्य जो नाभि ना० राजर्षि, त्यापासून मेरु देवी नामेंकरून त्याच्या भार्येच्या ठायीं झालेला पुत्र. हा महान् योगी, व तत्त्ववेत्ता होता. यास, त्या वेळच्या स्वर्गातील यज्ञ ना० इंद्रानें, आपली कन्या जयंती, ती भार्यार्थ दिली होती. तिचे ठायीं यास भरतप्रभृति शत पुत्र झाले होते. त्यांत ८१ कर्ममार्गाचरण करणारे ऋषि होऊन, **कवि, हरि, अंतरिक्ष, प्रबुद्ध, पिप्पलायन, आविर्होत्र, द्रुमिल, चमस** आणि **करभाजन**, हे नऊ परमब्रह्मनिष्ठ होते. यांचा जनकराजाशीं, ब्रह्मविद्यासंबंधानें अत्युत्तम संवाद झालेला प्रसिद्ध आहे. (भाग० ११ स्कं० अ० १–५ ). राहिले पुत्र **भरत, कुशावर्त, इलावर्त, ब्रह्मावर्त, मलय, केतु, भद्रसेन, इंद्रस्पृक, विदर्भ**, आणि **कीकट**, असे दाहा; त्यांत कुशावर्त आदिकरून नवांस ऋषभ देवानें, आपल्या पित्याच्या नांवानें चालणारा जो जंबुद्वीपाच्या नऊ वर्षांतील एक अजनाभ नांवाचा वर्ष, त्याचे नऊ खंड करून, व त्यांस त्यांचींच नांवें देऊन, त्यावर एकेकास अधिपति केलें. नंतर शेष राहिला जो सर्वांमध्यें श्रेष्ठ भरत, त्यास, त्या नांवांवर सार्वभौमत्व दिलें. हें भरताचें सार्वभौमत्व गौण असें समजावें; कारण सप्तद्वीपांवर सत्ता असल्याशिवाय, पूर्ण सार्वभौमत्व नाहीं. तें एक, होऊन गेलेले व होणारे जे मनु, त्यांस मात्र असायाचें.

ऋषभ देवानें, आपला पिता नाभिराजा, त्याच्या पश्चात्, व पुत्र होण्यापूर्वी, अजनाभ वर्ष, हा कर्मभूमि असल्यामुळें, येथें यज्ञादिक, तसेंच गुरुपसात्ति आदिकरून, कर्माचे प्रकार जनांस प्रदर्शित करून, संपूर्ण प्रजा धर्मवर्ती केल्या होत्या, व प्रजेचें उत्तम प्रकारें पालन करून, संपूर्ण प्रजेस, व आपल्या पुत्रांस, ब्रह्मविद्येचा उपदेश केला. त्यांतील दिक्प्रदर्शनार्थ वाक्य असें:—

गुरुर्न सः स्यात्स्वजनो न सः स्यात्
पिता न सः स्याज्जननी न सा स्यात् ।
दैवं न तत्स्यान्न पतिश्च सः स्या
न्न मोचयेद्यः समुपेतमृत्युम् ॥
( भाग० ५ स्कं० अ० ५ श्लो० १८ ).

इत्यादिक प्रकारें भरतादिकांस उपदेश केल्यावर, ब्रह्मावर्त ना० पुत्राच्या खंडांत जाऊन स्थित झाला असतां, तीव्र आत्मानुसंधानानें देहावरील भान सुटून, नग्न, व मुक्तकेश असा होत्साता, जडोन्मत्तपिशाचाप्रमाणें पृथ्वीवर भ्रमण करूं लागला. फिरतां फिरतां, कोंकवेंक प्रदेशांतून दक्षिण कर्णाटकांत आला. तेथें कुटकाचलसंबंधीं वनांतून जातां जातां, याच्या जटा, वेणु वृक्षास गुंतल्यामुळें, तेथेंच उभा होता. कांहीं कालानें, त्या वृक्षांच्या परस्पर संघर्षणांत अग्नि उत्पन्न होऊन, तें वेणुवृक्षांचें वन दग्ध झालें, त्यांत याचाही देह दग्ध झाला. ( भाग० ५ स्कं० अ० ३–६ ).

**ऋषभयोगी**–शिवांशानें भूमीवर संचार करणारा कोणी योगी. ( स्कंद० ब्रह्मोत्तर० ).

**ऋषभस्कंध**–रामसेनेंतील वानर. ( वा० रा० युद्ध० स० ४६ ).

**ऋषभा**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. (विंध्य श० पहा).

**ऋषिक**–भारतवर्षीय दुर्योधनपक्षीय राजा.

२– भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा, परम कांबोजाच्या उत्तरेस असून, याच्या उत्तरेस पुढें हिमालय महापर्वत आहे. (यास प्रस्तुत रशिया असें म्हणतात). येथें हिमालय लिहिलेला, मुख्य हिमालय समजावा. उपगिरि म्हणजे प्रस्तुत जो आपण पाहतों, हा समजूं नये. ( भार० सभा० अ० २९ श्लो० २५ –२९ ).

**ऋषिकुल्या**–ऋषभदेववंशीय भूमा ना० राजाच्या दोन स्त्रियांतील पहिली, हिचा पुत्र उद्गीथ.

२– मुख्य हिमालयाच्या उत्तरेकडील एक नदी.

३– भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( २ महेंद्र श० पहा).

**ऋषिगिरि**–मगध देशांतील सीमाभूत एक सामान्य पर्वत.

**ऋषिज**–औशज ऋषि तोच.

**ऋषिवान्**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**ऋष्टिक**–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. ( वा० रा० किष्किं० ).

**ऋष्य**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय जन्हु राजा, त्याच्या कुलांतील देवातिथि राजाचा पुत्र. यास दिलीप ना० पुत्र होता.

**ऋष्यकेतु**–ऋश्यकेतु श० पहा.

**ऋष्यमूक**–भारतवर्षीय भरतखंडस्थ पंपासरोवरासमीपचा जो मतंग ना० सामान्य पर्वत त्याचें शृंग. येथें मतंग ऋषीचा आश्रम असे. हा पर्वत मतंगाच्या शापामुळें वालीस गमनार्थ वर्ज्य होता म्हणून, सुग्रीव आपल्या सचिवांसह यावर राहून कालक्रमणा करीत असे. मतंग पर्वतास, ऋष्यमूकाप्रमाणेंच मलय नांवाचें दुसरेंहि एक शृंग होतें. ( वा० रा० किष्किं० स० १–२ ).

**ऋष्यवान्**–भारतवर्षीय भरतखंडस्थ एक उपपर्वत. (अष्टमुख्य पहा). मंदाकिनी, दशार्णा, चित्र-

कूटा, तमसा, पिप्पली, श्येनी, चित्रोपला, विमला, चंचला, धूतवाहिनी, शुक्तिमती, शुनी. लज्जावती, मुकुटा, आणि ऱ्हादिका इ० नद्यांचें हा उत्पत्तिस्थान म्हटलेला आहे. ऋक्षवान् यासच नामांतर होय. ( मत्स्य० अ० ११३ ).

**ऋष्यशृंग**–ऋश्यशृंग शब्द पहा.

**ऋक्ष**–एक ब्रह्मर्षि. भरद्वाजांगिरस कुल. ( ३ अंगिरा श० पहा ).

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजाच्या चार पुत्रांतील एक. याचा पुत्र संवरण राजा.

**ऋक्षगिरि**–भारतवर्षीय पर्वत.

**ऋक्षदेव**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशांतील पांचालकुलांत जन्मलेल्या द्रुपद राजाचा पुत्र जो शिखंडि, त्याच्या दोन पुत्रांतील एक. हा भारती युद्धांत पांडवांकडे होता. युद्धसमयीं हा, आपल्या रथास सोनेरी रंगाचे अश्व जोडीत असे. ( भार० द्रोण० अ० २३ ).

**ऋक्षरजा**–एकदां सत्यलोकीं ब्रह्मदेव समाधिस्थ असतां, आत्मस्वरूपीं लीन झालेल्या वृत्तीचें ज्या काळीं उत्थान झालें, त्या काळीं, अनुभूत आनंदाच्या योगानें जे नेत्रांतून आनंदाश्रु निघाले, ते त्यांनीं अंजलींत धारण करून, भूमीवर टाकले, त्यांपासून एक वानर उत्पन्न झाला, तोच हा. यास ब्रह्मदेवांनीं, कित्येक कालपर्यंत आपल्यासमीपच ठेविलें होतें, त्यावरून, यानेंही प्रत्यहीं फळें, मूळें व पुष्पें, आणून ब्रह्मदेवास निवेदन करीत असावीं, व सेवा करीत असावी. एके काळीं हा, फलमूलादिकांर्थ, मेरुपर्वतावर संचार करीत असतां, तेथें यानें सरोवर पाहिलें, व त्यांत यांस, याचें प्रतिबिंब गोचर झालें तें पाहून, तो कोणीतरी अन्य वानर असावा असें यास वाटून त्यावर यानें उडी घातली, परंतु त्या जलांत अन्य कोणी नाहीं, असा याचा निश्चय होतांच हा बाहेर आला, आणि पाहूं लागला तों, आपली पुरुषाकृति सर्व लोपली जाऊन, आपणास स्त्रीची आकृति प्राप्त झाली आहे. त्यावरून यास आश्चर्य व भय दोनही उत्पन्न होऊन, परमलज्जित होत्साता तेथेंच बसून कसें करावें असा विचार करीत आहे तों, इंद्र, आणि सूर्य, मध्यान्ह-समयींचें ब्रह्मदेवाचें दर्शन व पूजन करून, स्वलोकीं येण्यास परतले होते त्यांनीं या स्त्रीस क्रमेंकरून पाहिलें. त्यावरून उभयतांचाही कामसंकल्प, त्या स्त्रीचा वाल-प्रदेश आणि ग्रीवा, यांवर पडून त्यांपासून वाली व सुग्रीव, असे दोन वानर तत्काळ उत्पन्न झाले. त्यांस, त्यांनीं अनुक्रमानें मालादि प्रसाद देऊन गमन केल्या-वर, यानें त्या उभय बालकांसहित, तो दिवस तेथेंच काढिला. दुसऱ्या दिवशीं ऋक्षरजा पाहूं लागला तों, आपण पूर्ववत् पुरुष आहों. त्यावरून तो पुत्रांस घेऊन, ब्रह्मदेवांकडे गेला व वंदन करून, त्यांस त्यानें झालेलें वृत्त निवेदन केलें. तें ऐकून ब्रह्मदेवांनीं तत्काळ एका दूतास हाक मारिली, आणि त्यास आज्ञा केली कीं, तूं भूलोकीं जा, आणि या ऋक्षरजास किष्किंधा म्हणून नगरी आहे, तींत राज्याभिषिक कर. त्याप्रमाणें दूतानें यास किष्किंधेच्या राज्यावर स्थापिलें असतां, यानें आपला ज्येष्ठपुत्र वाली, यास युवराज केलें. पुढें सुषेण ना० वानराची कन्या तारा; अतिरूपवती पाहून तिशीं त्याचा विवाह केला, आणि तार ना० वानराची कन्या रुमा, तिचाहि तसाच सुग्रीवाशीं विवाह केला. कालांतरानें ऋक्षरजा मरण पावला, तेव्हां वालीस राज्य प्राप्त होऊन, सुग्रीव युवराज्य चालवूं लागला. ( वा० रा० उत्तर० प्रक्षिप्त० स० १ ).

**ऋक्षवान्**–ऋष्यवान् शब्द पहा.

---

## ऋ ऌ ॡ

०

---

## ए

**एक**–( सो० व० ) पुरूरवा राजाच्या साहा पुत्रांतील चवथा रय, त्याचा पुत्र.

**एकचक्र**–दनुपुत्र एक दानव.

**एकचक्रा**–भारतवर्षीय भरतखंडस्थ एक नगरी. पांडव लाक्षागृहांतून वांचून निघाल्यावर, हींत विप्रवेषानें येऊन राहिले होते. ( भार० आदि० अ० १५६ ). येथें कुंतीसहवर्तमान पांडव राहात असतां, बकासुर ना० कोणीएका राक्षसानें, त्या नगरींतील प्रत्येक गृहावर क्रमानें प्रतिदिवशीं त्यास अमुक अन्नादि देत जावें, असा कर बसविला होता. ती पाळी, हे, ज्या ब्राह्मणाच्या गृहीं उतरले होते, त्यावर त्याच समयास आली होती. तिचें निवारण भीमाकडून कुंतीनें करवून त्या ब्राह्मणासुद्धां सर्व नगरीस सुखी केलें होतें. ( २ बकासुर श० पहा ).

**एकजटा**–सीतासंरक्षणार्थ असलेल्या राक्षसींतील एक. ( वा० रा० सुंदर० स० २३ ).



**एकत**–ब्रह्मदेवाचा मानसपुत्र. द्वित आणि त्रित, यांचा

ज्येष्ठ भ्राता. हे तिघेही प्रथमार्थक उपरिचर वसूच्या यज्ञामध्यें सदस्य होते ( भार० शांति० अ० ३३६ ).

२–गौतम ऋषीच्या तीन पुत्रांतलि ज्येष्ठ. यांचींही अशींच नांवें होतीं. ( भार० शल्य० अ० ३६ ).

**एकपर्णा**–हिमवानास मेनेपासून झालेल्या तीन कन्यांतील दुसरी; अपर्णा व पर्णा यांची भगिनी. ही, असित ऋषीची स्त्री.

**एकपादा**–सीतासंरक्षणार्थ असणाऱ्या राक्षसींतील एक. ( भार० वन० अ० २८० ).

**एकलव्य**–हिरण्यधेनुक ना० निषादाधिपतीचा पुत्र. भीष्मानें द्रोणाचार्यास, धार्तराष्ट्र आणि पांडव इ० मुलांस धनुर्वेद शिकविण्यासाठीं हस्तिनापुरीं आपणासमीप ठेवून घेतल्यावर, तीं मुलें त्यासमीप अभ्यास करूं लागलीं. हें वर्तमान देशोदेशीं कळून, अनेक राजपुत्र तेथें येऊन द्रोणासमीप अस्त्रविद्येचा अभ्यास करूं लागले, असें ऐकून हाही तेथें आला, आणि माझा अंगीकार करून विद्या पढवावी म्हणून आचार्यास प्रार्थूं लागला. परंतु त्यांनीं याचा अंगीकार केला नाहीं. त्यावरून, यानें द्रोणाचार्यांच्या पादुका मागितल्या, त्या त्यांनीं यास विमुख लावूं नये म्हणून दिल्या असतां, हा, त्या घेऊन स्वगृहीं आला, आणि भक्तिपुरःसर द्रोणाचार्यांची मृण्मय मूर्ति करून, व तीपुढें आणलेल्या पादुका ठेवून, त्यांचीं नियमपूर्वक नित्य पूजा करीत होत्साता, हस्तामध्यें आपणच धनुष्यबाण घेऊन उभा राही, व असें अस्त्र सोडूंना ? म्हणून आपण आपल्याच मनास प्रश्न करी, व आपणच, हो हो, असेंच सोड, म्हणून उत्तर करून सोडी. असें करतां करतां, विमोक्ष, आदान, संधान इ० जीं धनुर्विद्येचीं प्रकरणें, त्यांत तो अल्प काळांतच तिकडे प्रवीण झाला.

इकडे कौरव, पांडव, तसेंच अन्य राजपुत्र, हेही धनुर्विद्येंत प्रवीण होऊन, एकदां सर्वही मृगयेस गेले, व मृगामागें लागले असतां, त्यांचा मृगयाश्वान त्यांपासून दूर राहून चुकल्यामुळें, जेथें एकलव्य होता तिकडे गेला. परंतु त्यास नेहेमीं सुंदर वेष केलेल्या राजपुत्रांस पाहाण्याची संवय असल्यामुळें, विचित्र–वेषधारी एकलव्यास त्यानें पाहून, तो त्याच्या अंगावर भुंकूं लागला. तें त्याचें पसरलेलें मुख एकलव्यानें पाहून, त्यांत अशा युक्तीनें एक लहान लहान बाणांचा जुंबडा भरला कीं, त्यास भुंकतां, व तोंड मिटतां येऊं नये. पुढें तो श्वान लांबून पळाला, व इकडे तिकडे हिंडत आहे तों, त्यानें राजपुत्रांस, व राजपुत्रांनीं त्यास परस्पर पाहिलें. नंतर तो समीप आला असतां, संपूर्ण राजपुत्रांनीं त्याच्या मुखांत भरलेला बाणांचा जुंबडा पाहतांच, त्यांस अति आश्चर्य झालें, व अशी कृति करणारा धनुर्धर या अरण्यांत कोण असावा, म्हणून ते त्याचा शोध करीत चालिले. जातां जातां, हस्तांत धनुष्यबाण घेतलेल्या एकलव्यास त्यांनीं पाहिलें, व हाच तो असावा म्हणून ते सर्व तेथें उभे राहिले.

नंतर सर्व राजपुत्रांत, एकजण पुढें होऊन, त्यानें यास पुसलें कीं, तूं कोण, व कोणाचा शिष्य आहेस ? यानें उत्तर केलें, मी हिरण्यधेनुक ना० निषादाधिपतीचा पुत्र असून, द्रोणाचार्यांचा शिष्य आहे. व त्यावरून सर्वांसही कांहींसा विषाद वाटून ते गृहीं आले, आणि आचार्यास म्हणाले कीं, आपण आम्हांस न कळूं देतां, गुप्तपणें एक निषाद प्रवीण केलात हें कसें ? तें ऐकून द्रोणाचार्यास त्याचा कांहींच संबंध ध्यानांत येईना, तथापि तो कोण असावा हें पाहावें म्हणून, आचार्य हस्तिनापुरांतून राजपुत्रांस समागमें घेऊन त्यास पाहाण्यास निघाले, व तेथें गेले. त्यांस पाहातांच एकलव्यानें दंडवत् प्रणाम केला, व हात जोडून आचार्यांपुढें उभा राहिला. पुढें द्रोणाचार्यांनीं, याच्या अस्त्रविद्येची परीक्षा पाहून, तींत तो उत्कृष्ट प्रवीण आहे असें जाणल्यावर त्यास पुसलें कीं, ही विद्या, तूं मजपासून कशी संपादन केलीस ? तेव्हां यानें संपूर्ण पूर्ववृत्त त्यांस निवेदन केलें. तें ऐकून राजपुत्र निःसंशय झाले, व याच्या भावनेचें आणि आचार्यांच्या पुण्यप्रभावाचें, त्यांस परमाश्चर्य होऊन, परस्परांशीं गोष्टी करीत आहेत तों आचार्यांनीं, हा, प्रसंगवशात् अर्जुनासही भारी होईल, असें मनांत आणून, यास गुरुदक्षिणा मागितली कीं, तूं तुझा अंगुष्ठ, बाण सोडतांना इतःपर कधींही त्यास स्पर्शवीत जाऊं नको, व त्यावरून यानें तथास्तु म्हणून त्या दिवसापासून बाणास अंगुष्ठाचा स्पर्श करणें सोडिलें. तें व्रत अजून सर्व किरात पाळतात. तात्पर्य, इतकें जरी द्रोणाचार्यांनीं यास बांधून घेतलें होतें, तरी हा अर्जुनास भारीच होता. ( भार० आदि० ). हा भारती युद्धांत दुर्योधनाकडे म्हणायास मात्र होता; परंतु युद्धसमयीं मुळींच आला नाहीं.

**एकलोचना**–सीतासंरक्षणार्थ असलेल्या राक्षसींतलि एक. ( भार० वन० अ० २८० ).

**एकवीर** ( सो० वं० )–तुर्वसुकुलांत उत्पन्न झालेल्या,

हरिवर्मा ना० राजास विष्णुप्रसादानें प्राप्त झालेला पुत्र. हा वाजीरूपधर विष्णूपासून, वडवारूप धारण केलेल्या लक्ष्मीच्या ठायीं उत्पन्न झाला होता म्हणून,यास हैहय असें नांव होतें. हा यदुकुलोत्पन्न हैहय राजाहून अगदीं भिन्न असून, यास एकावली, आणि यशोवती अशा दोन स्त्रिया होत्या, व याची उपास्यदेवता एकवीरा ना० देवी होती. (देवीभा० ६ स्कं० अ० १७–२३ ).

**एकवीरा**–एकवीर राजाची उपास्यदेवता.

**एकसाला**-- ग्रामवि०. ( वा० रा० अयो० स० ७१ ).

**एकादशरुद्र**–चालू वैवस्वत मन्वंतरांतील जो ब्रह्ममानसपुत्र स्थाणु, त्याच्या अनेक पुत्रांतील अकरा प्रमुख ते. हे प्रस्तुत सप्तविध देवांतलि तिसरे देव असून, भूत, पिशाच्च, यक्ष, राक्षस इत्यादिकांचे आधिपति आहेत. यांचीं नांवें आहेत तीं अशीं.--**मृगव्याध, सर्प, निर्ऋति, अजैकपात्, अहिर्बुध्न्य, पिनाकी; दहन, ईश्वर, कपालि, महाद्युति** आणि **भर्ग**. ( भार० आदि० अ० ६५ ). पुराणांतून पाहातां, यांतील कांहीं नांवें कित्येक नांवांशीं जमतात, कित्येक जमत नाहींत. मग तीं तशीं कां झालीं अ० लिहिलीं त्यांचें कारण कळत नाहीं, परंतु इतकें मात्र नियमित आहे कीं, रुद्र तेथून कोणताही ग्रंथ पहा, सर्वत्र अकराच आहेत, त्यांत घोटाळा नाहीं.

**एकांभक**–भारतवर्षीय क्षेत्र व तीर्थ.

**एकायन**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु० श० पहा ).

**एकावली**–एकवीर राजाची स्त्री. रम्य राजास रुक्मरेखेच्या ठायीं झालेली कन्या.

**एकाक्ष**–दनुपुत्र एक दानव.

**एलापत्र**–कद्रुपुत्र एक नाग. ( ५ नभ० श० पहा ).

**एलापूर**–भारतवर्षीय क्षेत्र.

**ऐकेपि**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**ऐडविड**--इडाविडेचा अ० इलविलेचा पुत्र जो कुबेर तो.

२—शतरथ राजा, ज्यास इडाविड असें नामांतर होतें. त्याचा पुत्र. हा राजा सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न होता. याचा पुत्र वृद्धशर्मा.

**ऐतरेय**–ऋक्शाखीय एक ऋषि, व उपनिषत्.

**ऐंद्रद्युम्नि**—( विदे० वं० ) एक जनकवंशीय राजा, व इंद्रद्युम्नाचा पुत्र असावा. याचें नांव वंशमालिकेंत नाहीं. हा, अष्टावक्राच्या वेळेस होता. ( अष्टावक्र श० पहा ).

**ऐंद्रबाहू**–रैवत मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

**ऐरंडी**–नर्मदेस मिळणारी एक नदी.

**ऐरावण**–ऐरावत गजास म्हटलेलें आढळतें.

**ऐरावत**–एक नाग. ( १ तपस्य श० पहा ). हा, कद्रुपुत्र होय.

२—पृथिवीच्या आसमंतात् आठही दिशांकडे जे दिग्गज आहेत, त्यांतील पूर्वेकडील तो. हा सर्व दिग्गजांचा स्वामी, व इंद्राचा वाहनरूप होय. हा शुभ्रवर्णाचा असून यास चार दांत आहेत.

३—समुद्रमंथनकालीं निघालेला जो चवदा रत्नांतील गज तो.

**ऐरावतकुल**–कद्रुपुत्र नाग. जनमेजयाच्या सर्पसत्रांत, यांचीं १० कुळें दग्ध झालीं, त्यांचीं नांवें पारावत, पारियात, पांडुर, हरिण, कृश, विहंग, शरभ, मेद, प्रमेद आणि संहतापन.

**ऐरावतवर्ष**–कुरुवर्षास नांव.

**ऐरावती**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( २ हिमालय श० पहा ).

**ऐरीडव**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**ऐल**–इलेचा पुत्र जो पुरूरवा राजा, त्यास नामांतर.

**ऐलधान**–भारतवर्षीय नगरवि०

**ऐलविल**–ऐडविड श० पहा.

**ऐलिक**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**ऐक्ष्वाकी**–कोणत्याही इक्ष्वाकुकुलोत्पन्न राजाच्या कन्येचें साधारण नांव.

**ओंकार**–मंत्रयुक्त ईश्वराचें नांव, व वेदारंभीं उच्चारणीय प्रणव.

**ओघरथ**–( सू० वं० ) नृगकुलोत्पन्न ओघवान् राजाचा पुत्र. यासही नृग ना० पुत्र होता.

**ओघवती**–नृगकुलोत्पन्न ओघवान् राजाची कन्या, ओघरथाची भगिनी. ही सुदर्शन राजाची स्त्री होती.

२–सरस्वती नदीच्या सप्तप्रवाहांतील एक प्रवाह अ०नदी. हिच्याच समीप कौरवपांडवांचें युद्ध झालें. ( भार० शल्य० अ० ६२ ). ( भार० शांति० अ० ५० ).

**ओघवान्**–( सू० वं० ) नृगकुलोत्पन्न प्रतीक राजाचा पुत्र. याचा पुत्र ओघरथ, व कन्या ओघवती. ( भार० अनु० अ० २ ).

**ओज**–कृष्णास लक्ष्मणा स्त्रीपासून झालेला पुत्र, हा महारथी होता.

**औग्रसेनि**–उग्रसेनाचे कंसादिक नऊ पुत्र ते प्रत्येक.

**औघरथ**–सूर्यवंशीय दुसरा नृग राजा, ओघरथाचा पुत्र.

**औचेयु**-ऋतेयु श० पहा.

**औंड्म्लेंच्छ**-भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**औत्तमी**-उत्तम मनूचा पुत्र व त्याचें मन्वंतर तें.

**औत्तानपादी**-उत्तानपाद राजाचा पुत्र ध्रुव तो.

**औपगहय**-एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**और्व**-दुसऱ्या स्वारोचिष मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

२-वारुणि भृगूच्या सात पुत्रांतील चौथा. ( ३ भृगु श० पहा ).

३-वारुणि भृगूच्या सात पुत्रांतील पहिला जो च्यवन, त्याचा पुत्र, व ऊर्वऋषीचा पुत्र तो. कोठें असेंही आढळतें कीं, हा, मातेच्या ऊरूचा ( मांडीचा ) भेद करून निघाला म्हणून यास नांव और्व. तात्पर्य, याच्या नांवास दोनेहीं प्रकार लागू आहेत. हा मोठा झाल्यावर, यास असें कळलें कीं, हैहयकुलोत्पन्न राजांनीं, आपल्या कुलांतील स्त्रियांस व पुरुषांस द्रव्यानिमित्त बहुत पीडा दिली होती यास्तव त्यांचा नाश करण्यास, यानें मोठें उग्र तप आरंभिलें. त्यापासून परम भयंकर अग्नि उत्पन्न होऊन, तो त्या क्षत्रियांस जाळूं लागला. तेव्हां क्षत्रिय, याच्या पितरांस शरण आले असावेत, म्हणून त्यांनीं येऊन याचा कोपानल याकडून समुद्रांत टाकविला. ( भार० आ० अ० १७९-१८१ ).

**औशनस**-उशना ऋषीचे पुत्र ते. ( शंडामर्क श० पहा ).

२-भारतवर्षीय तीर्थ. येथ उशना ऋषीनें तप करून, नीतिविषयक अनेक सूत्रेंही बांधिलीं, म्हणून यास हें नांव पडलें. या तीर्थास कपालमोचन असेंही नांव आढळतें. ( भार० शल्य० अ० ३९ ).

३-गौतमांगिरसवंशमालिकेंतील एक ऋषि व त्याचें कुल तें. ( ३ आंगिरा श० पहा ).

**औशीनर**-उशीनर राजापासून माधवीस झालेला जो पुत्र शिबि तो. ( भार० द्रोण० अ० ५८ ).

**औक्षी**-उक्ष ऋषीचा पुत्र तो. ( ३ भृगु श० पहा ).

---

## क

**क**-प्राचेतस दक्षास नामांतर. ( भार० शांति० अ० २०८ श्लोक ७ ).

**कंक**-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न शूर राजास, मारीषा अ० भोजेपासून झालेल्या दाहा पुत्रांतील सातवा, वसुदेवाचा भ्राता, यास कर्णिका स्त्रीपासून ऋतधामा आणि जय, असे दोन पुत्र झाले होते.

२-( सो० वं० ) उग्रसेनाच्या नऊ पुत्रांतील चौथा, कंसाचा कनिष्ठ भ्राता.

३-अज्ञातवासकालीं विराटगृहीं प्रवेश करितांना युधिष्ठिरानें आपणास धारण केलेलें नाम. ( भार० विराट० अ० १ आणि ७ ). हा विराटाचा सभासद असून, त्याशीं अक्षक्रीडा करीत असे. दक्षिण गोग्रहणकालीं, विराट राजा सुशर्म्यासमागमें युद्धास गेला असतां, त्यानें यांस, भ्रात्यांसहित समागमें घेतलें होतें, व तेथें त्यास सुशर्मा बांधून नेत असतां, त्यापासून यानें, आपल्या भ्रात्यांकडून ( बल्लवादिकांकडून ) त्याची मुक्तता करविली होती. ( ३ विराट श० पहा ).

४-भारतवर्षीय महादेश. ( भार० शांति० अ० ६५ ).

**कंका**-उग्रसेनाची कन्या, कंसाची भगिनी. वसुदेवभ्राता जो आनक, त्याची ही स्त्री होती, आणि त्यापासून हिला सत्यजित् व पुरुजित् असे दोन पुत्र झाले होते.

**ककुत्स्थ**-( सू० वं० ) इक्ष्वाकु राजर्षीचा पौत्र, व विकुक्षीचा पुत्र. सांप्रतच्या स्वर्गस्थ पुरंदर इंद्राचें दैत्यांशीं युद्ध चाललें असतां, त्यानें यास आपल्या साह्यास बोलाविलें होतें, त्या वेळेस यानें इंद्रास वृषभ करून, त्यावर आरोहण केलें, व दैत्यांचीं पुरें जिंकिलीं, म्हणून यास असें नांव पडलें. यास क्वचित् इंद्रवाह, पुरंजय अशींही नामांतरें आढळतात, व इंद्रानें धारण केलेलें शुभ्र वृषभरूप, त्यावर याचें आसन होतं, अशा अर्थानें यास कोठें चंद्रवाह असेंही म्हटलेलें आहे. ( देवीभा० ७ स्कं० अ० ९ ).

**ककुभान्**-हिमालयाचें शिखरवि० हें कैलास शिखराच्या वायव्येस असून, नंदीच्या उत्पत्तीचें स्थल होय. ( मत्स्य अ० १२० ).

**ककुद्मि**-रेवराजास नामांतर.

**ककुद्-भ्**-धर्मऋषीच्या अरुंधती ना० स्त्रीचें नामांतर. ( ३ अरुंधती श० पहा ).

**कच**-चालू मन्वंतरांतील जो अंगिरापुत्र बृहस्पति त्याचा पुत्र, परंतु याची माता कोण, तें कोठें आढळत नाहीं; कारण बृहस्पतीस शुभा आणि तारा, अशा वर्णिलेल्या ज्या दोन स्त्रिया, त्यांच्या संततींत याचें नांव मुळींच नाहीं. अस्तु, यास एकेकाळीं इंद्रानें, वृषपर्वा दानवाच्या वेळीं असणारा जो त्याचा पुरोहित शुक्राचार्य, त्याकडे संजीवनीविद्यासंपादनार्थ पाठविलें होतें,

त्याप्रमाणें हा इंद्राजवळून निघून शुक्राचार्याकडे आला व साष्टांग नमस्कार करून, त्यापुढें बद्धांजलि होऊन उभा राहिला.

शुक्राचार्यांनीं यास पाहून पुसलें कीं, तूं कोण व कोठून आलास? तेव्हां यानें नम्रतेनें मी बृहस्पतीचा पुत्र कच असून, आपणाकडे विद्यासंपादनार्थ आलों आहें असें सांगितलें. तें ऐकून त्यांनीं सांगितलें, बृहस्पति व मी भिन्न नाहीं, यास्तव येथें स्वस्थ राहा व विद्या संपादन कर. त्यावरून हा तेथें, निष्कपट बुद्धीनें सेवा करीत राहिला. ती अशीः—यानें प्रत्यहीं आचार्यांच्या पूर्वींच प्रातःकाळीं उठून गायींची शुश्रूषा करावी, नंतर फलें, मूलें, पुष्पें, दर्भ आणि समिधा, आचार्यांस नूतन आणून देऊन, गायी घेऊन त्यांस चारावयास अरण्यांत जावें, व अस्तमानीं गायी घरीं आणून, अन्य सेवा झाल्यावर, आचार्य निद्रेस गेले असतां, आपण निद्रा संपादावी. पुनः प्रातःकाळीं उठून पूर्ववतच क्रम आचरावा; परंतु कधीं मला विद्येचा पाठ द्या असें यानें म्हणूं नये. आचार्य कृपापूर्वक हाक मारून पाठ देत, तेव्हांच यानें तो घ्यावा. याप्रमाणें शुक्राचार्यांची, व त्यांची प्रियकन्या देवयानी तिची कोठेंही न्यून न पडूं देतां, उत्तम प्रकारच्या ब्रह्मचर्यव्रतानें पंचशत संवत्सरात्मक कालपर्यंत यानें तीव्र सेवा केली, त्या योगानें यावर आचार्यांची वृत्ति सुप्रसन्न असून, देवयानीस तर, हा केवळ आपला प्राणच असें वाटूं लागलें.

देवगुरु बृहस्पतीचा पुत्र कच आपल्या आचार्यासमीप विद्यासंपादनार्थ येऊन राहिला आहे, तेव्हां तो मृतसंजीवनी विद्येच्याच हेतूनें आला असावा, असें दैत्यांस वाटून, त्यांनीं यास अपाय करण्याची बुद्धि धरिली, व तो अरण्यांत केव्हां येतो म्हणून ते त्याची गुप्तपणानें मार्गप्रतीक्षा करीत बसले. इतक्यांत त्यांनीं यास गायी घेऊन येतांना पाहिलें. मग विलंब न करितां यास त्यांनीं धरिलें, व याच्या शरीराचे खंडशः तुकडे करून, ते आपआपल्या स्थळीं निघून गेले.

इकडे त्या दिवशीं, सूर्य अस्तास जाऊन रात्र झाली तरी कच आला नाहीं, असें पाहून, देवयानीनें पित्यांस कळविलें. त्यावरून त्यांनीं अंतर्दृष्टीनें पाहिलें तों, त्यांस कळलें कीं, दैत्यांनीं त्याचा वध केला. मग मृतसंजीवनीमंत्र जपून, कच सजीव होवो असें म्हणतांच, तिकडे अरण्यांत कच जिवंत झाला, आणि पाहतों तों रात्र झाली आहे, असें जाणून तेथून त्वरेनें निघून आश्रमीं आला, आणि आचार्य व देवयानी या उभयतांस वंदन करून त्यांपुढें उभा राहिला.

कच आला असें पाहून, आचार्यांनीं पुसलें, कचा, आज विलंब कां लागला! तेव्हां त्यानें दैत्यांनीं केलेला आपणास अपकार समग्र आचार्यांस निवेदन केला. तो ऐकून आचार्य म्हणाले, तूं इतःपर अरण्यांत फार जात जाऊं नकोस, कारणपरत्वें जाणेंच पडल्यास सत्वर जाऊन सत्वर येत जावेंस. त्यावरून कच तथास्तु म्हणून, त्याचप्रमाणें वागत असतां, त्यास कांहीं दिवसांनीं अरण्यांत जाण्याचें कारण पडलें, म्हणून गेला; तों त्यास दैत्यांनीं पाहिलें. त्यावरून त्यांनीं जाणलें कीं, आपण यास मारिलें असतां, हा ज्या अर्थीं अजून आहे, त्या अर्थीं आचार्यांनीं यास सजीव केलें यांत संशय नाहीं. मग त्यांनीं असें केलें कीं, यास मारून याच्या शरीराचे तुकडे केले, आणि ते वृकव्याघ्रादिकांकडून भक्षवून, आतां हा सजीव होणें अशक्य आहे, असा निर्धार करून त्यांनीं स्वस्थलीं गमन केलें. त्या वेळेसही देवयानीनें पित्यास सांगून, पूर्ववत्प्रमाणेंच यास सजीव करविलें.

यावर कच, अरण्यांत बरेच दिवसपर्यंत गेला नाहीं, परंतु त्यास जाण्याचें तसेंच कारण एकदां उपस्थित झाल्यामुळें, जाणें भाग पडलें. त्यावरून तो गेला, व काय कार्य जें होतें, तें सत्वर संपादून, आश्रमास येण्यास निघाला, इतक्यांत, दैत्यांनीं त्यास अवलोकन केलें त्यावरून ते अत्यंत क्रोधाविष्ट झाले, आणि विचार करूं लागले कीं, यास आचार्य वारंवार सजीव करतात, तसें त्यांस करतां येऊं नये याविषयीं काय उपाय करावा!! विचारांतीं त्यांस अशी युक्ति सुचली कीं, आपण यास आज मारून, याचा देह दग्ध करावा. नंतर ती रक्षा मद्यांत मिसळून तें मद्य आचार्यांस प्राशनार्थ द्यावें, म्हणजे हा पुनः सजीव होणार नाहीं. मग त्यांनीं तसेंच करून, आचार्य जरी नित्य मद्य प्राशन करीत नसत, तरी युक्तीनें हें मद्य, त्या दुष्टांनीं त्यांकडून प्राशन करविलें, व आपआपल्या गृहास गमन केलें.

नंतर दिवस अतिक्रांत होऊन रात्र झाली, तरी कच आला नाहीं असें पाहून देवयानी पित्यास म्हणूं लागली कीं, आज कच अजून आला नाहीं, त्यावरून मला वाटतें, त्यास दैत्यांनीं आजही मारलें यांत संशय नाहीं; तर त्यास सत्वर सजीव करून आश्रमीं आणावें. तेव्हां आचार्य देवयानीस बोलले, कच वारंवार दैत्यांच्या हातून मरतो, त्यास मी कितीदा जिवंत करावें?

यास्तव त्याच्या मरणाचा आतां कांहीं खेद न मानतां तूं स्वस्थ असावेंस हेंच बरें. तें ऐकून देवयानी म्हणाली असें होऊं नये; कारण जो कायिक, वाचिक, मानसिक, अवंचकबुद्धीनें आपली सेवा करणारा, त्याची अशी उपेक्षा करणें आपणास योग्य नाहीं. यास्तव त्यास सजीव केलेंच पाहिजे. असा कन्येचा आग्रह पाहून, आचार्य, कच कोठें आहे अशाविषयीं दिव्य दृष्टीनें पाहूं लागले तों त्यांस तो आपल्या उदरांत असल्याचें समजून आलें, त्यावरून देवयानीस, दैत्यांनीं आजचें केलेलें कृत्य त्यांनीं सांगून म्हटलें कीं, आज कच सजीव होणें अशक्य आहे. जर मी कदाचित् आज त्यास सजीव करीन, तर मी मरणार आहें, यास्तव मी तुला पाहिजे असल्यास कच जिवंत होणार नाहीं, आणि कच पाहिजे असेल तर मी तुला नाहीं.

याप्रमाणें पित्याचें वाक्य श्रवण करून, देवयानीसही विचार पडला. परंतु ती मोठी बुद्धिमान असल्यामुळें, तिनें पित्यास सांगितलें कीं, आपण उभयतांही मला पाहिजे असून, दोघेही जिवंत राहण्यास युक्ति आहे ती अशी,—प्रथमतः आपण संजीवनीमंत्र जपून, कचास उदरांत सजीव करावें, नंतर त्यास संजीवनी विद्येचा उपदेश करावा. पुढें तो आपलें उदर विदारण करून बाहेर आला असतां आपण मृत झाला असें पाहून, त्याच विद्येनें तो आपणास सजीव करील. ही युक्ति शुक्राचार्यांस मान्य होऊन, त्यांनीं तत्काळ संजीवनीमंत्र जपून कचास उदरांत सजीव केलें, आणि म्हणाले, कचा, आज माझी गुह्यविद्या मी तुजकरितां प्रकाशित करितों, तर बाहेर येऊन मला सजीव कर. असें बोलून त्यांस त्यांनीं मृतसंजीवनी विद्येचा उपदेश केला, तेणेंकरून ज्या उद्देशानें हा आला होता, तो, याचा सिद्ध झाल्यामुळें, यास हर्ष होऊन, हा तत्काळ आचार्यांचें उदर विदारण करून बाहेर आला, व त्यानें त्याच विद्येनें लागलेंच आचार्यांस सजीव केलें. तात्पर्य, दैत्यांनीं यास केलेला अपाय, उपायच होऊन, याचा मनोरथ सफल होतसाता, दैत्यांचा मात्र, मृतसंजीवनी विद्या स्वर्गांत गेल्यानें अपाय झाला, म्हणून दुसऱ्याचा अपाय करण्याची, बुद्धिमान, जन कधींही इच्छा करीत नाहींत.

आपला पिता शुक्राचार्य व कच, या दोघांसही, सजीव पाहून, देवयानीस पराकाष्ठेचा हर्ष झाला. नंतर तिनें कचास पुनः जरी अरण्यांत जाऊं दिलें नाहीं, तरी आचार्यांनीं विचार केला कीं, आतां यास येथें राहणें निर्भय नाहीं, यास्तव यास जाण्याची आज्ञा द्यावी, म्हणून त्यांनीं कचास सांगितलें कीं, तूं आतां आपल्या पित्याकडे जावेंस. इतकें बोलून, मद्यपानाविषयीं, त्याच दिवशीं त्यांनीं याप्रमाणें निर्बंध केला.—

**श्लोक.**

यो ब्राह्मणोऽद्यप्रभृतीह कश्चिन्मोहात्सुरां पास्यति मंदबुद्धिः ।। अपेतधर्मा ब्रह्महा चैव सः स्यादस्मिन्लोके गर्हितः स्यात्परेच ।। ६२ ।। मया चेमां विप्रधर्मोक्तसीमां मर्यादां वै स्थापितां सर्वलोके ।। संतो विप्राः शुश्रुवांसो गुरूणां देवा दैत्याश्चोपशृण्वंतु सर्वे ।। ६३ ।।
( मत्स्य० अ० २५ ).

आचार्यांनीं, कचास जाण्याची आज्ञा दिली असतां, तो त्यांस साष्टांग नमस्कार करून निघाला, व देवयानीकडे येऊन, तिला त्यानें जाण्याची आज्ञा मागितली. तेव्हां देवयानी म्हणाली, तूं जातोस हें युक्तच आहे; परंतु तूं माझें पाणिग्रहण करावेंस, आणि मला समागमें घेऊन नंतर जावेंस, अशी माझी इच्छा आहे. व हाच हेतु धरून मी तुला पित्याकडून तीन वेळां सजीव करविलें. इतकेंच नव्हें, तर अतिअप्राप्त जी मृतसंजीवनी विद्या, तहि मीच तुला प्राप्त करून देवविली, हें तर तूं जाणतच आहेस. याशिवाय माझें ब्रह्मचर्यव्रत कसें आहे तेंही तुला विदित असून, तूं देवगुरूचा पुत्र, व मी दैत्यगुरूची कन्या असल्यामुळें, आपलें उभयतांचें कुलशील समान आहे, यास्तव माझें पाणिग्रहण केल्याशिवाय, मी तुला जाण्याची आज्ञा देणार नाहीं.

असें देवयानीचें भाषण श्रवण करून, तिला यानें मोठ्या नम्रतेनें उत्तर केलें कीं, तूं म्हणालीस तितक्या सर्व गोष्टी तथ्य असून, तूं मला पाणिग्रहणास योग्य होतीस हें खरें आहे, व मीही तुझ्यासारख्या स्त्रीचा लाभ सोडून कधींच गेलों नसतों, परंतु ज्या उदरांतून तुझें जन्म झालें, त्याच उदरांतून मीही प्रस्तुत निघाल्यामुळें, तूं व मी एकोदर झालों असतां, तुझें पाणिग्रहण मी करणें व तूंही तशी इच्छा धरणें योग्य नाहीं. यास्तव विचार करून मला जाण्याची आज्ञा दे, कारण तूं ज्ञानसंपन्न आहेस.

कचानें केलेलें सयुक्तिक व सशास्त्र भाषण देवयानीनें श्रवण करून, ती कुंठित तर झालीच, तथापि

तिच्या बहुतां दिवसांच्या मनोरथाचा भंग झाला म्हणून तिनें यास शाप दिला कीं, जी मृतसंजीवनी विद्या तुला प्राप्त झाली आहे, ती तुजप्रत सफल होणार नाहीं. असें बोलून तिनें यास जाण्याची आज्ञा दिली. त्यावरून यासही खेद होऊन, हा तिला म्हणाला कीं, तूं मला व्यर्थ शाप दिलास, यास्तव तुलाही ब्राह्मण पति मिळणार नाहीं, असें बोलून कच निघून स्वर्गलोकीं गेला, व इंद्रापासून मोठा सन्मानः पावला. ( भार० आदि० अ० ७६-८३ ). ( मत्स्य० ).

२-एक ब्रह्मर्षि. ( भार० शांति० अ० ४८ ).

**कच्छनिलय**-या नांवाचा एक दक्षिणेकडील पाणथळ प्रदेश. ( भार० सभा० अ० ३१ ).

**कच्छनीर**-एक नाग. ( २ माधव श० पहा ).

**कच्छप**-कुबेराच्या मूर्तिमान् नऊ निधींतील पांचवा.

**कच्छपी**-नारदाच्या हातांतील वीणा ती. ( भार० शल्य० अ० ५४ श्लो० ९ ).

**कंजानना**-दाशरथि रामाचा पुत्र लव, त्याची स्त्री.

**कटायनि**-एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**कटु**-एक ब्रह्मर्षि, यास कटय असेंही म्हटलेलें आहे. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कटय**-कटु.

**कठ**-एक ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

२-कठवल्लि श० पहा.

**कठरुद्र**-मुख्य यजुर्वेदोपानिषत्.

**कठवल्लि**- " "

**कंडरीक**-ब्रह्मदत्त राजाच्या मंत्र्याचा पहिला पुत्र. ( पितृवर्ती श० पहा ).

**कंडु**-एक ब्रह्मर्षि. याचा एक दशवार्षिक पुत्र, ज्या वनांत मरण पावला होता, तें वन यानें वृक्षोदकरहित केलें. ( वा० रा० किष्किंधा० स० ४८ ).

**कंडुक**-एक ऋषि, मारीषाना० कन्येचा पिता. ( १ मारीषा श० पहा ).

**कणजिव्ह**-एक ब्रह्मर्षि. ( २ आत्रि श० पहा ).

**कणीक**-धृतराष्ट्राचा ब्राह्मण मंत्री, यानें धृतराष्ट्रास पांडवांविषयीं विपरीत बोध केला होता. ( भार० आदि० अ० १४० ).

**कण्व**-कश्यपकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि. याचा आश्रम मालिनीनदीतीरीं असे, यास जी कन्या सांपडली होती, तीच शकुंतला. ( शकुंतला श० पहा ).

२-केवलांगिरसवंशमालिकेंतील एक ऋषि व तें कुल. ( ३ अंगिरा श० पहा ).

३-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्वपुत्र ऋतेयु, तद्वंशीय अप्रतिरथ राजाचा पुत्र, यास मेधातिथि नांवाचा पुत्र होता.

**कत**-एक ऋषि, व कुल. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**कतृण**-एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कथक**-एक ब्रह्मर्षि व कुल. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**कंदर्प**-मदन.

**कंदर्पकल्प**-दिवसानुक्रमानें ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील आठवा दिवस. या कल्पांत आरंभीं मदनजन्म झालें होतें म्हणून यास हें नांव पडलें. (४ कल्प श० पहा).

**कदली**-एक भरतखंडस्थ नदी. (भार० भीष्म अ० ९). ( मत्स्य० अ० ११३ ).

**कद्रू**-प्राचेतस दक्षाची कन्या, कश्यपऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक. ही संपूर्ण सर्पांची माता असून, हिला जे शत पुत्र होते त्यांतील मुख्यमुख्यांचीं नांवें अशीं होतीं.—शेष, वासुकि, कर्कोटक, शंख, ऐरावत, कंबल, धनंजय, महानील, पद्म, अश्वतर, तक्षक, एलापत्र, महापद्म, धृतराष्ट्र, बलाहक, शंखपाल, महाशंख, पुष्पदंत, शुभानन, शंकुरोमा, बहुल, वामन, पाणिन, कपिल, दुर्मुख, पतंजलि, कूर्म, कुलिक, अनंत, आर्यक, कृष्ण, लोहित, पद्मचित्र, इ० व मनसा ना० कन्या होती. हिचा विनतेशीं, सूर्यरथाचा अश्व श्याम आहे कीं गौर ? याविषयीं वाद झाला होता. त्यांत हिनें आपला पक्ष सिद्धीस नेऊन, तिला आपल्या दास्यांत गुंतविलें होतें. ( १ विनता श० पहा ).

**कध्मोर**-एक राजर्षि.

**कनकांगद**-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**कनकायु**- " "

**कनखल**-एक भरतखंडस्थ तीर्थ.

२-एक पर्वत.

**कन्यक**-एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**कन्यका**-देवतावि०. ( भाग० १० स्कं० अ० २ ).

**कन्यकागुण**-भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कन्यातीर्थ**-भरतखंडस्थ तीर्थ.

**कन्याश्रम**- " "

**कप**-देववि०. यांनीं पूर्वी स्वर्गाचा अपहार केला असतां, ब्राह्मणांनीं इंद्राला पक्ष धरून, यांचा नाश केला होता. ( भार० अनु० अ० १५७ ).

**कपट**–दनुपुत्र एक दानव.

२–लंकेंतील एक राक्षस.

**कपर्दी**–जटामुकुटच मस्तकीं सर्वदा असल्यामुळें महादेवास नांव आहे.

**कपर्देय**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा० ).

**कंपन**–अंगदानें युद्धांत मारलेला लंकेंतील राक्षस. ( वा० रा० युद्ध० स० ७५–७६ ).

**कंपना**–भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ). ( मत्स्य० अ० ११३ ).

**कपालमोचन**–औशनस तीर्थ. हत्या घडून मागें लागलेलें कपाल, या तीर्थांत स्नान करण्यानें नाहींसें झालें, म्हणून यास असें नांव पडलें.

**कपालि**–एक रुद्र. ( एकादशरुद्र. श० पहा ). अष्टभैरवांतील एक, यास कुपति असेंही नांव आहे.

**कपि**–तामस मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

२–भरद्वाजांगिरसवंशमालिकेंतील एक ऋषि, व त्याचें कुल. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कपिंजल**–एक ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**कपिंजला**–भरतखंडस्थ भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कपिंजल्य**–इंद्रप्रभृति ऋषींसच नामांतर.

**कपिध्वज**–अर्जुन पांडवाचें नांव.

**कपिभू**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कपिल**–कर्दम प्रजापतीपासून देवहूतीस झालेला पुत्र. यास महामुनि असें म्हटलेलें असून, याची सिद्ध ना० देवांत गणना आहे. हा सांख्यशास्त्राचा प्रणेता होता, व यानें आपली माता देवहूती, तिला ब्रह्मतत्त्वज्ञानाचा बोध केला होता. ( भाग० ३ स्कं० अ० २५–३३ ). सगरपुत्र याच्याच कोपाग्नीनें भस्म झाले होते. ( सगर श० पहा ). यास चक्रधनु असें नामांतर ग्रंथांत आढळतें. ( भार० उद्योग० अ० १०९ ).

२–रुद्रगणांतील एक.

३–विश्वामित्राच्या पुत्रांतील एक. ( १ विश्वामित्र श० पहा ).

४–दनुपुत्र एक दानव.

५–कद्रुपुत्र एक नाग.

६–अश्वशास्त्रप्रणेता जो शालिहोत्र ऋषि, त्याचा पिता.

७–विंध्यपर्वतीं राहणारा एक वानर.

८–वसुदेवास सुतनुभार्येपासून झालेल्या दोन पुत्रांतील कनिष्ठ.

९–मेरुकर्णिका पर्वतांतील एक पर्वत.

१०–कुशद्वीपस्थ सप्तपर्वतांतील एक.

**कपिला**–कश्यप ऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक. प्राचेतस दक्षाची कन्या.

२–एक ब्राह्मणी, पंचशिख ऋषींची माता.

३–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कपिलाऱ्हद**–वाराणसी क्षेत्रांतील एक तीर्थ.

**कपिलावट**–भारतवर्षीय तीर्थ.

**कपिलाश्व**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुवलाश्व राजा, त्याच्या तीन पुत्रांतील एक. यास क्वचित् धौंधुमारी असें म्हटलेलें आढळतें.

**कपिलोदक**–भारतवर्षीय तीर्थ.

**कपिवती**–भारतवर्षीय नदी. ( वा० रा० अयो० स० ७१ ).

**कपिश**–दनुपुत्र एक दानव.

**कपिष्ठल**–एक ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**कपिसुख**–एक ब्रह्मर्षि. ( कृष्णपराशर श० पहा ).

**कपीतर**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कपोतरेतस्**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**कपोतरोमा**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतराजा त्याच्या अंधक ना० पुत्राचा वंशीय विलोम राजा, त्याचा पुत्र. यास अनु ना० पुत्र होता.

२–एक राजर्षि, औशीनर शिबीचा पुत्र. ( भार० वन० अ० १९७ ).

**कबंध**–दंडकारण्यांतील एक असूर. विश्वावसु गंधर्वास स्थूलशिरा ऋषीचा अपमान करण्यानें ही योनि प्राप्त झाली होती. याचें मुख इंद्राच्या वज्रप्रहारानें उदरांत गेलें होतें, म्हणून याचें चक्षुरिंद्रिय स्पष्ट नव्हतें. तथापि याचा निर्वाह झाला पाहिजे, म्हणून क्षुधानिवारणार्थ भक्ष्य मिळविण्यासाठीं, यास योजनप्रमाण लांबीचे हस्त होतील. व त्यांत सांपडेल तें तुझें भक्ष्य होईल, असा इंद्रानें वर दिला होता. एकदां दंडकारण्यांतून रामलक्ष्मण सीतेचा शोध करीत चालले असतां याच्या कवेंत सांपडले, तेव्हां रामचंद्र याचे हस्त छेदण्यास उद्युक्त झाला, त्यावरून उभयतांचें वरच भाषण होऊन, रामानें याचे बाहु छेदिले, व यास गतप्राण केलें, इतक्यांत त्या कलेवरांतून एक दिव्य पुरुष निघाला, व त्यानें रामाची स्तुति करून, सीताशुद्धीचा मार्ग सांगितल्यावर स्वर्गास गमन केलें. ( भार० वन० अ० २७९ ).(वा० रा० अर० स० ६९–७३ ).

**कबंधी**–पिप्पलाद ऋषीचा ब्रह्मविद्यासंबंधानें शिष्य.

**कंबल**–कद्रुपुत्र एक नाग.

**कंवलबर्हिष**– ( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या, ज्यामध कुलांत जन्मलेल्या सात्वतपुत्र अंधकाच्या चार पुत्रांतील कनिष्ठ. याचा पुत्र असमंजा.

**कंबुग्रीव**–इंद्रदेशांतील सुधन्वा राजाचा पुत्र.

**कमला**–लक्ष्मी.

**कमलायजि**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**कमलालय**–भारतवर्षीय क्षेत्रवि०

**कमलाक्ष**–त्रिपुरांतलि सुवर्णपुराधिपति असुर वि० ( भार० द्रोण० अ० २०२ ).

**कयाधु**–जंभासुराची कन्या, व हिरण्यकशिपूची स्त्री. हिला प्रऱ्हादादिक चार पुत्र होते. ही प्रथमतःप्रऱ्हादाच्या वेळेस गर्भिणी असतां, हिरण्यकशिपु तपार्थ गेला होता. त्या संधीत इंद्रानें ( पुरंदरानें ) येऊन दैत्यांचें कदन केलें व हिला घेऊन स्वर्गी जाऊं लागला, इतक्यांत मार्गामध्यें नारद भेटले, त्यांनीं हिच्या उदरांत जो बाळ आहे, तो विष्णुतेजानें युक्त असल्यामुळें तुझा द्वेषी नाहीं, इ० सांगून हिला त्यापासून सोडविलें, व भागीरथीतीरीं आश्रम करून राहून ज्ञानोपदेश केला, तो प्रऱ्हादानें गर्भांतून श्रवण केला होता म्हणून, तो पुढें मोठा भगवद्भक्त झाला. ही मात्र स्त्री स्वभावानें तो बोध विसरली. पुढें अल्पच काळानें हिरण्यकशिपु अरण्यांतून परत आला असतां, नारद हिला त्याच्या स्वाधीन करून आपण संचारार्थ गेले. ( भाग० ६ स्कं० अ० १८ ).

**करक**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**करकर्ष**– ( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्यामघ कुलांतील रोमपादवंशोत्पन्न शिशुपाल राजा, त्याच्या चार पुत्रांतील एक.याचा चेकितान यादवाशीं अत्यंत स्नेह असे.

**करकाक्ष**–भारती युद्धांतलि दुर्योधनपक्षयि राजा.

**करट**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**करतोया**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. हिला सदानीरा असेंहि नामांतर आहे. ( विंध्यश० पहा ).

**करंधम**– ( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न खनिनेत्र राजर्षीचा पुत्र, अवीक्षित राजाचा पिता, व मरुत्त राजाचा पितामह. ( भार० अनु० अ० १३७ ). याचें मूळचें नांव सुवर्चा असून, हें पडण्यास कारण झालें तें असें,–एकदां कित्येक राजानीं मिळून यास अतिशय उपद्रव दिला त्यावरून यानें आपले हस्त कंपित करून सैन्य उत्पन्न केलें, आणि सर्वांचा पराभव केला. ( भार० अश्व० अ० १६ ).

२– ( सो० वं० ) ययातिपुत्र तुर्वसु, त्याच्या कुलांतील त्रिभानु राजाचा पुत्र, यास मरुत ना० पुत्र होता.

**करंभ**–एक ब्रह्मर्षि. ( २ अगस्त्य श० पहा ).

२– दनुपुत्र एक दानव. ( रंभकरंभ श० पहा ).

३– भारतवर्षीय करूषक देश तेथील राजा.

**करभाजन**–ऋषभदेवाच्या नऊ सिद्ध पुत्रांतील एक. ( ऋषभदेव श० पहा ).

**करंभि**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्यामघ कुलोत्पन्न क्रथवंशांत जन्मलेल्या शकुनी राजाचा पुत्र. यास पुत्र देवरात होता.

**करवीर**–मेरूच्या परिस्तरण गिरींतील दक्षिण दिशेकडील पर्वत.

२– भारतवर्षीय भरतखंडस्थ क्षेत्र. यास प्रस्तुत कोलापुर म्हणतात.

**करवीराक्ष**–परवीराक्ष शब्द पहा.

**करहाट**–करट श० पहा.

**कराल**–एक गंधर्व.

२– लंकेंतलि एक राक्षस.

३– ( विदे० वं० ) एक जनक. वंशावळींत नांव नाहीं. याचा वासिष्ठ ऋषींशीं संवाद झाला होता. ( भार० शांति० अ० ३०२ ).

**करालदंत**–एक ब्रह्मर्षि.

**करीत**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**करीराशी**–एक ब्रह्मर्षि.( १ विश्वामित्र श० पहा. )

**करीष**– ,, ,,

**करीषक**–भारतवर्षीय देश.( भार० भीष्म० अ० ९ ).

**करीषिणी**–भातरवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ). ( मत्स्य० अ० ११३ ).

**करूष**–( २ करूषक श० पहा ).

**करूषक**–( सो० वं० ) वैवस्वत मनूच्या दाहा पुत्रांतील एक. याची संतति कारूषक नांवानें प्रसिद्ध होती, व त्यांचें आधिपत्य उत्तरेकडे होतें.

२– भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा मलद देशास लगत आहे. ( वा० रा० बाल० स० २४ ). येथें पूर्वी करंभना० राजा होता, परंतु पांडवांच्या वेळेस जरासंधाचे प्रधान, हंस आणि डिंभक, हे दोघे सहोदर राज्य करीत असत. वृद्धशर्मा राजा, व त्याचा पुत्र दंतवक्र यांचेच दायाद होते. ( मलद श० पहा ).

**करेणुपालि**–गौतमांगिरसमालिकेंतील ऋषि. ( ३ आंगिरा श० पहा ).

**करेणुमती**-पंडुपुत्र नकुलाची स्त्री, शिशुपालाची कन्या. हिचा पुत्र निरमित्र.

**कर्कखंड**-भारतवर्षीय देश. ( भार० वन० अ० २५४).

**कर्कोट**-कर्कोटक शब्द पहा. ( भार० मौसल० अ० ४ ).

**कर्कोटक**-कद्रुपुत्र एक नाग. हा नारदाच्या शापानें दवाग्नींत सांपडला असतां, नलराजानें यास बाहेर काढून वांचविलें होतें. त्या उपकारामुळें यानें नलास दंश करून, मुख्यत्वेंकरून कलीपासून यास पीडा न होई असें केलें होतें. तसेंच वनवास संपेपर्यंत त्यास कोणी ओळखूं नये म्हणून विरूपही केलें होतें. वनवास सरतांच सुरूप करून स्वस्थळीं गेला. ( ५ नल श० पहा ).

२-भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कर्ण**—वसुदेवभागिनी पृथा, जिला कुंती असें नांव पडलें होतें, तिच्या उदरीं सूर्यमंत्रप्रभावानें, कौमारदशेंत झालेला पुत्र. ( भार० आदि० अ० १११ ). हा झाला त्या काळीं, कुंतीचा विवाह झाला नव्हता, त्यामुळें तिला परम लज्जा होऊन, तिनें याचें नालच्छेदन न करतां यास एका पेटींत घालून अश्वनदींत सोडिलें. ( कुंती श० पहा ). पेटी नदींत सोडिल्यावर, ती त्या जलप्रवाहांतून वाहत चालली असतां, ययातिपुत्र अनुराजा, तत्कुलोत्पन्न सत्कर्मा अथवा सत्यकर्मा, त्याच्या अधिरथ ना० पुत्रास ती पेटी सांपडली. नंतर तींत काय असावें म्हणून ती उघडून तो पाहूं लागला तों, त्याच्या दृष्टीस हा सुंदर बालक पडला. त्यावरून त्यास पराकाष्ठेचा आनंद झाला; कारण तो त्या वेळेस निपुत्रिक होता. नंतर तो बालक त्यानें घरीं आणून, आपल्या राधा ना० स्त्रीच्या स्वाधीन केला, केव्हां तिलाही परम हर्ष होत्साता, तिनें पतीकडून त्याचें नालच्छेदन करविलें, व जातकर्म करवून, वसुषेण अस नांव ठेविलें. ( भार० वन० अ० ३०९ ).

पुढें वसुषेण तेथें वाढत असतां, राधेस औरसपुत्र झाला त्याचें नांव राधेय असें होतें. नंतर वसुषेण वयें करून मोठा झाल्यावर, धार्तराष्ट्र आणि पांडव द्रोणाचार्याजवळ धनुर्विद्येचा अभ्यास करीत असून, अन्यही देशोदेशींचे राजपुत्र तेथें जात आहेत, असें अधिरथानें श्रवण करून, त्यास व राधेयास आचार्याजवळ धनुर्विद्या शिकण्यास नेऊन ठेविलें. तेथें हा, बंधूसहित अभ्यास करीत असतां, अर्जुनाच्या बरोबरीचा झाला. अर्जुनानें जें जें अस्त्र, ज्या ज्या प्रकारें योजावें, त्याचप्रमाणें यानेंही योजून, समयाविशेषीं अर्जुनाहूनही विशेष कृती करून दाखवावी. त्यामुळें होतां होतां याचे अर्जुनाशीं वितुष्ट पडलें, तें दुर्योधनास इष्ट होऊन, तो यावर अत्यंत ममता करूं लागला असतां, हाही त्याशीं तसाच वागूं लागल्यामुळें त्यानें यास आपल्या आश्रयास ठेविलें.

कांहीं कालानें जरासंधाशीं याचा युद्धप्रसंगानें स्नेहभाव झाला, तें दुर्योधनानें जाणून, समयीं हा आपणास विशेष उपयोगीं पडावा अशा हेतूनें, त्यानें यास अंगदेशाचें आधिपत्य दिलें. ( भार० आदि० अ० १३६ ). हा मोठा सूर्योपासक असे. सूर्याच्याच मंत्रप्रभावानें याचें जन्म झालें होतें म्हणून, सूर्यही यावर पुत्राप्रमाणें प्रेम ठेवी. एकदां ब्राह्मण-वेषानें सूर्य याकडे येऊन यास म्हणाला कीं, इंद्र ब्राह्मण-वेषानें तुजकडे येऊन, तुझीं कवचकुंडलें मागणार आहे, तर तीं, तूं त्यास देऊं नयेस. ( याच्या अंगास उपजतच वज्राप्रमाणें कवच, व कानांत परम दैदीप्यमान् कुंडलें होतीं, तीं न देण्याविषयीं सूर्यानें त्यास सुचविलें असें येथें समजावें ). परंतु यानें विप्रवेषधारी सूर्यास सांगितलें कीं, ब्राह्मणानें मागितल्यावर, त्यास नाहीं म्हणणें माझ्यानें होणार नाहीं. मग तो इंद्र किंवा अन्य कां कोणी असेना, मीतीं त्यास देईन. असें ऐकून सूर्य म्हणाला, तूं माझें ऐकत नाहींस, त्यास येवढें तरी कर कीं, कवच कुंडलें दिल्यावर, त्यापासून एक अमोघ शक्ति (अस्त्रविशेष) मागून घे, म्हणजे त्यांत तुझें पुष्कळ हित होईल. यावरून यानें तथास्तु म्हटलें असतां, सूर्य अंतर्धान पावला. ( भार० वन० अ० ३००-३०२ ). या गोष्टीस कांहीं दिवस लोटल्यावर, ब्राह्मण-वेषानें इंद्र याजकडे येऊन, त्यानें त्यास कवचकुंडलें मागितलीं, तेव्हां यास सूर्याच्या वाक्याचें स्मरण होऊन, हा, इंद्र आहे असें यानें जाणलें. नंतर यानें सूर्यवचनानुरूप त्याजवळून शक्ति मागून घेतली, व त्यास आंगचीं कवचकुंडलें कर्तन करून दिलीं. तेव्हांपासून यास कर्ण असें नांव पडलें. :( भार० वन० अ० ३१० पहा ).

कवचकुंडलें गेल्यावर याच्या मनांत, जामदग्न्य रामाकडे जाऊन विशेष विद्या संपादन करावी असें आलें. त्यावरून हा तेथें गेला, व मी ब्राह्मण आहे असें मिथ्या सांगून, त्यांसमीप अस्त्रविद्या संपादन करीत राहिला. ( रामाजवळ ब्राह्मण मी आहे असें सांगण्याचें हेंच कारण होतें कीं, भीष्म शिवायकरून तो क्षत्रि-

यांस विद्या पढवीत नसे ). परंतु हें याचें कपट फार दिवस गुप्त राहिलें नाहीं. त्यांचें कारण असें झालें कीं, एकदां राम, याच्या मांडीवर मस्तक ठेवून निद्रित झाला असतां, एक दैत्य तीक्ष्णकीटक-योनि पावलेला ( दंश श० पहा ), त्यानें याची मांडी कोरिली, तेणेंकरून यास बहुत वेदना झाली असतांही गुरुनिद्रेचा भंग होऊं नये, अशा हेतूनें यानें धैर्य धरून मांडा तिळमात्र हलविली नाहीं. इतक्यांत याच्या मांडीपासून निघालेला रक्त-प्रवाह रामाच्या मस्तकांस स्पर्श झाल्यामुळें तो जागृत झाला, आणि पाहूं लागला तों, याच्या मांडीस मोठेंच क्षत कीटकानें केलें आहे. त्यावरून त्याची वृत्ति याच्यावर अधिक सुप्रसन्न व्हावी, ती न होतां, रामास याच्या ब्राह्मण्याचा संशय उत्पन्न झाला, तो असा कीं, येवढी पीडा यास झाली असतां, ज्या अर्थी हा चळला नाहीं, त्या अर्थी हा निश्चयेंकरून मृदु-हृदयाचा ब्राह्मण नसून, वज्रतुल्य हृदयी क्षत्रिय असावा असें वाटून, त्यानें यास पुसलें कीं, तूं खरेंच सांग कोण आहेस ? तेव्हां यानें हात जोडून नम्रतेनें विनंति केली कीं, मी सूत्रपुत्र आहे ( क्षत्रियापासून ब्राह्मणीस होतो पुत्र तो सूत. त्याचा पुत्र ). तर मग तूं, मी ब्राह्मण आहें असें कशावरून सांगितलेंस, म्हणून रामानें पुसलें असतां, यानें सांगितलें कीं, शिष्याचा गुरु हा पिताच होय, म्हणून जी गुरूची जाति, तीच शिष्याची, असें मनांत आणून मी ब्राह्मण आहें असें सांगितलें. तें ऐकून राम, यास विशेष कांहीं न बोलतां, इतकेंच म्हणाला कीं, जी विद्या तू मजपासून संपादिली आहेस, ती तुला युद्ध-समयीं स्फुरद्रूप होणार नाहीं, असें जाण, व येथून आतां सत्वर गमन कर.असें ऐकतांच हा तेथून निघून अंतःकरणांत खिन्न असतांही, दुर्योधनास मी विद्या संपादून आलों असेंच यानें सांगितलें. ( भार० उद्यो० अ० १६८ पहा ).

तसाच हा, एके काळीं मृगयेस गेला असतां, अनेक श्वापदें मारतां मारतां, एका ब्राह्मणाची होम-धेनु अरण्यांत चरत होती, तिला याचा बाण चुकून लागला, व ती मरण पावली. त्यावरून यास अत्यंत खेद होऊन, ती धेनु ज्या ब्राह्मणाची होती त्याकडे आला, आणि मजकडून झालेला अपराध क्षमा करून, हिच्या बदला मागाल तितक्या गायी देतों असें म्हणूं लागला. परंतु ब्राह्मणानें कोपेंकरून हें याचें म्हणणें अमान्य केलें, व यास शाप दिला कीं, युद्धसमयीं तुझें रथचक्र भूमि ग्रस्त करील. तात्पर्य, अर्जुनाहून आपण अधिक व्हावें, म्हणून जों जों हा प्रयत्न करीत गेला, तों तों याची हानिच होत गेली, व पांडव वनवासांत असतां दुर्योधन घोषयात्रेच्या निमित्तानें यास समागमें घेऊन, त्यांचा छल करावयास गेला असतां, तेथें याचा गंधर्वानें पराभव केला. ( भार० वन० अ० २४१ ).

एकदां दुर्योधन, दुःशासन, शकुनि, आणि हा, पांडवांची निंदा करीत बसले होते. ती भीष्मानें श्रवण करून, त्यास इतका कोप आला कीं, त्यानें या सर्वांची पराकाष्ठेची निर्भर्त्सना केली, तीवरून यास ईर्ष्या उत्पन्न होऊन, हा दिग्विजयास गेला व अपरिमित द्रव्य आणून दुर्योधनास देत होत्साता, त्याकडून यानें विष्णुयाग करविला. ( २ दुर्योधन श० पहा ).

अज्ञातवासांतून पांडव प्रकट झाल्यावर, युधिष्ठिरानें कृष्णास दुर्योधनाकडे साम करण्यास पाठविलें. त्यावरून कृष्णानें तेथें जाऊन, बहुता प्रकारें दुर्योधनास बोध केला कीं, युद्ध करणें चांगलें नाहीं, कारण त्यांत बहुत जीवांचा नाश होतो. यास्तव पांडवांचा यथायोग्य भाग त्यांस देऊन सुखानें राहा. या गोष्टीस भीष्म, द्रोण, विदुर, धृतराष्ट्र व गांधारी, यांचें संमत पडलें असतांही, तें दुर्योधन ऐकेना. शेवटीं आपला यत्न निर्फळ झाला असें पाहून, कृष्ण युधिष्ठिराकडे परतण्यास निघाला. तेव्हां भीष्मादिक मंडळी त्यास पोहोंचविण्याकरितां नगराबाहेर बरीच दूरवर आली होती, त्यांत कर्ण हाही होता. नंतर कृष्णानें ते सर्व फार दूर आले असें पाहून सर्वांस निरोप दिला; परंतु कर्णास निरोप दिला नाहीं. त्यास आपल्या रथांत घेतलें आणि बोलण्यास उपक्रम केला. तो असाः—

कर्णा, मी काय जें बोलतों, तें सावधपणानें ऐक. तूं दुर्योधनाचा आश्रय केला आहेस खरा; परंतु वास्तविकपणानें तत्पक्षी नाहींस. तुझें जन्म कुंतीपासून झालें असून, तूं तिचा ज्येष्ठ पुत्र आहेस. वृष्णिकुल हें संपूर्ण तुझ्या मातृपक्षाचें असून, सर्व पांडव तुझे भ्राते आहेत. तूं युधिष्ठिराचा ज्येष्ठ भ्राता असें जर त्यास समजलें, तर लागलाच त्यास इतका आल्हाद होईल कीं, तो तुझा सर्व बंधूंसहित सेवक होईल इतकेंच नव्हे, तर त्याची इतर भ्रात्यांसहित जसी प्रस्तुत द्रौपदी सेवा करीत आहे, तसीच तुझीही करील. यास्तव माझें म्हटलेलें तूं ऐक व पांडवांकडे चल. याप्रमाणें कृष्ण बोलून उगाच राहिला असतां, कर्ण

बोलूं लागला कीं, कृष्णा, तूं जें बोललास तें सर्व यथार्थ असून मलाही विदित आहे; परंतु उपयोग काय ? कुंतीनें माझा त्याग केला असतां, अधिरथानें माझें पालन केलें. राधेनें मला पाजिलें, व माझें मूत्र-पुरीष तिनें काढिलें, तिच्या नांवावरून लोक मला राधेय म्हटल्यानें ओळखतात, शिवाय अधिरथानें माझें लग्न केलें असून, येथें मला संततीही झाली आहे. दुसरें, तूं असें पहा कीं, आजपर्यंत दुर्योधनानें माझें बळ धरून, पांडवांशीं द्वेष केला, त्यास मी आतां कसें सोडावें ? त्यानें जी प्रस्तुत युद्धाची सिद्धता केली आहे, ती सर्व माझ्या विश्वासावर आहे. अशा प्रसंगीं जर मी विश्वासघातास प्रवर्तेन, तर लोक तरी मला काय म्हणतील ? फार तर काय पण तूं सुद्धां मला चांगलें म्हणणार नाहींस. यास्तव आतां पांडवांकडे येणें मला श्रेयस्कर नाहीं, तर आतां विशेष कांहीं तूं मला न बोलतां पांडवाकडे जा, आणि युद्धाचीच सिद्धता कर. म्हणजे हे सर्व उन्मत्त क्षत्रिय धारातीर्थी मरण पावून स्वर्गास जातील. दुर्योधनही परम दुष्ट आहे. तो युद्धांत मरण पावल्यानें भूमीवर अधिक पाप होणार नाहीं, वांचल्यास अधर्माचीच वृद्धि होईल,हें सर्व मनांत आण, आणि हें जें तुझें माझें झालेलें भाषण, तें तूं युधिष्ठिरास अगदीं कळवूं नको. कळविण्यांत तो युद्धाचीच इच्छा करणार नाहीं, यास्तव हें सर्व वृत्त गुप्त ठेव. पांडव हे युद्ध करूनच जय पावोत अशी माझी इच्छा आहे. याप्रमाणें कर्ण बोलून, त्यानें कृष्णास व कृष्णानें त्यास परस्परें आलिंगनें देऊन हा कृष्णाच्या रथांतून उतरून आपल्या रथांत बसला, आणि कृष्णास मार्गस्थ केल्यावर, आपण परतून हस्तिनापुरांत प्रवेशला. ( भार० उद्योग० अ० १४२-१४३ ).

पुढें उभयपक्षीं सैन्याची सिद्धता होऊन लवकरच युद्धास आरंभ होणार असें कुंतीनें जाणून, कर्ण त्यांत न मरावा, व तो पांडवांकडे यावा, अशा हेतूनें ती गुप्तपणें त्याकडे गेली, व म्हणाली कीं, तूं माझा पुत्र आहेस यास्तव तिकडे चल. कर्णानें उत्तर केलें, तूं आपल्या लज्जेच्या संरक्षणार्थ माझा त्याग केलास, त्यामुळें तुझें नीटच झालें, परंतु माझें जन्म व्यर्थ झालें; कसें म्हणशील तर ऐक. मी क्षत्रिय कुलांत जन्मलों असून, तूं त्याग केल्यामुळें, क्षत्रियकुलास योग्य जे संस्कार त्यांस मी अंतरलों. यास्तव आतां कांहीं अधिक न बोलतां परत जा. मी जो युद्धाचा निश्चय केला तो केलाच, आतां, पांडव मला मारतील, किंवा मी त्यांस मारीन याशिवाय दुसरी गोष्ट नाहीं. असा त्याचा निश्चय पाहून कुंती म्हणाली, तूं माझें ऐकत नाहींस यास्तव येवढें तरी कर कीं, धनुर्विद्येंत अर्जुन जसा तुझ्या साम्यतेचा आहे, तसे इतर पांडव नाहींत, म्हणून त्यांस तूं अगदीं हात लावूं नयेस. हें बोलणें कर्णानें मान्य केलें, व तिला जाण्यास निरोप दिला. ( भार० उद्योग० अ० १४४-१४६ ).

पुढें कौरव-पांडवांचीं सैन्यें रणभूमीवर येऊन, कौरवसेनेंत सेनापत्य भीष्मास प्राप्त झालें. त्या दाहा दिवसांत यानें मुळींच शस्त्र धरिलें नाहीं; कारण भीष्म आहेंत तोंपर्यंत मी युद्ध करणार नाहीं, अशी याची प्रतिज्ञा होती. भीष्म रणांत पडल्यावर द्रोणाचार्य सेनापति झाला, त्या पांच दिवसांत यानें बरेंच युद्ध केलें. नंतर तोही पडला असतां सोळाव्या दिवशीं दुर्योधनानें यास सैनापत्याभि-षेक केला. त्या काळीं याच्या दोन दिवसांतून पहिल्या दिवशीं यानें चांगलेंच झटून युद्ध केलें; परंतु याच्या मनाजोगा यास सारथि नसल्यामुळें, हा सूर्यास्त होतांच सेनेचा अवहार करून, शिबिरांत आला, व सारथ्याविषयीं चिंतन करूं लागला. इतक्यांत तेथें दुर्योधन प्राप्त होऊन यास म्हणाला कीं, आज तूं तर युद्ध उत्तम केलेंस, असेंच उद्यीक करून पांडवांस मार. माझा काय तो विश्वास तुजवरच आहे. असें ऐकून कर्ण म्हणाला, तें सर्व मी करीन; परंतु मला असावा तसा सारथि नाहीं. पांडव सैन्यांत अर्जुनाचे सारथ्य करण्यांत कृष्ण जसा कुशल आहे, तसा आपल्या सैन्यांत एक शल्य मात्र आहे, म्हणून तो जर माझें सारथ्य करण्याचें स्वीकारील, तर निःसंशय मी उद्यां पांडवांस मारून तुला राज्या-भिषेक करीन; नाहीं तर मरून तरी जाईन. त्यावरून दुर्योधन, कर्णास समागमें घेऊन, लागलाच शल्याच्या शिबिरांत गेला व त्यास म्हणूं लागला कीं, माझी कांहीं विनंति आहे. शल्य म्हणाला, काय असेल ती बोल. दुर्योधन म्हणाला, आपण कृपा करून उद्यांचा दिवस कर्णाचें सारथ्य स्वीकारल्यास उत्तम होईल. कारण कृष्णाहूनही अधिक उत्तम सारथ्य करण्यास तुम्ही जाणत आहां, तर हें माझें येवढें बोलणें मान्य व्हावें. तें ऐकून शल्यास अनिवार क्रोध येऊन, तो रुष्ट होत्साता दुर्योधनास म्हणाला कीं, तूं जें येथें मला बोलाविलेंस तें माझा असा अपमान करण्यासच असें मला वाटतें. अरे, मी अभिषिक्त राजा असतां, सूतपुत्राचें सारथ्य करणें मला-

उन्नित आहे काय ? मी स्वतंत्रपणानें युद्ध करून पांडवांस मारण्यास समर्थ असतां, तसें करण्यास मला सांगायाचें सोडून, कर्णाचें सारथ्य करा म्हणतोस, त्या अर्थी मला तुझ्या युद्धाची गरज नाहीं. मी हाच पहा माझ्या मद्रदेशास जाण्यास निघालों असें समज. तेव्हां दुर्योधन भयभीत होत्साता लीनतेनें शल्यास म्हणाला कीं, आपण स्वतंत्रपणानें पांडवांस मारण्यास खचित समर्थ आहां हें मी जाणतों, निरुपायास्तव केलेल्या विनंतीचा क्रोध न मानतां मजकडे दृष्टि देऊन काय करणें तें करावें. त्यावरून शल्य कांहींसा शांत होऊन म्हणाला कीं, बरें तर, मी सारथ्य करीत असतां, कर्णास जें कांहीं शुभाशुभ बोलेन, तें त्यानें सोसलें पाहिजे. तें कर्णानें मान्य केल्यावर, ते आपआपल्या शिबिरास गेले. ( भार० कर्ण० अ० ३२ ).

दुसऱ्या दिवशीं शल्य, बोलल्याप्रमाणें सारथ्य करण्यास कर्णाच्या रथावर येऊन बसला. त्यास पाहून कर्ण हर्षयुक्त होत्साता रथारूढ होऊन युद्ध करूं लागला. त्यांत त्यानें पांडव सेनेस पराकाष्ठेचें त्रस्त केलें, व असंख्य सेना मारिली. परंतु अर्जुन कोठें सैन्यांत दृष्टीस पडेना म्हणून, वारंवार अर्जुन कोठें आहे, अर्जुन कोठें आहे, असें म्हणूं लागला, तेव्हां शल्य म्हणाला, कर्णा, तूं अर्जुनास सत्वरच पाहाशील, परंतु एकदां तो दृष्टीस पडला म्हणजे मग मात्र हें तुझें धैर्य राहील न राहील. अरे, अर्जुन तो अर्जुनच. त्याची साम्यता एक त्यालाच, असें पूर्णपणें समज. पहा बरें, पांडव वनवासांत असतां, गंधर्वांनीं दुर्योधनास बांधिलें, तेव्हां तूं तेथें असतां त्यास तूं सोडविलेंस किंवा अर्जुनानें ? दुसरें, विराटनगरींत उत्तरगोग्रहणकाळीं, तूं होतास कीं नव्हतास ? जर होतास तर पलायन कां केलेंस ? म्हणून तूं यःकश्चित् कोणीकडे व महायोद्धा अर्जुन कोणीकडे, याचा विचार करून काय बोलणें तें बोल, व्यर्थ वल्गना करण्यांत तात्पर्य नाहीं.

असें शल्यानें केलेलें मर्मभेदक भाषण कर्णानें श्रवण करून, त्यास क्रोध आला, परंतु कांहीं अधिक बोलावें तर, तो सारथ्य सोडून जाईल, या भीतीनें जरी स्तब्ध रहावें असें यानें मनांत आणिलें, तरी याच्यानें बोलल्यावांचून राहावेना. म्हणून यानें शल्यास युक्तीनें असें भाषण केलें कीं, शल्या, तूं जें कांहीं मला बोललास, हा तुझा दोष नव्हे, तर ज्या मद्रदेशाचा तूं अधिपति असून, तेथील प्रजेपासून त्यांच्या उत्पन्नाच्या साहव्या भागावर उपजीविका करतोस, त्याचा दोष होय.

**श्लोक.**

आमत्स्येभ्यः कुरुपांचालदेश्या आनैमिष्याच्चेदयो ये विशिष्टाः ॥
धर्मं पुराणमुपजीवंति संतो मद्रान्ऋते पांचनदांश्च जिह्मान् ॥ १६ ॥
त्वं तस्य गोप्ता च जनस्य राजा षड्भागहर्ता शुभदुष्कृतस्य ॥
( भार० कर्ण० अ० ४५ ).

कर्ण म्हणाला, शल्या, आणखी असेंही आहे. हिमालय उपगिरी, गंगा, सरस्वती, यमुना, आणि कुरुक्षेत्र, या पांचांनीं बहिष्कृत प्रदेश, तसाच शतद्रु, विपाशा, इरावती, चंद्रभागा, वितस्ता आणि सिंधु, या साहा नद्यांमधील प्रदेश, त्या सर्वांस वाहीक अट्ट अशी संज्ञा असून, त्यांत आर्य लोकांनीं दोन दिवस देखील राहूं नये, यांतून तूं, पहिल्या वर्गांतील प्रदेशांत रहाणारा होस म्हणून, तुझा देश बहिष्कृत असून आर्यास त्याज्य असल्याचें बोलणेंच नको. ( वाहीक श० पहा ). दुसरें, तुझ्या देशांत रहाणारे लोक प्रायः व्रात्य ( उपनयनसंस्कारहीन ) असून, गौडी मद्य ( गुळाची दारू ) पिणारे, ज्यांच्या द्वारांशीं सुरापात्रांचे व गोवधाचें क्रमानें डाव्या उजव्या अंगास प्रसिद्ध स्थल असायाचेंच, ज्यांच्या स्त्रिया नग्न होऊन गाणाऱ्या व नाचणाऱ्या, तशाच द्वाराच्या बाह्य प्रदेशीं स्थित होऊन नंतर अंगावर पुष्पें धारण करणाऱ्या, व मनास येईल त्याशीं मैथुन करणाऱ्या, इतक्या निंद्य असतात, याविषयीं असें वचन आहे;—

**श्लोक.**

क्षत्रियस्य मलं भैक्षं ब्राह्मणस्याव्रतं मलम् ॥
मलं पृथिव्या वाहीकाः स्त्रीणां मद्रस्त्रियो मलम् ॥२३॥
( भार० कर्ण० अ० ४४ ).

तसेंच गाढव, खेचर, उंट, यांवर बसून संचार करणें; एडका, डुकर, कोंबडा इत्यादिकांचें मांस, व भाजलेलें सातू खाणें; गाढवी, मेंढी, उंटीण, यांचें दूध पिणें; हीं कर्मे तर ज्यांचीं नित्याप्रमाणेंच झालीं असून, वर आणखी त्यांचें म्हणणें असें असतें कीं, जे मनुष्य आमच्याप्रमाणें वागत नाहींत, त्यांचें जन्म व्यर्थ आहे. शल्या, फार काय सांगूं, प्रस्थल, गांधार, आरट्ट, खस, वसाति, सिंधु, सौवीर, कारस्कर, माहि-

षक, कलिंग, केरल, कर्कोटक, वीरक, जर्तिक आणि तुझा मद्र देश, हे कुत्सित असल्यामुळें मद्रदेशाधिपति जो तूं, तोही तसाच, अतएव मला कुत्सित भाषण करितोस.

**श्लोक.**

मानुषाणां मलं म्लेंच्छं म्लेंछानामौष्ट्रिका मलम् ।।
औष्ट्रिकाणां मलं पंढाः पंढानां क्षुद्रयाजकाः ॥ २४ ॥
क्षुद्रयाजकयाज्यानां मद्रकाणां च यन्मलम् ।।
तद्भवेद्वै तव मलं यद्यस्मान्न विमुंचसि ।। २५ ।।
( भार० कर्ण० अ० ४४ ).

आणखीही

मुद्रके संगतं नास्ति हतं वृश्चिक ते विषम् ।।
आथर्वणेन मंत्रेण यथा शांतिः कृता मया ॥ ३३ ॥
इति वृश्चिकदष्टस्य विषवेगहतस्य च ।।
कुर्वंति भेषजं प्राज्ञाः सत्यं तच्चापि दृश्यते ।। ३४ ॥
( भार० कर्ण० अ० ४० ).

मद्र देशाशीं संगत होणें अयोग्य असेल, तर हे वृश्चिक, तूं डसलेल्या मनुष्याचें विष उतरो, अशा अथर्वणवेदांतील मंत्रानें, मांत्रिक विष उतरतात. तें तुझ्या कृतीवरून शल्या, मला सत्यच दिसतें. इतकें बोलून कर्ण उगाच राहिला. नंतर शल्य बोलूं लागला, कर्णा, आतुर ( रोगी ) त्यांचा परित्याग करणें, आपलीं स्त्रियाबालकें विकणें, इ० कर्मे तुझ्या अंगदेशांत होतात, तेथील तूं राजा होस, म्हणून तूं जर स्वतः तसा असलास, तर माझ्या देशांतील व्यवहारावरून मीही तद्वत होईन हें यथार्थ आहे. परंतु देशव्यवहारावरून राजास नांव ठेवणें योग्य नाहीं. आणखी दुसरें, कांहीं प्रजा वाईट असली म्हणजे सर्वच तसी असत्ये असें नाहीं, यास्तव तुझें मजविषयीं दोषारोपयुक्त भाषण योग्य नसून, माझ्या सर्व प्रजेविषयींही योग्य नाहीं.

**श्लोक.**

आतुराणां परित्यागः स्वदारसुतविक्रयः ॥
अंगे प्रवर्तते कर्ण येषामधिपतिर्भवान् ॥ ४० ।।
सर्वत्र ब्राह्मणाः संति संति सर्वत्र क्षत्रियाः ।।
वैश्याः शूद्रास्तथा कर्ण स्त्रियः साध्व्यश्च सुव्रताः ॥४२॥
रमंते चोपहासेन पुरुषाः पुरुषैः सह ।।
अन्योन्यमवरक्षंतो देशे देशे समैथुनाः ॥ ४३ ॥
सर्वत्र संति राजानः स्वं स्वं धर्ममनुव्रताः ।।
दुर्मनुष्यान्निगृण्हंति संति सर्वत्र धार्मिकाः ।। ४५ ।।
न कर्ण देशसामान्यात्सर्व पापं निषेवते ।।
( भार० कर्ण० अ० ४४ ).

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, साध्वी स्त्रिया, आणि आपआपला स्वधर्म पाळून दुष्ट मनुष्यांचा निग्रह करणारे धार्मिक राजे सर्वत्र आहेत, म्हणून कर्णा, तूं केलेलें भाषण एकदेशीच होय. याप्रमाणें उभयतांचें भाषण चाललें आहे, इतक्यांत दुर्योधन तेथें आला, आणि म्हणाला कीं, ही वेळ आपण उभयतांनीं वाद करण्याची नाहीं, माझें हित होईल तें पाहावें. त्यावरून कर्णानें शल्यास सांगितलें कीं, युधिष्ठिर आणि भीम जिकडे आहेत, तिकडे माझा रथ ने. तेव्हां शल्यानें तिकडे रथ नेला असतां, कर्णानें अनिवार युद्ध करून, शतावधि रथी मारून पाडले. युधिष्ठिर, नकुल, सहदेव, त्यांस तर यानें त्यांच्या गळ्यांत धनुष्य घालून ओढिलें असतां, कुंतीस दिलेल्या वचनाचें यास स्मरण होऊन, त्यांस सोडून दिलें, व पुढें आलेल्या भीमास म्हणाला कीं, तूं गदायुद्धांत मात्र कुशल आहेस, अस्त्रविद्येचें परिज्ञान तुला चांगलें नाहीं, यास्तव मजपुढें तूं येत जाऊं नयेस. इतक्यांत अर्जुन कर्णासमोर आलेला पाहून, शल्य म्हणाला, कर्णा, तूं येव्हढा वेळ अर्जुन कोठें आहे म्हणून भारी छंद घेतला होतास, त्यास, हा आतां अर्जुन पहा.

नंतर कर्णाचें व अर्जुनाचें अत्यंत घोर युद्ध झालें, त्यांत कर्णाचें युद्धकौशल्य त्या दिवशीं अर्जुनानें पाहून, त्यानेंही तसेंच दाखवून, यास इतकें जर्जर केलें कीं, याला त्या दिवशीं वासवी शक्तीचें ( इंद्रानें दिलेल्या शक्तीचें ) स्मरण झालें, परंतु ती पूर्वीच घटोत्कचावर सोडिली होती त्यामुळें, यानें दुसऱ्या अस्त्राची योजना केली. ( घटोत्कच श० पहा ). या अस्त्राची यानें योजना केली असतां, यास नकळत तक्षकपुत्र त्यावर बसलेला कृष्णानें जाणून, त्याचा व कर्णाचा प्रयत्न यानें निर्फळ केला व अर्जुनास वांचविलें. ( १ अश्वसेन श० पहा ).

याप्रमाणें झालें असतां, तक्षकपुत्र पुनः कर्णाकडे आला, व त्यांस म्हणूं लागला कीं, मी तुझ्या बाणावर तुला नकळत बसलों होतों. परंतु माझा प्रयत्न व्यर्थ गेला. यास्तव तूं आपल्या बाणावर माझी पुनः योजना कर. कर्णानें उत्तर केलें, मी तुझ्या बळावर युद्ध आरंभिलें नाहीं, म्हणून मला तसें करण्याची गरज नाहीं, तर येथून चालता हो. असें म्हणतांच तो निरुपाय होऊन स्वस्थळीं गेला, व कर्ण पुनः युद्ध करूं लागला. होतां होतां, तो दिवस कर्णाच्या मृत्यूचा असल्यामुळें, त्यास, अस्त्रयोजनेचें विस्मरण होत चाललें, व त्या संधींत याचें रथचक्रही भूग्रस्त

झालें. असें पाहून हा रथाखालीं उतरला, आणि चक्र काढण्याचा यत्न करीत आहे तों, अर्जुनानें याच्यावर निर्वाण बाण योजिला.त्यास पाहून कर्ण म्हणाला,अर्जुना, मी रथचक्र काढण्यास गुंतलों आहें, तर क्षणभर अवकाश कर,इतक्यावर तसें करशील तर अधर्मयुद्ध होईल. अर्जुनानें उत्तर केलें,तुम्ही साहा महारथ्यांनीं मिळून अभिमन्यूस मारलेंत, त्या वेळेस धर्म कोठें गेला होता ? यास्तव आतां मीही तें कांहीं पाहात नाहीं, असें म्हणून, त्यानें तो बाण यावर सोडतांच याचें शिर तुटून, हा गतप्राण होऊन रणभूमीवर पडला. ( भार० कर्ण० अ० ९०–९२ ).

कर्ण गुणांनीं चांगला होता, परंतु दुर्योधनाच्या संगतीनें त्याची बुद्धि भ्रंश पावली होती. दानशूरत्व तर याचें इतकें वर्णनीय होतें कीं, आपल्या अंगास जशी त्वचा आहे, तद्वत् यास आंगचेंच कवच असलेलें कर्तन करून ( कातरून ) यानें ब्राह्मणवेषधारी इंद्रास दिलें. हा शापदग्ध होता म्हणूनच अर्जुनानें यास मारिलें, यास अनेक स्त्रिया असून, सत्यसेन, प्रसेन, भानुसेन, पृथुसेन, वृषसेन, चित्रसेन, शत्रुंजय आणि वृषकेतु, इ० पुत्र होते. यांत वृषकेतु लहान असल्यामुळें वांचला जाऊन, इतर सर्व हा असतांच भारती युद्धांत मरण पावले होते. कर्ण मरण पावला असें पाहून दुर्योधनास अनिवार शोक होऊन, तो रोदन करीत आपल्या शिबिरास गेला.

२–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**कर्णक**–एक ब्रह्मर्षि. ( २ अत्रि श० पहा ).

**कर्णनिर्वाक**–ऋषिवि०.

**कर्णवेष्ट**–पांडवपक्षीय राजा. ( भार० उद्योग० अ० ४ ).

**कर्णश्रवा**–पांडवांसमागमें द्वैतवनांत होता ऋषि तो.

**कर्णाटक**–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कर्णिका**–एक अप्सरा.

२–वसुदेवभ्राता जो कंक त्याची स्त्री, हिला ऋतधामा, आणि जय, असे दोन पुत्र होते.

**कर्णिकार**–जटायूच्या पुत्रांतील एक.

**कर्णिरथ**–एक ब्रह्मर्षि. ( २ अत्रि श० पहा ).

**कर्दम**–एक प्रजापति, हा ब्रह्ममानसपुत्र असून, त्याच्या छायेपासून स्वायंभू मन्वंतरांत उत्पन्न झाला होता. यानें प्रजा निर्माण व्हावी म्हणून सरस्वती नदीच्या तीरीं दुर्घट तप चालविलें असतां, यास भगवान् प्रत्यक्ष होऊन वरप्रदानपूर्वक बोलले कीं, स्वायंभू मनु तुला त्याच्या तीन कन्यांतील एक कन्या विवाहविधीनें देईल,तिचें तूं पाणिग्रहण करून प्रजा निर्माण करावीस. असें बोलून भगवान् अंतर्धान पावल्यावर, अल्पच काळानें स्वायंभू मनूनें यास कन्या भार्यार्थ दिली, तिचें नांव देवहूती असें होतें. तिचेठायीं यानें **कला, अनसूया, श्रद्धा, हविर्भुवा, गति, क्रिया, ख्याति, अरुंधती,** आणि **शांति,** अशा नऊ कन्या निर्माण करून, महर्षीस याप्रमाणें दिल्या होत्या. पहिली कला–ती **मरीचीस,** दुसरी अनसूया **अत्रीस,** तिसरी श्रद्धा **अंगिराऋषीस,** चौथी हविर्भुवा **पुलस्त्यास,** पांचवी गति **पुलहास,** साहावी क्रिया **क्रतूस,** सातवी ख्याती, **भृगूस,** आठवी अरुंधती **वसिष्ठास,** आणि नववी शांति **अथर्वणऋषीस,** नंतर यानें एक पुत्र निर्माण केला, तो **कपिलमहामुनि,** या नांवानें प्रसिद्ध होता. ( भाग० ३ स्कं० अ० २१–२४ ).

२–पुलह ऋषीचा पुत्र, ज्यास सिनीवाली नांवाची स्त्री होती तो ( मत्स्य० अ० २३ ). ( २ पुलह श० पहा ).

३–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

४–एक राजर्षि.

**कर्दमाल–कर्दमिल**–भारतवर्षीय भरतखंडस्थ तीर्थ. येथें भरत राजास ऋषींनीं राज्याभिषेक केला होता. ( भार० वन० अ० १३५ ).

**कर्मजित्**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न उपरिचरवंशांत जन्मलेल्या बृहत्सेन राजाचा पुत्र, यास पुत्र सुतंजय ना० होता.

**कर्मश्रेष्ठ**–स्वायंभूमन्वंतरांतील पुलह ऋषीच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.

**कर्मायन**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**कर्मी**–शुक्राचार्याच्या चार पुत्रांतील कनिष्ठ. ( २ शुक्र श० पहा ).

**कर्वट**–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा पूर्वेकडे वंगदेशाच्या पुढें पांडवांच्या वेळेस असून, त्या काळीं तेथें ताम्रलिप्त ना० राजा होता. ( भार० सभा० अ० ३० ).

**कलशीकंठ**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कला**–कर्दम प्रजापतीच्या नऊ कन्यांतील पहिली, व मरीचि ऋषीची स्त्री. हिला कश्यप आणि पूर्णिमा असे दोन पुत्र होते.

२–बिभीषणाची ज्येष्ठ कन्या. ही रामाकडील कुशलवृत्त अशोकवनिकेंत वारंवार जाऊन सीतेस कळवीत असे. ( वा० रा० सुंदर० स० ३७ ).

**कलावती**–काशीपतीची कन्या, सोमवंशीय यदुकुलोत्पन्न दशार्ह राजाचा पुत्र व्योम, ज्यास दाशार्ह म्हणतात त्याची स्त्री. ही दुर्वासऋषींची शिष्य असून, अत्यंत पवित्र असे. हिचें पाणिग्रहण करून पतीनें हिला स्वनगरींत आणिल्यावर, रात्रौ आपल्या मंदिरांत नेलें, व आलिंगन देऊं लागला, तेणेंकरून त्याचें शरीर पोळलें. म्हणून तो हिला पुसूं लागला कीं, असें होण्याचें कारण काय ? हिनें सांगितलें, आपण अभक्ष्य पदार्थ भक्षिल्यामुळें मलिन झालां आहां म्हणून असें झालें असेल. त्यावरून त्यानें गर्गमुनीस शरण जाऊन शरीर शुद्ध केलें असतां, हिचें अंग मग त्यास चंदनाप्रमाणें शीतल लागूं लागलें. ( स्कंद० ब्रह्मोत्तर० ).

**कलि**–कश्यप ऋषीपासून मुनीना० भार्येस झालेल्या देवगंधर्वांतील एक. ( १ देवगंधर्व श० पहा ).

२–चार युगांतील चौथें व त्याची मूर्तिमान् देवता. याची वर्षसंख्या देवमानानें १२०० वर्षांची असून मनुष्यमानानें ४, ३ २,००० चार लक्ष बत्तीस सहस्र वर्षांची असते. याचा संध्या, व संध्यशकाल देवमानानें दोनशें संवत्सरांचा म्हटलेला आहे. ( मत्स्य० अ० १६४ ). मघा नक्षत्रीं सप्तर्षि आले म्हणजे कलियुगास आरंभ होतो. ( भाग० १२ स्कं० अ० ३ ). सांप्रत कलियुगाचीं ४९७७ चार सहस्र नऊशें सत्याहत्तर वर्षें गत झालीं आहेत, व हें युग चालू मन्वंतरालें २८ वें आहे.

**कलिंग**–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा इंद्रप्रस्थापासून दक्षिण दिशेकडे असून, याची राजधानी राजपुर म्हटलेली आहे. येथें पूर्वकाळीं चित्रांगद राजा होता. ( भार० शांति० अ० ४ ). पांडवांच्या वेळेस येथें भानुमंत राजा असे. ( भानुमंत श० पहा ).

२– एक नगर, व तत्संबंधी देश. हा इंद्रप्रस्थाच्या कांहींसा नैर्ऋत्येस असून यांत अमरकंटक पर्वत आहे. ( वा० रा० अयो० स० ७१ ).

३– ( सो० वं० ) ययातिपुत्र अनुराजा तत्कुलोत्पन्न बलीच्या साहा पुत्रांतील तिसरा. सुतपा राजाचा पौत्र.

**कलियुग**–द्वितीयार्थक कलि श० पहा.

**कलिसंतरण**–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**कल्कि**–कलीच्या अंतीं संभल ग्रामामध्यें रहाणाऱ्या विष्णुयशा ना० ब्राह्मणाच्या गृहीं होणारा विष्णूचा अवतार. ( भार० वन० अ० १९० ).

**कल्प**–उत्तानपादपुत्र ध्रुव त्यापासून, भ्रमी भार्येच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ.

२– तेरा सैंहिकेयांतील एक. (२ सैंहिकेय श० पहा ).

३– वसुदेवापासून उपदेवेस झालेला पुत्र.

४– ब्रह्मदेवाच्या दिवसाचें साधारण नांव. आपल्या मनुष्यांच्या एका मासांत, जसे साधारणतः तीस दिवस असतात, तसेच ब्रह्मदेवाच्या मासांतही तीस कल्प असतात. कल्पाचें मान केवढें असतें त्याविषयीं असें आहे.–कृत, त्रेता, द्वापर आणि कलि या चार युगांचा एक पर्यय ( चौकडी ), असे पर्यय सहस्र झाले म्हणजे ब्रह्मदेवाचा प्रातःकालापासून सायंकालापर्यंत केवळ दिवस होतो, इतकीच पुढें रात्र. याप्रमाणें एक जें अहोरात्र, त्यास कल्प असें नांव आहे. ब्रह्मदेवाच्या दिवसांत स्वर्गांत चौदा इंद्र, आणि पृथ्वीवर चौदा मनु होतात. या मनूचें, मनुष्यमानाचा, एकाहत्तर पर्यय, व वरती कांहीं अधिक इतका काळ मन्वंतर चालतें. ( भाग० ३ स्कं० अ० ११ ). ब्रह्मदेवाचें वर लिहिल्या मानानें शतसंवत्सरपरिमित आयुष्य म्हटलेलें असून, त्यांत पन्नास वर्षांचें प्रथम परार्धगत झालें आहे; व प्रस्तुत द्वितीय परार्ध चालू आहे; यांत किती वर्षें झालीं असून कोणत्या वर्षाचा कितवा मास चालला आहे, तें कांहीं आढळत नाहीं, परंतु जो मास चालू आहे त्यांत पंचवीस कल्प ( ब्राह्म दिवस ) होऊन गेले असून सांप्रत सव्विसावा कल्प चालला आहे. व चार पुढें होणारे आहेत. ही कल्पव्यवस्था भारतादि ग्रंथांत मुळींच नसल्यामुळें, ती मत्स्यपुराणांत निःसंशय आढळल्यावरून येथें प्राधान्यत्वानें ग्रहण केली आहे. तीं कल्पांचीं नांवें येणेंप्रमाणें.– १ श्वेतकल्प, २ नीललोहित, ३ वामदेव, ४ रथंतर, ५ रौरवकल्प, ६ देवकल्प, ७ बृहत्कल्प, ८ कंदर्पकल्प, ९ सद्यकल्प, १० ईशानकल्प, ११ तमकल्प, १२ सारस्वतकल्प, १३ उदानकल्प, १४ गरुडकल्प, १५ कौर्मकल्प, १६ नारसिंहकल्प, १७ समानकल्प, १८ आग्नेयकल्प, १९ सोमकल्प, २० मानवकल्प, २१ तत्पुरुष, २२ वैकुंठ, २३ लक्ष्मी, २४ सावित्री, २५ घोरकल्प, २६ वाराहकल्प, ( हा प्रस्तुत चालला आहे ), २७ वैराज, २८ गौरीकल्प, २९ माहेश्वर आणि ३० पितृकल्प. यांत कौर्मकल्प ब्रह्मदेवाची पूर्णिमा, व पितृकल्प अमावास्या समजावी. कल्पारंभीं जो अवतार होतो, त्यावरून तें नांव कल्पास पडून चालतें, हेंही एक पूर्णपणें लक्षांत वागवावें. जसा प्रस्तुत चालू कल्पारंभीं वराहावतार झाला होता, म्हणून वाराहकल्प नांव चालत आहे त्याप्रमाणें. ( मत्स्य अ० २८९ ).

**कल्माषपाद्**– ( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न सुदास राजाचा पुत्र मित्रसह, वीर्यसह, अ० सौदास राजा, त्यासच हें नामांतर. या नांवानें हा विशेष प्रख्यात होता. हें नांव यास पडण्याचें कारण असें.–एकदां हा अरण्यांत मृगयेस गेला असतां, यानें तेथें दोन राक्षस पाहिले; त्यांतून एकास तर यानें मारिलें, दुसऱ्यास मारणार इतक्यांत तो पळाला म्हणून हा, त्याचा विशेषेंकरून पाठलाग न करितां स्वनगरास माघारा आला. इकडे पळालेल्या राक्षसानें मात्र राजाचा सूड मी केव्हांतरी उगवीन असें मनांत धरून, तो ती संधी पहात असतां, याच्या घरीं यज्ञनिमित्तानें वसिष्ठऋषि बराच काळपर्यंत राहिले होते. त्यांत एके दिवशीं वसिष्ठ स्नानसंध्येस नदीतीरीं गेलेले पाहून, त्या अवकाशांत त्यानें वसिष्ठाचें रूप धारण केलें आणि राजास म्हणाला कीं, आज भोजनार्थ सामिष अन्न सिद्ध करीव. राजानें तथास्तु म्हणून सूदास बोलावून तसें करण्याची आज्ञा दिली. त्यानें राजाज्ञेप्रमाणें तें अन्न सिद्ध करण्याच्या संधींत राक्षसानें गुप्तरूपेंकरून तेथील मांस चोरून, त्या जागीं नरमांस ठेविलें, व तो चालता झाला. हें सूदास ( पाक सिद्ध करणारास )कांहींच विदित नसल्यामुळें त्यानें तें मांस पाकरूपानें सिद्ध करून ठेविलें, व वसिष्ठ ऋषि स्नानसंध्या करून घरीं आल्यावर, राजानें पात्रें मांडविलीं असतां, सर्व अन्नें मदयंतीनें ( राजस्त्रीनें ) वाढिलीं, त्यांत तें मांस वाढिलें. तें वसिष्ठानें ओळखून,तत्काळ राजास त्यानें शाप दिला कीं,तूं राक्षस होशील;कारण नरमांस अभक्ष्य असतां तूं कसें वाढविलेंस ? राजास नरमांसाचें वृत्त मुळींच ठाऊक नसल्यामुळें त्यानेंही वसिष्ठास शाप देण्यासाठीं हातांत उदक घेऊन अभिमंत्रित केलें, इतक्यांत मदयंती राजास म्हणाली, आपण कुलगुरूस शाप देतां हें काय ? साधारण मांस असतें तर वसिष्ठाचें मुळींच कांहीं म्हणणें नव्हतें. नरमांसामुळें त्यांचें म्हणणें आहे. त्यावरून राजानें शोध केला असतां सूदाच्या करण्यांत कपट नसून, हें नरमांस तर निश्चयात्मक आहे खरें, तेव्हां हें कोणी तरी राक्षसानें माझ्या नाशार्थ कृत्य केलें आहे यांत संशय नाहीं. असा यानें निश्चय करून, अभिमंत्रित जल त्यानें आपल्याच पायांवर टाकिलें, तेणेंकरून याचे पाय कृष्णवर्ण झाले व यास त्या दिवसापासून असें नांव पडलें. राक्षस होण्याचा यास जो वसिष्ठाचा शाप होता. तो द्वादशसंवत्सरांचा असून नंतर यानें पूर्ववत् राजा व्हावें असा होता. त्याप्रमाणें हा पुढें पूर्ववत् झाला. परंतु राक्षसयोनींत हा असतां, याच्या शरिरांत विश्वामित्रानें आणखी किंकर ना० राक्षसाची प्रेरणा करवून, वसिष्ठाचे शक्ति आदिकरून शत पुत्र मारविले. तसेंच एक ब्राह्मणदंपत्य अरण्यांत संचार करीत असतां त्यांतील पुरुषालाही यानें भक्षिलें होतें, यामुळें त्याच्या स्त्रीनें तूं मदयंतीचा समागम होतांच मरशील असा शाप दिला होता. ( वा० रा० उत्तर० स० ६५ ). यास पुढें जो पुत्र झाला तोच अश्मक नांवानें प्रसिद्ध होता. ( अश्मक श० पहा ).

**कल्माषा**–भारतवर्षीय नदी. (भार० भीष्म० अ० ९). ( मत्स्य० अ० ११३ ).

**कल्याणिनी**–धरनामक वसूची स्त्री. हिला द्रविण अ० रमण ना० पुत्र होता.

**कवची**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**कवष**–युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांतील होता ना० ऋत्विज. ( भाग० दश० अ० ७४ ).

**कवषा**–कोणी ऋषिपत्नी, तुर ऋषीची माता. ( तुर श० पहा ).

**कवि**–देववि०. ( तुषित श० पहा ).

२–स्वायंभूमन्वंतरांतील ब्रह्मपुत्र भृगुऋषि, त्याच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. याचा पुत्र उशना ऋषि.

३–प्रियव्रत राजर्षीस बर्हिष्मतीपासून झालेल्या दाहा पुत्रांतील कनिष्ठ. हा बाल्यावस्थेपासूनच विरक्त होता. ( भाग० ५ स्कं० अ० १ ).

४–तामस मन्वंतरांतल्या सप्तर्षींत झालेला एक. (तामसमनु श० पहा ).

५–रैवत मनूच्या दाहा पुत्रांतील पांचवा. ( रैवतमनु श० पहा ).

६–ऋषभ देवाच्या नऊ सिद्ध पुत्रांतील ज्येष्ठ. ( ऋषभदेव श० पहा ).

७–वैवस्वत मनूच्या दाहा पुत्रांतील कनिष्ठ. हा विरक्त होता म्हणून अरण्यांत गेला. ( भाग नवम० अ० २ ).

८–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

९–वैवस्वत मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र यास वारुणि कवि अशी संज्ञा होती. ( भार० अनु० अ० ८५ ). यास कवि, काव्य, धृष्णु, उशना, भृगु, विरजा, काशि आणि उग्र, असे आठ पुत्र होते.

१०–ब्रह्मपुत्र जो वारुणि कवि, त्याच्या आठ पुत्रांतील ज्येष्ठ. ( भार० अनु० अ० ८५ श्लोक० १३२–१३४ ).

११-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्ववंशीय भरत राजा. त्याच्या कुलांत जन्मलेल्या दुरितक्षय राजाच्या तीन पुत्रांतील मध्यम. हा तपानें ब्राह्मण झाला होता.

१२-कौशिक ऋषीच्या सात पुत्रांतील एक. ( पितृवर्ती श० पहा ).

१३-कृष्णास कालिंदीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

१४-कृष्णाचा एक प्रपौत्र. हा महारथी होता.

**कविरथ**-(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न पांडववंशांतील चित्ररथ राजाचा पुत्र, याचा पुत्र वृष्टिमान्.

**कव्यवाल**-पितरवि०. (देवीभा० ११ स्कं० अ० १५).

**कशेरक**-यक्षवि०

**कश्यप**-स्वायंभूमन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र जो मरीचि ऋषि, त्यास कर्दमकन्या कला, तिच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. हा स्वारोचिष मन्वंतरामध्यें सप्तर्षीत होता.

२-वैवस्वत मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र मरीचि ऋषि. त्याचा पुत्र तो. यास प्राचेतस दक्षानें आपल्या ६० साठ कन्यांतून तेरा कन्या प्रजावृद्धि करण्यासाठीं भार्यार्थ दिल्या होत्या, त्यांचीं नांवें अशीं-**अदिति, दिति, दनु, काला, दनायु, सिंहिका, क्रोधा, प्राधा, इला, विनता, कपिला, मुनी,** आणि **कद्रु.** यांत **काष्ठा, सुरसा, क्रोधवशा, ताम्रा,** इ० कित्येक नांवें, फेरानें आढळतात. तरी तेरा संख्येंत गोंधळ अगदीं नाहीं. या प्रत्येकीची संतति, तिच्या नांवावर पृथक् पृथक् लिहिली आहे ती पहावी. या तेरा स्त्रियांत भारतामध्यें विश्वा लिहिली आहे, आणि विश्वा तर प्राचेतस दक्षानें साठ कन्यांतून धर्मऋषीस दिलेल्या दाहा कन्यांत आहे. म्हणून ती याच्या स्त्रियांत धरतां आली नाहीं.

याच्या कुलांत मंत्रद्रष्टे ऋषिमुख्य हा स्वतः एक, आणि याचे दोन पुत्र अवत्सार आणि असित मिळून तीन. त्यांत अवत्सारास निध्रुव आणि रैभ, असे दोन पुत्र असून असितास एकच शांडिल ना० पुत्र होता. निध्रुवाच्या संततीस नैध्रुव, रेभाच्या संततीस रैभ्य, आणि शांडिलाच्या संततीस शांडिल्य असें म्हटलेलें आहे. अवत्सराच्या स्त्रीचें नांव आढळत नाहीं; परंतु असित ऋषीस मात्र एकपर्णा नांवाची स्त्री आढळत्ये. नित्य ऋषि आणि देवल, हे शांडिल्याचे प्रख्यात वंशज होते, व तेहि मंत्रद्रष्टे असत, असें मत्स्यपुराणांत आहे. ( लिंग० अ० ६३ ).

कश्यपाच्या मुख्यत्वेंकरून निध्रुव, रेभ आणि शांडिल, अशा तीन वंशमालिका आहेत. त्यांतील पहिलींतील ऋषींची प्रवरव्यवस्था अशी.-आश्रायणि, मेष, कीरिटकायन, उदग्रज, माठर, भोज, शालाहलेय, कौरिष्ठ, कन्यक, आसुरायण, मंदाकिन्य, वैसृगय, श्रुति, भोजपायन, देवयान, गोमयान, अधच्छाय, अभय, कात्यायन, शाक्रयाण, बर्हियोग, गदायन, भवनंदि, महाचक्री, दाक्षपायन, योधयान, कार्तिवय, हस्तिदान, वात्स्यायन, निकृतज, आश्वलायनिन, प्राग्रायण, पौलमौलि, आश्ववातायन, कौवेरक, श्याकार, अभिशर्मायण, मेषप, कैकरसप, बभ्रु, प्राचेय, ज्ञानसंज्ञेय, आग्माप्रासेव्य, श्यामोदर, वैवशप, उद्वलायन, काष्ठाहारिण, मारीच, आजिहायन, हास्तिक, वैकर्णेय, कश्यपेय, सासिस, हारितायन, मातंगिन आणि भृगु. हे सर्व **काश्यप, आवत्सार, नैध्रुव,** या तीन प्रवरांचे होते. रेभकुलोत्पन्नांस **काश्यप, आवत्सार, रैभ्य,** असे तीन प्रवर असतात. शंडिलकुलोत्पन्नांस **काश्यप, आवत्सार, शांडिल्य,** असे तीन प्रवर असतात. ( मत्स्य० अ० १४४ ).

संयाति, नभ, पिप्पल्य, जलंधर, भुजातपुर, पूर्य, कर्दम, गर्दभिमुख, हिरण्यबाहु, कैरात, काश्यप, गोभिल, कुलह, वृषकंड, मृगकेतु, उत्तर, निदाघ, मसृण, भत्स्यमहांत, शांडिल्य, दानव, देवजाति, पैप्पल आणि दित्स. हे सर्व शंडिलवंशमालिकेंतील असून, यांस **काश्यप, आवत्सार, असित;** **काश्यप, आवत्सार, देवल,** अ० **काश्यप, असित, देवल,** असे तीन प्रकारांनीं तीन प्रवर असतात.

अनसूय, नाकुरय, स्नातप, राजवर्तप, शैशिर, उदवहि, सैरंध्रि, रोपसेवाकि, यामुनि, काद्रू, पिंगाक्षि, संजातंवि, दिवावष्टाश्व, हे ऋषि द्व्यामुष्यायण आहेत, म्हणून यांस **काश्यप, आवत्सार, वासिष्ठ,** असे तीन प्रवर असतात. ( मत्स्य० अ० १९८ ).

कश्यपऋषि मरीचि ऋषीचा पुत्र म्हणून यास कोठें कोठें मारीच असें म्हटलेलें आहे, व अरिष्टनेमि असेंहि क्वचित् नांव यास आढळतें. हा मार्गशीर्षमासीं प्रतिवर्षी सूर्यासमागमें संचार करण्यास असतो. ( ४ सह श० पहा ).

**कंस**-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतपुत्र अंधक, त्याच्या वंशांत जन्मलेल्या उग्रसेन राजाच्या नऊ पुत्रांतील ज्येष्ठ. हा, कालनेमि ना० असुरांशानें जन्मला होता म्हणून, स्वभावतःच दुष्टबुद्धीचा असे. यास अस्ति आणि प्राप्ति, या दोघी जरासंधाच्या कन्या स्त्रिया होत्या. हा प्रथमतः कांहीं अंशीं चांग-

लाहि होता असें वाटतें. कारण, याचा पितृव्य ( चुलता ) देवक राजा, त्याच्या देवकी ना० कन्येचा विवाह, वसुदेवाशीं यानें मोठ्या समारंभानें केला, व त्या वधूवरास रथारूढ करून आपण सारथि होऊन, नगरांतून मिरवीत पोहोंचवायास निघाला असतां, मार्गामध्यें देववाणीनें यास असें सांगितलें कीं, कंसा, या देवकीचा अष्टम गर्भ तुला मारील. त्यावरून याची पहिली वृत्ति बदलून, यानें तत्काळ खड्ग उपसला, आणि देवकीस मारूं लागला. तेव्हां वसुदेव मध्यें होऊन यास म्हणूं लागला कीं, या समारंभांत तुला असें करणें योग्य नाहीं. वास्तव, हिला जें जें अपत्य होत जाईल, तें तें मी तुला आणून देत जाईन; परंतु तूं हिला या समयीं सोड.त्यावरून, हा कांहींसा शांत झाला, व त्यानें देवकीस सोडून तो समारंभ पूर्ण केला.

थोड्याच अवकाशांत याच्या मनांत असें आलें कीं, पुत्रलोभ मोठा कठिण आहे. तेव्हां वसुदेव बोलल्याप्रमाणें झालेलें अपत्य देतो कीं न देतो, याचा भरंवसा काय? यास्तव त्यास व देवकीस आपल्या समीप प्रतिबंधांत ठेवावें, हें योग्य आहे; परंतु उग्रसेन ही गोष्ट ऐकेल न ऐकेल म्हणून, यानें प्रथम उग्रसेनास प्रतिबंधांत ठेवून आपण राज्य चालवूं लागला, आणि मग वसुदेव देवकीस मनांत आल्याप्रमाणें आपल्या समीप आणून प्रतिबंधांत ठेविलें.

अशाप्रकारें प्रतिबंधांत असतां, देवकीस पहिल्यानेंच पुत्र झाला. तो वसुदेवानें बोलल्याप्रमाणें कंसास देतांच याच्या मनांत त्यास मारूं नये असें प्रथम आलें; परंतु लागलाच विकल्प येऊन, यानें तो बालक मारिला. याप्रमाणें यानें देवकीचे साहा पुत्र मारिले. पुढें देवकी सातव्यानें गर्भिणी झाली असतां, तो गर्भ देवमायेनें तिचा जिरून, गोकुळांत नंदासमीप वसुदेवाची स्त्री रोहिणी होती, तिच्या उदरीं जाऊन, ती तिकडे एकाएकीं गर्भिणी झाली. अशारीतीनें सातवा गर्भ जिरला, हें कंसास कळतांच, त्यानें अष्टमगर्भाविषयीं अतिशय सावधपणा राखिला; परंतु तो अष्टम बालक जन्मून, वसुदेवानें त्यास गोकुळामध्यें नंदगृहीं सुरक्षित पोहोंचवून, त्याच समयास त्यास तिकडे झालेली कन्या मथुरेस बंदिशाळेंत आणिली, तेव्हां कंसास देवकी प्रसूत झाली असें कळलें. मग तो लागलाच धांवला, व त्या कन्येस धरून मारूं लागला, तों ती त्याच्या हातून निसटून आकाशांत अदृश्य झाली. तात्पर्य, सातवा बलराम व आठवा कृष्ण अशाप्रकारें वाचून गोकुळांत वाढूं लागले.

पुढें कंसास असें कळलें कीं, देवकीचे शेवटचे दोन पुत्र गोकुळांत वाढत आहेत. त्यावरून त्यास आश्चर्य झालें कीं, असें कसें झालें !! तथापि ईश्वरी लीला अगाध आहे, असें त्यास वाटून, आपण स्वतः त्या बालकांवर चालून जाणें योग्य नाहीं म्हणून, पूतना, अघासुर, केशी इ०कांस यानें क्रमेंकरून गोकुळांत पाठविलें. त्यांचा वध झाला असतां, याचा निश्चय झाला कीं, देवकीचेच हे पुत्र होत, यांत संशय नाहीं. मग यानें धनुर्यागाच्या निमित्तानें त्यांस गोकुळांतून मथुरेस आणायाकरितां अक्रूरास पाठविलें. त्याप्रमाणें अक्रूर त्यांस घेऊन आला असतां, चाणूर व मुष्टिक, हे मल्ल यानें त्यांवर मल्लयुद्धामिषानें सोडिले, त्यांस उभयतांनीं मारून कृष्णानें तत्काळ कंसास धरिलें, व त्याच्याच खड्गानें त्याचा शिरच्छेद केला. त्याबरोबरच त्याचे आठ बंधुही बलरामानें मारिलें. ( भाग० १० स्कं० अ० ३६-४४ ).

**कंसवती**—उग्रसेनाची कन्या, कंसाची भगिनी. ही, वसुदेवाचा कनिष्ठ भ्राता देवश्रवा त्याची स्त्री असून, हिला त्यापासून सुवीर आणि इषुमान् असे दोन पुत्र झाले होते.

**कंसा**—उग्रसेनाची कन्या, वसुदेवभ्राता देवभाग त्याची स्त्री. हिला त्यापासून, चित्रकेतु, बृहद्बल आणि उद्धव असे तीन पुत्र झाले होते.

**कंसावती**—कंसवती शब्द पहा.

**कहोड** अ० **कहोल**—एक ऋषि. उद्दालक ऋषीचा शिष्य; यानें गुरुगृहीं राहून, गुरुसेवा उत्तमप्रकारें केल्यामुळें, गुरुनें संतुष्ट होऊन यास आपली कन्या भार्यार्थ दिली होती. तिला घेऊन हा गृहस्थाश्रम करूं लागला असतां, सुजाता, यापासून गर्भिणी झाली. एकदां हा अध्ययन करीत असतां, तिच्या गर्भानें यास अध्ययन न करण्याविषयीं निषेध केला. त्यावरून यास कोप येऊन, यानें त्या गर्भास,तूं आठ स्थळीं वांकडा होशील असा शाप दिला.कांहीं कालानें हा द्रव्ययाचनेनिमित्त जनक राजाकडे गेला असतां, तेथें वरुणपुत्र बंदीनें अनेक ऋषींस वादांत जिंकून उदकांत बुडविलें, त्यांत हाहि बुडाला. तेथून यास पुनः परत याच्या पुत्रानें बंदीशीं वाद करून, त्यांस जिंकून आणिलें. ( अष्टावक्र श० पहा ). यास कौषीतकेय असेंहि म्हटलेलें आहे.

**कक्षसेन**—असित पर्वतावर राहणारा एक राजर्षि. (भार० अनु० अ० १३७ ).

**कक्षीवान्**—कोणी एक ऋषि.

**कक्षेयु**—कुक्षेयु शब्द पहा.

**काकी**—कश्यपापासून ताम्रेस झालेल्या कन्यांतील एक.

२–स्कंदाच्या शरीरापासून उत्पन्न झालेल्या मातरांतील एक देवता.

**काकुत्स्थ**—ककुत्स्थ राजाचा पुत्र जो अनेना अ० सुयोधन त्यासच नामांतर.

**काकेयस्थ**—एक ब्रह्मर्षि. ( कृष्णपराशर श० पहा ).

**कांचन**—च्यवनभार्गवास नामांतर. ( वा० रा० उत्तर० स० ६६ ).

२–( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न भीमराजाचा पुत्र. याचा पुत्र होत्रक राजा.

**कांचनष्ठीवि**—सुवर्णष्ठीवि शब्द पहा.

**कांचनाक्षि**—भारतवर्षीय भरतखंडस्थ सरस्वती नदीच्या सप्तप्रवाहांतील एक प्रवाह.

**कांचीपुरी**—भरतखंडस्थ एक नगरी. ( देवीभा० ७ स्कं० अ० ३८ ).

**काठ्य**—एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कांड्रषप**—एक ऋषि. ( गौरपराशर श० पहा ).

**काण्व**—एक ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**काण्वायन**—एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कांतिकोसल**—ईशान्यकोसलच.

**कात्यायन**—एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ). हा, याज्ञवल्क्यस्त्री कात्यायनी, तिचा पिता असावा.

२–दाशरथि रामाच्या सभेंत असणाऱ्या अष्ट धर्मशास्त्रयांतील एक.

**कात्यायनी**—पार्वतीस नांव आहे.

२–याज्ञवल्क्य ऋषीची दुसरी स्त्री.

**काद्रवेय**—कद्रूपुत्र जे संपूर्ण नाग, सर्प ते.

**काद्रुपिंगाक्षि**—एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**कानीन**—अभिवेद्य ऋषीस नांव. व्यास, कर्ण इ० कांस, कन्येपासून झाल्यामुळें नांव.

**कान्यकुब्ज**—भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. यास प्रस्तुत कनोज म्हणतात. या देशास असें नांव कां पडलें ? त्याविषयीं ( कुशनाभ श० पहा ).

**कांपिली**—ब्रह्मदत्त राजाची नगरी.

**कापिलेय**—पंचशिख ऋषीस म्हटलेलें आहे.

**कांपिल्य**—( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशांतील भर्म्याश्व अथवा भद्राश्व राजाच्या पांच पुत्रांतील चौथा.

२–द्रुपद राजाची दक्षिणपांचाल येथील नगरी.

**कापी**—भरतखंडस्थ नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**काप्य**—पतंजलि ऋषीस कपिवंशोत्पन्नत्वामुळें नामांतर.

**कांबोज**—हा देश, उत्तर आणि पश्चिम अशा दिशाभेदानें दोन प्रकारचा आहे. त्यांत पश्चिमेकडे एकच कांबोज असून, उत्तरेकडे दोन कांबोज आहेत. त्यांमध्यें एकाचें नांव उत्तर कांबोज, व दुसरा परम कांबोज. हा दिशाक्रम इंद्रप्रस्थ मध्य मानून येथें धरिला आहे, असें समजावें. ( भार० सभा० अ० २७ ). ( भार० भीष्म० अ० ९ ). येथें पांडवांच्या वेळेस सुदक्षिण राजा होता.

**काम**—ब्रह्मपुत्र, याची स्त्री रती. हा, महादेवाच्या तृतीयनेत्राग्नीनें भस्म झाला होता.

२–चतुर्विध पुरुषार्थांतील तिसरा.

३–वैवस्वत मन्वंतरांतील बृहस्पतीचा दौहित्र. ( कन्येचा पुत्र ).

**कामकायन**—एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**कामगम**—धर्मसावर्णि मन्वंतरांतील त्रिविधदेवसंबंधी देववि०.

**कामगिरि**—भारतवर्षीय सामान्य पर्वत. ( वा० रा० किष्किं० स० ४३ ) यासच कामशैल नांव आहे.

**कामंद**—एक ब्रह्मर्षि, आंगरिष्ट राजानें यास, शुद्ध धर्म, अर्थ आणि काम कोणते ते मला सांगा, असा प्रश्न केला असतां, जेणेंकरून चित्तशुद्धि होईल तो धर्म; मोक्ष पुरुषार्थ साधेल तो अर्थ; आणि देहनिर्वाहापुरतीच इच्छा तो काम, असें उत्तर दिलें होतें. ( भार० शांति० अ० १२३ ).

**कामदुघ**—सुस्वधा ना० पितरांचा लोक.

**कामधेनु**—हविर्धानी शब्द पहा.

**कामशैल**—कामगिरि शब्द पहा.

**कामाश्रम**—चतुर्थार्थक अंग शब्द पहा.

**काम्यकवन**—दुर्योधनानें, द्यूतामिषेंकरून पांडवांची सर्व संपत्ति हरण केल्यावर, युधिष्ठिर, बंधूंसहवर्तमान द्रौपदीस घेऊन, प्रथमतः द्वैतवनांत प्रवेशला. ( भार० वन० अ० २ ). तेथें यांसमागमें धौम्य ऋषि पुरोहित व अन्यहि ब्राह्मणसमुदाय असल्यामुळें, युधिष्ठिरास त्यांच्या निर्वाहाची मोठी विवंचना पडूं लागली, म्हणून तो या वनांत सर्व समुदायासहित आला. ( भार० वन० अ० ३ ). येथें असतां, सूर्यापासून स्थालीची प्राप्ति युधिष्ठिरास होऊन, असंख्य ब्राह्मण समसमयास भोजन करून सुखानें राहूं लागले, पुढें

याचा कित्येक काळ तीर्थयात्रादिकांत गेल्यानंतर पुनः या वनांत याचें आगमन झालें. कांहीं काळ पुनः द्वैतवनांत राहून, मातक्यान या वनांत आगमन झालें. ( भार० वन० अ० २५८ ). हें वन हस्तिनापुराच्या कोणत्या दिशेस होतें, त्याचा उल्लेख भारतांत नाहीं.

**काम्या**–कोणी एक अप्सरा.

**कायनि**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**कायव्य**–एक निषाद होता. हा अरण्यसंबंधीं सर्व दस्यूंचा अधिपति असे. हा शूर असून, परम धार्मिक असल्यामुळें, यास, एके काळीं याच्या सजातियांनीं पुसलें कीं, तूं धर्मतत्त्व चांगलें जाणतोस, तर आम्हीं कसें आचरण केलें असतां उत्तम गति पावूं तें सांग. त्यावरून यानें सांगितलें कीं, तुम्हीं ब्राह्मणांचा द्वेष कधींहि करीत जाऊं नका, तर त्यांस सर्वभावानें भजून, लहान बालकें, स्त्रिया, भयभीत, पलायन करणारे व निरायुध, इतक्यांस मारीत जाऊं नका. जे ब्राह्मणांचे शत्रु असतील, त्यांशीं युद्ध करून त्यांस मारा. अशा रीतीनें वागलां असतां उत्तम गति पावाल. ( भार० शांति० अ० १३५ ).

**कायशोधन**–भारतवर्षीय तीर्थ.

**कायाध्रव**–कयाधूचे प्रऱ्हादादिक पुत्र ते. परंतु मुख्यत्वें-करून प्रऱ्हादाविषयीं विशेष रूढी.

**कायावरोहण**–भारतवर्षीय क्षेत्र व तीर्थ.

**कारकि**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कारंधम**–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न सुवर्चा अ० करंधम राजा त्याचा पुत्र अवीक्षित त्यासच नामांतर.

२–दक्षिण समुद्राकडील तीर्थ. ( नारीतीर्थ श० पहा).

**कारस्कर** भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. ( १ कर्ण श० पहा ).

**कारस्कार**–कारस्कर देशाचा राजा. हा राजसूय—यज्ञ-काळीं सामान्य कार्यांत युधिष्ठिरास बहुत उपयोगी पडला होता. ( हा कुकुरवंशोत्पन्न होता म्हणून, यास कौकुर असें म्हणत असत ).

**कारीरय**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कारीषि**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**कारुकायन**– " "

**कारूपथ**–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. याची राजधानी अंगदीया. ( अंगदीया श० पहा ).

**कारूषक**–करूषक देशाचा राजा वृद्धशर्मा तो. याचा पुत्र दंतवक्र. हा राजा भारती युद्धांत दुर्योधनाकडे होता.

**कारोटक**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कार्तवीर्य**–( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजित्, त्याच्या वंशांत जन्मलेल्या कृतवीर्य राजाचा पुत्र जो अर्जुन, त्यासच हें नामांतर होतें. यानें दत्तात्रेयाची अत्युत्तम सेवा करून, सहस्र हस्त प्राप्त करून घेतले होते, त्या-मुळें यास सहस्रार्जुन असेंही नांव पडलें होतें. हा अनूप देशांतील माहिष्मती नगरी, ती आपली राज-धानी करून संपूर्ण भरतवर्षावर आधिपत्य करीत असे. (भार० वन० अ० ११५). व ( भार० अनु० अ० १५२ ). हा दत्तप्रसादेंकरून स्मर्तृगामी होता, त्यामुळें याच्या राज्यांत पाप होत नसून, याप्रमाणें यानें पंचायशीं सहस्र वर्षेपर्यंत उत्तम प्रकारेंकरून राज्य केलें. यानें, रावण आपणास बलवान् जरी समजत होता, तरी त्यासही बंधन केलें होतें. ( रावण श० पहा ). याकडून अग्नीनें एक वन भक्षणार्थ मागित-लेलें यानें त्यास देऊन, त्याची प्रसन्नता संपादिली होती. परंतु, त्याच्या भक्षणांत वसिष्ठऋषीचा आश्रम दग्ध झाल्यामुळें, त्यानें यास तुझे सहस्र हस्त भग्न होतील, असा शाप दिला होता, तोच पुढें याच्या मरणास कारण झाला. ( आपव श० पहा ). यास पुत्र सहस्र होते, परंतु त्यांत जयध्वज, शूरसेन, वृषभ, मधु आणि ऊर्जित, हे पांच शूर, धृष्ट, क्रोष्टु, वैकर्ता, अवंति, अशा नामांतरांनीं प्रसिद्ध व प्रमुख होते.

एकेकाळीं हा मृगयेनिमित्त अरण्यांत गेला असतां, तेथें यानें जमदग्नि ऋषीचा आश्रम पाहून त्यांत गमन केलें. त्यावरून जमदग्नीनें, कामधेनूच्या आश्रयानें याचा उत्कृष्ट सत्कार केला, त्या काळीं यानें संतोषून सुखानें स्वनगरास जावें तें न जातां, त्याची कामधेनु बलात्कारानें हरण केली. ती, जमदग्नीचा पुत्र परशु-राम यास सामोपचारानें मागत असतांही यानें न दिल्यामुळें, त्याचें व याचें युद्ध होऊन, त्यांत हा, त्याच्या हातून सहस्र हस्त तुटून मरण पावला. ( भार० वन० अ० ११७ ).

**कार्तिकेय**–प्रथमतः महादेवाचें रेत शरवण ना० वनांत स्कन्न ( पतन पावलें ) तें पुढें कांहीं कालपर्यंत गंगेनें, व अग्नीनें क्रमेंकरून धारण केलें. त्यापुढें साहा कृत्ति-कांनीं धारण केलें असतां, याचें जन्म झालें, म्हणून यास अनुक्रमानेंच, स्कंद, गांगेय, अग्निभू आणि कार्तिकेय अशीं नांवें पडलीं. हा प्रत्येक कृत्तिकेपासून एक मुख आणि दोन हात अशा आकृतीनें साहीं-पासून एकेचकाळीं जन्मून, एका ठिकाणीं जडल्यामुळें, याची आकृति साहा मुखें व बारा हातांची झाली,

तेणेंकरून यास षण्मुख असें नांव पडलें. हा पुढें देवांच्या सेनेचा अधिपति झाला होता, त्यावरून यास सेनानी असें नांव असून, गुहेंत वास करण्यानें गुह असेंही यास म्हटलें आहे. ( भार० वन० अ० २२३-२२६ (व) भार० अनु० अ० ८५ ).

**कार्तिवय**-एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**कार्दमायनि**-एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**कार्पणि**- ,, ,,

**कार्ष्णायन**-एक ऋषि. ( कृष्णपराशर श० पहा ).

**कार्ष्णि**-कश्यपपत्नी मुनी तिजपासून झालेल्या देवगंधर्वांतील एकाचें नामांतर. ( १ देवगंधर्व श० पहा ).

२-कृष्णपुत्र प्रद्युम्नास प्राधान्येंकरून नांव. ( भाग० १० स्कं० अ० ५५ श्लो० ९ ).

**काल**-ध्रुव ना० वसूचा पुत्र त्यास नांव.

२-एक ऋषि.

३-एक असुर. ( २ महिषासुर श० पहा ).

४-कोणी एक योद्धा. ( कुशीलव श० पहा ).

५-एक पर्वत. ( वा० रा० किष्किं० स० ४३ ).

**कालकंठ**-रुद्रगणवि०.

**कालकवृक्षीयमुनि**-यासमीप भूत, भविष्य, वर्तमान जाणणारा एक पक्षी होता. एकदां हा, कोसलदेशाधिपति क्षेमदर्शी राजाकडे फिरत फिरत आला असतां, राजानें या पक्ष्याच्या अंगीं असा गुण आहेसा जाणून, मुनिस पुसलें कीं, माझे मंत्री मजविषयीं कसे आहेत, तें या पक्ष्याकडून सांगवा. त्यावरून पक्ष्यानें एकाचे दुर्गुण काय होते ते सांगून, इतरांचे उदयीक सांगेन म्हणून म्हटलें, तें तथ्य मिळाल्यावरून, रात्रीं अन्य मंत्र्यांनीं त्या पक्ष्यास मारिलें. त्यावरून राजा समजला कीं, हे सर्वही मंत्री माझें अनिष्टचिंतन करणारे आहेत यांत संशय नाहीं, म्हणून त्यानें या मुनीचें साह्य घेऊन सर्वांस शासन करून सुखी झाला. (भार० शांति० अ० १०१ ).

**कालका**-वैश्वानर दानवाची कन्या, मारीच ना० असुराची स्त्री.

**कालकाम**-एक विश्वेदेव.

**कालकामुक-कार्मुक**-खर राक्षसाच्या बारा अमात्यांतलि एक. ( १ खर श० पहा ).

**कालकाल**-महादेव.

**कालकाक्ष**-एक गरुडानें मारलेला असुर.

**कालकीर्त्ति**-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**कालकूट**-भारतवर्षीय उत्तर आनर्ताच्या उत्तरेकडील देश. ( भार० सभा० अ० २६ ).

२—मगधदेशांतील एक सामान्य पर्वत.

३—समुद्रमंथनकालीं निघालेलें दुर्धर विष.

**कालकेतु**-असुरवि० हा एकवीर ना० हैहय राजानें मारिला.

**कालकेय**-कश्यप ऋषीची स्त्री काला तिचे पुत्र व त्यांचे वंशज ते. हे वृत्रासुराच्या बळानें देवांशीं युद्ध करीत असतां, ज्या काळीं इंद्रानें वृत्रासुरास मारिलें, त्या काळा हे संपूर्ण समुद्रांत लपले. यांनीं दिवसास लपून राहून, रात्रीं बाहेर निघावें व ऋषींस भक्षावें असा क्रम चालविला असतां, च्यवन ऋषीच्या आश्रयास राहणारे शंभर, भरद्वाजाश्रित वीस, याप्रमाणें असंख्य ऋषि भक्षिले. तेणेंकरून उर्वरित ऋषि भय पावून गुहांतून लपून राहिले. तरींही यांचा उपद्रव न्यून न होतां यज्ञादिक कर्में होईनातशीं झालीं. पुढें सर्व ऋषि इंद्रास पुढें करून ब्रह्मदेवास शरण गेले. त्या काळीं त्यानें अगस्त्यऋषीकडे जाण्याची सर्वांस आज्ञा दिली. त्यावरून ते सर्व अगस्त्याकडे आले, आणि कालकेयांनीं दिलेल्या त्रासाचें वृत्त त्यांनीं त्यास निवेदन केलें. तें ऐकून अगस्त्यानें सर्वांस अभय देऊन समुद्रतीरीं आगमन केलें, व तपोबलानें संपूर्ण समुद्र प्राशिला. त्या योगानें हे सर्व कालकेय त्याच्या उदरांत प्रविष्ट होऊन ऐतेच मरण पावले. ( भार० वन० अ० १०२ -१०५ ).

२—मारीच ना० असुराची स्त्री कालका तिचे पुत्र, यांस कालखंज असेंही म्हटलेलें आहे. हे सर्व हिरण्यपुरांत राहून इंद्रास भारी त्रास देत असत, परंतु इंद्राचें यांपुढें कांहीं चालेना. पुढें द्वापरयुगसमाप्तिकाळीं पंडुपुत्र अर्जुन स्वर्गास गेला असतां, इंद्रानें त्यास यांच्यावर पाठविल्यावरून त्याचें व यांचें बराच कालपर्यंत युद्ध होऊन, शेवटीं हे सर्व व पौलोम अर्जुनाच्या हातून मरण पावले. ( भार० वन० अ० १७३ ).

**कालकोटि**-नैमिषारण्यांतील तीर्थवि०.

**कालखंज**-कालकेय द्वितीयार्थक त्यांसच नांव.

**कालगौतम**-एक ऋषि. ( १ ब्रह्मदत्त श० पहा ).

**कालघट**-जनमेजय राजाच्या सर्पसत्रांतील एक सदस्य ऋषि.

**कालंजर**-मेरुकर्णिका पर्वतांतील एक पर्वत.

२—भरतखंडस्थ एक सामान्य पर्वत. ( पितृवर्ती श० पहा ).

**कालजित्**—लक्ष्मणाचा सेनापति. ( कुशीलव श० पहा ).

**कालजिव्ह**-एक रुद्रगण.

**कालतोयक**-भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कालदंष्ट्र**-दैत्यवि०.

**कालनर**-( सो० वं० ) ययातिपुत्र अनुराजा त्याचा पौत्र व सभानर राजाचा पुत्र, याचा पुत्र सृंजय राजा.

**कालनाभ**-तेरा सैंहिकेयांतील एक. ( २ सैंहिकेय श० पहा ).

**कालनेमि**-असुरवि० ( ३ तारक श० पहा ).

२—लंकेंतील एक राक्षस. युद्धांत लक्ष्मण मूर्च्छित झाला असतां, मारुति द्रोणाचलावरील औषधि आणायास जात आहे असें रावणानें ऐकून, यास त्यानें त्याचा मार्गांत निरोध करावा म्हणून पाठविलें होतें. त्यावरून हा ऋषिवेष धारण करून मारुतीच्या मार्गांत बसला असतां, जलपानार्थ तेथें मारुति थांबला, परंतु मारुतीस तें याचें कपट लवकरच कळलें, म्हणून त्यानें मग विलंब न करतां यास मारून आपल्या कार्यार्थ पुढें गमन केलें. ( अध्या० रा० युद्ध० स० ७ ).

३—शंभर मुखांचा एक दैत्य, यास विष्णूनें मारिलें. ( मत्स्य० अ० १७७ ).

**कालभैरव**-काशीपुरीचा क्षेत्रपाल एक रुद्रगण.

**कालमही**-भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ मत्स्य० अ० ११३ ).

**कालयवन**-कोणी एका यवनाधिपतीनें, यादवांच्या पराभवार्थ आपल्या क्षेत्रांत ( स्त्रीच्या ठायीं ) गर्गमुनीपासून निर्माण करविलेला पुत्र. हा मोठा प्रतापी, व यादवांस अजिंक्य असे. एकदां हा, मोठ्या सैन्यासहित यादवांवर चालून आला असतां, त्यांशीं याचा मोठा भयंकर संग्राम झाला, त्यांत कृष्णानें पाहिलें कीं, यापुढें युद्ध करून जय मिळणें कठिण दिसतें. यास्तव यास युक्तीनेंच मारिलें पाहिजे. नंतर हा कशानें मरेल हें कृष्णानें मनांत आणून, त्यास आपण पळत आहों असें दिसण्याजोगा पळ काढतांच हा त्याच्या पाठीस लागला, पळतां पळतां, कृष्ण एकाएकीं मुचकुंद राजा ज्या पर्वतदरींत निजला होता तींत प्रवेशला, व आंत जाऊन आपलें उत्तरीय वस्त्र त्याच्या अंगावर पांघरूं घालून, पलीकडल्या अंगास आपण लपून काय होतें तें पाहूं लागला. मागून कालयवन येतच होता, त्यानें कृष्णास दरींत शिरलेला पाहून आपणही तींत शिरला आणि आंत पाहूं लागला तों उत्तरीय वस्त्र पांघरुन कृष्णच निजला आहे असें यास वाटून, यानें क्रोधेंकरून त्यास लत्ताप्रहार केला. तेणें करून मुचकुंद जागा होऊन त्यानें नेत्र उघडले, व याकडे पाहातांच त्याच्या कोपानलानें हा तत्काळ दग्ध होऊन मरण पावला. ( भाग० १० स्कं० अ० ५१ ). पुढें मुचकुंदाची व कृष्णाची भेट होऊन परस्परांचें कांहीं संभाषण झाल्यावर तो उत्तर दिशेकडे निघून गेला असतां कृष्ण द्वारकेस परत आला.

**कालरात्रि**--एक पार्वतीची शक्ति. ( शुंभनिशुंभ श० पहा ).

**कालवध**--एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा).

**कालवीर्य**--एक असुर. ( २ सैंहिकेय श० पहा ).

**कालशिख**--एक ब्रह्मर्षि. ( ३ वासिष्ठ श० पहा ).

**कालशैल**-भरतखंडस्थ एक सामान्य पर्वत.

**कालसूत्र**-एक नरक आहे. दशसहस्र योजनें विस्तीर्ण अशा तांब्याच्या पत्र्याखालीं, तितक्याच प्रमाणाचा अग्नि असून, तो पत्रा निरंतर तप्त असतो. जे प्राणी माता, पिता, ब्राह्मण व मुख्यत्वेंकरून ब्रह्मनिष्ठ, यांचा द्रोह करितात, त्यांस यावर उभें करून यमदूत यातना करितात.

**काला**-पार्वतीची शक्ति. ( शुंभनिशुंभ श० पहा ).

२—कश्यप ऋषीच्या स्त्रियांतील एक. हिला चार पुत्र होते. त्यांस कालकेय अशी संज्ञा आहे. ( १ कालकेय श० पहा ).

**कालाग्निरुद्र**—महादेवाची एक मूर्ति.

२—मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**कालानल**-कालनर राजासच नामांतर.

**कालिका**-भारतवर्षीय नदी. ( मत्स्य अ० ११३ ).

२—काली शब्द पहा.

**कालिंजर**-भारतवर्षीय वन.

२-काशींतील स्थलवि०.

**कालिंदी**-अंशुमती नदीसच नांव. यमुनानदीसही हें नांव आढळतें. ( भार० विराट० अ० ५ श्लो०१).

२-कृष्णाची सातवी स्त्री. कृष्ण हा, आपणास पति मिळावा म्हणून, ही यमुनातीरीं तप करीत होती. ही प्रायः यमुनेची मूर्तिमान् देवता असावी, कारण ही कोणाची कन्या इ० वृत्त कोठें आढळत नाहीं. एकदां कृष्ण चातुर्मास्यांत इंद्रप्रस्थीं असतां, अर्जुनास समागमें घेऊन मृगयेस गेला होता, त्या काळीं त्यानें हिला तेथें तप करितां पाहिलें. नंतर तिला कोण म्हणून पुसतां, तिचा अभिप्राय जाणल्यावर, तिला समागमें घेऊन इंद्रप्रस्थास आला व चातुर्मास्य संपून द्वारकेस गेल्यावर, हिचें विधीनें पाणिग्रहण करून आपल्या अष्टस्त्रियांत हिची गणना केली. ( भाग०

१० स्कं० अ० ५८ ). हिला श्रुत इ० पुत्र कृष्णापासून झाले होते. ( ४ कृष्ण श० पहा ).

**कालिय**–काद्रवेयकुलोत्पन्न एक नाग. हा पूर्वी रमणक द्वीपांत राहत असे. त्या द्वीपांत गरुडानें वारंवार जाऊन, नागांस भक्षण करावे, त्यामुळें सर्व नागांनीं मिळून एकदां असा विचार केला कीं, गरुडास आपण सर्वांनीं कांहीं नियमित भक्ष्य देण्याचें ठरवावें, त्याप्रमाणें त्यांनीं ठरवून गरुडास तो विचार कळविला, त्यानें तो मान्य केला व प्रत्यहीं नियमित भक्ष्य भक्षून जाऊं लागला, त्यामुळें नागांस सुख झालें. एकदां असें झालें कीं, गरुडाचा भक्ष्य त्यास न देतां यानें भक्षिला, त्या कारणास्तव गरुडाचें व याचें मोठें युद्ध झालें; परंतु त्याच्या पुढें कांहीं उपाय चालेना असें पाहून, हा जो तेथून पळाला तो यमुनेच्या डोहांत येऊन लपला. असें पाहून गरुड तेथून माघारा परतला, कारण तें स्थान, त्यास सौभरि ऋषीच्या शापामुळें वर्ज्य होतें, व हें मर्म कालियास ठाऊक होतें म्हणूनच तो येथें येऊन निर्भयपणानें राहिला. याचें विष इतकें उग्र होतें कीं, वरून गेलेला पक्षीही त्या जलवायुस्पर्शानें प्राणास मुकत असे, त्यामुळें तो डोह अगदीं वर्ज्य झाला असतांही, कृष्णाचे गोपाळ एकेकाळीं दैववशात् अज्ञानेंकरून तेथें गायींसहवर्तमान गेले, व तेथलि जल प्राशन करून सर्व मरण पावले. हें कृष्णास कळतांच तो तेथें गेला, व समीप असणाऱ्या एका वृक्षावर चढून त्यानें त्या डोहांत उडी टाकिली. नंतर कालिय जेथें होता तेथें जाऊन त्यास आपल्या अद्भुतशक्तीनें धरलें, आणि इतकें मर्दन केलें कीं, त्याचें प्राण कासावीस होऊन मरतोच कीं काय ! इतक्यांत याच्या स्त्रियांनीं यास प्राणदान द्यावें अशी कृष्णाची प्रार्थना केली असतां, व तोही नम्र झाला असतां, यमुनेचें जल अगदीं शुद्ध करवून, व गायीगोपाळांस पूर्वस्थितीवर आणवून, यास पुनः रमणक द्वीपास परत घालविलें. ( भाग० दशम० अ०१६).

२–दाशरथि रामाच्या सभेंतील एक हास्यकार.

**काली**–सतीनें हिमालयाच्या उदरीं जन्म धारण केलें असतां, तिची अंगकांति श्यामवर्ण असल्यामुळें तिला हें नांव पडलें होतें.

२–कालिका म्हणून जी शक्ति ती. हिनें शुंभनिशुंभांचा वध केला. ( शुंभनिशुंभ श० पहा ).

३–मत्स्यीच्या उदरीं जन्मलेली उपरिचरवसुराजाची कन्या. हिला मत्स्यगंधिनी, योजनगंधा इ० नांवें असून, पुढें सत्यवती असेंही नांव पडलें होतें. हीच शंतनूची स्त्री झाली होती. कौमारावस्थेंत हिला पराशर ऋषीपासून कृष्णद्वैपायन पुत्र झाला होता.

४–पंडुपुत्र भीमसेनाची दुसरी स्त्री. हिला त्यापासून सर्वग पुत्र झाला होता.

५–भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ). ( मत्स्य० अ० ११३ ).

**कालेय**–एक ब्रह्मर्षि. ( २ अत्रि श० पहा ).

**कावषेय**–तुर ऋषीस कवषेचा पुत्र म्हणून नांव.

**कावेरी**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( ३ पारियात्र श० पहा ).

२–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( सह्याद्रि श०पहा).

**काव्य**–बर्हिषदपितरांतील एक पितरवि०.

२–वारुणि कवीच्या आठ पुत्रांतील दुसरा. ( ९ कवि श० पहा ).

३–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

४–दैत्यगुरु शुक्राचार्यास कविवंशोत्पन्नत्वास्तव नामांतर.

**काशय**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**काशि**–वारुणि कवीच्या आठ पुत्रांतील सातवा. ( ९ कवि श० पहा ).

२–( सो० वं० ) आयु राजाचा पुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या सुहोत्र ना० पुत्राचा पौत्र, काश्य राजाचा पुत्र. यास पुत्र राष्ट्र नांवाचा होता. या काश्यवंशजांस कोठें कोठें काशिपति असें म्हटलेलें आहे. तथापि हे काशिपुरीचे राजे असें समजूं नये.

३–एक पवित्र नगरी.

**काशिक**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा. ( भार० उद्यो० अ० १७१ ).

**काशिका**–भरतखंडस्थ नदी. ( शुक्तिमान् श० पहा ).

२–काशि नगरी.

**काशिकोशल**–ईशान्यकोसल ज्यास उत्तरकोसल म्हटलें आहे, त्याचेंच नांव. हें नांव यास, काशिसंबंधीं देश समीप असल्यामुळें असावेंसें वाटतें.

**काशिपांचाल**–पूर्वपांचालास हें नांव असावेंसें वाटतें. ( भार० कर्ण० अ० ७३ ).

**काशिराज**–अंबा, अंबिका, अंबालिका, यांचा पिता. परंतु हें नांव काशीच्या कोणत्याही राजास साधारणच असे.

२–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. ( भार० आदि० अ० ६७ ).

**काशी**–काशिपुरी तीच.

**काश्मीर**–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा पांडवांच्या

वेळेस उत्सवसंकेत सप्तगण आणि लोहित या दोन देशांच्या मध्यें होता. ( भार० सभा० अ० २७ ).

**काश्य**–सांदीपनी ऋषीचा पिता.

२–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न सुहोत्र राजाच्या तीन पुत्रांतलि ज्येष्ठ. याचा पुत्र काशि.

३–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशांत जन्मलेल्या सेनजित् राजाच्या चार पुत्रांतील तिसरा.

४– भारतीयुद्धांतील पांडवपक्षीय राजा. हा एकरथी असतां युद्धसमयीं कांहीं वरप्रभावानें अष्टरथी होत असे. ( भार० उद्योग अ० ४ ).

**काश्यप**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

२– एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

३– दाशरथि रामाच्या सभेंत जे आठ धर्मशास्त्री होते, त्यांतील एक.

४– दाशरथि रामाच्या सभेंतील एक हास्यकार.

५– एक ऋषि. यास, एकदां कोणी एका वैश्याच्या रथाचा आघांत होऊन मूर्छा आली, व भूमीवर पडला. नंतर किंचित् सावध झाल्यावर याच्या मनांत असें आलें कीं, देहामुळें अनेक क्लेश भोगावे लागतात, त्याअर्थी देह त्यागावा हें बरें, इतक्यांत मनुष्यदेहाची योग्यता किती मोठी आहे, तें यास दाखविण्यासाठीं, इंद्र जंबुकरूपानें यापुढें येऊन यास असें बोलला:—

**श्लोक.**

मनुष्ययोनिमिच्छंति सर्वभूतानि सर्वशः ॥
मनुष्यत्वे च विप्रत्वं सर्वएवाभिनंदति ८
मनुष्यो ब्राह्मणश्चासि श्रोत्रियश्चा
सि काश्यप ॥ सुदुर्लभमवाप्यैतन्न
दोषान्मर्तुमर्हसि ॥ ९ ॥ अपाणित्वा
द्वयं ब्रह्मन्कंटकं नोद्धरामहे ॥ जंतून्नु-
च्चावचानंगे दशतो निकषामवा ॥ १३ ॥
अथ येषां पुनः पाणी देवदत्तौ दशां
गुली ॥ उद्धरंति कृमीनंगादृशतो
निकषंति च ॥ १४ ॥

( भार० शांति० अ० १८० ).

याप्रमाणें जंबुकाचें वाक्य यानें श्रवण करून, हा इंद्र आहे असें यानें त्यास दिव्य दृष्टीनें ओळखिलें. त्यावरून जंबुकरूप टाकून इंद्र यापुढें उभा राहिला असतां, यानें त्याचा वंदनादिकेंकरून सत्कार केला. पुढें इंद्र स्वर्गास गेला व हा आपल्या आश्रमास आला.

६– पांडवांसमागमें द्वैतवनांत होता ऋषि तो.

७– एक मांत्रिक ब्राह्मण, परीक्षित् राजास सर्पदंश होऊन तो मरणार असें यानें ऐकून, त्यास आपल्या मंत्रसामर्थ्यानें सजीव करून द्रव्य संपादन करावें असें मनांत आणिलें, व हस्तिनापुरास जाण्यास निघाला. तें वर्तमान तक्षकास कळून, त्यानें यास मनुष्यरूपानें मार्गांत गांठिलें, व पुसूं लागला कीं, हे ब्राह्मणा, तूं कोठून कोणीकडे जात आहेस ? त्यावरून यानें वास्तविक वृत्त होतें तें सांगितलेलें ऐकून, यास म्हटलें कीं, हा पुरुषयुक्त वृक्ष मी भस्म करितों, यास जर तूं पुनः पूर्ववत् करशील, तर मी तुझें मंत्रसामर्थ्य खरें समजेन. यानें सांगितलें, बरें आहे. त्यावरून तक्षकानें त्या वृक्षास दंश केला व वरील पुरुषासहित त्याचें भस्म केलें. तें यानें पाहून लागलाच आपल्या मंत्रानें तो पुरुषासहित वृक्ष पूर्ववत् केला. त्यावरून तक्षकाचा निश्चय झाला कीं, हा, परीक्षित् राजास खाचित सजीव करील. नंतर तक्षक यास म्हणाला, ऋषिपुत्रानें परीक्षितास दिलेला शाप मिथ्या करून जो तुला लाभ होणार, त्याहून अधिक द्रव्य हें घे, आणि परत जा. तक्षक तो मीच आहे. त्यावरून यानें तें द्रव्य घेतलें, व तेथूनच माघारा फिरून स्वस्थळास आला. ( भार० आदि० अ० ४३ ).

८– सावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षींतलि एक.

**काश्यपि**–कश्यपाचा वंशज तो. अरुणासहि म्हणतात.

**काश्यपी**–संपूर्ण पृथ्वी कश्यपाची म्हणून तिला हें नांव आहे.

**काश्यपेय**–एक ब्रह्मर्षि. ( २ काश्यप श० पहा. ) सूर्यासही नांव आहे.

२– कृष्णाचा सारथि जो दारुक तो. ( भार० द्रोण अ० १४७ श्लो० ५५ ).

**काष्ठाहारिण**–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**कासोरु**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**काक्षीवान्**–अनुकुलोत्पन्न बलिराजानें, आपली स्त्री सुदेष्णा तिला, पुत्रसंपादनार्थ दीर्घतमा ऋषीच्या सेवेस जाण्यास सांगितलें असतां, तिनें एकदां आपण न जातां, दासीस त्याकडे पाठविलें. त्या काळीं दासीच्याठायीं हा झालेला पुत्र. हा तपाचरणेंकरून ब्रह्मलोकास गेला.

**किंकर**–कोणी एक राक्षस. हा, विश्वामित्रानें आज्ञा केल्यावरून कल्माषपाद राजाच्या शरीरांत प्रवेशला होता.

२– लंकेतील एक सहस्र राक्षसांचा समुदायवि०.( वा०

रा० सुंदर० स० ४२ ). ( हनुमान् श० पहा ).

**किंकिण**- ( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या वंशांत जन्मलेल्या सात्वतपुत्र भजमानाच्या दुसऱ्या स्त्रीस झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा.

**किन्नराश्व**- ( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न सुनक्षत्र राजाचा पुत्र, ज्यास पुष्कर असें मुख्य नांव होतें, त्याचें नामांतर.

**किंपुना**-भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ). (भाग० ५ स्कं० अ० ९ ).

**किंपुरुष**-आग्नीध्राच्या नऊ पुत्रांतील दुसरा. यास मेरु-कन्या प्रतिरूपा ती स्त्री असून, याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध होता.

**किंपुरुषवर्ष**-जंबुद्वीपाच्या नऊ वर्षसंज्ञक भागांतील एक भाग तो. याच्या चतुःसीमा, उत्तरेस हेमकूट पर्वत, दक्षिणेस हिमालय, आणि पूर्वपश्चिम दिशां-कडे क्षार समुद्र, याप्रमाणें आहेत. यास हैमवत वर्ष असें नामांतर असून, येथें किन्नरसंज्ञक देवयोनिवि० मानवांची वसती आहे. आग्नीध्रपुत्र किंपुरुष तो येथील अधिपति होता. ( भार० भीष्म० अ० ६ ).

**किरातदेश**-इंद्रप्रस्थ मध्य धरून, याचे पूर्व, पश्चिम आणि उत्तर असे तीन भेद आहेत. ते त्या त्या अक्ष-रक्रमांत पाहावे.

**किरीटी**-पंडुपुत्र अर्जुनास नामांतर.

**किर्मीर**-एक राक्षस, बकासुराचा भ्राता. हा, वैत्र-कीय ना० वनांत ( वेताच्या वनांत ) राहात असे. हस्तिनापुराहून पांडव निघून काम्यकवनांत आले असतां, आपल्या भ्रात्यास भीमसेनानें मारिलें तो सूड उगवण्यासाठीं हा त्या वनांत आला, व पांड-वांचा मार्ग चोहींकडून रोधून धरिला. त्यावरून भीमसेनाशीं याचें घोर युद्ध होऊन,त्यांत हा त्याच्या हातून मरण पावला. ( भार० वन० अ० ११ ).

**किशोर**-बली दैत्याच्या पुत्रांतील एक. ( मत्स्य० अ० १७२ ).

**किष्किंध**-एक सामान्य पर्वत.

**किष्किंधा**-दक्षिणेकडील एक नगरी. येथील मूळ राजा ऋक्षरजा, पांडवांच्या वेळेस येथें मैंद आणि द्विविद असे वानरजातीय राजे होते. ( भार० सभा० अ० ३१ ).

**कीकट**-ऋषभ देवाच्या दाहा पुत्रांतील कनिष्ठ. हा याच नांवाच्या खंडाचा अधिपति होता.

२.—भरतवर्षाच्या नऊ खंडांतील एक.

३—भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कीचक**-पूर्वमत्स्यदेशाधिपति विराटराजा, त्याच्या सुदेष्णा ना० स्त्रीचा भ्राता, व त्याचा श्याल. यासुद्धां कीचक एकशेंपांच असून ते सर्व कैकेय होते. या सर्व बंधूंत हा ज्येष्ठ असून मोठा पराक्रमी होता, त्यामुळें विराटानें यास आपला सेनापति केलें होतें. वनवास सरून, अज्ञातवासार्थ पांडव विराटाच्या गृहीं राहिले असतां, त्यांत द्रौपदी, सैरंध्री नांव स्वीकारून सुदेष्णेसमीप राहिली होती. तिचे नेम—मी कोणाचें उच्छिष्टभक्षण, पादप्रक्षालन, व अनुचित अन्य कार्य, कधीं करणार नाहीं इ० होते, व ते सर्व मी तुझे पाळीन असें सुदेष्णेनें मान्य केलें होतें. याशिवाय कोणी पुरुष मजविषयीं अभिलाषबुद्धि धरील, तर त्यास तुम्ही शासन केलें पाहिजे, तसें न कराल तर माझे पति पांच गंधर्व आहेत, ते त्यास शिक्षा कर-तील व मग तुम्हास वाईट वाटेल, असें होऊं नये. हेंही सुदेष्णेनें मान्य करून, तिला आपणासमीप ठेविलें होतें; कारण ती, तिला तशीच पवित्र आहे, असें तिच्या आकृतीवरून पूर्ण वाटलें होतें.

या गोष्टीस बरेच दिवस लोटून, सुदेष्णेसमीप सैरंध्री सुखानें असतां, एकदां कीचक आपल्या भगि-नीस भेटावें अशा उद्देशानें सहजरीत्या तिच्या मंदि-रांत आला, व सैरंध्रीस एकाएकीं त्यानें पाहिलें. या-पूर्वी यानें तिला कधींच पाहिलें नव्हतें. तिला पाह-तांच हा अगदीं वेडा होऊन भगिनीस पुसूं लागला कीं, हीं नूतन स्त्री कोण आहे ? सुदेष्णा म्हणाली, माझी परिचारिका आहे. तें ऐकून यास फार आश्चर्य झालें, व कांहीं वेळ स्तब्ध राहून, भगिनीची मर्यादा न धरितां सैरंध्रीस म्हणूं लागला कीं, हे सैरंध्री, तुझें स्वरूप अत्युत्कृष्ट असतां,तूं परिचारिका कशी झालीस ? मला असें वाटतें, तूं राजपत्नी असावीस, व मिषें-करून तूं हें दास्य स्वकारिलें असावेंस.अस्तु तें कांहीं असो, परंतु आज तुझा भाग्योदयच होण्याचा समय म्हणून येथें माझें येणें झालें, त्या अर्थीं मी माझ्या भगिनीस सांगून तुझी येथून मुक्तता करवितों. तर माझी स्त्री होऊन मजसमागमें माझ्या गृहीं चल. कीचकासारखा पति मिळून महद्भाग्य प्राप्त होत असतां, सैरंध्रीपणाचीच इच्छा धरून कोण अभागी स्त्री राहील ? माझें मन असें साक्ष देतें कीं, मी जें कांहीं बोललों, हें तुला रुचलें असावें, व तूं बोलण्या-सही मर्शी इच्छित्येस, परंतु माझी भगिनी समक्ष आहे, या कारणानें कांहीं उत्तर न देतां स्तब्ध राहि

र्ली आहेस. इतकें बोलून कीचक उगाच राहिला. कीचक बोलत असतां सैरंध्री खालीं मान घालून त्याचें सर्व भाषण ऐकत होती, व सुदेष्णा कांहीं-तरी कीचकास बोलेल म्हणून वाट पाहात होती; परंतु ती कांहींच बोलत नाहीं असें पाहून ती स्वतःच कीचकास म्हणूं लागली, कीचका, तूं जें भाषण केलेंस हें तुझ्या सारख्यास अगदीं योग्य नाहीं. अरे, परस्त्रीचा अभिलाष धरून पूर्वी कोणाचें कल्याण झाले आहे म्हणून तुझेंच होईल. तुला असें वाटत असेल कीं, मला कोणी नियंता नसेल, तर तसें समजूं नको, मला नियमन करणारे पांच गंधर्व महासमर्थ आहेत, व ते गुप्तरूपानें माझें सर्वकाळ संरक्षण करीत आहेत. यास्तव जर त्यांस हा तुझा अन्याय कळेल, तर तूं नसत्या अनर्थांत मात्र आपणास पाडून घेशील. इतकें बोलून ती स्तब्ध झाली. ( भार० विराट० अ० १४ ).

असें सैरंध्रीनें केलेलें भाषण ऐकून, आपल्या मनाशीं कीचक याप्रमाणें विचार करूं लागला कीं, ज्या स्त्रियांच्या मनांतून पुरुषास वश व्हावयाचें असतें, त्या बाह्यात्कारीं उग्रच भाषण करितात असें मी ऐकतों. म्हणून इनें केलेलें भाषण तसेंच तर नसेलना ! अस्तु, तें कसेंही कां असेना ? जरी तिच्या मनांतून वश होणें नसलें, तरी मी कीचक आहे, मी बलात्कार केला असतां विराटही मला निवारण करूं शकणार नाहीं, मग इतरांची काय कथा ? असें बोलून तो तेथून उठला, आणि जातांना भगिनीस म्हणाला कीं, ही मला जेणेंकरून वश होईल असें कर. तें ऐकून सुदेष्णा कीचकास म्हणाली, तूं इजविषयीं पापबुद्धि धरूं नयेस; कारण हिनें मजजवळून याविषयीं प्रथमच वचन घेतलें आहे, यास्तव तें मला पाळिलें पाहिजे. असें सैरंध्रीसमक्ष जरी सुदेष्णा बोलली, तरी तिला, कीचक हा भ्राता असल्यामुळें त्याचें इष्ट करणें आवश्यक होतें, म्हणून ती त्यास निराळी भेटून म्हणाली कीं, मी सैरंध्रीस कांहींतरी निमित्तानें तुजकडे पाठवीन, मग तुला पाहिजे तसें कर. इतकें ऐकतांच कीचक मोठ्या हर्षानें स्वगृहीं गेला. या गोष्टीस सुदेष्णेनें कांहीं दिवस लोटून दिले, व सैरंध्रीस तिचें अगदीं विस्मरण पाडिलें. नंतर एके दिवशीं तिनें, युक्तीनेंच आपल्या अन्य परिचारिका दुसऱ्या कांहीं कार्याकडे गुंतवून, सैरंध्री मात्र एकटी जवळ ठेवलेली अशा संधीस तिला म्हटलें, हे सैरंध्री, हें पात्र घेऊन तूं कीचकाच्या गृहीं जा, आणि त्यास सांग कीं, तुझ्या भगिनीनें यांत मद्य भरून मागितलें आहे. तें ऐकून सैरंध्री म्हणाली, हें कार्य माझें नाहीं, तुम्ही दुसऱ्या कोणास पाठवून माझे नियम पाळण्याविषयीं दिलेलें वचन सत्य करा. सुदेष्णा बोलली, सैरंध्री, तें सर्व माझ्या ध्यानांत आहे,मी दाटून हें कार्य तुला सांगत्यें असें नाहीं.परंतु आज तुजवांचून जवळ कोणचि नाहीं, म्हणून सांगत आहे. तर आजचा दिवस कसेंही करून तूं जा, व मद्य घेऊन ये. तुझ्या मनांत त्या दिवसांचें कीचकाचें भाषण येऊन, तेथें जाण्यास भीति वाटत असेल हें जरी खरें आहे, तरी तूं माझ्याच कार्योद्देशानें आज तिकडे जाणारी असल्यामुळें तुला त्यापासून भीति नाहीं असें समज. त्यावरून सैरंध्रीस मोठें संकट झालें, परंतु उपाय नाहीं असें जाणून तिनें, सुदेष्णेनें दिलेलें पात्र हातांत घेतलें व कीचकाच्या गृहाकडे जाण्यास निघाली. जातांना मार्गांत तिनें सूर्याचें स्तवन केलें. तें असें कीं, हे विश्वसाक्षी सूर्या, तूं भगवंताचा चक्षु आहेस, म्हणून प्राणिमात्रांच्या शुभाशुभ कृति तूं सर्व पाहतोस, त्यांत मी जर तुजसमोर चांगली वागल्यें असेन, तर या समयीं तूं माझें रक्षण कर. त्यावरून एक दूत, तिला मात्र दिसावा असा गुप्त तेथें अकस्मात् प्राप्त झाला, त्यास पाहून सैरंध्री निर्भय होत्साती कीचकाकडे जाण्यास निघाली. ( भार० विराट० अ० १५ ).

सैरंध्री कीचकाच्या गृहाकडे चालली असतां, जवळ जवळ जातांच त्यानें तिला येतांना पाहिलें. त्यावरून त्यास पराकाष्ठेचा हर्ष होऊन, ती आपल्या गृहांत केव्हां येत्ये म्हणून मोठ्या उत्सुकतेनें तिच्या मार्गाकडे तो डोळे लावून बसला—इतक्यांत, ती त्याच्या द्वारासमीप जाऊन तेथेंच बाहेरल्या अंगास उभी राहिली, व तिनें आणलेलें पात्र उंबऱ्याच्या आंत ठेवून सुदेष्णेनें यांत मद्य मागितलें आहे असा तिचा निरोप सांगितला. तो ऐकून कीचक द्वारासमीप येऊन तिला म्हणूं लागला, हे शुभांगि, तूं येथें कां उभी राहिलीस ? आंत ये, व माझें ऐश्वर्य पहा. परंतु सैरंध्रीनें एकच उत्तर केलें, यांत सत्वर मद्य दे व मला जाऊं दे, विलंब लावूं नको; कारण सुदेष्णा मद्याकरितां खोळंबून बसली आहे. कीचक म्हणाला, तूं मद्य घेऊन जाण्याची काळजी करूं नको, मी तें दुसऱ्या कोणासमागमें तिकडे पाठवितों, परंतु आंत ये. तथापि सैरंध्री ऐकेना. ती म्हणाली, कीचका, मी त्या दिवसीं माझें सर्व वृत्त तुला सांगितलेंच आहे, असें असून जर तूं मजविषयीं

पापबुद्धि धरशील, तर मरणास पात्र होशील. त्यावरून मोठ्या आवेशानें कीचक तिजसमीप आला, आणि बलात्कारानें तिला आंत नेण्यासाठीं तिचा हात धरूं लागला. तेव्हां क्रोधेंकरून सैरंध्रीनें त्याच्या हातास झिडकारून देऊन म्हटलें, मूर्खा, इतका मदांध कां झालास? कोण स्त्री कशी आहे त्याचा विचार कर, कामाधीन होऊन भलत्याच कर्मास प्रवृत्त होऊं नको. मग तर कीचकास इतका अनिवार क्रोध आला कीं, तो तिला उचलण्यास प्रवृत्त झाला. तें सैरंध्रीनें पाहून ती तेथून जी पळत निघाली, ती राजसभेसच आली. मागून कीचकही धांवला व त्यानें तिला राजसभेंत गांठिलें आणि तिची वेणी धरून तिला लत्ताप्रहारानें ताडन केलें. तें अतिशय कर्म झालेलें पाहातांच सूर्यदूतानें कोणाच्या दृष्टीस न पडतां, कीचकास येवढा प्रबळ आघात केला कीं, तो एकाएकीं, वृक्ष जसा वायूनें उन्मळून पडतो, तसा निःसंज्ञ होऊन तेथें पडला. सैरंध्रीस कीचकानें केलेला लत्ताप्रहार राजसभेंत सर्वांनीं अवलोकन केलाच होता, त्यावरून तिनें राजास म्हटलें कीं, या तुझ्या सभेंत तुजसमक्ष असा अन्याय होणें योग्य नाहीं. तें ऐकून विराटानें त्याचें उत्तर नीट केलें नाहीं, तो म्हणाला, स्त्रियांचीं कृत्यें कशीं असतात तीं कोणी जाणावीं? त्यावरून तेथें कंक (युधिष्ठिर) होता, तो सभासद कोणी बोलत नाहींत असें पाहून सैरंध्रीस म्हणाला कीं, हे सैरंध्रि, तुला राजसभेंत येऊन इतकें अमर्यादपणानें भाषण करणें योग्य नाहीं, यास्तव येथून सत्वर गमन कर, व अंतः पुरांत चालती हो. असें ऐकून सैरंध्री तेथून निघाली, व सुदेष्णेकडे येऊन तिनें तिला झालेलें वर्तमान सांगितलें. तें तिनें ऐकून घेतल्यावर तिला म्हटलें कीं, झाली गोष्ट ती झाली, आतां तूं तिचा अगदीं खेद मानूं नको. त्या दुष्टाकडे इतःपर मी तुला कधींच पाठविणार नाहीं. (भार० विराट० अ० १६).

सुदेष्णेनें जरी सैरंध्रीचें समाधान केलें, तरी तिला त्या दिवशीं अगदीं चैन पडलें नाहीं. वारंवार राहून राहून त्या गोष्टीचें स्मरण होऊन, पुढें यास उपाय तरी काय करावा, हेंच तिच्या मनांत येऊं लागलें. शेवटीं रात्र झाली असतां, तिच्या मनांत आलें कीं, आतां या संकटांतून बल्लवच (भीमसेनच) मला सोडवील तर सोडवील, इतरांच्या हातून कांहीं होणार नाहीं, यास्तव तिकडे जावें. नंतर सर्वत्र सामसूम झालेलें पाहून, ती तेथून (सुदेष्णेच्या मंदिरां-तून) निघाली, ती बल्लव निजला होता त्या पाकशाळेंत आली, आणि त्यास जागें करून म्हणूं लागली कीं, मी महत्संकटांत असतां, आपणास निद्रा सुखानें येत्ये तरी कशी? तेव्हां बल्लव काय झालें म्हणून पुसूं लागला. त्यावरून तिनें पहिल्यापासून झालेलें इत्थंभूत वृत्त त्यास निवेदन केलें व रडूं लागली. पुढें बल्लवाचा व तिचा बराच संवाद होऊन, शेवटीं त्यानें तिचें समाधान करीत असें सांगितलें कीं, तुला उदयीक कीचक प्रायः भेटेलच, भेटला असतां, त्याशीं क्रोधमुद्रा न दर्शवितां असें बोल कीं, तूं रात्रीं नृत्यागारांत ये, म्हणजे तुझी मनःकामना पूर्ण होईल. इकडे रात्र होऊन सर्वांची निजानीज होतांच मी नृत्यागारांत जाऊन बसतों, मग मी आहें व कीचक आहे, काय जें त्याचें माझें होईल, तें तुला आपोआपच कळेल. इतकें बोलून उजेडायास आलेंसें पाहून, बल्लवानें तिला अंतःपुराकडे मार्गस्थ केलें. (भार० विराट० अ० १७-२१).

वर सांगितलें आहे कीं, सूर्यदूताच्या प्रबल आघातानें, राजसभेंत कीचक निःसंज्ञ होऊन पडला होता, तो बऱ्याच वेळानें सावध होऊन तेथून उठून मुकाट्यानेंच घरीं गेला, व अस्तमानपर्यंत तो दिवस व रात्र त्यानें इकडून तिकडून कशींतरी काढून प्रातःकाल होतांच सैरंध्रीकडे गेला, तों ती त्यास, बल्लवानें दिलेल्या आश्वासनामुळें ऐतीच प्रफुल्लितमुख दिसली. त्यावरून तो लगबगीनें तीसमोर गेला, आणि म्हणाला, सैरंध्रि, मजकडून काल जो अन्याय झाला, तो तूं क्षमा करावायस म्हणून मी तुजकडे आलों आहें. तर कृपाकरून तो मत्कृत अपराध क्रोध मनांत न धरतां क्षमा कर. (मनांत कीं, ही ज्या अर्थीं आज प्रसन्नमुख आहे, त्या अर्थीं हिला रागच आला नसून मला वश होण्याचेंच हिचें चिन्ह दिसतें.) तें त्याचें भाषण ऐकून बल्लवाच्या संकेतानुरूप सैरंध्रि म्हणाली, मला तुझा राग मुळींच आला नाहीं, मी तर तुझ्या मनाप्रमाणें चालण्यास सिद्ध आहें; परंतु सांगत्यें असें मात्र कर, मी आज रात्रीं नृत्यागारांत तुझी वाट पाहात बसत्यें, तर तूं तेथें अंधारांतच यावेंस, व मी तरी अंधारांतच जाऊन बसेन. याचें कारण इतकेंच कीं, तुझा मनोदय जो पूर्ण व्हावयाचा, तो माझ्या गंधर्वास न कळावा. हे सैरंध्रीचे शब्द त्यास इतके अमृततुल्य वाटले कीं, हा आपणास कृतार्थ मानून आपल्या गृहास निघून गेला. (अ० २२).

नंतर कीचकास असें झालें कीं सूर्यास्त केव्हां होईल, फार तर काय, त्या दिवशीं त्यास इतकें वेड भरलें कीं, कांहीं कार्य करीत असतांही त्यानें बाहेर यावें, व वारंवार दिवसाकडे पाहावें. होतां होतां सूर्यास्त झाला, मग त्यानें उत्तम शृंगार केला, परंतु पुनः त्यास स्मरण झालें कीं, अंधःकारांत पुष्कळ शृंगार करून जाऊन काय उपयोग? असें होतां होतां बरीच रात्र झाली. तों इकडे बल्लव आपलें कार्य आटपून अंधारांतून निघून नृत्यागारांत जाऊन कीचकापूर्वीच बसला होता. इतक्यांत तेथें कीचकही प्राप्त झाला; परंतु अंधकारामुळें कांहींच दिसेना म्हणून चांचपीत चांचपीत, व मुखानें, सख्ये कोणीकडे येऊं? तूं कोठें बसली आहेस? असें म्हणत जाऊं लागला. तों बल्लवानें बारीक स्वरानें इकडेच ये असें म्हटल्यावरून तिकडे गेला, व ती सैरंध्रीच आहे असें समजून आलिंगन देऊं लागला, इतक्यांत त्यास, तो कोणी वीरपुरुष आहे असें समजलें. त्यावरून उभयतांचें तेथें भयंकर बाहुयुद्ध होऊन कीचक हा बल्लवाच्या हातून प्राणास मुकला, व दुसरे दिवशीं त्याचे सर्व बंधूही बल्लवानेंच मारिले. ( भार० विराट० अ० २३ ). यास, सूत असें संबोधन आढळतें.

**कीटक**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**कीरिटकायन**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**कीर्तिधर्मा**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा. (भार० द्रोण० अ० १५८ ).

**कीर्तिमती**–शुकाचार्याची कन्या कृत्वी तीच, ही नीप अ० अणुह राजाची स्त्री असून, हिला जो पुत्र होता त्याचें नांव ब्रह्मदत्त होतें.

**किर्तिमान्**–उत्तानपाद राजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. ध्रुवाचा भ्राता.

२–वसुदेवापासून देवकीस होऊन कंसानें मारलेल्या साहा पुत्रांतील ज्येष्ठ. कृष्णाचा ज्येष्ठ भ्राता.

**कीर्तिरथ**–( विदे० वं० ) कृतिरथ जनकास नामांतर.

**कीर्तिरात**–( विदे० वं० ) कृतिरात जनकास नामांतर.

**कीलायन**–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**कुकर**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कुकुर**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टून्वयांत जन्मलेल्या सात्वतपुत्र अंधकाच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ. यास पुत्र होता त्याचें नांव वन्हि.

**कुकुरांगार**–भारतवर्षीय देश. (भार० भीष्म० अ० ९).

**कुचैल**–कृष्ण आणि बलराम, हे उभयतां सांदीपनी नाम ऋषीजवळ विद्यासंपादनार्थ राहिले असतां, तेथें त्यांच्या पूर्वीच त्यासमीप अध्ययन करीत असलेला हा ब्राह्मण. हा वयानें व विद्येनें ज्येष्ठ होता, म्हणून रामकृष्ण यास ज्येष्ठ गुरुबंधु मानीत असत. हा उत्तम प्रकारचा ब्रह्मनिष्ठ असल्यामुळें अतिशय दरिद्री असतांही परमसमाधानी होता. ( यास सुदामा अ० श्रीदामा असें पुराणिक इ० म्हणतात, परंतु हें नांव भागवतांत नाहीं ). कुचैल हा गृहस्थाश्रमी व कुटुंबी असे. जरी हा पराकाष्ठेचा दरिद्री होता तरी स्वकर्मतत्पर व मोठा भगवद्भक्त अशी याची ख्याती होती. एकदां याची स्त्री यास म्हणाली कीं, आपला गुरुबंधु कृष्ण आहे असें ऐकतें, तर आपण एकवार द्वारकेस जाऊन त्यास कां भेटत नाहीं? आपण तेथें गेलां असतां आपला आदरसत्कार करून तो आपणास कांहीं धनही देईल; कारण तो मोठा ब्राह्मणभक्त असून संपत्तिमानही आहे. असें स्त्रीचें भाषण ऐकून याच्या मनांत द्वारकेस जावें असें आलें व त्यानें कांहीं कृष्णाकरितां उपायन सिद्ध करण्यास तिला सांगितलें.

तेव्हां कांहीं पोहे तिनें मिळवून, बांधायास वस्त्र जरी अगदीं जीर्ण होतें तरी तें त्यांत युक्तीनें बांधून दिले, व हा द्वारकेस गेला. तें वर्तमान रामकृष्णास कळतांच ते त्यास सामोरे आले, मोठ्या आदरानें आपल्या गृहीं घेऊन गेले. पुढें रामकृष्णांनीं रात्रंदिवस त्याजवळच असावें. गुरुगृहींच्या गोष्टी वारंवार काढून कालक्रमणा करीत असावी, व रात्रीं उभयतांनीं पादसंवाहन करावें. तात्पर्य, शयन, भोजन इ० व्यापारांत हा तेथें होता तेथपर्यंत यास, ते अगदीं विसंबले नाहींत. असे याचे तेथें बरेच दिवस आनंदांत गेल्यावर यानें स्वगृहीं जाण्याची उत्कंठा दाखविली. तीवरून रामकृष्णांनीं तथास्तु म्हणून याची जाण्याची सिद्धता केली, व यास दूरवर पोहोंचवीत जाऊन मार्गस्थ केल्यावर ते मागें परतले.

कुचैलास रामकृष्णांनीं जरी इकडे असें मार्गस्थ केलें, तरी याची योग्यता मोठी जाणून, आपल्या अलौकिक सामर्थ्यानें त्यांनीं, याचें केवळ घरच नव्हे, तर हा ज्या ग्रामांत राहात होता, तो संपूर्ण ग्राम विश्वकर्म्याकडून नगरतुल्य करवून संपूर्ण गृहें कांचनमय करविलीं. हें यास विदित नसून, जरी हा कृष्णापासून रिक्तच चालला होता, तरी यास त्याचा खेद झाला नाहीं; कारण तो मूळचाच समाधानी होता. तात्पर्य, गांवाकडे हा जात असतां, नगर पाहून त्यास आपण मार्ग चुकलों असें वाटलें, व पुढें कोणीकडे

जावें असा विचार करीत आहे तों, याच्या स्त्रीनें यास सामोरें येऊन मोठ्या हर्षानें मंदिरांत नेलें, व हा, त्या ऐश्वर्यानें चकित होऊन, कृष्णाचें सामर्थ्य वर्णन करीत सुखानें राहिला. ( भाग० १० स्कं० अ० ८०–८१).

**कुज**–भूमिपुत्र मंगळ नांवाचा ग्रह तो.

२–नरकासुरासही म्हटलेलें आहे. (भाग० २ स्कं० अ० ७ श्लो० ३४ ).

**कुजंभ**–एक दैत्य, यानें महिषासुरप्रभृति दानवांसहवर्तमान तारकासुरास राज्याभिषेक केला होता. (मत्स्य० अ० १४६ श्लो० २८ ).

**कुंजर**–दैत्यवि०. ( ३ तारक श० पहा ).

२–एक वानर, अंजनेचा पिता.

३–सौवीरदेशीय सामान्य राजपुत्र ( ३ जयद्रथ श० पहा ).

**कुटक**–भारतवर्षीय एक देश आणि पर्वत ( वा० रा० किष्किंधा० स० ६६ ).

२–एक सामान्य राजपुत्र ( ३ जयद्रथ श० पहा ).

**कुटिका**–भारतवर्षीय नदी ( भार० भीष्म० अ०९).

**कुटिकोष्ट्रिका**–प्राग्वटपुरासमीप असणारी भारतवर्षीय नदी ( प्राग्वटपुर श० पहा ).

**कुटीचर**–रुद्रगणवि०.

**कुंडज**–धृतराराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**कुंडजठर**—जनमेजय—सर्पसत्रांतील एक सदस्य ऋषि.

**कुंडधार**–कद्रूपुत्र एक नाग.

२–या नांवाचा एक मेघ. यास एकदां एका ब्राह्मणानें मूर्तिमान् पाहिलें, त्यावरून द्रव्यप्राप्तीसाठीं त्यानें याची फारच सेवा केली. तेव्हां द्रव्यापासून किती अनर्थ आहेत, ते यानें त्यास स्वप्नद्वारा विवेचन करून सांगितलें असतां, ब्राह्मण द्रव्यापासून उपरम पावला. ( भार० शांति० अ० ३४८ ).

**कुंडभेदी**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**कुंडल**–भारतवर्षीय महादेश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कुंडली**–भारतवर्षीय महानदी ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कुंडिका**–सामवेदोपनिषत्.

**कुंडिकेर**–हैहयाच्या पांचकुलांतील एक कुल.

**कुंडिन**–एक ब्रह्मर्षि व कुल ( ३ वसिष्ठ श० पहा ). याचा पुत्र कौंडिन्य.

२–विदर्भराजा भीष्मकाचें नगर ( भाग० १० स्कं० अ० ५३ ).

**कुंडिनपुर**–कुंडिनद्वितीयार्थ पहा.

**कुंडोद**–भारतवर्षीय सामान्यपर्वत.

**कुंडोदर**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**कुड्मला**–भारतवर्षीय नदी ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कुणि**–सोमवंशीय सात्यकीच्या दाहा पुत्रांतील भारतीयुद्धांत मेलेला एक.

**कुणिगर्ग**–एक ब्रह्मर्षि. यास एक मानस कन्या होती. ती यौवनावस्थेंत आल्यावर तिचा विवाह करावा असें यानें मनांत आणिलें, परंतु तिच्या योग्य पति मिळेना, त्यामुळें ती तशीच राहिली, व तप करूं लागली. कालांतरानें हा ऋषि देहत्याग करून स्वर्गास गेला, तेव्हां ती कन्या याच आश्रमांत देव आणि ऋषि यांच्या तृप्तिपूर्वक तप करीत असतां बरीच वृद्ध झाली. एकदां तिनें मनांत आणिलें कीं, आतां देहत्याग करून उत्तम लोकांस जावें, तों तेथें अकस्मात् नारदऋषि प्राप्त झाले. त्यांस तिनें आपला हेतु कळवितांच त्यांनीं सांगितलें कीं, तूं तपस्विनी आहेस त्यामुळें उत्तम लोक तुला जरी सुलभ आहे, तरी तूं संस्कारहीन असल्यामुळें तुला अक्षय गति होणार नाहीं. यास्तव संस्कारयुक्त होऊन तूं उत्तम लोक जिंकावास हें चांगलें. असें सांगून नारद गेल्यावर, तिनें विवाह करावा असें मनांत आणून एके स्थळीं कांहीं ऋषिपुत्रांचा समुदाय वेदाध्ययन करीत होता, तेथें ती गेली, आणि म्हणूं लागली, अहो ऐकतां, जो कोणी या समाजांतून माझा पति होईल, त्यास मी बहुत द्रव्य व अर्ध भाग माझें तप देईन. हें तिचें भाषण कोणी मान्य करीनात; कारण ती वृद्ध होती. तथापि त्यांत गालववंशोत्पन्न प्राक्शृंगवान् ना० एका ऋषिपुत्रानें तिचा पति होण्याचें स्वीकारलें. त्यावरून त्या वृद्ध कन्येनें त्याशीं यथाशास्त्र विवाह केला, व रात्रीं तरुण होऊन त्याच्या सेवेस ती सादर झाली. नंतर प्रातःकाल होतांच तिनें, आपल्या वचनाप्रमाणें प्राक्शृंगवानास यथेच्छ द्रव्य व अर्ध भाग तप दिलें, आणि देह त्यागून उत्तम लोकांस गमन केलें. हीच सुलभा मैत्रेयी असावी असें वाटतें. ( भार० शल्य० अ० ५२ ).

**कुंतल**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

२–कौतलपुराधिपति एक राजा. ( १ चंद्रहास श० पहा ).

**कुंति**–( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजिताच्या वंशांतील हैहयकुलांत जन्मलेल्या नेत्र ना० राजाचा पुत्र, याचा पुत्र सोहंजि.

२–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्यामघकुलोत्पन्न क्रथ राजाचा पुत्र, याचा पुत्र धृष्टि.

३–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न कृष्णास सत्येपासून झालेला पुत्र. हा महारथी होता.

**कुंतिभोज**–एक राजा. हा यदुकुलोत्पन्न शूर राजाचा अत्यंत मित्र असून अनपत्य असल्यामुळें, शूराचें प्रथम अपत्य दत्त घ्यावें असा यानें निश्चय केला होता. त्याप्रमाणें शूरास प्रथम झालेली पृथा ना० कन्या, ती यानें दत्त घेतली, व तिचें नांव कुंती असें ठेविलें. पुढें यास पुरुजित् नांवाचा औरसपुत्र झाला. हा भारती युद्धांत पुत्रासहवर्तमान पांडवांकडे होता. ( भार० उद्यो० अ० १७२ ). पुढें त्याच युद्धांत हा मरण पावला. त्यास भोज असेंही म्हटलें आहे. मात्र याचें कुल आढळत नाहीं. तथापि देश, कुंतिराष्ट्रच निश्चयात्मक आहे. ( भार० सभा० अ० ३१).

**कुंतिराष्ट्र**–भारतवर्षीय महादेश. हा नरराष्ट्राच्या दक्षिणेस असणारा होय. याचा अपर दक्षिणकुंतिराष्ट्र असाही एक भेद आढळतो. तो अक्षरक्रमांत पहा.

**कुंती**–यदुकुलोत्पन्न शूर राजाची कन्या पृथा, तिलाच कुंतिभोजानें दत्त घेतल्यावरुन हें नांव पडलें होतें. ही कुमारी असतां, कोणी ऋषि ( दुर्वास असावा ) कुंतिभोज राजाच्या घरीं आला होता, व त्यास त्यानें राहून घेऊन हिला त्याच्या सेवेकडे दिलें होतें. कुंतीनें त्याची उत्तम प्रकारेंकरून सेवा केली. त्यावरून त्यानें जातांना प्रसन्नांतःकरणानें सूर्य, यमधर्म, वायु, इंद्र आणि अश्विनीकुमार, या देवतांचे हिला मंत्र देऊन सांगितलें होतें कीं, कारणपरत्वेंकरून तुला जेव्हां पुत्र असावेत असा प्रसंग येईल, तेव्हां तूं यांतून ज्याचा जप करशील, तो देव प्रकट होऊन तुला पुत्र देईल कारण न पडल्यास याचा जप करण्याचें कारण नाहीं. याप्रमाणें सांगून तो ऋषि गेल्यावर, एकदां हिच्या मनांत मंत्राचा प्रत्यय पाहवा, असें बालभावानें येऊन हिनें पहिला सूर्याचा मंत्र जपून त्याचें आवाहन केलें, तों सूर्य लागलाच हिच्यापुढें मूर्तिमान् होऊन प्रत्यक्ष झाला, आणि पुसूं लागला कीं, माझें आवाहन किंनिमित्त केलेंस ? त्यावरून ही भय पावली, आणि सूर्यास म्हणाली कीं, मी मंत्राचा प्रत्यय पाहावा म्हणून आपलें आवाहन केलें होतें; तर आतां कृपाकरून आपण परत जावें. सूर्य म्हणाला, माझें आगमन व्यर्थ होणार नाहीं, यास्तव तुला आतां मशीं रत झालेंच पाहिजे. असें म्हणून त्यानें तत्काळ हिशीं रत होऊन स्वलोकीं गमन केलें. ( भार० वन० अ० ३०३–३०७ ). पुढें हिला गर्भ राहिला त्यामुळें ही लज्जित होऊन कोणाच्याच दृष्टीस पडेनाशी झाली. नऊ मास पूर्ण होतांच, ही कवचकुंडलयुक्त अशा दैदीप्यमान पुत्रास प्रसवून, तो पुत्र हिनें आपल्या विश्वासू दासीकडून अश्वनदीमध्यें पेटींत घालून सोडून देवविला. तोच पुढें कर्ण अशा नांवानें प्रख्यात झाला. ( भार० वन० अ० ३०८ ).

कांहीं कालानें हिचा विवाह पंडुराजाशीं झाला. ( भार० आदि० अ० ११२ ). परंतु तो शापदग्ध झाला होता म्हणून, हिनें त्यास पुत्रप्राप्तीच्या मंत्राचें वृत्त सांगून त्याची आज्ञा झाल्यावर, क्रमानेंच त्या त्या देवांचें आवाहन करुन युधिष्ठिरादिक पुत्र निर्माण केले. ( पंडु श० पहा ). पांडवांचा द्वेष दुर्योधन करूं लागला, त्यामुळें हिला बरेच कष्ट सोसावे लागले; तथापि ही पांडवांसमागमें वनवासांत नव्हती. पुढें युद्धप्रसंग होऊन संपूर्ण धार्तराष्ट्र मरण पावले, व युधिष्ठिरास राज्य प्राप्त झालें. तेवढ्या काळांत हिला कांहीं सुख मिळालें. कांहीं काळानें विदुर, धृतराष्ट्र आणि गांधारी, महाप्रस्थानास निघालीं, त्यासमागमें हीहि गेली, व तेथेंच हिचा देहपात झाला.

२–भारतवर्षीय देश. हा प्रायः कुंतिराष्ट्र असेल.

३–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( ३ पारियात्र श० पहा ).

**कुत्स**–उत्तानपादवंशीय चक्षुर्मनु, त्याच्या अक्रा पुत्रांतील दुसरा.

२–एक ब्रह्मर्षि. ( अंगिरा श० पहा ). याचे जे वंशज ते कौत्स होत.

३–दाशरथि रामाच्या सभेंतील एक ऋषि. ( वा० रा० उत्तर० क्षेपक सर्ग २ ).

**कुत्सन्य**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**कुंद**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ )

२–शाल्मलीद्वीपांतील एक पर्वत.

३–कुबेराच्या नऊ निधींतील सातवा.

**कुपट**–दनुपुत्र दानवांतील एक.

**कुपति**–कपाली म्हणून जो अष्टभैरवांतील एक तो.

**कुबेर**–प्रथमाद्वितीयार्थक वैश्रवण शब्द पहा.

**कुब्जा**–कंसाची दासी. ही तीन ठिकाणीं शरीरानें वक्र असे. कृष्ण आणि बलराम या दोघांस ज्या वेळेस मथुरेस धनुर्यागार्थ कंसानें आणविलें, त्या वेळेस कृष्णप्रसादानें ही सरळ झाली. ( भाग० १० स्कं०

अ० ४२ ). कैकेयीची दासी मंथरा, तिलाहि म्हणत असत. ( २ मंथरा श० पहा. ).

**कुब्जाम्रक**–भारतवर्षीय क्षेत्र व तीर्थ.

**कुंभ**–प्रल्हाददैत्याच्या पुत्रांतील एक.

२–कुंभकर्णाचा ज्येष्ठ पुत्र. ( कुंभानिकुंभ श० पहा ).

३–लंकेंतील एक सामान्य राक्षस.

**कुंभकर्ण**–वैवस्वतमन्वंतर जें प्रस्तुत चालू आहे, यांतील पुलस्त्यपुत्र जो विश्रवा ऋषि त्यास,कैकसी ना० भार्येपासून झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा रावणाचा कनिष्ठ भ्राता. हा उत्पन्न झाला त्याच वेळीं आकृतीनें पर्वतप्राय मोठा, व भयंकर असा होता. म्हणून उपजतांच एक सहस्र प्रजा यानें भक्षिल्या. त्यावरून इंद्र ऐरावतारूढ होऊन यावर धांवला,व यास आपल्या वज्रानें ताडन केलें. यानें तो प्रहार सहन करून, ऐरावताचा एक दांत उपटला,व त्यानेंच त्यास इतका प्रबळ आघात केला कीं, इंद्रानें तेथून पलायन केलें. नंतर इंद्र ब्रह्मदेवाकडे गेला, व त्यानें त्यास याचें अद्भुत कर्म निवेदन केलें. त्यावरून ब्रह्मदेवांनीं, यानें सर्वकाल निद्रित राहावें असा यास शाप दिला. हें वृत्त रावणास कळल्यावर, त्यानें ब्रह्मदेवाची बहुताप्रकारें प्रार्थना करून स्तुति केली, तिवरून त्यांनीं हा, सहा महिन्यांनीं एक दिवस जागृत राहील असा वर दिला. ( वा० रा० युद्ध० स० ६१ ).

आपणावर ब्रह्मदेवाचा झालेला कोप शांत होऊन, आपणास अपार ऐश्वर्य व बल प्राप्त व्हावें, या उद्देशानें यानें गोकर्णक्षेत्रीं उग्र तप आरंभिलें. त्यास दाहा सहस्र वर्षें झालीं असतां, ब्रह्मदेव यास प्रत्यक्ष होऊन वर देण्यास सिद्ध झाले आहेत तों, देवांनीं प्रार्थना केली कीं, यानें आजपर्यंत इंद्राच्या अप्सरा सात, देवदूत दाहा व असंख्य ऋषि भक्षिले असल्यामुळें, यास वर देणें तो मोह पाडून द्यावा. त्यावरून ब्रह्मदेवानीं याच्या जिव्हाग्रीं सरस्वतीस अधिष्ठित करून यास वर मागण्याची आज्ञा केली; परंतु, याची बुद्धि भ्रंश पावल्यामुळें यानें, मी बहुत कालपर्यंत निद्रा करण्यास इच्छितों असेंच पूर्वशापानुरूप मागितलें. त्यास ब्रह्मदेवांनीं तथास्तु म्हणून गमन केल्यावर, हा प्रकृतीवर आला, आणि हें मी काय मागून माझें तप व्यर्थ घालविलें म्हणून खेद करूं लागला. ( वा० रा० उत्तर० स० १० ).

हा, रावणासमागमें कांहीं काल श्लेष्मातकवनांत राहून पुढें त्यास लंकानगरी मिळाली असतां तींत जाऊन राहिला. नंतर विरोचनपुत्र बलीनें, आपली दौहित्री ( कन्येची कन्या ) वज्रज्वाला यास भार्यार्थ देवविली असतां याचा तिशीं विवाह झाला. वज्रज्वालेस वृत्रज्वाला असेंहि नामांतर आहे. पुढें यास निद्रेची फारच बाधा होऊं लागली असें पाहून, रावणानें एक योजना रुंद व दोन योजनें लांब असें एक मंदिर निर्माण करवून, त्यांत यास निद्रा करण्याची आज्ञा दिली. तींत हा साहा महिनेपर्यंत निद्रा करी, व जागा होई त्या दिवशीं अपरिमित अन्नाचें भोजन, मांसभक्षण, व मद्यपान करून विषयाचा उपभोग घेई, व कधीं सभेसहि येई. लंकादहन करून मारुति किष्किंधेस गेल्यावर, एके दिवशीं रावणसभेंत विचार चालला होता कीं, रामलक्ष्मण वानरांसहित आपणांवर चालून आले असतां, काय उपाय योजावा? त्या दिवशीं हा जागा असून सभेंतहि होता म्हणून, यानें, सीता रामचंद्रास परत देऊन सुखानें राहावें असें रावणास सांगितलें. परंतु त्या भाषणाचा रावणास कोप आला असें जाणून यानें, मी युद्धास जाऊन सर्वांस भक्षीन,नंतर तूं सीतेसहित सुखानें राहा, असें भाषण करून त्याचा कोप शांत केला. ( वा० रा० युद्ध० स० १२ ).

अल्पच काळांत रामलक्ष्मण, समुद्रावर सेतुबंधन करून वानरांसहित लंकेस आले, व सुवेलाचलावर सेनेचा निवेश करून लंकेस वानर पाठवून अनेक राक्षसांचा त्यांनीं नाश आरंभिला. धूम्राक्ष, वज्रदंष्ट्र, अकंपन, तसाच रावणाचा मुख्य प्रधान प्रहस्त, इ० मरण पावले असतां, रावण स्वतः रामाशीं युद्धास आला; परंतु पराभव पावून लकेंत गेला असतां त्यास कुंभकर्णाचें स्मरण झालें. नंतर त्यास जागृत करावें म्हणून, त्यानें यूपाक्ष ना० सचिवासमागमें राक्षस देऊन त्यास तिकडे पाठविलें. तेथें जातांच यूपाक्षानें प्रथम असें केलें कीं, कुंभकर्णाच्या मंदिरद्वाराशीं मृग, महिष, वराह इत्यादि पशूंचे समुदाय उभे केले, अन्नाचे राशी सिद्ध करून रुधिराचे कुंभ भरून ठेविले, अनेक प्रकारचीं पुष्पें, चंदन, तशींच सुवासिक तैलें यांची व्यवस्था ठेवून, नंतर आंत राक्षसांस पाठविलें. परंतु तेथें असें होऊं लागलें कीं,याच्या श्वासवायूनें राक्षस उडून मागें पडत, तेणेंकरून आंत प्रवेशच होईना. शेवटीं मोठ्या संकटानें एकदां राक्षस यापर्यंत जाऊन पोहोंचले, व त्यांनीं त्यास हालविणें, शंख भेरी इ० कांचे शब्द करणें, अशा नानाप्रकारांनीं जागृत करण्याचा प्रयत्न

चालविला, परंतु हा अशा सामान्य उपायांनीं जागा होत नाहीं असें पाहून, याच्या शरीरावर गजादि-पशूंचा समुदाय चालविणें,शतावधि भेरींचें नाद करणें, कर्णछिद्रांत जलकुंभ ओतणें, इ० उपाय आरंभिले. तेव्हां हा एकाएकीं जागा झाला, आणि मोठ्या गुहे-प्रमाणें मुख पसरून जांभया देत बसला; परंतु मध्यं-तरीच निद्रेचा भंग झाल्यामुळें, याची मुखचर्या अत्यंत भयंकर दिसूं लागली. इतक्यांत प्रमुख प्रमुख राक्ष-सांनीं यापुढें होऊन वंदनें केलीं, त्यावरून त्यांस यानें जागें करण्याचें कारण विचारिलें. तेव्हां यूपाक्ष पुढें होऊन, त्यानें लंकेंतील सर्व वृत्त निवेदन केलें. व तें ऐकून हा म्हणाला, बरें तर, मी युद्धास जाऊन राम-लक्ष्मणांचा पराभव करितों, नंतर येऊन रावणास भेटेन. यूपाक्ष म्हणाला, असें करूं नये. आधीं राव-णास भेटून नंतर युद्धास जावें हें मला बरें दिसतें.त्या-वरून कुंभकर्ण बरें आहे असें म्हणून उठला, व त्यानें मुख प्रक्षालन करून स्नान व भोजन केलें.त्यापुढें दोन सहस्र मद्याचे घट प्राशन करून, अंगांत थोडासा उन्माद येतांच, रावणसभेकडे तो जाण्यास निघाला.

नंतर हा सत्वरच सभेंत जाऊन, यानें रावणास वंदन केलें, आणि विचारिलें, काय आज्ञा आहे? रावणानें यांस पाहून उठून आलिंगन दिलें, व मोठ्या मानानें यास समीप बसवून प्राप्तसंकट त्यास निवेदन केलें. पुढें कुंभकर्णानें कांहीं नीतींचा उपदेश केला, तो रावणास रुचला नाहीं असें पाहून, आपल्या साम-र्थ्याचें वर्णन करीत रावणास यानें मी शत्रूचा परा-भव करितों, तूं स्वस्थ ऐस, असें वचन दिलें. तें ऐकून महोदरानें, मनांत याची निंदा करीत रावणास सीतेस वश करण्याची अशी युक्ति सांगितली कीं,राम-लक्ष्मणांस आपण मारिलें असा मोठा शब्द करून, लंकेंत उत्साहचिन्ह दाखवावें, म्हणजे सीता आपो-आप दीन होऊन तुम्हास वश होईल. त्या युक्तीचा कुंभकर्णानें निषेध करून, युद्ध करणें हेंच चांगलें असें रावणास सांगितलें. त्यावरून रावणानें याची स्तुति केली, आणि वस्त्रालंकारांनीं गौरवून युद्धास जाण्याची आज्ञा दिली. तेव्हां कुंभकर्ण रावणास वंदन करून उठला, आणि राजमार्गांतून रामसेनेकडे यावयास निघाला. कुंभकर्ण येत असतां, जेव्हां त्यास वानरांनीं पाहिलें, तेव्हां कित्येक वानर भयभीत होऊन पळूं लागले. त्याचें कारण असें होतें कीं, कुंभकर्णाची स्वाभाविक आकृति साह्यशें धनुष्यें उच्च व शत धनुष्यें विस्तीर्ण होती. (चार हात लांबीचें एक धनुष्य). या शिवाय राक्षसीमायेनें तो मोठा देह धरीत असे तें निराळेंच. सारांश, वानर पळतात असें पाहून, अंगदानें सर्वांस प्रोत्साहनपूर्वक परत आणिलें. पुढें वानर याशीं युद्ध करूं लागले. मारुतीनें याच्या मस्त-कावर पर्वतशृंगें टाकावीं, तीं यानें आपल्या हातांतील गदेनें सहज उडवून एकीकडे पाडावीं. ऋषभ, शरभ, नील, गवाक्ष आणि गंधमादन, हे पांच यावर धांवून गेले असतां, यानें त्यांस तत्काळ मूर्च्छित केलें. तें पाहून सहस्रावधि वानर याच्या शरीरावर चढून यास मुष्टिप्रहारांनीं जेव्हां ताडन करूं लागले, तेव्हां यानें सात आठशें वानर एकदांच धरून भूमीवर आपटून मारावे. दाहा वीस धरून तोंडांत घालून भक्षण करावें. कित्येक वानर, यास मात्र मी भक्षिलें असें वाटे, परंतु ते जिवंत राहिल्यामुळें नाकांतून व कानांतून निघून यास पुनः मारीत व चावत, अथवा कित्येक पळून जात. याप्रमाणें चाललें असतां, अंगदानें एक पर्वत याच्या मस्तकावर टाकिला. त्याचें निवारण करून यानें अंगदास मूर्च्छित पाडिलें, व सुग्रीवावर धांवला, आणि त्यावर टाकलेला सहस्रभार शूल मारु-तीनें मध्येंच भग्न करून टाकितांच यानें एकाएकीं सुग्रीवास धरिलें व लंकेकडे जाण्यास निघाला. इत-क्यांत त्यानें याच्या नासिकेचा छेद केला असतां, यानें त्यास भूमीवर आपटून तुडविलें, तथापि तो तेथून उडाला व रामसैन्यांत सुखरूप आला.

घ्राणेंद्रिय नष्ट झालें त्यावरून कुंभकर्ण मा-घारा परतला, व हातांत मुद्गर घेऊन राम-सेनेवर धांवला, इतक्यांत यासमोर लक्ष्मण झाला असतां, त्याचा यानें अनादर करून रामावरच चाल केली. तेव्हां रामानें रौद्रास्त्र टाकून याचा मुद्गर नष्ट केला. तेणेंकरून हा अतिक्रुद्ध होऊन, यास स्वकीय, परकीय भान न राहतां,राक्षस व वानर कोणी सांपडो, त्यांस भक्षीत चालिला. रामानें याशीं घोर युद्ध केलें, व याचे भुज छेदून भूमीवर पाडिले. त्या योगानें त्या-खालीं अनेक राक्षस व कित्येक वानर सांपडून प्राणास मुकले. इतक्यांत रामानें याचे पाय तोडले, तथापि हा केवळ मुखच पसरून रामाकडे येऊं लागला, असें रामानें पाहून याचे मस्तक तोडून लंकेवर पाडिला. तेणेंकरून लंकेंतील अनेक गोपुरें भग्न झालीं. (भार० वन० अ० २८६-२८७). याप्रमाणें कुंभकर्ण मरतांच सर्व वानर, देवर्षि, व महर्षि हर्षित होऊन त्यांनीं रामाची स्तुति केली. (वा० रा० युद्ध०स० ६०-

६७ ). कुंभकर्णास कुंभ आणि निकुंभ असे दोन महाबलाढ्य पुत्र होते.

**कुंभनिकुंभ**–कुंभकर्णास वृत्रज्वालेपासून झालेले दोन पुत्र. हे अति पराक्रमी, व बलवान् असत. रावणानें यांस रामसैन्यावर एकदां युद्धास पाठविलें असतां, यांनीं भयंकर युद्ध केलें. शेवटीं त्यांत सुग्रीवानें कुंभास व मारुतीनें निकुंभास ठार मारून टाकिलें. ( वा० रा० युद्ध० स० ७५-७७ ).

**कुंभयोनि**–अगस्त्य ऋषीस प्राधान्येंकरून नामांतर.

२–द्रोणाचार्यासही हें नांव आढळतें. ( भार० द्रोण० अ० १८४ ).

**कुंभरेता**–द्वितीयार्थक वीर शब्द पहा.

**कुंभहनु**–प्रहस्ताचा सचिव एक राक्षस. यास तार वानरानें मारिलें. ( वा० रा० युद्ध० स० ५८ ).

**कुंभांड**–बाणासुराचा मंत्री, व चित्ररेखेचा पिता. (भाग० १० स्कं० अ० ६२ ).

**कुंभीनसी**–बली दैत्याची कन्या, बाणासुराची भगिनी. ( मत्स्य० अ० १८६ श्लो० ४० ).

२–सुमाली राक्षसास केतुमतीपासून झालेल्या चार कन्यांतील कनिष्ठ. रावणमाताकैकसी तिची भगिनी.

३–माल्यवान् राक्षसाची कन्या अनला, तिला विश्वावसु राक्षसापासून झालेली कन्या. हिला मधु राक्षसानें चोरून नेऊन, हिशीं विवाह केला होता, व त्यापासून ईस जो पुत्र झाला होता, तो लवणासुर प्रख्यात असे.

४–पुष्पोत्कटेस विश्रवा ऋषीपासून झालेली कन्या. ( लिंगपु० अ० ६३ ).

५–अंगारपर्ण गंधर्वाची स्त्री.

**कुंभीपाक**–एक नरक आहे. जे कोणी सजीव प्राण्यांचें पचन करितात, ते येथें यातना भोगितात.

**कुमार**–सनकादिक ब्रह्ममानसपुत्र ते. यांचीं वयें अजून पांचच वर्षांचीं आहेत म्हणून त्यांस असें नांव आहे.

२–स्कंदानें लग्न केलें नाहीं म्हणून त्यास नांव.

३–अनल ना० वसूचा पुत्र तो.

४–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा चेदी देशाच्या पूर्वेस असून, पांडवांच्या वेळेस येथें श्रेणिमान् ना० राजा होता. ( भार० सभा० अ० ३० ).

५–मंगल ना० ग्रहास असें नांव आढळतें.

**कुमारकोटि**–भारतवर्षीय तीर्थ.

**कुमारधारा**– ” ”

**कुमारवन**–भारतवर्षीय वन. ऊर्वशीच्या विरहानें पुरूरवा राजा, येथें बहुत कालपर्यंत भ्रमिष्ट होऊन फिरत होता.

**कुमारी**–धनंजय ऋषीची स्त्री.

२–भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ).

३–भरतखंडाचें दक्षिण टोंक.

**श्लोक.**

योजनानां सहस्रं तु खंडोयं दक्षिणोत्तरः ॥ आयतस्तु कुमारीतो गंगायाः प्रवहावधिः ॥ ९ ॥ (मत्स्य० अ० ११३ ).

**कुमुद**–विष्णूच्या पार्षदगणांतील एक.

२–नैर्ऋत्य दिशेकडील दिग्गज.

३–गोमती नदीतीरीं रम्यक पर्वतावर राहणारा रामसेनेंतील वानर. ( वा० रा० युद्ध० स० २६ ).

४–मेरूस असणारा आश्रय पर्वत. ( भाग० ५ स्कं० अ० १६ ).

**कुमुदेक्षण**–विष्णूचा पार्षद.

**कुमुद्वती**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( विंध्य श० पहा ).

२–दाशरथि रामाची स्नुषा. कुशाची दुसरी स्त्री. हिचाच पुत्र अतिथि राजा.

३–मयूरध्वज राजाची स्त्री, ताम्रध्वजाची माता.

**कुरंग**–मेरूच्या कर्णिका पर्वतांतील एक.

**कुरज**–दाहा विश्वेदेवांतील एक.

**कुरर**–मेरुकर्णिका पर्वतांतील एक.

**कुरु**–प्रियव्रतपुत्र आग्नीध्रास पूर्वचित्ति अप्सरेपासून झालेल्या नऊ पुत्रांतील सातवा. यास स्त्री, मेरुकन्या नारीनामक होती, व याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे. ( भाग० ५ स्कं० अ० २ ).

२– कुरु राजाचा वर्ष तो. ( कुरुवर्ष श० पहा ).

३–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, त्याच्या संवरण ना० पौत्रास तपती भार्येपासून झालेला पुत्र. यानें दीर्घकालपर्यंत तपाचरण करून जें स्थल वसविलें, तें इंद्राच्या आशीर्वादानें कुरुक्षेत्र या नांवानें प्रख्यात व पवित्र झालें. यास परीक्षित, सुधनु अ० सुधन्वा, जन्हु, निषधाश्व, आणि प्रजन, असे पांच पुत्र होते. याचे जेवढे वंशज तेवढे सर्व कौरव असें जरी होतें, तरी दुर्योधनादि शत बंधूंस म्हणण्याची विशेष रूढी आहे ( मत्स्य० अ० ५० ). ( भा० ९ स्कं० अ० २२ ).

४–एक ऋषि ( भार० शांति० अ० ४८ ).

५–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. याची राजधानी हस्तिनापूर. इंद्रप्रस्थ, वारणावत हींही याचींच नगरें होतीं.

**कुरुजांगल**–कुरुदेशास, पश्चिमदिशेकडून लागून अस-

लेला प्रथम देश जो जांगल त्यास म्हणण्याची अशी रुढी. याचें कारण खालच्या शब्दांत पहा.

**कुरुपांचाल**–कुरु देशास पूर्वदिशेकडून लागून असलेला प्रथम देश जो पांचाल, त्यासच असें म्हणण्याची रुढी. याचें कारण, आणखी दुसरा एक पांचाल आहे, त्याशीं याचा संकर होऊं नये.

**कुरुवर्णक**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९).

**कुरुवश**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्यामघकुलांतील क्रथवंशांत जन्मलेल्या मधुराजाचा पुत्र. यास अनु ना० पुत्र होता.

**कुरुवर्ष**–आग्नीध्रानें आपल्या जंबुद्वीपाचे नऊ भाग करुन नऊ पुत्रांस दिले. त्यांत कुरुना० पुत्रास दिलेला वर्ष. हा शृंगवान् पर्वत आणि क्षार समुद्र यांच्यामध्यें आपल्या भारतवर्षाप्रमाणेंच धनुष्याकार आहे. ( धनुर्वत्संस्थिते ज्ञेये द्वे वर्षे दाक्षिणोत्तरे ). ( भार० भीष्म० अ० ६ श्लो० ३८ ). ( मत्स्य० अ० ११२ श्लो० ३२ ). ( भाग० ५ स्कं० अ० २ ). यास उत्तरकुरु, व ऐरावतवर्ष, अशीं नामांतरें आहेत.

**कुरुक्षेत्र**–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा ब्रह्मावर्त देशाच्या पश्चिमेस असल्याचें म्हटलें आहे. तें असें–कृष्ण आनर्त देशास जात असतां, कुरुदेशांतून निघून मार्गांत कोणकोणते देश उल्लंघून तेथें गेला, त्याविषयीं ( भाग० १ स्कं० अ० १० ) यामध्यें असें लिहिलें आहे.—

**श्लोक.**

कुरुजांगलपांचालान् शूरसेनान्सयामु-
नान् ॥ ब्रह्मावर्तं कुरुक्षेत्रं मत्स्यान्
सारस्वतानथ ॥ ३४ ॥ मरुधन्वम-
तिक्रम्य सौवीराभीरयोः परान् ॥ आन-
र्तान् भार्गवोपागाच्छ्रांतवाहो मना-
ग्विभुः ॥ ३५ ॥

म्हणून हा एक स्वतंत्र देशच असून कौरवपांडवांचें युद्ध झालें, तें हें कुरुक्षेत्र नव्हे.

२–कुरुराजानें ज्या स्थळीं तप केलें, व तें इंद्राच्या आशीर्वादानें पवित्र झालें त्याचें नांव. हें स्थळ कुरुदेशांतच असून, याच्या चतुःसीमा ( भार० शल्य० अ० ५३ यांत ) अशा लिहिल्या आहेत कीं, तरंतुक आणि अरंतुक या दोहोंचें अंतर, तसेंच रामन्हद आणि मचक्रुक यांचें अंतर, त्यांतील जो प्रदेश, त्याचें नांव स्यमंतपंचकरूप कुरुक्षेत्र.

**श्लोक.**

तरंतुकारंतुकयोर्यदंतरं रामन्हदानां
च मचक्रुकस्य च ॥ एतत्कुरुक्षेत्र-
स्यमंतपंचकं प्रजापतेरुत्तरवेदिरुच्यते ॥२४॥

यांत, तरंतुकादिक स्थानें यांस दिशा जरी दर्शविल्या नाहींत, तरी येणेंकरुन कुरुक्षेत्राची मर्यादा स्पष्ट होते. या स्थळीं कौरव आणि पांडव यांचें युद्ध झालें होतें असें समजावें. यास उत्तरवेदि, अंतर्वेदि असेंहि स्यमंतपंचकाप्रमाणेंच नामांतर असून, विनशनक्षेत्र असेंहि म्हटलेलें आहे.

**कुल**–दाशरथि रामाच्या सभेंतील एक हास्यकार.

**कुलक**–इक्ष्वाकुकुलोत्पन्न सूर्यवंशीय रणक राजास नामांतर.

**कुलत्थ**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कुलंपुन**–भारतवर्षीय तीर्थ.

**कुलह**–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**कुलिक**–कद्रुपुत्र एक नाग.

**कुलिंगा**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( वा० रा० ).

**कुलिंद**–कुरुदेशाच्या उत्तरेस अतिनिकट पहिला देश. याचा अपर उत्तर कुलिंद असा एक भेद आहे. याची राजधानी चंदनावती. ( चंदनावती श० पहा ).

**कुवल**–वीरवर्मा राजाच्या पुत्रांतील एक. ( वीरवर्मा श० पहा ).

**कुवलयापीड**–कंसाचा गजवि०. हा सहस्र गजांइतका वलवान् असे. धनुर्यागनिमित्तानें कृष्ण मथुरेस आला असतां, कंसानें अंबष्ठाकडून यास त्याच्या अंगावर घालविलें, तेव्हां हा कृष्णाच्या हातून मेला. ( भाग० १० स्कं० अ० ४३ ).

**कुवलयाश्व**–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न काश्यवंशीय दिवोदास राजा त्याचा पुत्र जो प्रतर्दन त्यास नामांतर.

२–कुवलाश्व शब्द पहा

**कुवला**–हंसध्वज राजाची कन्या, सुधन्व्याची भगिनी.

**कुवलाश्व**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न बृहदश्वराजाचा पुत्र. बृहदश्वानें यास राज्यावर स्थापून अरण्यांत गमन केल्यावर, यानें पित्याच्या आज्ञेप्रमाणें उत्तंक ऋषीस समागमें घेऊन आपल्या एकवीस सहस्र पुत्रांसहवर्तमान धुंधुदैत्यांशीं युद्धास गमन केलें. हा तेथें गेला त्या काळीं दैत्यानें उज्जालक ना० समुद्रभागांत निद्रा केली होती. म्हणून याच्या पुत्रांनीं तो समुद्र उपसून त्यास जागें केलें. त्याबरोबर त्याच्या मुखांतून भयंकर अग्नि निघाला, व दृढाश्व,

कापिलाश्व, आणि चंद्राश्व, तिघे शिवाय करून, इतर याचे सर्व पुत्र मरण पावले. त्यावरून स्वतः याचें व धुंधूचें मोठें युद्ध झालें. त्यांत तो याच्या हातून मरण पावला. व तेव्हांपासून यास धुंधुमार असें नांव पडलें. यास कुवलयाश्व व अप्रतिरथ अशींहि नामांतरें आहेत. ( भार० वन० अ० २०१-२०४ ).

**कुवीरा**-भारतवर्षीय नदी.

**कुश**-( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न सुहोत्र राजाच्या तीन पुत्रांतील दुसरा. याचा पुत्र प्रति ना० राजा.

२-( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न अजक राजाचा पुत्र, यास कुशिक असेंहि म्हणत. याला कुशांबु, मूर्तय, वसु, आणि कुशनाभ, असे चार पुत्र असून, त्यांस कौशिक अशी संज्ञा होती.

३-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा त्याच्या वंशांतील ज्यामघ राजाचा पौत्र, विदर्भ राजाच्या तीन पुत्रांतील पहिला.

४-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न दाशरथि रामास सीतेपासून झालेल्या दोन पुत्रांतील पहिला. यास, हें नांव पडण्याचें कारण-( कुशीलव श० पहा ). यास चंपिका आणि कुमुद्वती अशा दोन स्त्रिया होत्या. त्यांतून पहिलीस चंपकमालिनी इ० नऊ कन्या, आणि दुसरीस अतिथि० इ० आठ पुत्र होते. राम असतांना हा कुशावती नगरांत राहत असे.

५-भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कुशचीरा**-भारतवर्षीय नदी.

**कुशद्वीप**-पृथ्वीच्या सप्त महाद्वीपांतील चौथ. याची रुंदी आठ लक्ष योजनें असून, तितक्याच रुंदीच्या घृतसमुद्राचें यास वेष्टन आहे. येथें अग्नीप्रमाणें दैदीप्यमान् ईश्वरानिर्मित कुशस्तंब असल्यामुळें यास कुशद्वीप असें नांव पडलें. प्रियव्रत राजाचा पुत्र हिरण्यरेता तो येथील आधिपति असून, त्यानें याचें वर्षसंज्ञक सात भाग करून, **वसु, वसुदान, दृढरुचि, नाभिगुप्त, स्तुत्यव्रत, विविक्त,** आणि **वामदेव,** अशा सात पुत्रांस दिले, व त्यांचींच नांवें त्या त्या वर्षास क्रमानें दिलीं. या द्वीपांत चक्र, चतुःशृंग, कपिल, चित्रकूट, देवानीक, ऊर्ध्वरोमा, आणि द्रविण, असे सात पर्वत, व रसकुल्या, मधुकुल्या, मित्रविंदा, श्रुतविंदा, देवगर्भा, घृतच्युता, आणि मंत्रमाला अशा सात नद्या आहेत. ( भाग० ५ स्कं० अ० २० ). ( देवी० ८ स्कं० अ० १२ ).

**कुशधारा**-भारतवर्षीय नदी.

**कुशध्वज**-रथध्वज राजाचा पुत्र, वेदवतीचा पिता. ( वेदवती श० पहा ).

२-( विदे० वं० ) ऱ्हस्वरोमा ना० जनकाच्या दोन पुत्रांतील दुसरा, सीरध्वज जनकाचा कनिष्ठ बंधु. हा इंद्रदेशाच्या सांकाश्या ना० राजधानींत राज्य करीत असे. ( वा० रा० बाल० स० ७० ). मांडवी आणि श्रुतकीर्ति त्या दोघी याच्या कन्या असून, त्या यानें दशरथपुत्र भरत आणि शत्रुघ्न यांस क्रमानें दिल्या होत्या. सीरध्वजास पुत्र नव्हता, म्हणून हाच पुढें मिथिलेचा राजा झाला होता, यास पुत्र होता त्याचें नांव धर्मध्वज जनक.

**कुशनाभ**-( सो०वं० ) विजयकुलोत्पन्न कुश अ० कुशिक राजाच्या चार पुत्रांतील चौथा. यानें महोदय ना० पुरी स्थापिली होती. याच्या शंभर कन्या वायूच्या कोपानें वक्र झाल्या असतां, कांपिली पुरीच्या चुलिसूनु ब्रह्मदत्त राजास दिल्यावर सरळ झाल्या, परंतु देशास कान्यकुब्ज नांव जें पडलें तें पडलेंच. ( वा० रा० बाल० स० ३२-३३ ).

**कुशप्लव**-भारतवर्षीय वनवि० दितीनें इंद्राचा पराभव करील असा पुत्र व्हावा म्हणून, येथें सहस्र वर्षेपर्यंत तप केलें होतें. कालांतरानें याच स्थळावर विशाला नगरी स्थापिली गेली. ( वा० रा० बाल० स० ४६ ).

**कुशप्लवन**-भारतवर्षीय तीर्थ.

**कुशल्य**-भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कुशस्थली**-सूर्यवंशोत्पन्न शर्यातिराजा, त्याच्या आनर्त ना० पुत्राचा पुत्र जो रेवत राजा, त्यानें स्थापिलेली नगरी, हिलाच पुढें द्वारका असें नांव पडलें.

**कुशाग्र**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढान्वयांतील, उपरिचरवसूचा पुत्र बृहद्रथ त्याच्या दोन पुत्रांतील दुसरा, जरासंधाचा कनिष्ठ बंधु. याचा पुत्र ऋषभ राजा.

**कुशांब**-( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न कुश अ० कुशिक राजाच्या चार पुत्रांतील पहिला. यास कुशांबु असेंही म्हणत असत. यानें स्थापिलेल्या नगरीचें नांव कौशांबी असें असून, याच्या पुत्राचें नांव गाधि असें होतें.

२-( सो० वं० पूरुकुलोत्पन्न उपरिचरवसु राजाच्या पुत्रांतील एक.

**कुशांबु**-प्रथमार्थक कुशांब तोच.

**कुशावती**-दाशरथिरामाचा पुत्र कुश त्याची नगरी.

**कुशावर्त**–प्रियव्रतवंशीय ऋषभदेवास जयंतीच्याठायीं झालेल्या शतपुत्रांतील जे नवखंडाधिपति पुत्र त्यांतलि ज्येष्ठ. याचा खंड याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२–भरतवर्षाचे जे नऊ खंड त्यांतील एक.

३–भारतवर्षीय तीर्थ.

**कुशिक**–एक ब्रह्मर्षि व कुल. ( १ विश्वामित्र श० पहा).

२–द्वितीयार्थक कुश तोच.

**कुशीलव**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न दाशरथिरामास, सीतेच्या ठायीं झालेले दोन पुत्र ते. रामचंद्रानें लोकापवादास्तव गंगेच्या पलीकडे तमसानदीतीरीं लक्ष्मणाकडून सीतेचा त्याग करविला, तेव्हां ती गर्भिणीच असून, अरण्यांत सोडल्यानंतर प्रसूत झाली असतां, यांचे जन्म झाले होते. ( २ राम श० पहा ). अरण्यांत सीतेस सोडून लक्ष्मण अयोध्येस परत गेला असें पाहून, तेथें सीता रोदन करीत बसली, असें वाल्मीकि ऋषीच्या शिष्यांनीं पाहून, तें वृत्त त्यांनीं ऋषीस कळविलें. तें ऐकून, व त्यास तें पूर्वज्ञातच होतें म्हणून, तो सीता होती तेथें आला, व तिचें सांत्वन करून, त्यानें तिला आपल्या आश्रमीं नेलें, आणि ऋषिपत्न्यांच्या समाजांत ठेवून, तिचें त्यांस उत्तम प्रकारेंकरून पालन करण्यास सांगितलें ( वा० रा० उत्तर० स० ४८–५० ).

सीता, वाल्मीकिऋषीच्या आश्रमांत सदाचरणानें काल्क्षेप करीत असतां, ती यथाकालीं श्रावणमासीं रात्रौ प्रसूत होऊन, या दोन पुत्रांस प्रसवली. हें वाल्मीकीस कळतांच, तो तेथें आनंदानें गेला, व त्यानें एकाची रक्षा कुशमुष्टीनें, व दुसऱ्याची लवमुष्टीनें केली, म्हणून यांस क्रमानेंच कुश आणि लव अशीं नांवें पडलीं. याप्रमाणें उभयतांचीं नामकरणें करून, हे दोनही पुत्र मोठे पराक्रमी होतील असें त्यानें सीतेस सांगून गमन केलें. सीता प्रसूत झाली त्या रात्रीं तेथें शत्रु होता. ( वा० रा० उत्तर० स० ६५ ). ( २ शत्रुघ्न श० पहा ).

कुशीलव मोठे झाल्यावर, वाल्मीकीनें, त्यांचें व्रतबंधन करून, वेदवेदांगें व धनुर्विद्या, यांत त्यांस निष्णात केलें. याशिवाय आपल्या शतकोटि रामायणकाव्यांतून गायत्रीमंत्रप्रचुर चोवीस सहस्र काव्य निवडून, तेंही त्यांस पढविलें. तें यांनीं तंत्रीतालयुक्त गात असावें व ऋषींस ऐकवीत असावें; त्यांतच तें रामचंद्राच्याही ऐकण्यांत आलें होतें. कुशीलव उभयतांही परमतेजस्वी, व आकृतीनें रामासारखेच असत; परंतु वाल्मीकीनें त्यांस असें सांगून ठेविलें होतें कीं, तुम्हास कोणी कोणाचे पुत्र म्हणून पुसल्यास आम्ही ऋषिपुत्र आहों असें सांगतजा, व कोणी द्रव्य देऊं लागल्यास, हें आम्हास घेऊन काय कर्तव्य आहे ? असें म्हणून घेत जाऊं. नका. यांच्या अप्रतिम गायनानें ऋषींस मोठा आनंद होई, व त्यावरून त्यांनीं संतुष्ट होऊन कौपीन इ० दिल्यास हे संतोषानें ग्रहण करीत, परंतु द्रव्य कधींच घेत नसत.

याप्रमाणें कुशीलव, ऋषिवेषानें वाल्मीकीची सेवा करीत त्याच्या आश्रमांत असतां, तिकडे अयोध्येस रामचंद्रानें गोमती नदीच्या तीरीं अश्वमेध यज्ञ आरंभून पृथ्वीवर श्यामकर्ण सोडिला. त्यासमागमें मोठ्या सेनेसहित शत्रुघ्न असून मोठमोठ्या देशांतून तो अश्व जसजसा फिरला तसाच शत्रु फिरून, त्यानें अनेक राजे जिंकले व करभार संपादन केला. याप्रमाणें अश्व फिरत असतां तो यदृच्छेनें वाल्मीकि ऋषीच्या अरण्यांत एकाएकीं प्राप्त झाला. आश्रमासमीप येतांच, लव तेथें उभा होता, त्यानें त्यास पाहिलें, व त्याच्या मस्तकावर असलेली सुवर्णपत्रिका वाचून तत्काळ त्यास धरून कदलीस्तंभासीं बांधून ठेविलें. हें लवानें कृत्य केलें त्या वेळेस वाल्मीकिऋषि आश्रमांत नव्हता; कारण तो बऱ्याच काळापूर्वी पाताळांत वरुणाच्या यज्ञास गेला असून, कुश हाही दर्भसमिधादिक मिळविण्यास अरण्यांत गेला होता. लवानें अश्व धरलेला पाहून, त्याच्या संरक्षणार्थ अनेक वीरांसहित मागें शत्रुघ्न होताच. त्यानें लवास रागें भरून अश्व सोड म्हणून सांगितलें; परंतु त्यानें तें न ऐकतां हातांत धनुष्यबाण घेऊन युद्ध आरंभिलें, व शत्रुघ्नाच्या सेनेस व्यथाभूत केलें. त्यावरून शत्रुघ्न पुढें होऊन युद्ध करूं लागला असतां त्यासही यानें मूर्च्छित करून भूमीवर पाडिलें. किंचित् अवकाशानें तो सावध झाला, व त्यानें लवाचें धनुष्य तोडून, त्यास मूर्च्छित करून पाडल्यावर रथांत घालून अश्व घेऊन अयोध्येचा मार्ग धरिला.

हें वर्तमान ऋषिकुमारांनीं सीतेस कळविलें, त्यावरून ती शोक करूं लागली. इतक्यांत कुश आला असें पाहून, त्यास तिनें लवास कोणी वीरांनीं धरून नेल्याचें वृत्त सांगितलें. तें ऐकतांच धनुष्यबाण घेऊन कुश हा, मातेस वंदन करून निघाला, व त्यांच्या पाठोपाठ धांवून जाऊन शत्रुघ्नाचा सेनापति व त्याचा बंधु यांचा वध करून शत्रुघ्नासही, बरेंच युद्ध झाल्यावर मूर्च्छित पाडिलें, तेणेंकरून भयभीत होऊन कांहीं

वीर अयोध्येस गेले, व त्यांनीं झालेलें वृत्त रामास निवेदन केलें. त्यावरून रामाज्ञेनें लक्ष्मण, कालजित् सेनापति, रुधिराक्ष, व दशरथाचा पुरातन मंत्री सुज्ञ नांवाचा त्याच्या दाहा पुत्रांसहित समागमें घेऊन, असंख्य सेनेसहवर्तमान युद्धास निघाला.

इकडे शत्रुघ्नाच्या रथांत लव मूर्च्छित होता. तो सावध झाल्यावर त्यानें कुशास पाहिलें, तेणेंकरून त्यास अधिक वीरश्री चढून, त्यानें धनुष्य नव्हतें तें सूर्याचें स्तवन करून संपादन केल्यावर लागलीच रथाखालीं उडी टाकिली, व कुशासमीप येऊन उभा राहिला. इतक्यांत तेथें लक्ष्मण येऊन पोहोंचला, तेव्हां त्याचें व कुशीलवाचें बरेंच युद्ध झालें. त्यांत लवणासुराचा मातुल रुधिराक्ष रामचंद्रास शरण आलेला त्यानें, एकाएकीं लवाचें धनुष्य हरण करून अंतरिक्षांत उड्डाण केलें, त्यास, तसेंच, जितश्रम, धार्मिक, सुकेतु, शत्रुसूदन, चंद्र, मद, शल, काल, मल्ल आणि सिंह या सुज्ञप्रधानाच्या दाहा पुत्रांस, व कालजित् सेनापतीस ठार मारून, कुशानें लक्ष्मणासही मूर्च्छित करून पाडिलें. हें वर्तमान अयोध्येमध्यें रामास कळून, हनुमान्, अंगद, नल, नील, जांबवान् यांस समागमें देऊन त्यानें भरतास पाठविलें असतां, त्याचीही तीच अवस्था झाली.

शेवटीं असें झालें कीं, यज्ञदीक्षा असतांही रामचंद्रास स्वतः तेथें यावें लागलें, व तेथें येऊन त्यानें, हीं मुलें पाहिलीं, त्यावरून अंतःकरणांत साहजिक स्नेह उत्पन्न होऊन, तो या मुलास पुसूं लागला कीं, तुम्हीं कोणाचीं मुलें आहां तें सांगा. कुश म्हणाला, युद्ध करण्याचें सोडून तुला आमचा वंश इ० पुसण्यांत काय अर्थ आहे ? रामचंद्र म्हणाला, तें कळल्यावांचून मी युद्ध करणार नाहीं. त्यावरून कुश बोलला, बरें तर ऐक, आम्ही सीतेचे पुत्र आहों, वाल्मीकि ऋषीनें आमचें उपनयन करून, आम्हास सर्व विद्या शिकविली, व माझ्या कनिष्ठ भ्रात्यास तुझ्या वीरांनीं मूर्च्छित करून धरून चालविलें,म्हणून मला युद्ध करणें भाग पडलें. त्यावरून रामास मूर्च्छा आली, तथापि त्वरेनें सावध होऊन, तो यांशीं युद्ध करूं लागला; परंतु उदासीनपणानें युद्ध करीत असल्यामुळें, त्याचा इतर बंधूंप्रमाणेंच यांनीं पराभव करून त्यास मूर्च्छित पाडिलें, व रामलक्ष्मणांचीं मुकुटकुंडलादि भूषणें काढून घेऊन सीतेकडे परत येऊन, तिला झालेलें वर्तमान ते सांगूं लागले.

इतक्यांत वाल्मीकि ऋषि पाताळांतून आला, व त्यास हें सर्व वर्तमान समजलें. नंतर तो, राम, त्याचे बंधु व सैन्य जेथें होतें तेथें येऊन, त्यानें आपल्या अमृतमयदृष्टीनें सर्वांस सावध व सजीव करून, सीता व लवकुश, यांचें वृत्त त्यास सांगितलें, व त्यांस त्याच्या स्वाधीन केलें. तेव्हां राम, ऋषीस वंदन करून, त्या सर्वांसह अयोध्येस आला. ( जैमिनी अश्वमेध० अ० २५-३६ ).

**कुशोदका**-कुशद्वीपसंबंधीं देवता.

**कुषीतक**-एक ब्रह्मर्षि.

**कुसीदकी**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**कुसुंभ**-मेरुकर्णिका पर्वतांतील एक.

**कुसुमामोदिनी**-हिमालय पर्वतावरील देवताविo (मत्स्य० अ० १५५ ).

**कुस्तुंबरु**-गंधर्ववि०.

**कुहन**-सौवीरदेशीय सामान्य राजपुत्र.(३ जयद्रथ श०पहा).

**कुहर**-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**कुहु**-स्वायंभू मन्वंतरांतील अंगिराऋषीस श्रद्धेपासून झालेल्या चार कन्यांतील दुसरी.

२-हविष्मंत ना० पितरांची जी स्त्री ती.

३-द्वादशादित्यांतील धाता ना० आदित्याची स्त्री ती.

४-मयासुराच्या तीन कन्यांतील तिसरी.

५-भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी (२हिमालय श०पहा).

६-शाल्मली द्वीपांतील एक नदी.

**कुक्षि**-एक ब्रह्मर्षि. रैभ्यऋषीचा पुत्र. ( भार० शांति० अ० ३४८ ).

**कुक्षिभीम**-बलीच्या शतपुत्रांतील एक.

**कुक्षेयु**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्व राजा, त्याच्या १० पुत्रांतील एक. यास कक्षेयु असेंही म्हटलेलें आहे.

**कूट**-कंससभेंतील मल्लवि०. हा धनुर्यागकाळीं बलरामानें मारिला. ( भाग० १० स्कं० अ० ४४ ).

**कूपकर्ण**-एक रुद्रगण. बाणासुराच्या युद्धप्रसंगांत बलरामाशीं याचें युद्ध झालें होतें.

**कूपह्रद**-भारतवर्षीय तीर्थ.

**कूर्च**-( सू० वं० ) नरिष्यंतकुलोत्पन्न मीढ्वान राजाचा पुत्र. याचा पुत्र इंद्रसेन.

**कूर्चामुख**-एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**कूर्म**-चालू श्वेतवाराहकल्पांतील चाक्षुषमन्वंतरांत झालेला विष्णूचा अवतार. हा झाला असतां समुद्रमंथन झालें होतें. ( भाग० १ स्कं० अ० ३ ). व त्या काळीं कोणी एक सत्ययुग असून दैत्यांवर राज्य करणारा बली दैत्य राजा होता.

२–कद्रूपुत्र एक नाग.

३–शरीरस्थ उपप्राणांतील एक.

**कूष्मांडराज**–रुद्रगणवि०.

**कृकल**–शरीरस्थ पंचोपप्राणांतील एक.

**कृत**–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न क्षत्रवृद्धकुलांत जन्मलेल्या कुशवंशांतील जय राजाचा पुत्र. याचा पुत्र हर्यवन.

२–वसुदेवास रोहिणीपासून झालेल्या सात पुत्रांतील सातवा.

३–कृतयुग शब्द पहा.

**कृतक**–वसुदेवास मदिरेपासून झालेल्या चार पुत्रांतील तिसरा.

**कृतचेता**–पांडवांसमागमें द्वैतवनांत होता ऋषि तो.

**कृतंजय**–एक ब्रह्मर्षि.

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न बर्हि राजाचा पुत्र, याचा पुत्र रणंजय.

**कृतद्युति**–चित्रकेतु राजाच्या कोटिस्त्रियांतील ज्येष्ठ

**कृतध्वज**–प्रतर्दन राजास नामांतर. (१ प्रतर्दन श०पहा).

२–( विदे० वं० ) धर्मध्वज जनकाच्या दोन पुत्रांतील पहिला, याचा पुत्र केशिध्वज.

**कृतप्रज्ञ**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय भगदत्त राजा, त्याचा पुत्र, यास नकुलानें मारिलें.

**कृतमाला**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( २ हिमालय श० पहा ).

**कृतयुग**–चार युगांतील पहिलें व त्याची मूर्तिमान् देवता. याची वर्षसंख्या देवमानानें अठ्ठेचाळीसशें वर्षांची म्हणजे मनुष्यमानानें १७,२८,००० वर्षांची आहे. याची संध्या, व संध्यंशकाल हे देवमानानें आठशें संवत्सरांचे म्हटलेले आहेत. ( मत्स्य० अ० १६४ ). ज्या काळीं सूर्य, चंद्र, बृहस्पति आणि पुष्यनक्षत्र एके राशीस येतात, त्या काळीं कृतयुगास आरंभ होतो. ( भार० वन० अ० १५ श्लो० ९० ). (भाग० १२ स्कं० अ० २ श्लो० २४ ), " कृतकृत्याः प्रजा जात्या तस्मात्कृतयुगं विदुः " यास सत्ययुग असेंही म्हटलें आहे.

**कृतवर्मा**–( सो० वं० ) सहस्राजित्कुलोत्पन्न धनक राजाच्या चार पुत्रांतील तिसरा.

२–( सो० वं० ) नहुषपौत्र यदुराजा, त्याच्या सात्वतकुलांतील हृदिक राजाच्या पांच पुत्रांतील तिसरा, यास हार्दिक असें नामांतर ग्रंथांत फार आढळतें,व हा मरुद्गणांशानें जन्मला असून, भारती युद्धांत एक अक्षौहिणी सैन्यासह यास, बलरामानें दुर्योधनाकडे साह्यास दिलें होतें. भारती युद्ध समाप्त झालें त्या काळीं दुर्योधनाकडील जे तीन वीर वांचले होते, त्या तिहींत हा एक होता. ( १ अश्वत्थामा श० पहा ). नंतर हा द्वारकेस गेला होता. (भार० स्त्री० अ० ११). कांहीं कालानें युधिष्ठिरानें अश्वमेध केला, त्या वेळीं हा अर्जुनासमागमें अश्वसंरक्षणार्थही गेला होता. पुढें जेव्हां कृष्ण निजधामास जाऊं लागला, तेव्हां कांहीं अगोदर पिंडारक येथें यादवांमध्यें परस्पर कदन झालें, त्यांत हा सात्यकीच्या हातून मरण पावला. ( भार० मौसल० अ० ३ श्लो० २८ ).

**कृतवाक्**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कृतवीर्य**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न धनक राजाच्या चार पुत्रांतील पहिला. याचा पुत्र कार्तवीर्य नामांतरानें अर्जुन ना० होता. ज्यास सहस्रार्जुन असें म्हणत असत.

**कृतशौच**–भारतवर्षीय क्षेत्र.

**कृतस्थली**–एक अप्सरा. ( ९ मधु श० पहा ).

**कृताग्नि**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न धनक राजाच्या चार पुत्रांतील दुसरा.

**कृतांत**–संहारकर्ता काल. यमासही म्हणतात.

**कृताश्व**–( सू० वं० ) इक्ष्वाकुलोत्पन्न संहताश्व राजाच्या दोन पुत्रांतील पहिला. यास कृशाश्व असें नामांतर असून, पुत्र श्येनाजित् नामांतरानें प्रसन्न ना० राजा होता.

**कृति**–( सो० वं० ) आयुपुत्र नहुष राजा त्याच्या साहा पुत्रांतील कनिष्ट.

२–( विदे० वं० ) बहुलाश्व जनकाचा पुत्र. याचा पुत्र महावशीनामा जनक.

३–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्यामकुलांतील प्रसिद्ध जो रोमपाद पुत्र बभ्रु, त्याचा पुत्र. याचा पुत्र उशिक राजा.

४–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिपुत्र देवमीढ अ० द्विमीढ, त्याच्या वंशांत जन्मलेल्या सन्नातिमान् राजाचा पुत्र. यानें हिरण्यनाभापासून प्राच्य सामाच्या साहा संहिता संपादिल्या होत्या. याचा पुत्र नीप राजा. ( भाग० ९ स्कं० अ० २१ ).

५–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, त्याच्या कुरुपुत्र सुधनुवंशांत जन्मलेल्या च्यवन राजाचा पुत्र. यास पुत्र उपरिचरवसु नांवाचा होता.

६–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. याचा पुत्र रुचिपर्वा.

**कृतिमान्**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न देवमीढ अ० द्विमीढ राजाचा पुत्र यवीनर त्याचा पुत्र. यास

धृतिमान् असेंही नामांतर असून, पुत्र सत्यधृति ना० होता.

**कृतिरथ**–( वि० वं० ) प्रदीपक जनकाचा पुत्र. यास नामांतर कीर्तिरथ असून, पुत्राचें नांव देवमीढनामा जनक होतें.

**कृतिरात**–( वि० वं० ) महाधृति जनकाचा पुत्र. यास कीर्तिरात असें नामांतर असून, पुत्र होता त्याचें नांव महारोमा होतें.

**कृती**–कयाधुपुत्र संन्हादाची स्त्री. पंचजन दैत्याची माता.

**कृतेयु**–( सो० वं ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्व राजा त्याच्या १० पुत्रांतील चौथा.

**कृतौजा**–(सो० वं०) यदुपुत्र सहस्राजित्, तद्वंशीय धनक राजाच्या चार पुत्रांतील चौथा.

**कृत्तिका**–प्राचेतस दक्षानें सोमास दिलेल्या सत्तावीस कन्यांतील एक.

२–षट्संख्याक ज्या कार्तिकेयाच्या माता त्या.

**कृत्या**–भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कृत्वा**–कृत्वी तीच.

**कृत्वी**–कृष्णद्वैपायनपुत्र शुक त्याची कन्या. हिला कीर्तिमती असें नामांतर आहे. अजमीढकुलोत्पन्न जो नीप अ० अणुह राजा त्याची ही स्त्री. हिला पुत्र होता त्याचें नांव ब्रह्मदत्त असें होतें.

**कृप**–उत्तानपादपुत्र ध्रुव त्याचा पौत्र, शिष्टाच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ.

२–गौतमकुलोत्पन्न शरद्वान् ऋषींचा तपोभंग व्हावा म्हणून, इंद्रानें जी जानपदी अप्सरा पाठविली होती, तिच्या दर्शनानें जें त्याचें रेत पतन झालें, त्यापासून उत्पन्न झालेल्या युग्मांतील पुत्र तो. या युग्माचें शंतनु राजानें कृपेंकरून पालन केलें म्हणून, कन्येस कृपी व पुरुषास कृप अशीं नांवें पडलीं. ( भाग० ९ स्कं० अ० २१ ). हा शरद्वानृषींचा पुत्र म्हणून यास शारद्वत, व गौतमकुलोत्पन्न यास्तव गौतम असें म्हणत असत. हा, पुढें धनुर्विद्येंत चांगला निपुण झाला म्हणून कृपाचार्य हें नांव पावला. कौरवपांडवांस द्रोणाचार्यांपूर्वी हाच धनुर्विद्येची शिक्षा देत असे. भारती युद्धांत हा दुर्योधनाकडे होता, व सर्व कौरव मरण पावल्यावर, यास पांडवांनीं आपल्यासमीप आश्रय दिला होता. (भार० स्त्री० अ० ११). हा चिरजीवी असून, पित्याच्या शरद्वान् या नांवानेंच सावर्णि मन्वंतरांत सप्तर्षींत एक होणार आहे; कारण याचा पिता चिरजीवी नाहीं.

**कृपा**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( शुक्तिमान् श० पहा ).

**कृपाचार्य**–कृप तोच.

**कृपी**–कृपाचार्याची भगिनी, हिला शारद्वती असेंहि म्हणत असत. ( कृप श० पहा ). ही द्रोणाचार्यांची स्त्री असून, हिला अश्वत्थामा पुत्र झाला होता.

**कृमिभोजन**–एक नरक आहे.

**कृमी**–एक नदी. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**कृश** अ० **कृशतनु**–एक ऋषि, यानें प्रतिग्रहरहित होऊन, आपला काळ तपाचरणांत पुष्कळ घालविला होता. याची आकृति अत्यंत कृश होती; तीमुळेंच यास असें नांव पडलें होतें. यानें वीरद्युम्न राजाचा पुत्र भूरिद्युम्न नष्ट झाला होता, तो त्याचा त्यास, तपोबलानें आणून देऊन उपदेशपर असे कित्येक इतिहासहि सांगितले होते. ( भार० शांति० अ० १२८ ).

**कृशान** अ० **कृशानु**–अग्नि.

**कृशानुरेता**–महादेव.

**कृशाश्व**–एक ऋषि व प्रजापति. प्राचेतस दक्षानें यास आपल्या ६० कन्यांतून दोन कन्या आर्चि व धिषणा भार्यार्थ दिल्या होत्या, त्यांतून पहिलीस धूम्रकेश, आणि दुसरीस वेदशिरा, देवल, वयुन व मनु, असे पुत्र होते. यांशिवाय जया आणि सुप्रभा अशा यास दोन कन्या होत्या; परंतु ह्या कोणत्या स्त्रीपासून झाल्या होत्या त्याचा उल्लेख आढळत नाहीं. अस्तु, जयेस पुत्र शंभर व सुप्रभेस पन्नास होते, ते सर्व अस्त्ररूपच असल्यामुळें त्यांस विश्वामित्रानें आपणासमीप ठेविलें होतें. ( वा० रा० बाल० स० २१ ).

२–कृताश्व राजास नामांतर.

३–नाट्यकलेचा आचार्य एक ऋषि.

४–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न सहदेव राजाचा पुत्र. याचा पुत्र सोमदत्त.

**कृषीवल**–एक ब्रह्मर्षि.

**कृष्ण**–उत्तानपादवंशीय हविर्धान राजास, हविर्धानी भार्येपासून झालेल्या साहा पुत्रांतील चवथा, द्वितीयार्थक प्राचीनबर्हीच्या कनिष्ठबंधूंतील एक.

२–कद्रुपुत्र नागांतील एक.

३–अथर्वणवेदोपनिषत्.

४–(सो० वं०) यदुकुलांतील सात्वतराजवंशांत जन्मलेल्या शूरपुत्र वसुदेवास, देवकीपासून झालेल्या आठ पुत्रांतील कनिष्ठ पुत्र. हा, शिशुपालादि दुष्टांचा निग्रह करून, साधुजनांचें संरक्षण करावें, या कारणास्तव, विष्णूच्या अंशानें चालू वैवस्वत मन्वंतराचा जो

प्रस्तुत अठ्ठाविसावा पर्यय ( चौकडी ) चालत आहे, यांतील द्वापारयुगाच्या अगदीं समाप्तीस भूमीवर अवतरित झाला होता. ( देवीभा० ४ स्कं० अ० १६ ).

याचें जन्म होण्यापूर्वींच याच्या मातापितरांस, कंसानें बंदींत ठेविलें होतें. याचे साहा बंधु कंसानें मारिल्यावर, आणि सातवा त्यानें मारण्यापूर्वींच रोहिणिच्या गर्भांत प्रविष्ट झाल्यावर, याचें जन्म झालें. हा जन्मला त्यावेळीं श्रावणमासांतील कृष्णाष्टमीची मध्यरात्र होती. याचें जन्म झालें असें पाहून, वसुदेवास चिंता पडली कीं, आतां याचें रक्षण कोणत्या उपायानें करावें ? इतक्यांत त्यास गोकुळांत आपला परम मित्र नंद आहे, तेथें यास पोहोंचवावें असें स्फुरलें, व तेथें पोहोंचविल्यानें माझी स्त्री रोहिणीहि मीं पूर्वींच त्याच्या घरीं ठेविली आहे, तिजप्रमाणें याचें संरक्षण ऐतेंच चांगलें होईल; परंतु जावें कसें, कारण, पायांत शृंखला आहेत, तों त्याच्या पायांतील शृंखला आपोआप तुटून, द्वारें मोकळीं झालीं. द्वाररक्षक गाढनिद्रेनें व्याप्त झालें, असें पाहून वसुदेवाने विलंब न करितां, जरी निबिड अंधकार होता, व यमुनेस पाणीहि पर्जन्यकाळामुळें बरेंच होतें, तरी या बालकास घेऊन, तो गोकुळास गेला, व नंदाच्या गृहांत जाऊन, यास त्यानें यशोदेच्या पर्यंकावर ठेविलें, आणि तिची कन्या आपण घेऊन जसा गेला तसाच मथुरेस बंदीशाळेंत परत आला. इतकें कृत्य झालेलें गोकुळांत, व मथुरेंतील बंदीशाळेंत कोणासहि ईश्वरी मायेनें विदित झालें नाहीं. कारण कपाटें, व त्याच्या पायांतील शृंखला जशा होत्या, तशाच पूर्वींप्रमाणें झाल्या. ( भाग० १० स्कं० अ० ३ ).

वसुदेव, कन्येस बंदीशाळेंत घेऊन येतांच कंसास दुष्ट स्वप्न पडलें, व तेणेंकरून तो जागृत होऊन विमनस्क होत्साता बसला आहे इतक्यांत, देवकी प्रसूत झाल्याचें वर्तमान सेवकांनीं येऊन त्यास कळविलें. तेव्हां तो तत्क्षणींच उठून बंदीशाळेंत गेला, आणि पाहतो तर ती कन्या आहे; तथापि अष्टम बालक म्हणून, त्यानें मनांत दया न आणतां तिला शिळेवर आपटावें तों, ती त्याच्या हातांतून निसटून तुझा वैरी गोकुळांत वाढत आहे इतकें बोलून अंतरिक्षांत अदृश्य झाली. (भाग० १० स्कं० अ० ४ ).

इकडे गोकुळांत, नंदानें आपणास पुत्र झाला या आनंदानें कृष्णाचें जातकर्म केलें. ( अ० ५ ) कांहीं दिवसांनीं कंसानें, गोकुळांतील नूतन जन्मलेलीं बालकें मारावीं अशा आशयानें पूतनेस पाठविलें. तिचा नाश झाला. ( पूतना श० पहा. ) पुढें तृणावर्त आला त्याचीही तीच अवस्था झाली ( तृणावर्त श० पहा ). गर्गमुनींनें येऊन रामकृष्णांचीं नामकर्में केलीं. ( अ० ८ ) नंदाच्या अंगणांतील दोन वृक्षांचा कृष्णाकडून झालेला उद्धार. ( नलकूबर श० पहा ). वत्सासुर, बकासुर, अघासुर, यांचा वध. ते ते शब्द पहा. गाई, वत्स आणि गोपाळ, अदृश्य करून ब्रह्मदेवांनीं केलेली कृष्णाच्या सामर्थ्याची परीक्षा ( भाग० दशम० अ० १३-१४ ). धेनुकासुराचा कृष्णानें केलेला वध. ( धेनुकासुर श० पहा ). कालियमर्दन. (१ कालिय श० पहा). गोपांचें दवाग्नीपासून कृष्णानें केलेलें संरक्षण (भाग० १० स्कं० अ० १७). प्रलंबाचा बलरामानें केलेला वध ( २ प्रलंब श० पहा ). पुनः गायी व गोपाळ यांचें अग्नीपासून संरक्षण ( अ० १९ ). ऋषिपत्न्यांपासून कृष्णबलरामादिकांस अन्नप्राप्ति ( अ० २३ ). प्रतिवर्षी नंद, इंद्रयाग करीत असे. तो रहित करून आपलें सामर्थ्य इंद्रास दाखविण्यासाठीं कृष्णानें नवाच गोवर्धनयाग काढिला. त्यावरून इंद्रानें गोकुळ बुडवायाच्या हेतूनें अतिवृष्टि केली असतां, गोवर्धनपर्वताच्या आश्रयानें कृष्णानें गोकुलवासी जनांचें संरक्षण केलें ( गोवर्धन श० पहा ). एकदा नंद यमुनेवर स्नानास गेला असतां तींत बुडाला. त्यास कृष्णानें संरक्षिलें ( अ० २८ ). सुदर्शन ना० विद्याधराचा सर्पयोनीपासून कृष्णानें उद्धार केला ( ६ सुदर्शन श० ). अरिष्टवध ( ३ अरिष्ट श० ). केशीवध ( ३ केशी श० ). व्योमासुर वध ( व्योमासुर श० पहा ).

पुढें धनुर्यागनिमित्तानें, कंसानें कृष्णबलरामांस गोकुळांतून मथुरेस आणायासाठीं अक्रूरास पाठविलें. त्याप्रमाणें तो त्यांस घेऊन जात असतां, मार्गांत स्नानसमयीं त्यानें विश्वरूप पाहिलें ( भाग० १० स्कं० अ० ३८-४० ). कंसाच्या रजकाचा वध. ( अ० ४१ ). कंसाची दासी कुब्जा कृष्णानें सरळ केली ( कुब्जा श० पहा ). कुवलयापीड गजाचा वध, तो शब्द पहा. चाणूर, मुष्टिक, व त्याच्या बंधूसहवर्तमान कंसाचा वध. ते ते शब्द पहा. नंतर वसुदेवदेवकींची बंदींतून कृष्णानें मुक्तता करून त्यांचा सत्कार केला व उग्रसेनास राज्यावर स्थापिलें. यादवांतील वृष्णि, अंधक, कुकुर, मधु, दाशार्ह, इ० क्षत्रियकुलें, कंसाच्या भीतीनें दशदिशांस पळालीं होतीं, त्यांस कृष्णानें मथुरेस आणून वसविलें. नंदादिगोपालांचे उपकार स्मरून

त्यांस मथुरेस कांहीं काळपर्यंत आणून ठेवून यथायोग्य सत्कारपूर्वक पुनः गोकुलास मार्गस्थ केलें. तदनंतर वसुदेवानें रामकृष्णांचा व्रतबंध केला, व यांच्या जन्मकालीं तो स्वतः कारागृहांत असल्यामुळें त्यास गोप्रदानें घडलीं नव्हतीं, तीं त्यानें येथें दिलीं. त्यापुढें कृष्ण, रामासहवर्तमान सांदीपनी ऋषींच्या गृहीं विद्यासंपादनार्थ जाऊन राहिला. ( भाग० दशम० अ० ४५). गोकुलांस उद्धवास पाठविलें ( २ उद्धव श० पहा).

पांडव कृष्णाचे आतेभाऊ असून हा त्यांचा मामेभाऊ होता; कारण पृथा जी कुंतिभोजानें दत्त घेत ल्यामुळें कुंती नांव पावली होती, ती वसुदेवाची प्रत्यक्ष भगिनी होती. त्यामुळें याचा, त्याकडे, व त्यांचा याकडे साहजिक ओढा असे. एकदां पांडवांचें वृत्त यास बरेच दिवस कळलें नव्हतें, म्हणून यानें अक्रूरास हस्तिनापुरास पाठविलें. त्यावरून तो तेथें गेला, व त्यानें कुंती, विदुर, इ०कांस भेटून दुर्योधनादिकांची पांडवांशीं द्वेषाची वर्तणूक असल्याचें वृत्त त्यांपासून ऐकून घेतलें, व धृतराष्ट्रास नीतीचा बोध केला. परंतु त्यास तो तादृश रुचला नाहीं असें पाहून, कुंतीचें समाधान केल्यावर, मथुरेस परत येऊन तेथील साकल्य वर्तमान कृष्णास निवेदन केलें. (भाग० १० स्कं० अ० ४८-४९ ).

कंस जरासंधाचा जामात होता म्हणून, त्यांस कृष्णानें मारलें असें ऐकतांच, तो तेवीस अक्षौहिणी सैन्य घेऊन येऊन त्यानें मथुरेस वेढा दिला. त्यावरून कृष्ण आणि बलराम यांनीं त्याशीं यादवांसहवर्तमान युद्ध करून त्याचा पराभव केला, इतकेंच नाहीं, तर बलरामानें त्यास बांधूनही आणिलें. परंतु कृष्णानें त्यास सोडून दिल्यावर तो परमलज्जित होऊन मगध देशास माघारा गेला. तथापि कांहीं काळानें पुनः तो मथुरेवर आला. त्यांतही तो पराभव पावला. याप्रमाणें सत्रा वेळा झालें. एकदां कालयवनानें मथुरेस वेढा दिला आहे असें त्यास कळतांच आपणहि युद्धाची सिद्धता करूं लागला. तें कृष्णानें ऐकिल्यावरून संपूर्ण मथुरेंतलि जनांस पशुधनादिकांसहित विश्वकर्म्याकडून द्वारकेंत नेऊन ठेवविलें ( द्वारका० श० पहा ). नंतर मथुरेंत कोणी राहिलें नाहीं असें पाहून आपण तींतून एकटाच पळूं लागला. तें कालयवनानें पाहून तो याच्या मागें लागला असतां, यानें मुचकुंदाकडून त्याचा वध करविला. ( कालयवन श० पहा ). नंतर कृष्ण तेथून मथुरेकडे परतला. इतक्यांत बलरामाहि यादवसेना घेऊन तेथें आला, आणि उभयतांनीं मिळून कालयवनाचें सैन्य मारिलें, व ते द्वारकेस निघून गेले.

पुढें जरासंधास असें कळलें कीं, कृष्ण हा, संपूर्ण यादवांसहवर्तमान मथुरा सोडून, आनर्त देशामध्यें द्वारकेस जाऊन राहिला आहे. त्यावरून तो आपणांस खचित भितो असें त्यास वाटून तो सेनेसहित निघाला तो द्वारकेवरच आला. (हें त्याचें अठराव्यानें येणें). परंतु कृष्ण या प्रसंगीं त्याशीं युद्ध न करितां बलरामासहवर्तमान पळत सुटून प्रवर्षण ना० एका गिरीवर चढला. तें जरासंधानें पाहून सेनेसहित त्याच्या मागें लागला, व त्या पर्वतास तृणकाष्ठादिकांचें आवरण करवून, व त्यास अग्नि देऊन, आतां रामकृष्ण दग्ध झाले, किंवा होतील, अशी कल्पना करीत होत्साता हर्षानें मगधदेशीं गेला. त्यास सेनेसहित गेलेला पाहून रामकृष्ण अन्य मार्गानें उड्या टाकून द्वारकेंत प्रवेशले. त्यावर पुरातन आनर्ताधिपति रेवत राजा, त्यानें बलरामास आपली रेवती ना० कन्या विवाहविधीनें दिल्यावरून तो विवाहसमारंभ उत्तमप्रकारचा झाला. ( रेवत श० पहा ). तसीच भीष्मक राजाची कन्या रुक्मिणी तीसही कृष्णानें वरिलें ( भाग० १० स्कं० ५२-५४ ).

रुक्मिणीस कृष्णापासून प्रथम पुत्र प्रद्युम्न झाला. त्यानें शंबरासुराचा वध केला ( २ प्रद्युम्न श० पहा). पुढें स्यमंतकमण्याच्या प्रसंगानें, जांबवंती व सत्यभामा या दोघींचें कृष्णाशीं पाणिग्रहण, सत्राजित राजा, व शतधन्वा यांचा वध. ( स्यमंतकमणि श० पहा ). कांहीं कालानें कृष्ण, पांडवांस भेटण्याकरितां कित्येक यादवांस समागमें घेऊन इंद्रप्रस्थास येण्यास निघाला. ( त्याचें कारण पांडव लाक्षागृहांतून वांचून निघाल्यावर, जरी ते यास द्रुपदपुरांत द्रौपदीविवाहप्रसंगानें भेटले होते, तरी स्वस्थपणानें भेट झाली नव्हती ). येथें आल्यावर पांडवांनीं यास चातुर्मास्यपर्यंत राहून घेतलें, त्या कालांत कालिंदीनें यास वरिलें. ( २ कालिंदी श० पहा ). तशाच, द्वारकेस गेल्यावर मित्रविंदा, सत्या, भद्रा, लक्ष्मणा, यांसहि यानें स्वपराक्रमानें हरून त्यांशीं विवाह केले. ते ते शब्द अंकांकडे लक्ष देऊन पहा.

पूर्वी भौमासुरानें इंद्रास बहुताप्रकारें त्रास दिला असतां, त्याच्या नाशाची संधि इंद्र पाहात होताच. इतक्यांत कृष्णाचें अवतरण झालें, व तो महापराक्रमी आहे असेंही त्यास दिसलें त्यावरून त्यानें ही गोष्ट कृष्णास कळविली. तेव्हां कृष्ण प्राग्ज्योतिष नगरीस

गेला, व त्यानें भौमासुरास मारून, त्याचा पुत्र भगदत्त होता त्याची त्या राज्यावर स्थापना केली. तशाच त्यानें बंदींत ठेविलेल्या सोळा सहस्र राजकन्यां, त्यांस बंधमुक्त करून, अदितीचीं हरण करून आणलेलीं कुंडलें तीं परत घेऊन, इंद्राच्या स्वाधीन केलीं. ( नरकासुर श० पहा ). यापुढें कृष्णाचा ज्येष्ठ पुत्र प्रद्युम्न त्याचा रुक्मवतीशीं विवाह झाला इ०.( भाग० १० स्कं० अ० ६१ ).

कृष्णानें, भौमासुर अ० नरकासुर त्यानें बंदींत ठेवलेल्या कन्या, त्यास मारून सोडविल्या असतां, त्यांनीं कृष्णासच वरिलें. त्यामुळें कृष्णास पहिल्या आठ, व ह्या सोळा सहस्र इतक्या स्त्रिया होत्या ( भाग० १० स्कं० अ० ९० ). परंतु ग्रंथांतरीं शंभर अधिकही स्त्रिया होत्या असें आढळतें. आतां याच्या मुख्य स्त्रिया आठ व त्यांस यापासून झालेली संतति येथें दाखवितों, त्याचप्रमाणें अन्य स्त्रियांसही संतति होती असें समजावें.

१ **रुक्मिणी.** हिचे पुत्र प्रद्युम्न, चारुदेष्ण, सुदेष्ण, चारुदेह, सुचारु, चारुगुप्त, भद्रचारु, चारुचंद्र, विचारु आणि चारु असे दाहा पुत्र; तसेंचि चारुमती ना० एक कन्या होती, तीस कृतवर्म्याच्या पुत्रानें वरिलें होतें. २ **जांबवती.** हिचे पुत्र सांब, सुमित्र, पुरुजित्, शतजित्, सहस्रजित्, विजय, चित्रकेतु, वसुमान, द्राविड आणि क्रतु; तसेंच एक कन्या होती. ३ **सत्यभामा.** हिचे पुत्र भानु, सुभानु, स्वर्भानु, प्रभानु, भानुमान्, चंद्रभानु, बृहद्भानु, अतिभानु, श्रीभानु आणि प्रतिभानु; व एक कन्या. ४ **भद्रा.** हिचे पुत्र संग्रामजित्, बृहत्सेन, शूर, प्रहरण, अरिजित्, जय, सुभद्र, वाम, आयु, आणि सत्यक; व एक कन्या. ५ **मित्रविंदा.** हिचे पुत्र वृक, हर्ष, अनिल, गृध्र, वर्धन, उन्नाद, महाश, पावन, वन्हि आणि क्षुधि. ६ **सत्या.** हिचे पुत्र वीर, चंद्र, अश्वसेन, चित्रगु, वेगवान्, वृष, आम, शंकु, वसु आणि कुंति. ७ **कालिंदी.** हिचे पुत्र श्रुत, कवि, वृष, वीर, सुबाहु, भद्र, शांति, दर्श, पूर्णमास, आणि सोमक. ८ **लक्ष्मणा.** हिचे पुत्र प्रघोष, गात्रवान्, सिंह, बल, प्रबल, ऊर्ध्वग, महाशक्ति, सह, ओज, आणि अपराजित्; व एक कन्या. यांशिवाय एक रोहिणी म्हणून–ही स्त्री आढळत्ये ( भाग० १० स्कं० अ० ६१ ). कृष्णाच्या पुत्रपौत्रांत अठराजण महारथी होते. त्यांचीं नांवें अशीं–**प्रद्युम्न, अनिरुद्ध, दीप्तिमान, भानु, सांब, मधु, बृहद्भानु, चित्रभानु, वृक, अरुण, पुष्कर, वेदबाहु, श्रुतदेव, सुनंदन, चित्रबाहु, विरूप, कवि** आणि **न्यग्रोध.** ( भाग० दशम० अ० ९० श्लो० ३३–३४ ). कृष्णास इतक्या स्त्रियांशीं समागम होऊन, पुत्रपौत्रसंतति कशी झाली असेल त्याचें आश्चर्य मानूं नये. कारण त्यास प्रत्येक स्त्रीसमीप भिन्न भिन्न रूप धारण करून राहण्याचें सामर्थ्य होतें, असें ( भाग० १० स्कं० अ० ५९ ) यांतील नारदांनीं केलेली कृष्णाची परीक्षा, तीवरून दिसतें.

याप्रमाणें कृष्ण बलरामादिकांसहवर्तमान सुखें-करून काळ घालवीत असतां, जरासंधानें वीस सहस्र राजे यज्ञमिषानें बली देण्याकरितां बद्ध करून ठेविले होते. त्यांनीं, एका दूताबरोबर कृष्णास गुप्त रीतिनें असा संदेश ( निरोप ) पाठविला कीं, तुम्ही सत्वर येऊन आम्हांस बंधनमुक्त केल्यास आमचे प्राण वांचतील. तो संदेश कृष्णास दूतानें येऊन सांगितल्यावर, कृष्ण, सभेंत येऊन त्याविषयीं कसें करावें असा यादवांस जमवून विचार करीत बसला. इतक्यांत, इंद्रप्रस्थाहून संदेश घेऊन दूत आला कीं, युधिष्ठिराच्या मनांत राजसूययज्ञ कर्तव्य आहे, यास्तव आपणास त्यानें सत्वर बोलाविलें आहे. त्यावरून कृष्णास विचार पडला कीं, आधीं कोणीकडे जावें! परंतु सभेंत उद्धव होता त्यानें आपलें मत कृष्णास असें दिलें कीं, अजून जरी राजसूययज्ञास आरंभ झाला नाहीं, तरी युधिष्ठिरास, संदेशानुरूप आधीं भेटून, नंतर जरासंधाकडे जावें; म्हणजे त्यास, त्यानें संदेश पाठविल्याचा तुम्हीं आदर केलात असें कळून आनंद होऊन, मग दुसरीकडे जाण्यास तुम्हासही प्रशस्त वाटेल. हा विचार कृष्णास मान्य होऊन, उभय दूतांस समागमें घेऊन तो इंद्रप्रस्थास रथारूढ होत्साता जाण्यास निघाला. थोडयाच काळानें कृष्ण, इंद्रप्रस्थास पोहोंचून, त्यानें गिरिव्रजाहून आलेल्या दूतासमागमें परत संदेश पाठविला कीं, मी सत्वरच येऊन जरासंधास मारितों, व तुम्हांस बंधमुक्त करितों, असें राजांस सांग, त्यावरून तो दूत गेला असतां, पांडवांनीं कृष्ण आलेला पाहून त्याचा मोठा सत्कार केला. ( भाग० १० स्कं० अ० ७१ ).

तदनंतर निवांतपणा पाहून, युधिष्ठिरानें कृष्णास राजसूययज्ञ करण्याचें मनांत आणलेलें वृत्त कळविलें. तें ऐकून घेऊन कृष्णानें त्यास सांगितलें कीं, हा विचार उत्तम आहे; परंतु जरासंध जिवंत असतां, तुमचा यज्ञ सिद्धीस जाईल असें कधींच होणार नाहीं. यास्तव आधीं त्यास मारलें पाहिजे. तेव्हां युधिष्ठिर

म्हणाला, आमचें सर्वपरी बरें करणें तुजकडे आहे; म्हणून तुला कळेल तसें कर. त्यावरून कृष्ण, भीम आणि अर्जुन या दोघांस समागमें घेऊन, मगधदेशांत गिरिव्रजास गेला. तेथें भीमाशीं जरासंधाचें युद्ध होऊन, त्यांत तो भीमाच्या हातून मरण पावला. तो मरतांच कृष्णानें त्याच्या सहदेव ना० पुत्रास राज्यावर स्थापून, सर्व राजे बंधमुक्त केले आणि भीमार्जुनांसहवर्तमान तो इंद्रप्रस्थास परत आला. ( १ जरासंध श० पहा ).

राजसूययज्ञामध्यें कृष्णाची अग्रपूजा सर्वसंमतानें युधिष्ठिरानें केली, ती शिशुपालास सहन न होऊन, त्यानें त्याची निंदा केली. तीमुळें त्याचा वध झाला ( शिशुपाल श० ). राजसूययज्ञ समाप्त होऊन कृष्ण द्वारकेस परत आल्यावर शाल्वाचा त्यानें वध केला ( २ शाल्व श० ). करूषदेशाधिपति दंतवक्र, व त्याचा भ्राता विदूरथ यांचा वध ( भाग० १० स्कं० अ० ७८ ). कुचैल ब्राह्मणाचा कृष्णानें केलेला सत्कार ( कुचैल श० पहा ).

पांडवांनीं १२ वर्षें अरण्यवास, व एकवर्षपर्यंत अज्ञातवास भोगून, प्रतिज्ञा सत्य केली. पुढें कौरवांपासून आपला यथायोग्य राज्यभाग घ्यावा, म्हणून युधिष्ठिरानें कृष्णास दुर्योधनाकडे साम करण्यास पाठविण्याचा विचार केला. तो कृष्णानें मान्य करून, भीमादिकांचीं मतें घेतल्यावर सात्यकीस समागमें घेऊन कृष्ण हस्तिनापुरास जाण्यास निघाला ( भार० उद्योग० अ० ७४–८३ ). मार्गानें ऋषिसमुदाय भेटला असतां, कृष्णानें त्यांस वंदन करून समागमें घेतलें, व हस्तिनापुरापासून संनिध असणाऱ्या वृकस्थल ग्रामापर्यंत तो जाऊन पोहोंचला ( अ० ८४ ). कृष्ण, हस्तिनापुरास येत आहे, असें धृतराष्ट्रास पूर्वींच कळलें होतें, म्हणून त्यानें हस्तिनापुरापासून वृकस्थलापर्यंत मार्ग सुशोभित करवून, भीष्मादिकांस त्याकडे सामोरें पाठविलें. त्यावरून ते कृष्णास सामोरे गेले, आणि मोठ्या सन्मानानें त्यास हस्तिनापुरांत घेऊन आले. नंतर कृष्णानें पृथक् पृथक् सर्वांच्या भेटी घेऊन, तो विदुराच्या घरीं गेला, आणि तेथें असलेली आपली आत पृथा ( कुंती ) तिला पांडवांचीं वंदनें सांगून, तिचें त्यानें मधुर वाक्यांनीं समाधान करून दुर्योधनाकडे गमन केलें. ( अ० ८५–९० ). दुर्योधनानें त्याचा सत्कार केला, व भोजनास येथेंच रहा म्हणून म्हटलें. परंतु कृष्णानें, मी ज्या कार्याकरितां पांडवांकडून इकडे आलों आहें, हें कार्य झालें म्हणजे भोजन करीन. असें उत्तर करून, विदुराच्या घरीं जाऊन भोजन केलें. ( अ० ९३ ). दुसऱ्या दिवशीं भीष्म, द्रोण, कृप, व अन्य ऋषि यांसहवर्तमान धृतराष्ट्र सभेंत येऊन बसल्यावर, कृष्णही आपलें स्नानादिक आन्हिक उरकून सभेस आला, व त्यानें गंभीरवाणीनें भाषणास आरंभ केला, तो असा.—

हे धृतराष्ट्रा, मी पांडवांकडून तुम्हाकडे अशाकरितां आलों आहें कीं, तुम्हीं पांडवांस अर्धराज्य द्यावें, व त्यांनीं तुम्हीं उभयतांनीं सुखी राहावें. दुर्योधनानें युद्धाकरितां जे राजे जमविले आहेत, हे युद्ध करतील, परंतु युद्ध हें चांगलें नाहीं; कारण त्यांत वहुत जीवांचा नाश होतो, यास्तव मला वाटतें, तुम्हीं युद्धापर्यंत गोष्ट आणूं नये. आलेले राजे आपआपला क्रोध शांत करून, तुजकडून वस्त्रालंकारांनीं पूजित होत्साते स्वनगरास गमन करोत. विचार करून जर पहाशील, तर पांडवांचा तिळमात्र अपराध नसून, भीमास विषदान, लाक्षागृहांत त्यांस दग्ध करण्याचा विचार, त्यांनीं स्वपराक्रमानें मिळविलेली संपत्ति द्यूतमिषानें त्यांपासून कपटानें हरण करणें, व द्रौपदीचा अपमान, इ० अपराध तुम्हाकडूनच घडले आहेत. तथापि त्यांनीं सत्त्वापासून न ढळतां तेरा वर्षें आपदा भोगिली असून, तुजविषयीं अजून पूज्यबुद्धि बाळगतात. अशा सन्मार्गवर्ती, पराक्रमी, आणि सद्गुणी, पांडवांचा तूं व तुझे पुत्र यांनीं द्वेष करणें योग्य नाहीं. तर तूं नीट प्रकृतीवर ये, आणि आपल्या पुत्रांचा निग्रह कर. इतक्यावर न ऐकशील, व पांडव भिऊन त्यांनीं मला साम करण्यास पाठविलें असें समजशील, तर तसें समजणें अगदीं अयोग्य असून, ते युद्धास सिद्धच आहेत असें समज. ( भार० उद्योग० अ० ९५ ).

कृष्णाचें भाषण ऐकून, सभेंत बसलेले ऋषि, व राजे, रोमांचित झाले, व कोणी कांहीं बोलेनात, तेव्हां सभेंत जामदग्न्य राम होता, त्यानें धृतराष्ट्रास दंभोद्भव राजाचा इतिहास सांगून, म्हटलें कीं, कृष्णार्जुन हे नरनारायण आहेत, म्हणून यांशीं शम करण्यांतच तुझें कल्याण होईल ( अ० ९६ ). नंतर कण्व ऋषि, मातली व त्याची कन्या गुणकेशी, यांची कथा धृतराष्ट्रास सांगून म्हणाला कीं, अभिमान धरून युद्धास प्रवृत्त होऊं नको, आणि इतक्यावर तसें करशील तर, व्यर्थ खेदास पात्र होशील. इ०. ( गुणकेशी श० पहा ).

असें कण्व ऋषींचें भाषण झाल्यावर, नारद धृतराष्ट्रास म्हणतात, धृतराष्ट्रा, कोणतेंही कार्य करणें त्यांत प्रसंग पाहूनच वर्तलें पाहिजे. अतिशय आग्रह धरणें उपयोगी नाहीं, याविषयीं त्यांनीं त्यास गालवचरित्रांत सांगितलें ( ३ गालव श० ). तसाच अभिमानही चांगला नाहीं यावर ययातीचा स्वर्गांतून पतन पावल्याचा इतिहास सांगितला ( ययाति श० ). तेव्हां धृतराष्ट्र म्हणाला, कृष्णा, तूं, व या ऋषींनीं, जें भाषण केलें, तें अक्षरशः सत्य असून हितकारकहि आहे, व माझ्या मनांत शमच कर्तव्य आहे; परंतु हा दुष्ट दुर्योधन माझें ऐकत नाहीं; तर यास तूं तरी कांहीं सांगून पहा. तेव्हां कृष्ण दुर्योधनास म्हणतात दुर्योधना, पांडवांस अर्धराज्य देणें योग्य आहे व त्यांत तुझी मानहानिही नाहीं; कशी म्हणशील तर, धृतराष्ट्र हाच महाराजा राहून, तूं युवराजा आहेस तसाच राहशील. यास्तव पांडवांशीं निरर्थक वैर वाढवूं नको. तुझ्या पक्षाचे भीष्मादिक जे महान् महान् योद्धे आहेत, ते शमच करूं इच्छितात. केवळ क्षुद्र जे कर्ण, सौबलादिक, ते इच्छीत नाहींत. व त्यांच्या भरंवशावर राहून तूं पांडवांस जिंकीन म्हणतोस, परंतु पांडव एकापेक्षां एक अधिकाधिक पराक्रमी आहेत, त्यांशीं वैर करून तूं वांचशील असें कधींच होणार नाहीं. याकरितां आपल्या मातापितरांचें ऐक, व युद्धापासून निवृत्त हो, म्हणजे त्यांत सर्वांचेंही कल्याण होईल ( भार० उद्योग० अ० १२४ ).

कृष्णाचें भाषण झाल्यावर, भीष्मद्रोणांनीं असाच दुर्योधनास उपदेश केला, आणि म्हणाले, कृष्णाचें म्हणणें तूं ऐकावेंस यांतच तुझें बरें आहे. विदुर म्हणाला, दुर्योधना, अरे, हे सर्व काय म्हणतात इकडे लक्ष्य दे, आग्रह धरूं नको. तुला असें वाटत असेल कीं, मी युद्ध करूं नये म्हणून माझे, हे सर्व असें आर्जव करीत आहेत; परंतु तुला पक्कें ठाऊक असूं दे, युद्धांत तुलाच पांडव जिंकितील, व तूंच त्यांत मरशील. काय सांगूं दुर्योधना, तूं मेल्याचें मला किमपि दुःख नाहीं; परंतु धृतराष्ट्र आणि गांधारी, वृद्धपणीं अनाथ व दुःखित होऊन, त्यांस पृथ्वीवर भिक्षावृत्तीनें उपजीवन करीत हिंडावें लागेल, तें मनांत येऊन दुःख वाटतें. यास्तव पांडवांकडे जा, आणि शम कर. ( भार० उद्योग० अ० १२५-१२६ ).

सर्वांचीं भाषणें झाल्यावर दुर्योधन कृष्णास म्हणाला, तुम्ही सर्वजण पांडवांचा पक्ष धरून मलाच दोष देतां; परंतु त्यांचा अपराध मी कोणता केला ? पांडवांनीं शकुनीशीं द्यूत खेळून आपली संपत्ति हरविली; आणि तेच स्वप्रतिज्ञापालनार्थ वनवासास गेले, यांत माझा अपराध काय ? आतां पांडवांस शरण जाणें, हें तर दूरच आहे, परंतु मी जिवंत आहें तोपर्यंत त्यांस मजपासून सुईच्या अग्रावर येणाऱ्या मृत्तिकेइतकीही भूमि मिळणार नाहीं. ( अ० १२७ ).

या दुर्योधनाच्या भाषणानें कृष्णास पराकाष्ठेचा संताप येऊन, तो त्यास म्हणाला, मूर्खा, आम्हास म्हणतोस कीं, तुम्ही सर्व पांडवांचा पक्ष धरून बोलतां, व मी अपराध काय केला ? परंतु मूढा, तूं त्यांचा परम अन्यायी आहेस. भीमास वीष कोणीं घातलें ? लाक्षागृहांत घालून त्यांस दग्ध करण्याचा यत्न कोणीं केला ? इंद्रप्रस्थास त्यांना कोणीं घालविलें ? द्यूत खेळण्यास पांडव आपण होऊन आले कीं, तूं आणलेंस? सभेंत द्रौपदीचा छळ कोणीं केला ? इतकें असून त्यांनीं स्वपराक्रमानें मिळविलेली संपत्ति, देणार नाहीं म्हणतोस हें म्हणण्यास तुला मूर्खा, लाज कशी वाटत नाहीं ! ! इतकें असून वृद्धवृद्धांचें ऐकत नाहींस, याहून आतां मोठा अपराध तो कोणता ? पण दुर्योधना, स्मरण धर, तूं लवकरच नाश पावशील. असें कृष्णाचें भाषण ऐकून दुःशासन भयभीत होत्साता, त्यानें दुर्योधनास सभेंतून उठण्याचा संकेत केला, त्याबरोबर दुर्योधन व त्याचे पक्षपाती सर्व उठले. तें पाहून भीष्म म्हणाले, हा दुर्योधन अर्थलोभी, व मानी झाला आहे, आणि हे सर्व राजे त्यासच अनुसरतात; तस्मात् क्षत्रियकुलांचा विनाशकाल निश्चयेंकरून समीप आला यांत संदेह नाहीं. तें ऐकून पुनः कृष्ण म्हणाला, कंसास मारून सर्व आम्ही यादव जसे सुखी झालों, असेंच दुर्योधन व तत्पक्षपाती यांस तुम्ही कराल, तर सर्व क्षत्रिय वांचून तुम्ही सुखी व्हाल. त्यावरून दुर्योधन तत्काळ तेथून पळाला. नंतर दुर्योधनास गांधारीनेंही बोध केला कीं, हे सर्व जें कांहीं सांगतात, त्याचें उल्लंघन करून नाश पावूं नको. भीष्मादिक जरी तुजकडे आहेत, असें तुला वाटतें, तरी ते तुजकरितां झटून युद्ध करतीलच असें समजूं नको. पांडवांस आजपर्यंत छळिलेंस इतकेंच पुरे, आतां त्यांचा त्यांस भाग दे, व सुखानें राहा ( अ० १२९ ).

या गांधारीच्या हितकारक वाक्यास दुर्योधन मान्य न करितां उठून बाहेर गेला, व कृष्णास बंधन करण्याचा विचार करूं लागला. तें वर्तमान सात्यकीस कळून, त्यानें सभेंत येऊन तो विचार कृष्ण व इतर

सभासद यांस कळवितांच, कृष्ण म्हणाला, असें आहे तर, मी आतांच त्यास व त्याच्या पक्षपात्यांस बांधून पांडवांकडे नेतों. त्यावरून धृतराष्ट्रानें विदुराकडून, त्यास पुनः सभेंत बोलावून आणिलें, व अत्यंत निर्भर्त्सना करून म्हटलें, मूर्खा, कृष्णाशीं अन्यथा विचार मनांत आणणें तुला श्रेयस्कर नाहीं. अशा नीच कृत्यानें तूं सत्वर नाश मात्र पावशील ( अ० १३० ).

इतक्यांत, कृष्णानें तेथें, लोकपालासहित आपलें दिव्यरूप प्रकट करून सर्वांस प्रदर्शित केलें, व तें अंध धृतराष्ट्रासही दाखवून त्याचा उपसंहार केला. सारांश कृष्ण सभेंतून उठला, व रथारूढ झाला, तेव्हां धृतराष्ट्र म्हणाला, कृष्णा, शमाविषयींच माझा अभिप्राय आहे. परंतु हा दुष्ट पोर माझें ऐकत नाहीं, याला माझा उपाय नाहीं. त्यावरून कृष्णानें सर्व कौरवांस अनुलक्षून अत्यंत मोठ्यानें भाषण केलें कीं, अहो, सर्वांनीं ऐकावें, मीं तुम्हां सर्वांसमक्ष दुर्योधनास नीति सांगितली, ती न ऐकतां, तो उलटा मलाच बंधन करावयास सिद्ध झाला, आणि धृतराष्ट्र तर म्हणतो माझा उपाय नाहीं, त्यावरून मी,पांडवांकडे जाण्यास सर्वांचा निरोप घेतों. इतकें बोलून तो विदुरगृहीं गेला. ( अ० १३१ ).

विदुरगृहीं कृष्ण येऊन कुंतीस भेटला, व सभेंत झालेलें सर्व वृत्त तिला कळवून, त्यानें पांडवांकडे परत जाण्यास तिला आज्ञा मागितली. तेव्हां कुंतीनें कृष्णाबरोबर पांडवांस निरोप सांगून धाडला. तो असा,— पांडवहो, तुम्ही क्षत्रिय आहां, त्या अर्थी तुम्हीं युद्धच करून संपत्ति मिळवावी, आणि धर्मानें प्रजेचें पालन करावें.यासाठीं तिनें विदुलाख्यान सांगितलें ( विदुला श० ). नंतर तिनें पृथक् पृथक् सर्वांस आशीर्वाद सांगून कृष्णास निरोप दिला.

नंतर कृष्ण हस्तिनापुराहून निघाला असतां, त्यास पोहोंचविण्यास भीष्मादिक मंडळी निघाली, त्यांत कर्णही पोहोंचविण्यास होता. तेव्हां कृष्णानें सर्वांस निरोप देऊन, कर्णास आपल्या रथांत घेतलें, व त्याचा बुद्धिभेद करून पाहिला; परंतु तो वश झाला नाहीं. ( १ कर्ण श० पहा ). नंतर कर्ण माघारा फिरला असतां, कृष्ण उपप्लव्य येथें युधिष्ठिराकडे परत आला, आणि त्यास सर्व वृत्त कळवून, युद्धाची सिद्धता करविली, व कुरुक्षेत्रास घेऊन आला ( भार० उद्योग० अ० १५० ).

पुढें भारती युद्ध आरंभलें असतां, कृष्ण पांडवांकडे राहून, त्यानें अर्जुनाचें सारथ्य अठरा दिवसपर्यंत स्वीकारिलें. त्यांत त्यानें प्रसंगानुरूप कोठें युक्ति, व कोठें अद्भुतशक्ति यांची योजना करून अठरा दिवसांत पृथ्वीस भारभूत संपूर्ण दुष्ट राजांचा संहार करून पांडवांस वांचविलें, व त्यांचें राज्य त्यांस देऊन, द्वारकेस जाण्यास निघाला. इतक्यांत उत्तरेनें अश्वत्थाम्याच्या अस्त्रापासून गर्भाचें संरक्षण करण्याची प्रार्थना केल्यावरून, तिच्या संरक्षणार्थ आपलें चक्र ठेवून, द्वारकेस गमन केलें ( २ उत्तरा श० पहा ).

कृष्ण द्वारकेंत असतां, एकदां सूर्यग्रहणपर्व आलें. त्यावरून स्यमंतपंचकास जाण्याचा निश्चय करून, यानें द्वारकेच्या संरक्षणार्थ, अनिरुद्ध व कृतवर्मा यांस ठेविलें, व संपूर्ण यादव, तशाच स्त्रिया यांसहित स्यमंतपंचक क्षेत्रास हा आला, तों इकडे पांडवही तेथें गेले. नंतर सर्वांच्या भेटी होऊन, द्रौपदी आणि कृष्णाच्या आठ मुख्य स्त्रिया, यांचीं परस्पर स्वयंवरविषयक भाषणें झालीं ( भाग० १० स्कं० अ० ८२–८३ ). याच पर्वनिमित्तानें येथें कृष्णद्वैपायन, नारद, च्यवन, असित, देवल, विश्वामित्र, शतानंद, भरद्वाज, गौतम जामदग्न्य, राम, वसिष्ठ, गालव, भृगु, पुलस्त्य, कश्यप, आत्रि, मार्कंडेय, अगस्त्य, याज्ञवल्क्य इत्यादिक ऋषिही आले होते. त्यांची आदरसत्कारपूर्वक व्यवस्था, वसुदेवानें उत्तम प्रकारें करून ठेवून, एके दिवशीं त्यानें त्यांस कांहीं कर्मविषयक प्रश्न केला. त्याचें उत्तर त्यांनीं देऊन वसुदेवास यज्ञ करण्यास सांगितलें, त्यावरून तो यज्ञ त्यानें तेथेंच केला. नंतर समाप्तिकाळीं ऋषींचा सत्कार करून मार्गस्थ केलें. या कृत्यास तीन महिने लागले. तोंपर्यंत पांडवांस ठेवून घेतलें होतें. पुढें पांडव हस्तिनापुरास गेले, व कृष्णबलराम परिवारासहित द्वारकेस आले ( अ० ८४ ).

पुढें देवकीचे मृत झालेले साहा पुत्र, यांस एक वेळ पाहावें अशी तिला इच्छा झाली असतां, कृष्णानें ते तिला दाखविले, त्यांचीं नांवें काय इ०कांविषयीं ( १ ऊर्णा० श० पहा ). कांहीं काळानें कृष्ण, मिथिला नगरींत राहाणाऱ्या श्रुतदेव ब्राह्मणाच्या भेटीस गेला; कारण तो ब्राह्मण महान् ब्रह्मनिष्ठ असलेला, बहुलाश्व जनकास विदित नव्हता, तो त्यास विदित होऊन, आपणासही त्याचें दर्शन व्हावें. नंतर कांहीं काल तेथें राहून, पुनः कृष्ण द्वारकेस आला ( भाग० १० स्कं० अ० ८६ ).

कृष्णाची व पांडवांची जेव्हां जेव्हां भेट होई, तेव्हां तेव्हां कृष्ण, युधिष्ठिर आणि भीमसेन यांस वंदन करी.

अर्जुनाचें व याच परस्पर आलिंगन होई, व नकुल-सहदेव हे दोघे, यास वंदन करीत. यावरून हा, कोणाहून कनिष्ठ, कोणाहून ज्येष्ठ, व कोणाचा समवयी होता, हे उघड दिसून येतें. तथापि याची योग्यता फार मोठी आहे, असें युधिष्ठिर व भीमसेन समजत असत. हें नवल नाहीं; तर भीष्मही यास अत्यंत पूज्य-बुद्धीनें समजून मानीत असे ( भार० शांति० अ० ५१ श्लो० २९ पहा ).

कृष्णाची आकृति अतिउच्च, ऱ्हस्व, स्थूल किंवा कृश, अशी नसून मध्यम प्रकारची होती. याचे नेत्र कमलासारखे विस्तीर्ण, नासिका सरळ, अंगकांति अतसी कुसुम ( जवसाचें फूल ) त्याप्रमाणें श्यामवर्ण असे. पीतवस्त्र वापरणें त्यावर याची अत्यंत प्रीति असून, याच्याप्रमाणें अध्यात्मविद्यापारंगत त्या वेळेस क्षत्रियांत कोणी नव्हता असें म्हटलें तरी चालेल. यास राजसूययज्ञांत, व्यासादिकांच्या संमतीनें युधिष्ठिरा-कडून अग्रपूजेचा मान मिळाला होता. त्यावरून, कित्येक प्रसंगांतील अलौकिक कृत्यांवरून, व महा-भयंकर भारती युद्धांत स्वतः शस्त्र न धरितां, शस्त्राऽस्त्रां-पासून व्यथित न झाल्यावरून, याचें इतर मनुष्यांहून वैलक्षण्य स्पष्ट होतें. तथापि हा स्नानसंध्यादिक नित्य-कर्म, आणि उपमन्यु ऋषीपासून घेतलेल्या दीक्षेप्रमाणें ईश्वरोपासन, हें करण्यांत वेळच्या वेळीं पराकाष्ठेचा तत्पर असे. यानें या भरतखंडांत अवतरून, यास जीं दुष्टवधादि कृत्यें करावयाचीं होतीं, तीं सर्व यानें करून निजधामास जाण्याचें मनांत आणिलें असतां, देवांनींही यास येऊन तेंच सुचविलें. त्यावरून हा, यादवकुळ कसें संहार पावेल त्याचें चिंतन करूं लागला.

तदनंतर असें झालें कीं, कांहीं यादवांचीं मुलें एके काळीं पिंडारकक्षेत्रीं गेलीं होतीं, तेथें त्यांस मोहेंकरून दुर्बुद्धि उत्पन्न होऊन त्यांनीं आपल्यांतून सांब ना० एका यादवास गर्भिणी स्त्रीचा वेष दिला, आणि तेथें समीपच ऋषि होते त्यांकडे जाऊन त्यांस ते पुसूं लागले कीं, या स्त्रीस काय होईल तें सांगा. तेव्हां त्यांनीं कोपेंकरून सांगितलें, अरे ऐका, हिला एक लोहमय मुसळ होईल, व त्यापासून तुम्ही सर्व यादव संहार पावाल. अशी ऋषींची वाणी श्रवण करून सर्व मुलें भिऊन तेथून पळालीं, व स्त्रीवेष काढून पाहा-तात तों सांबाच्या वस्त्रांतून ऋषिवचनाप्रमाणें लोह-मुसळ खालीं पडलेलें त्यांच्या दृष्टीस पडलें. त्यावरून त्यांस पराकाष्ठेचें भय उत्पन्न होऊन, तीं सर्व तें मुसळ घेऊन उग्रसेन आणि वसुदेव यांजवळ जाऊन, त्यांनीं त्यांस आपण केलेलें अनुचित कर्म साकल्य निवेदन केलें. तेव्हां त्या वृद्धांनीं, असें मुलांचें कृत्य, कृष्ण आणि बळराम यांस कळल्यास ते पोरांस मोठी शिक्षा देतील या भीतीनें त्यांस न कळवितां, तें मुसळ त्यांनीं त्याच पोरांकडून समुद्रतीरीं मुकाट्यानेंच दगडा-वर घांसघांसून झिजविलें, व शेवटीं लहानसा तुकडा राहिलेला समुद्रांत फेंकून देवविला.

इकडे देवांनीं कृष्णास निजधामास येण्याची के-लेली सूचना, उद्धवानें श्रवण केल्यावरून त्यानें कृ-ष्णास मला समागमें न्यावें म्हणून प्रार्थिलें. त्यावरून त्यास त्यानें अध्यात्मविद्योपदेश केला ( २ उद्धव श० पहा ). पुढें द्वारकेंत दुश्चिन्हें होऊं लागलीं असें पाहून स्त्रिया व वृद्ध शिवाय करून सर्व यादवांस कृ-ष्णानें शंखोद्धारतीर्थी पाठविलें, व आपण बलरामा-सहित प्रभासास गेला. शंखोद्धारास गेलेले यादव बराच काळ तेथें राहिले असतां, एकदां क्रीडा करतां करतां, त्यांस मद्यपान करावें अशी बुद्धि उत्पन्न झाली. तीवरून सर्वांनीं मद्यपान केलें, व खेळतां खेळतां त्या धुंदींत कलहास आरंभ होऊन सर्वहि युद्धास प्रवृत्त झाले. त्यांत एकानें एकाचा वध केलेला पाहून, त्यांच्या पक्षपात्यानें यास मारिलें. तों याचा पक्षपाती उठून त्यानें त्यास मारिलें. अशा प्रकारें तें युद्ध चेतून, दाशार्ह, वृष्णि, अंधक, भोज, सात्वत, मधु, अर्बुद, माथुर, कुकुर, कुंति इ० सर्व यादवकुळें आप-आपणांत युद्ध करून एका प्रहर दोन प्रहरांत सर्व नष्ट झाली. हें वर्तमान बलराम आणि कृष्ण यांस विदित होतांच, बलरामानें योगधारणेनें आपला देह समुद्र-तरीं टाकिला ( बलराम श० पहा ).

असें बलरामाचें निर्याण पाहून, कृष्णही एका अ-श्वत्थवृक्षाखालीं, उजव्या मांडीवर डावा पाय ठेवून, त्यास टेकून बसला, व नेत्र लावून स्वकीय मूळ रूपानें चिंतन करीत आहे तों, कोणी एका जरा ना० व्याधास कृष्णाविषयीं मृगाची भ्रांति होऊन, त्यानें जो लांवून बाण मारिला तो याच्या डाव्या तळपायास लागला. कांहीं अवकाशानें तो जवळ येऊन पाहतो तों त्यानें कृष्णास पाहिलें. त्यावरून आपला बाण यास लागला हें चां-गलें झालें नाहीं, म्हणून तो समीप येऊन दुःख करूं लागला, व त्यानें झालेल्या अपराधाची कृष्णाजवळ क्षमा मागितली. तेव्हां कृष्णानें त्याचें सांत्वन करून, त्यास दिव्यलोकीं विमानांत घालून पाठविलें ( २ जरा श० पहा ).

इतक्यांत कृष्णाचा दारुक सारथि, कृष्ण आज

रथांत न बसतां, पायानेंच कोणींकडे गेला म्हणून रथ सिद्ध करून शोध करीत चालला आहे तों, त्यानें एकाएकीं वृक्षास टेंकून बसलेल्या कृष्णास पाहिलें. त्यावरून तो समीप येऊन रथाखालीं उतरला, आणि कृष्णास वंदन करीत आहे तों, मागें रथ सोडलेला एकाएकीं अदृश्य झाला. कृष्णानें दारुकास पाहून म्हटलें, दारुका, आतां माझा स्वधामास जाण्याचा काळ समीप आहे, तर तूं द्वारकेंत जा, आणि संपूर्ण यादवांचा संहार, बलरामाचें निधन, आणि माझें निर्याण, उग्रसेनादिकांस सांगून त्यांस द्वारका सोडून तिच्या बाहेर सत्वर पडण्याची त्वरा करीव. मी द्वारका सोडिली असल्यामुळें तिला आतां समुद्र बुडवील यास्तव हें तुला सांगण्याचें कारण होय असें समज. अवशेष माझीं मातापितरें व स्त्रिया, यांस अर्जुन इंद्रप्रस्थास नेत्रो. इतकें बोलणें होईपर्यंत दारुकानें मागें पाहिलें नव्हतें, त्यामुळें रथ अदृश्य झालेला त्यास विदित नव्हता. तों एकाएकीं त्यानें मागें पाहिलें असतां, रथ नाहीं असें पाहून, त्यास विस्मय होत्साता अनिवार दुःख झालें. त्यावरून कृष्णानें त्याचें सांत्वन केलें, व शोक टाकून उपरम पाव, असें बोलून त्यास सत्वर जाण्याची आज्ञा दिली. तेव्हां दारुक कृष्णास वंदन करून तेथून मोठ्या दुःखानें निघाला, व वारंवार कृष्णाकडे पाहात पाहात त्यानें द्वारकेचा मार्ग धरिला.

दारुक गेला, व तो दिसेनासा झाला असें पाहून, कृष्णानें योगधारणा केली, व स्वरूपाचा अवलंब केला. इकडे दारुकानें येऊन कृष्ण, बलराम व संपूर्ण यादव यांचें निधन उग्रसेनादिकांस कळवितांच, द्वारकेंत एकच अनर्थ झाला. नंतर सर्वांहि निघून प्रभासास आले. येतांच वसुदेव, देवकी व रोहिणी, यांनीं आपआपले देह तत्काळ टाकिले. कृष्णाच्या अष्टनायिकांनीं कृष्णदेहासमागमें अग्निप्रवेश केला, व प्रद्युम्नादिकांच्या स्त्रियांनींहि शंखोद्धारतीर्थी जाऊन, आपआपले पति ओळखून, त्यांसह तसेंच केलें. इतक्यांत अर्जुन इंद्रप्रस्थाहून येऊन पोहोंचला, मग त्यानें परमदुःखानें सर्वांची सांपरायिक क्रिया करून, अवशेष स्त्रिया व बालकें यांस घेऊन इंद्रप्रस्थाचा मार्ग धरिला असतां, द्वारका समुद्रानें बुडवली. ( भार० मौसल० अ० ७ ). कृष्ण निजधामास गेला, त्याकाळीं त्याचें वय एकशें पंचवीस वर्षांजवळजवळ होतें.

५–शुकाचार्यास पीवरीपासून झालेल्या चार पुत्रांतील एक

६–पंडुपुत्र अर्जुनाच्या दाहा नांवांतील एक नांव.

७–एक ऋषि. ( भार० शांति० अ० ४७ ).

**कृष्णद्वैपायन**––मैत्रावरुणि जो वसिष्ठऋषि, त्याच्या शक्ति ना० पुत्राचा पौत्र, व पराशर ऋषीचा पुत्र. हा उपरिचर नामांतरानें प्रसिद्ध जो वसु राजा, त्याच्या वासवी ना० धीवरासमीप ठेविलेल्या कन्येच्या ठायीं, तिच्या कौमारदशेंत पराशर ऋषीपासून झाला होता. आणि त्याच कारणामुळें यास पाराशर्य असें म्हटलेलें आहे. दुसरें यास द्वैपायन असेंहि नांव आढळतें. त्याचें कारण यमुना नदी कृष्णवर्ण असून, तिच्या ठायीं असणाऱ्या द्वीपांत याचें जन्म झालें होतें, म्हणून यास द्वैपायन अ० कृष्णद्वैपायन असें म्हटलेलें आहे ( भार० आदि० अ० ६० ). तसेंच बदरीवनांत तप करण्यानें बादरायण असेंहि म्हणत असत.

याचें जन्मः चालू वैवस्वत मन्वंतराच्या अठ्ठाविसाव्या पर्ययांतील ( चौकडींतील ) द्वापारयुगांत कृष्णावताराच्या पूर्वी झालें होतें. ( भाग० १ स्कं० अ० ३ ) व हा सांप्रतच्या पर्ययांतील व्यास आहे ( व्यास श० पहा ). वेदविस्तार करणारास व्यास असें म्हणण्याचा प्रघात आहे, यास्तव तें नांव साधारण असून इतर स्वयंभुवादिकांस जसें चालत असे, तसेंच यासही चाललें आहे; परंतु तें याचें विशेष नांव नव्हें. तर मग यास व्यास असें कां म्हटलें? ही शंका होईल, त्यास असें समजावें कीं, यानें कांहीं लुप्त वेदशाखांचें उद्घाटन केलें म्हणून याला तें नांव पडलें.

**श्लोक.**

द्वापरे समनुप्राप्ते तृतीये युगपर्यये
जातः पराशराद्योगी वासव्यां कलया
हरेः॥ ( भाग० १ स्कं० अ० ४ श्लोक १४ ).

या वाक्यावरून तिसऱ्या युगपर्ययांत कृष्णद्वैपायन व्यास झाला होता असें दिसतें; परंतु त्या पर्ययांत उशना नांवाचा व्यास होता.

**श्लोक.**

ब्रूहि सूत महाभागा व्यासाः पूर्व-
युगोद्भवाः॥ वक्तारस्तु पुराणानां द्वापरे
द्वापरे युगे ॥ २५ ॥ द्वापरे प्रथमे
व्यस्ताः स्वयं वेदाः स्वयंभुवा ।। प्रजा-
पतिर्द्वितीये तु द्वापरे व्यासकार्यकृत
॥ २६ ॥ तृतीये चोशना व्यासश्चतुर्थे
तु बृहस्पतिः ॥ इत्यादि. म्हणून—
मन्वंतरे सप्तमेत्र शुभे वैवस्वताभिधे ॥
अष्टाविंशतिमे प्राप्ते द्वापरे मुनिसत्तमाः॥

व्यासः सत्यवतीसूनुर्गुरुर्मे धर्मवित्तमः॥
एकोनात्रिंशे संप्राप्ते द्रौणिर्व्यासो भवि-
ष्यति ॥ २२-२३ ॥ ( देवी भा० १ स्कं० अ० ४).

तर मग वरील पहिल्या वाक्याची वाट काय ? त्यास तो पाठ चुकला असून अंधपरंपरेनें चालत आला आहे असेंच म्हटलें पाहिजे, दुसरा उपाय नाहीं; कारण पर्यय म्ह० चौकडी हा अर्थ प्रधान व सर्वसंमत आहे. तृतीययुगपर्यय म्ह० तिसरें युग द्वापर, असा अर्थ लोक लावोत, पण तो व्यापक अर्थ नव्हे.

आतां, वेदाचे ऋगादि चार भेद यानें केले किंवा पूर्वींचे आहेत त्यांविषयीं पाहूं गेलें तर असें आढळतें कीं, "अवतीर्णो महाभागो वेदं चक्रे चतुर्विधम् ॥ तथा वेदतरोः शाखा दृष्ट्वा पुंसोल्पमेधसः असें" भागवत द्वादशस्कंध अ० ६ आणि तृतीय स्कं० अ० ३ यांत आहे; परंतु "द्वापरे प्रथमे व्यस्ताः स्वयं वेदाः स्वयंभुवा" या देवीभागवतांतील वाक्यावरून वेदाचे ऋगादि चार भेद मन्वंतरारंभींचेच किंवा अनादित आहेत असें सिद्ध होतें, यास प्रमाण असें आहेः—

भागवतोक्त प्रथम पक्षावरून कृष्णद्वैपायनानेंच वेदाचे चार भाग जर केले आहेत, तर संपूर्ण ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, आणि अथर्वणवेद, यांचें क्रमानें अध्ययन करणारे पैल, वैशंपायन, जैमिनि, आणि सुमंतु, याचेच शिष्य असलेले म्हटले पाहिजेत. नंतर त्यांनीं आपआपल्या वेदामध्यें शाखा केल्या. अर्थात् यजुर्वेदांतर्गत तैत्तीर्यशाखा पढणारा तित्तिरिऋषि तो, याचा शिष्य जो वैशंपायन त्याचा शिष्य झाला, असें न्यायानेंच म्हणणें ओळीस आलें; परंतु तित्तिरि ऋषीचा पुत्र तैत्तिरि, तो याच्या वैशंपायन ना० शिष्याचा पूर्वज होता. असें पहिल्या उपरिचर राजाच्या यज्ञांतील सोळा ऋत्विजांचीं नांवें सांगतांना आलें आहे, तें वाक्य असें:—

**श्लोक.**

आद्यः कठस्तैत्तिरिश्च वैशंपायनपू-
र्वजः ॥ कण्वोथ देवहोत्रश्च एते
षोडश कीर्तिताः ॥ ( भार० शांति० अ० ३३६ श्लोक० ९ ).

यावरून तित्तिराचा पुत्र तैत्तिरी ऋषि, व कण्व-ऋषि आदिकरून प्राचीन असल्यामुळें वेदाचे विभाग, व तदंतर्गत शाखा, ह्या व्यासानें केलेल्या नव्हत. फार तर काय, पण तैत्तीर्यशाखांतर्गत आपस्तंब ऋषि, तो सुद्धां अति पुरातन आहे, मग हे आहेत हें काय बोलावें ? ( अपस्तंब श० पहा ).

दुसरें, अध्यात्मरामायण यानें रचिलेलें असून, त्यांत रामचंद्र लक्ष्मणास गीता सांगत असतां, जें कांहीं बोलला, त्याचा यानें अनुवाद असा केला आहेः—

**श्लोक.**

सा तैत्तिरीयश्रुतिराह सादरं न्यासं
प्रशस्ताखिलकर्मणां स्फुटम् ॥ एताव-
दित्याह च वाजिनां श्रुतिर्ज्ञानं विमो-
क्षाय न कर्मसाधनम् ॥ ( अध्या० रा० उत्तर० स० ५ श्लो० २१ ).

यावरून रामावतार याच्या पूर्वींचा असतां, जर त्या वेळच्या वाक्याचा अनुवाद, कृष्णद्वैपायन व्यास हा जर अशा रीतीनें करितो, तर शाखा, व ऋगादिक वेदाचे विभाग, ते पूर्वींचेच असें उघड सिद्ध होतें. असो. यानें पुराणें व महाभारत नांवाचा इतिहास रचला. यास वेदपरंपरा चालवणारे पैलादिक चार शिष्य असून, पुराणपरंपरा चालविणारा रोमहर्षण नांवाचा एक शिष्य होता. याशिवाय आसित आणि देवल, असेही याचे दोन शिष्य होते. ( देवीभा० १ स्कं० अ० २ श्लो० ४६ ).

याचें जन्म मातेच्या गर्भांत नऊ मास राहणें इ० प्रकारांनीं झालें नाहीं, म्हणून हा जन्मतांच, स्मरण करशील तेव्हां प्रकट होईन, असें वरप्रदान आपल्या सत्यवती अ० वासवी मातेस देऊन, लागलाच तप करण्यास गेला. पुढें यानें सत्यवतीनें स्मरण केलें असतां, छिन्न झालेला शंतनूचा वंश वृद्धिंगत केला. हा कल्पपर्यंत चिरजीवी असून, पुढें सावर्णि मन्वंतरांत बादरायण नांवानें सप्तर्षींतील एक ऋषि होणार आहे ( २ सावर्णि श० पहा ). यास शुक म्हणून, उत्तम ब्रह्मतत्त्वसंपन्न एक पुत्र होता.

**कृष्णपराशर**—पराशरकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि व त्याचें कुल. याच्या कुलांत कार्ष्णायन, कपिमुख, काकेयस्थ, अजः—पाति आणि पुष्कर, हे मुख्य ऋषि होते.

**कृष्णवेणा-वेणी**—भारतवर्षीय नदी (सह्याद्रि श० पहा).

**कृष्णा**—भारतवर्षीय नदी ( सह्याद्रि श० पहा ).
२—द्रौपदीस नामांतर.

**कृष्णानुभौतिक**—सप्तमार्थक कृष्णशब्द पहा.

**केकय**—भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा, आग्नेयकोसलाच्या उत्तरेस असावा. येथील राजांस केकय हें नांव साधारण असत असे; परंतु अंतर्गत नांव प्रत्येकाचें भिन्न भिन्न असे. दशरथाच्या वेळीं येथें अश्वपति नांवाचा राजा असून त्याची कन्या कैकेयी, तीच दशरथाची स्त्री होती. पांडवांच्या वेळेस येथील राजा धृष्टकेतु

होता. ( ३ धृष्टकेतु श० पहा ). याची राजधानी गिरिव्रज नगर.

२–केकयदेशाधिपति एक राजर्षि. याचें मूळ नांव काय, व हा कोणत्या वेळीं होता त्याचा उल्लेख ग्रंथांत कोठें सांपडत नाहीं. परंतु हा, उत्तम प्रकारच्या नीतीनें राज्य करणारा होता असें दिसतें. याविषयीं इतिहास (भार० शांति० अ० ७७ ) यांत असा आढळतो कीं, एके काळीं हा राजा मृगयेस गेला असतां, यास अरण्यांत रहाणाऱ्या एका राक्षसानें पाहिलें, व यास धरावें अशा बुद्धीनें यावर धांवला; परंतु राजा धैर्यानें उभा राहून त्याशीं याप्रमाणें बोलूं लागला.–हे राक्षसा, माझ्या अंगास स्पर्श करूं नको, दूर उभा रहा, व मी काय म्हणतों तें ऐक.

**श्लोक.**

न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यपः ॥ नानाहिताग्निर्नायज्वा मामकांतरमाविशः ॥ ८ ॥ अधीयंतेऽध्यापयंति यजंते याजयंति च ॥ ददाति प्रतिगृण्हंति षट्सु कर्मव्यवस्थिताः ॥ ११ ॥ न याचंति प्रयच्छंति सत्यधर्मविशारदाः ॥ नाध्यापयंत्यधीयंते यजंते याजयंति न ॥ १३ ॥ ब्राह्मणान् परिरक्षंति संग्रामेष्वपलायिनः ॥ क्षत्रिया मे स्वकर्मस्था मामकांतरमाविशः ॥ १४ ॥ कृषिगोरक्षवाणिज्यमुपजीवंत्यमायया ॥ मम वैश्या स्वकर्मस्था मामकांतरमाविशः ॥१६॥ त्रीन्वर्णानुपजीवंति यथावदनुसूयकः ॥ मम शूद्रा स्वकर्मस्था मामकांतरमाविशः ॥ १७ ॥ नासंविभज्य भोक्तास्मि नाविशामि परस्त्रियम् ॥ स्वतंत्रो जातु न क्रीडो मामकांत० ॥ २१ ॥ नाब्रह्मचारी भिक्षावान् भिक्षुर्वाब्रह्मचर्यवान् ॥ अनृत्विजाहुतं नाति मामकां० ॥ २२ ॥ नावजानाम्यहं वेद्यान्न वृद्धान्न तपस्विनः ॥ राष्ट्रे स्वपतिजागर्मि मामकांतर० ॥ २३ ॥ आत्मविज्ञानसंपन्नस्तपस्वी सर्वधर्मवित् ॥ स्वामी सर्वस्य राष्ट्रस्य धीमान्मम पुरोहितः ॥ २४ ॥ दानेन विद्यामाभिवांच्छयामि सत्येनार्थं ब्राह्मणानां च गुप्त्या ॥ शुश्रूषया चापि गुरूनुपैमि न मे भयं विद्यते राक्षसेभ्यः ॥ २५ ॥ न मे राष्ट्रे विधवा ब्रह्मबंधुर्न ब्राह्मणः कितवो नोतचोरः ॥ अयाज्ययाजी न च पापकर्मा न मे भयं विद्यते राक्षसेभ्यः ॥ २६ ॥ यस्मात्सर्वास्ववस्थासु धर्ममेवान्ववेक्षसे ॥ तस्मात्प्राप्नुहि कैकेय गृहं स्वस्ति व्रजाम्यहम् ॥ २९ ॥ या श्लोकांतील सारांश—

राजा राक्षसास म्हणाला, माझ्या देशांत चोर, कृपण, मद्यपी, यजन न करणारा कोणी नाहीं. अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान, प्रतिग्रह, अशा षट्कर्मांनीं युक्त ब्राह्मण. अध्ययन, यजन, आणि दान, हीं तीनच कर्में करणारे व ब्राह्मणांचें संरक्षण करीत होत्साते युद्धांत पलायन न करणारे क्षत्रिय. कृषि, वाणिज्य, गोरक्षण, यांनींच निर्वाह करणारे वैश्य. तसेंच या तीन वर्णांची सेवाच करणारे शूद्र आहेत. इ० व्यवस्था मी ठेवीत असल्यामुळें, मला राक्षसांपासून भय नाहीं. त्यावरून राक्षस म्हणाला, राजा, जर तूं असाच आहेस, तर आपल्या घरीं स्वस्थ जा, मीही जातों.

३–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न शिबिराजाच्या पांच पुत्रांतील चौथा.

४– भारती युद्धांतलि पांडवपक्षीय, व दुर्योधनपक्षीय राजे ( भार० उद्यो० अ० १७१ आणि अ० १९५).

**केतु**–ऋषभदेवाच्या नऊ खंडाधिपति पुत्रांतलि एक ( ऋषभदेव श० पहा ).

२–तामसमनूच्या पुत्रांतील एक ( तामसमनु श०पहा).

३–दनुपुत्र दानवांतील एक ( दनु श० पहा ). हाच नवग्रहांतील एक असावा ( राहु श० पहा ).

४–भरतवर्षांतील एक खंड.

**केतुमती**–सुमाली राक्षसाची स्त्री, रावणाची मातामही. ( आईची आई ).

**केतुमान्**–दनुपुत्र एक दानव ( दनु श० पहा ).

२–मनुष्यजातीय पश्चिम दिग्पाल ( ३ पृथु श० पहा).

३–( सू० वं० ) नभगकुलोत्पन्न अंबरीष राजाच्या तीन पुत्रांतील मध्यम.

४–( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या कुलांत जन्मलेल्या धन्वंतरि राजाचा पुत्र. याचा पुत्र भीमरथ अ० भीमसेन.

५—निषादाधिपति भारतीयुद्धांतलि दुर्योधनपक्षीय राजा.

**केतुमाल**–आग्नीध्र राजाच्या नऊपुत्रांतील कनिष्ठ. याची

स्त्री मेरुकन्या देववीती असून, याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

**केतुमालवर्ष**–माल्यवान् पर्वत आणि क्षारसमुद्र, यांच्या मधील जंबुद्वीपाच्या नऊ वर्षांतील एक जो वर्षसंज्ञक भूभाग तो ( भार० भीष्म० अ० ६ श्लोक० ३१ ). ( भाग ५ स्कं० अ० १६ श्लोक० १०–११ ).

**केतुमाला**–काम्यक वनाच्या पश्चिम दिशेकडील एक नदी.

**केतुवर्मा**–त्रिगर्ताधिपति सूर्यवर्म्याचा भ्राता, यास अर्जुनानें मारलें. ( भार० अश्वमे० अ० ७४ ).

**केतुवीर्य**–एक दानव. ( दनु श० पहा ).

**केदार**–हिमालयावरील एक पवित्र स्थल.

२–एक राजर्षि. ( देवी भा० ९ स्कं० अ० ४२ ).

**केन**–सामवेदोपनिषत्.

**केरल**–इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेकडील एक महादेश. हा, पांडवांच्या वेळेस एक पादपुरुष देशाच्या दक्षिणेस होता. ( भार० सभा० अ० ३१ ). येथें पांडवांच्या किंचित् पूर्वी, चंद्रहासपिता सुधार्मिक तो राजा होता.

**केवल**–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न नर राजाचा पुत्र, याचा पुत्र बंधुमान्.

**केशिध्वज**–( विदे० वं० ) कृतध्वज जनकाचा पुत्र. याचा पुत्र भानुमान् जनक.

**केशिनी**–एक राजकन्या. हिच्या स्वयंवरकालीं प्रऱ्हादपुत्र विरोचन,आणि अंगिराऋषीचा पुत्र सुधन्वा हे दोघेही एकदांच येऊन पोहोंचले. तेव्हां त्या दोघांत श्रेष्ठ कोण असा वाद पडला, याविषयीं त्यांनीं आपआपले प्राण पणास लाविले. आणि उभयतांही प्रऱ्हादाकडे आले. तेव्हां प्रऱ्हादानें विरोचनाचा निषेध करून, सुधन्व्याचा पक्ष सत्य आहे असें सांगितलें, व विरोचनाच्या प्राणदानाविषयींची सुधन्व्यास प्रार्थना केली. त्यावरून सुधन्व्यानें विरोचनास प्राणदान दिलें असतां, हिचा विवाह त्याशीं झाला ( भार० उद्यो० अ० ३५ ).

२–एक अप्सरा ( प्राधा श० पहा ).

३–सूर्यवंशीय सगर राजाच्या दोन स्त्रियांतील एक. ही शिबिराजाची कन्या म्हणून शैब्या असें हिला नामांतर होतें. हिला भानुमती असेंहि नांव आढळतें.

४–सोमवंशीय पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, त्याच्या चार स्त्रियांतील एक ( ३ अजमीढ श० पहा ).

५–अयोध्यानगरी आणि भागीरथी नदी, यांमधील एक लहान नदी. ( वा० रा० उत्तर० स० ५१ ).

६–दमयंतीची दासी. ( ५ नल श० पहा ).

**केशी**–एक असुर. हा, उर्वशी व चित्रलेखा, या अप्सरांस घेऊन पळत असतां, यास मारून, त्यांस पुरूरवा ना० राजानें सोडविलें होतें. ( मत्स्य० अ० २४ ).

२–कोणीएका प्रजापतीच्या देवसेना, आणि दैत्यसेना ना० दोन कन्या हरण करून पळणारा असुर. त्यांतून दैत्यसेना यास वश झाली; परंतु देवसेना होईना, व ती रडूं लागली. त्यावरून इंद्रानें याचा पराभव करून, तिला यापासून सोडविलें. ( भार० वन० अ० २२३ ).

३–कंसपक्षीय एक राक्षस. हा अश्वाचें रूप धरून वृंदावनांत कृष्ण आणि गोपाळ यांस पीडा देण्यास गेला असतां, कृष्णानें यास मारिलें. ( भाग० १० स्कं० अ० ३७ ).

४–वसुदेवाची स्त्री कौशल्या तिचा पुत्र.

**केसरी**–एक वानर, अंजनेचा पति ( वा० रा० उत्तर० स० ६६ ). हा, गोकर्ण ना० पर्वतावर राहात असे. एकदां शंबसादन ना० एक असुर बलाढ्य होऊन त्यानें कित्येक ऋषींस बहुत त्रास दिला. त्यावरून ऋषींच्या आज्ञेनें यानें त्याशीं युद्ध करून त्याचा वध केला. तेव्हां ऋषींनीं संतुष्ट होऊन यास आशीर्वाद दिला होता कीं, तुला एक सुस्वभावी, भगवद्भक्त, आणि बलाढ्य असा पुत्र होईल. त्यावरून यास पुढें, मारुति हा तसाच पुत्र झाला ( वा० रा० सुंदर० स० ३५ ).

२–गद्गद वानराचा पुत्र, जांबवानाचा कनिष्ठ भ्राता.

**कैकरसप**–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**कैकसी**–सुमाली राक्षसाची कन्या, विश्रवा ऋषीची स्त्री ( २ विश्रवा श० पहा ).

**कैकेय**–द्वितीयार्थक केकय तोच.

**कैकेयी**–संजयराजाची स्त्री ( ७ संजय श० पहा ).

२–सूर्यवंशीय दशरथ राजाच्या मुख्य तीन स्त्रियांतील तिसरी. ही केकय देशींच्या अश्वपति राजाची कन्या असून आपल्या पतीस अतिशय प्रिय असे. दाशरथि रामास अरण्यवास, आणि दशरथास मृत्यु, असे प्राप्त होण्यास हीच कारण झाली होती. हिचा पुत्र भरत ( ३ दशरथ श० पहा ).

३–मत्स्यपति विराट राजाची स्त्री सुदेष्णा, ती केकयाधिपतीची कन्या म्हणून तिलाहि म्हणत असत. ( भार० विराट० अ० ९ ) यावरून हिचा भ्राता कीचक कैकेय होता.

**कैटभ**–मधु दैत्याचा अनुज ( मधुकैटभ श० पहा ).
**कैतव**–शकुनीचा पुत्र उलूक त्यासच नामांतर होतें ( भार० उद्योग० अ० १६३ ).
**कैरात**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).
**कैराति**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).
**कैलास**–शिवलोक. हा सत्यलोकांतच अंतर्भूत समजावा; कारण वेदामध्यें याचें पृथक् नांव नाहीं.
२–मेरूच्या परिस्तरणगिरींतील एक.
३–हेमकूट पर्वतावरील कुबेराचें स्थान.
४–हिमालयाचें एक शिखर.
**कैवल्य**–मुख्ययजुर्वेदोपनिषत्.
**कैशिक**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तत्कुलोत्पन्न ज्यामध राजाचा पौत्र, विदर्भ राजाच्या चार पुत्रांतील एक. याचा पुत्र चिदि.
**कोंकणदेश**–शूर्पारक शब्द पहा.
**कोकनद**–भारतवर्षीय देश ( भार० सभा० अ० २७).
**कोकामुख**–भारतवर्षीय तीर्थ.
**कोटरा**–बाणासुराची माता. ही बलीची दुसरी स्त्री, किंवा विंध्यावलीच हा निर्णय होत नाहीं ( भाग० १० स्कं० अ० ६३ श्लो० २०–२१ ).
२–देवतावि० (भाग० १० स्कं० अ० ६ श्लो० २८).
**कोटिक**–शिबिदेशाधिपति सुरथ राजाचा पुत्र. जयद्रथाचा मित्र. हा भीमाच्या हातून मरण पावला होता ( ३ जयद्रथ श० पहा ).
**कोटिकास्य**–कोटिकच.
**कोटितीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ.
**कोपचय**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा).
**कारकृष्ण**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).
**कोलगिरि**–कर्णप्रावरण देशाच्या दक्षिणेस असणारा एक सामान्य पर्वत.
**कोलापुर**–द्वितीयार्थक करवीर ( देवीभा० सप्तम० अ० ३८ ).
**कोलाहल**–एक सामान्य पर्वत (२ उपरिचर श० पहा).
**कोशा-षा**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी.
**कोसल**–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. याचे इंद्रप्रस्थ मध्य धरून पूर्व आणि दक्षिण असे दोन भेद पांडवांच्या वेळेस होते. त्यांत पूर्व कोसलाचे ईशान्य आणि आग्नेय कोसल असलेले दोन भेद त्या त्या अक्षरक्रमांत पाहावे.
**कौकुट्टक**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).
**कौकुर**–कुकुरवंशोत्पन्न कारस्कार राजा तोच.
**कौकुरुंडी**–उत्तम मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.
**कौचकी**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).
**कौचहस्तिक**–एक ब्रह्मर्षि (३ भृगु श० पहा ).
**कौटिल**– ,, ,,
**कौंडिन्य**–एक ब्रह्मर्षि. हा कुंडिनकुलोत्पन्न होय ( ३ वसिष्ठ श० पहा ).
२–युधिष्ठिराच्या अश्वमेधांतील एक सदस्य ( जैमिनी अश्व० अ० ६३ ).
**कौणकुत्स्य**–एक ऋषि. कुल आढळत नाहीं.
**कौंतल** अथवा **कौंतलका**–कुंतल राजाची नगरी ( १ चंद्रहास श० पहा ).
**कौतुजाति**–एक ब्रह्मर्षि ( नीलपराशर श० पहा ).
**कौंतेय**–कुंतीपुत्र युधिष्ठिर, भीमसेन, आणि अर्जुन, या तिघांस म्हणण्याची प्रवृत्ति.
**कौत्स**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ). भृगुवंशीय भगीरथ राजानें यास आपली कन्या हंसी भार्यार्थ दिली होती ( १ भगीरथ श० पहा ).
**कौथुम**–वेदशाखा, परंतु कोणत्या वेदाची तो निर्णय होत नाहीं. यांतील मंत्रानुरूप भगीरथ राजानें गंगेस प्रसन्न केलें होतें ( देवी भा० ९ स्कं० अ० ११ ).
**कौमंड**–गौतमांगिरसांतील एक ऋषि, व त्याचें कुल ( ३ अंगिरा श० पहा ).
**कौमारी**–सप्त मातृगणांतील एक.
२–कुमार जो कार्तिकेय त्याची शक्ति.
**कौमोदकी**–खांडववनदाहकालीं, अग्नीनें वरुणापासून आणून कृष्णास दिलेली गदा.
**कौरव्य**–एक ब्रह्मर्षि ( ३ वासिष्ठ श० पहा ).
२–ऐरावतकुलोत्पन्न एक नाग. उलूपीचा पिता. याच्या कुलांतील जनमेजयकृत सर्पसत्रांत १० कुळें दग्ध झालीं होतीं. त्यांचीं नांवें अशीं.—एरक, कुंडल, वेणी, वेणिस्कंध, कुमारक, बाहुक, शृंगवेर, धूर्तक, आणि प्रातरातग.
३–कुरुवंशोत्पन्न राजावि०
**कौरुपति**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).
**कौरुक्षेत्री**– ,, ,,
**कौर्मकल्प**–मासांतील दिवसक्रमानें ब्रह्मदेवरची पूर्णिमा. या कल्पारंभीं प्रथम कूर्मावतार झाला होता म्हणून यास असें नांव पडलें. ( ४ कल्प श० पहा. )
**कौवेरक**–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).
**कौशल्य**–आश्वलायन ऋषिकुलांतील एक ऋषि, पिप्पलाद ऋषीचा शिष्य.
२–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा. )
**कौशल्या**–प्रथमार्थक कौसल्या शब्द पहा.

**कौशापि**—ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**कौशांबी**—सोमवंशीय विजयकुलोत्पन्न कुशांब अ० कुशांबु राजानें स्थापिलेली नगरी.

**कौशि**—ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**कौशिक**—कुरुक्षेत्रांत राहणारा ब्राह्मण. पितृवर्ती इ०सात पुत्रांचा पिता. ( पितृवर्ती श० पहा ).

२—अरण्यांत राहून तपश्चर्या करणारा कोणी एक ब्राह्मण. याचा नियम सत्यच भाषण करावें असा असें, त्यांत तारतम्य मुळींच नसे; परंतु सत्य भाषण केलेलें दोषास, व असत्य भाषण गुणास कोठें कसें कारण होतें, याविषयीं असें आहे.—

**श्लोक.**

विवाहकाले रतिसंप्रयोगे प्राणात्यये
सर्वधनापहारे ॥ विप्रस्य चार्थे ह्यनृतं
वदेत पंचानृतान्याहुरपातकानि ॥३३॥
सर्वस्वस्यापहारे तु वक्तव्यमनृतं भवे—
त् ॥ तत्रानृतं भवेत्सत्यं सत्यंचाप्यनृ—
तं भवेत् ॥ ३४ ॥

( भार० कर्ण० अ० ६९ ).

याप्रमाणें तारतम्य असतां, एकदां कोणी श्रीमान् पांथस्थांचा समुदाय, मार्गक्रमण करीत चाललेला चोरांनीं दुरून पाहून, त्यावर चाल केली. तेव्हां तो या ऋषीच्या आश्रमामागें लपला. मागून चोर आले त्यांनीं, समुदायाविषयीं यास पुसल्यावरून, यानें सत्य होतें तें सांगितलें. तें ऐकून चोरांनीं सर्वांचा वध केला व द्रव्य घेऊन स्वस्थळास गमन केलें. त्यावरून हा ब्राह्मण अधोगतीस गेला. ( कृष्णार्जुनसंवाद ).

३—सोमवंशीय विजयकुलोत्पन्न जे कुशांबु, गाधि, विश्वामित्रप्रभृति राजे, त्यांस हें नांव साधारण आहे.

४—विश्वामित्र ब्राह्मणत्व पावल्यावर, त्याच्या कुलांतील एक ऋषि. यास हैमवती नांवाची स्त्री होती. ( भार० उद्यो० अ० ११७ ).

५—इंद्रास नांव.

६— वसुदेवास वैश्यजातीय एक स्त्री होती; तिजपासून झालेला पुत्र.

७ सावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षींतील एक. ( २ सावर्णि श० पहा ).

**कौशिकी**—भारतवर्षीय नदी. ( २ हिमालय श० पहा). हिला पारा असें नामांतर आहे.

२—जमदग्नीची माता सत्यवती, तिला नदीरूपांतरकाळीं पडलेलें नांव. ( वा० रा० बाल० स० ३४ ).

**कौषारवि**—मैत्रेय ऋषीस नामांतर.

**कौषीतक**—एक ऋषि, याचा पुत्र किंवा वंशज कहोड ऋषि होय.

**कौषीतकि**—ऋग्वेदाची एक शाखा, व उपनिषत्.

**कौषीतकेय**—कहोड ऋषीस नामांतर.

**कौषेय**—एक ब्रह्मर्षि. ( वा० रा० उत्तर० स० १ ).

**कौष्ठिकि**—एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**कौसला**—कृष्णपत्नी सत्या तिला नामांतर.

**कौसल्या**—ईशान्यकोसलदेशीय भानुमान् राजाची कन्या, व दशरथ राजाची स्त्री ती. ही रामचंद्राची माता.

२—काशी राजाच्या अंबादिक तीन कन्यास नामांतर.

३—कृष्णपिता वसुदेव त्याची स्त्री.

**कौस्तुभ**—समुद्रमंथनकालीं त्यांतून निघालेला मणि.

**क्रतु**—स्वायंभू मन्वंतरांतल्या ब्रह्ममानसपुत्रांतील एक. हा ब्रह्मदेवाच्या करापासून उत्पन्न झाल्यामुळें, यास असें नांव पडलें. यास, कर्दम प्रजापतीच्या नऊ कन्यांतील एक जी क्रिया, ती स्त्री असून, वालखिल्य नांवाचे ६० सहस्र पुत्र होते. संपूर्ण ब्रह्मपुत्र महादेवाच्या शापानें मरण पावले असतां, वैवस्वत चालू मन्वंतरारंभीं, ब्रह्मदेवानें त्यांस पुनः उत्पन्न केलें. त्यांत जरी याचें नांव नाहीं, तरी हा, " क्रतुः खल्वनपत्योभूद्राजन् वैवस्वतेंतरे " या वाक्यावरून उत्पन्न झाला होता. ( महर्षि श० पहा).

२—वैवस्वतमन्वंतरांतील ब्रह्मपुत्र तो. यास येथें मुळींच संतति नव्हती. हा प्रतिवर्षी पौषमासीं आयु अशा नांवानें संचार करण्यास सूर्यासमागमें असतो. ( सहस्य श० पहा ).

३—दाहा विश्वेदेवांतील एक. ( विश्वेदेव श० पहा ).

४—बारा भार्गव देवांतील एक. ( ३ भृगु श० पहा ).

५—चक्षुर्मनूचा पौत्र, उल्मुकास पुष्करिणीपासून झालेल्या ६ पुत्रांतील चवथा.

६—कोणी एक असुर.

७—कृष्णास जांबवतीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**क्रथ**—शुक्तिमान् पर्वताच्या पूर्वेकडील एक राजा. हा, भारती युद्धांत दुर्योधनाकडे होता.

२—( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तत्कुलोत्पन्न ज्यामघ, त्याचा पौत्र, विदर्भ राजाच्या चार पुत्रांतील एक, याचा पुत्र कुंति.

**क्रथक**—एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**क्रथन**—वरुणलोकांतील असुरवि०.

२—रामसेनेंतील या नांवाचे दोन वानराधिपति. ( वा० रा० युद्ध० स० २६ आणि स० २७ ).

**क्रव्याद**–सहरक्ष ना० अग्नीचा पुत्र. याचें प्रेतदहनांत प्राधान्य.

**क्राथ**–वर जे दोन क्रथ वानर सांगितले त्यांतीलच कोणास तरी हें नांव असावें. ( भार० वन० अ० २८३ ).

२–एक राजा, याच्या पुत्रास भारतीयुद्धांत अभिमन्यूनें मारिलें.

**क्रिया**–स्वायंभूमन्वंतरांतील दक्षाच्या सोळा कन्यांतील, व धर्मऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक, हिचा पुत्र योग.

२–कर्दम प्रजापतीच्या नऊ कन्यांतील एक;व प्रथमार्थक क्रतु ऋषीची स्त्री.

३–द्वादशादित्यांतील अंशुमान् आदित्याची स्त्री.

**क्रोडोदरायण**–ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**क्रोध**–ब्रह्मदेवाच्या भृकुटिमध्यापासून झालेला त्याचा पुत्र. यानें एके काळीं जमदग्नीचें, त्यानें पितरांकरितां सिद्ध केलेलें पायस, सर्परूप धारण करून आपल्या विषानें दूषित केलें, तथापि त्यास कोप आला नाहीं. परंतु पितरांच्या शापानें यास कांहीं काल नकुलयोनि प्राप्त होऊन पुढें उद्धार झाला. (जैमि०अश्व०अ०६७).

२–अष्टभैरवांतील एक.

३–कश्यपस्त्री काला तिच्या चार पुत्रांतील एक.

**क्रोधन**–कौशिक ऋषींच्या सात पुत्रांतील एक. ( पितृवर्ती श० पहा ).

२–कोणी एक ब्रह्मर्षि.

३–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, त्याच्या ऋक्ष ना० पुत्रवंशांतील जन्हुकुलोत्पन्न अयुत राजाचा पुत्र, याचा पुत्र देवातिथि.

**क्रोधनायन**–श्यामपराशर शब्द पहा.

**क्रोधवश**–कश्यपास क्रोधा अ० क्रोधवशा स्त्रीपासून झालेले पुत्र, व त्यांचे वंशज. यांस भीमसेनानें मारिलें होतें. ( भार० वन० अ० १५४ ).

२–रावणपक्षीय एक राक्षस.

**क्रोधवशा**–क्रोधा शब्द पहा.

**क्रोधशत्रु**–कश्यपस्त्री काला तिच्या चार पुत्रांतील एक.

**क्रोधहंता**– ,, ,,

**क्रोधा**–कश्यप ऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक. हिला क्रोधवशा असें म्हटलेलें असून, क्रोधवश नांवाचे लक्ष पुत्र होते. व मृगी, मृगमंदा, हरि, भद्रमना, मातंगी, शार्दूली, श्वेता, सुरभि, आणि सुरसा, अशा नऊ कन्या होत्या.

**क्रौंची**–एक ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**क्रोष्टा**–ऋषि. ( ३ अंगिरा श० पहा ).

२–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न यदु राजाच्या चार पुत्रांतील दुसरा. यास पुराणांतरीं क्रोष्टु असें म्हटलें असून, यास पुत्र वृजिनवान् अ० वृजिनिवान् होता.

**क्रोष्टावक्षि**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० ).

**क्रोष्टु**–द्वितीयार्थक क्रोष्टा तोच.

**क्रौंच**–हिमवान् पर्वतास मेनेपासून झालेला पुत्र. याच्याच मुळें हा ज्या द्वीपांत आहे, त्यास क्रौंचद्वीप असें नांव पडलेलें अजून चालतें.

२–भारतवर्षाच्या उत्तरभागीं असणारा एक पर्वत. (वा० वा० किष्किं० स० ४३ ).

**क्रौंचद्वीप**–पृथ्वीच्या सप्तमहाद्वीपांतील पांचवें. हें घृतोदाच्या पलीकडचे असून, याचा विस्तार अ० रुंदी सोळा लक्ष योजनें आहे, व यास तितक्याच रुंदीच्या क्षीरसमुद्राचें वेष्टन आहे. येथील अधिपति प्रियव्रत राजर्षीचा पुत्र घृतपृष्ठ असून, यांत क्रौंच ना० एक अत्यंत मोठा पर्वत असल्यामुळें यास क्रौंचद्वीप हें नांव पडलें आहे, यांत शुक्र , वर्धमान, भोजन, उपबर्हिण, नंद, नंदन, आणि सर्वतोभद्र, असे सात पर्वत; आणि अभया, अमृतौघा, आर्यका, तीर्थवती, वृत्तिरूपवती, पवित्रवती आणि शुक्ला, अशा सात नद्या आहेत. घृतपृष्ठानें या द्वीपाचे वर्षसंज्ञक सात भाग करून, आपल्या सात पुत्रांस यांचींच नांवें ठेवून विभागून दिले असत. ( भाग० ५ स्कं० अ० २० ). ( घृतपृष्ठ श० पहा ). ( देवीभा० ८ स्कं० अ० १२ ).

**क्रौंचारण्य**–दंडकारण्याच्या पुढें दक्षिणेस असणारें वनवि०. याच अरण्यांतून रामलक्ष्मण चाललेले असतां,त्यांस अयोमुखी व कबंध राक्षस, यांच्या गांठी पडल्या होत्या. ( वा० रा० अर० स० ७३ ). यास क्रौंचावट असेंही नामांतर आढळतें. ( वा० रा० अर० स० १०९ ).

**क्रौंचावट**–क्रौंचारण्यासच नांव.

---

## ख

**खग**–आकाशांत संचार करण्याच्या कारणानें सूर्यास नांव. ( १ सूर्य श० पहा ).

**खगण**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशवंशांत जन्मलेल्या वज्र अ० वज्रनाभ राजाचा पुत्र, याचा पुत्र विधृति.

**खट्वांग**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न विश्वसह राजाचा पुत्र, वृद्धशर्मा राजाचा पौत्र, व ऐडविड अ० ऐलविलाचा प्रपौत्र. यास दिलीप असें नामांतर असून क्वचित् ऐलविल असेंही म्हटलें आहे. (भार०द्रोण०अ०६१). हा मोठा यज्ञ करणारा प्रख्यात होता. याच्या यज्ञांत

विश्वावसुप्रभृति साठ सहस्र गंधर्व गायन करीत असत, सुवर्णाचे यूप (पशूंस बांधण्याचे खांब)असून, स्वाध्याय-घोष ( वेदपठनाचा घोष ), ज्याघोष ( धनुष्याच्या रज्जूचा घोष ) आणि दीयतां ( द्या ) असा घोष, याप्रमाणें त्रिविध घोष निरंतर ऐकूं येत. (भार०शांति० अ० २९ ).

एकदां देवांनीं यास, आपलें साह्य यानें युद्धांत करावें म्हणून स्वर्गी नेलें होतें. त्याप्रमाणें यानें तें करून, देवांस जय प्राप्त झाला असतां, ते यास वर माग असें म्हणूं लागले. यानें आधीं माझें आयुष्य किती आहे तें सांगा, म्हणजे मागेन म्हणतांच, त्यांनीं मुहूर्त मात्र आहे असें सांगितलें. मग यानें कांहींच न मागतां, शीघ्रगामी विमानांत बसून त्वरेनें हा अयोध्येस आला, आणि आपल्या दीर्घबाहु ना० पुत्रास राज्यावर स्थापून,आत्मस्वरूपीं रममाण होत्साता परब्रह्मभावाप्रत प्राप्त झाला. ( भार० वन० अ० ९).

२-महादेवाचें आयुधवि०.

**खंड**-महाद्वीपाच्या लहान भागांस जसी वर्ष म्हणून संज्ञा आहे, तसी वर्षातील लहान भागांस खंड संज्ञा आहे. आपण राहतों या भरतवर्षांत **कुशावर्त**, **इला-वर्त**, **ब्रह्मावर्त**, **मलय**, **केतु**, **भद्रसेन**, **इंद्रस्पृक्**, **विदर्भ**, आणि **कीकट**, असे नऊ खंड आहेत. हींच नांवें मत्स्यपुराणांत **इंद्रद्वीप**, **कसेर**, **ताम्रपर्ण**, **गभस्तिमान्**, **नाग**, **सौम्य**, **गंधर्व**, **वारुण**, आणि **भरत** अशीं आहेत. **श्लोक**—" इंद्रद्वीपः कसेरश्च ताम्रपर्णो गभस्तिमान् ॥ नागद्वीपस्तथा सौम्यो गंधर्वस्त्वथ वारुणः ॥ अयं तु नवमस्तेषां द्वीपः सागरसंवृतः " ( मत्स्य० अ० ११३ श्लो० ९-१०). या दोहों प्रकारांत कोणतें कोणाचें नामांतर त्याचा निर्णय होत नाहीं; तरी भरतखंड म्हणजे ब्रह्मावर्तखंड असा निर्णय होऊं शकतो. ( ४ परीक्षित् श० पहा ).

आतां यास द्वीप असें मत्स्यपुराणांत म्हणून, " अयं तु नवमस्तेषां द्वीपः सागरसंवृतः " या वाक्यानें त्याचें दृढीकरण केलें आहे. परंतु नौकाद्वारें येथील राजाचें अन्यखंडांत जाणें कोणत्याही ग्रंथांत दृष्ट नसून, भारताचें तर या गोष्टीस मुळींच प्रमाण नाहीं. यास्तव इंद्रद्वीपादिक हा पाठ लेखकप्रमादच होय. असा निश्चय करण्यास प्रमाण आहे तें असें:—

**श्लोक.**

काशीपुरीच केदारो महाकालेश्च ना-सिकम् ॥ त्र्यंबकं च महाक्षेत्रं पंच द्वी-पा इमे भुवि ॥ ३२ ॥ ( देवीभा० ११ स्कं० अ० २१ ).

या श्लोकांत काशीपुरी, बदरीकेदार, महाकाल म्ह० उज्जयिनी अ० अवंती, नासीक, आणि त्र्यंबकेश्वर, हीं द्वीपें म्हटलीं असून जसीं जलानें वेष्टित नसल्यामुळें या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असाच वरच्यांतही नाहीं. त्यांत पांडवांच्या वेळेस तर असें नव्हतेंच, सांप्रत असेल तर असो, त्याविषयीं माझा वाद नाहीं.

**खंडपरशु**-महादेव.

**खनपान**-( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न बलि राजाचा पौत्र, व अंगराजाचा पुत्र, यास दधिवाहन असें नामांतर असून, पुत्र दिविरथ ना० होता.

**खनित्र**-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न प्रमति राजाचा पुत्र, याचा पुत्र चाक्षुष.

**खनिनेत्र**-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न रंभ राजाचा पुत्र, याचा पुत्र करंधम, नामांतरानें सुवर्चा. हा खनिनेत्र दुष्ट होता म्हणून, प्रजेनें यास राज्यावरून काढून टाकिलें होतें, व सुवर्चास राजा केलें होतें. ( भार० अश्वमे० अ० ४ ).

**खर**-विश्रवा ऋषीस राका ना० राक्षसी स्त्रीपासून झालेला पुत्र. हा, रावणाचा सापत्न भ्राता. ( भार० वन० अ० २७५ श्लो० ८ ). हा धनुर्विद्येंत परम निपुण असून, पूर्वीचा याज्ञवल्क्यपुत्र चंद्रकांत होय. रावणानें यास, शूर्पणखेच्या साह्यार्थ जनस्थानीं रहाण्याची आज्ञा केली होती. तीप्रमाणें हा तेथें चौदा सहस्र राक्षसांसहित राहून, दंडकारण्यांतील रहिवासी मुनिजनांस अनेक प्रकारें पीडा देऊन भक्षीतही असे. तो याचा उपद्रव चित्रकूट पर्वतापर्यंत होता म्हणून, दाशरथि रामास विदित होताच.

पुढें राम जनस्थानांतलि पंचवटींत सीता व लक्ष्मण यांसहित येऊन राहिला असतां, शूर्पणखा रामाकडे येऊन मला वर असें म्हणूं लागली. त्यावरून लक्ष्मणाकडून त्यानें तिची विटंबना करविली असतां, तेणेंकरून ती विव्हल होऊन याकडे येऊन रडूं लागली. ( शूर्पणखा श० पहा ). नंतर खरानें तिजपासून साद्यंत वृत्त ऐकून घेऊन, रामनाशार्थ आपले चौदा सहस्र राक्षस त्याकडे पाठविले. त्यांस रामानें पाहून त्या सर्वांचा तत्काळ नाश केला. हें वर्तमान यास कळतांच यानें दूषण सेनापतीस आणखी सेना सत्वर सिद्ध करण्यास सांगितली.

खराची आज्ञा होतांच दूषणानें श्येनगामी, पृथुश्याम, यज्ञशत्रु, विहंगम, दुर्जय, परवीराक्ष, परुष, कालकार्मुक, मेघमाली, महामाली, सर्पास्य, आणि रुधिराशन, या बारा अमात्यांसहित त्याची सेना व महाकपाल, स्थूलाक्ष, प्रमाथ, आणि त्रिशिरा, या चार अमात्यांसहित आपली सेना सिद्ध करून यास कळविलें. त्यावरून खर हा तत्काळ रामावर जाण्यास निघाला.

हा निघाला त्या काळीं, यास पुष्कळ दुश्चिन्हें जाणवलीं; परंतु यानें त्या सर्वांची अवगणना करून, युद्धदुर्मद होत्साता पंचवटीस आला. तें पाहून राम एकटाच याशीं युद्धास उभा राहिला. पुढें रामाचें व याचें अत्यंत घोर युद्ध झालें. त्यांत दूषण, त्रिशिरादिक अमात्य व सर्व याची सेना नष्ट होऊन, केवळ एकटा हा मात्र अवशेष राहिला, असें रामानें पाहून यास म्हटलें, खरा, तूं आजपर्यंत दंडकारण्यांत राहून, निरपराध अनेक ऋषींस भक्षिलेंस, व पुढेंही वांचलास तर असेंच करशील, यास्तव तुला मारणें योग्य आहे. इतकें बोलून, त्यावर एक बाण असा टाकला कीं, याचें शिर तत्काळ तुटून हा मरण पावला. यास मकराक्ष म्हणून एक पुत्र होता. ( वा० रा० अर० स० १९-३० ).

२–रावणपक्षीय दुसरा एक राक्षस. ( भार० वन० अ० २८५ श्लो० २ ).

३–लंबासुराचा भ्राता एक असुर. ( मत्स्य० अ० १७६ श्लो० ७ ).

**खरवाक्**–ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**खर्व**–कुबेराच्या नऊ निधींतील शेवटला.

**खल्वायन**–धूम्रपराशर शब्द पहा.

**खश** अ० **खस**–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश, व तेथील लोक.

**खांडव**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**खांडवप्रस्थ**–इंद्रप्रस्थ शब्द पहा.

**खांडववन**–वनवि०. हें अर्जुनानें अग्नीस भक्षणार्थ दिलें होतें. ( १ अग्नि श० पहा ). हें वन जळत असतां, तक्षकाचा पुत्र अश्वसेन त्यांतून कसा तरी वांचला, मयासूर शरण येऊन वांचला, व शार्ङ्गपक्ष्याची चार बालकें अग्नीनें वांचविलीं. ( भार०आदि०अ०२२४ ).

**खांडवायन**–ब्राह्मणसमुदायवि०. पूर्वी जामदग्न्यानें पृथ्वी निःक्षत्रिय करून, एक मोठा यज्ञ केला. तेव्हां त्याच्या समाप्तिकाळीं, सुवर्णाची एक मोठी वेदी करून कश्यप ऋषीस दिलेली खंडशः ज्यांनीं ती वांटून घेतली, त्यांस त्या निमित्तानें हें नांव पडलें. ( भार० वन० अ० ११७ श्लोक० ११–१३ ).

**खांडिक्य**–ऋषिवि०.

२–( विदे० वं० ) मितध्वज जनकाचा पुत्र.

**खासीर**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**खिलखिली**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**ख्याति**–कर्दम प्रजापतीच्या नऊ कन्यांतील एक, व प्रथमार्थक भृगुऋषीची स्त्री.

२–तामस मनूच्या पुत्रांतील एक.

३–उल्मुकाच्या साहा पुत्रांतील एक.

**ख्यातेय**–नीलपराशरकुलोत्पन्न एक ऋषि.

---

## ग

**गगनमूर्द्धा**–एक दानव. ( दनु श० पहा ).

**गंगा**–एक महानदी, व तिची मूर्तिमान् देवता. हिला तूं भूलोकीं पतन पावशील असा ब्रह्मदेवाचा शाप झाला होता. ( महाभीष श० पहा ). मृत्युलोकीं ही पतन पावल्यावर शंतनुराजाची प्रथम स्त्री झाली, व त्यापासून हिला आठ पुत्र झाले होते. त्यांत भीष्म शेवटचा असून, परमप्रतापी, व व्रती होता म्हणून, त्याच्या नांवावरून हिला भीष्मसू असें नांव पडलें होतें. याशिवाय विष्णुपदी, त्रिस्रोता, भागीरथी, जान्हवी, हीं नांवें हिला पहिलीं आहेतच, व तीं अशींच कारणपरत्वेंकरून पडलेलीं आहेत. हिचें मूळचें नांव स्वर्धुनी. ही स्वर्धुनीच्या सप्त प्रवाहांतील एक होय. हिचें उगमस्थान भगीरथाच्या वेळेपासून प्रथमार्थक हिमालयावर समजावें; कारण कुमारीपासून एक सहस्र योजनांवर हिचा उगम आहे असें प्रमाण आहे. ( भरतखंड श० पहा ).

२–( २ भागीरथी श० पहा ).

**गंगाद्वार**–मेरुपर्वतावरून गंगा येत येत, आपल्या भरतवर्षांत ज्या स्थळीं प्रथम आली, त्या स्थळाचें नांव. हें नांव नर्मदा व गोदावरी, यांच्याही आद्यस्थळास आहे.

**गंगाधर**–महादेवास, गंगेस मस्तकीं धारण करण्यानें नांव आहे.

**गंगासागर**–गंगेचा ज्या स्थळीं समुद्राशीं संगम होतो, त्यास म्हणतात.

**गंगान्हद**–गंगेसंबंधीं तीर्थ.

**गंगोद्भेद**–

**गज**–एक वानराधिपति रामसेनेंतील वानर.

२–दुर्योधनाच्या मातुलांतील एक. शकुनीच्या साहा कनिष्ठ भ्रात्यांतील शेवटचा. हा भारती युद्धांत अर्जुनपुत्र इरावान् याच्या हातून मेला. ( भार० भीष्म० अ० ९० ).

३–गजासुर दैत्य तो.

४–गजपुर शब्द पहा.

**गजकर्ण**–एक यक्षवि०. तसेंच एक तीर्थवि०.

**गजपुर**–हस्तिनापुर.

**गजसाव्हय**–गजपुर.

**गजानन**–एक शिवगण. त्याचें मूळ असें आहे कीं, एकदां पार्वतीनें अंगास उटणें लावून मळी काढिली, व तिचा तिनें एक पुतळा केला, त्यास लीलेनें तिनें हत्तीप्रमाणें सोंड केली होती. पुढें तिनें लीलेचा उपरम करून, तो पुतळा जलांत टाकिला, तों तत्क्षणींच त्यांतून एक पुरुष निघाला. त्यास पार्वतीनें पुत्रा, इकडे ये म्हणून हांक मारिली. त्यावरून हा जवळ गेला असतां, विनायक ना० रुद्रगणाचें तिनें त्यास आधिपत्य दिलें. त्यावरून यास गणपति असें नांव पडलें, व हत्तीप्रमाणें सोंड असल्यामुळें, गजानन हें नांव यास चालून, शिवपुत्र म्हणण्याचें हेंच कारण आहे. ( मत्स्य० अ० १५३ ).

**गजाव्हय**–गजपुर शब्द पहा.

**गजासुर**–तारकासुराच्या सैन्यांतील असुरवि०. हा तारकामयसंग्रामांत, कपाली ना० रुद्राच्या हातून मरण पावला. ( मत्स्य० अ० १५२ ).

**गजेंद्र**–द्वितीयार्थक इंद्रद्युम्न शब्द पहा.

**गंडक**–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा पांडवांच्या वेळेस पूर्व पांचालाच्या पूर्वेस होता. ( भार० सभा० अ० २९ ).

**गंडकंडु**–यक्षवि०.

**गंडकी**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( २ हिमालय श० पहा ).

**गणतीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ.

**गणपति**–गजानन शब्द पहा.

**गति**–कर्दम प्रजापतीच्या नऊ कन्यांतील एक. स्वायंभू मन्वंतरांतल्या पुलह ऋषीची स्त्री.

**गद**–वसुदेवास रोहिणीच्या ठायीं एक व देवरक्षितेच्या ठायीं एक मिळून झालेल्या दोनही पुत्रांस नांव. या दोहोंतून एक भारती युद्धांत पांडवांकडे होता.

**गदायन**–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**गद्गद**–एक ऋक्ष, जांबवान् आणि दुसरा केसरी त्यांचा पिता. ( वा० रा० युद्ध० स० ३० ).

**गंधमादन**–रामसेनाधिपति एक वानर. ( भार० वन० अ० २८३ ).

२–सोमवंशीय यदुकुलोत्पन्न श्वफल्क, त्याच्या १३ पुत्रांतील एक.

३–आपण ज्या भरतवर्षांत राहतों, इकडील दृष्टीनें मेरुपर्वताच्या पश्चिमेकडील पर्वत. हा दक्षिणोत्तर असून, नील आणि निषध या दोन पर्वतांस क्रमानें स्पर्शून आहे. याच्या आणि पश्चिम समुद्राच्या मधील प्रदेश त्यास भद्राश्ववर्ष असें नांव आहे. ( भाग० ५ स्कं० अ० १६ ).

४–हिमालयपर्वताच्या एका शिखराचें नांव. येथें कांहीं काळ युधिष्ठिर वनवासांत असतां रहात असे. ( भार० वन० अ० १५८ ). इंद्रलोकीं अर्जुन गेलेला परत आला असतां, येथेंच युधिष्ठिरास येऊन भेटला होता. ( इंद्रकील श० पहा ).

**गंधर्व**–देवयोनिवि०. हे स्वर्गांतील गायक आहेत.

**गंधर्वतीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ.

**गंधर्वपति**–चालू मन्वंतरांतील गंधर्वाधिपति चित्ररथ तो.

२–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**गभीर**–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न रभसाचा पुत्र, याचा पुत्र अक्रिय.

**गंभीरबुद्धि**–पुढें होणारा इंद्रसावर्णि मनु, त्याच्या पुत्रांतील एक.

**गय**–उत्तानपादवंशीय उल्मुक राजाच्या साहा पुत्रांतील कनिष्ठ.

२–उत्तानपादवंशीय हविर्धान राजाच्या साहा पुत्रांतील दुसरा. यास सांग असें नामांतर होतें.

३–प्रियव्रतवंशीय ऋषभदेवकुलोत्पन्न पृथुषेणपुत्र नक्त राजा, त्यास द्रुती अ० द्युति भार्येपासून झालेला पुत्र, यास गयंति ना० स्त्री, आणि चित्ररथ, सुगति, व अवरोधन, असे तीन पुत्र होते. ( भाग० पंचम० अ० १५ ).

४–( सू० वं० ) इल अ० सुद्युम्न राजाच्या तीन पुत्रांतील मध्यम.

५–( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न मूर्तय अ० अमूर्तरयाचा पुत्र. यानें वानिरमालिनी नदी, आणि ब्रह्मसर, यांसमीप अनेक यज्ञ केले होते व त्यांत यानें ब्राह्मणांस अपार दाक्षिणा देऊन, घृतकुल्या व मधुकुल्या यांची समृद्धि करून दिली होती. अन्न तर

इतकें होतें कीं, सर्वांचीं भोजनें झाल्यावर त्यांचे पर्वततुल्य पंचवीस राशि अवशेष राहिले होते. ( भार० वन० अ० ९५ ).

६–अमूर्तरजस नामांतराचा एक राजा. ( भार० द्रोण० अ० ६६ ).

७–पुरवि०. ( भार० शल्य० अ० ३८ ).

८–काम्यक वनाच्या पूर्वेकडील सामान्य पर्वत.

**गयंति**–ऋषिवि०.

२–तृतीयार्थक गय राजाची स्त्री. चित्ररथादिक तीन पुत्रांची माता.

**गयशिर**–एक पर्वत, यासमीपच वानिरमालिनी नदी असावी; कारण गय राजाचा यज्ञ, तीसमीप झाला होता. गयाशिर असेंही नांव यासच असेल.

**गया**–क्षेत्रवि०.

**गरिष्ठ**–ऋषिवि०.

**गरुड**–कश्यप ऋषीपासून विनतेस झालेल्या दोन पुत्रांतील दुसरा, अरुणाचा कनिष्ठ भ्राता. (भार० आदि० २३ ). हा मोठा पराक्रमी असे, व यानें आपल्या मातेस कद्रूच्या दास्यांतून सर्पांस अमृत आणून देऊन मुक्त केलें होतें. ( भार० आदि० अ० २७–३४ ). हा संपूर्ण पक्ष्यांचा प्रस्तुतच्या मन्वंतरांत अधिपति असून, विष्णूसही वहन करितो. श्रुतश्री, श्रुतसेन, विवस्वान्, रोचनामुख, प्रस्तुत, आणि कालकाक्ष, इ० यानें अनेक दैत्य मारिले. (भार० उद्यो० अ० १०५). यास सुमुख नांवाचा एक पुत्र होता. ( भार० भीष्म० अ० ६ ). तार्क्ष्य असेंही नामांतर याला आढळतें.

**गरुडकल्प**–चालू ब्राह्ममासांतील चौदावा कल्प अ० दिवस. ( ४ कल्प श० पहा ). या कल्पांत गरुडावतार प्रथम झाला होता, म्हणून यास हें नांव पडलें.

**गरुत्मान्**–गरुडास नांव.

**गर्ग**–भरद्वाजांगिरसवंशमालिकेंतील एक प्रख्यात ऋषि. (३ अंगिरा श० पहा ).

२–एक ऋषि. ( पितृवर्ती श० पहा ).

३–यादवांतील वृष्णिकुलाचा उपाध्याय.

४– ( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न ऋतेयु वंशांतील मन्यु राजाचा पुत्र, यास पुत्र शिनि होता.

**गर्गस्रोत**–भारतवर्षीय तीर्थ.

**गर्जनतीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ. येथें इंद्रजितानें तप केलें होतें. ( मत्स्य० अ० १८९ ).

**गर्दभीविपीत**–गौतमकुलोत्पन्न एक ऋषि.

२–भारद्वाजकुलोत्पन्न एक ऋषि.

**गर्दभीमुख**–एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**गर्भ**–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**गर्व**–स्वायंभूमन्वंतरांतील धर्मपुत्र. याची माता पुष्टि.

**गवय**–रामसेनेंतील एक वानराधिपति.

**गवलागन**–एक सूत. संजयाचा पिता.

**गवाक्ष**–रामसेनेंतील एक वानराधिपति.

२–दुर्योधनमातुल, शकुनीच्या साहा भ्रात्यांतील एक. हा भारती रात्रियुद्धांत भीमसेनाच्या हातून मेला. ( भार० द्रोण० अ० १५७ ).

**गविजात**–एक ब्रह्मर्षि.

**गविष्ठ**–देववि०. ( ३ अंगिरा श० पहा ).

२–एक दानव. ( दनु श० पहा ).

**गविष्ठिर**–एक ब्रह्मर्षि व कुल. ( २ अत्रि श० पहा ).

२–अत्रिकुलोत्पन्न अन्य ऋषि.

**गवेषण**–अक्रूर यादवाच्या पुत्रांतील एक.

**गांगेय**–शंतनु राजास गंगेपासून झाल्यामुळें भीष्मास नांव.

**गांगोदधि**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**गांडीव**–अग्नीनें पंडुपुत्र अर्जुनास दिलेल्या धनुष्याचें नांव.

**गात्रवान्**–कृष्णास लक्ष्मणेपासून झालेला पुत्र.

**गाथि**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**गाथिन**–एक ब्रह्मर्षि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**गांदिनी**–काशी राजाची कन्या व श्वफल्क यादवाची स्त्री. अक्रूरादिकांची माता. ( भाग० १० स्कं० अ० ४१ ).

**गांधर्ववेद**–सामवेदाचा उपवेद व त्याची देवता. हा, सामवेदाप्रमाणेंच ब्रह्मदेवाच्या पश्चिमेकडील मुखांतून निघाला.

**गांधार**–( सो० वं० ) द्रुह्युकुलोत्पन्न आरब्ध राजाचा पुत्र, याचा पुत्र धर्म.

२–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा सिंधुनदीच्या उभयतीरांस व्यापून आहे. येथील राजे शैलूष गंधर्वाचे वंशज होत. ( वा० रा० उत्तर० स० १०० ). याची राजधानी, पूर्वी तक्षशिला नगरी होती. हीशिवाय आणखी एक नगरी होती, तिचें नांव पुष्करावती होतें.

३–गांधारदेशाच्या राजांस साधारण नांव, परतु गांधारीचा बंधु जो शकुनि, त्याविषयीं भारतामध्यें विशेष प्रवृत्ति.

**गांधारकायण**–एक ब्रह्मर्षि. ( २ अगस्त्य श० पहा ).

**गांधारदेश**–द्वितियार्थक गांधार शब्द पहा. येथें पांड-

वांच्या वेळेस शकुनि व गांधारी, यांचा पिता सुबल, तो राजा होता.

**गांधारी**-गांधारदेशाधिपति सुबल राजाची कन्या ती. हिचा धृतराष्ट्राशीं विवाह झाला होता. ( भार० आदि० अ० ११० ). ही मोठी पतिव्रता असे, ती अशी कीं, पतीशिवाय इतर पुरुष दृष्टीससुद्धां न पडावा म्हणून, नेत्रांस पट्ट बांधीत असे. हिनें,वाल्यावस्थेंत रुद्राचें आराधन केलें होतें, त्यावरुन शत पुत्र तुला होतील, असें हिला त्याचें वरप्रदान होतें. त्याप्रमाणें हिला शतपुत्रांचा एकाच खेपेनें गर्भ राहिला होता. एकदां हिला कोणी असें कळविलें कीं,कुंतीस अरण्यांतच युधिष्ठिर ना० पुत्र पंडूपासून झाला आहे. त्यावरुन मला पुत्र केव्हां होईल म्हणून ही रात्रंदिवस चिंता करूं लागली,परंतु कांहीं केल्या प्रसूत होईना.तेव्हां बलात्कारानें हिनें गर्भ बाहेर काढण्याचा यत्न केला, तेणेंकरून अंगुष्ठप्रमाण असे ते शतपुत्र मृतप्राय एकाएकीं उदराबाहेर पडले. त्यावरुन ही शोक करूं लागली. इतक्यांत तेथें व्यास प्रकट होऊन, कृपेनें व्याप्तचित्त होत्साते हिला म्हणाले,शोक करूं नको,तर सत्वर घृतकुंभ शंभर आणून, त्यांत हे बालक घालून ठेव, म्हणजे पूर्ण काळ होतांच हे सजीव होऊन व्यवास्थित होतील. त्याप्रमाणेंच हिनें केलें असतां,अल्पच काळांत त्याप्रमाणेंच ते बालक झाले. याच संधीस अरण्यामध्यें कुंतीस भीमसेन झाला होता. ( भार० आदि० अ० ११५ ). अशीच एक हिला दुःशला नांवाची कन्या झाली होती. ( भार० अ० ११६ ). या शतपुत्रांचीं नांवें ( भार० आदि० अ० ११७ ) यांत आहेत.

दुर्योधन मोठा झाल्यावर पांडवांशीं तो पराकाष्ठेचा द्वेष करूं लागला, असें पाहून हिनें त्यास बहुतवेळा हितोपदेश केला; परंतु त्याचें कांहींच साफल्य झालें नाहीं. ( भार० उद्यो० अ० १२९ ). हिनें उपदेश केल्याप्रमाणें दुर्योधनानें न ऐकल्यामुळें, शेवटीं युद्धच उपस्थित होऊन, त्यांत हिचे सर्व पुत्र मरण पावले. त्यावरुन हिनें कोपेंकरुन कृष्णास जवळ बोलावून शाप दिला कीं, तूं पांडवांस साह्य होऊन, माझे पुत्र मारविलेस, यास्तव आजपासून छत्तिसाव्या वर्षी तुझाहि असाच कुलक्षय होईल. त्यावरुन कृष्ण हिला वंदन करून, मला हें इष्टच आहे असें म्हणून तेथून माघारा परतला. ( भार० स्त्रीपर्व० अ० २५ ).

दुर्योधनादिक शतपुत्र मेल्यावर, ही पतीसहवर्तमान बराच काळ पांडवांजवळ होती; कारण युधिष्ठिर हा स्वभावानें उत्तम होता म्हणून त्यानें कोणत्याहि गोष्टीची हिला न्यूनता पडूं दिली नाहीं; परंतु भीमसेनानें वाग्वज्रेंकरून एकादे वेळेस तरी ताडन करावें, त्यावरुन धृतराष्ट्रास वैराग्य झालें;पण अंध असल्यामुळें निरुपाय झाला आहे, इतक्यांत विदुर आला. त्यानें त्यास वनांत निघण्याविषयीं सांगताच, तो तत्काळ कोणासहि न कळूं देतां अरण्यांत निघून गेला. त्यासमागमें ही, विदुर, आणि विदुर निघतांच कुंती, याप्रमाणें वनांत निघून गेलीं. नंतर कांहीं कालानें धृतराष्ट्राचा देहपात झाला असें पाहून, हिनेंहि आपला देहत्याग केला. ( भाग० १ स्कं० अ० १३ ).

**गाधि**-( सो० वं० )विजयकुलोत्पन्न कुशांबु राजाचा पुत्र. हा कान्यकुब्ज देशाचा राजा असून, यास एकच प्रथमतः सत्यवती ना० कन्या होती. ( भार० वन० अ० ११५ ). या सत्यवतीची ऋचीक ऋषीनें, यासमीप भार्यार्थ याचना केली असतां,तिला यानें त्यास विवाहविधीनें दिलें. ( ऋचीक श० पहा ). त्यावरुन पुढें यास विश्वामित्र नांवाचा पुत्र झाला होता.

**गानबंधु**-प्रस्तुत जो वाराहकल्प चालला आहे, यापूर्वी घोरकल्पांत हा एक अत्यंत नामांकित गायनाचार्य होऊन गेलेला आहे. यापासून त्यावेळच्या नारदानें गायनशिक्षा घेतली होती. हा उलूकयोनीस कांहीं कारणानें पावला होता. ( वा० रा० अद्भुतोत्तर० स० ७ ).

**गायत्री**-सावित्री, सरस्वती या नामांतरांनीं ब्रह्मदेवाची ज्ञानशक्ति.

२-ईश्वरप्रार्थना करण्याचा त्रिपदात्मक मंत्र.

**गायन**-एक ब्रह्मर्षि. (३ भृगु श० पहा).

**गारुड**-अथर्वणवेदोपनिषत्.

**गार्ग**-विश्वामित्राचा पुत्र एक ऋषि.

**गार्गी**-वचक्नु ऋषीची कन्या म्हणून, हिला गार्गीवाचक्नवी असें नांव ग्रंथांत आहे. ही परमब्रह्मनिष्ठ असून, परमहंसाप्रमाणें पृथ्वीवर संचार करीत असे. हिचा दैवराति जनकाच्या सभेंत, याज्ञवल्क्याशीं वाद झालेला, बृहदारण्यकांतील मधुकांडांत प्रसिद्ध आहे.

**गार्ग्य**-एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

२-अंगिराकुलोत्पन्न अन्य ऋषि. हा केकयदेशाधिपति युधाजित् राजाचा पुरोहित होता. (वा० रा० उत्तर० स० १०० ).

३-सोमवंशीय पूरुकुलोत्पन्न गर्ग, शिनि इ०कांच्या संततीस नांव, व ती संतति तपानें ब्राह्मणत्वही पावलेली अशी असे.

**गार्दभि**-एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

२–विश्वामित्राच्या पुत्रांतील एक.

**गार्हपत्य**–एक अग्नि. हे नामांतर, पवमान् ना० अग्नीसच आहे.

**गार्हायन**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**गालव**–ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

२–विश्वामित्र ऋषींचा पुत्र. यास हें नांव पडण्यास कारण असें झालें होतें कीं, एके काळीं मोठें अवर्षण पडलें. तेव्हां विश्वामित्र,आपल्या स्त्रीस व पुत्रांस,त्यांचें होईल तसें होवो असें म्हणून सोडून तपश्चर्येस गेला. पुढें त्याच्या स्त्रीनें, बराच काळपर्यंत मुलें कसें तरी करून जगविलीं; परंतु एकदां असें झालें कीं, कांहींच निर्वाहास मिळेना, तेव्हां तिनें निरुपाय होऊन एका पुत्राच्या गळ्यास दर्भरज्जु बांधिला, आणि त्यास कोठेंतरी विकावें म्हणून तीं घेऊन चालली.इतक्यांत सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न सत्यव्रत राजा तिला मार्गांत भेटला. त्यानें बालकाच्या गळ्यास रज्जु पाहून तिला पुसलें, हें तूं काय करीत आहेस ? त्यावरून तिनें यथार्थ वृत्त निवेदन केलें. तें ऐकून तो म्हणाला, असें करूं नको, तुझा पति येईपर्यंत मी तुला थोडें मांस आणून देत जाईन, त्यावर तूं आपला, व मुलांचा निर्वाह करीत जा. तें ऐकतांच तिनें केलेला विचार रहित करून, राजा जें मांस आणून देइ त्यावर निर्वाह चालविला. तेव्हांपासून त्या मुलास गळ्यास रज्जु बांधल्याकारणानें गालव असें नांव पडलें तें पडलें. ( देवी०भा० सप्तम० अ० १० ).

३–विश्वामित्र ऋषींचा शिष्य. यानें विश्वामित्राची शतवर्षकालपरिमित अत्युत्कृष्ट सेवा करून,त्याची पूर्ण कृपा संपादन केली होती., त्यावरून विश्वामित्रानें यास, तुला संपूर्ण विद्या प्राप्त होतील असा आशीर्वाद देऊन, स्वाश्रमीं जाण्याची आज्ञा दिली. असें असून यानें पुनः विश्वामित्रास विनंति केली कीं, माझ्या मनांत आपण कांहीं दक्षिणा मागावी असें आहे. तें ऐकून विश्वामित्र म्हणाला,मला गुरुदक्षिणा आतां नको;कारण तुझ्या सेवेनें मी अति तुष्ट आहे. यास्तव स्वस्थांतःकरणानें घरीं जा. परंतु यानें सत्वर उमजून जावें तें न जातां, आग्रह धरिला कीं, कांहीं तरी मागाच. त्यावरून विश्वामित्र यास किंचित् रोषानें म्हणाला कीं, बरें तर, आठशें श्याम कर्ण अश्व मला सत्वर आणून देऊन, नंतर आपल्या घरीं जा. ( भार० उद्योग० अ० १६ ).

याप्रमाणें विश्वामित्र बोलतांच, हा भयभीत झाला; परंतु आतां कांहीं उपाय नाहीं असें जाणून, विश्वामित्रास वंदन करीत होत्साता तेथून निघून विचार करूं लागला कीं, पुढें कसें करावें ! आठशें श्यामकर्ण अश्व मला मिळतात कसे ! जर अश्व मिळाले तर बरें, नाहीं तर ठीक नाहीं. नंतर यानें विष्णूचें आराधन आरंभिलें, व मनांत निश्चय केला कीं, अश्व मिळाले तरच देह ठेवायाचा,नाहीं तर नाहीं. सारांश, यानें विष्णूचें आराधन बरेच दिवस केलें, त्यावरून विष्णूनें याकडे गरुडास पाठवून, याचें कार्य करण्याची त्यास आज्ञा केली. तांवरून गरुड येऊन यास म्हणूं लागला कीं, मी तुझें काय इष्ट करावें तें सांग. यानें गरुडास अश्व मला पाहिजे आहेत असें प्रथमच सांगावें तें न सांगतां, व्यग्रचित्त झाल्यामुळें त्यास म्हणाला कीं,मला संपूर्ण दिशा पाहण्याची इच्छा आहे, यास्तव तेवढ्या मला दाखीव. त्यावरून गरुडानें यास आपल्या खांद्यावर घेतलें, व संपूर्ण दिशा दाखविल्या. त्या पाहून याला पराकाष्ठेचें आश्चर्य होऊन, यानें गरुडास म्हटलें, आतां मी येथेंच राहातों, कारण मला देहत्याग कर्तव्य आहे. तें ऐकून गरुडानें पुसलें, तूं देह किमर्थ त्यागणार ? व असा दुर्लभ देह त्यागीन म्हणणें तुजसारिख्यास योग्यहि नाहीं. यास्तव तुझा काय हेतु असेल तो वास्तविक सांग. तेव्हां यानें सांगितलें कीं, मला आठशें श्यामकर्ण अश्व विश्वामित्रास गुरुदक्षिणा देणें आहेत, ते मिळणें कठीण, यास्तव मी तसें करणार. तेव्हां गरुड म्हणाला, असें होतें तर पूर्वींच कां बोलला नाहींस ? अस्तु, असें म्हणून त्यानें यास खांद्यावर घेतलें, आणि ययाति राजाकडे तो जाण्यास निघाला, मार्गांत ऋषभपर्वतावर शांडिली ना० कोणी महातपस्विनी ब्राह्मणी होती, तिचें दर्शन घ्यावें म्हणून तो तेथें उतरला. तिनें यांचा सत्कार करून ठेवून घेतलें. ( २ शांडिली श० पहा ). नंतर गरुड यास घेऊन, ययाति राजाकडे आला, व त्यास म्हणाला कीं, या ब्राह्मणास आठशें श्यामकर्ण अश्व पाहिजे आहेत, तर ते तूं यास कसें तरी करून द्यावेस, इतकें बोलून गरुड स्वस्थळीं गेला. ( भार० उद्योग० अ० १०८–११४ ).

ययाति राजाही, शतावधि यज्ञ करून, त्या सर्वांपासून उपरम पावल्यामुळें, बहुत काळ झाला होता तरी अरण्यांत होता, म्हणून त्याजवळही त्या समयीं अश्व नव्हते इतकेंच नव्हे,तर याची संभावना होण्यासारखें त्याजवळ द्रव्य सुद्धां नव्हतें. त्यावरून त्यास या ब्राह्मणाचा संतोष कसा करावा त्याची विवंचना पडली. इतक्यांत त्याला विचार सुचून, त्यानें यास

म्हटलें, गालवा, ही माझी माधवी कन्या आहे, ही तूं घेऊन जा, आणि हिला, कोणीतरी समर्थ राजास विकून, आठशें श्यामकर्ण त्यापासून घे, व गुरूस अर्पण कर. तें ऐकून गालव माधवीस घेऊन निघाला, तो प्रथम इक्ष्वाकुकुलोत्पन्न अनरण्य राजाचा पुत्र हर्यश्व त्याजकडे येऊन, त्यास, ही कन्या घेऊन मला आठशें श्यामकर्ण अश्व दे असें म्हणूं लागला. परंतु हर्यश्वानें सांगितलें, तूं मागतोस इतके अश्व मजजवळ नाहींत, दोनशें मात्र आहेत. यास्तव येवढेच पाहिजे असतील, तर माधवीस मजपासून एक पुत्र होईपर्यंत मजजवळ ठेव, आणि मग हिला घेऊन जा; तसें करणें नसेल, तर तुझें समग्र कार्य जेथें घडून येईल तिकडे हिला ने. तेव्हां गालव, कसें करावें या विचारांत पडला; तें पाहून माधवी गालवास म्हणाली, तूं विचार कशाचा करतोस ? दोनशें अश्व मिळत आहेत, येवढे हस्तगत करून घे, मी या राजाजवळ एक पुत्र होईपर्यंत राहत्यें. नंतर मला दुसरीकडे नेऊन शेष अश्वांची भरती करून घे. असें माधवीचें वाक्य ऐकून गालवानें हिला हर्यश्वाजवळ ठेविलें असतां, त्यापासून तिला, वसुमना ना० पुत्र झाला. नंतर गालवानें हर्यश्वास सांगितलें कीं, हे अश्व सध्यां तुजपाशींच असूंदेत, माझी भरती होतांच हे मी घेऊन जाईन. या गोष्टीस हर्यश्वानें तथास्तु म्हणतांच, हा तेथून माधवीस घेऊन निघून,सोमवंशीय आयुकुलोत्पन्न क्षत्रवृद्धवंशज दिवोदास राजा त्याकडे गेला, व त्यास, ही कन्या देऊन साहाशें अश्व मागूं लागला. त्यानेंही मजजवळ दोनशें आहेत, अधिक नाहींत असें म्हणतांच, पूर्ववत् नियमाप्रमाणें माधवीस यानें त्याजवळ ठेविलें. तेथें तिला त्यापासून प्रतर्दनपुत्र होतांच, आपले अश्व, त्यासच कांहीं काळपर्यंत संभाळण्यास सांगून, यानें मातक्यान माधवीस समागमें घेतलें, व भोजनगरीच्या उशीनर राजाकडे येऊन, त्याला, ही कन्या तूं घेऊन, मला चारशें श्यामकर्ण अश्व दे, अशी याचना केली. परंतु त्यानेंही, मजजवळ दोनशेंच आहेत असें म्हटल्यावरून, पूर्वोक्त नियमानुसार माधवीस तेथें ठेविलें. नंतर त्यापासून माधवीस शिबि ना० पुत्र होतांच; दोनशें आपले अश्व त्यासच अल्पकाळपर्यंत संभाळण्यास सांगून, तेथून माधवीस घेऊन पुष्कळ हिंडला;परंतु आणखी दोनशांची भरती कोठेंही होईना. असें पाहून शेवटीं कंटाळला, व मिळालेले साहाशें अश्व, आणि माधवी तिला घेऊन हा, विश्वामित्राकडेसच आला, व मागील सर्व वृत्त निवेदन करून म्हणाला कीं, हे साहाशें अश्व आणिले आहेत, येवढे घेऊन, या कन्येच्या द्वारें अवशिष्ठ दोनशें अश्वांची भरती करून घ्यावी.असें ऐकून विश्वामित्र म्हणाला, बरें आहे. नंतर त्यापासून माधवीस, अष्टक नांवाचा पुत्र होतांच, विश्वामित्रानें गालवास म्हटलें कीं, आम्ही गुरुदक्षिणा भरून पावलों, तर ही कन्या घे, व आश्रमास जा. त्यावरून गालव तेथून विश्वामित्रास वंदन करून निघाला, व ययातीकडे येऊन, ती माधवी कन्या त्याची त्यास परत दिली, व राजास आशीर्वाद देऊन, आपल्या आश्रमास गमन करिता झाला. ( भार० उद्योग० अ० ११५-११९ ).

४-कुंतलराजाचा पुरोहित एक ऋषि. ( १ चंद्रहास श० पहा ).

५-आठव्या सावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षींतील एक.

**गालवि**-एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ). यासच गालवित् असेंही नांव असेल.

**गालवित्**-गालवि ऋषि तोच असेल.

**गावल्गणि** अ० **गावल्गाणि**-धृतराष्ट्राचा सारथि जो गवल्गण त्याचा संजय ना० पुत्र तो. "चक्षुषा संजयो राजन् दिव्येनैव समन्वितः ।। कथयिष्यति ते युद्धं सर्वज्ञश्च भविष्यति ॥ १० ॥ प्रकाशं वाऽप्रकाशं वा दिवा वा यदि वा निशि ।। मनसा चिंतितमपि सर्व वेत्स्यति संजयः ॥ ११ ॥ नैनं शस्त्राणि छेत्स्यंति नैनं बाधिष्यते श्रमः ॥ गावल्गणिरयं जीवन् युद्धादस्माद्विमोक्ष्यति ।। १२ ।। ( भार० भीष्म० अ०२). व्यासधृतराष्ट्रसंवाद.

**गिरि**-श्वफल्क यादवाच्या तेरा पुत्रांतील एक.

**गिरिकर्णिका**-भारतवर्षीय नदी. ( भार० भीष्म० अ० ९).

**गिरिका**-उपरिचरवसु राजाची स्त्री. हिला बृहद्रथादिक साहा पुत्र, व काली अ० मत्स्यगंधिनी ना० कन्या वसुराजापासून झाली होती. ही गिरिका कोलाहल पर्वतापासून, शुक्तिमती नदीच्या ठायीं झालेल्या युग्मांतील कन्या.

**गिरिव्रज**-केकयदेशाची राजधानी. ( वा० रा० अयो० स० ६८ ).

२-मगध देशाची राजधानी. हिची स्थापना उपरिचरवसु राजानें केली होती म्हणून हिला वसुमती असेंही म्हणत असत. ( वा० रा० बाल० स० ३३ ). पांड-

वांच्या वेळेस हींत जरासंध राजा होता, पुढें त्याचा पुत्र सहदेव झाला.

**गी**–वाणीची देवता सरस्वती ती.

**गीष्पति**–अग्नि, व बृहस्पति.

**गुडाकेश**–निद्रेचा जय केल्यानें पंडुपुत्र अर्जुनास हें नांव असे.

**गुणकेशी**–इंद्रसारथि जो मातली, त्यापासून त्याची भार्या सुधर्मा तिच्या ठायीं झालेली कन्या. ही, उपवर झाली असतां हिजकरतां मातलीनें देव, मनुष्य, राक्षस, इ० कांत पुष्कळ वर पाहिले; परंतु त्याच्या मनास कोणीच येईना. शेवटीं तो नागलोकांत गेला, व तेथें त्यास आर्यक ना० नागाचा पौत्र, चिकुर नागाचा पुत्र, अ० वामन नागाचा दौहित्र, ज्यास सुमुख असें नांव होतें, तो रुचला. नंतर त्याशीं हिचा विवाह करणार, इतक्यांत त्यास असें कळलें कीं, त्याशीं गरुडाचें मोठें वैर आहे. त्यावरून मातली सुमुखास घेऊन इंद्राकडे आला, आणि म्हणाला कीं, हा मी जामात योजिला आहे, तर यास तुम्ही मज-करितां अमृत देऊन अमर करावें. तें इंद्रानें मान्य केलें, व विष्णूनेंही गरुडास सांगून सुमुखावरील त्याचा असलेला वैरभाव टाकविला. पुढें हिचा सुमुखाशीं विवाह झाला. ( भार० उद्योग० अ० ९७–१०५ ). कृष्णधृतराष्ट्रसंवाद.

**गुणवती**–सिंव्हलद्वीपींच्या चंद्रसेन राजाची स्त्री.

**गुप्तक**–एक सामान्य राजा. ( ३ जयद्रथ श० पहा ).

**गुरु**–ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ). बृहस्पतीस म्हणतात हें प्रसिद्धच आहे.

२–( सो० वं० ) पुरुकुलोत्पन्न मन्युपुत्र नर त्याचा पौत्र, संकृति राजाचा पुत्र. यास गुरुधि हेंही नांव आहे.

**गुरुधि**–द्वितीयार्थक गुरु तोच.

**गुरुवीत्**–तृतीयार्थक अंगिराकुलोत्पन्न ब्रह्मर्षि.

**गुर्वक्ष**–बली दैत्याच्या शतपुत्रांतील एक.

**गुह**–कार्तिकेयास नांव.

२–शृंगवेर ना० पुरीचा किराताधिपति. हा दशरथाचा परममित्र होता. राम अयोध्येहून निघून दंडकारण्यांत चालला असतां, एक रात्र तेथेंहि राहिला होता, व त्यावेळेस यानें, रामाचें फलमूलांनीं आतिथ्य करून, हें नगर तुझेंच आहे, यास्तव येथेंच आपल्या अरण्य-वासाचीं वर्षें घालीव म्हणून आग्रह केला. परंतु रामानें, यानें आणलेल्या फलादिकांस हस्तानें स्पर्श मात्र करून, परानें दिलेलें मला भक्षण कर्तव्य नाहीं, व नगरांतही चतुर्दश वर्षेंपर्यंत प्रवेश करणें नाहीं असें यास सांगून, दर्भांवर सीतेसह येथें रात्रीं निद्रा केली. नंतर लक्ष्मण, व हा, उभे राहून रामाचें संरक्षण करीत असतां, उभयतांचा प्रारब्धाच्या विचित्र गतीविषयीं पुष्कळ संवाद झाला. ( वा० रा० अयो० स० ५०–५१ ).

प्रातःकाल होतांच रामलक्ष्मणांनीं आपलें स्नान-संध्यादिक नित्यकर्म उरकून, वटदुग्धानें आपआपल्या जटा वाळिल्या, व यास, गंगेपलीकडे दक्षिणतीरीं आम्हांस उतर म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें यानें, राम, सीता, आणि लक्ष्मण, या तिघांस गंगेपार उत-रिलें. नंतर येथून रामलक्ष्मणांस पोहोंचविण्यास आ-लेला सुमंत्र, अयोध्येस माघारा परतला. ( वा० रा० अयो० स० ५२–५७ ).

राम, चित्रकूटपर्वतावर जाऊन राहिल्यावर, त्यास माघारें अयोध्येस आणावें म्हणून थोड्याच दिवसांनीं मोठ्या सेनेसहित भरत निघाला, तो येथेंच येऊन उतरला. त्यावरून, तो रामनाशार्थ चालला असावा, असा यास संशय येऊन, यानें आपली सेना सिद्ध कराविली; परंतु भरत तशा बुद्धीनें चालला नाहीं, असें यास कळल्यावर, त्यानेंही गंगेपार आह्मांस कर म्हणतांच, त्यास यानें गंगेपलीकडे सैन्यासहित उत-रिलें, व आपण त्यासमागमें चित्रकूटापर्यंत गेला. ( वा० रा० अयो० स० ८४–९७ ).

**गृत्समद**–एक ऋषि. ( ३ भृगु श० पहा ). हा, वीत-हव्य राजा भृगुवचनानें ब्राह्मणत्व पावल्यावर, त्यास झालेला पुत्र. याचा पुत्र सुचेता. (वीतहव्य श० पहा).

२–दंडकारण्यांत राहणारा कोणी एक ऋषि. यास शत पुत्र होते. ( वा० रा० अद्भुतो० स० ८ ).

३–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न सुहोत्र राजाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. यास शुनक नांवाचा पुत्र होता.

**गृध्र**–कृष्णास मित्रविंदेपासून झालेला पुत्र.

**गृध्रकूट**–भारतवर्षीय पर्वत.

**गृध्रिका**–ताम्रेच्याठायीं कश्यपास झालेली कन्या.

**गोकर्ण**–हिमालयपर्वतावरील तीर्थवि०.

२–निषधपर्वतावरील तपोवन. ( भार० भीष्म० अ० ६ श्लो० ५१ ).

३–काशीपुरींतील स्थलवि०.

४–एक सामान्य पर्वत. ( वा० रा० सुंदर० स० ३५ ).

५–दंडकारण्यांतील क्षेत्रवि०. येथें कुंभकर्णानें तप केलें होतें.

**गोकामुख**–भारतवर्षीय सामान्य पर्वत.

**गोणीपति**–एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**गोतीर्थ**–नैमिषारण्यांतील एक तीर्थ, व प्रयागसंबंधी तीर्थ.

**गोत्रवान्**–कृष्णास लक्ष्मणेपासून झालेला पुत्र.

**गोदा अ० गोदावरी**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( सह्याद्रि श० पहा ).

**गोध्र**–भारतवर्षीय महादेश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**गोप**–एक गंधर्व.

**गोपति**–महादेव.

२–कश्यपस्त्री मुनी तिजपासून झालेल्या गंधर्वांतील एक.

३–सिंहसेन राजाचा पिता एक पांचाल. ( भार० द्रोण० अ० २३ ). हा पांडवपक्षीय होता.

४–गार्यांनीं अरण्यांत रक्षिलेला शिबिपुत्र तो. ( भार० शांति० अ० ४९ श्लो० ७९ ).

**गोपन**–एक ब्रह्मर्षि. ( २ अत्रि श० पहा ).

**गोपराष्ट्र**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**गोपालकक्ष**–आग्नेयकोसल, आणि ईशान्यकोसल यांमधील भरतखंडस्थ देश. ( भार० सभा० अ० ३० ).

**गोपालतपन**–अथर्वणवेदोपनिषत्.

**गोपालि**–गौरपराशरकुलोत्पन्न एक ऋषि.

**गोपाली**–एक अप्सराविं०.

**गोप्रतार**–सरयूनदीसंबंधीं तीर्थविं०. ( वा० रा० उत्तर० स० ११० ).

**गोभानु**–( सो० वं० ) तुर्वसुपुत्र वन्हिराजा, त्याच्या दोन पुत्रांतील एक. याचें नांव वंशावळींत नाहीं.

**गोभिल**–ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**गोमंत**–क्षेत्रविं०.

२–पर्वतविं०. जरासंधाच्या त्रासानें कृष्णबलराम, याबर कांहीं दिवस राहिले होते.

**गोमंतक**–भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**गोमती**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( २ हिमालय श० पहा ).

२–विश्वभुक् अग्नीची स्त्री.

**गोमयान**–एक ऋषि. ( २ कश्यप श० पहा ).

**गोमुख**–मातलीचा पुत्र, इंद्रपुत्र जयंताचा सारथि. ( भार० उद्योग० अ० १०० श्लो० ८ ).

२–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**गोमेदगांधिक**–ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**गोरथ**–मगधदेशाची राजधानी गिरिव्रज, तीसमीपच्या पांच सामान्य पर्वतांतील एक.

**गोलभ**–गंधर्वविं०. याचें वालीशीं सतत पंधरा वर्षे युद्ध चालून, शेवटीं हा त्याच्या हातून मरण पावला. ( वा० रा० किष्किं० स० २२ श्लो० २७–३० ).

**गोलोक**–श्रुतिप्रतिपाद्य पृथ्वीच्या उपरिभागीं लोक सात असें असतां, हा लोक पुराणांत आढळतो, म्हणून तदंतःपाती असावा असें वाटतें; कारण सत्यलोकावर मुळीं लोकच नाहीं. वैकुंठ व कैलास जरी असले, तरी तेहि सत्यलोकांतच अंतर्भूत असणें श्रुतीवरून म्हटलें पाहिजे. अर्थात् इतरांची काय कथा ?

**गोवर्द्धन**–यमुनातीरीं वृंदावनासमीप असणारा सामान्य पर्वत.

**गोवासन**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. हा शैब्य होता. ( भार० द्रोण० अ० ९५ ).

**गोशृंग**–निषादभूमि, व पटच्चर यांच्या दक्षिणेकडील एक सामान्य पर्वत. येथें पांडवांच्या वेळेस श्रेणिमान् राजा होता. ( भार० स० अ० ३१ ).

**गोष्ठायन**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**गौ**–मानस ना० पितरांची कन्या.

२–चालू मन्वंतरांतील पुलस्त्य ऋषीची स्त्री. सूर्यवंशीय नरिष्यंत राजाचा पौत्र तृणबिंदु राजर्षि त्याची कन्या. हिचा पुत्र विश्रवा ऋषि. ( भार० वन० अ० २७४ ).

३–सोमवंशीय पूरुकुलोत्पन्न ब्रह्मदत्त राजाची स्त्री, हिला सरस्वती अ० सन्नति असें नामांतर होतें. ( पितृवर्ती श० पहा ).

४–शमीक ऋषीची स्त्री, शृंगी ऋषीची माता.

५–वरुणाचा पुत्र व बलाध्यक्ष. ( वा० रा० उत्तर० स० २३ ).

**गौडिनि**–एक ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**गौतम**–चालू मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक. हा ब्रह्ममानसकन्या अहल्येचा पति. ( १ अहल्या श० पहा ). हा प्रति माघमासीं संचार करण्यास सूर्यासमागमें असावा असें वाटतें. ( तपा श० पहा ). याचा पुत्र शतानंद ऋषि, तोच विदेहवंशीय राजांचा पुरोहित असे.

२–अंगिराकुलांतील एक प्रख्यात वंशविस्तारक ऋषि. ( ३ अंगिरा श० पहा ).

३–अंगिराकुलांतीलच दुसरा ऋषि. हा चालू मन्वंतरांतल्या विसाव्या पर्ययांतील ( चौकडींतील ) व्यास असावा असें वाटतें. ( व्यास श० पहा ).

४–कौशिक ऋषीचा शिष्य. हाच रामसभेंतल्या धर्मशास्त्र्यांतील एक असावा. ( वा० रा० अद्भुतोत्तर० स० ४ ).

५-एकत, द्वित, त्रित, या तीन ऋषींचा पिता. ( भार० शल्य० अ० ३६ ).

६-विंध्याश्व राजाची कन्या अहल्या तिचा पति. शतानंद आणि चिरकारी ऋषि, यांचा पिता. (२ अहल्या श० पहा ).

७-दीर्घतमा ऋषींचा पुत्र तो. गोदावरीस गौतमी नांव ज्याच्या योगानें पडलें, तो हाच असेल. ( देवीभा० ११ स्कं० अ० ९ ).

८-एक ब्रह्मर्षि. ( २ आत्रि श० पहा ). (भार० वन० अ० १८५ आणि २९८ ).

९-कृपाचार्यांस क्वचित् म्हटलेलें आढळतें. ( भार० उद्योग० अ० १६४ श्लो० ६ ).

१०-एक कृतघ्न ब्राह्मण. ( भार० शांति० अ० १६८-१७३ ).

**गौतमी**-एक वृद्ध ब्राह्मणी. ( अर्जुनक श० पहा ).

**गौपायन**-ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**गौरग्रीव**-ब्रह्मर्षि. ( २ अत्रि श० पहा ).

**गौरजिन**- ,, ,,

**गौरथ**-ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**गौरपराशर**-एक ऋषि. ( पराशर श० पहा ). या कुलांत कांड्वष, वाहनप, जैह्मप, भौमतापन आणि गोपालि, हे प्रख्यात ऋषि होते.

**गौरपृष्ठ**-एक राजर्षि.

**गौरप्रभ**-शुकाचार्यास पीवरीपासून झालेल्या पांच पुत्रांतील एक.

**गौरमुख**-शमीक ऋषींचा शिष्य. यानें, गुरूच्या आज्ञेवरून परीक्षित् राजास, त्याकडे जाऊन त्याचा मृत्यु कळविला.

**गौरवीति**-ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**गौरशिरा**-एक ऋषि. ठिकाण आढळत नाहीं.

**गौराश्व**-एक राजर्षि. ठिकाण आढळत नाहीं.

**गौरी**-पूर्वी पार्वती श्यामवर्ण असल्यामुळें, महादेवानें एकदां लीलेनें तिला काली असें म्हटलें, त्यावरून तिनें तपेंकरून गौरवर्ण प्राप्त करून घेऊन, हें नांव संपादन केलें. ( मत्स्य० अ० १५६ ).

२-स्वायंभुवमन्वंतरांतील पश्चिमदिग्पाल वरुणाची स्त्री ती. ( भार० उद्योग० अ० १७१ ).

**गौरीकल्प**-चालू ब्राह्ममासांतील पुढें येणारा अठ्ठाविसावा दिवस. ( ४ कल्प श० पहा ). या कल्पांत गौरीचा अवतार प्रथम होणार आहे.

**गौरीशिखर**-हें कोणत्या पर्वताचें शृंग तें आढळत नाहीं. परंतु यावर स्तनकुंड तीर्थ आहे.

**ग्रंथिक**-अज्ञातवासकाळीं सहदेवानें विराटगृहीं धारण केलेलें नांव. ( भार० विराट० अ० ३ ).

**ग्रसन**-तारकासुराचा सेनापति एक असुर. याचें तारकामयसंग्रामांत यमाशीं मोठें युद्ध होऊन शेवटीं यास विष्णूनें मारलें. ( मत्स्य० अ० १५० ).

**ग्रह**-रवि, सोम, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु आणि केतु, अशीं नऊ मंडळें, व त्यांवरील तत्तन्नामक अधिपति तो प्रत्येक. नक्षत्रें जरी ग्रहांत नाहींत, तरी तींहि सर्व मंडळेंच आहेत.

**श्लोक.**

वसंति सर्वदेवाश्च स्थानान्येतानि सर्वशः ॥ मन्वंतरेषु सर्वेषु ऋक्षसूर्यग्रहाश्रयाः ॥८॥ तेन ग्रहा गृहाण्येव तदाख्यास्ते भवंति च ॥ सौरं सूर्योऽविशत्स्थानं सौम्यं सोमस्तथैव च ॥९॥ नक्षत्राणि च सर्वाणि नक्षत्राणि विशंति च ॥ गृहाण्येतानि सर्वाणि ज्योतींषि सुकृतात्मनां ॥ १२ ॥ कल्पादौ संप्रवृत्तानि निर्मितानि स्वयंभुवा ॥ स्थानान्येतानि तिष्ठंति यावदाभूतसंप्लवं ॥१३॥ मन्वंतरेषु सर्वेषु देवस्थानानि तानि वै ॥ अभिमानिनोऽवतिष्ठंते देवाः स्थानं पुनः पुनः ॥१४॥ ( लिंगपु० अ० ६१ ).

या, वरील श्लोकांत संपूर्ण ग्रह आणि नक्षत्रें, हीं गृहतुल्य ( घराप्रमाणें ) स्थानें असून, कल्पप्रवृत्तीपासून तीं आहेतच, त्या स्थानांतून आपआपल्या पुण्यप्रभावाप्रमाणें तत्तत्स्थलाभिमानी देव, तेथें तेथें वास करितात. जसा सौरमंडलावर सूर्य, सौम्यमंडलावर सोम, शौक्रमंडलावर शुक्र, आणि याचप्रमाणें सर्व नक्षत्रें, यावरून कल्पसमाप्तिपर्यंत स्थानांत फेर अगदीं होत नाहीं. फेर होणें तो अधिपतींचा होतो असें दिसतें. याविषयीं प्रमाण.-**श्लोक.** " विवस्वान् दितेः पुत्रः सूर्यो वैवस्वतेंतरे ॥ द्युतिमान् ऋषिपुत्रस्तु सोमो देवो वसुः स्मृतः ॥ १७ ॥ ( लिंगपु० अ० ६१ ). म्हणजे चालू मन्वंतरांत आदितिपुत्र विवस्वान् ना० आदित्य सौरमंडलाधिपति मुख्यत्वानें असून, सोम ना० वसु चंद्रमंडलाधिपति आहे. अर्थात् साहा मन्वंतरांपर्यंत दुसऱ्या कोणाचें या मंडलांवर आधिपत्य होतें, यांचें नव्हतें. याचप्रमाणें इतरांविषयीं जाणावें.

वर जो रवीपासून शनीपर्यंत ग्रहांचा क्रम लिहिला आहे, त्यांत राहु आणि केतु, हे दोन तामस ग्रह (अंधकारयुक्त काळे ग्रह ) असल्यामुळें शिवाय करून, इतर पृथिवीपासून एकावर एक उंच असून, तिच्या उपरिभागीं वरचेवरच मेरुसभोंवते फिरत होत्साते, त्यांच्या अनुसारेंकरून वारांचा क्रम सर्व देशांतून एकसारखा चालत असलेला अजून बदलला नाहीं, व पुढेंहि कधीं बदलणार नाहीं. जर बदलताच तर, भास्कराचार्यानें पृथिवीच्या उपरिभागीं पहिला ग्रह चंद्र मानिला असून, न्यूटनादिक ज्योतिष्यांनीं बुध मानिला असल्यामुळें, ज्या दिवशीं आमचा रविवार, त्या दिवशीं वरील ज्योतिष्यांचे क्रमानें सोमवार व बुधवार असावेत, ते जेव्हां त्यांचे तसे नाहींत तेव्हां, त्यांनीं केलेल्या कल्पना केवळ व्यवहारनिर्वाहार्थच होत; पारमार्थिक नव्हत असें सिद्ध होतें.

आतां राहु आणि केतु हे जे दोन ग्रह म्हणजे तीं मंडलें, त्यांची व्यवस्था अशी आहे कीं, राहुमंडल, चंद्र व सूर्य यांच्यामध्यें असून, केतुमंडळ पृथिवी आणि सूर्य यांच्यामध्यें आहे, व त्यामुळेंच तीं मंडलें, अनुक्रमानें चंद्रसूर्यमंडलांच्या ग्रहणास कारण होत आहेत. ( छादयत्यर्कमिंदुर्विधुंभूमिभा ) म्हणजे सूर्यग्रहण होण्यास कारण चंद्र आणि चंद्रग्रहणास कारण पृथिवी, हें सूर्यसिद्धांतांतील वाक्य, केवळ काल्पनिक अतएव असत् होय. ( राहु श० पहा ).

**ग्रामणि**–एक गंधर्व. ( ११ ऋषभ श० पहा ).

**ग्रामद**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

**ग्राम्यायनि**– ,, ,,

---

## घ

**घटसृंजय**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**घंटाकर्ण**–शिवगणवि०. हा, शिवनाम अ० त्याचे गुणानुवाद, यांशिवाय अन्य कांहींच श्रवणांत येऊं नये, म्हणून निरंतर कानांत घंटा बांधीत असे. त्यामुळें यास असें नांव पडलें होतें. यावरून हा विलक्षण ईश्वरोपासक होता, असें दिसतें.

**घंटेश**–मंगळाचा पुत्र.

**घंटेश्वर**–भारतवर्षीय तीर्थ.

**घटोत्कच**–पंडुपुत्र भीमसेनापासून हिडिंबा राक्षसीच्या ठायीं झालेला पुत्र. हा जन्मला त्या काळीं, याचा मस्तक घटाप्रमाणें मोठा असून त्यास केश अगदीं नव्हते, म्हणून याचें असें नांव पडलें होतें. याशिवाय पितृमातृसंबंधानें याला भैम्य, भैमसेनि, हैडिंब, हैडिंबेय, अशींहि नांवें असत. ( भार० आदि० अ० १५५ ). हा जन्मून अमळ मोठा झाल्यावर, हिडिंबा, यास घेऊन कुंतीकडे आली होती, व तिनें तिला, आणि सर्व पांडवांना हा पुत्र दाखविला होता याचा विवाह झाला होता; परंतु स्त्रीचें नांव ग्रंथांत आढळत नाहीं. तरी यास अंजनपर्वा आणि मेघवर्ण, असे दोन पुत्र होते इतकें आढळतें.

घटोत्कच नेहमीं आपल्या मातेजवळच राही, पांडवांजवळ राहात नसे, म्हणून तो मोठा झाला असतां, हिडिंबेनें त्याकडून, गुप्त प्रकट होणें, पाहिजे तेव्हां पाहिजे तें व जेवढें पाहिजे तेवढें रूप धरणें, इ० अनेक राक्षसी विद्यांचा अभ्यास करविला होता. याशिवाय कोणी स्मरण केलें असतां, तेथें तत्काळ जाऊन उभें राहणें, हीहि विद्या त्यास अवगत होती. याविषयीं इतिहास असा आढळतो. पांडव वनवासांत असतां, तीर्थयात्रा करीत हिंडतेवेळीं, त्यांस हिमालयाच्या गंधमादनशिखरावर जाण्याचा प्रसंग आला. तेव्हां चढतां चढतां सर्व ऋषि व भीमावांचून द्रौपदीसहित इतर पांडव, इतके थकले कीं, त्यांच्यानें एक पाऊलहि पुढें टाकवेना, असें पाहून भीमसेन हा पांडवांस जरी नेण्यास समर्थ होता, तरी ऋषींसहित सर्वांस नेण्यास नव्हता, म्हणून त्यानें याचें स्मरण केलें. त्या काळीं हा तेथें तत्काळ प्रकट होऊन, यानें सर्वांस एकाच खेपेनें व एका क्षणांत पर्वतावर नेऊन नरनारायणाश्रमीं सोडलें. ( भार० वन० अ० १४५ ).

याचा दुसरा एक चमत्कारिक इतिहास असा आढळतो कीं, बलरामाची वत्सला म्हणून कन्या होती, ती अभिमन्यूस देऊं केली असतां, पांडव राज्यभ्रष्ट झाले असें पाहून, दुर्योधनानें ती, आपल्या लक्ष्मण पुत्रास मिळण्याविषयीं शकुनीकडून बलरामास सांगविलें. तें त्यानें मान्य केल्यावरून दुर्योधन मोठ्या समारंभानें लग्नाकरतां द्वारकेस गेला. त्या संधींत अभिमन्यूनें यास मागील वृत्त कळवून तिचा विवाह आपणाशीं झाला पाहिजे असें सांगितलें. त्यावरून यानें अभिमन्यूस द्वारकेस घेऊन जाऊन, कौरवांची, कृष्णानुमतें. दुर्दशा करून, तिचा विवाह अभिमन्यूशीं केला. हा इतिहास जैमिनिकृत भारतांतील वनपर्वांत आहे.

हा भारती युद्धांत पांडवांकडे होता. याची आकृति सहजींच भयंकर, व परमाविशाल असे, त्यामुळें याच्या रथांस आठ चक्रें असून, तो ओढण्यास शंभर अश्व लागत. याच्या रथावर गृध्रपक्ष्याचा ध्वज असून, हा

आपल्या हातांत युद्धसमयीं पौलस्त्य नांवाचें धनुष्य वागवीं, व याचें सारथ्य करणारा विरूपाक्ष नांवाचा राक्षस असे. (भार० द्रोण० अ० २३).

भीष्म रणांत पडल्यावर, द्रोणाचार्यांचें युद्ध प्रवृत्त होऊन, त्यांत जयद्रथ मरण पावला असतां दुर्योधनास दुःख व संताप होत्साता तो द्रोणाचार्यांस कांहीं न्यूनाधिक बोलला, त्यावरून द्रोणानें रात्रियुद्धाचा प्रसंग घालून अनिवार युद्ध केलें. परंतु त्यांत कर्णाचें युद्ध मोठें भयंकर होतें. त्यावरून कर्णावर चालून जाण्याविषयीं अर्जुन चळवळ करूं लागला असें पाहून कृष्णानें त्याचें निवारण करून सांगितलें कीं, जोंपर्यंत कर्णाजवळ वासवी शक्ति (इंद्रदत्त अस्त्र) आहे, तोंपर्यंत त्याच्यापुढें तुला जाणें निर्भय नाहीं. यास्तव मी सांगेन तसें ऐक. असें म्हणून त्यानें घटोत्कचास आपणाकडे येण्याची सूचना करवली, तीप्रमाणें तो आला असतां, कृष्णानें त्यास सांगितलें कीं, या प्रसंगीं तूंच कर्णाशीं युद्ध करावेंस; कारण हें निशायुद्ध असल्यामुळें, निशाचरस्वभावास्तव त्याशीं युद्ध करण्याचें तुला जसें बळ आहे, तसें इतरांस नाहीं.

ही कृष्णाज्ञा घटोत्कचानें मान्य करून, तो तत्काळ कर्णाकडे वळला, व त्याशीं त्यानें इतकें विलक्षण युद्ध आरंभिलें कीं, कर्णास त्यापासून मरणशंका प्राप्त झाली. तेव्हां कर्ण पुढें काय करावें, व हा कोणत्या उपायानें मरेल, असें चिंतन करीत आहे तों, ती त्याची शंका सदृढ झाली. तिचें कारण असें झालें, अलंबुष नांवाचा कोणी बलाढ्य राक्षस, दुर्योधनाज्ञेनें मध्येंच यावर चालून आलेला अनिवार युद्ध करणारा असून, त्यास यानें मारिलें व त्याचें मस्तक तोडून हातांत घेऊन दुर्योधनासमीप "रिक्तपाणिर्न पश्येत राजानं" हें वाक्य म्हणत जाऊन, त्यापुढें तें ठेविलें, आणि आतां कर्णाचेंही मस्तक असेंच घेऊन भेटीस येतों, इतकें बोलून माघारा उलटला. त्यावरून कर्णास अत्यंत भीति उत्पन्न होऊन, त्यानें यावर वासवी शक्ति सोडिली.

ती महादुर्धर शक्ति, कर्णानें, अर्जुनास मारण्याकरितां राखून ठेविलेली, निरुपाय होऊन सोडिली असतां, मोठा शब्द करीत यावर येऊन पडत आहे तों, आतां आपण हिच्या हातून वांचत नाहीं असें यानें जाणून, पर्वताएवढा मोठा देह धारण केला, व पांडवांच्या हिताकरितां कौरवसैन्यावर पडून, मोठ्या सैन्याच्या भागाचा चुराडा करीत, शक्ति वक्षस्थळावर आदळतांच प्राण सोडिला. (भार० द्रोण० अ० १७४–१७९).

**घटोदर**–रावणपक्षीय एक पुरातन राक्षस. (वा० रा० उत्तर० स० २७).

**घन**–लंकेंतील दुसरा एक नामांकित राक्षस. (वा० रा० सुंदर० स० ६).

**घर्घर**–भारतवर्षीय एक नद.

**घृणि**–स्वायंभू मन्वंतरांतल्या साहा मरीचि पुत्रांतील एक. (१ ऊर्णा श० पहा).

**घृतकौशिक**–एक ऋषि व कुल. (विश्वामित्र श०पहा).

**घृतच्युता**–कुशद्वीपांतील महानदी.

**घृतपृष्ठ**–प्रियव्रत राजाच्या दाहा पुत्रांतील साहावा. क्षीरोदानें वेष्टित जें क्रौंचद्वीप तेथील हा अधिपति होता. यानें, आपल्या द्वीपाचे वर्षसंज्ञक सात भाग करून, **आम, मधुरुह, मेघपृष्ठ, सुधामा, भ्राजिष्ठ, लोहितार्ण** आणि **वनस्पति** अशा आपल्या सात पुत्रांस त्यांचींच नांवें त्या त्या भागास देऊन विभागून दिले होते. (भाग० ५ स्कं० अ० १).

**घृतवती**–भारतवर्षीय नदी. (भार० भीष्म० अ० ९).

**घृताची**–कश्यपपत्नी प्राधा, तिला झालेल्या अप्सरांतील एक. ही प्रतिमाघमासीं संचार करण्यास सूर्यासमागमें असत्ये. (तपा श० पहा).

**घृतोद**–पृथ्वीवर जे सप्त महासमुद्र आहेत, त्यांतील एक. याचें वेष्टन कुशद्वीपास असून त्याच्या भोंवतें वर्तुलाकार क्रौंच द्वीप आहे. (भाग० ५ स्कं० अ० १).

**घोर**–वैवस्वत मन्वंतरांतील अंगिरा ऋषीच्या आठ पुत्रांतील एक. (३ अंगिरा श० पहा).

२–लंकेंतील एक राक्षस. (वा० रा० सुंदर० स० ५४).

**घोरकल्प**–(४ कल्प शब्द पहा). प्रस्तुत चालू जो ब्राह्म मास, त्यांतील हा पंचविसावा दिवस अ० कल्प होऊन गेला. या कल्पाची रात्र समाप्त होण्याच्या संधींत मत्स्यावतार झाला होता. व पुढें दिवस अ० कल्प जो निघाला, तोच हा वाराहकल्प सध्यां चालत आहे.

**घोष**–वैवस्वत मन्वंतरांतील धर्मऋषीस, लंबा ना० स्त्रीपासून, या संज्ञेचे झालेले पुत्र.

---

## च

**चक्र**–कुशद्वीपस्थ सप्तपर्वतांतील एक. (कुशद्वीप श० पहा).

२–भारतवर्षीय देश. (भार० भीष्म० अ० ९).

३–लंकेंतील रावणपक्षीय राक्षस. (वा० रा० सुंदर० स० ६).

**चक्रक**-विश्वामित्राच्या पुत्रांतील एक. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**चक्रधनु**-कपिलमुनीस नामांतर. (१ कपिल श० पहा).

**चक्रधर्मा**-एक विद्याधर.

**चक्रमाली**-रावणाच्या साचिवांतील एक.

**चक्रवाक**-भारतवर्षीय तीर्थ.

**चक्रवान्**-भरतवर्षाच्या पश्चिम दिशेकडील एक पर्वत.

**चक्रव्यूह**-सैन्यरचनेंतील एक भेदवि०.

**चक्रातय**-भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९).

**चक्रायण**-उपस्त ऋषीचा पिता.

**चक्री**-ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

२-चक्रधारण करण्यानें विष्णूस नांव.

**चंचला**-भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( ऋष्यवान् श० पहा ).

**चंचुलि**-एक ऋषि. ( १ विश्वामित्र श० पहा ).

**चंड**-शिवाच्या रुद्रगणांतील एक. यास चंडी, चंडीश, चंडेश्वर, चंडघंट इ० नामें आहेत. दक्षप्रजापतीच्या यज्ञविध्वंसकालीं यानें पूषा ना० ऋत्विजास बांधिलें होतें. ( भाग० ४ स्कं० अ० ५ ).

२-अष्ट भैरवांतील एक.

३-विष्णूच्या पार्षदगणांतील एक.

४-प्रलयमेघांतील चौथा मेघ.

५-मुंडाचा ज्येष्ठ भ्राता एक असुर. ( चंडमुंड श० पहा ).

६-रामसेनेंतील एक वानर. ( वा० रा० युद्ध० स० २६ ).

**चंडकौशिक**-एक ब्रह्मर्षि. याच्या प्रसादानें बृहद्रथ राजास जरासंध पुत्र झाला होता. ( २ बृहद्रथ श० पहा ).

**चंडबल**-रामसेनेंतील कुंभकर्णानें मारिलेला नामांकित वानर.

**चंडभार्गव**-च्यवनभार्गववंशीय एक ऋषि. हा जनमेजयानें केलेल्या सर्पसत्रांत होता ना० ऋत्विज झाला होता. ( ६ जनमेजय श० पहा ).

**चंडमुंड**-हे दोघे सहोदर होते. व शुंभनिशुंभास मिळून कालिकेच्या हातून मरण पावले होते. ( शुंभनिशुंभ श० पहा ).

**चंडाश्व**-सूर्यवंशीय कुवलाश्वपुत्र जो भद्राश्व त्यास नामांतर.

**चंडिका**-पार्वती.

**चंडी**-पार्वती.

२-उद्दालक ऋषीची स्त्री. ( २ उद्दालक श० पहा ).

**चंडोदरी**-अशोकवनिकेंतील एक राक्षसी. ( वा० रा० सुंदर० स० २४ ).

**चतुरंग**-( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न चित्ररथ अ० रोमपाद राजाचा पुत्र. याचा पुत्र पृथुलाक्ष.

**चतुरस्य**-एक राजर्षि. याचें विशेष कांहीं आढळत नाहीं.

**चतुर्मुख**-चार मुखांवरून ब्रह्मदेवास नांव. अशा अर्थाचीं पुष्कळ नांवें आहेत. परंतु तीं येथें घेतलीं नाहींत.

**चतुःशृंग**-कुशद्वीपस्थ पर्वत. ( कुशद्वीप श० पहा ).

**चंदनावती**-कुलिंद देशाची राजधानी. ( १ चंद्रहास श० पहा ).

**चंद्र**-प्रथम-द्वितीय-तृतीयार्थक सोम शब्द पहा.

२-कश्यपपत्नी दनु तिच्या पुत्रांतील एक.(दनु श० पहा).

३-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न विश्वग राजाचा पुत्र इंदु, त्याचें नामांतर.

४-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशवंशीय अनीह राजा, त्याच्या सहस्राश्व ना० द्वितीयपुत्रान्वयांत जन्मलेल्या भानु राजाचा पुत्र, यास श्रुतायु ना० पुत्र होता.

५-चतुर्दशरत्नांतील महादेवानें मस्तकीं धारण केला तो.

६-दाशरथि रामाच्या सुज्ञ ना० मंत्र्याच्या पुत्रांतील एक. ( कुशीलव श० पहा ).

७-कृष्णास सत्येपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**चंद्रकांत**-याज्ञवल्क्य ऋषीचा पुत्र. हा, महामेघ आणि विजय असे उभय बंधु व चौदा सहस्र शिष्य, यांसहित महादेवाचा शाप पावून राक्षसयोनीस प्राप्त झाला होत्साता खर, दूषण, व त्रिशिरा, या नांवांनीं प्रख्यात होता. अर्थात् मुख्यत्वेंकरून खर तो हाच होता. ( वा० रा० अर० स० १९ ).

२-चंद्रकेतुराजाचें नगर. हें कारूपथ देशाच्या उत्तरभागीं पूर्वी होतें. ( वा० रा० उत्तर० स० १०२ ). यास धनरत्न असेंहि नामांतर आढळतें.

**चंद्रकेतु**-दशरथपुत्र लक्ष्मण, त्याच्या दोन पुत्रांतील दुसरा. यास चित्रकेतु असें नामांतर असून, हा चंद्रकांतनगरांत राहात असे.

२-अभिमन्यूनें मारलेला दुर्योधनपक्षीय राजा. ( भार० द्रोण० अ० ४८ ).

३-हंसध्वज राजाचा बंधु.

**चंद्रगिरि**-(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न तारापीड राजाचा पुत्र. यास भानु ना० पुत्र होता.

**चंद्रचित्र**-भारतवर्षीय देश. ( वा० रा० किंष्किंधा० स० ४२ ).

**चंद्रदेव**-युधिष्ठिराचा चक्ररक्षक कर्णानें मारलेला पांचाल तो. ( भार० कर्ण० अ० ४९ ).

२–अर्जुनानें मारलेला दुर्योधनपक्षीय राजा. ( भार० द्रोण० अ० २७ ).

**चंद्रप्रभ**–मेरुपर्वतस्थ एक सरोवर; यांतून जंबुनदी निघत्ये.

२–मणिभद्र यक्ष, ज्या हिमालयशिखरावर राहतो त्यास नांव. हें कैलासशिखराच्या ईशान्येस आहे.

३–शरवणांत जाऊन स्त्रीत्व पावलेला इल राजा, त्याच्या अश्वाचें नांव.

**चंद्रप्रदर्शन**–सिंहिकापुत्र. ( १ सैंहिकेय श० पहा ).

**चंद्रभागा**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ( २ हिमालय श० पहा ).

२–भीमानदीस नामांतर.

३–नर्मदेसंबंधीं तीर्थवि०.

**चंद्रभानु**–कृष्णास सत्यभामेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**चंद्रमसतीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ.

**चंद्रमा**–भारतवर्षीय नदी.

२–दक्षिणसमुद्रतीरीं राहणारा ऋषि. ( १ संपाति श० पहा ).

**चंद्रवती**–दहा प्रचेत्यांस मारीषेपासून झालेली कन्या. प्राचेतस दक्षाची भगिनी.

२–एक नदी.

**चंद्रवर्मा**–भारती युद्धांतील कांबोजदेशाचा सामान्य राजा. ( भार० आदि० अ० ६७ ).

**चंद्रवशा**–भारतवर्षीय नदी.

**चंद्रवाह**–ककुत्स्थ राजास नामांतर.

**चंद्रशुक्र** अ० **शुक्र**–अष्ट उपद्वीपांतील एक. ( अष्टउपद्वीप श० पहा ).

**चंद्रसेन**–सिंहलद्वीपाचा राजा. द्वितीयार्थक मंदोदरीचा पिता.

२–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. ( भार० उद्यो० अ० १७१ ).

३–पांडवपक्षीय राजा. याच्या रथाचे अश्व चंद्रासारख्या वर्णाचे होते. ( भार० द्रोण० अ० २३ ). यास, रात्रियुद्धांत अश्वत्थाम्यानें मारिलें. ( भार० द्रोण० अ० १५६ ).

४–हंसध्वज राजाचा भ्राता.

**चंद्रसेना**–एक असुरस्त्री.

**चंद्रहर्ता**–सिंहिकापुत्र. ( १ सैंहिकेय श० पहा ).

**चंद्रहास**–केरलाधिपति सुधार्मिक राजाचा पुत्र. हा रूपानें सुंदर असून, सर्वलक्षणयुक्त असतांही, याचें जन्म मूलनक्षत्रावर झालें होतें व याच्या वामपादास साहावी अंगुलि होती, म्हणून हा जन्मतांच, शत्रूंनीं याच्या पित्यास मारिलें. तसेंच मातेनेंही सहगमन केलें. त्यामुळें हा निराश्रितच झाला; परंतु याची धात्री (दायी) अति दयालु स्वभावाची असल्यामुळें, तिनें यास तेथून कौंतलका पुरीस नेलें, व तेथें कोणाकोणाच्या घरीं कंडनपेषणादि करून, ती आपला, व याचा निर्वाह करीत राहिली. असे तेथें याचे बरेच दिवस गेले, तों याच्या दैवास, हीही गोष्ट सहन न होऊन ती धात्री अकस्मात् मरण पावली. मग काय पुसावें ? हा दीनवाणा होऊन त्या नगरांत हिंडूं लागला, व कोणी अन्न दिलें असतां, तें भक्षण करून कोठें तरी राहूं लागला.

याप्रमाणें हा, त्या नगरांत निर्वाह करून वाढत असतां एकदां धृष्टबुद्धि प्रधानाच्या गृहीं ब्राह्मणभोजन होतें तेथें अन्नार्थ गेला, तेव्हां तेथील व्यवस्थापकानें यास भोजनार्थ राहून घेतलें. पुढें भोजनें झाल्यावर, ब्राह्मण तांबूलदक्षिणा ग्रहण करून जाऊं लागले या काळीं, त्यांनीं धृष्टबुद्धीस आशीर्वाद करून सांगितलें कीं, तूं या अनाथमुलाचें पालन कर, म्हणजे त्यांत तुझें कल्याण आहे. कसें म्हणशील तर, हाच पुढें तुझा स्वामी होणार आहे. इतकें बोलून ते गेले असतां, धृष्टबुद्धीस याच्याविषयीं अधिक प्रीति उत्पन्न व्हावी तें एकीकडे राहून, उलटा याच्या दुर्दैवानें द्वेषच उत्पन्न झाला, व लागलेंच त्यानें चांडाळास बोलावून आणून, याला अरण्यांत नेऊन मारण्याची आज्ञा केली. तीवरून त्यांनीं यास अरण्यांत नेलें, व आतां मारणार, इतक्यांत यानें तेथें विष्णूचें ( व्यापक परमात्म्याचें ) स्तवन आरंभिलें. त्यावरून, व याचें सुंदर रूपही पाहून, त्यांस याची दया आली. नंतर त्यांनीं याचें साहावें बोट तोडून, यास सोडून दिलें, व नगरांत येऊन धृष्टबुद्धीस तें दाखवून आपआपल्या घरीं गेले, तेणेंकरून तो संतोषून गृहामध्यें स्वस्थपणानें राहिला.

इकडे हा, अरण्यांत बोट तुटल्याच्या वेदनेनें व्याकुळ होऊन फिरत आहे तों, अलक्ष्मीकर बोट गेल्यानें याचें सुदैव जागृत होऊन, तेथें एकाएकीं निपुत्रिक कुलिंददेशाधिपति मृगयेस प्राप्त झालेला त्यानें यास पाहिलें, व हा बालक परमेश्वरानेंच आपल्यास दिला असें समजून, याला चंदनावतीस नेऊन, आपल्या मेघाविनी स्त्रीच्या स्वाधीन केलें. त्यावरून तिलाही आनंद झाला असें पाहून, राजानें याचे सर्व

संस्कार केलें, व चंद्रहास असें नांव ठेवून, तो मोठा होतांच त्याचें उपनयनही केलें. पुढें वेदवेदांग व धनुर्विद्या, इत्यादिकांत हा इतका सत्वर प्रवीण झाला कीं, यानें आसमंताद्भागींचा प्रदेश जिंकून कौंतलका नगरी सधन केली. त्यावरून कुलिंद राजास हा आतां राज्यही संभाळील असा विश्वास येऊन, त्यानें यास राज्याभिषेक केला.

कुलिंदराजा, प्रतिवर्षी कौंतलक राजास करभार देत असे, म्हणून त्यानें चंद्रहासास सांगितलें कीं, कर भरण्याचा समय प्राप्त झाला आहे, यास्तव तिकडे कर पाठीव. त्यावरून चंद्रहासानें नियमित कर सिद्ध करून, विशेष कांहीं रत्नें, व वस्त्रालंकार सेवकांसमागमें देऊन कौंतलका पुरीस त्यांस मार्गस्थ केलें. तेव्हां ते सेवक तें द्रव्य घेऊन धृष्टबुद्धीकडे आले आणि म्हणूं लागले कीं, चंद्रहास राजानें वार्षिक कर पाठविला आहे. तर हा घेऊन, आम्हास परत जाण्याची आज्ञा द्यावी. असें ऐकून धृष्टबुद्धीनें त्यांस विचारिलें, चंद्रहास हा कोण आहे ? तेव्हां त्यांनीं त्यास साद्यंत वृत्त होतें तसें सांगितलें, त्यावरून व त्यानें पाठविलेल्या पदार्थावरून धृष्टबुद्धीस आश्चर्य होऊन, तो कसा आहे तें पाहावें या हेतूनें मदनपुत्रास राजकार्य करण्यास सांगून तो चंदनावतीस आला.

कुलिंद राजा, धृष्टबुद्धि आपल्या भेटीस आला असें ऐकून, चंद्रहाससहवर्तमान त्यास सामोरा गेला, व त्यास नगरांत आणून, त्याचा त्यानें उत्तम प्रकारें आदरसत्कार केला. पुढें भोजनादिक झाल्यावर, सावकाशपणें गोष्टी सांगत उभयतां बसले असतां, धृष्टबुद्धीनें कुलिंदराजास पुसलें कीं, हा पुत्र तुला कधीं झाला, आम्हांस याविषयीं तूं अगदींच कळविलें नाहींस, असें कसें ? त्यावरून कुलिंद म्हणाला, मला झालेला पुत्र मी आपणास कळवावा हें युक्तच आहे; परंतु तसें झालें नसून हा मला अरण्यांत सांपडलेला आहे, म्हणून कळविलें नाहीं. त्यावरून धृष्टबुद्धीनें तर्क केला कीं, चांडालांपाशीं जो मी अरण्यांत नेऊन मारण्यास दिला होता तोच हा होय. नंतर तो क्षणभर स्तब्ध होऊन मनांत चिंतन करूं लागला कीं, पुढें कसें करावें ? ब्राह्मणांच्या वचनाप्रमाणेंच झाल्यास, माझ्या मदन आणि अमल, उभयपुत्रांचें नीट होणार नाहीं. यास्तव यास विष देऊन मारावें असें निश्चित करून, बाह्यात्कारीं हर्ष दर्शवीत होत्साता कुलिंदास म्हणाला, कुलिंदा, तुझा पुत्र पाहून मला बहुत संतोष झाला आहे; तर हा सुखानें नांदो, पण एक माझें कौंतलका पुरीस अत्यंत गुप्त कार्य आहे, त्यासाठीं माझें मानस यास तेथें पाठवावें असें आहे; कारण त्या कार्यास हाच योग्य आहे. तर याविषयीं तूं अनुमोदन द्यावेंस. त्यास कुलिंदानें तथास्तु म्हणतांच, त्यानें आपल्या मदनपुत्रास विलंब न लावतां यास विष द्यावें, माझी वाट पाहूं नये, असें पत्र लिहिलें, व मुद्रा करून चंद्रहासाजवळ दिलें. त्यावरून चंद्रहास कित्येक सेवक समागमें घेऊन अश्वारूढ होत्साता निघाला, तो कित्येक दिवसांनीं कौंतलका पुरीस पोहोंचून, नगराबाहेर आराम होता तेथें मध्यान्हकाळीं उतरला, व आन्हिक आटपून उपाहार झाला असतां, थकून आल्यामुळें क्षणभर पहुडला तो, त्यास तेथें सेवकांसहित गाढ निद्रा लागली.

याप्रमाणें हा तेथें निजला आहे तों, तेथील राजाची कन्या चंपकमालिनी, आपल्या कित्येक सख्यांसहित, धृष्टबुद्धिप्रधानाची कन्या विषया तिला समागमें घेऊन तेथेंच पुष्पें तोडायास आली होती. परंतु तिनें यास पाहिलें नाहीं. विषयेची मात्र दृष्टि यावर गेली, त्यावरून ती याच्या सौंदर्यास लुब्ध होऊन याकडे एकाग्रदृष्टीनें पाहात असतां, याच्या कंचुकाबाहेर पत्र निघालें होतें. तें तिनें पाहिलें. नंतर युक्तीनें जवळ जाऊन पाहत्ये तों, त्यावर आपल्या पित्याची मुद्रा आहे. त्यावरून यांत काय लिहिलें असावें, त्याविषयीं तिला उत्कंठा उत्पन्न होऊन, तिनें तें मोठ्या चातुर्यानें फोडिलें. परंतु त्यांत मदनास ( तिच्या भ्रात्यास ) पित्यानें "विषमस्मै प्रदातव्यं" असें लिहिलेलें पाहून, त्यानें असें कसें लिहिलें, यास्तव हें चुकून पडलें असावें, असें तिला वाटून, तिनें तेथें तत्काळ वृक्षनिर्यासानें ( वृक्षाचा चीक काढून त्यानें ) "विषयाऽस्मै प्रदातव्या" असें लिहिल्यावर पूर्ववत् तें चिकटवून, त्याच्या कंचुकांत घालून तेथून परतली, व राजकन्येसहवर्तमान निघून तिला तिच्या मंदिरीं पोहोंचवितांच आपल्या गृहीं सत्वर प्राप्त झाली.

राजकन्या व प्रधानकन्या गेल्यावर, चंद्रहास बऱ्याच वेळानें जागृत झाला, आणि पाहतो तों दिवस अगदीं थोडा राहिला आहे. नंतर त्वरेनें अश्वारूढ होऊन, धृष्टबुद्धि प्रधानाच्या मंदिरास आला, व त्यानें आणिलेलें पत्र मदनास दिलें. त्यावरून मदनानें त्याचा सत्कार करून पत्र वाचिलें, तों त्यांत चंद्रहासास विषया द्यावी असें लिहिलें आहे. मग त्यास

आनंद होऊन, लागलेंच ब्राह्मणास बोलावून आणून त्यानें मुहूर्त पाहिला, व पत्रांत लिहिल्याप्रमाणें आपली भगिनी विषया चंद्रहासास विवाह करुन दिली.

आतां इकडे चंदनावतीपुरांत जें झालें तें असें;– धृष्टबुद्धि स्वभावतः परम दुष्ट, मत्सरी, निर्दय आणि ईश्वरभक्तिहीन असल्यामुळें, त्यानें चंद्रहासास कौंतलकापुरींत मार्गस्थ करितांच, कुलिंद राजास कारागृहांत ठेवून, त्याचें व त्याच्या प्रजेचें सर्वस्व हरण केलें इतकेंच नव्हे, तर त्याचा छळही पराकाष्ठेचा केला. नंतर त्यांचीं, त्यांनीं पळूं नये इत्यादिक व्यवस्था ठेवून, चंद्रहास मेलाच असेल असें समजून, तें संपूर्ण द्रव्य घेऊन मोठ्या हर्षानें कौंतलका पुरीकडे येण्यास परतला. तों इकडून विवाहसमारंभ आटोपून, ब्राह्मण वस्त्रालंकारादि घेऊन आपआपल्या ग्रामीं चाललेले त्यास मार्गांत भेटले. तेव्हां त्यांनीं धृष्टबुद्धीस ओळखून आशीर्वाद केला कीं, तुला जामात अति उत्तम मिळाला, व तुझ्या पुत्रानेंही विवाहोत्सव उत्कृष्ट केला, असें म्हणून ते चालते झाले; परंतु धृष्टबुद्धीस तें ऐकून विलक्षणच वाटलें, आणि तो तेथून मोठा संतापून जो निघाला तो त्वरेनें घरीं आला, व येतांच मदनास रागें भरुन बोलला, मूर्खा, हें तूं काय केलेंस ? त्यावरुन मदन आपल्या मनांत चकित होऊन म्हणूं लागला कीं, यास भ्रम तर झाला नसेल ना ? अस्तु. कसेंही असो. असें म्हणून, त्यानें पित्यास सांगितलें, आपण व्यर्थ रागावूं नका, मी आपलें पत्र आल्याप्रमाणें केलें. इतकें बोलून त्यानें तें पत्र त्यापुढें ठेविलें. तें पत्र वाचून त्यानें आपल्या कपाळास हात लावून म्हटलें, हा विवाह केवळ प्रारब्धानेंच झाला. ब्रह्मलिखितापुढें कोणाचाच उपाय नाहीं. असें म्हणून मदनास मग रागें न भरतां, स्वस्थ होत्साता त्यानें झालेल्या विवाहांचा बाह्यतः आनंदच दर्शविला.

नंतर पुनः त्यानें एकांतीं मनाशीं विचार केला कीं, कन्येस वैधव्य आलें तरी येवो. परंतु याचा नाश केलाच पाहिजे. असें म्हणून त्यानें पूर्वींच्या चांडालांस एकांतीं बोलावून आणून सांगितलें, अरे ऐकतां, आज रात्रीं ग्रामाबाहेर अंबिकेचें देवालय आहे, तेथें तुम्ही जाऊन बसावें, व जो पुरुष आंत जाऊं लागेल तो कोणी असो, त्याचे तत्काळ तुकडे करावे. हें कार्य तुम्ही केल्यास, तुम्हास मी बहुत धन देईन. पूर्वीं मी तुम्हास मारण्यास जो पुरुष दिला होता, त्यास तुम्ही मारिलें नसून मर्शी वंचना केलीत ती असो; परंतु आतां मात्र तसें होतां कामास नये. इतकें बोलून त्यानें त्यांस जाण्याची आज्ञा दिली. नंतर घरांत येऊन चंद्रहासास म्हणाला, आमच्या कुळांत असा कुलाचार आहे कीं विवाह झाल्यावर जामातानें रात्रौ एकाकी अंबिकेच्या पूजनास जावें. तर तुम्ही आज रात्रीं देवालयांत जाऊन पूजा करुन यावें. त्यावरुन चंद्रहास तथास्तु म्हणून स्तब्ध राहिला, व पुढें सूर्यास्त होत आला असें पाहून, त्यानें संध्यावंदन केलें, व लागलेंच पूजासाहित्य सिद्ध करुन तो देवालयाकडे जाण्यास निघाला.

इकडे राजमंदिरीं त्या दिवशीं असें झालें होतें कीं, राजकार्य पाहण्यास तेथें मदन गेला असतां, गालव ना॰ पुरोहितानें राजास अरिष्टाध्याय ( मृत्युचिन्हज्ञानाचें ग्रंथप्रकरण ) ऐकविला, तेणेंकरुन राजानें आपला मरणकाल फारच त्वरित आहे असें जाणून, पोटीं पुत्रसंतान नसल्यामुळें चंद्रहासास त्यानें विवाहसमयीं पाहिलें होतेंच त्यावरुन त्यास आपली कन्या चंपकमालिनी द्यावी, व तोच राज्याधिकारी करावा. असें मनांत आणून, मदनास त्याला राजमंदिरीं घेऊन येण्याविषयीं आज्ञा केली होती, तीप्रमाणें तो राजमंदिरांतून निघून घरीं येण्यास निघाला आहे,तों अर्धमार्गांतच पूजासाहित्य हातांत घेऊन एकाकी चाललेला चंद्रहास त्यास भेटला. तेव्हां मदनानें त्यास राजाकडील वृत्त कळवून तिकडे पाठविलें व आपण त्याजवळचें पूजासाहित्य घेऊन घरीं न जातां परस्परच अंबिकेच्या देवालयांत गेला. तों तेथें पूर्वसंकेताप्रमाणें चांडाल आधींच बसले होते, त्यांनीं प्रधानाज्ञेप्रमाणें विचारपूस न करितां त्याचे तत्काळ तुकडे केले. इतक्यांत इकडे राजानें चंद्रहास आलेला पाहून, तादृश मुहूर्तापेक्षा न धरितां त्यास चंपकमालिनी विवाहविधीनें देऊन, त्याची लागलींच अभिषेकपूर्वक राज्यावर स्थापना केली, व धृष्टबुद्धीस बोलावून सांगितलें कीं, आजपासून हा तुझा स्वामी, व तूं वृद्ध झाला आहेस यास्तव तुझा पुत्र मदन याचा प्रधान,असें सांगून राजा लागलाच अरण्यांत गेला.

राजा गेला व चंद्रहास राज्याधिकारी झाला असें पाहून धृष्टबुद्धीस वाईट तर वाटलेंच; परंतु आतां त्यास कांहीं बोलून चालणार नाहीं म्हणून त्यानें नम्रतेनें चंद्रहासास इतकेंच पुसलें कीं, देवालयांत आपलें जाणें झालें होतें कीं नाहीं ? तेव्हां यानें त्यास सत्य वृत्तांत सांगून तिकडे मदन गेला म्हणून कळविलें. तें ऐकून

धृष्टबुद्धि घाबरा झाला व त्वरेनें देवालयांत जाऊन पाहूं लागला तों, पुत्र मरून पडला आहे. त्यावरून त्यानें तेथें पुष्कळ आक्रोश करून शेवटीं आपलें मस्तक खांबावर आपटून प्राण दिला.

प्रातःकालीं, देवाल्यांत कोणी देवीपूजनास गेला, त्यानें तीं पितापुत्रांचीं प्रेतें पाहिलीं, व पूजन झाल्यावर गांवांत येऊन, तें वृत्त चंद्रहासास कळविलें. त्यावरून तो तेथें गेला, आणि पाहतो तर मदन तोडला जाऊन मरण पावला आहे. तेव्हां हें कृत्य धृष्टबुद्धीनें मज-करितां केलेलें असें जरी त्यास समजलें, तरी त्यानें मुख्यत्वेंकरून मदनाकरितां देवीची स्तुति आरंभिली; परंतु ती प्रसन्न होत नाहीं असें पाहून आपलें मस्तक तोडण्यास सिद्ध झाला. त्यावरून देवी प्रत्यक्ष होऊन यास म्हणाली कीं, तूं एवढें साहस कशासाठीं करितोस? धृष्टबुद्धि, तो आपल्याच दुराचरणानें मेला आहे. यानें उत्तर केलें, तें कांहीं असो, मदनास आधीं उठवून त्यासही उठविलें पाहिजे; कारण हे मेल्याचा अपवाद, नागरिक लोक माझ्या पायगुणावर ठेवितात. त्यावरून त्या उभयतांस सजीव करून, देवी अंतर्धान पावली. तें पाहिल्यानंतर चंद्रहासानें, स्वमंदिरीं उभयतांस आणून मदनास प्रधानपदवीचीं वस्त्रें दिलीं, आणि धृष्टबुद्धीस हितोपदेश करून गौरविल्यावर घरीं जाण्याची आज्ञा केली.

याप्रमाणें चंद्रहास राज्य पावून, विषया व चंपक-मालिनी या उभय स्त्रियांसहित आनंदानें राहिला असतां, लवकरच त्यानें मंत्री इ०कांस चंदनावतीस पाठवून कुलिंद राजास स्त्रीसहवर्तमान कौंतलकापुरीस मोठ्या मानानें आणविलें, व त्यांच्या आज्ञेप्रमाणें वर्तन करून उत्तमप्रकारें तीनशें वर्षेंपर्यंत राज्य केलें. यास विषयेपासून मकराक्ष, व चंपकमालिनीपासून पद्माक्ष असे दोन पुत्र झालेले, तेही याच्याप्रमाणेंच पराक्रमी व सुशील होते.

एकदां हे उभयतां पुत्र, नगराबाहेर संचार कर-ण्यास गेले असतां, युधिष्ठिरानें अश्वमेधाच्या उद्देशानें सोडलेला श्यामकर्ण अश्व फिरत फिरत कौंतलकापुरीस आलेला त्यांनीं पाहिला. त्यास धरून, व त्याच्या मस्तकावरील सुवर्णपत्रिका वाचून, त्यांस परम आश्चर्य झालें व तें वृत्त पित्यास ( चंद्रहासास ) कळविलें. तें ऐकतांच चंद्रहास हा कृष्णार्जुनांच्या भेटीस गेला. तेव्हां कृष्णाचें व याचें परस्पर वंदनालिंगन झालें असतां, कृष्णानें अर्जुनास याला नमन करण्यास सांगि-तलें; परंतु अर्जुनाच्या मनांतून याशीं युद्ध करावयाचें होतें म्हणून तो यास वंदन करीना. तें यानें जाणून अर्जुनास म्हटलें कीं, मी युद्ध करण्यास सिद्ध आहें. परंतु तुझ्या यज्ञास विघ्न होईल, यास्तव त्या खटपटींत तूं पडूं नयेस. त्यावरून अर्जुनानें यास वंदन करतांच यानें त्यास आलिंगन दिलें. नंतर यानें त्यास नगरांत नेऊन तीन दिवस ठेवून घेतलें, व त्यांचा मोठा सन्मान करून, व त्यांस अपार द्रव्य देऊन, त्यांसमा-गमें त्यांच्या साह्यार्थ आपण निघाला असतां, मागें राज्यव्यवस्था पाहाण्यास मकराक्षास अधिपत्य दिलें. ( जैमि० अश्व० अ० ५०-५९ ).

२-रावणास रुद्रप्रसादानें मिळालेला खड्ग तो. ( वा० रा० उत्तर० स० १६ ).

**चंद्रा**-वृषपर्वादानवाची कन्या, शर्मिष्ठेची भगिनी.

**चंद्राद्रि**-क्षीरसमुद्रतीरीं असणारा एक पर्वत.

**चंद्रावलोक**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयांत जन्मलेल्या सहस्राश्व राजाचा पुत्र. यास तारापीड ना० पुत्र होता.

**चंद्रांशुतापन**-एक दानव. ( दनु० श० पहा ).

**चंद्राश्व**-सूर्यवंशीय कुवलाश्वपुत्र जो भद्राश्व त्याचें नामांतर.

**चंद्रिका**-भारतवर्षीय नदी.

**चंप**-(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरित अ०वृक राजाचा पुत्र. यास पुत्र सुदेव ना० होता. यानें मालिनी नग-रीस चंपा नांव ठेविलेलें नीट दिसत नाहीं म्हणून तो लेख लेखकाचा प्रमाद होय.

२-( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न पृथुलाक्ष राजा, त्याच्या चार पुत्रांतील कनिष्ठ. यानें मालिनी नगरीस चंपा नांव ठेविलें. हा राजा दशरथसखा जो रोमपाद राजा, त्याच्यापुढें चौथ्या पिढीस झाला होता म्हणून दशरथ व रोमपाद यांच्या वेळेस तिला चंपा नांव नव्हतें, आणि वरील सूर्यवंशी चंप तो तर दशरथा-पूर्वीचा तिसावा पुरुष होता. म्हणून वरील इतिहास बरोबर नाहीं.

**चंपक**-एक गंधर्व.

**चंपकमालिनी**-चंपिका शब्द पहा.

२-चंद्रहास राजाच्या दोन स्त्रियांतील कनिष्ठ.

**चंपका**-हंसध्वज राजाची नगरी.

**चंपा**-चंद्रसेना असुरस्त्री. तिचें नामांतर.

२-मालिनी नगरीस द्वितीयार्थक चंप राजानें ठेविलेलें नांव. ही अंगदेशाची राजधानी होय. ( भार० वन० अ० ११३ ). हींत पांडवांच्या वेळेस कर्ण राहात होता. ( भार० शांति० अ० ५ ).

**चंपारण्य**–भारतवर्षीय वनवि०. हें नांव यास चंपानगरीच्या सान्निध्यानें असेलसें वाटतें.

**चंपिका**–दाशरथि रामाचा पुत्र कुश त्याच्या दोन स्त्रियांतील ज्येष्ठ. हिला चंपकमालिनी इ० नऊ कन्या होत्या. या कन्यांची नांवें विस्तारभयास्तव या कोशांत घेतलीं नाहींत.

**चमस**–ऋषभदेवाच्या नऊ ब्रह्मनिष्ठ पुत्रांतील एक ( ऋषभदेव श० पहा ).

**चमसोद्भव**–भारतवर्षीय तीर्थवि०.

**चमसोद्भेदन**– ,, ,,

**चरिष्णु**–होणाऱ्या आठव्या सावर्णि मनूच्या दाहा पुत्रांतील एक.

**चर्मकोट**–भारतवर्षीय तीर्थ.

**चर्मण्वती**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ही अपर कुंतिराष्ट्राच्या दक्षिणेस असून, रंतिदेव राजाच्या यज्ञांत जे पशु मृत झाले, त्यांच्या चर्मराशीपासून जो रक्तप्रवाह निघाला त्यायोगानें उत्पन्न झाली म्हणून हें नांव हिला पडलें. " महानदी चर्मराशेरुत्क्लेदात्ससृजे यतः ॥ ततश्चर्मण्वतीत्येवं विख्याता सा महानदी ॥ १२३ ॥ ( भार० शांति० अ० २९ ). ही प्रस्तुत जलरूप आहे.

**चर्ममंडल**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**चर्मवान्**–शकुनीच्या साहा कनिष्ठ बंधूंतील एक. यास इरावानानें भारतीयुद्धांत मारिलें (भार० भीष्म० अ० ९० ).

**चर्षणी**–द्वादशादित्यांतील मित्र आदित्याची स्त्री, वरुण आदित्याची नाहीं; कारण ' मित्रस्य चर्षणी ' असा मंत्र दृष्ट आहे.

**चलकुंडल**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**चलिक**– ,, ,,

**चक्षु**–भगवत्पदीच्या चार प्रवाहांतलि पूर्वदिशेकडील प्रवाह. हा केतुमाल वर्षांतून समुद्रास मिळतो.

२–( सो० वं० ) अनुराजाच्या तीन पुत्रांतील दुसरा.

**चक्षुर्मनु**–उत्तानपादवंशीय सर्वतेजस् राजर्षीपासून आकूती भार्येच्या ठायीं झालेला पुत्र. हा, चालू मन्वंतरापूर्वीच होऊन गेलेला साहवा मनु० ( भाग० ४ स्कं० अ० १३ श्लो० १५ ). याच्या कालसत्तेस चाक्षुष मन्वंतर असें म्हटलेलें असून, त्यांत भृगु, सुधामा, विरज, सहिष्णु, नाद, विवस्वान् आणि अतिनामा, हे सप्तर्षि; हविष्मान्, वीरक, इ० नामांतरांनीं होते. लेख, ऋभ, ऋभु, आद्य, वरिमूल, असे आप्यादिक नामांतरानें पंचविध देव होते. स्वर्गामध्यें मंत्रद्रुम नांवाचा इंद्र असून, वैराजऋषीपासून संभूती भार्येच्या ठायीं आजित् ना० विष्णूचा अवतार झालेला, त्यानें समुद्रमंथनकालीं कूर्मरूपानें मंदराचल स्वकीय पृष्ठावर धारण करून, देवांस अमृत प्राप्त करून दिलें होतें ( भाग० ८ स्कं० अ० ५ ). यावरून या कल्पांतील कूर्मावतार या मन्वंतरांत झाला होता असें समजावें. यास नड्वला अ० वीरिणी नांवाची स्त्री होती, व तिजपासून यास पुरु, कुत्स, त्रित, द्युम्न, सत्यवान्, धृतव्रत, अग्निष्टोम, अतिरात्र, प्रद्युम्न, शिवि आणि उल्मुक असे अकरा पुत्र झाले होते. हींच नांवें मत्स्यपुराणांत रुरु, पुरु अ० पुरुष, शतद्युम्न, तपस्वी, सत्यवाक्, हवि, अग्निष्टुत, अतिरात्र सुद्युम्न आणि अभिमन्यु, अशीं दाहाच आहेत. परंतु मी येथें, प्रथम पक्ष प्रबल असल्यावरून त्याचेंच ग्रहण केलें आहे.

**चाक्रायण**–उषस्त ऋषीस नामांतर.

**चाणूर**–कंससभेंतील एक मल्ल. धनुर्यागनिमित्तानें कृष्णबलराम मथुरेस आले असतां, यास कृष्णानें मारिलें होतें ( भाग० १० स्कं० अ० ४४ ).

**चातकि**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**चांद्रमसि**– ,, ,,

**चांपेय**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**चामुंडा**–देवतावि०. हें नांव कालिकेस आहे. ( देवीभा० ५ स्कं० अ० २६ ).

**चारु**–कृष्णापासून रुक्मिणीस झालेला पुत्र.

**चारुगुप्त**– ,, ,,

**चारुचंद्र**– ,, ,,

**चारुचित्रांगद**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**चारुदेष्ण**–रुक्मिणीपुत्र.

२–मद्रदेशीय राजपुत्र. द्वितीयार्थक मंदोदरीचा पति.

**चारुदेह**–रुक्मिणीपुत्र.

**चारुधि**–मेरुकर्णिका पर्वतांतील एक. यास जारुधि असेंही म्हटलें आहे ( देवीभा० ८ स्कं० अ० ६ ).

**चारुनेत्रा**–प्राधेच्या अप्सराकन्यांतील एक.

**चारुपद**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न नमस्यु राजाचा पुत्र. याचा पुत्र सुद्यु.

**चारुमती**–रुक्मिणीस कृष्णापासून झालेली कन्या. कृतवर्म्याची स्नुषा.

**चारुमत्स्य**–विश्वामित्रऋषिपुत्रांतलि एक.

**चारुशीर्ष**–इंद्राचा परममित्र एक राजर्षि. ( भार० अनुशा० अ० १८ ).

**चार्वाक**–एक राक्षस. यानें दुर्घट तप करून ब्रह्मदेवास

प्रसन्न केलें, व अमरत्व मागितलें. त्यांनीं, ब्राह्मणांचा अपमान जोंपर्यंत तुजकडून होणार नाहीं, तोंपर्यंत अमर राहशील म्हणून सांगितलें, व ते अंतर्धान पावले. त्यावरून हा तसा बराच काळपर्यंत जपून होता. परंतु द्वापाराच्या अंतीं, संपूर्ण कौरव मेल्यावर, व्यासानुमतें युधिष्ठिरास राज्याभिषेक होऊं लागला, त्याकाळीं अनेक ऋषि जमले असतां, त्यांत हा ऋषिवेषानें तेथें गेला होता. पुढें अभिषेकसमारंभ पूर्ण झाल्यावर, याचा मरणकाल समीप आल्यामुळें यास दुर्बुद्धि उत्पन्न होऊन हा त्या समाजांत युधिष्ठिरास बोलूं लागला, हे युधिष्ठिरा, तूं हें राज्य व ज्ञातिवधानें संपादिलें आहेस, यास्तव राज्यांतीं तूं नरकास जाशील. तें विलक्षण वाक्य ऐकून युधिष्ठिर चकित होऊन बोलला, जर असेंच सत्य असेल, तर मला राज्याचें कारण नाहीं. मी हाच अरण्यांत जातों. हें भाषण ऐकून, सर्व ऋषींनीं युधिष्ठिरास आश्वासन दिलें कीं, हा राक्षस असून कपटऋषिवेषधारी आहे. यास्तव याच्या भाषणाचा विश्वास धरूं नको. आमचा अभिप्राय असा नाहीं. इतकें बोलून, त्यांनीं याच्यावर हुंकार सोडिला, तेणेंकरून हा तत्काल दग्ध झाला (भार० शांति० अ० ३८–३९).

**चाक्षुष**–चक्षुर्मनूचें मन्वंतर तें.

२–(सू० वं०) दिष्टकुलोत्पन्न खनित्र राजाचा पुत्र. याचा पुत्र विविंशति.

३–इंद्रसावर्णि मन्वंतरांतील देवजातिवि०

**चिकुर**–आर्यक नागाचा पुत्र. सुमुख नागाचा पिता.

**चित्तहार्य**–देववि० (साध्यदेव श० पहा).

**चित्ति**–स्वायंभू मन्वंतरांतील अथर्वण ऋषीची दुसरी स्त्री.

**चित्र**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक. यास भीमसेनानें मारिलें. (भार० द्रोण० अ० १३७).

२–कर्णानें मारिलेला पांडवपक्षीय राजा. (भार० कर्ण० अ० ५६).

**चित्रक**–राजसूययज्ञांत पांडवांचें साह्य करणारा एक राजा.

२–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक. (भार० आदि० अ० ११७).

**चित्रकूट**–प्रयागापासून दाहा कोसांच्या अंतरावर असणारा सामान्य पर्वत. याच्या उत्तरभागीं मंदाकिनी नदी वाहत्ये. दाशरथि राम वनवासास निघाला असतां, भरद्वाजऋषीचें दर्शन घेऊन येथें आला, व लक्ष्मणानें पर्णकुटिका बांधिली. तेथें सीता, व त्यासहित तो सुखानें राहिला. एकदां एका काकानें (कावळ्यानें) सीतेस पीडा दिली, तिचें त्यानें निवारण करून स्वस्थ आहे तों सैन्यासहित त्यानें भरतास येतांना पाहिलें. त्यावरून तो कां आला असावा, म्हणून चिंतन करीत आहे इतक्यांत, लक्ष्मण त्याशीं युद्धाची आज्ञा मागूं लागला. ती रामानें न देतां, त्याचें सांत्वन केलें,त्यावरून तो स्वस्थ बसून पुढें काय होतें तें पाहूं लागला.

इकडे भरतानें चित्रकूटासमीप येतांच, सैन्याचा निवेश तेथेंच शत्रुघ्नास करण्यास सांगून, वसिष्ठादिकांसहित आपण पर्वतावर आला तेव्हां त्यानें रामास दर्भासनावर स्थित झालेला असें पाहिलें. तेणेंकरून अतिदुःखित होऊन, तसाच त्यानें रामास साष्टांग नमस्कार घातला. तो पाहून राम उठला व त्यानें त्यास आलिंगन देऊन अयोध्येकडील क्षेम विचारलें. तेव्हां वसिष्ठांनीं, दशरथ पुण्यलोकास प्राप्त झाला म्हणून सांगितलें. तें ऐकून रामलक्ष्मणांस अत्यंत शोक झाला. नंतर मंदाकिनीजलांत त्यांनीं स्नानें केलीं, आणि पिण्याक व इंगुदी यांहींकरून दशरथास पिंड देऊन जलांजलिहि दिल्या. याप्रमाणें बारा दिवस झाल्यावर शुद्धस्नानादिक होऊन, राम स्वस्थ झाला असें पाहून, भरतानें अयोध्येस माघारें चलून राज्य स्वीकारण्याची त्यास प्रार्थना केली. परंतु रामानें सांगितलें, पित्यानें केलेल्या आज्ञेस मी कधींच व्यत्यय करणार नाहीं. याविषयीं त्याचा व भरताचा पुष्कळ संवाद झाला. शेवटीं राम ऐकत नाहीं असें पाहून, त्याचें मन पाहण्याकरतां असेल,भरतपक्षानें जाबालि मंत्री बोलूं लागला कीं,जेणेंकरून ऐहिक सुखाचा नाश होईल,ती पित्राज्ञा असो, कीं, कांहीं असो, बुद्धिमानांनीं पाळूं नये. इ० त्याचें भाषण ऐकून, रामास अनिवार क्रोध आला, व त्यानें त्याच्या मताचें अक्षरशः खंडन केलें. तेव्हां तो उगाच राहिला. नंतर वसिष्ठांनीं रामाचें सांत्वन करून सांगितलें कीं, जाबालिवर तूं क्रोध करूं नयेस. इतकें बोलून पुनः वसिष्ठानें रामास नीति सांगितली, परंतु त्याचा अरण्यवासाचा निश्चय पालटेना. शेवटीं राम अयोध्येस येत नाहीं असें पाहून भरतानें दर्भ पसरले, व त्यांवर प्रायोपवेशनार्थ स्थित झाला. तें त्याचें निश्चयात्मक कर्म पाहून, अंतरिक्षांतून देवादिकांनीं भरतास सांगितलें कीं, रामास पितृवचनांतून अनृणी होऊं दे. त्यावरून भरतानें आग्रह सोडिला, व रत्नमय पादुका रामाच्या चरणांत घालून, त्या, त्यापासून पुनः मागून घेऊन, प्रतिज्ञोत्तर बोलला कीं, या पादु-

कांस राज्य समर्पण करून, मी फलमूल भक्षण करीत अयोध्येबाहेर राहीन. चतुर्दश वर्षेपर्यंत वल्कलांवर धारण करीन, आणि ज्या दिवशीं चवदावें वर्ष पूर्ण होईल,त्या दिवशीं तूं येऊन भेटलास तर बरें,नाहींतर अग्निप्रवेश करीन. ही त्याची प्रतिज्ञा रामानें मान्य करून त्यास आलिंगन दिलें, व कैकेयीवर रोष करूं नको म्हणून विशेष अगत्यानें सांगितलें. त्यावरून भरत रामास वंदन करून सर्व समुदायासहित अयोध्येस परत गेला.

नंतर राम तेथें चातुर्मास्य राहिला; परंतु अयोध्येंतील जन व शत्रुघ्न, वारंवार येऊन येऊं लागल्यामुळें ऋषींस उपद्रव होऊं लागला. याशिवाय खर ना० राक्षसाचाहि तर त्यांस उपद्रव असेच, म्हणून रामानें ऋषींच्या संरक्षणार्थ राक्षसवधनिमित्तानें चित्रकूट सोडून सीता व लक्ष्मण यांसहित दक्षिण दिशेकडील मार्ग धरिला. ( वा० रा० अयो० स० ९४-११७ ).

२-कुशद्वीपांतल्या सप्त महापर्वतांतील एक.

**चित्रकूटा**-भारतवर्षीय नदी ( ऋष्यवान् श० पहा ).

**चित्रकेतू**-स्वायंभूमन्वंतरांतल्या सप्तवसिष्ठपुत्रांतील एक.

२-शूरसेन देशाचा राजा.यास एक कोटि स्त्रिया होत्या; परंतु तितक्याहि अनपत्य असल्यामुळें, राजा सर्वकाळ दुःखीच असे. एकदां अंगिराऋषि फिरत फिरत याच्या गृहीं प्राप्त झाला असतां, यानें आपलें दुःख, त्यास निवेदन केलें, त्यावरून त्यास दया येऊन त्यानें त्वष्टा ना० आदित्यास उद्देशून चरु सिद्ध केला, व याची ज्येष्ठ पत्नी कृतद्युति तिला दिला.तो तिनें भक्षितांच तिला गर्भ धारण होऊन, पूर्णमासांतीं ती दिव्य पुत्रास प्रसवली. ही गोष्ट तिच्या सपत्नींस (सवतींस) सहन न होऊन, त्यांनीं त्या बालकास विषप्रयोग करून मारिलें. त्यावरून यास जें दुःख झालें तें सांगतां येत नाहीं. तात्पर्य, हा शोक करीत आहे तों, तेथें अंगिरा ऋषि व नारद प्रकट झाले. त्यांनीं स्वसामर्थ्यानें त्यास चेतना आणिली. तेव्हां तो बालक पित्यास व मातेस बोलूं लागला, हा सर्व प्रपंच मायामय आहे यास्तव अशा अनित्य पदार्थांचा शोक करणें अगदीं योग्य नाहीं. इ० त्यानें भाषण करून तो अदृश्य झाला असतां, राजानें शोक टाकून त्याचें और्ध्वदेहिक केलें, व नारदापासून उपनिषद्विद्येचा अनुग्रह घेऊन, सर्वसंगत्याग करीत होत्साता यमुनातीरीं अनुष्ठान करीत राहिला. त्या योगानें जन्मांतरीं त्यास विद्याधरांचें आधिपत्य प्राप्त झालें.

हा विद्याधरयोनि पावल्यावर एके काळीं विमानांत बसून भ्रमण करीत असतां सिद्ध, देव आणि ऋषि यांच्या समुदायांत, मध्यभागीं पार्वतीस अंकावर घेऊन बसलेल्या महादेवास यानें पाहिलें, त्यावरून कायहो हा निर्लज्जपणा! असें बोलून यानें हास्य केलें. तें पार्वतीनें पाहून शाप दिला कीं, तुला असुर योनी प्राप्त होईल. तेणेंकरून हा किंचित् भीत होत्साता विमानाखालीं उतरला व शिवपार्वतींची स्तुति करून, त्यानें अपराधाची क्षमा मागितली, व स्वलोकीं गमन केलें.हाच पुढें वृत्रासुर झाला. ( भाग० ६ स्कं० अ० १४-१७ ).

३-प्रथमार्थक चंद्रकेतु तोच.

४-देवभागास कंसेपासून झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.

५-कृष्णास जांबवतीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

६-भारती युद्धांतील पांडवपक्षीय एक पांचाल. सुकेतूचा पिता, यास द्रोणानें मारिलें होतें. ( भार० द्रोण अ० १२२ ).

**चित्रगु**-कृष्णास सत्येपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**चित्रगुप्त**-धृतराष्ट्रपुत्रांतील एक. यमासही म्हणतात.

**चित्रचाप**-धृतराष्ट्रपुत्रांतील एक.यास भीमानें मारिलें.

**चित्रधर्मा**-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**चित्रबाहु**-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

२-कृष्णाच्या पौत्रांतील एक.

**चित्रभानु**-एक कृष्णपौत्र.

**चित्रमाल**-एक ऋषि.

**चित्ररथ**-मुनीस झालेल्या सोळा गंधर्वांतील एक. हा संपूर्ण गंधर्वांचा स्वामी आहे.

२-ऋषभदेववंशीय गयराजास गयंतीपासून झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. यास ऊर्णा ना० भार्येपासून सम्राट् नांवाचा पुत्र झाला होता.

३-( विदे० वं० ) सुपार्श्वजनकाचा पुत्र. याचा पुत्र क्षेमधी जनक.

४-अनुकुलोत्पन्न रोमपाद राजास नामांतर.

५-दशरथ राजाचा सारथी. ( वा० रा० बाल० स० ३२ ).

६-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा त्याच्या वंशांत जन्मलेल्या रुशेकु राजाचा पुत्र. याचा पुत्र शशबिंदु.

७-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्ट्रान्वयांत जन्मलेल्या सात्वत राजाच्या वंशांतील अनमित्रपुत्र जो वृष्णि, त्याच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यास पृथु, विदूरथ इ० पुत्र होते.

८-मार्तिकावतक देशाचा राजा तो. हा तेथें प्राचीन-

काळीं होता. ( १ जमदग्नि श० पहा ).

९–भारती युद्धांतलि पांडवपक्षीय शैब्य राजा, ( भार० द्रोण० अ० २३ पहा ).

१०–याच नांवाचा पांडवपक्षीय दुसरा राजा. यास द्रोणाचार्यानें मारिलें. ( भार० द्रोण० अ० १२२ ).

११–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय निमिचक्र राजाचा पुत्र. याचा पुत्र कविरथ.

**चित्ररथा**–भारतवर्षीय नदी.

**चित्ररूप**–शिवाच्या रुद्रगणांतील एक.

**चित्ररेखा**–बाणासुराच्या कुंभांड प्रधानाची कन्या. उषेची सखी. ही, चित्रकलेंत फारच प्रवीण असे.

**चित्ररेफ**–प्रियव्रतपुत्र मेधातिथि, त्याच्या सात पुत्रांतील पांचवा. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२–शाकद्वीपाच्या वर्षसंज्ञक सात भागांतील पांचवा.

**चित्रलेखा**–केशी दैत्यास मारुन पुरूरव्यानें सोडविलेली अप्सरा.

२–चित्ररेखा शब्द पहा.

**चित्रवर्मा**–धृतराष्ट्रपुत्रांतील एक.

२–द्रोणाचार्यानें मारिलेला पांडवपक्षीय एक राजा. ( भार० द्रोण० अ० १२२ ).

**चित्रवाहन**–मणिपुर नगरीचा राजा. अर्जुन तीर्थयात्रेस गेला असतां याची कन्या चित्रांगदा, त्यानें पाहून तिला वरण्याची इच्छा दर्शविली. त्यावरून यानें ती, त्यास पुत्रिकाधर्मेंकरून विवाहविधिनें दिली. ( पुत्रिकाधर्म म्ह० कन्येस होईल पुत्र तो आपण घेणें ).पुढें तिच्या ठायीं अर्जुनापासून बभ्रुवाहन पुत्र झालेला यानें घेऊन, त्यासच आपल्या राज्याचा अधिकारी केलें. या चित्रवाहनाचा मूळ पुरुष प्रभंजन राजा. ( भार० आदि० अ० २१५ ).

**चित्रवाहा** भारतवर्षीय नदी.

**चित्रसेन**–( सू० वं० ) वैवस्वतमनूचा पौत्र, नरिष्यंत राजाच्या दोन पुत्रांतील एक, यास दक्ष नांवाचा पुत्र होता.

२–विश्वावसु ना० गंधर्वाचा पुत्र. याची गणना देवर्षींत आहे.

३–अभिसारीपुरीचा राजा. हा भारती युद्धांत दुर्योधनाकडे होता. ( भार० कर्ण० अ० १४ ).

४–भीमसेनानें मारिलेला धृतराष्ट्रपुत्र. ( भार० द्रोण० अ० १३७).

५–कर्णाच्या पुत्रांतून नकुलानें मारलेला तो. ( भार० शल्य० अ० १० ).

६–देवसावर्णि मनूच्या पुत्रांतील एक.(देवसावर्णि श०पहा).

७–कर्णानें मारिलेला पांडवपक्षीय पांचाल. ( भार० कर्ण० अ० ४८ ).

**चित्रसेना**–एक अप्सरा. ( प्राधा श० पहा ).

२–भारतवर्षीय नदी.

**चित्रस्वन**– एक गंधर्व. ( १३ शुचि श० पहा ).

**चित्रा**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

२–एक अप्सरा.

**चित्रांगद**–एक गंधर्व. (भार० आदि० अ० १०१).

२–सीमंतिनी ना० एका राजकन्येचा पति.

३–शंतनु राजास सत्यवतीपासून झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यास लहान असतांच अरण्यांत चित्रांगद गंधर्वानें मारिलें. ( भीष्म श० पहा ).

४–कलिंगदेशीय राजपूर नगरीचा राजा. (भार०शांति० अ० ४ ).

५–द्रौपदीस्वयंवरास गेलेल्या राजांतील एक. ( भार० आदि० अ० १८६ ).

**चित्रांगदा**–एक अप्सरा.

२–चित्रवाहन राजाची कन्या, अर्जुनाची स्त्री. हिचा पुत्र बभ्रुवाहन.

**चित्रायुध**–द्रौपदीस्वयंवरास गेलेल्या राजांतील एक. ( भार० आदि० अ० १८६ ). हाच प्रायः भारती युद्धांत पांडवांकडे असावा. ( भार० उद्यो० अ० १७१ ). याच्या रथाच्या अश्वांचा रंग पळसाच्या फुलाप्रमाणें होता. ( भार० द्रोण० अ० २३ ).

२–भीमसेनानें मारिलेल्या धृतराष्ट्रपुत्रांतलि एक. (भार० द्रोण० अ० १३७ ).

**चित्राश्व**—शाल्वदेशाधिपति द्युमत्सेनपुत्र सत्यवानास नामांतर. ( २ सत्यवान् श० पहा ).

२–एक राजर्षि. ( भार० अनुशा० अ० १६५ ).

**चित्राक्ष**—धृतराष्ट्रशतपुत्रांतील एक. ( भार० आदि० अ० ११७ ).

**चित्रोपला**–भारतवर्षीय नदी. ( ऋष्यवान् श० पहा ).

**चिदि**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा तत्कुलोत्पन्न ज्यामघ राजाचा पौत्र, व विदर्भराजाच्या चार पुत्रांतील एक जो कैशिक राजा, त्याचा हा पुत्र.

**चिरकारी**–गौतम ऋषीच्या दोन पुत्रांतील एक. (भार० शांति० अ० २६६ ).

**चिक्षुर**–महिषासुराचा सेनापति एक राक्षस. ( २ महिषासुर श० पहा ). यासच चिक्षुराक्ष असें म्हटलेलें आहे.

**चीन**–हा महादेश, इंद्रप्रस्थाच्या दृष्टीनें ईशान्येस असून, प्राग्ज्योतिष देशास लागत आहे. ( भार० सभा० अ०

२६ श्लो० ८-९ ). येथें पांडवांच्या वेळेस कोणता राजा होता तें कळत नाहीं. परंतु प्राचीनकाळीं धौत-मूलक राजा असल्याचें आढळतें. याचा रमणचीन असाही आणखी एक भेद आहे.

**चीरिणी**-बदरी वनांतील एक नदी. येथें वैवस्वत मनूनें अयुत वर्षे तप केलें होतें. (भार०वन०अ०१८७).

**चीरवासा**-दुर्योधनपक्षीय राजा.

**चुलुका**-भारतवर्षीय नदी.

**चूडाला**-शिखिध्वज राजाची स्त्री. हिनें हरप्रयत्नें करून स्वतः आत्मज्ञान संपादून, पतीसही त्या स्थितीस आणून, पुनः राज्य करावयास लाविलें होतें, कारण, तो राज्य सोडून अरण्यांत गेला होता. हा इतिहास वासिष्ठग्रंथांत आहे.

**चूलि**-एक ऋषि. हा उग्र तप करीत असतां, सोमदा ना० गंधर्वानें याची अति उत्कृष्ट सेवा केली, व याचें तप समाप्त झाल्यावर, पुत्राची इच्छा दर्शविली. त्यावरून यानें मनेंकरून एक पुत्र निर्माण करून तिला दिला, तो ब्रह्मदत्त या नांवानें प्रसिद्ध आहे. ( वा० रा० बाल० स० ३३ ).

**चूलिसूनु**-चूलिऋषीनें सोमदा गंधर्वीस दिलेला ब्रह्मदत्त ना० पुत्र. त्यासच नामांतर.

**चेकितान**-हा यादव असून भारती युद्धांत पांडवांकडे होता. याच्या रथाचे अश्व पिंगट वर्णाचे असत ( भार० द्रोण० अ० २३ ). याचें सुशर्म्याशीं बरेंच युद्ध झालें होतें, व यास पुढें द्रोणानें मारिलें ( भार० द्रोण० अ० १२५ ). याच्या सारथ्याचें नांव पार्ष्णि असें होतें.

**चेदि**-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तत्कुलोत्पन्न रोम-पादवंशांत जन्मलेल्या उशिक राजाचा पुत्र, यास दम-घोष नांवाचा पुत्र होता. या चेदीच्या नांवावरून त्याच्या देशास तेंच नांव पडलें, व वंशास चेदिप अ० चैद्य असें ग्रंथांत म्हटलेलें आढळतें.

**चेदिदेश**-इंद्रप्रस्थाकडून पूर्वदशार्ण देशाच्या आग्नेयी दिशेस असणारा देश. याची राजधानी शुक्तिमती नगरी असून पांडवांच्या वेळेस तींत चेदिकुलोत्पन्न शिशुपाल राजा होता ( भार० सभा० अ० ३० ).

**चेदिप**-द्वितीयार्थक उपरिचर वसूच्या पुत्रांतील एक.

**चेदिमत्स्य**-पूर्व मत्स्यदेशास संज्ञा आहे; कारण त्यास चेदिदेशाचें सांनिध्य आहे.

**चैत्यक**-मगध देशांतील पर्वत.

**चैत्रक**-प्रयागक्षेत्रांतील तीर्थवि०

**चैत्ररथ**-चित्ररथ राजाचा पुत्र. हा भारती युद्धांत पांडवांकडे होता.

२-मेरु पर्वतावरील वनवि०. (भाग०५ स्कं० अ०१६).

३-इंद्राचें स्वर्गांतील वन.

४-हिमालयावरील कुबेराचें वन.

**चैत्रसेनि**-चित्रसेन पांचालाचा पुत्र. हा भारती युद्धांत पांडवांकडे होता.

**चैत्रा**-ज्यामघराजाची स्त्री, ही शिबि राजाची कन्या म्हणून हिला शैब्या असें नामांतर आहे.

**चैत्रायण**-एक ऋषि. ( २ अत्रि श० पहा ).

**चैद्य**-चेदि राजाचे वंशज ते.

**चोल**-भारतवर्षीय देश. ( भार० सभा० अ० २७ ).

**चौलि**-एक ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**च्यवन**-वारुणि भृगूच्या सात पुत्रांतील ज्येष्ठ. यास हें नांव पडण्यास असें कारण झालें कीं, भृगु ऋषीची स्त्री, पुलोमा गर्भिणी असतां, तिला घेऊन एक राक्षस पळाला, ते समयीं ती मार्गांतच प्रसूत झाली, त्यामुळें गर्भाची च्युति ( पतन ) झाल्या कारणानें असें नांव यास पडलें. राक्षसानें गर्भ च्युत झालेला पाहून, त्याच्या तेजानें भयभीत होत्साता पलायन केलें, व पुलोमा, यास घेऊन घरीं आली. ( भार० आदि० अ० ४—६ ).

हा, मोठा झाल्यावर वेदवेदांगांत पूर्ण होत्साता, पुढें यानें तपास आरंभ केला. तें याचें तप इतकें दीर्घ-कालपर्यंत चाललें होतें कीं, याच्या अंगावर वारूळ वाढलें. एकदां असें झालें कीं, हा ज्या वनांत तप करीत होता, तेथें, सूर्यवंशीय शर्यातिराजा, आपल्या चार सहस्र स्त्रिया समागमें घेऊन, सैन्यासहवर्तमान आला, व बरेच दिवसपर्यंत राहिला. त्या काळांत एके दिवशीं याची सुकन्या ना० कन्या आपल्या सख्यां-सहित अरण्यांत क्रीडा करीत फिरत असतां, च्यवन भार्गव ज्या वारुळांत होता तेथें गेली, व वारुळाच्या मुखाशीं अवलोकन करूं लागली, तों याचे नेत्र, यानें समाधि उतरल्यामुळें उघडे होते, तें तिच्या दृष्टीस पडले. तेव्हां हें चकचकीत काय असावें, तें तिला बालभावानें न समजून, तिनें त्या तेजाचा, लांब कंटक घेऊन त्यानें वेध केला. तेणेंकरून त्यांतून रक्त बाहेर आलें. त्यास पाहून सुकन्येस आश्चर्य होत्सातें ती सख्यांसहवर्तमान मुकाट्यानेंच पित्याकडे माघारी आली.

च्यवन भार्गवाचे नेत्र सुकन्येनें फोडिले, या मह-दतिक्रमामुळें शर्याति राजाच्या सैन्यांत सर्वांचा मल-मूत्ररोध झाला, त्याचें कारण राजास न समजून,

असें कां झालें म्हणून तो चिंताग्रस्त झाला आहे तों त्याजवळ सुकन्या गेली, व तिनें अरण्यांत आपण केलेलें कृत्य त्यास कळविलें. त्यावरून शर्याति भयभीत होत्साता कन्येस घेऊन त्या वारुळासमीप गेला, व तें युक्तीनेंच उकरवून पाहूं लागला तों, आंत नेत्रहीन झालेला दैदीप्यमान् ऋषि आहे. नंतर राजानें त्याची प्रार्थना आरंभिली कीं, कन्येकडून ही गोष्ट न कळत घडली आहे, तर याची क्षमा करणें आपणाकडे आहे. तें ऐकून यानें सांगितलें कीं, ही कन्या जर तूं मला देशील, तर अपराधाची क्षमा होईल. त्यावरून राजा निरुपाय होऊन त्यानें ती कन्या यास विवाहविधीनें दिली. देतांच सैन्य मोकळें झालें. असें पाहून सुकन्येस त्यानें तेथेंच ठेवून, आपल्या नगरास गमन केलें.

शर्याति राजा, सुकन्येस तेथें ठेवून स्वनगरास जातांच, तिनें पाहिलें कीं, आतां पतीवांचून आपल्यास कोणीच नाहीं, तर आपण याची सेवाच करून स्वस्थ असावें हें बरें. असा विचार करून, तिनें याची एकाग्रभावनेनें सेवा आरंभिली. या गोष्टीस बराच काळ लोटला असतां, तिचें सत्व पाहण्याकरितां अश्विनीकुमार तेथें आले व त्यांनीं तिचा बुद्धिभेद करून पाहिला. परंतु ती निश्चयापासून ढळली नाहीं असें पाहून, अन्यप्रकारानें तिला मोह पाडून पाहावा, असें त्यांनीं मनांत आणून, च्यवनास घेऊन ते एका सरोवरांत प्रवेशले, व आपल्याप्रमाणेंच त्यास तारुण्यादिक अवस्थेनें युक्त करून पुनः त्यास घेऊन बाहेर आले. त्यामुळें तिघेही सारखे दिसूं लागले. अर्थात् च्यवनाचें अंधत्वही गेलें; तथापि सुकन्येनें आपल्या पातिव्रत्यबलानें, त्या तिघांतून च्यवनासच ओळखून घेऊन त्याचा अंगीकार केला. त्यावरून अश्विनीकुमार संतुष्ट होऊन, त्यांनीं सुकन्येस आशीर्वाद देऊन, व च्यवनास कांचननामाभिधान ठेवून, स्वस्थळीं गमन केलें.

अश्विनीकुमार स्वर्गीं जाण्यास निघाले तेव्हां च्यवनानें त्यांस वचन दिलें कीं, तुह्मी मला तारुण्य, आणि नेत्र मी न म्हणतां ज्या अर्थी दिले आहेत, त्या अर्थीं मी तुम्हांस यज्ञामध्यें हविर्भाग नाहीं, तो तुम्हास देईन. असें म्हणून अश्विनीकुमार जातांच, तो स्त्रीस घेऊन शर्याति राजा जो आपला श्वशुर त्याच्या नगरास आला. त्यास शर्यातीनें ओळखलें नाहीं. सुकन्येस मात्र त्यानें ओळखिलें, व त्यावरून, कन्येनें अन्यपुरुषाचा अंगीकार केला असें त्यास वाटून, तीविषयीं तो पराकाष्ठेचा क्रोधाविष्ट झाला. तें पाहून तिनें त्यास झालेलें वृत्त सांगितलें. त्यावरून तो शांत होऊन, च्यवनाचा त्यानें सन्मान केला. नंतर च्यवनानें राजास बुद्धिपूर्वक यज्ञ करण्यास सांगून, तो अश्विनीकुमारांस हविर्भाग देऊं लागला. त्याचें इंद्रानें निवारण केलें असतां, तो ऐकत नाहीं असें पाहून वज्र उगारलें, तो च्यवनानें त्याचा हस्त स्तंभित करून, मद नांवाचा एक राक्षस त्यावर सोडिला. त्यावरून इंद्र, यास शरण येऊन म्हणाला कीं, अश्विनीकुमारांस हविर्भाग असो, परंतु या राक्षसाचें निवारण करावें. तें ऐकून यानें आपला कोप शांत केला, व अश्विनीकुमारांस हविर्भाग देऊन, मद्यपान, स्त्री, अक्ष ( द्यूत ) आणि मृगया, यांवर मद विभागून देऊन इंद्रास मुक्त केलें. व यज्ञ समाप्त करून, स्त्रीसहित पुनः आपल्या आश्रमास आला. यास, सुकन्येपासून प्रमति ना० पुत्र असून, दुसरी एक आरुषी ना० ज्येष्ठ स्त्री होती, तिला ऊर्व नांवाचा पुत्र झाला होता. ( भार० वन० अ० १२१-१२५ ). (भाग० ९ स्कं० अ० ३ ).

२-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, त्याच्या सुधनु ना० राजाचा पौत्र, व सुहोत्र राजाचा पुत्र. याचा पुत्र कृति.

३- ( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील, त्याच्या वंशांत जन्मलेल्या मित्रेयु राजाच्या दोन पुत्रांतील दुसरा. यास सुदास नांवाचा पुत्र होता.

## छ.

**छत्रवती**-द्रोणाचार्यापासून द्रुपदराजा पराभव पावल्यावर, आपली नगरी त्याकडे गेल्यानें, ही नूतन नगरी स्थापून तो हींत राहिला ( भार० आदि० अ० १३८ ).

**छंदोगेय**-एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा )

**छांदोग्य**-सामवेदोपनिषत्.

**छाया**-विवस्वान् आदित्याची स्त्री जी संज्ञा, तिला त्याचें तेज सहन होईना म्हणून, आपण अदृश्य होऊन, जें तिनें आपलें प्रतिरूप तेथें निर्माण करून ठेविलें ती. हिला सूर्यापासून, सावर्णि आणि शनि असे दोन पुत्र, व तपती नांवाची कन्या झाली होती. यांत सावर्णि हा मनु होणारा असून, शनीनें शनिमंडलाधिपत्य प्राप्त करून घेतलें, आणि तपती संवरण राजाची स्त्री झाली.

## ज

**जंगारि**-एक ब्रह्मर्षि ( १ विश्वामित्र श० पहा ).

**जंघ**–रावणपक्षीय नामांकित राक्षस.

**जटापुर**–नगरवि॰. ( वा॰ रा॰ किष्किं॰ स॰ ४२ ).

**जटायु**–विनतापुत्र जो अरुण, त्याच्या दोन पुत्रांतील दुसरा, संपातीचा कनिष्ठ भ्राता. दाशरथि राम, अगस्त्याश्रमाहून निघून पंचवटीकडे चालला असतां, त्याची व याची मार्गांत भेट झाली. ते समयीं रामानें तूं कोणाचा कोण असें यास पुसलें. यानें आपला सविस्तर वंश त्यास कथन करून, दशरथ राजा माझा अतिमित्र होता असें सांगितलें. त्यावरून रामानें, आम्ही आतां पंचवटींत राहणार आहों,यास्तव आमचें कुशल पाहणें तूं पाहात जा. असें सांगून पंचवटीकडे चालला असतां, हाही तथास्तु म्हणून चालता झाला. ( वा॰ रा॰ अर॰ स॰ १४ ).

एके काळीं राम आणि लक्ष्मण, दोघेही आश्रमीं नसावेत, अशी रावणानें संधि आणवून, पंचवटींत सीतेकडे भिक्षुरूपानें येऊन तिला हरिलें. व घेऊन जात असतां तिनें, रामा धांव, लक्ष्मणा धांव, असा आक्रोश आरंभिला, तो, हा दूर एका पर्वतावर होता तेथून श्रवण करून लागलाच धांवला, आणि पाहतो तर रावण तीस घेऊन चालला आहे. त्यावरून रावणाशीं याचें, व याशीं रावणाचें बरेंच भाषण होऊन, शेवटीं तो सीतेस सोडीत नाहीं असें पाहून, यानें त्यास युद्धार्थ आडविलें ( वा॰ रा॰ अर॰ स॰ ४९). पुढें रावणाचें व याचें युद्ध होऊन, त्यांत रावणानें युक्तीनेंच याचें पक्ष छेदिले, व शस्त्रप्रहारानें यास मरणोन्मुख करून, भूमीवर पाडल्यावर तो सीतेस घेऊन चालता झाला. पुढें जटायु राम येईपर्यंत प्राणमात्र धारण करून होता, व त्या वेळेस त्याचें वय साठ सहस्र वर्षांचें होतें. ( वा॰ रा॰ अरण्य॰ स॰ ५०–५२ ).

इकडे रामलक्ष्मण, बऱ्याच वेळानें आश्रमीं येऊन पाहतात तों तेथें सीता नाहीं, म्हणून तिचा शोध करीत चालले असतां, त्यांनीं दुरून यास पाहिलें, परंतु हा जटायुच, असें त्यांनीं न ओळखल्यामुळें, राक्षस असावा या बुद्धीनें रामानें धनुष्यास बाण लाविला, इतक्यांत लक्ष्मणानें निवारण केल्यावरून ते उभयतां त्यासमीप गेले, आणि पाहतात तों, तो जटायु छिन्नपक्ष होऊन पडला आहे. ( वा॰ रा॰ अर॰ स॰ ६४–६६ ).

नंतर रामानें यास पुसलें, जटायो, तुझी अवस्था अशी कशानें झाली ? त्यावरून यानें झालेलें वृत्त सांगितलें. व रावण सीतेस घेऊन दक्षिणेकडे लंकेंत गेला, इतकें बोलून प्राण सोडिला. तेणेंकरून रामलक्ष्मणांस परम दुःख होऊन, त्यांनीं याच्या देहास अग्निसंस्कार केला, व पिंड आणि जलांजलि देऊन, उभयतांही पुढें किंचित् नैर्ऋत्यदिशा अनुलक्षून सीतेचा शोध करीत चालिले. ( वा॰ रा॰ अर॰ स॰ ६८ ). जटायूस कर्णिकार, शतगामी, सारस, रज्जुवाल, आणि भेरुंड असे पांच पुत्र असल्याचें पुराणांतरीं आढळतें.

**जटासुर**–द्वितीयार्थक अलंबुष राक्षसाचा पिता. पांडव तीर्थयात्रा करीत फिरत फिरत, बदरिकाश्रमीं येऊन राहिले असतां, हा त्यांसमीप मुनिवेषानें येऊन, व आपणच आपल्या तपादि गुणांची प्रशंसा करून, विश्वास दाखवून राहिला. परंतु मनांत हेतु कीं, भीमसेन आश्रमांत नसेल, त्या वेळेस पांडवांस मारून द्रौपदीस हरण करावें. हें याचें कपट पांडवांस न कळल्यामुळें, तो मुनि असें समजून, ते त्याच्या सेवेस तत्पर असत. एकदां असें झालें कीं, भीमसेन फळें आणावयाकरितां अरण्यांत गेला, ती संधी याच्या मनाप्रमाणें येतांच, यानें तत्काळ द्रौपदीसहित पांडवांस उचलिलें, ( यांत अर्जुन इंद्रलोकींहून आला नसल्यामुळें नव्हता ) व धूम पळत सुटला. त्यावरून युधिष्ठिरानें यास बहुत नीति सांगितली, परंतु हा तिकडे लक्ष्य न देतां चालला. असें पाहून युधिष्ठिरानें कांहीं अलौकिक प्रकारानें जड होऊन त्याचा वेग मंद केला. तेणेंकरून याच्यानें पुढें चालवेना. इतक्यांत भीम आश्रमांत येऊन, पांडव नाहींत असें पाहून, त्यांच्या शोधास निघालेला तेथें येऊन पोहोंचला. नंतर भीमाचें व याचें घोर युद्ध होऊन, शेवटीं यास भीमानें मारिलें. ( भार॰ वन॰ अ॰ १५७ ).

**जटिला**–गौतमकुलोत्पन्न एक कन्या. हिला सात पति असल्याचा इतिहास व्यासांनीं द्रुपद राजास सांगितला ( भार॰ आदि॰ अ॰ १९५–१९६ ).

**जटी**–रावणानें पाताळांतील जिंकलेल्या नागांतील एक. ( वा॰ रा॰ युद्ध॰ स॰ ७ ).

**जठर**–मेरुच्या परिस्तर गिरींतील पूर्व दिशेकडील पर्वत.

२–भारतवर्षीय देश. ( भार॰ भीष्म॰ अ॰ ९ ).

**जडभरत**–प्रियव्रतवंशोत्पन्न जो प्रसिद्ध ऋषभदेव राजर्षि, त्याच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ भरत राजा. तोच राज्य सोडून अरण्यांत तप करीत असतां, हरिणबालकाच्या ममतेनें, अंतकालीं त्यास तोच ध्यास लागून, हरिणजन्म प्राप्त झालें. नंतर त्या योनींतून सुटल्यावर,

आंगिरसगोत्री कोणी ब्राह्मणाच्या कनिष्ठ स्त्रीच्या उदरीं तो जन्मास आला असतां, मागील संगानें मी कसा फेऱ्यांत पडलों, याचें त्यास पूर्व पुण्यानें स्मरण होतें म्हणून, संगास भिऊन, त्यानें तेथें जडचर्या अवलंबिली. त्या कारणानें यास असें नांव पडलें.

हा कोणी उठविल्यास उठावें, भक्षणास दिल्यास खावें, नाहीं तर नाहीं; अशी याची स्थिति पाहून, याच्या सापत्न भ्रात्यांनीं, याचा घरांत उपयोग नाहीं असें जाणून, क्षेत्राच्या संरक्षणार्थ यास तेथें नेऊन ठेविलें; परंतु तेथेंही याचा उपयोग झाला नाहीं. तथापि हा तेथेंच असे. एकदां कांहीं चोर देवीस नरबलि देण्याच्या विचारांत असतां, हा त्यांच्या दृष्टीस पडला. त्यावरून त्यांनीं यास उचलून देवीसमीप नेलें, व वध करणार इतक्यांत, ती देवताच क्षुब्ध होऊन, तिनें चोरांस मारून याचें संरक्षण केलें. ( भाग० ५ स्कं० अ० ९ ).

कालांतरेंकरून प्रसंगवशात्, रहूगण राजाची व याची गांठ पडून, त्यास यानें आत्मतत्त्वबोधानें कृतार्थ केलें. ( रहूगण श० पहा ).

**जंतु**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न सोमकराजा, त्याच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ ( १ सोमक श० पहा ).

**जतृण**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**जनक**-विदेहवंशीय प्रत्येक राजाचें साधारण नांव. याचें कारण, यांचा मूळ पुरुष केवळ पित्याच्याच देहापासून निर्माण झाला हेंच होय. याविषयींचा मूळ इतिहास असा आहे कीं, वैवस्वत मनूचा ज्येष्ठपुत्र इक्ष्वाकु, त्याच्या शतपुत्रांतील द्वितीय पुत्र निमि ना० राजा, त्यास वसिष्ठाचा शाप होऊन, त्याचा देहपात झाला असतां, ब्राह्मणांनीं त्याच्या देहाचें मथन केलें व त्यांतून एक पुरुष निर्माण केला. त्याचें नांव मिथि नामा जनक. तेथून मग तेंच नांव प्रत्येक पुरुषास चालू झालें. ( १ निमि श० पहा ).

**जनककूप**-भारतवर्षीय तीर्थ.

**जनदेव**-( वि० वं० ) एक जनक. याचें नांव वंशावळींत आढळत नाहीं. याचा इतिहास असा आहे कीं, यानें आपल्या पदरीं एक शत आचार्य ठेविले असून, त्यांस एके काळीं असा प्रश्न केला कीं, आत्मा म्हणजे काय ? व तें नांव मुख्यत्वेंकरून कोणास असून, त्याच्या प्राप्तीचा उपाय कोणता ? त्यावरून त्या आचार्यांनीं, जशीं ज्यांस कळलीं, तशीं उत्तरें दिलीं. परंतु राजाचें त्यांपासून समाधान झालें नाहीं, त्यावरून हा बहुत साशंक असतां, एके काळीं याच्या गृहीं पंचशिख ना० ऋषि प्राप्त झाला. त्याचें यानें पूजन करून, नम्र होत्साता वरीलच प्रश्न केले, त्यांचीं त्यानें उत्तरें जशीं द्यावयाचीं अशींच देऊन, आचार्यांच्या मतनिरासपूर्वक याचें उत्तम समाधान केलें. तें समाधान किती दृढ होतें, त्याविषयीं गायिलेलें गीत असें आहे. -"अपिच भवति मैथिलेन गीतं नगरमुपाहितमग्निनाभिवीक्ष्य ।। न खलु मम हि दह्यतेत्र किंचित्स्वयमिदमाह किल स्म भूमिपालः" ( भार० शांति० अ० २१८-२१९ श्लो० ५० ). तात्पर्य, राजगृह जरी जळूं लागलें, तरी यास हें माझें जळतें, अशी निजत्वबुद्धि व ममत्वबुद्धि उत्पन्न झाली नाहीं.

**जनपादप**-एक ब्रह्मर्षि ( १ विश्वामित्र श० पहा ).

**जनमेजय**-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न सुमति राजाचा पुत्र तो. यानें तीन दिवसांत भूमीचा जय करून तिचें आधिपत्य संपादिलें होतें.(भार० शांति० अ० १२४).

२- ( सो० वं० ) ययातिपुत्र जो पूरु त्याचा पुत्र. यानें चार यज्ञ केल्यावर वनांत गमन केलें. यास माधवी स्त्रीपासून प्राचिन्वान् अ० प्राचींतत् ना० पुत्र झाला होता.

३- ( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न सृंजय राजाचा पुत्र. यास महामना ना० पुत्र होता.

४- भारतीयुद्धांतील पांडवपक्षीय राजा, याच्या रथाचे अश्व युद्धकालीं मोहरांच्या फुलासारख्या रंगाचे असत. ( भार० द्रोण० अ० २३ ). यास धृतराष्ट्रपुत्र दुर्मुख त्यानें मारिलें (भार० द्रोण० अ० १५८).

५-भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

६-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पंडुपुत्र अर्जुनाचा पुत्र जो अभिमन्यु, त्याचा पौत्र, व परीक्षित् राजाचा पुत्र. यास वपुष्टमा ना० स्त्रीपासून तिचेठायीं शतानीक नांवाचा पुत्र झाला होता. याचा पिता परीक्षित् राजा, सर्पदंशानें मरण पावल्यामुळें, यानें, उत्तंक ऋषीनें उत्तेजन दिल्यावरून सर्पसत्र केलें होतें. त्यांत कवषापुत्र तुरऋषि, तो याचा उपाध्याय असून, चंडभार्गव, पिंगलऋषि, जैमिनि, आणि अंगिरा, हे क्रमेंकरून होता, अध्वर्यु, उद्गाता आणि ब्रह्मा; असे चौघे ऋत्विज होते. यांशिवाय कृष्णद्वैपायन व्यास, उद्दालक, प्रमत्तक, श्वेतकेतु, पिंगल, असित, देवल, नारद, पर्वत, आत्रेय, कुंडजठर, कालघट, वात्स्य, श्रुतश्रवा, कहोड, देवशर्मा, मौद्गल्य, आणि समसौरभ इ० ऋषि सदस्य ( सभासद ) होते. ( भार० आदि० अ० ५१-५३ ).

यानें केलेल्या सर्पसत्रांत नागांचीं कुळें इतकीं दग्ध

झालीं.–१५ वासुकीचीं, १८ तक्षकाचीं, १० ऐरावतनागाचीं, ९ कौरव्यनागाचीं, ३५ धृतराष्ट्रनागाचीं, याचप्रमाणें आणखी कित्येकांचीं मिळून शतावधि कुळें भस्म झालीं. ( भार० आदि० अ० ५७–५८). पुढें हें सर्पसत्र आस्तिकऋषीनें येऊन समाप्त करविलें.

कांहीं काळानें यानें आणखी एक यज्ञ केला असतां, त्यांत वाजसनेयी शाखेचा ब्रह्मा केलेला पाहून, वैशंपायन ऋषीनें यास शाप दिला. तेणेंकरून हा सत्वरच राज्यभ्रष्ट झाला, व कांहीं काळानें अरण्यांत मरण पावला. ( मत्स्य० ).

७– इंद्रोतःशौनकानें पावन केलेला प्राचीन राजा. हाही परीक्षित्पुत्रच होता. परंतु याचें कुल कोणतें होतें इ० कांहीं आढळत नाहीं. (इंद्रोतःशौनक श० पहा).

८– एक नागवि०.

**जनस्थान**–गोदावरीच्या दक्षिणतीरीं असणारें स्थलवि०. यास प्रस्तुत नासिक म्हणतात. येथें रामाच्या वेळेस शूर्पणखा, व खर राक्षस राहत असे. वा० रा० अर० स० १८ ).

**जनोलोक**–भूलोकापासून सत्यलोकापर्यंत ऊर्ध्वभागीं असणारे जे सप्तलोक, त्यांतील पांचवा. येथें ब्रह्ममानसपुत्र सनकादिक राहतात.

**जन्मेश्वर**–भारतवर्षीय तीर्थ.

**जन्हु**– ( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न होत्रक राजाचा पुत्र. यानें गंगेस आपल्या जंघेंत प्रथमतः गुप्त करून नंतर सोडून दिलें, तेव्हांपासून तिला जान्हवी नांव पडलें. ( वा० रा० बाल०स० ४३ ). यास अज किंवा अजमीढ नामांतरानें पूरु ना० पुत्र होता. ( भार० शांति० अ० ४९ ).

२– ( सो० वं० ) नहुषकुलोत्पन्न पूरु, त्याच्या अजमीढवंशांत जन्मलेल्या कुरु राजाच्या पांच पुत्रांतील तिसरा. याच वंशांत कौरवपांडव झाले होते. याचा पुत्र सुरथ.

**जंबुक**–एक शूद्र. दाशरथि राम राज्य करीत असतां, यानें तीन वर्णांची सेवा करणें हा आपला स्वधर्म सोडून, ब्राह्मणादिकांचा तप करणें हा परधर्म अंगीकारिला, त्या अधर्मानें अयोध्येंत एका ब्राह्मणाचा पुत्र अकाळीं मरण पावला. त्यावरून तो ब्राह्मण रामास येऊन पुष्कळ बोलला. म्हणून राम पुष्पक विमानांत बसून शोध करीत चालला आहे तों हा शूद्र तप करितां दृष्टीस पडला. तेव्हां रामानें याचा तत्काळ वध करून प्राणांत शिक्षा त्यास दिली, व ती देतांच इकडे ब्राह्मणपुत्र सजीव झाला. "श्रूयते जंबुके शूद्रे हते ब्राह्मणदारकः ॥ जीवितो धर्ममासाद्य रामात्सत्यपराक्रमात् ॥" ( भार० शांति० अ० १५३ श्लो० ६७ ). यास वाल्मीकि रामायणांत शंबुक असें म्हटलें आहे. ( वा० स० उत्तर० स० ७६ ).

**जंबुद्वीप**–पृथ्वीच्या सप्त महाद्वीपांतील पहिलें. हें मेरूच्या आसमंताद्भागीं वर्तुलाकार असून, याच्या मध्यभागीं मेरु आहे. याचा व्यास एक लक्ष योजनें आहे, व यास इतक्याच रुंदीच्या क्षारसमुद्राचें वेष्टन आहे. येथील अधिपति कल्पारंभीं प्रियव्रत राजाचा पुत्र आग्नीध्र होता. त्यास नऊ पुत्र होते म्हणून, त्यानें त्याचे वर्षसंज्ञक नऊ भाग करून एकेक वर्षाचें आधिपत्य एकेकास दिलें. त्या भागांचीं नांवें अशीं–**अजनाभवर्ष, किंपुरुषवर्ष, हरिवर्ष, भद्राश्ववर्ष, रम्यकवर्ष, हिरण्मयवर्ष, कुरुवर्ष, केतुमालवर्ष.** आणि या सर्वांच्या मध्यभागीं **इलावृतवर्ष.** यांच्या चतुःसीमापूर्वक मर्यादा कशा आहेत, त्या त्या शब्दावर पहाव्या. या द्वीपांत, शत योजनें लांबीच्या, व तितक्याच रुंदीच्या, म्ह० दशसहस्र योजनें क्षेत्रफळाच्या प्रमाणाचे, सत्तावन्न सहस्र देश असून, यास भारतांत सुदर्शनद्वीप असें म्हटलेलें आहे ( भार० भीष्म० अ० ५ श्लो० १३ ).

**जंबुनदी**–मेरूच्या पार्श्वभागीं असणाऱ्या चंद्रप्रभ सरोवरांतून निघालेली नदी.

२–स्वर्धुनीच्या सप्त प्रवाहांतील एक प्रवाह तो.

**जंबुप्रस्थ**–ग्रामवि०. हा केकयदेशांतून अयोध्येस परत येत असतां मार्गामध्यें भरतास लागला होता.

**जंबुमार्ग**–भारतवर्षीय क्षेत्र.

**जंबुमाली**-लंकेंतलि प्रसिद्ध जो प्रहस्त ना० रावणसचिव राक्षस त्याचा पुत्र. यास रावणानें, अशोकवनिका मारुतीनें भंगिली त्या काळीं त्यावर पाठविलें असतां, मारुतीच्या हातून हा मेला. ( वा० रा० सुंदर० स० ४२—४४).

२–दुसरा एक राक्षस. यासहि मारुतीनेंच मारिलें.(वा० रा० युद्ध० स० ४३ ).

**जंभ**–एक दैत्य. हा तारकासुराच्या १० प्रमुख असुरांतील एक असून, यास कयाधु ना० कन्या होती, व तारकासुराच्या युद्धांत याला विष्णूनें मारिलें. ( भार० वन० अ० १०२ ).

२–रावणपक्षीय राक्षस. याचा पुत्र सुंद, तो ताटका राक्षसीचा पति होता.

३—रामसेनेंतील एक वानर. ( वा० रा० युद्ध० स० ४ ).

**जंभक**–इंद्रानें मारलेला दैत्य. ( ३ तारकासुर श०पहा).

**जंभासुर**–प्रथमार्थक जंभ शब्द पहा.

**जमदग्नि**–वारुणिभृगुकुलोत्पन्न जो ऋचीक ऋषि, त्यापा-

सून गाधि राजाची कन्या सत्यवती तिच्या ठायीं झालेला पुत्र. यास आर्चीक असेंहि म्हटलेलें असून, हा विश्वामित्राचा भागिनेय होता, व याला प्रसेनजित् राजर्षि ज्यास रेणु असें म्हणत असत, त्याची कन्या रेणुका, ती स्त्री होती. हा प्रत्याश्विनमासीं प्रस्तुत सूर्यासमागमें संचार करण्यास असतो. ( ३ इष श० पहा ). यास रुमण्वान्, सुषेण, वसुमान्, विश्वावसु आणि राम, ज्यास परशुराम अशी प्रासिद्धि आहे तो, मिळून रेणुकेच्या ठायीं झालेले पांच पुत्र होते.

हा कोपी किती होता, त्याविषयीं असा इतिहास आहे कीं, एकदां याची स्त्री रेणुका बहिर्जलीं स्नानास गेली असतां, तिनें तेथें मार्तिकावतकदेशाचा राजा चित्ररथ, स्त्रियांसहवर्तमान जलक्रीडेस आलेला होता त्यास पाहिलें.त्यावरून त्याची क्रीडा अवलोकन करण्यानें तिला आश्रमीं येण्यास किंचित् विलंब लागला. तेवढयावरून यास इतका क्रोध आला कीं,यानें आपल्या पुत्रांस तिचा वध करण्याची आज्ञा केली. परंतु तिचा त्यांनीं अनादर करून, ते स्तब्ध राहिल्यामुळें, त्यांस यानें पाषाणतुल्य जड केलें. व परशुराम अरण्यांत गेला होता, त्याची मार्गप्रतीक्षा करीत राहिला. इतक्यांत तो आला असें पाहून, त्यासहि तीच आज्ञा केली. तेव्हां परशुरामानें दीर्घदृष्टि करून, पित्याच्या आज्ञेनुरूप तिचा तत्काळ वध केला. त्यावरून हा प्रसन्न होऊन परशुरामास म्हणाला कीं, तुला काय इष्ट असेल तें माग. असें ऐकतांच परशुराम म्हणाला, माझी माता व भ्राते पूर्ववत् होऊन, मातेस, मीं तिला मारल्याचें स्मरण नसावें ( १ राम श० पहा ). व आपण आजपासून क्रोध सोडावा. त्यास यानें तथास्तु म्हणतांच रेणुका, व चौघे पुत्र तत्काळ सजीव होऊन, हाहि इतका कोपरहित झाला कीं, सहस्रार्जुनाच्या पुत्रांनीं, यास येऊन मारिलें तथापि पुनः यास क्रोध म्हणून आलाच नाहीं.

एकदां क्रोधदेवतेनें असें मनांत आणिलें कीं, यानें मला निश्चयेंकरून सोडिलें आहे किंवा कसें तें पहावें, म्हणून याच्या आश्रमीं पितृतिथि असतां, यानें पितरांकरितां सिद्ध करविलेलें पायस ( खीर ) सर्परूपानें तिनें येऊन त्यांत आपलें गरल टाकून दूषित केलें, आणि यास म्हणाली, मीं असें केलें आहे. परंतु यास कोप न येतां, यानें तीस इतकेंच म्हटलें कीं, हा अपराध तूं पितरांचा केला आहेस. [illegible] संतुष्ट होऊन पायसः पूर्ववत् करून अंतर्धान पावली ( १ क्रोध श० पहा ).

एकदां कार्तवीर्यार्जुन सैन्यासहित याच्या आश्रमास आला असतां, यानें त्याचें सपरिवार कामधेनूच्या बळानें उत्कृष्ट आदरातिथ्य केलें, असें असून त्यानें याची ती धेनु बलात्कारानें हरण केली; परंतु यास कोप आला नाहीं. मात्र ती पुनः कार्तवीर्यापासून परशुरामानेंच आपण होऊन सोडवून आणून, याचे आश्रमधर्म चालू केले.

कांहीं कालानें कार्तवीर्याच्या पुत्रांनीं त्यांच्या पित्यास परशुरामानें मारिलें होतें म्हणून, तो आश्रमांत नाहीं अशा संधीस येऊन जमदग्नीचा वध केला ( भार० वन० अ० ११६ ). त्यावरून परशुरामानें पुनः यास सजीव करून, पृथ्वी निःक्षत्रिय करण्याची प्रतिज्ञा केली इ० ( परशुराम श० पहा ).

२–याच कुलांतील दुसरा एक ऋषि. (३ भृगु श०पहा).

**जय**–विष्णूच्या प्रसिद्ध दोन द्वारपालांतील एक ( जयविजय श० पहा ).

२–उत्तानपादवंशीय ध्रुवपुत्र वत्सरास, स्वर्वीथि भार्येपासून झालेल्या ६ पुत्रांतील कनिष्ठ.

३–( वि० वं० ) श्रुत ना० जनकाचा पुत्र.याचा पुत्र विजय जनक.

४–( सो० वं० ) पुरूरवा राजास उर्वशीपासून झालेल्या ६ पुत्रांतील कनिष्ठ. याचा पुत्र मित.

५–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न क्षत्रवृद्धवंशीय संजय राजाचा पुत्र. याचा पुत्र कृत.

६–(सो० वं०) आयुपुत्र क्षत्रवृद्धवंशीय संकृति राजाचा पुत्र. याचा पुत्र क्षत्रधर्मा.

७–( सो० वं० ) नहुषपौत्र पूरुवंशीय रौद्राश्वकुलांतील मन्यु राजाच्या पाच पुत्रांतील दुसरा.

८–शुक्राचार्यास पीवरीपासून झालेल्या पांच पुत्रांतील कनिष्ठ.

९–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय सात्यकीच्या १० पुत्रांतील ज्येष्ठ. हा भारतीयुद्धांत मरण पावला.

१०–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय कंकास कर्णिकेपासून झालेल्या दोन पुत्रांतील दुसरा.

११–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न कृष्णास भद्रेच्या ठायीं झालेला पुत्र.

१२–धृतराष्ट्रपुत्र. यास भीमसेनानें युद्धांत मारिलें ( भार० द्रोण० अ० १३५ ).

१३–कर्णानें मारिलेला पांडवपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ५६ ).

१४–ब्रह्मसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षीतील एक.

**जयंत**–एक रुद्र. भारतोक्त रुद्रांतील हें कोणाचें नामांतर तो निर्णय होत नाहीं.

२–एक रुद्रगण.

३–इंद्राचा पुत्र, व द्वादशादित्यांतील इंद्राच्या तीन पुत्रांतील एक.

४–धर्मऋषींस मरुत्वतीपासून झालेल्या दोन पुत्रांतील एक.

५–दशरथराजाच्या अष्टप्रधानांतील एक ( वा० रा० बाल० स० ७ ).

६–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० उद्यो० अ० १७१ ).

**जयंती**–स्वयंभू मन्वंतरांतील स्वर्गाधिपति यज्ञ ना० इंद्राची कन्या. ऋषभदेव राजर्षीची स्त्री. हिचेच भरत इ० शत पुत्र होत ( ऋषभदेव श० पहा ).

२–चालू मन्वंतरांतील स्वर्गाधिपति पुरंदरनामा इंद्र त्याची कन्या वारुणि भृगूच्या पुत्रांतील एक जो शुक्र त्याची स्त्री. हा वृषपर्वा दानवाच्या वेळेस त्याचा पुरोहित असणारा शुक्र होय. त्यापासून हिला देवयानी कन्या झाली होती ( मत्स्य० अ० ४७ ).

३–भारतवर्षीय नदी.

**जयत्सेन**–भारतीयुद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० उद्यो० अ० ४ ).

२–भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय मागध, अभिमन्यूनें मारिला ( भार० भीष्म० अ० ४७).

३–आणखी एक दुर्योधनपक्षीय राजा ( भार० शल्य० अ० ६ ).

**जयद्रथ**–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न पूरु राजा त्याच्या अजमीढवंशांतील बृहदिषुकुलांत जन्मलेल्या बृहत्काय राजाचा पुत्र. यास विशद नांवाचा पुत्र होता.

२–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न रोमपाद राजा, तद्वंशीय बृहन्मना राजाचा पुत्र. यास संभूति स्त्री असून विजय नांवाचा पुत्र होता.

३–सिंधुदेशाचा राजा वृद्धक्षत्र त्याचा पुत्र, व धृतराष्ट्र-कन्या दुःशला तिचा पति. हा दुर्योधनपक्षाचा असल्यामुळें, पांडवांचा द्वेष करी. त्याविषयींचें थोडें वृत्त येथें लिहितों.—

पांडव वनवासांत असतां, एके काळीं हा आपल्या देशांतून निघून स्वयंवराकरितां शाल्व देशास चालला होता, त्यावेळेस यासमागमें बलाहक, आनीक, विदारण, इ० याचे साहा भ्राते, आणि कोटिक अ० कोटिकास्य, शिबिदेशाधिपति सुरथ राजाचा पुत्र, क्षेमंकरनामेंकरून त्रिगर्तराजपुत्र, इक्ष्वाकुकुलोत्पन्न सुभद्रपुत्र सुपुष्पित, कुलिंदपुत्र आणि सिंधुदेशोत्पन्नच अंगारक, कुंजर, गुप्तक, शत्रुंजय, संजय, सुप्रवृद्ध, भयंकर, भ्रमर, रवि, शूर, तसाच प्रताप आणि कुहन, असे बारा राजपुत्र व याच मानानें सैन्य होतें. याप्रमाणें हा चालला असतां, मार्गामध्यें ज्या काम्यकवनांत पांडव होते तें यास लागलें.

त्या वनांत याचें त्या दिवशीं राहणें झालें. तेथें पांडवांचा आश्रम समीपच असून, ते सर्वही मृगयेस गेले होते, व धौम्य पुरोहित आणि द्रौपदी उभयतां मात्र आश्रमीं होतीं. त्यामुळें द्रौपदी याच्या सहजीं दृष्टीस पडून, तीविषयीं यास कामबुद्धि उत्पन्न झाली. नंतर ती कोणाची कोण हें कळून, तिनें आपणास वश व्हावें, अशा बुद्धीनें तिजकडे यानें कोटिकास पाठविलें. त्यावरून तो तिजकडे गेला, व त्यानें तिला तूं कोण व या अरण्यांत किन्निमित्त राहिली आहेस, इ० सर्व वृत्त विचारिलें. तिनें उत्तर केलें, मी पांडवांची स्त्री द्रौपदी आहें, व पांडव मृगयेस गेले असून, त्यांनीं माझ्या रक्षणार्थ येथें धौम्य पुरोहित ठेविला आहे. असें बोलून ती आंत गेली असतां, कोटिक याजकडे माघारा येऊन, त्यानें यास द्रौपदी बोलल्याप्रमाणें जशाचें तसेंच वृत्त सांगितलें.

कोटिकानें सांगितलेलें वृत्त ऐकतांच, जयद्रथ आपल्या सेनेंतून निघून द्रौपदी होती तेथें आला. त्यास पाहून तिनें याचा आदर केला, व तो जयद्रथ असें ओळखून पांडव आतांच येऊन तुम्हांस भेटतील इ० सरळ भाषण केलें. परंतु हा कुटिल असल्यामुळें, यानें बोलण्यास आरंभ केला कीं, हे द्रौपदि, तुला या हतभाग्य पांडवांसमागमें राहून, वनसंबंधीं क्लेश भोगणें योग्य नाहीं. तूं द्रुपदराजाची कन्या असून, परम सुकुमार, तशांत तुझें रूपही उत्तम, व अजून तारुण्यदशा आहे. यास्तव विचार करून सत्वर मजसमागमें चल. माझें ऐश्वर्य अतिशय मोठें आहे. इ० अनेक प्रकारें निर्लज्जपणाचें त्याचें भाषण ऐकून, द्रौपदीस पराकाष्ठेचा क्रोध आला, व ती यास म्हणाली, मूर्खा, येथून सत्वर चालता हो; नाहींतर व्यर्थ प्राणास मुकशील. अरे, गांधारीचा तूं जामात, तोच कुंतीचा असें असतां, तुला हें भाषण योग्य आहे काय? असो.

सत्वर तुला उमजून गमन कर, अविचारानें व्यर्थ कालपाशांत पडण्याची इच्छा करूं नको. तथापि हा उन्मत्तच, म्हणून तिचें भाषण यास न रुचतां, यानें तिला बलात्कारानें धरून, आपल्या रथांत नेऊन घातलें, व रथ हाकून सेनेची वाट न पाहतां पळत सुटला ( भार० वन० अ० २६४–२६८ ).

धौम्यऋषिही जयद्रथानें द्रौपदीस उचलून रथांत घातलें, व पळत सुटला असें पाहून त्याचा वारंवार निषेध करीत त्यामागें लागला. तों इकडे पांडव आश्रमीं आले. येतांच त्यांस इतर ऋषींनीं झालेलें वर्तमान कळविलें. त्यावरून ते याच्यामागें धांवले, व बऱ्याच अंतरावर यास गांठून धरिलें. इतक्यांत याच्या मागून आलेल्या सैन्याचाही पराभव करून कोटिकास तर भीमानें ठारच मारिलें, व यास मारणार, तों युधिष्ठिरानें भीमास सांगितलें, यास मारूं नको; कारण दुःशलेस दुःख होऊन, धृतराष्ट्र व गांधारी त्यांसही शोक होईल. त्यावरून त्यानें यास न मारतां, याकडून मी पांडवांचा दास आहे असें म्हणवून, पांच पाट काढून सोडून दिलें, व ते द्रौपदीस घेऊन, धौम्यासहित आश्रमीं आले.

याप्रमाणें याची अवस्था पांडवांनीं केली असतां, हा अत्यंत विमनस्क होत्साता, स्वयंवरास न जातां, सैन्यासह सर्व राजपुत्रांस माघारें देशास लावून देऊन, आपण एकटाच निघून गंगाद्वारास गेला, व तेथें रुद्राचें तीव्र आराधन करून मी संपूर्ण पांडवांस जिंकावें असा वर मागूं लागला. परंतु रुद्रानें सांगितलें, हें कांहीं होणार नाहीं. मात्र अर्जुन नसतां एकवेळ तूं इतर पांडवांचा पराभव करशील. इतकें बोलून रुद्र अंतर्धान पावला असतां, तेवढ्यानेंच हा संतुष्ट होऊन स्वनगरास आला. याच वरप्रभावानें अभिमन्युवधकालीं चक्रव्यूहांत यानें पांडवांचा पराभव केला. ( भार० वन० अ० २७२ ).

पुढें भारतीयुद्ध प्रवृत्त होऊन, अर्जुन संशप्तकांकडे गुंतल्यामुळें, यानें पांडवांचा पराभव केला म्हणून अभिमन्यु चक्रव्यूहांत एकटा सांपडून मरण पावला. त्यावरून अर्जुनानें उदयीक सूर्यास्तापूर्वीं यास मारीन, न मारीन तर अग्निप्रवेश करीन अशी प्रतिज्ञा केली. तीवरून हा भयभीत होऊन मी स्वदेशास माघारा जातों, असें दुर्योधनास म्हणूं लागला; परंतु द्रोणाचार्यानें यास अभय देऊन, राहून घेतलें, म्हणून हा न जातां स्वस्थ राहिला. (भार० द्रोण० अ० ७३–७४).

दुसरे दिवशीं पाहाटेस अर्जुन उठला व त्यानें स्नान संध्या आणि शिवोपासन ( आनंदरूप परमात्म्याचें उपासन ) यथाविधि केलें, व कृष्णाची मार्गप्रतीक्षा करीत बसला. इतक्यांत तोहि त्याचप्रमाणें विधि उरकून अर्जुनासमीप प्राप्त झाला. असें पाहून अर्जुन सेनेसहित युद्धभूमीवर येऊन उभा राहिला. तों तिकडून, कौरवसेनेसहित द्रोणाचार्यहि प्राप्त होऊन व त्यानें अर्जुनास अविदित अशा शकटव्यूहाची रचना करून त्यांत पद्मव्यूह रचिला, व त्याच्या आंत सूचिव्यूह रचून त्यांत जयद्रथास बसविल्यावर, सर्व योद्ध्यांची यथायुक्त स्थापना जेथील तेथें होतांच, आपण स्वतः व्यूहद्वारावर येऊन उभा राहिला ( भार० द्रोण० अ० ८०–८८ ).

इकडे कृष्णानें अर्जुनास, आचार्याशीं युद्ध करण्यास गुंतूं नको, सत्वर व्यूहांत प्रवेश कर, असें सुचवून रथ हांकिला. त्यावरून अर्जुनानें व्यूहांत जातांजातांच आचार्यास वंदन केलें, व पुढें निघाला. इतक्यांत द्रोणाचार्य अर्जुनास म्हणूं लागला कीं, व्यूहद्वारावर मी तुझा शत्रु स्थित असतां, मशीं युद्ध करून मला जिंकल्यावांचून तुला आंत जाणें योग्य नाहीं. तें ऐकून अर्जुनानें त्यास उत्तर असें केलें:—

**श्लोक.**

॥ गुरुर्भवान् न मे शत्रुः शिष्यः पुत्र-
समोऽस्मि ते ॥ नचास्ति स पुमान्
लोके यस्त्वां युधि पराजयेत् ॥
( भार० द्रोण० अ० ९१ श्लो० ३४ ).

नंतर जो नीट निघाला तो व्यूहांतच प्रवेशला. जातां जातां शतावधि योद्ध्यांचा पराजय करीत, तसाच शतावधि योद्ध्यांस मारीत चालला आहे तों कृष्णानें अश्वांस तृषा लागली आहे, असें सुचविल्यावरून, त्यानें जयद्रथ अजून येथून बराच दूर असून मध्यान्ह झाला आहे असें पाहून, तेथें विश्रांति घेतली व अश्वांस पिण्यास स्वच्छ उदक नव्हतें, यास्तव बाणगंगा निर्माण केली. तदनंतर चार घटिका विश्रांति घेऊन अर्जुन तेथून निघाला, तों जयद्रथाच्या बराच समीप येऊन पोहोंचला. इतक्यांत युधिष्ठिरानें अर्जुनाच्या साह्यास सात्यकीस पाठविलें. त्यावरून व्यूह भेदून तो अर्जुनास येऊन भेटला ( युयुधान श० पहा). त्यामागून लागलाच भीमसेन, युधामन्यु, उत्तमौजा, हेहि अनुक्रमें येऊन पोहोचले. त्या सर्वांस एकत्र झालेले पाहून, दुर्योधनास अत्यंत भय उत्पन्न होत्सातें, तो जयद्रथाच्या रक्षणार्थ स्वतः त्याजवळ जाऊन बसला (भार० द्रोण० अ० ९०–९१ ).

याप्रमाणें अर्जुन व दुर्योधन आपआपले मनोरथ सिद्ध करण्याच्या व्यवस्थेंत निमग्न असून, संपूर्ण योद्धे परस्परांशीं युद्धांत गुंतले आहेत, इतक्यांत कृष्णानें एकाएकीं सूर्य अस्तास जात असल्याचा उभयसैन्यांत भास उत्पन्न केला. त्यावरून अर्जुनाची मुखश्री म्लान झाली, व कौरवांस हर्ष होऊन, ते परस्परांशीं, हा पहा सूर्य अस्तास गेला असें बोलून, ते एकमेकांस दाखवूं लागले. त्या प्रसंगांत सूर्यास्त पाहण्याकरितां जयद्रथानें मान वरती केली, तों कृष्णानें अर्जुनास, संकेतानें तो जयद्रथ पहा, इतकें म्हणतांच, अर्जुनानें तत्काळ त्याचें शिर उडवून त्याचा पिता वृद्धक्षत्र त्याच्या मांडीवर पाडिलें ( वृद्धक्षत्र श० पहा ). जयद्रथ मरतांच कृष्णानें सूर्य पूर्ववत् सर्वांच्या दृष्टीस पडेसा केला. तेणें करून संपूर्ण कौरव शोकाकुलित झाले, व पांडव सैन्यांत जयघोष होऊन, यथार्थ सूर्यास्त होतांच ते आपल्या शिबिरास गेले ( भार० द्रोण० अ० १४६ ). जयद्रथास दुःशलेपासून झालेला सुरथ नांवाचा पुत्र होता.

**जयध्वज**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न कार्तवीर्य राजाच्या पांच पुत्रांतील पहिला. याचा पुत्र तालजंघ.

**जयरात**–कलिंगदेशीय भानुमंत राजाचा भ्राता. यास रात्रियुद्धांत भीमसेनानें मारिलें ( भार० द्रोण० अ० १५५ ).

**जयविजय**–विष्णूचे उभय द्वारपाल. हे सनकादिकांच्या शापानें वैकुंठांतून पतन पावून असुरयोनीस आले होते. "तौ तु गीर्वाणऋषभौ दुस्तराद्धरिलोकतः ॥ हतश्रियौ ब्रह्मशापादभूतां विगतस्मयौ ।। " (भाग०३ स्कं० अ० १६ श्लो० ३२ ).

**जयसेन**–( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध तद्वंशीय अहीन राजाचा पुत्र. याचा पुत्र संकृति.

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ तद्वंशीय जन्हुकुलांत जन्मलेल्या सार्वभौम राजाचा पुत्र. यास राधिक नांवाचा पुत्र होता.

३– अवंत्यराजा, राजाधिदेवीचा पति, व विंदानुविंदांचा पिता. यास मित्रविंदा ना० कन्या होती. तिला कृष्णानें वरिलें होतें.

**जया**–कृशाश्वप्रजापतीची कन्या.

**जयानीक**–द्रुपदपुत्र एक पांचाल. यास अश्वत्थाम्यानें मारिलें ( भार० द्रोण० अ० १५६ ).

**जयाश्व**–जयानीकाचा भ्राता. यासही अश्वत्थाम्यानेंच मारिलें ( भार० द्रो० अ० १५६ ).

**जरत्कारु**–भृगुकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि. हा महातपस्वी व ब्रह्मचर्यानें वागणारा होता. यानें एकदां आपल्या मातापित्यांस एका गर्तेंत लोंबतांना पाहिलें. तेव्हां यानें दयेंकरून आपण कोण, व अशी अवस्था कां पावलां म्हणून पुसलें. त्यांनीं सांगितलें, आमचा एक जरत्कारु म्हणून पुत्र आहे, तो विवाह करून सत्प्रजा उत्पन्न करीत नाहीं, म्हणून आम्हास ही दशा प्राप्त झाली आहे. तेव्हां यास विस्मय होऊन, हा त्यांस म्हणाला कीं, जरत्कारु तो तर मीच आहें ( भार० आदि० अ० ४५–४६ ). पुढें हा आणखी असें म्हणाला, वरें तर मी आतां तुम्हाकरितां लग्न करितों. परंतु मला माझ्याच नांवाची स्त्री मिळून, ती मला कोणीतरी भिक्षेंत दिली पाहिजे. त्यांनीं यास तथास्तु म्हणतांच, हा पृथ्वीवर आला. पुढें कश्यपपुत्र वासुकीनें आपली भगिनी जरत्कारु, यास भिक्षेंत दिली. ती देण्याचें कारण तिच्या ठायीं होणारा पुत्र, जनमेजयाच्या सर्पसत्रांतून नागांस वाचविणारा होणार आहे, हें त्यास विदित होतें. तात्पर्य, नागभगिनी जरत्कारु तिशीं याचा विवाह झाला (भार० आदि० अ० ४७–४८ ).

विवाह होऊन जरत्कारु ऋषि स्त्रीस घेऊन आश्रमीं आला, व बराच काळपर्यंत तो तीसहवर्तमान एकत्र राहिला. एकदां असें झालें कीं, हा निद्रित असतां सूर्यास्ताचा समय झाला म्हणून संध्येनिमित्त तिनें यास जागृत केलें तेवढ्यावरून यास कोप येऊन, हा तिला सोडून चालला. तेव्हां तिनें याची रहाण्याविषयीं बहुत प्रार्थना केली. परंतु यानें न ऐकतां, तुझ्या उदरीं गर्भ आहे, इतकें सांगून वनांत गमन केलें. तोच पुढें यास आस्तिक नांवाचा पुत्र झाला. याचें नांव जरत्कारु पडण्यास कारण असें कीं, **जरत्** शब्द क्षीणवाची असून **कारु** शब्द क्रियावाची आहे. म्हणजे उग्र तपानें शरीर क्षीण करणारा, अतएव **जरत्कारु** असा त्यांतलि भाव होय. ( भार०आदि० अ० १३–१६ ).

२–नागभगिनी जरत्कारु ऋषीची स्त्री, व आस्तिकाची माता.

**जरद्गौरी**–आस्तिकमाता जरुत्कारु तिलाच हें नामांतर.

**जरा**–एक राक्षसी. ( जरासंध श० पहा ).

२–वसुदेवापासून रथराजी ना० स्त्रीच्या ठायीं झालेल्या तीन पुत्रांतील मध्यम. हा क्षत्रिय असून दुराचरणानें व्याध झाला. याचाच बाण कृष्णास लागून त्याचें निधन झालें व हाही दिव्यलोकीं कृष्णकृपेनें गेला ( भार० मौसल० अ० ४ ).

**जरासंध**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा तद्वंशीय जो उपरिचर वसु राजा त्याचा पौत्र, व बृहद्रथ राजाच्या दोन पुत्रांतील एक. याचें जन्म दोघी मतांपासून दोन शकलांनीं होऊन, तीं शकलें जरा राक्षसीनें सांधिलीं, व त्यांचा एकच सवंध पुत्र केला, म्हणून यास असें नांव पडलें होतें ( भार० सभा० अ० १७-१८ ). हा मगध देशाचा अधिपति असून याच्या राजधानीचें नांव गिरिव्रज असें होतें. याच्या दोन कन्या अस्ति व प्राप्ति, त्या यानें कंसास दिल्या होत्या. यानें, कंसास कृष्णानें मारिल्यामुळें त्याशीं सत्रावेळ जाऊन युद्ध केलें; परंतु तितक्या वेळाही याचा पराभवच झाला; कारण यादवाग्रणी बलराम तो महाबलाढ्य होता.

हा जरी इकडे असा पराभूत झाला, तरी तो अन्यत्र असाच असेल असें समजूं नये. तर ता मोठा बलवान् असून, याची भीति बहुत राजांस असे. हंस आणि डिंभक हे उभयतां भ्राते याचे प्रधान असून, शिशुपाल याचा सेनापति होता, व यानें युद्धांत शतावधि राजे जिंकून पशूंप्रमाणें बद्ध करून कारागृहांत ठेविले असत, आणि त्यांस हा शतवर्षें पूर्ण झाल्यावर रुद्रयाग करून बलि देणार होता. इतक्यांत. युधिष्ठिरानें राजसूययज्ञ करावा, असें मनांत आणून कृष्णास पाचारण केलें. त्या संधींत त्या राजांस बद्ध होऊन शायशीं वर्षें झालीं होतीं, व चौदा वर्षें हां हां म्हणतां जाऊन, आपणास बळी जावें लागेल या भीतीनें त्यांनीं गुप्तरूपानें कृष्णाकडे दूतद्वारा संदेश ( निरोप ) पाठविला कीं, तुम्ही सत्वर येऊन आह्मांस सोडवावें; नाहींतर आमचें मरण समीप येऊन पोहोंचल्यामुळें आह्मी मरूं. त्यावरून कृष्णानें आलेल्या दूतासमागमें अभयसंदेश राजांस पाठवून, त्यानें इंद्रप्रस्थपुरास गमन केलें, व भीमार्जुनांस समागमें घेऊन तो मगधदेशास गेला ( भार० सभा० अ० २० ).

भीमार्जुनांसहित कृष्ण, गिरिव्रजास जाऊन पोहोंचल्यावर, प्रथम त्यानें याच्या महाद्वारावर अतिशय मोठ्या तीन दुंदुभी होत्या त्या फोडिल्या, व ब्राह्मणवेषानें जरासंधाच्या गृहीं गमन केलें. त्यावरून त्यानें ते ब्राह्मणच आहेत असें जाणून त्यांचा सत्कार केला, व त्यांस अर्घ्यपाद्य देऊं लागला. परंतु, ते तें ग्रहण करीनात असें पाहून, जरासंधानें पुसलें कीं, तुम्ही ब्राह्मण असून, माझी पूजा घेत नाहीं, तर आपण कोण, व यथें काय हेतूनें आलां आहां तें सांगा. कृष्णानें उत्तर केलें, आम्ही कोणीतरी आहों. व येथें तुझीं युद्ध करावें अशा हेतूनें आलों आहों; तर आम्हां तिघांतून ज्याशीं तुझी इच्छा असेल त्याशीं युद्ध कर. असें ऐकून जरासंधानें तर्क केला कीं, हे ब्राह्मण नाहींत, व हें त्याचें अनुमान, त्यांच्या आकृति नीट न्याहाळून पाहतां सत्य आहे, असा त्याचा निश्चय झाला.

नंतर जरासंध कृष्णास म्हणाला, तुम्ही तिघे कोण आहां, तें मीं ओळखिलें. परंतु तुह्मां तिघांतून, तूं व अर्जुन मशीं बाहुयुद्धास टिकणार नाहीं, कांहींसा भीम टिकेल असें वाटतें, तर त्याशीं युद्ध करण्यास मी सिद्ध आहें. असें म्हणून त्यानें तिघांसहवर्तमान त्या दिवशीं यथासांग भोजन केलें, व दुसऱ्या दिवशीं भीम आणि तो यांच्या युद्धास आरंभ झाला. तें उभयतांचें युद्ध तेरा अहोरात्र सारखें चाललें होतें; त्यांत दोघेही थकून गेले होते, तरी भीमानें चौदाव्या दिवशीं जरासंधास फाडलें, तथापि तो पुनः सांधला जाऊन युद्धास सिद्ध झाला. असें पाहून भीमास पराकाष्ठेची भीति उत्पन्न झाली कीं, आतां हा कसा मरेल! इतक्यांत कृष्णानें एक तृण हातांत घेऊन त्याचा छेद केला, व उजव्या हातांतील डावेकडे आणि डाव्यांतील उजवेकडे फेकणें असें मर्म सुचवितांच भीमानें त्याप्रमाणें केलें असतां जरासंध तत्काळ मृत्यु पावला.

जरासंध मरतांच, त्याचा पुत्र सहदेव शरण आल्यावरून, त्यास कृष्णानें अभय दिलें, व राज्यावर त्याची स्थापना करून, सर्व राजांस बंदींतून सोडविलें. नंतर तेथून भीमार्जुनांसहित निघाला तो इंद्रप्रस्थास आला. याप्रमाणें जरासंधाचा शेवट झाला ( भार० सभा० अ० १७-२४, भाग० दशम० अ० ७२-७३ ).

२-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

३-भारती युद्धांतील सात्यकीनें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० ११५ ).

**जर्तिक**-बाह्लिकदेशीय एक प्रदेश.

**जलद**-एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

**जलंधर**-एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**जलसंध**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

२-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

३-सात्यकीनें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा (भार० द्रोण० अ० ११५ ).

**जलेयु**-( सो० वं० ) पुरुकुलोत्पन्न रौद्राश्व राजाचा पुत्र.

**जलोद्भव**-द्वितीयार्थक हिमालयाच्या पार्श्वभागीं पांडवां-

च्या वेळेस होता जो राजा तो ( भार० सभा० अ० ३० ).

**जल्प**–तामस मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

**जव**–विराध ना० दंडकारण्यांतील राक्षसाचा पिता.

**जवि**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**जवीनर**–यवीनर शब्द पहा.

**जह्नु**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न जरासंध भ्रात्याच्या वंशांतील पुष्पवान् राजाचा पुत्र.

**जांगल**–कुरु देशाच्या पश्चिमभागीं अति निकट पहिला देश. यास कुरुजांगल असें प्रसिद्ध नांव आहे. (भाग० १ स्कं० अ० १० ).

**जागुड**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**जाजलि**–एक ऋषि ( तुलाधार श० पहा ).

**जाटासुरि**–जटासुरपुत्र अलंबुष राक्षस तो.

**जातवेदा**–अग्नि. " वेदास्त्वदर्थं जाता वै जातवेदास्ततो ह्यसि " ( भार० सभा० अ० ३१ श्लोक ४२ ).

**जातिस्मर**–भारतवर्षीय तीर्थ.

**जातुकर्ण**–चालू मन्वंतरांतील सत्ताविसावा व्यास ( व्यास श० पहा ).

**जातुकर्ण्य**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

२–( सू० वं० ) नरिष्यंतकुलोत्पन्न अग्निवेश्य राजास नामांतर.

**जानकी**–जनकाची कन्या, सीतेविषयीं विशेष रूढी.

२–दुर्योधनपक्षीय राजा. ( भार० आदि० अ० ६७ ).

**जानपदी**–एक अप्सरा.

**जानुजंघ**–एक राजर्षि.

**जान्हवी**–जन्हुराजामुळें भागीरथीस पडलेलें नांव.

**जांबवती**–जांबवानाची कन्या. कृष्णाच्या अष्टनायिकांतील एक. हिला सांब इ० दाहा पुत्र होते ( ४ कृष्ण श० पहा ).

**जांबवान्**–ब्रह्मदेवाच्या जांभयीपासून उत्पन्न झालेला वानर ( वा० रा० बाल० स० १७ ). हा मोठा पराक्रमी होता व रामावतारीं यानें त्याचें साह्य पुष्कळ केलें ( वा० रा० युद्ध० स० ३९ ). हा कृष्णावतार होईपर्यंत होता, असें वाटतें. याच्या वंशजांतील कोणीएका जांबवानाशीं कृष्णाचें युद्ध स्यमंतक मण्याच्या प्रसंगानें होऊन, त्यानें आपली कन्या त्यास दिली होती ( स्यमंतकमणि श० पहा ).

२–रामसेनेंतलि दुसरा एक वानर. हा गद्गदाचा पुत्र असून, धूम्राचा कनिष्ठ बंधु होता.

**जाबाल**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

२–प्रथमार्थक विश्वामित्राच्या पुत्रांतील एक.

३–यजुर्वेद व अथर्वण, या दोन वेदांतील दोन उपनिषदें.

**जाबालदर्शन**–सामवेदोपानिषत्.

**जाबालि**–जाबालवंशजांस संज्ञा.

२–प्रथमार्थक विश्वामित्राच्या पुत्रांतील एक.

३–दशरथाचा एक मंत्री ( १ चित्रकूट श० पहा ).

४–दाशरथि रामाच्या सभेंतील एक धर्मशास्त्री.

**जामदग्न्य**–जमदग्निपुत्र, परशुरामास मुख्यत्वेंकरून संज्ञा.

**जामी**–यामी शब्द पहा.

**जायंत—जायंतेय**– ऋषभदेवास जयंतीपासून झालेलें भरतादि १०० पुत्र ते.

**जायद्रथ**–जयद्रथपुत्र जो सुरथ तो.

**जारासंधि**–जरासंधपुत्र सहदेव तो.

**जारुधि**–मेरुकर्णिका पर्वतांतील एक. यासच कोठें चारुधि म्हटलें आहे.

**जालंधर**–एक क्षेत्र व पर्वत.

**जालधि**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**जितव्रत**–उत्तानपादवंशीय हविर्धानास, हविर्धानीपासून झालेल्या ६ पुत्रांतील कनिष्ठ.

**जितश्रम**–( कुशीलव श० पहा ).

**जित्वा**–एक ऋषि, शिलीन ऋषीचा पुत्र.

**जिन**– " "

२–बौद्धमतानुसारी पुरुष.

**जिह्मक**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**जिष्णु**–विष्णु, इंद्र आणि अर्जुन यांस नांव.

**जीमूत**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा तद्वंशीय व्योम अ० दाशार्ह राजाचा पुत्र. याचा पुत्र विकृति अ० विमल.

२–विराटगृहीं भीमसेनानें मारिलेला मल्ल ( भार० विरा० अ० १३ ).

**जीवंति**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**जीवल**–अयोध्याधिपति ऋतुपर्ण राजाचा अश्वपाल.

**जैगिषव्य**–कोणी पुरातन ऋषि, याची स्त्री पर्णा ( मत्स्य० अ० १७९ ). याचा शिष्य देवलऋषि ( भार० शल्य० अ० ५० ).

२–देव्युपासक दुसरा एक ऋषि ( देवीभा० ९ स्कं० अ० ४ ).

**जैत्यद्रोणी**–ब्रह्मर्षि ( अंगिरा श० पहा ).

**जैत्र**–कृष्णाचा एक भृत्य (भाग० १० स्कं० अ०७१).

**जैमिनि**–स्वयंभूव्यासाचा संपूर्ण सामवेद पढणारा शिष्य.

२–कौत्सकुलोत्पन्न कृष्णद्वैपायन व्यासाचा सामशाखाध्यायी शिष्य. हा मोठा वादी असे, "अथातो धर्म-

जिज्ञासा'' आणि ''अथातो ब्रह्मजिज्ञासा'' हीं दोन सूत्रें व्यासाचीं आहेत; त्यांतील दुसऱ्या सूत्राचा पक्ष व्यासानें स्वतः धरून, पहिल्याचा याकडून धरविला. त्यांवर पूर्वोत्तरमीमांसा असे दोन ग्रंथ झाले, त्यांत व्यासानें याच्या पक्षाचें खंडन केलें आहे. हा जनमेजयाच्या सर्पसत्रांत उद्गाता होता. यानेंही एक भारतग्रंथ रचिला होता; परंतु तो चांगला प्रौढ नव्हता म्हणून, व्यासानें अश्वमेधशिवाय करून सर्व बुडविला.

**जैह्मप**-गौरपराशरकुलोत्पन्न एक ऋषि.

**जैव्हलायनि**-तृतीयार्थक अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**ज्यामघ**-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तदन्वयांत जन्मलेल्या रुचक अ० रुक्मकवच राजाच्या पांच पुत्रांतील कनिष्ठ. यास चैत्रा अ० शैब्या नांवाची स्त्री होती. तिला जरी संतति होईना तरी याला तिच्या भीतीनें दुसरी स्त्री वरतां येईना. एकदां भोजदेशीय एका राजकन्येचें स्वयंवर होत असतां, हा तेथें गेला होता, व यानें स्वपराक्रमानें तिला जिंकून, रथांत घालून स्वनगरास आणिलें; परंतु चैत्रेनें ही रथांत कोण म्हणून पुसतांच, हा भ्याला व तिला म्हणाला, ही तुझी स्नुषा आहे. तें बोलणें तिला पुत्र नव्हता म्हणून दुःखास कारण होऊन, मग ती इतकेंच म्हणाली कीं, आपणांस पुत्र नसतां ही स्नुषा कशी होईल ? परंतु अल्पच काळांत, यास चैत्रेच्या ठायीं विदर्भ ना० पुत्र झाला, व ती आणिलेली भोजा त्याची स्त्री झाली.

**ज्येष्ठ**-एक ब्रह्मर्षि; ज्येष्ठसामाचा हाच कर्ता होता ( भार० शांति० अ० ३४८ ).

**ज्येष्ठा**-सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

२-द्वादशादित्यांतील वरुणाची स्त्री. हिला बल, अधर्म, बंदी, पुष्कर, इ० पुत्र, व सुरा ना० कन्या होती.

**ज्येष्ठिल**-भारतवर्षीय तीर्थ.

**ज्येष्ठिला**-भारतवर्षीय नदी ( भार० भीष्म० अ० ९).

**ज्योति**-प्रथमार्थक वसिष्ठाच्या सात पुत्रांतील एक.

**ज्योतिरथा**-भारतवर्षीय नदी.

**ज्योतिर्धामा**-तामस मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

**ज्योतिर्भास**-मानस ना० पितरांचा लोक.

**ज्योतिर्मुख**-रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० युद्ध० स० ३० व ७३ ).

**ज्योतिष्मती**-विष्णुपद ना० सरोवरांतून निघालेली नदी.

**ज्योतिष्मान**-प्लक्षद्वीपस्थ एक पर्वत.

**ज्योत्स्ना**-सोमकन्या, वरुणपुत्र पुष्कराची स्त्री.

**ज्वलना**-तक्षककन्या. सोमवंशीय औचेयु अ० ऋतेयूची स्त्री.

---

## झ-ट-ड-ढ.

**झिल्लिक**-भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ ).

**झिल्ली**-वृष्णिकुलोत्पन्न एक यादव ( भार० द्रोण० अ० ११ ).

**टिट्टिभ**-वरुणलोकांतील असुरवि०.

**डमरु**-शिवाच्या हस्तांतील वाद्यवि०. यांतून व्याकरणाचीं चवदा सूत्रें निर्माण झालीं.

**डिंभक**-जरासंधाच्या दोन प्रधानांतलि एक. हंसाचा कनिष्ठ बंधु. ( हंसडिंभक श० पहा ).

**डुंडुभ**-सर्पजातिवि०. हा पूर्वीचा ऋषि असून शापानें ही योनि पावला होता ( २ रुरु श० पहा ).

**ढक्का**-शिवाच्या हस्तांतील वाद्यवि०.

---

## त

**तर्किबिंदु**-एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

**तंगण**-भारतवर्षीय देश (भार० भीष्म० अ० ९).याचाच अपरतंगण हा भेद होय.

**तंडि**-अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि. यानें दाहा सहस्र वर्षे तप करून शिवास प्रसन्न केलें ( भार० अनु० अ० १६ ). यापासून उपमन्यु ऋषीस शिवसहस्रनामयुक्त शैवी दीक्षा प्राप्त झाली होती ( भार० अनु० अ० १७ ). कृष्णोपमन्युसंवाद.

**तंति**-धूम्रपराशरकुलोत्पन्न एक ऋषि.

**तंतिपाल**-सहदेवानें अज्ञातवासकालीं धारण केलेलें नांव ( भार० विराट० अ० ३ ).

**तंतु**-प्रथमार्थक विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**तत्पुरुष**-शिवाचा एक अवतार.

**तत्पुरुषकल्प**-ज्या कल्पारंभीं तत्पुरुषावतार झाला, असा ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील एकविसावा दिवस तो. ( ४ कल्प श० पहा ).

**तत्त्वदर्शी**-रैवतमनूच्या दाहा पुत्रांतील एक.

२-देवसावर्णि मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

३-सुदरिद्र ब्राह्मणाच्या चार पुत्रांतील एक ( पितृवर्ती श० पहा. ).

**तंदुलिकाश्रम**-भारतवर्षीय तीर्थ.

**तप**-सप्तलोकांतील साहवा तपोलोक तो.

**तपती**-विवस्वान् सूर्यास छायेपासून झालेली कन्या.

हिनें सोमवंशीय अजमीढ राजाचा पौत्र, व ऋक्ष राजाचा पुत्र जो संवरण राजा, त्यास वरिलें होतें.

२–भारतवर्षीय नदी ( विंध्य श० पहा ).

**तपन**–सूर्यास नांव.

२–कर्णानें मारिलेला पांडवपक्षीय पांचाल ( भार० कर्ण० अ० ४८ ).

३–गजवानरानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० युद्ध० स० ४३ ).

**तपस्य**–द्वादशमासानुक्रमानें वर्षांतील बारावा मास. याची पूर्णिमा फाल्गुनी नक्षत्रानें युक्त असल्ये म्हणून, यास फाल्गुन असें नांव आहे. या मासांत सूर्यमंडलाधिपति पर्जन्य अ० सविता ना० आदित्य असून, त्यासमागमें भरद्वाज ऋषि, सेनजित् अप्सरा, ऐरावत नाग, ऋतु यक्ष, वर्चा राक्षस, आणि विश्व ना० गंधर्व, इतके संचार करण्यास असतात ( भाग० १२ स्कं० अ० ११ ).

२–तामसमनूच्या पुत्रांतील एक.

**तपस्वी**–चक्षुर्मनूस नड्वलेपासून झालेल्या पुत्रांतलि एक.

२–रुद्रसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षींतील एक.

**तपा**–द्वादशमासानुक्रमानें वर्षांतील अकरावा मास. याची पूर्णिमा मघानक्षत्रानें युक्त असल्ये म्हणून, यास माघमास म्हणतात. यांत पूषा ना० आदित्य सूर्यमंडलाधिपति असून त्यासमागमें घृताची अप्सरा, वात ना० राक्षस, धनंजय नाग, सुरुचि यक्ष, गौतम ऋषि आणि सुषेण गंधर्व, इतके संचार करण्यास असतात ( भाग० १२ स्कं० अ० ११ ).

**तपोत्सुक**–सुदरिद्र ब्राह्मणाच्या चार पुत्रांतील एक ( पितृवर्ती श० पहा ).

**तपोद्युति**–तामसमनूच्या पुत्रांतलि एक.

**तपोधन**– " "

**तपोभागी**– " "

**तपोमूर्ति**–रुद्रसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षींतील एक.

**तपोमूल**–तामसमनूच्या पुत्रांतलि एक.

**तपोयोगी**– " "

**तपोरति**– " "

**तपोलोक**–तप श० पहा,

**तपोवन**–नर्मदातीरीं असणारें वनवि०.

**तप्तसूर्मि**–एक नरक आहे. अगम्यगमन करणारीं मनुष्यें या नरकास जाऊन,तप्तलोहप्रतिमांस भेटभेटून यातना पावतात.

**तम**–एक ऋषि. श्रवा ऋषीच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. याचा पुत्र प्रकाश ना० ऋषि (वीतिहव्य श० पहा).

**तमकल्प**–ज्या कल्पारंभीं तमच होतें, असा ब्रह्मदेवाच्या चालू मासांतलि अकरावा दिवस. (४ कल्प श० पहा).

**तमसा**–भारतवर्षीय नदी. ( ऋष्यवान् शब्द पहा ). ही वाहात वाहात कोसलदेशाकडे दक्षिणादिशेकडून गेली असून, हिच्या तीरीं वाल्मीकि ऋषीचा आश्रम असे.

**तमोजा**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा तद्वंशीय अंधककुलांतील असमंजा राजाचा पुत्र.

**तरंतुक**–एकन्हदवि० ( २ कुरुक्षेत्र श० पहा ).

**तरस**–रामसेनेंतील वानरवि० ( वा० रा० युद्ध० स० ४१ ).

**तरुक्ष**–एक ब्रह्मर्षि.

**तर्ज**–उत्तम मनूच्या पुत्रांतलि एक.

**तलातल**–या नांवाचा एक बिलस्वर्ग ( भाग० ५ स्कं० अ० २४ ).

**तक्ष**–( सू० वं० ) दशरथ राजाचा पौत्र, व भरतास मांडवीच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यास कालिका, आणि चपला, अशा दोन स्त्रिया असत. गांधार देशाची राजधानी तक्षशिला नगरी, ती यानें स्थापिलेली होय.

२–( सो० वं० ) वसुदेवभ्राता वृक त्यास दुर्वार्क्षीपासून झालेल्या पुत्रांतील ज्येष्ठ.

**तक्षक**–कद्रुपुत्र एक नाग. हा, सर्वांस नागकुलांतील एका कुलाचा अधिपति असून, याच्या कुलांत जीं कुळें होतीं, त्यांतून अठरा कुळें जनमेजयकृत सर्पसत्रांत दग्ध झालीं. त्यांचीं नावें अशीं.–पिच्छांडक, मंडलक, पिंडसेक्ता, भेणक, उच्छिख, शरभ, भंग, बिल्वतेजा, विरोहण, शिली, शलकर, मूक, सुकुमार, प्रवेपन, मुद्गर, शिशुरोमा, सुरोमा आणि महाहनु. व तक्षकावरच स्वतः प्रसंग आला असतां, यास आस्तिक ऋषीनें वांचविलें ( अस्तिक श० पहा ).

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न पहिल्या प्रसेनजित् राजर्षीचा पुत्र. याचा पुत्र बृहद्बल राजा, ज्यास भारती युद्धांत अभिमन्यूनें मारिलें होतें तो.

**तक्षशिला**–गांधार देशाची राजधानी ( १ तक्ष श० पहा ).

**ताटका**–सुकेतु ना० यक्षाची कन्या. ही मोठी बलवान् असून, जंभपुत्र सुंद त्याची स्त्री होती. हिला त्यापासून मारीच आणि सुबाहु, असे दोन पुत्र झाले असत. [illegible] कांहीं अपराध केल्यामुळें, तो

त्याच्या कोपानें दग्ध झाला असतां, हीं, उभयपुत्रांस घेऊन, मलद आणि करूषक, हे दोन देश जवळ जवळ आहेत, तेथें येऊन राहिली. व ऋषीस अनेक प्रकारें पीडा देऊं लागली. त्यामुळें अल्पच काळांत दोनही देश उध्वस्त होऊन, तेथें मोठें अरण्य झालें.

त्याच अरण्यासमीप विश्वामित्र ऋषि राहात असून, जेव्हां जेव्हां यज्ञ आरंभी, तेव्हां तेव्हां, ही, आपल्या दोन पुत्रांसहित त्याचा येऊन विध्वंस करी. त्यामुळें विश्वामित्र कंटाळून, तो अयोध्येस दशरथ राजाकडे गेला, व त्याचे रामलक्ष्मण दोघे पुत्र त्यानें मागून घेऊन आश्रमाकडे येण्यास निघाला. इतक्यांत मार्गामध्यें हिनें त्यांस पाहिलें, व अंगावर धांवून येत आहे तों विश्वामित्रानें रामाकडून हिचा वध करविला. पुढें यज्ञकाळीं सुबाहु मरण पावून, रामबाणाच्या पिसाऱ्यानें मारीच उडून समुद्रांत जाऊन पडला. तेव्हां-पासून तो या अरण्यांत पुनः न येतां, लंकेंत जाऊन राहिला ( वा० रा० बाल० स० २५-२६ ).

**ताटकेय**-ताटकेचे दोन पुत्र सुबाहु आणि मारीच ते.

**ताडका**-ताटका तीच.

**ताडकायन**-विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**तांडि**-तंडि ऋषीचा पुत्र, व वंशज तो.

**तापी**-भारतवर्षीय नदी ( विंध्य श० पहा ).

**तामसमनु**-प्रियव्रत राजास दुसऱ्या स्त्रीपासून झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा. हा चालू जो श्वेतवाराहकल्प यांतील होऊन गेलेला चौथा मनु. याच्या कालसत्तेस तामस मन्वंतर असें म्हटलेलें असून, अकल्मष, धन्वी, तपोमूल, तपोधन, तपोरति, तपस्य, तपोद्युति, परंतप, तपोभागी आणि तपोयोगी, असे दहा पुत्र-पृथु, ख्याति, नर, केतु, इत्यादिक नामांतरांनीं होते. कवि, पृथु, अग्नि, अकपि, कपी, जल्प, आणि धीमान, हे सप्तर्षि ज्योतिर्धामा इ० नामांतरांनीं असत. विधृतिपुत्र सत्यक, हरि, वीर, इ० नामक साध्यसंज्ञेनें प्रसिद्ध असे देव असत. याच्या मन्वंतरांत स्वर्गामध्यें त्रिशिखनांवाचा इंद्र असून, हरिमेधा ब्राह्मणाच्या हरिणी स्त्रीच्या उदरीं, हरिनामेंकरून विष्णूचा अवतार इंद्राच्या साह्यार्थ होऊन, त्यानें गजेंद्र व नक्र, यांचा उद्धार केला. यावरून गजेंद्रमोक्ष, या मन्वंतरांत झाला होता हें उघडच आहे ( भाग० ८ स्कं० अ० १ ). ( मत्स्य० अ० ९ ).

**तामिस्र**-परद्रव्य आणि परस्त्री हरण करणारांस या नरकास जावें लागतें. हा नरक गाढ अंधकाराचा आहे.

**ताम्र**-महिषासुराचा धनाध्यक्ष ( २ महिषासुर श० पहा ).

२-मुरदैत्याच्या सात पुत्रांतील एक ( नरकासुर श० पहा ).

**ताम्रतप्त**-कृष्णास रोहिणीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**ताम्रध्वज**-मयूरध्वज राजाचा पुत्र.

**ताम्रपर्णी**-भारतवर्षीय नदी ( २ हिमालय श० पहा).

२-भारतवर्षीय नदी. ( ३ महेंद्र श० पहा ).

**ताम्रलिप्त**-कर्वटदेशाधिपति एक राजा ( भार० सभा० अ० ३० ).

**ताम्रलोचन**-एक शिवगण.

**ताम्रा**-कश्यपस्त्री. हिला शुकि, श्येनी, भामी, सुग्रीवी, गृधिका, शुचि, काकी आणि धृतराष्ट्री अशा आठ कन्या पुराणांतरीं आढळतात.

२-वसुदेवाच्या स्त्रियांतील एक.

**ताम्रारुण**-भारतवर्षीय तीर्थ.

**ताम्रोष्ठ**-एक गंधर्व.

**तार**-मयासुराचा सहचर दैत्यवि० ( मत्स्य०अ० १७७).

२-रामसेनाधिपति एक मोठा वानर (भार० वन० अ० २८५ ). याची कन्या रुमा, ती सुग्रीवाची स्त्री.

३-रामसेनेंतील दुसरा एक बलाध्यक्ष वानर.

**तारक-तारकासुर**-त्रिपुरांतील एक दैत्य ( त्रिपुर श० पहा). यास ताराक्ष अ० तारकाक्ष, कमलाक्ष, आणि विद्युन्माली असे तीन पुत्र होते (भार० कर्ण०अ० ३३).

२-दनुपुत्र दानवांतील एक.

३-वज्रांग दैत्यास वरांगीपासून झालेला पुत्र. यानें पारियात्र पर्वतावर बसून उग्र तप केलें, व ब्रह्मदेवास प्रसन्न करून अमरत्व मागितलें. तें त्यांनीं अमान्य केल्यावर, मला साता दिवसांच्या शिशूवांचून इतरांच्या हातानें मृत्यू नसावा, असें म्हटलें असतां, ब्रह्मदेव तथास्तु म्हणून स्वलोकीं गेल्यावर, यानें त्रैलोक्यास पीडा आरंभिली. जंभ, कुजंभ, महिषासुर, कुंजर, मेघ, कालनेमि, निमि, मथन, जंभक, आणि शुंभ, हे याच्या सेनेंतील मुख्य नायक असत. शेवटीं याचा अतिशय उपद्रव झाला असतां, कार्तिकेयाचा अवतार झाला, व त्यानें सातव्याच दिवशीं यास मारिलें ( मत्स्य० अ० १४७-१५९ ).

**तारकाक्ष**-प्रथमार्थक तारकाच्या तीन पुत्रांतील एक. यास ताराक्ष असेंही नांव होतें.

**तारसार**-यजुर्वेदोपनिषत्.

**तारा**-बृहस्पतीच्या दोन स्त्रियांतील दुसरी. हिच्या संतति इ०कांविषयीं २ बृहस्पति शब्द पहा.

२–सुषेण वानराची कन्या, व वालीची स्त्री. हिचा पुत्र अंगद.

३–सूर्यवंशीय हरिश्चंद्र राजाची स्त्री. हिला तारामती असेंही नांव असून, रोहित ना० पुत्र होता. (१ हरिश्चंद्र श० पहा).

**तारापीड**–(सू०वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयांत जन्मलेल्या चंद्रावलोक राजाचा पुत्र, याचा पुत्र चंद्रगिरी.

**तारामती**–तृतीयार्थक तारा तीच.

**ताराक्ष**–तारकाक्ष तोच.

**तारेय**–तारापुत्र अंगदास नांव.

**तार्क्ष**–एक यक्ष ( ४ सह श० पहा ).

**तार्क्ष्य**–कश्यपापासून विनतेस झालेला पुत्र जो गरुड तो. ( भार० अनु० अ० १४ श्लो० ४३ ).

२–अरिष्टनेमि ना०ऋषि तो (भार०वन०अ० १८४).

**ताल**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**तालकृत**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**तालकेतु**–कृष्णानें मारिलेला एक राक्षस.

**तालजंघ**–( सू० वं० ) वैवस्वत मनूचा पुत्र शर्याति राजा, तद्वंशीय एक राजा. हैहयराजाचा भ्राता.

२– ( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सहस्रार्जुनाचा पौत्र, जयध्वजाचा पुत्र. यास जे शतपुत्र होते, त्यांसही तालजंघच म्हणत असत. हे सर्व और्वाग्नीनें दग्ध होऊन, त्यांतून एक वीतिहोत्र मात्र वांचला होता.

**तालाकट**–शूर्पारक देशासमीपचा देश ( भार० सभा० अ० ३१ ).

**तिग्मकेतु**–ध्रुवपुत्र वत्सरास स्वर्वीथीपासून झालेल्या ६ पुत्रांतील दुसरा.

**तित्तिरि**–एक ऋषि. स्वयंभू व्यासाचा संपूर्ण यजुर्वेद पढणारा शिष्य जो वैशंपायन, तो आपल्या वेदाच्या ८६ शाखा करून, त्या तितक्याच शिष्यांस पढवीत असतां, त्यांत एका शाखेचें अध्ययन करणारा शिष्य. त्याचाच भागिनेय ( भाचा ) याज्ञवल्क्य ऋषि होता. त्यापासून ती, त्यानें कांहीं अपराधास्तव माघारी घेतली असतां अग्नीप्रमाणें प्रखर अशी भूमीवर पडली. पुढें वैशंपायनानें आपल्या उर्वरित शिष्यांस आज्ञा केली कीं, हा प्रखर यजुर्गण तुम्ही सर्वांनीं मिळून सत्वर ग्रहण करावा, नाहींतर हा येथून आतांच गुप्त होऊन सत्यलोकास जाईल. त्यावरून सर्वांनीं तित्तिरि पक्ष्याचीं रूपें धारण करून, ती शाखा ग्रहण केली. ( तित्तिरि पक्ष्याचीं रूपें धरण्याचें कारण, त्या पक्ष्यास अग्नीचाच आहार आहे ): नंतर वैशंपायनानें आंगिरसकुलोत्पन्न कोणी तित्तिरि ऋषि होता, त्याचे ठायीं ती शाखा प्रादुर्भूत केली असावी, म्हणून सर्व यजुःशाखांत त्यासच अग्रगण्य केलें असावें, आणि त्यामुळें त्या दिवसापासून तीच शाखा मुख्य यजुर्वेद असें चालू झालें असावें. या तित्तिरि ऋषीस तैत्तिरि नांवाचा पुत्र होता.

**तित्तिरिदेश**–भारतवर्षीय देश (भार०भीष्म० अ०९).

**तितिक्षा**–स्वायंभू मन्वंतरांतील दक्षानें, धर्मऋषीस दिलेल्या तेरा कन्यांतील एक. हिचा पुत्र क्षेम.

**तितिक्षु**–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न महोमना राजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. याचा पुत्र रुशद्रथ.

**तिथि**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**तिमि**– ( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय दुर्व राजाचा पुत्र. याचा पुत्र बृहद्रथ.

**तिमिंगल**–पांडवांच्या वेळचा रामकपर्वतावरील राजा ( भार० सभा० अ० ३१ ).

**तिमिध्वज**–दक्षिण देशांत दंडकारण्यासमीपच्या वैजयंत ना० पुरीचा राजा. यास शंबर असेंही म्हणत असत. हा असुरास अनुकूल होऊन इंद्राशीं युद्ध करीत असतां पुढें काय करावें असा इंद्रास विचार पडून, शेवटीं, त्यानें दशरथराजास आपल्या साह्यास बोलाविलें. त्यावरून दशरथानें घोर युद्ध करून, असुरांसहित याचा अगदीं पराभव केला. इतक्यांत दशरथास एक दुर्धर बाण असा लागला कीं, तेणेंकरून तो मरणप्राय मूर्च्छित झाला, म्हणून कैकेयी त्याची स्त्री त्या प्रसंगीं त्यासमागमें होती, तिनें मोठ्या चातुर्यानें दशरथाचा रथ एकीकडे नेऊन त्यास सावध केलें. तेव्हां त्यानें असें पाहिलें कीं, असुरांसहित तिमिध्वज पळाला आहे, व मूर्च्छित झालों असतां कैकेयीनें आपलें संरक्षण केलें आहे. म्हणून त्यानें प्रसन्न होऊन तिला दोन वर मागण्यास सांगितलें. ते तिनें त्या वेळेस न घेतां, तसेंच राजाजवळ ठेविले, आणि म्हणाली कीं, मला लागतील तेव्हां घेईन. त्यावरून तो तिला घेऊन अयोध्येस परत आला ( वा० रा० अयो० स० ९ ).

**तिलोत्तमा**–प्राधेच्या अप्सराकन्यांतलि एक ( ३ इष श० पहा ).

२–सुंदोपसुंदवधार्थ विश्वकर्म्यानें निर्मिलेली स्त्री ( सुंदोपसुंद श० पहा ).

**तिष्य**–कलियुग. पुष्पनक्षत्रासही म्हणतात.

**तीर्थवती**–क्रौंचद्वीपस्थ नदी.

**तीव्ररथ**– सुमतीचा पुत्र ( हंसध्वज श० पहा ).

**तीक्ष्णवेग**–रावणपक्षीय राक्षस.

**तुंग**–भारतवर्षीय तीर्थ.

**तुंगकारण्य**–अरण्यवि०.

**तुंगभद्रा**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी ( सह्याद्रि श० पहा ).

**तुंगवेणा**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी ( भार० भीष्म० अ० ९ ).

**तुंड**–नल वानरानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस ( भार० वन० ).

**तुंडी**–नंदिकेश्वर.

**तुंबरु—तुंबुरु**–प्राधेच्या गंधर्वपुत्रांतील एक. याची स्त्री रंभा होती ( भार० उद्यो० अ० ११७ ) व हा शापानें दंडकारण्यांत विराध झाला होता. ( विराध श० पहा ). हा चैत्रमासीं सूर्यासमागमें संचार करणाऱ्या गणांतील गंधर्व होय ( ९ मधु श० पहा ).

२–एक ऋषि ( भार० शांति० अ० ४८ ).

**तुर**–एक ऋषि. कवषा ना० ब्राह्मणीचा पुत्र. म्हणून यास कावषेय असेंही म्हटलें आहे. हा जनमेजयाच्या सर्पसत्रांत त्याचा उपाध्याय होता.

**तुरा**–नर्मदेस मिळणारी एक सामान्य नदी.

**तुरीय**–यजुर्वेदोपनिषत्.

**तुर्वसु**–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न ययाति राजास, देवयानीपासून झालेल्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. यानेंही यदुप्रमाणेंच पित्याची जरा घेतली नाहीं, म्हणून यास छत्रसिंहासनादिक चिन्हें नव्हतीं. याचें आधिपत्य यवनांवर होतें, व यास वन्हि ना० पुत्र होता.

**तुळजापुर**–प्रस्तुतचें प्रसिद्ध देवीचें स्थान ( देवीभा० ७ स्कं० अ० ३८ ).

**तुलसी**–शंखचूड असुराची स्त्री ( देवी भाग० ९ स्कं० अ० ८ ). ( २ शंखचूड श० पहा ).

**तुलाधार**–एक धर्मात्मा वैश्य. जाजलि ना० एका ऋषीस स्वतपाचा मोठा अभिमान झाला असतां, याशीं त्याचा संवाद होऊन तो नष्ट झाला ( भार० शांति० अ० २६१–२६४ ).

**तुषार**–भारतवर्षीय देश, व तेथील लोक ( भार० कर्ण० अ० ७३ ).

**तुषित**–स्वायंभू मन्वंतरांतील देववि०. हे यज्ञास दक्षिणा स्त्रीपासून झालेले १२ पुत्र. यांचीं नांवें अशीं.— **तोष, प्रतोष, संतोष, भद्र, शांति, इडस्पति, इध्म, कवि, विभु, स्वन्ह, सुदेव** आणि **रोचन**. यास तुषित देव अशी संज्ञा आहे.

**तुषिता**–स्वारोचिष मन्वंतरांतील वेदशिरा ऋषीची स्त्री.

**तुष्ट**–हंसध्वज राजाचा प्रधान.

**तुष्टि**–स्वायंभू मन्वंतरांतील दक्षानें, धर्मऋषीस दिलेल्या १० कन्यांतील एक. हिचा पुत्र संतोष.

**तुष्टिमान्**–उग्रसेनाच्या ९ पुत्रांतील कनिष्ठ, कंसाचा भ्राता.

**तुहुंड**–दनुपुत्र दानवांतील एक.

२–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा.

**तृणप**–प्राधापुत्र गंधर्वांतील एक ( १ देवगंधर्व श० पहा ).

२–एक राजर्षि.

**तृणबिंदु**–( सू० वं० ) नरिष्यंत राजाचा पौत्र, व दमराजाचा पुत्र. हा महान् राजर्षि, मेरुपर्वताच्या पार्श्वभागीं राहून तप करीत असतां, यानें आपली गौ ना० कन्या कांहीं कारणास्तव पुलस्त्य ऋषीस दिली ( वा० रा० उत्तर० स० २ ).( २ पुलस्त्य श० पहा).

२–वैवस्वत मन्वंतरांतील चोविसावा व्यास ( व्यास श० पहा ).

३–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न बंधु राजाचा पुत्र. यास अलंबुषा अप्सरेपासून, विशाल, शून्यबंधु आणि धूम्रकेतु, असे तीन पुत्र झाले होते.

४–पांडवांसमागमें द्वैतवनांत कांहीं काळ होता ऋषि तो ( भार० वन० अ० २६४ श्लो० ५ ).

**तृणावर्त**–कंसाचा अनुचर एक असुर. यानें कृष्णबलरामांच्या नाशार्थ गोकुलांत येऊन, प्रचंड चक्रवातरूपानें कृष्णास आकाशांत उडवून नेलें, तेव्हां कृष्णानें आपली गुरुत्वशक्ति प्रकट करून, याच्या कंठास मिठी मारिली, व अशा नेमानें यास शिळेवर आपटिलें कीं, हा तत्काळ मृत्यु पावला ( भाग १० स्कं० अ० ७ ).

**तृतीया**–भारतवर्षीय नदी ( २ हिमालय श० पहा ).

**तृक्ष**–कश्यपऋषीस नामांतर ( भार० वन० अ० १८४ श्लो० १३ ).

**तेजस्वी**–पूर्वेंद्रांतील पांचवा. हाच पुढें पंडुपुत्र सहदेव झाला होता.

२–गोकुलांतील कृष्णसखा एक गोप ( भाग १० स्कं० अ० २२ ).

**तेजोबिंदु**–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**तैजस**–एक तीर्थ. येथें देवांनीं तारकासुरवधार्थ कार्तिकेयास अभिषेक केला होता.

**तैत्तिरि**–तितित्तिरिऋषीचा पुत्र. कृष्णद्वैपायन व्यासाचा शिष्य जो वैशंपायन तो याचा वंशज होता; म्हणजे हा त्याचा पूर्वज होता ( कृष्णद्वैपायन श० पहा ).

**तैत्तिरियक**–यजुर्वेदरूपच त्याची मुख्य शाखा.

**तैलप**-एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

**तैलेय**-धूम्रपराशरकुलोत्पन्न एक ऋषि.

**तोरण**-ग्रामवि०.

**तोशलक**-कंससभेंतील कृष्णानें मारिलेला मल्ल ( भाग० १० स्कं० अ० ४४ ).

**तोष**-देववि० ( तुषित श० पहा ).

**तौलेय**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**त्याज्य**-बारा भार्गवदेवांतील एक.

**त्रय्यारुण**-चालू मन्वंतरांतील पंधरावा व्यास ( व्यास श० पहा ).

२-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न संभूति राजाचा पौत्र, व त्रिधन्व्याचा पुत्र.

**त्रय्यारुणि**-( सो० वं० ) पूरुवंशज दुष्यंत राजा, तत्कुलोत्पन्न दुरितक्षय राजाच्या ३ पुत्रांतील ज्येष्ठ. हा तप करून ब्राह्मण झाला होता.

**त्रसदस्यु**-युवनाश्वपुत्र मांधात्यास नामांतर.

२-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न मांधात्याचा पौत्र, पुरुकुत्स राजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. यास पौरुकुत्स असें नामांतर असून, हा राज्य करीत असतां, आगस्त्यऋषि याकडे येऊन द्रव्य मागूं लागला; परंतु याजवळ द्रव्य अगदींच त्या वेळेस नव्हतें, म्हणून यानें आपलें आयव्यय ( जमाखर्च ) त्यास दाखविलें. त्यावरून अगस्त्यास वाटलें कीं, आतां याजवळून द्रव्य घेतल्यास याच्या प्रजेस पीडा होईल. तर असें न करतां दुसरेकडे जावें. असें म्हणून तो श्रुतर्वा आणि व्रध्नश्व, या दोन राजांसहवर्तमान जाऊं लागला. तेव्हां यानें इल्वलाकडे जाऊन त्याचा पराभव केल्यास अपार द्रव्य मिळेल म्हणून सांगून त्यास घेऊन तिकडे गेला ( भार० वन० अ० ९८ ). यास विष्णुवृद्ध आणि अनरण्य, असे दोन पुत्र होते.

**त्रिककुत्**-( सो० वं० ) आयुपुत्र अनेना राजा, त्याच्या शुचि ना० पौत्राचा पुत्र. यास धर्मसारथी ना० पुत्र होता.

**त्रिकूट**-मेरुकर्णिका पर्वतांतील एक.

२-लंबनामांतरानें लंकेंतील एक पर्वत (वा०रा०सुंदर० स० १ ).

३-दुसरा एक सामान्य पर्वत.

**त्रिगर्त**-भारतवर्षीय देश. याचे उत्तर त्रिगर्त आणि पश्चिम त्रिगर्त, असे दोन भेद या ग्रंथांत इंद्रप्रस्थ मध्य मानून धरिले आहेत. ते त्या त्या अक्षरक्रमांत पाहावें.

**त्रिगर्ति**-एक राजर्षि.

**त्रिजट**-गार्ग्यकुलोत्पन्न अयोध्येंत राहणारा एक ब्राह्मण. हा अतिशय वृद्ध असून, राम दंडकारण्यांत जाऊं लागला त्या काळीं, यास याच्या स्त्रीनें सांगितलें कीं, तुम्ही रामाकडे जाऊन कांहीं त्यास मागा, म्हणजे सहजींच तो बहुत याचकांस धन इ० देत आहे, त्यांत तुम्हासही मिळेल व तेणेंकरून आपण दरिद्री आहों, त्या आपलें कार्य सहज होईल. त्यावरून हा, हातांत दंड घेऊन, हळूहळू तो टेंकीत टेंकीत रामाकडे आला. तेव्हां राम समजला कीं, हा धनार्थी आहे, परंतु किंचित् विनोद करून मग यास कांहीं द्यावें, असें मनांत आणून, राम म्हणाला, ब्राह्मणश्रेष्ठा, आपण यासमीपच्या गोसमुदायापाशीं उभें राहून, त्यांत आपला दंड फेंका, नंतर तो जेथें पडेल, त्या अलीकडील सर्व गायी मी तुम्हास देईन. तें ऐकून ब्राह्मणानें कंबर बांधिली, व दंड फेंकिला; तो इतका दूर गेला कीं, हीं गोधनें उल्लंघून, दुसरीं रामाचीं गोधनें होतीं, त्यांच्या पलीकडे जाऊन पडला. त्यावरून रामास व अन्यजनांस आश्चर्य होऊन, रामानें यास वंदन करून म्हटलें, मी आपणास विनोदानें दंड फेंकण्यास सांगितला त्याचा क्रोध मानूं नये. नंतर रामानें हीं व तीं, सर्व गोधनें आणि वर पुष्कळ द्रव्य यास देऊन मार्गस्थ करितांच, हा, रामास आशीर्वाद देऊन स्वगृहीं आला ( वा०रा०अयो०स०३२).

**त्रिजटा**-लंकेंतील एक वृद्ध राक्षसी. रावणानें सीतेस पंचवटींतून चोरून आणिल्यावर, तिला अशोकवनिकेंत ठेविली असतां, तिच्या रक्षणार्थ हिला ठेविलें होतें. ही, द्व्यक्षी, त्र्यक्षी, ललाटाक्षी, दीर्घजिव्हा, अजिव्हिका, त्रिस्तनी, एकपादा, एकलोचना, इ० अनेक राक्षसींवर प्रमुख असे ( भार० वन० अ० २८० ). एकदां हिला असा स्वप्न झाला कीं, रावण, कुंभकर्ण, इंद्राजित्-गर्दभ, उष्ट्र, इ० अमंगल वाहनांवर बसून, दक्षिण दिशेकडे चालले असतां, खालीं पडून गोमयऱ्हदांत बुडाले, व नग्न, उन्मत्त, भ्रांत, तैललिप्त, असेही दिसले. तसेंच राम-लक्ष्मण, श्वेत वस्त्रें धारण केलेले, गज इ० उत्तम वाहनारूढ होऊन, उत्तर दिशेकडे चाललेले दिसून, ही जागी झाली व तिनें निश्चय केला कीं, हा स्वप्न रामाचा उत्कर्ष दाखवून, राक्षसांचा विनाशकाळ सुचवितो. त्याअर्थी इतःपर राक्षसींकडून सीतेस पीडा होऊं देऊं नये. नंतर हिनें तो स्वप्न सर्व राक्षसींस सांगून, त्याकडून तसाच क्रम ठेविला ( वा० रा० सुंदर० स० २७ ).

**त्रिणकर्णी**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**त्रित**-ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांतील एक.

२-चक्षुर्मनूस नड्वलेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

३-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

४-गौतम ऋषीच्या तीन पुत्रांतील एक. एकत आणि द्वित, यांचा कनिष्ठ भ्राता. हा आपल्या उभय बंधूंहून विद्वान् असल्यामुळें, एका यजमानाच्या गृहीं तिघेही गेले असतां, त्या दोघांहून त्यानें यास अधिक द्रव्य व गायी दिल्या. तों यांस सहन न होऊन, हा, त्यां-सहित घरीं येत असतां, मार्गांत आढळलेल्या वृकास चुकविण्यास जातां जातां एका कूपांत पडला असें पाहून, त्यांनीं यास मत्सरानें न काढतां, ते उभयतां घरीं गेले. त्यावरुन हा त्या कूपांत तसाच राहिला. इतक्यांत तेथें यास एक वल्ली लावेंत असलेली दृष्टीस पडली. तिला यानें सोमवल्लीची कल्पना करुन, देवांचें आवाहन केलें. त्यावरुन देव येऊन सोमपान करूं लागले असतां, कूपांतून उदकाचा मोठा प्रवाह उचं-बळून त्यासरसा हा बाहेर आला. नंतर देवांपाशीं यानें वर मागितला कीं, जो कोणी आजपासून येथें स्नान करील, त्यास सोमपान केल्याचें फल असावें. तेव्हां देव तथास्तु म्हणून स्वर्गी गेले, व त्या कूपाची त्या दिवसापासून तीर्थांत गणना होऊन, त्यास त्रितकूप असें नांव पडलें ( भार० शल्य० अ० ३६ ).

**त्रितकूप**-त्रित ऋषीचें तीर्थ. बलरामास तीर्थयात्रा-प्रसंगीं मार्गांत आढळलें होतें ( भाग० १० स्कं० अ० ७८ ).

**त्रिदिवा**—भारतवर्षीय नदी ( ३ महेंद्र श० पहा ).

**त्रिधन्वा**- (सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न पुरुकुत्स राजाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ जो वसुद राजा, त्याचा पौत्र, व संभूति राजाचा पुत्र. याचा पुत्र त्रय्यारुण.

**त्रिधामा**—चालू मन्वंतरांतील दाहवा व्यास ( व्यास श० पहा ).

**त्रिनेत्र**-द्वितियार्थक महिषासुरपक्षीय असुरवि०.

**त्रिपथगा**-तीन लोकांत संचार करणाऱ्या भागीरथीस नांव ( भार० भीष्म० अ० ६ ).

**त्रिपुर**-पूर्वी देवदानवांचा दीर्घकाळ संग्राम होऊन, दान-वांचा पराभव झाल्यावर, मयासुरानें आपले दोन मित्र तारक आणि विद्युन्माली यांस समागमें घेऊन, दीर्घ-कालपर्यंत तप करुन ब्रह्मदेवास प्रसन्न केलें, आणि वर मागितला कीं, मला शत शत योजनांच्या अंतरावर देवांस अभेद्य अशीं तीन फिरतीं पुरें करतां यावीं, व तीं ब्राह्मणांच्या शापास अभेद्य असून, महादेवाच्या बाणानें कदाचित् त्यांचा नाश झाला, तरी त्यांतून जें पुर अवशेष राहील त्याचा नाश होऊं नये. त्यावरुन ब्रह्मदेव तथास्तु म्हणून सत्यलोकास गेले असतां, मयासुरानें पुष्यनक्षत्रावर लोह, रजत आणि सुवर्ण यांचीं, एकावर एक अशीं सारख्या अंत-रानें तीन पुरें निर्माण केलीं, आणि तेथील आधि-पत्य अनुक्रमानें तारकासुर, कमलाक्ष व विद्युन्माली त्या तिघांस दिलें. याशिवाय त्या तीन पुरांच्या आस-मंतात् आणखीही कित्येक अंतरिक्षपुरें निर्मून त्यांत अन्य असुरांची राहण्याची व्यवस्था केल्यावर,सर्वांच्या ऊर्ध्वप्रदेशीं अति दिव्य पुर निर्मून, त्यांत स्वतः आपण राहिला.

मयासुरानें अशी व्यवस्था करुन, सर्वांस असें सांगितलें कीं, तुम्ही इतःपर आपण होऊन देवांच्या वाटेस जाऊं नये, व उन्मत्तपणानें आचारहीन होऊन, ईश्वरोपासनेचा अनादर करूं नये. त्याप्रमाणें ते सर्व त्या नियमानुरूप बराच कालपर्यंत राहिल्यामुळें स्वस्थ होते. परंतु दुर्दैवेंकरुन, त्यांस विपरीतबुद्धि उत्पन्न होऊन, ते सर्व नियम त्यांनीं हळू हळू सोड-ण्यास आरंभ केला. त्यावरुन सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले, तेव्हां ब्रह्मदेव सर्वांस घेऊन, महादेवाकडे येऊन, त्यांनीं असुरांचें वृत्त त्यांस निवेदन केलें. तें ऐकून महादेवांनीं पृथ्वीस रथाची कल्पना करुन, ब्रह्मदेवास सारथि केलें, व अन्य देवांस ज्या ज्या स्थानीं योजा-वयाचें, त्या त्या स्थानीं योजून, विष्णूस धनुष्यावर योजण्यास बाण केलें, व पुष्यनक्षत्राचा योग येतांच तीं तीन पुरें समसूत्रांत क्षणभर यावयाचीं,तो क्षण साधून, महादेवांनीं त्रिपुरांचा नाश केला. तो करतांच तेथील तेथील अधिपति मरण पावून, अन्य असुर अन्य देवांनीं मारिले. मात्र मयासुर परमनियमशाली व ईश्वरोपासक असल्यामुळें, तेवढा वांचला ( भार० द्रोण० अ० २०२ ). व्यासार्जुनसंवाद.

हें त्रिपुराख्यान पुराणांतरांतून, असें आढळतें कीं, पुरांची व्यवस्था कोठें कोठें खालींवर, व आधिप-त्यांच्या नांवांत किंचित् फेरफार, परंतु तीन संख्येंत अगदीं फेर नाहीं. हें मुख्य बीज मी ध्यानांत धरून, पुराणांतरींचे लेख तादृश सप्रमाण न धरतां, भार-तोक्त त्रिपुराख्यानच येथें मुख्य मानिलें आहे

**त्रिपुरा**-ऋ[illegible]

**त्रिपुरातपन**-अथर्वणवेदोपनिषत्.

**त्रिपुरी**-नगरीवि० ( भार० वन० अ० २५४ श्लो० १० ).

**त्रिबंधन**-त्रिबंधनसत्या [illegible]

**त्रिभागा**–द्वितीयार्थक महेंद्र पर्वतापासून निघालेली नदी.

**त्रिभानु**– ( सो० वं० ) तुर्वसुकुलोत्पन्न भानुमान् राजाचा पुत्र. याचा पुत्र करंधम.

**त्रिमूर्ति**–इंद्रप्रमदि ऋषीस नामांतर.

**त्रिमूर्धा**–रावणाचा पुत्र.

**त्रिलोचन**–तीन नेत्रांनीं युक्त जो महादेव, आणि त्याचा गणसमुदाय तो.

**त्रिवक्रा**–कंसाची कुब्जा ना० दासी.

**त्रिविक्रम**–विष्णूचें त्रैलोक्यव्यापि रूप त्याचें नांव.

**त्रिवृष**–चालू मन्वंतरांतील अकरावा व्यास. ( व्यास श० पहा ).

**त्रिशंकु**– ( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अरुण राजाचा पौत्र, व निबंधन राजाचा ज्येष्ठ पुत्र. याचें मूळचें नांव सत्यव्रत होय. हा बाल्यापासून दुर्मार्गवर्ती असून ब्राह्मणाच्या विवाहित स्त्रिया यानें हरण करीत असाऱ्या. म्हणून निबंधनानें यास सदुपदेश करून पाहिला, तथापि हा ऐकत नाहीं असें पाहून, त्यानें यास राज्यांतून बाहेर हांकून दिलें, व आपणही त्या दुःखानें मंत्र्याच्या स्वाधीन राज्य करून, उत्तम पुत्रप्राप्त्यर्थ अरण्यांत जाऊन तप करूं लागला. इकडे सत्यव्रत अरण्यांत श्वपाकाप्रमाणें राहात असतां, अयोध्येंत राजा नसल्यामुळें अधर्मेंकरून प्रजा व्याप्त होऊन राज्यांत नऊ वर्षें अवर्षण पडलें. त्या योगानें मनुष्यांस अन्न मिळेनासें होऊन मोठा आकांत झाला. त्यांत विश्वामित्राची स्त्री, व तीन पुत्र हे सांपडले होते; परंतु त्यांस यानें मोठ्या श्रमानें कांहीं मांस प्रत्यहीं आणून देऊन वांचविलें (२ गालव श० पहा). विश्वामित्रपत्नीस, यानें मांस आणून देण्याचा क्रम ठेविला असतां, त्यांत एकदां वसिष्ठऋषीची धेनु याच्या हातून वधली गेली, म्हणून त्यानें यास असा शाप दिला कीं, ब्राह्मणस्त्रियांचा अपहार, पित्याचा क्रोध, आणि धेनूचा वध, या तीन शंकूत्व ( पातकांत्व ) सत्यव्रत हा त्रिशंकु नाम पावो. तेव्हांपासून तर याचा अधिकच बुद्धिभ्रंश होऊन, हा अरण्यांत पिशाचाप्रमाणें फिरूं लागला.

निबंधन राजा अरण्यांत गेला असतां, तेथें त्यास स्वदेशाची अवस्था कळली, व सत्यरथ म्हणून दुसरा पुत्रहि झाला, म्हणून तो परत अयोध्येस येऊन पूर्ववत् प्रजापालन करूं लागला. त्या योगानें यथाकालीं पर्जन्य पडून सर्वत्र सुभिक्ष झालें. परंतु याचे त्यानें नांवच घेतलें नाहीं, असें पाहून, यास अनिवार पश्चात्ताप झाला, व यानें देहत्यागाचा निश्चय केला. पुढें देहत्याग करणार तों, कोणी देवतेनें यास सांगितलें कीं, तूं देहत्याग करूं नको, तुझा पिता तुला लवकरच राज्यावर स्थापील. त्यावरून हा देहत्याग करण्यापासून उपरम पावला.

इकडे निबंधन राजास सहजीं असें वाटलें कीं, सत्यव्रतास राज्यावर आणून स्थापावें. त्यावरून त्यानें याकडे दूतांस पाठवून, यास अयोध्येस आणविलें, व सदुपदेश करून याची राज्यावर स्थापना केली. नंतर आपण अरण्यांत जाऊन अल्पच काळांत परमगतीस पावला. पुढें त्रिशंकूनें पुष्कळ काळपर्यंत चांगलें नीतीनें राज्य केलें व हा तसा वागत असतां, यास हरिश्चंद्र आणि अंबरीष असे दोन पुत्र झाले.

याप्रमाणें त्रिशंकु राज्य करीत असतां, याच्या मनांत एकदां असें आलें कीं, या मर्त्यदेहानेंच स्वर्गास जाऊन, तेथील दिव्य भोग चिरकाळ भोगीत बसावें, असा एक यज्ञ करावा. त्यावरून तो वसिष्ठाकडे गेला, आणि मनांत आणलेला हेतु त्यास यानें निवेदन केला. (या गोष्टीवरून वाचणारांच्या ध्यानांत येईल कीं, हा राजा एक तऱ्हेवाईक होता ). अस्तु. वसिष्ठानें हें त्याचें भाषण ऐकून उत्तर केलें, या जन्मामध्यें बहुत यज्ञ करावे, आणि देहपातानंतर स्वर्गास जावें, ही रीत अनादिसिद्ध आहे. यास्तव तूं म्हणतोस तसें होणार नाहीं. त्यावरून हा म्हणाला, मी आपली धेनु पूर्वी मारिली आहे, त्या द्वेषानें आपण असें म्हणतां, तें मी समजलों, तर आतां येतों, मी दुसरा उपाध्याय पाहून, असा यज्ञ करून स्वर्गास जातों कीं नाहीं तें पहा. त्यावरून वसिष्ठास कोप येऊन तो म्हणाला, बरें तर, याच देहानें स्वर्गी जाणें तुझें होवो कीं न होवो; प्रस्तुत तूं चांडाळ तर हो, पुढें पाहतातच आहेत. इतकें म्हणतांच हा तत्क्षणींच कुरूप व कृष्णवर्ण झाला. ती आपली अवस्था यानें अवलोकन करून, यास पराकाष्ठेची लज्जा झाली, व मग अयोध्येंत न जातां, तसाच हा अरण्यांत निघून गेला.

हें वर्तमान हरिश्चंद्रास कळल्यावर त्यास अतिशय वाईट वाटलें, व त्यानें याकडे मंत्र्यास पाठविलें. परंतु यानें सांगितलें, आतां माझें अयोध्येंत येणें होणार नाहीं. हरिश्चंद्रानें राज्यावर बसावें, आणि प्रजेचें पालन करावें. त्यावरून मंत्री अयोध्येस परतला, व हरिश्चंद्रास सर्व वृत्तांत सांगून म्हणाला कीं, आतां आपण राज्य स्वीकारावें. त्यावरून हरिश्चंद्र निरुपाय होऊन, तो अयोध्येचें राज्य करूं लागला.

पूर्वी सांगितलें आहे कीं, अवर्षण पडलें असतां, आपल्या स्त्रीपुत्रांस सोडून विश्वामित्र तपार्थ गेला

होता, तो पुनः परत आला आणि त्रीस पुसूं लागला कीं, अवर्षणांत तुम्हीं आपले प्राण कसे वांचविलेत ? तिनें सत्यव्रतानें संरक्षण केल्याचें वृत्त सांगून म्हणाली, त्याची प्रस्तुत वसिष्ठशापानें अशी अशी अवस्था झालेली आहे. तर आपणांस त्याच्या उपकारांतून उत्तीर्ण होणें आवश्यक आहे. तें तिचें भाषण ऐकतांच विश्वामित्र याकडे आला. त्यास यानें पाहतांच साष्टांग नमस्कार घालून विनंति केली कीं, आतां माझा या अवस्थेंतून उद्धार करणें आपणाकडे आहे. विश्वामित्र म्हणाला, राजा तूं कांहीं चिंता करूं नको. इतकें म्हणून त्यानें अल्प दिवसांतच यज्ञाची सिद्धता करून, ब्राह्मणांस निमंत्रणें केलीं. परंतु चांडाला यजमान, आणि क्षत्रिय उपाध्याय, अशी वसिष्ठानें निंदा केल्यावरून, बहुतेक ब्राह्मणांनीं, आम्हीं या यज्ञास येत नाहीं म्हणून सांगितलें. त्यावरून विश्वामित्रास क्रोध येऊन, त्यानें वसिष्ठपुत्रांस तुम्ही चांडाल व्हाल असा शाप दिला. सारांश, शेवटीं कांहीं ब्राह्मण गेले, व यज्ञही होत आला; परंतु हविर्भाग घेण्यास देव येईनात, असें पाहून विश्वामित्रानें त्रिशंकूस सांगितलें कीं, आतां जर माझेंच कांहीं स्वार्जित पुण्य असेल, तर तूं स्वर्गी जाशील. इतकें म्हणतांच त्रिशंकु पक्ष्याप्रमाणें उडून स्वर्गी जाऊं लागला. त्यावरून इंद्रास क्रोध येऊन, त्रिशंकु त्याजवळ जातांच, त्यानें त्यास सांगितलें, गुरुशापानें दग्ध झालेला जो तूं, त्या तुला स्वर्गाचा मर्त्यदेहानें अधिकार नाहीं, यास्तव खालीं पतन पाव. तेव्हां त्रिशंकु खालीं पडूं लागला, व ओरडूं लागला. तें ओरडणें ऐकून विश्वामित्रानें “ तिष्ठ तिष्ठ ” (स्थिर रहा, स्थिर रहा, असें म्हटलें. तेणेंकरून हा तेथेंच अंतरिक्षांत स्थिर झाला.

नंतर विश्वामित्रानें प्रतिसृष्टि, व प्रतिस्वर्ग निर्माण करून, तेथें त्रिशंकूस स्थापीन अशी प्रतिज्ञा करून इष्टि आरंभिली, व कांहीं पदार्थ उत्पन्नही केले. त्यावरून इंद्रानें त्याची समजूत करून मर्त्यदेह त्रिशंकूकडून टाकवून त्यास दिव्यदेही केल्यावर स्वर्गास नेलें ( वा० रा० बाल० स० ५८-६० ). ( देविभा० ७ स्कं० अ० १०-१४ ).

**त्रिशिख**-तामस मन्वंतरांत स्वर्गामध्यें होता इंद्र तो ( १ इंद्र श० पहा ).

**त्रिशिखी**-यजुर्वेदोपनिषत्.

**त्रिशिरा**-त्वष्टा ना० प्रजापतीचा पुत्र जो विश्वरूप तो. यास तीन शिरें होतीं म्हणून असें नांव होतें. हा एका मुखानें वेदाध्ययन, एकानें सोमपान, व एकानें सुरापान करी. हा दैत्यांचा भागिनेय होता, म्हणून याचा ओढा देवाकडे व दैत्यांकडे सारखा होता. यास इंद्रानें कांहीं कालपर्यंत आपल्या पौरोहित्यावर योजिलें होतें ( ३ विश्वरूप श० पहा ).

२-दूषण राक्षसाच्या चार अमात्यांतील एक. ( १ खर श० पहा ).

३-रावणपुत्र त्रिशीर्ष तो.

**त्रिशिला**-भारतवर्षीय नदी ( भार भीष्म० अ० ९ ).

**त्रिशीर्ष**-रावणाच्या पुत्रांतील एक यास मारुतीनें मारिलें ( वा० रा० युद्ध० स० ७० ).

**त्रिशूलखात**-भारतवर्षीय तीर्थ.

**त्रिशृंग**-मेरूच्या परिस्तरणगिरींतील एक गिरी.

**त्रिसामा**-भारतवर्षीय नदी.

**त्रिस्तनी**-अशोकवनिकेंतील राक्षसी.

**त्रिस्रोता**-त्रिपथगा शब्द पहा.

**त्रेता**-आहवनीय, दक्षिणाग्नि आणि गार्हपत्य, या तीन अग्नींच्या समुच्चयास नांव.

**त्रेतायुग**-चार युगांतील दुसरें व त्याची मूर्तिमान् देवता. याची वर्षसंख्या देवमानानें छत्तिसशें वर्षांची; म्हणजे मनुष्यमानानें १२९६००० वर्षांची आहे. याचा संधि व संध्यंशकाल आद्यंतीं मिळून देवमानानें ६०० वर्षांचे असतात ( मत्स्य० अ० १६४ ).

**त्रैपुर**—त्रिपुरीचा राजा. यास सहदेवानें जिंकलें होतें ( भार० सभा० अ० ३१ ).

**त्रैशंकव**-त्रिशंकुपुत्र हरिश्चंद्र तो.

**त्रैशृंगायन**-तृतीयार्थक वासिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**त्र्यंबक**—एक रुद्र आहे. ज्यास तीन अंबक म्ह० नेत्र आहेत असा महादेव तो.

२-क्षेत्रवि०. हें जनस्थानासमीप आहे.

**त्र्यक्षी**-अशोकवनिकेंतील राक्षसी.

**त्वष्टा**—प्रियव्रतवंशीय ऋषभदेवकुलांत उत्पन्न झालेला भौवनराजा, त्यास दूषणेपासून झालेला पुत्र. यास विरोचना स्त्रीपासून विरज नांवाचा पुत्र झाला होता.

२-एक आदित्य ( द्वादशादित्य श० पहा ). हा चालू मन्वंतरांत प्रतिवर्षी आश्विनमासीं सूर्यमंडलावर अधिपति असतो ( ३ इष श० पहा ).

३-एक प्रजापति होता. यास, दैत्यभगिनी रचना, ती स्त्री असून, तिच्या ठायीं संनिवेश आणि विश्वरूप असे दोन पुत्र झाले होते; त्यांत विश्वरूपास इंद्रानें मारिल्यामुळें, याचें इंद्राशीं वैमनस्य होतें. आणि त्याच कारणास्तव पुरंदर इंद्रास मारण्याकरितां, यानें वृत्रासुरास निर्माण केलें होतें.

४–चालू मन्वंतरांतील विश्वकर्मा म्ह० देवांचा शिल्पी. यानें आपली कन्या, त्वाष्ट्री नामांतरानें प्रसिद्ध जी संज्ञा, ती विवस्वान् आदित्यास दिली होती, म्हणूनच यानें, विवस्वानाचें तेज, संज्ञेस सहन होईना असें पाहून, यास चक्रावर घालून तें काढून घेऊन न्यून केलें होतें. दधीच ऋषीच्या अस्थींचें इंद्रास, यानेंच वज्र करून दिलें होतें. याविषयीं प्रमाणः—

श्लोक.

युष्मभ्यं याचितोश्विभ्यां धर्मज्ञोंगानि
दास्यति ॥ ततस्तैरायुधश्रेष्ठो विश्व–
कर्मा विनिर्मितः ॥ ५४ ॥ येन वृत्र–
शिरोहर्ता मत्तेजउपबृंहितः ॥

( भाग० ६ स्कं० अ० ९ ).

५–एक असुर ( मत्स्य० अ० १७२ ).

या त्वष्ट्याच्या नांवाचा पुराणांत मोठा गोंधळ आहे. त्याचा मी येथें पूर्वापर नीट विचार करून, संगतवार क्रम लावला आहे.

**त्वष्टाधर**–द्वितीयार्थक शुक्राच्या चार पुत्रांतील एक.

**त्वाष्ट्र**–त्वष्टा प्रजापतीचा पुत्र जो विश्वरूप, वृत्रासुर इ० तो.

**त्वाष्ट्री**–त्वष्टा जो विश्वकर्मा, त्याची संज्ञा ना० कन्या ती. विवस्वान् आदित्याची स्त्री.

---

## थ

०

---

## द

**दंड**––सूर्याचा एक पार्षद. यासच दंडी असेंही नांव आहे.

२–सूर्यवंशोत्पन्न भद्राश्व राजास नामांतर.

३–द्रौपदीस्वयंवरांतील एक राजा, विदंड राजाचा पुत्र ( भार० आदि० अ० १८६ ).

४–कर्णानें मारलेला पांडवपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ५६ ).

**दंडक**–( सू० वं० ) इक्ष्वाकूच्या शतपुत्रांतील तिसरा. हा जन्मापासूनच मूढ व उन्मत्त असे. त्यामुळें यास राज्य कोठें द्यावें, असा तो विचार करीत असतां, त्यानें यास विंध्याद्रि व शैवलपर्वत या दोहोंमधील आधिपत्य दिलें. यानें त्या राज्यांत आपली राजधानी मधुमंत ना० नगरी केली होती, व आपलें पौरोहित्य भृगु–कुलोत्पन्न एका ऋषीस दिलें होतें ( वा०रा०उत्तर० स० ७९ ).

एकदां हा राजा, गुरूच्या आश्रमास गेला असतां, तेथें यानें गुरुकन्या अरजेस पाहिलें, व तेणेंकरून हा कामातुर होऊन तिला धरावयास धांवला. तेव्हां ती म्हणाली, माझ्या पित्यास तूं मजविषयीं याचना कर आणि त्यानें दिल्यास पाणिग्रहणविधीनें मला वर. परंतु या उन्मत्तानें तिचें न ऐकतां तिजवर बलात्कार केला, व तिशीं संभोग करून स्वनगरास पळून गेला ( वा० रा० उत्तर० स० ८० ).

इकडे ऋषि आश्रमीं येऊन पाहतो तों,राजानें महदन्याय केला आहे. नंतर त्यानें क्रोधानें यास शाप दिला कीं, हा राजा, बल, कोश इ०कांसहित एका सप्तकांत भस्म होईल. त्याप्रमाणें तो भस्म होऊन, याचा चतुःशतयोजनप्रमाण देश अरण्यप्राय झाला, त्यासच दंडकदेश असें नांव असतां, अशा कारणानें **दंडकारण्य** हें नांव पडलें. (वा०उत्तर०स०८१).

२–या नांवाचे लोकवि०.

**दंडकदेश**–विंध्याद्रि आणि शैवलपर्वत यांमधील दंडक राजाचा देश तो.

**दंडकारण्य**–अरण्यप्राय जो दंडकदेश तो.

**दंडकेतु**–भारतीयुद्धांतील पांडवपक्षीय राजा. ( भार० द्रोण० अ० २३ ).

**दंडगौरी**–एक अप्सरा.

**दंडधर**–यम.

**दंडधार**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

२–द्रोणाचार्यानें मारलेला पांडवपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० २३ ).

३–अर्जुनानें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० १८ ).

४–युधिष्ठिराचा चक्ररक्षक एक पांचाल. यास कर्णानें मारिलें ( भार० कर्ण० अ० ४९ ).

**दंडपाणि**–यम आणि कालभैरव या दोघांसही नांव.

२–( सो०वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशांत जन्मलेल्या वहीनर राजाचा पुत्र. याचा पुत्र निमि.

**दंडी**–एक रुद्रगण.

२–सूर्यपार्षद दंड तो.

३–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा ).

४–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**दंतवक्त्र**–अधिराज्य देशाचा राजा.

**दंतवक्र**–रामसभेंतील हास्यकार.

२–करूषकदेशाधिपति वृद्धशर्मा, त्यापासून वसुदेव–भगिनी श्रुतदेवा, तिच्या ठायीं झालेला पुत्र. हा कृष्णाच्या हातून असुरांश असल्यामुळें मरण पावला

होता ( भाग० १० स्कं० अ० ७८ ).

यास वक्रदंत असेंही म्हटलेलें आढळतें.

**दत्त**–स्वायंभू मन्वंतरांतील अत्रिऋषीच्या तीन पुत्रांतील एक. स्वारोचिष मन्वंतरामध्यें जे सप्तर्षि होते, त्यांतील हा एक होता. याचा पुत्र निमिऋषि (भार०अनुशा० अ० ९१ ).

२–चालू मन्वंतरांतील अत्रिपुत्र, हा मन्वंतरारंभींच्या प्रथम पर्ययांतील त्रेतायुगांत जन्मला होता ( मत्स्य० अ० ४७ ). (देवीभा० ४ स्कं० अ० १६). हा परम ब्रह्मनिष्ठ असून, अलर्क, प्रऱ्हाद, यदु, सहस्रार्जुन, इ० याचे ब्रह्मविद्यासंबंधानें शिष्य होते.

**दत्तात्रेय**–प्रथमद्वितीयार्थक दत्त तोच, व अथर्वणवेदोपनिषत्.

**दत्तामित्र**–अर्जुनानें मारिलेला पूर्व दिशेकडील एक राजा.

**दंदशूक**–सर्पांनींच व्याप्त असा यमलोकींचा एक नरक.

**दधिमंडोद**–पृथ्वीवरील सप्त समुद्रांतील साहवा. याचें वेष्टन शाकद्वीपास असून, हा त्याइतकाच म्हणजे बत्तीस लक्ष योजनें रुंद आहे, व यासभोंवता पुष्करद्वीपाचा वेढा आहे.

**दधिमुख**–रामसेनेंतील एक वानर. हा वालीच्या मधुवनाचें संरक्षण करीत असे. दाधिवक्त्र यालाच म्हटलेलें आहे ( वा० रा० युद्ध० स० ३० ).

**दधिवाहन**–खनपान राजास नामांतर.

**दधीच**–स्वायंभूमन्वंतरांतील जो अथर्वण ऋषि त्याच्या तीन पुत्रांतील दध्यंच ना० पुत्र तो. दध्यङाथर्वणही यालाच नामांतर आहे. वृत्रासुरवधार्थ यानेंच आपलीं अस्थि चालू मन्वंतरांतील इंद्रास दिलीं होतीं; कारण ब्रह्मविद्यासंबंधानें हा त्या इंद्राचा शिष्य असून, आश्विनीकुमारांचा गुरु होता ( भार० वन० अ० १०० ). ( भाग० ६ स्कं० अ० १० ). याविषयींचा इतिहास असा आहे कीं, इंद्रानें यास ब्रह्मविद्या सांगून असें सांगितलें होतें, जर ही विद्या तूं कोणास सांगशील, तर मी तुझा मस्तक तोडीन. त्यावरून हा तेथून तथास्तु म्हणून परतला असतां, अल्पच काळानें अश्विनकुमार याकडेस आले, आणि त्या विद्येविषयीं त्यांनीं यास प्रार्थिलें, तेव्हां यानें इंद्राची प्रतिज्ञा त्यांस सांगितल्यावरून, ते यास म्हणाले कीं, हें तुझें प्रस्तुतचें शिर आम्ही तोडून एकीकडे ठेवितों, व तुला अश्वाचें जोडितों, त्यानें तूं आम्हांस ब्रह्मविद्या सांगितलीस कीं, इंद्र हें तुझें मस्तक तोडील, तसें होतांच तुझें मूळचें शिर तुला जोडून सजीव करूं, व तुझ्या उपकारास उत्तीर्ण होऊन आम्ही स्वलोकीं गमन करूं. त्यास यानें अनुमोदन देतांच, अश्विनीकुमारांनीं याचें मूळचें शिर तोडून अश्वाचें जोडिलें. यानेंही त्या मुखानें त्यांस ब्रह्मविद्या उपदेशितांच इंद्रानें याचें मस्तक तोडिलें. तेव्हां अश्विनीकुमारांनीं याचें मूळचें शिर यास जोडून सजीव केलें, व याचा अनुग्रह संपादून ते स्वलोकास परत गेले ( देवी भा० ७ स्कं० अ० ३६ ).

२–तृतीयार्थक भृगुकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि. हा महातपस्वी होता. याकडेस एकदां इंद्रानें अलंबुषा अप्सरेस पाठविलें असतां, याचें रेत सरस्वती नदींत पतन पावलें, त्यापासून जो पुत्र निर्माण झाला, तोच सारस्वत ऋषि प्रख्यात होता ( सारस्वत श० पहा ).

**दध्यङाथर्वण**–प्रथमार्थक दधीच ऋषि तोच.

**दध्यंच**–दध्यङाथर्वणासच नांव.

**दनायु**–कश्यपऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक. **विक्षर**, **बल**, **वृत्र**, आणि **वीर**, असे हिला चार पुत्र होते.

**दनु**–कश्यपपत्नी. हिच्या पुत्रांस दानव, असें म्हटलेलें आहे. त्यांचीं नांवें अशीं—**विप्रचित्ति, अजक, अंजक, अयोमुख, इरागर्भशिरा, इंद्रजित्, एकचक्र, असिलोमा, अयःशिरा, अश्वशिरा, अश्वशंकु, अश्व, अश्वपति, इषुपात, अहर, एकाक्ष, कपिश, केतु, केतुवीर्य, केशी, केतुमान्, कुपट, कपट, सूर्य, चंद्र, गगनमूर्द्धा, गविष्ठ, द्विमूर्द्धा, दुर्जय, दीर्घजिव्ह, नमूचे, निचंद्र, निकुंभ, नरक, तारक, तुहुंड, पुलोम, प्रलंब, बिंदु, बाण, मारीचि, मेघवान्, महाबाहु, महाबल, महोदर, मृतपा, वैश्वानर, वातापि, विद्रावण, वज्रनाभ, वज्राक्ष, वृषपर्वा, वेगवान्, विरूपाक्ष, वनायु, शत्रुतपन, शकुनि, शंकुशिरोधर, शंबर, शतऱ्हद, शरभ, शलभ, शठ, सप्तजित्, सूक्ष्म, स्वर्भानु, हर,** आणि **हिरण्यकशिपु**, इत्यादिक शंभर ( भार० आदि० अ० ६५ ). ( मत्स्य० अ० ६ ).

**दंभ**–विप्रचित्ति दानवाचा पुत्र, यास शंखचूड ना० पुत्र होता.

**दंभोद्भव**–कोणीएक राजा, कोणाचा कोण तें आढळत नाहीं. याचा इतिहास असा—हा, आपल्या सभेंतील ब्राह्मणांस नित्य असे पुसत असे कीं, पृथ्वीवर मजपेक्षां अ० मजसमान बलवान् कोण आहे तें सांगा. असें बहुत दिवस पुसतां पुसतां, एकदां ब्राह्मणांनीं, रागावून असें सांगितलें, राजा, गंधमादनशिखरावर नरनारायण

ऋषि आहेत ते तुजहून अतिशय बलाढ्य आहेत, यास्तव तूं त्याकडे जा. त्यावरून हा तेथें गेला असतां, नरनारायणांनीं याचा आदर करून, येण्याचें कारण विचारिलें. यानें तें सांगितलें. तेव्हां ते म्हणाले, आम्हां पाशीं क्रोध मुळींच नसतां युद्ध कसें होईल ? परंतु हा तें कांहीं ऐकेना, असें त्यांनीं पाहून, एक मुष्टि दर्भ याच्या सैन्यावर टाकिले. तेणेंकरून सर्व सैन्य कर्ण, नेत्र, नासिका, इ० अवयवरहित झालें. तेणेंकरून याचा अभिमान नष्ट होऊन, यानें नरनारायणांस क्षमा मागितली. तेव्हां त्यांनीं याचा अपराध क्षमा करून, नीतचिा उपदेश केला. तो यानें मनांत धरून, त्यांची आज्ञा घेतली, व स्वनगरास येऊन अभिमानत्यागपूर्वक नीतीनें राज्य करूं लागला ( भार० उद्योग० अ० ९६ ).

**दम**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

२–ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

३–वैवस्वत मनूचा पौत्र. नरिष्यंत राजाच्या दोन पुत्रांतील एक. याचा पुत्र तृणबिंदु राजर्षि.

४–अंगिरस ना० देववि०.

५–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न मरुत्त राजाचा पुत्र. याचा पुत्र राज्यवर्द्धन.

६–विदर्भदेशाधिपति भीमराजाच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. दमयंतीचा भ्राता.

७–स्त्रीसंग होतांच मरण पावशील, असा पंडुराजास ज्यानें शाप दिला होता, तो ब्राह्मण.

**दमघोष**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्यामघ कुलांतील रोमपादवंशांत जन्मलेल्या चेदिराजाचा पुत्र. यास वसुदेवभागिनी श्रुतश्रवा ती स्त्री असून पुत्र शिशुपाल होता.

**दमन**–एक ब्रह्मर्षि. याच्या प्रसादानें भीमराजास दम इ० तीन पुत्र, व दमयंती कन्या झाली होती.

२–भीमराजाच्या तीन पुत्रांतील मध्यम. दमयंतीचा भ्राता.

३–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय पौरवराजा.

४–दुष्यंतपुत्र भरतास नामांतर.

**दमयंती**–भीमराजाची कन्या, नलाची स्त्री. ( ५ नल श० पहा ).

२–सृंजयराजाची कन्या. पर्वत ऋषीचा मातुल ( मामा ) जो नारद ऋषि त्याची स्त्री ( ७ सृंजय श० पहा ).

**दया**–स्वायंभूमन्वंतरांतील दक्षाची कन्या व धर्मऋषीची स्त्री. हिचा पुत्र अभय.

**दरद**–बाल्हीक देशाच्या उत्तरेकडील देश ( भार० सभा० अ० २७ ).

२–दुर्योधनपक्षीय भारती युद्धांतील राजा.

**दरीमुख**–रामसेनाधिपति या नांवाचे दोन वानर.

**दर्दुर**–या नांवाचे दोन सामान्य गिरि ( वा० रा० किष्किं० ४३ ). ( भार० वन० अ० २८२ ).

**दर्भवाह**–द्वितीयार्थक अगस्त्यकुलोत्पन्न ऋषि.

**दार्भि**–एक महातपस्वी ब्रह्मर्षि. यानें एकदां समुद्रांस बोलावून सांगितलें कीं, तुम्हीं सातजणांनीं मिळून एक तीर्थ असें उत्पन्न करावें कीं, ज्याच्या स्नानपानेंकरून, तुमचें सर्वांचे स्नानपान केल्याचें फळ घडावें. त्यावरून त्यांनीं अर्द्धकील नांवाचें एक तीर्थ यास भरतवर्षांत उत्पन्न करून दिलें ( भार० वन० अ० ८३ ).

**दर्विसंक्रमण**–भारतवर्षीय तीर्थ.

**दर्श**–कृष्णापासून कालिंदीस झालेला पुत्र.

**दल**–प्रथमार्थक परीक्षित् श० पहा.

**दंश**–भृगुऋषीची स्त्री पुलोमा, तिला हरण करून पळणारा असुर. यास भृगूनें तूं कृमि होशील असा शाप दिला होता; परंतु यानें उःशाप मागितला असतां, जामदग्न्य रामाच्या दर्शनें उद्धरशील असें यास भृगूनें वरदान दिलें होतें. हाच कृमि, कर्णाच्या मांडीवर मस्तक ठेवून राम निजला असतां, त्याच्या मांडीस चावला. तेव्हां त्यांतून निघालेल्या रक्तप्रवाहानें, रामाच्या मस्तकास स्पर्श केल्यामुळें तो जागृत होऊन, त्यानें याकडे पाहतांच याचा उद्धार झाला (भार० शांति० अ० ३ ).

**दशकंठ-ग्रीव**–दाहा शिरें असल्यामुळें रावणास मूळचें नांव.

**दशज्योति**–धूम्रा, आर्चि, ऊष्मा, ज्वलिनी, ज्वालिनी, विस्फुलिंगिनी, सुश्री, सुरूपा, कपिला, आणि हव्यकव्यवहा, अशा दाहा कलांनीं युक्त म्हणून हें नांव अग्नीस आहे ( भार० आदि० अ० १ श्लो० ४४ ).

**दशमी**–ब्रह्मदेवाची मानसकन्या.

**दशरथ**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न मूलक अ० नारीकवच राजाचा पुत्र. यास शतरथ किं० इडविड ना० पुत्र होता.

२–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्यामघकुलांतील क्रथवंशांत जन्मलेल्या नवरथ राजाचा पुत्र. यास शकुनी नांवाचा पुत्र होता.

३–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न रघुराजाचा पौत्र, व अज राजाचा पुत्र तो. हा, पित्याच्या मागें आग्नेय कोसलाचें राज्य पावून, अयोध्येंत इंद्राप्रमाणें राज्य

करूं लागला. याच्या वेळेस **धृष्टि, जयंत, विजय, सुराष्ट्र, राष्ट्रवर्द्धन, अकोप, धर्मपाल,** आणि **सुमंत्र,** असे शुचि, राजकार्यतत्पर, तसेच यशस्वी अष्ट प्रधान असून, मुख्य कुलगुरु **वसिष्ठ** असे. दुसरा एक **वसिष्ठ** आणि **वामदेव,** हे मुख्य ऋत्विज असून **सुयज्ञ, जाबालि, काश्यप, गौतम, मार्कंडेय** व **कात्यायन,** हे साहा उपऋत्विज असत. सुमंत्र हा जरी प्रधान होता, तरी कधीं कधीं सूताचें (सारथ्याचें) हि काम करी.

दशरथास **कौसल्या, सुमित्रा** आणि **कैकेयी,** अशा मुख्य तीन स्त्रिया असत. असें असतांही यास बराच काळपर्यंत संतति नव्हती. त्यावरून यानें वसिष्ठानुमतें पुत्रकामेष्टि करावी असें मनांत आणिलें. त्यांत सुमंत्रानें ऋष्यशृंगाची कथा सांगून, त्यास या इष्टीस आणावें म्हणून विशेष सुचविलें असतां, सोमवंशीय **रोमपाद** राजा दशरथाचा परममित्र होता, त्यास तो जाऊन भेटला, व इष्टीचा वृत्तांत सांगून, त्यापासून, त्याची कन्या **शांता** व जामात **ऋष्यशृंग,** त्यांस यानें मागून घेऊन अयोध्येस आणिलें. पुढें वसंतऋतु येतांच दशरथानें यज्ञाची सिद्धता केली. वसिष्ठांनीं यज्ञसंबंधीं सर्व कार्य करण्याचें स्वीकारलें, व सुमंत्रानें राजे यज्ञास येतील त्यांचें आगतस्वागत करण्याचें अंगीकारिलें. हा यज्ञ जरी इतर राजांस बोलावण्याच्या प्रसंगाचा नव्हता, तरी विशेष अगत्याचे जे राजे होते, ते यास स्वतःच्या उल्हासानें उपायनें घेऊन आले, त्यांचीं नांवें:—**सीरध्वजजनक, काशिराजा, अश्वपति; भानुमान्,** मगधाधिपति **शूरराजा,** इ० अनेक. पुढें दशरथानें सुमुहूर्तीं यज्ञदीक्षा घेऊन, सरयूतीरीं यज्ञास आरंभ केला. यज्ञ सांग होत आला असतां, अग्निकुंडांतून प्राजापत्य पुरुष निघाला, व त्यानें राजास पायसपात्र दिलें. तें त्यानें तिघी स्त्रियांस देतांच, त्या तिघीही गर्भिणी झाल्या ( वा० रा० बाल० स० ७–१६ ).

पुढें ऋष्यशृंगादिक ऋषींची पूजा करून, व अपार दक्षिणा देऊन, दशरथानें त्यांस मार्गस्थ केल्यावर, चैत्र शुद्ध नवमीच्या दिवशीं मध्यान्हीं रवि, भौम, शनि, गुरु, शुक्र, हे पांच ग्रह मेष, मकर, तुला, कर्क आणि मीन, या उच्च राशींवर असतां, कौसल्या रामास प्रसवली. मीनलग्नीं पुष्यनक्षत्रीं कैकेयी भरतास, आणि कर्कलग्नीं आश्लेषानक्षत्रीं सुमित्रा लक्ष्मण आणि शत्रुघ्न, अशा उभयतां प्रसवली. त्या कालीं अयोध्येमध्यें सर्वत्र आनंद झाला. दशरथानें पुत्रोत्सोहानिमित्त अनेक दानें देऊन, अकराव्या दिवशीं वसिष्ठाकडून त्यांचीं नामकरणें करविलीं. चारी पुत्र दिवसेंदिवस मोठें होऊन अनेक क्रीडा करूं लागले. त्या योगानें स्त्रियांसहित दशरथ आनंद पावून आपणास कृतार्थ मानूं लागला. लक्ष्मण हा सर्वदा रामास, व शत्रुघ्न भरतास अनुसरून वागे. याप्रमाणें होतां होतां, चौघेही मोठे झाले असें पाहून, दशरथानें त्यांचे यथाकालीं उपनयनसंस्कार केले, व अध्ययनार्थ वसिष्ठाकडे दिलें. वसिष्ठानें सर्वांस वेदवेदांगें, पढवून धनुर्विद्या इत्यादिकांतही प्रवीण केलें. तदनंतर दशरथ त्यांच्या विवाहाविषयीं चिंतन करीत असतां, एके दिवशीं एकाएकीं विश्वामित्र ऋषि याजकडे आला. त्यास पाहून दशरथानें त्याचें पूजन केलें, व काय इच्छित असेल तें मागावें, मी देतों असें म्हटलें. तेव्हां विश्वामित्र बोलला, राजा, मला अन्य कांहीं नको; तर इतकेंच पाहिजे कीं, मी यज्ञ आरंभिला असतां, मारीच आणि सुबाहु, हे दोघे राक्षसांसहित येऊन, त्यास विघ्न करितात. यास्तव त्यांचा उपद्रव न होतां यज्ञसिद्धि व्हावी, एतदर्थ तुझा ज्येष्ठ पुत्र राम तो मला दे. असें विश्वामित्राचें भाषण श्रवण करून यास शोक व भीति उत्पन्न होत्साती, हा त्यास म्हणूं लागला कीं, मी आपणास एक अक्षौहिणी सैन्य देतों, किंवा स्वतः आपणासमागमें येतों; परंतु राम आपल्यास देणें माझ्यानें होत नाहीं, कारण तो अजून लहान आहे, व राक्षसांशीं संग्राम करणें त्यास मुळींच विदित नाहीं. माझें वय आज साठ सहस्र वर्षांचें असून, मी अनेक संग्राम केलेला आहे. यास्तव कृपा करून आपण रामास मागूं नये. दुसरें मी, बहुत कालपर्यंत अनपत्य होतों, व वृद्धावस्थेंत हे पुत्र मला झाले आहेत, हें आपणास विदितच आहे. तेव्हां राम आपणास माझ्यानें कसा देववेल ? या दशरथाच्या भाषणानें विश्वामित्रास कोप येऊन, तो म्हणाला, राजा पूर्वी देईन असें बोलून, आतां नाहीं म्हणतोस हें काय ? रघुवंशांत जे जे राजे मीं पाहिले, ते ते सर्व सत्यवादीच असें असतां, त्या कुलांत तूं असा कसा निर्माण झालास ? अस्तु. तूं सुखानें राहा, मी जातों. असें बोलून तो निघतांच, दशरथ भ्याला, व वसिष्ठास म्हणूं लागला कीं, कसें करावें ? तेव्हां वसिष्ठांनीं सांगितलें, विश्वामित्रास सत्वर माघारें आणीव, तूं राम दिलास तरच त्याचा यज्ञ सिद्धीस जाईल, एऱ्हवीं नाहीं, असें

अगदीं समजूं नको; तर तो आपल्या यज्ञाचें संरक्षण करण्यास आपण स्वतः समर्थ आहे. परंतु यज्ञनिमित्तानें रामावर तो केवळ अनुग्रहच करण्यास आला आहे असें समज. असें ऐकून दशरथानें विश्वामित्रास तत्काळ माघारें आणवून, त्याच्या स्वाधीन रामास केलें. राम निघतांच लक्ष्मण त्यासमागमें निघाला, व दोघांस घेऊन विश्वामित्र चालतां झाला ( वा० रा० बाल० स० १७–२१ ).

रामलक्ष्मणांस विश्वामित्रऋषि घेऊन गेला असतां, दशरथास त्यांच्या विरहानें अगदीं चैन पडेनासें झालें; परंतु निरुपायास्तव तें दुःख सहन करून, कालक्रमणा करीत आहे तों मिथिला नगरींहून सीरध्वजजनकाचे दूत येऊन, पत्र देऊन दशरथास म्हणूं लागले कीं, विश्वामित्र ऋषिसह आपले उभयतां पुत्र मिथिलेंत कुशल आहेत. प्रस्तुत विदेहराजकन्येचें स्वयंवर होत असतां तेथें शिवचापभंगाचा पण होता, त्याचा रामानें भंग केल्यामुळें सीतेनें त्यास वरिलें असून, आतां विवाहसमारंभ होणें आहे, व त्याकरितां आपणास नेण्यास आम्हीं आलों आहों. हीं अकल्पित व अमृततुल्य अक्षरें दूतमुखींचीं ऐकून, दशरथास पराकाष्ठेचा आनंद झाला, आणि तो तत्काळ वसिष्ठ पुरोहित, संपूर्ण स्त्रिया, आणि मंत्री यांसहवर्तमान तिकडे जाण्यास निघाला. पुढें मिथिलेस पोहोंचतांच सीरध्वजानें याचा सत्कार करून, चारी पुत्रांचे यथासांग विवाह केले ( सीरध्वज श० पहा ). नंतर दशरथ आपले पुत्र व स्नुषा यांस घेऊन मिथिलेहून निघाला असतां मध्यें परशुरामाची गांठ पडून, तेथून हा पुढें अयोध्येस आला ( परशुराम श० पहा ). अयोध्येस येतांच युधाजितानें ( कैकेयीच्या भ्रात्यानें ) भरतशत्रुघ्नांस केकयदेशीं नेतों म्हटल्यावरून, यानें त्यांस तिकडे पाठविलें.

पुढें दशरथानें पाहिलें कीं, आपली उत्तरोत्तर वृद्धावस्था होत चालली आहे, तर आतां रामास यौवराज्याभिषेक करावा. असें मनांत आणून, वसिष्ठादिकांचें त्यानें अनुमोदन घेतलें, व अभिषेकाची सर्व सिद्धता करवून, रामास सुचवावें म्हणून वसिष्ठास सांगितलें. वसिष्ठ रामाकडे गेला, व त्यानें तुला उद्यीक यौवराज्याभिषेक होणार आहे, यास्तव आज उपोषणपूर्वक व्रतस्थ राहा म्हणून सांगून परतला. तों, हें वृत्त संपूर्ण नगरांत स्फुट होऊन सर्वांस आनंद झाला. कौसल्या व सुमित्रा या दोघींनीं हर्षानें अनेक दानें दिलीं. मात्र कैकेयीस मंथरेच्या भाषणानें विपरीतबुद्धि उत्पन्न होऊन, ती क्रोधागारांत प्रविष्ट झाली ( २ मंथरा श० पहा ).

कैकेयी ही, दशरथाची कनिष्ठ स्त्री असून, रूपानेंही उत्तम होती. त्यामुळें राजाची प्रीति तिजवर अधिक असे, म्हणून तो नेहेमीं रात्रीं तिच्याच मंदिरांत प्रायः राही. त्याच नियमाप्रमाणें त्या दिवशीं रात्रीं तिच्या मंदिरांत गेला असतां, नित्याप्रमाणें ती यास सामोरी आली नाहीं, असें पाहून याला कांहींसें विलक्षण वाटलें. इतक्यांत यानें दासींस पुसलें कीं, तुमची स्वामिणी आज कोठें दिसत नाहीं हें काय आहे? दासी म्हणाली क्रोधागारांत बसली आहे; परंतु तिला क्रोध येण्यास कारण आज काय झालें, तें आम्हास विदित नाहीं. त्यावरून हा तिजसमीप गेला आणि पाहतो तों, मलिनवस्त्र धारण करून तिनें भूमीवर शयन केलें आहे. तेव्हां हा तिला म्हणूं लागला, हें तूं आज काय आरंभिलें आहेस? तुला कोणीं कांहीं बोललें कीं काय? कैकेयीनें उत्तर केलें, पूर्वी तूं मला दोन वर दिले आहेस, ते माझे मला आज पाहिजेत; त्यांतून एका वरानें तूं भरतास यौवराज्य द्यावेंस, व दुसऱ्या वरानें रामास १४ वर्षे अरण्यांत पाठवावेंस. यांत विलंब होतां कामास नये; नाहींतर मी प्राणत्याग करीन ( तिमिध्वज श० पहा ).

असें तिचें तीव्र भाषण ऐकून राजास पराकाष्ठेचा शोक झाला, व त्यानें तिची बहुत समजूत केली परंतु तें ती कांहींच ऐकेना. सारांश, ती रात्र याची शोकांत व दुःखांत गेली असतां प्रातःकाल झाला, व त्यानें लागलेंच तेथें रामास बोलाविलें. राम आला असें पाहून दशरथास अतिशयच दुःख झालें. त्याच्यानें रामास कांहींच बोलवेना. तेव्हां कैकेयीनें, राजानें मला पूर्वी दोन वर दिलेल्याचें वृत्त सांगून, तुला चौदा वर्षे अरण्यांत गेलें पाहिजे म्हणून त्यास सांगितलें. राम तिला तथास्तु म्हणून, तसाच कौसल्येच्या मंदिरांत गेला, व तिला सर्व वृत्त निवेदन करून, अरण्यांत जाण्याची त्यानें आज्ञा मागितली. त्यावरून तिला अत्यंत दुःख झालें. तेव्हां रामानें तिचें समाधान करून, तो तसाच सीतेच्या मंदिरांत आला, व तिलाही सर्व वृत्त सांगून बोलला कीं, तूं येथें दशरथ आणि कौसल्या या उभयतांची सेवा करून स्वस्थ राहा. चौदा वर्षे तेव्हांच निघून जातील व आम्ही सत्वरच परत येऊं. परंतु सीतेनें असें करूं नये, मला समागमें न्यावेंच असा आग्रह धरिल्यामुळें रामानें तिला समागमें घेतलें ( १ सीता श० पहा ).

इतक्यांत लक्ष्मणानें रामास विनंति केली कीं, मी आपणासमागमें येणार, न न्याल तर मी आपला प्राण ठेवणार नाहीं. तेव्हां रामानें त्यासही समागमें घेतलें ( २ लक्ष्मण श० पहा ).

नंतर राम, सीता, व लक्ष्मण यांसहित पुनः कैकेयीच्या मंदिरांत आला, व त्यानें तिजजवळ जाण्याची आज्ञा मागितली. ती तिनें देतांच राजास, व आपल्या इतर मातांस वंदन करून सुमंत्रानें सिद्ध केलेल्या रथांत बसून, तो अरण्यांत जाण्यास निघाला. सुमंत्रानें रथ हांकितांच नगरांत जो आकांत झाला, तो सांगतां येत नाहीं. राजा, त्याच्या सर्व स्त्रिया, व नागरिक लोक, रथामागें धांवूं लागले, व वारंवार सुमंत्रास हाका मारून रथ हळू हळू चालीव म्हणून ओरडूं लागले. परंतु रामानें रथ सत्वर चालूं दे म्हटल्यावरून, त्यासही, मी आतां यांत कोणाचें ऐकावें, असा विचार पडला. सारांश, त्या निबिड समुदायांतून मोठ्या कष्टानें रथ सुमंत्रानें हांकून त्वरेनें इतका दूर नेला कीं, तो दशरथ इ०कांस दिसेनासा झाला. त्यावरून दशरथ, स्त्रियांसहवर्तमान माघारा परतून कौसल्येच्या मंदिरांत येऊन दुःख करीत पडला. कौसल्या व सुमित्रा यांसही अनिवार दुःख झालें; तथापि त्यांतच सुमित्रेनें राजाचें सांत्वन करावें, परंतु दशरथाचा शोक उणा म्हणून होईचना. तो वारंवार "हा राम !" "हा लक्ष्मण !" "हा सीते !" असा दीर्घ उच्चार करून अश्रुपात करी. त्या योगानें कांहीं मूर्च्छा, कांहीं निद्रा, व कांहीं शोक, याप्रमाणें त्यानें साहा दिवस घालविलें.

तिकडे राम, लक्ष्मण, व सीता, यांस घेऊन सुमंत्र गेला, तो शृंगवेर पुरासमीप जाऊन, गंगेपलीकडे त्यांस पोहोंचवून माघारा परतला, व साहाव्या दिवशीं अयोध्येस आला. मार्गानें जे जे जन, राम कोठें आहे म्हणून पुसत, त्यांस तो गंगेपलीकडे गेले, असें सांगे. सारांश, सुमंत्र नगरांत प्रवेशून, त्यानें राजमंदिराच्या सात कक्षा उल्लंघिल्या, व ज्या कौसल्येच्या मंदिरांत दशरथ दुःख करीत पडला होता, तेथें येऊन राजास वंदन केलें. त्यास आलेला दशरथानें पाहतांच त्याला अनिवार दुःख झालें, व मला रामाकडे न्या असें सर्वांस म्हणूं लागला. सुमंत्रानें पुनः अशा अशा रीतीनें राम गेला, अमुक अमुक स्थळीं उतरला, इत्यादि सविस्तर वृत्त सांगतांच कौसल्या राजास म्हणाली, आतां हा शोक कशासाठीं करितां ? रामास वनांत पाठवितांनाच जर विचार केला असता, तर हा प्रसंग आज कशास येता ! ! तें तिचें भाषण ऐकून दशरथ म्हणाला, होणारापुढें कोणाचाच उपाय नाहीं. यावर त्यानें आपण तरुण असतां, जी एका तपस्व्याची व त्याच्या वृद्ध आणि अंध मातापितरांची, आपणास हत्या घडली होती, व त्यांनीं, तूंही पुत्रशोक होऊन असाच मरशील म्हणून शाप दिला होता, तो सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून सर्व स्तब्ध झाले. दशरथासही ग्लानि येऊन मूर्च्छित झाला. याप्रमाणें तो दिवस गेला असतां, मध्यरात्रीच्या सुमारास पुत्रवियोगदुःख सहन न होऊन एकाएकीं दशरथ राजानें "हा राम !" असें म्हणून प्राण सोडिला.

दशरथाच्या मरणानें राजमंदिरांत एकच अनर्थ झाला. जो तो कैकेयीची निर्भर्त्सना करून म्हणे कीं, येवढ्या अनर्थास तीच कारण आहे. शेवटीं वसिष्ठ तेथें येऊन, त्यांनीं सर्वांचें सांत्वन केलें, व कौसल्या सहगमनास सिद्ध झाली होती, तिचें निवारण करून, राजाचें प्रेत तैलद्रोणींत प्रधानाकडून ठेवून, भरतास आणावयाकरितां पांच मंत्री पाठविले. त्याप्रमाणें ते भरतास घेऊन आल्यावर, त्यानें दशरथाचें उत्तरकार्य, वसिष्ठाज्ञेनुरूप सर्व यथाविधि केलें ( ५ भरत श० पहा ).

**दशशतनेत्र**–इंद्रास नांव ( भार० शांति० अ० ११२ ).

**दशारण्य**–अरण्यवि० ( पितृवर्ती श० पहा ).

**दशार्ण**–भारतवर्षीय देश. याचे इंद्रप्रस्थ मध्य धरून, पूर्वपश्चिम दिशाभेदानें दोन भेद या ग्रंथांत मानिले आहेत. ते त्या त्या अक्षर क्रमांत पाहावे.

**दशार्णा**–भारतवर्षीय नदी ( ऋष्यवान् श०पहा ).

**दशार्ह**–(सो० वं०) यदुपुल क्रोष्टा तत्कुलोत्पन्न ज्यामघराजाच्या वंशांत जन्मलेल्या निर्वृत्ति अ० विदूरथ राजाचा पुत्र. यास दाशार्ह नामांतरानें व्योम ना० पुत्र होता.

**दशावर**–वरुणलोकांतील एक असुर.

**दशाश्व**–( सू० वं० ) इक्ष्वाकुराजाच्या शतपुत्रांतील एक. हा माहिष्मती नगरींत राहात असून, यास मदिराश्व ना० पुत्र होता ( भार० अनु० अ० २ ).

**दशाश्वमेध**–वाराणसीसंबंधीं तीर्थवि०.

**दंष्ट्र**–लंकेंतलि नामांकित राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

**दस्र**–आश्विनेयांतील दुसरा ( आश्विनेय श० पहा ).

**दहन**–१ ( एकादशरुद्र श० पहा ).

२–पाकक्रियेस प्रशस्त जो अग्नि त्यास नांव.

**दक्ष**–स्वायंभू मन्वंतरांत जे ब्रह्मदेवानें दश मानसपुत्र निर्माण केले होते त्यांतील एक. हा ब्रह्मदेवाच्या दक्षिणांगुष्ठापासून उत्पन्न झाला असून, संपूर्ण प्रजापतींचा अधिपती होता. स्वायंभू मनूनें आपल्या तीन कन्यांतील जी **प्रसूति**, ती यास भार्यार्थ दिली असतां यानें तिच्या ठायीं **श्रद्धा, मैत्री, दया, शांति, तुष्टि, पुष्टि, क्रिया, उन्नति, बुद्धि, मेधा, तितिक्षा, ऱ्ही, मूर्त्ति, स्वाहा, स्वधा** आणि **सती**, अशा सोळा कन्या निर्माण करून, व श्रद्धेपासून मूर्तीपर्यंत क्रमानेंच तेरा, धर्मऋषीस, देऊन, अवशेष तीन राहिल्या. त्यांतील अग्नीस स्वाहा, पितरांस स्वधा, आणि भवास सती, याप्रमाणें दिल्या.

हा दक्ष, एके काळीं शिवलोकास गेला असतां, तेथें शिवानें याचा अभ्युत्थानपूर्वक सत्कार केला नाहीं. तेवढ्यावरून यास क्रोध येऊन, यानें त्याची बहुत निंदा केली; परंतु शिवांनीं तें कांहींच मनास न आणून भाषणच न केल्यामुळें, हा तेथून उठून गेला, व त्या दिवसापासून त्याचा, व तत्संबंधानें सतीचा, पराकाष्ठेचा द्वेष करूं लागला.

एकदां यानें मोठा यज्ञ आरंभून, भव आणि सती याशिवाय, सर्वांस पाचारण केलें. त्यावरून बहुतेक देव, आणि ऋषि तेथें प्राप्त होऊन यज्ञास आरंभ झाला. हें वृत्त सतीस कळल्यावर, तिनें पितृगृहीं जाण्याविषयीं शिवास विनंति केली. परंतु त्यांनीं सांगितलें, तूं तेथें अप्रार्थित जाऊं नयेस, जाशील तर तो तुझा अपमान करील, कधीं चुकणार नाहीं; कारण, तो माझा द्वेष अतिशयच करीत आहे. त्यावरून सती म्हणाली, अप्रार्थित पितृगृहीं जाण्यास प्रत्यवाय नाहीं, तर कृपा करून मला आज्ञा द्यावी. त्यावरून शिव, बरें तर जा, परंतु तूं निश्चयेंकरून अपमान पावशील. असें बोलून, तिजसमागमें कित्येक गण देऊन तिला त्यांनीं तिकडे जाण्याची आज्ञा दिली. तात्पर्य, सती तेथें गेली असतां, तिचा त्यानें अपमान केला. त्या योगानें तिला कोप येऊन, त्या शिवनिंदकोत्पन्न देहाचा, स्वकीय योगाग्नि चेतवून, त्यांत तिनें त्याग केला.

हें वर्तमान शिवगणांनीं, कैलासीं जाऊन शिवास कळवितांच, त्यांनीं, तेथें जाऊन दक्षास शासन करावें या उद्देशानें वीरभद्रास पाठविलें. त्यावरून तो तेथून निघून दक्षयज्ञाकडे येऊं लागला असतां, दक्षयज्ञांत एकाएकीं अनेक उत्पात होऊं लागले. असें पाहून ऋत्विज परस्परांत बोलूं लागले तें असें—

**श्लोक.**

वाता न वांति नहि संति दस्यवः प्राचीनबर्हि-
जीवतीहोग्रदंडः ॥ गावो न काल्यंत इदं कुतो
रजो लोकोऽधुना किं प्रलयाय कल्पते ॥ ८ ॥
( भाग० ४ स्कं० अ० ५ ).

अहो वारा अतिशय वहात नसतां, व प्राचीनबर्हीसारखा उग्रदंड करणारा राजा असल्यामुळें चोरांचीही भीति नसतां, ही येवढी धूळ कोठून उडाली !! बरें, अरण्यांतून गोधनें येण्यानें धूळ उडाली म्हणावी तर, त्यांचाही येण्याचा समय झाला नाहीं, तेव्हां आज प्रलय तर नाहींना ? याप्रमाणें बोलतात तों वीरभद्रास अकस्मात् सर्वांनीं पाहिलें. त्यानें येतांच सर्व ऋत्विज व देव यांची विटंबना केली आणि यज्ञाचा विध्वंस करून, दक्षाचें शिर तोडून, तें त्यानें यज्ञसंबंधी अग्नींत टाकिलें. याप्रमाणें वीरभद्राचें कर्म पाहून सर्व देव शिवास शरण गेले, व वीरभद्रास परत कैलासास आणवून, दक्षयज्ञाची समाप्ति त्यांनीं शिवाकडून करविली.

आतां हा यज्ञ कधीं झाला, व कोणत्या दक्षानें केला, त्याचा निर्णय असा कीं, स्वायंभू मन्वंतरांत हा यज्ञ झाला असून तो ब्रह्मपुत्र दक्षप्रजापतीनें केला होता, प्राचेतस दक्षानें केला नाहीं; केला म्हटल्यास तो दक्ष, बर्हिषद राजा ज्यास प्राचीनबर्हि असें म्हणत, त्याचा पौत्र असून, त्यास सती नांवाची कन्या मुळींच नव्हती. दुसरें, हा यज्ञ झाला त्या काळीं पृथ्वीवर जो प्राचीनबर्हि राजा राज्य करीत होता, तो प्राचेतस दक्षाचा पितामह म्हणावा लागेल, व तसें म्हटलें असतां, तो चक्षुर्मनूचा वंशज होऊन, हा यज्ञ चाक्षुष मन्वंतरांत झाला, असें होईल आणि तेणेंकरून " महादेवेन ऋषयः शप्ताः स्वायंभुवेंतरे " या वाक्यास विरोध येईल; कारण शाप होतांच सर्व ऋषि मरण पावले, त्यांत दक्षही मेला असें अनेक ग्रंथांत दृष्ट आहे. यास्तव मी, या कोशांत सतीच्या देहत्यागसमयींचा प्राचीनबर्हि भिन्न असें मानलें आहे व तसें मानलें तरच विरोध राहात नाहीं. याचा विचार विद्वान् करोत.

२–दाहा आंगिरसदेवांतील एक ( ३ अंगिरा श० पहा).

३–दाहा विश्वेदेवांतील एक ( विश्वेदेव श० पहा ).

४–एक देव ( ३ भृगु श० पहा ).

५–उत्तानपादवंशीय चक्षुर्मनु, तत्कुलोत्पन्न बर्हिषद, ज्यास प्राचीनबर्हि नामांतर असें, त्याचा पौत्र, व दाहा प्रचेत्यांचा पुत्र, आणि त्याच कारणामुळें यास

प्राचेतस दक्ष असें म्हटलेलें आहे. हा पूर्वीच्या दक्षांशानेंच जन्मला असून, यास पांचजनी अ० असिक्नि, आणि वीरिणी अशा दोन स्त्रिया होत्या. त्यांतून यानें पांचजनीपासून **हर्यश्वप्रमुख** दाहा सहस्र पुत्र निर्माण केले असतां, ब्रह्मपुत्र नारदानें त्यांस ब्रह्मतत्त्वोपदेश करून प्रजावृद्धिरूप कर्मापासून निवृत्त करून कोणीकडे घालविलें, त्यांचा यास ठिकाण लागला नाहीं ( मत्स्य० अ० ५ ). ( भाग० ६ स्कं० अ० ५ ).

हें वर्तमान या दक्षास कळल्यावर, त्यानें दुसरी स्त्री वीरिणी तिजपासून पुनः **शबलप्रमुख** दाहा सहस्र पुत्र निर्माण केले, त्यांचीही नारदानें तीच अवस्था केली. त्यावरून यास कोप येऊन यानें नारदास देहपाताचा शाप दिला, आणि पुनः मानसपुत्र निर्माण न करितां, मैथुन धर्मानें साठ कन्या उत्पन्न करून, **अदिति,** आदिकरून तेरा कश्यपास, **मरुत्वती** इ० दाहा धर्मऋषीस, **अश्विनी**, इ० सत्तावीस सोमास, अरिष्टनेमि ऋषीस चार, भृगुपुत्र भूतऋषीस दोन, दोन कृशाश्व ऋषीस, आणि दोन अंगिरा ऋषीस; याप्रमाणें देऊन, चालू मन्वंतरांत त्यांच्या द्वारें प्रजावृद्धि कराविली. " संकल्पाद्दर्शनात्स्पर्शात्पूर्वेषां सृष्टिरुच्यते ॥ दक्षात्प्राचेतसादूर्ध्वं सृष्टिर्मैथुनसंभवा " ॥ ( मत्स्य० अ० ५ श्लो० २ ). याप्रमाणें या दक्षाचा इतिहास आहे.

६-( सू० वं० ) नरिष्यंत राजाचा पौत्र, व चित्रसेन राजाचा पुत्र, याचा पुत्र मीढ्वान.

७-( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न उशीनर राजाच्या चार पुत्रांतील एक.

**दक्षसावर्णि**-पुढें होणारा नववा मनु. हा वरुणाच्या उदरीं जन्म पावेल, व यास रौच्य असेंही क्वचित् म्हणतील. भूतकेतु, दीप्तिकेतु, इ० यास पुत्र होऊन, पार, मरीचिगर्भ, इ० याच्या मन्वंतरांत स्वर्गामध्यें देव होत्साते, त्यांचा स्वामी अद्भुत नांवाचा इंद्र होईल तसेच द्युतिमान् इ० सप्तर्षि, व आयुष्मान्, ऋषीपासून त्याच्या अंबुधारा स्त्रीच्या ठायीं ऋषभ ना० विष्णूचा अवतार होऊन, तो इंद्राचें साह्य करील ( भाग० ८ स्कं० अ० १३ ).

**दक्षिणकर्णाटक**-कर्णाटक देशाचा एक भेद.

**दक्षिणकोसल**-इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेकडे असणारा कोसलदेश. यांत उज्जिहनी नगरी आहे.

**दक्षिणनिषाद**-निषाद देशाचा एक भेद.

**दक्षिणमत्स्य**-दक्षिणशूरसेन देशाच्या दक्षिणेकडील मत्स्य ( भार० सभा० अ० ३१ ).

**दक्षिणयवन**-यवनदेशाचा एक भेद ( भार० सभा० अ० ३१ ).

**दक्षिणशूरसेन**-शूरसेन देशाचा भेद. हा इंद्रप्रस्थानिकट असा दक्षिणेकडे पांडवांच्या वेळचा पहिलाच देश ( भार० सभा० अ० ३१ ).

**दक्षिणा**-रुचिऋषि व त्याची स्त्री आकूति त्यांची कन्या. ही यज्ञाची स्त्री असून, तिला यज्ञापासून तोष इ० बारा पुत्र झाले होते. ते स्वायंभूमन्वंतरांतील देव प्रसिद्धच आहेत. ही दक्षिणा स्वायंभुव मन्वंतरांतील इंद्राणी होय. कारण हिचा पति यज्ञ, तो त्या वेळेस स्वर्गांत इंद्र होता.

**दक्षिणाग्नि**-अग्निहोत्र्याच्या दक्षिणकुंडांतील अग्नि.

**दक्षिणामूर्ति**-शिवाचा एक ज्ञानविग्रही अवतार.

२-मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**दाकल्य**-एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**दाकायन**- " "

**दांत**-भीम राजाच्या तीन पुत्रांतील दुसरा, दमयंतीचा भ्राता.

**दांता**-एक अप्सरा.

**दानपति**-अक्रूरास नामांतर ( भाग० १० स्कं० अ० ४९ ).

**दानव**-विप्रचित्ति आदिकरून दनुपुत्र ते ( दनु० श० पहा ).

२-एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**दामघोषि** दमघोषपुत्र शिशुपाल तो.

**दामचंद्र**-भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० १५८ ).

**दामोदर**-कृष्णास नामांतर.

**दारद**-दरददेशीय राजास, व तेथील प्रजेस साधारण नांव.

**दारुक**-महिषासुराचा सारथि (देवीभा० ५ स्कं०).

२-कृष्णाचा सारथि. याला काश्यपेय असें नामांतर होतें ( २ काश्यपेय श० पहा ).

**दार्व**-भारतवर्षीय उत्तरत्रिगर्ताच्या उत्तरेकडील देश ( भार० सभा० अ० २७ ).

**दाल्भ्य**-उत्तममन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

२-द्युमत्सेन राजाचा अरण्यांतील सहचर ऋषि (भार० वन० अ० २९८ ).

**दाल्भ्यघोष**-एक ब्रह्मर्षि.

**दाशपुर**-एक नगर ( पितृवर्ती श० पहा ).

**दाशरथि**-दशरथपुत्र जे रामलक्ष्मणादिक त्यांस संज्ञा.

**दाशार्ण-दाशार्णक**-दशार्णदेशीय लोक.

**दाशार्ह**–सोमवंशीय व्योम राजास नामांतर व यदुवंशांतील एका कुलासही नांव.

२–कृष्णास कधीं कधीं म्हणत असत ( भार० द्रोण० अ० २९ ).

**दाशेरक**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा.

**दाक्षपायन**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**दाक्षायणी**–स्वायंभू मन्वंतरांतील दक्षकन्या जी सती, तिला हें नामांतर होतें.

**दाक्षि**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

२–द्वितीयार्थक अत्रिकुलोत्पन्न एक ऋषि.

**दिंडिपुण्यकर**–भारतवर्षीय तीर्थ.

**दिति**–वैवस्वत चालू मन्वंतर, यांतील ब्रह्ममानसपुत्र मरीचि ऋषि त्याची स्नुषा, कश्यपऋषीच्या तेरा स्त्रियांतील दुसरी. हिला एकच हिरण्यकशिपु मात्र आरंभीं पुत्र होता. हिरण्यकशिपु मेल्यावर मरुद्गण झालेले देवांत मिसळले, दैत्य झाले नाहींत. नंतर वज्रांग ना० दैत्य हिला पुत्र झाला होता. हिला हिरण्याक्ष झाल्याचें भारतांत नाहीं.

**दित्स**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**दिनकर**–सूर्यास दिवस करण्यानें नांव. अशा अर्थाचीं, हीं नांवें पुष्कळ आहेत.

**दिलीप**–(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंशुमान् राजाचा पुत्र. हा पित्याच्या मागें राज्याधिकारी झाला असतां, सगरांचा उद्धार करण्यासाठीं गंगा आणावी म्हणून, यानें तीस सहस्र वर्षे तप केलें होतें. परंतु ती सिद्धि यास न होतां हा मरण पावला. यास सुदक्षिणा ना० स्त्री व पुत्र भगीरथ होता ( वा० रा० बाल० स० ४२ ). ( मत्स्य० अ० १२ ). यावरून, पूर्वीं एकादें कार्य एकाद्यानें आरंभलें, व तें त्याच्या हातून सिद्धीस न गेलें, तर त्याचा पुत्र तें हातीं धरून शेवटास लावी असें स्पष्ट दिसतें.

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न खट्वांग राजा, त्यास नामांतर.

३–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, त्याच्या जन्हु ना० वंशांत जन्मलेल्या ऋष्य राजाचा पुत्र, यास प्रतीप नांवाचा पुत्र होता.

**दिवस्पति**–देवसावर्णि मन्वंतरांत स्वर्गांत होणारा तेरावा इंद्र.

**दिवाक** अ० **दिवाकर**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न भानु राजाचा पुत्र. याचा पुत्र सहदेव.

**दिवावष्टाश्व**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**दिविरथ**–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न खनपान राजाचा पुत्र. याचा पुत्र धर्मरथ अ० बृहद्रथ.

**दिवोदास**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

२–( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध राजा, त्याच्या काश्य ना० पौत्राच्या वंशांतील भीमरथ अ० भीमसेन राजा, त्याचा हा पुत्र. यास ययातिकन्या माधवी, तिजपासून प्रतर्दन ना० पुत्र झाला होता ( ३ गालव श० पहा ).

३–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, त्याच्या नील ना० पुत्राच्या वंशांत जन्मलेल्या विंध्याश्व राजाचा पुत्र, यासह जन्म पावलेली याची भगिनी अहल्या असून, मैत्रायण आणि मित्रयु, असे यास दोन पुत्र होते.

४–काशीपति सुदेव राजाचा पुत्र, याचें दिवोदास असें नांव असतांही,यास पित्याच्या नांवावरून सौदेव असेंही म्हणत असत. यानें इंद्राच्या अनुग्रहावरून, भागीरथीच्या उत्तरतीरीं व गोमतीच्या दक्षिणतीरीं वाराणसी ना० पुरी निर्माण करून, तेथें वास्तव्य केलें होतें. यास हैहयकुलोत्पन्न राजांनीं, अतिशय त्रास दिला त्यावरून हा भारद्वाज ऋषीस शरण गेला, व प्रार्थना करून म्हणाला कीं, हैहयांस जिंकील असा मला पुत्र व्हावा. तेव्हां भरद्वाजानें पुत्रकामेष्टि करवून, यास प्रतर्दन नांवाचा पुत्र उत्पन्न करून दिला. त्यानें पुढें हैहय राजांस जिंकून यास सुखी केलें (२ प्रतर्दन श० पहा ).

**दिव्य**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वत राजाच्या पुत्रांतलि एक.

**दिव्यकटपुर**–अमर पर्वताच्या दक्षिणभागचें नगर.

**दिशा**–भारतवर्षीय नदी.

**दिष्ट**–( सू०वं० ) वैवस्वत मनूच्या पुत्रांतील एक. याचा पुत्र नाभाग.

**दीप्तिकेतु**— होणाऱ्या दक्षसावर्णि मनूच्या पुत्रांतील एक.

**दीप्तिमान्**–( सो० वं० ) कृष्णास रोहिणीपासून झालेला पुत्र.

२–होणाऱ्या सावर्णि मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

**दीप्तोद**–भारतवर्षीय तीर्थ.

**दीर्घ**–पंडुराजानें मारिलेला मगधदेशीय राजा.

**दीर्घजिव्ह**–दानव ( दनु श० पहा ).

२–पातालांतील एक नाग ( जैमि० अश्व० अ० ३८ ).

**दीर्घजिव्हा**–अशोकवनिकेंतील एक राक्षसी.

**दीर्घतमस्**–गौतमांगिरसांतील एक कुल ( ३ अंगिरा श० पहा ).

**दीर्घतमा**–एक ब्रह्मर्षि. हा उशिज ऋषीस ममता ना० स्त्रीच्या ठायीं झालेला पुत्र. हा चालू मन्वंतरांतल्या बृहस्पतीचा भ्रातृव्य ( पुतण्या ) असून, जन्मांध जन्मला होता. यास प्रद्वेषी नांवाची स्त्री होती, व यापासून सोमवंशीय अनुकुलोत्पन्न बलिराजा, त्यानें आपल्या क्षेत्रांत, **अंग, वंग, कलिंग, सुह्म, पुंड्र** आणि **अंध्र**, असे सहा पुत्र निर्माण करविले होते. ( यासंबंधीं कथा विलक्षण असल्यामुळें, मी, ती येथें घेतली नाहीं ). याशिवाय दासीपुत्रही कित्येक होते.

२–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न क्षत्रवृद्धवंशीय राष्ट्र राजाचा पुत्र. याचा पुत्र धन्वंतरि राजा.

**दीर्घदंष्ट्र**–एक रुद्रगण.

**दीर्घप्रज्ञ**–दुर्योधनपक्षीय भारती युद्धांतील राजा (भार० आदि० अ० ६७ ).

**दीर्घबाहु**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न खट्वांग राजाचा पुत्र, याचा पुत्र रघुराजा.

२–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**दीर्घलोचन**–धृतराष्ट्रशतपुत्रांतलि एक.

**दीर्घसत्र**–भारतवर्षीय तीर्थ.

**दीर्घायु**--भारती युद्धांतलि दुर्योधनपक्षीय अच्युतायु राजाचा पुत्र.

**दुंदुभि**–मायासुरास, हेमा अप्सरेपासून झालेल्या दोन पुत्रांतील दुसरा ( वा० रा० उत्तर० स० १२ ). यानें दीर्घतप करून, सहस्रावधि नागांचें बल प्राप्त करून घेतल्यावर भयंकर महिषाचें रूप धारण केलें, व समुद्रापाशीं युद्ध करण्यास गेला. तेव्हां समुद्रदेवता यास म्हणाली, मी तुशीं युद्ध करण्यास समर्थ नाहीं, यास्तव तूं हिमालयाकडे जा. त्यावरून हा तेथून निघून हिमालयाकडे जातांच, त्यानेंही असेंच उत्तर दिलें, व सांगितलें कीं, किष्किंधा नगरीचा राजा वाली आहे, त्याकडे तूं जा. तें ऐकून हा तत्काल तेथें गेला, व मोठ्यानें गर्जना करून, युद्धाविषयीं यानें वालीस चेतविलें. वालीनें याची गर्जना श्रवण करून, इंद्रदत्तमाला कंठांत धारण केली, व याशीं युद्धार्थ किष्किंधेबाहेर आला. त्या कालीं याचें व त्याचें दीर्घकालपर्यंत घोर युद्ध होऊन, त्यांत यास वालीनें मारिलें. नंतर याचें शरीर उचलून फेंकिलें असतां, तें मतंगऋषीच्या आश्रमांत पडून, तो आश्रम व त्या आसमंताद्भागींचा योजनमात्र प्रदेश, रक्तानें पूर्ण होऊन, अनेक वृक्षांचाही नाश झाला. तें पाहून ऋषीनें वालीस शाप दिला कीं, इतःपर वाली, या आश्रमांत आल्यास तत्काल मृत होईल. हा शाप वालीस कळतांच, तो शापाच्या परिहारार्थ त्याकडे गेला; परंतु त्यानें त्यास दर्शनच दिलें नाहीं. तेव्हांपासून वालीस हा आश्रम अगम्य झाला होता. ( या आश्रमाचें स्थान ऋष्यमूक पर्वत ). सारांश, दुंदुभीचें प्रेत शुष्क होऊन, त्याचा अस्थिपंजर तेथें अनेक वर्षे पडला असतां, रामचंद्राचें सुग्रीवाशीं ज्या कालीं अग्निसाक्षिक सख्य झालें, त्या कालीं आपल्या सामर्थ्याचा प्रत्यय सुग्रीवास दाखविण्याकरितां, त्यानें तो आपल्या पदांगुष्ठानें दहा योजनें उडविला होता ( वा० रा० किष्किं० स० ११ ).

२–एक गंधर्वी. ही ब्रह्मदेवाच्या आज्ञेस्तव अयोध्येमध्यें मंथरा अशा नांवानें कैकेयीची दासी झाली होती ( भार० वन० अ० २७६ ).

३–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वत राजा, त्याच्या अंधक ना० पुत्राच्या वंशांतील, जो अनुपुत्र अंधक, त्याचा हा पुत्र. यास अरिद्योत नांवाचा पुत्र होता.

**दुःप्रहर्ष**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**दुराराधन**— ,, ,,

**दुरितक्षय**—( सो० वं० ) पुरुकुलोत्पन्न भरतवंशीय महावीर्य राजाचा पुत्र. यास त्र्य्यारुणि, कवि आणि पुष्करारुणि असे तीन पुत्र होते.

**दुर्ग**—हिरण्याक्षाच्या वंशांतील रुरु दैत्याचा पुत्र. यास दुर्गम असेंही नामांतर आहे ( १ दुर्गा श० पहा ).

**दुर्गंधा**—शंतनु राजाची स्त्री सत्यवती, तिचें मूळचें नांव.

**दुर्गम**—एक रुद्रगणवि०.

२—दुर्ग ना० असुराचें नामांतर.

**दुर्गमा**—भारत वर्षीय नदी ( विंध्य श० पहा ).

**दुर्गा**—दुर्ग अ० दुर्गमासुर यानें उग्र तप करून ब्रह्मदेवास प्रसन्न केलें, आणि वर मागितला कीं, संपूर्ण वेद मला यावेत. त्यास ब्रह्मदेवांनीं तथास्तु म्हणतांच; ते सर्व त्यास स्फुरद्रूप होऊन, ब्राह्मणमात्रांस त्यांची विस्मृति झाली, हें त्यांत विशेष झालें. त्या योगानें यज्ञादिक कर्में होईनातशा होऊन, देवांस हविर्भाग मिळेनासा झाल्यामुळें, त्यांची शक्ति क्षीण होऊन,

पृथ्विवर अनावृष्टि झाली. दुर्गमानें सर्व देवांची स्थानें हरण केली असतां, त्यांनीं आदिशक्तीचें आराधन आरंभिलें. त्या काळीं त्या सर्वांस शक्ति प्रत्यक्ष होऊन वर मागा असें म्हणूं लागली असतां, अशक्तपणामुळें त्यांच्यानें काहींच बोलवेना. असें पाहून तिनें त्यांकडेस शतावधि नेत्रांनीं दयार्द्रदृष्टीनें पाहिलें, व हस्तांतील अनेक शाकांनीं त्यांचें भरण करून ग्लानि दूर केली, म्हणून हिला शताक्षी व शाकंभरी अशीं नांवें पडलीं. सारांश, पुढें आदिशक्तीनें याचा वध केला. तेव्हांपासून तिला दुर्गा असें नांव पडलें (देवीभा० ७ स्कं० अ० २८ ).

२–भारतवर्षीय नदी.

**दुर्गालदेश**–भारतवर्षीय देश (भार० भीष्म० अ० ९ ).

**दुर्जय**–दनुपुत्र दानवांतील एक.

२–सूर्यवंशीय इक्ष्वाकुपुत्र दशाश्व, तत्कुलोत्पन्न सुवीर राजाचा पुत्र. याचा पुत्र दुर्योधन ( भार० अनु० अ० २ ).

३–या नांवाचा एक रुद्रगण.

४–खर राक्षसाच्या अमात्यांतील एक ( १ खर० श० पहा ).

५–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

६–कर्णानें भारती युद्धांत मारलेला पांडवपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ५६ ).

७–दुर्योधनपक्षीय एक राजा ( भार० आदि० अ० ६७ ).

**दुर्जया**–इल्वल आणि वातापि यांची नगरी. हिला मणिमती असें नामांतर होतें.

**दुर्दमन**–( सो० वं० ) पांडवकुलोत्पन्न शतानीक राजाचा पुत्र. याचा पुत्र वहीनर राजा.

**दुर्धर**–असुरवि०. ( २ महिषासुर श० पहा ).

२–रावणाच्या प्रधानांतील एक राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ४९ ).

३–रामसेनेंतील एक पराक्रमी वानर ( वा० रा० युद्ध० स० ३० ).

**दुर्धर्ष**–मारुतीनें मारिलेला रावणाचा सेनापती ( वा० रा० सुंदर० स० ४६ ).

२–रामानें मारिलेला रावणपक्षीय नामांकित राक्षस ( वा० रा० युद्ध० स० ९ ).

३–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**दुर्बुद्धि**–धृतराष्ट्र ना० नागाचा पुत्र(बभ्रुवाहन श० पहा).

**दुर्मद**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न हैहय राजा, तद्वंशीय भद्रसेनक अ० रुद्रश्रेण्य राजाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ.

२–वसुदेवास पौरवीपासून झालेल्या १२ पुत्रांतील एक.

३– वसुदेवास रोहिणीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

४–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**दुर्मना**–( सो० वं० ) ययातिपुत्र द्रुह्यु, तद्वंशीय धृत राजाचा पुत्र, याचा पुत्र प्रचेता.

**दुर्मर्ष**–समुद्रमंथनकालीं देवांशीं युद्ध करणारा एक असुर ( भाग० अष्टम० अ० १० ).

**दुर्मर्षण**–( सो० वं० ) वसुदेवाचा बंधु सृंजय त्यास राष्ट्रपाली भार्येपासून झालेल्या दोन पुत्रांतील एक.

२–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक. हा महारथी होता.

**दुर्मुख**–कद्रुपुत्र एक नाग.

२–वरुणसभेंतील एक असुर.

३–रामानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० युद्ध० स० ९ ).

४–रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० युद्ध० स० ३० ).

५–पांडवपक्षीय जनमेजय पांचालाचा पिता ( भार० द्रोण० अ० १५८ ).

६–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

७–महिषासुरपक्षीय एक असुर.

**दुर्मुखी**–अशोकवनिकेंतील एक राक्षसी.

**दुर्योधन**–सूर्यवंशीय दुर्जय राजाचा पुत्र. यास नर्मदानदीच्या मूर्तिमान् देवतेनें वरिलें असतां, तिच्याठायीं यापासून सुदर्शना ना० कन्या झाली होती, ती यानें अग्नीस दिली ( भार० अनु० अ० २ ).

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न धृतराष्ट्रराजा, त्यास गांधारीपासून झालेल्या शतपुत्रांतील ज्येष्ठ. भूमीवरील दुष्ट क्षत्रियांचा नाश होण्यास निमित्तभूत असा हा, कलीच्या अंशानें जन्मला होता ( भार० आदि० अ० ६७ ). याच्या जन्मकालीं अनेक दुश्चिन्हें झालीं होतीं, त्यावरून विदुरानें याचा त्याग करण्यास धृतराष्ट्रास सुचविलें असतां, यानें पुत्रमोहेंकरून तें त्याचें म्हणणें ऐकिलें नाहीं. म्हणून सर्वांस जाणवलें होतें कीं, कुलाचा नाश समीप आला आहे.

दुर्योधनानें, द्रोणाचार्यापासून धनुर्विद्या संपादन केली होती, व तींत जरी तो चांगला प्रवीण होता, तरी गदायुद्धांत त्याचें नांव विशेष प्रख्यात असे. हा बाल्यावस्थेपासूनच पांडवांचा द्वेष करूं लागला व भीमसेनास तर यानें विषयुक्त अन्नाचें भोजन घालून नदींतच बुडविलें ( १ आर्यक श० पहा ). पुढें त्यांतून भीम वांचला असें यानें पाहून, सर्व पांडवांस लाक्षागृहांत ठेवून दग्ध करण्याचा विचार केला;

परंतु तोही सिद्धीस गेला नाहीं ( भार० आदि० अ० १४१-१४३ ). हें वर्तमान धृतराष्ट्रास कळल्यावर, व पांडवांस स्वयंवरांत द्रौपदी प्राप्त झाली असें समजल्यावर, त्यांस त्यानें हस्तिनापुरास आणून, इंद्रप्रस्थीं ठेविलें; परंतु तें यास अगदीं रुचलें नाहीं.

धृतराष्ट्राच्या आज्ञेनुरूप पांडव इंद्रप्रस्थीं राहिले असतां तेथें त्यांनीं स्वपराक्रमानें अपारसंपत्ति मिळवून राजसूय नांवाचा मोठा यज्ञ केला. त्यावेळेस हा तेथें धृतराष्ट्रासमागमें बंधूंसहवर्तमान गेला असतां, कृष्णानें याकडेस कोशागाराचा आधिकार दिला होता. त्यावरून यानें द्वेषेंकरून, तूट पडावी या हेतूनें जरी द्रव्याचा अपरिमित व्यय केला, तरी तें सरलें नाहीं; तेणेंकरून, व मयासुरानें त्यास करून दिलेली सभा, तिचें ऐश्वर्य अवलोकन करून, यांस पांडवांच्या संपत्तीविषयीं अनिवार्य आभिलाषबुद्धी उत्पन्न झाली. तथापि ती गुप्त असून वृद्धिंगत होण्यास कारण झालें तें असें:—राजसूययज्ञ समाप्त झाल्यावर, एकदां संपूर्ण मयसभा सावकाशपणें अवलोकन करावी, अशा हेतूनें दुर्योधन हा, आपल्या कित्येक मित्र व बंधूंसहित तींत प्रवेशला;परंतु तिजमध्यें मयासुरानें जलाच्या ठायीं स्थल, स्थलाच्या ठायीं जल, भित्तीच्या ठायीं द्वार, द्वाराच्या ठायीं भित्ति ( भिंत ) असें भान होण्याचें जें चातुर्य केलें होतें, तें यास विदित नसल्यामुळें, एके स्थलीं यास जलाची भ्रांति होऊन, हा आपलीं वस्त्रें सांवरून चालूं लागला. तसेंच वास्तविक जल असतां, तेथें स्थलाची भ्रांति होऊन त्यांत पडला. तें पाहून द्रौपदी आदिकरून कित्येक स्त्रियांस हास्य आलें, तेणेंकरून यास मरणाहूनही अधिक दुःख झालें. इतक्यांत भीमसेन तेथें येऊन त्यानें यास नूतन वस्त्रें दिलीं, व अमुक मार्गानें जाऊन सर्व सभा पहा, असें सांगितलें. त्यावरून यानें सर्व सभा पाहिली, परंतु स्त्रिया आपणास हंसल्या तें शल्य याच्या हृदयांत राहून गेलेलें उणें झालेंच नाहीं. शेवटीं हस्तिनापुरास जाण्यास धृतराष्ट्र निघाला असतां, बंधूंसहवर्तमान हाही त्यांसमागमें पांडवांपासून सन्मान पावून परत गेला.

हस्तिनापुरास आल्यावर, यास ध्यानीं मनीं पांडवांची संपत्तिच दिसूं लागली, व तिचें हरण कोणत्या प्रकारें करावें त्याच्या चिंतनानें हा दिवसेंदिवस कृश होत चालला. हें धृतराष्ट्रास समजल्यावर त्यानें यास बहुत प्रकारांनीं उपदेश केला कीं, पांडवांच्या संपत्तिविषयीं तुला असा हेवा करणें योग्य नाहीं, त्याप्रमाणें तूं स्वपराक्रमानें संपत्ति मिळवून त्यांस आपलें ऐश्वर्य दाखवावेस हें योग्य होय. परंतु तें सांगणें यास कांहींच मानलें नाहीं. शेवटीं शकुनीनें असा विचार काढिला कीं, कपटद्यूतांत माझी गति चांगली आहे, आणि युधिष्ठिरही द्यूतक्रीडाप्रिय असून, तीविषयीं त्यास कोणी बोलाविल्यास नाहीं न म्हणणें असें त्याचें व्रत आहे, यास्तव त्यास येथें बोलावून आणविशील तर, मी त्याची सर्व संपत्ति हरण करून तुला साध्य करून देतों. हा विचार कर्णादिकांस मान्य होऊन त्यांच्या संमतानें यानें धृतराष्ट्रांकडून पांडवांस हस्तिनापुरास आणविलें, व कपटद्युतमिषानें शकुनीकडून त्यांची मयसभेसहित सर्व संपत्ति हरण करविली. द्रौपदीसहित पांडव, युधिष्ठिरानें पणास लावून त्यांसही हरविलें. त्या काळीं भीष्मद्रोणादिकांनीं, त्या द्यूताचा बहुत निषेध केला, परंतु त्यांचें दुर्योधनानें ऐकिलें नाहीं. इकडे युधिष्ठिराचा भीमसेनास अनिवार क्रोध आला, व त्यानें सहदेवास अग्नि आणण्याची आज्ञा करून, युधिष्ठिराचे हस्त दग्ध करण्याचा विचार मांडिला. तो पाहून अर्जुनानें त्याचें सांत्वन केलें, आणि म्हटलें, असें करणें योग्य नाहीं म्हणून भीमसेन स्तब्ध बसला. सारांश, द्रौपदीस सभेंत आणून यानें तिची विटंबना केल्यावर, द्वादश वर्षेंपर्यंत वनवास, आणि एक वर्ष अज्ञातवास, पांडवांनीं करावा, अज्ञातवासांत प्रगट झाल्यास पुनः बारा वर्षें वनवास करावा, अशा संकेतानें त्यांस अरण्यांत घालविलें, व आपण सर्व संपत्तीचा निष्कंटक उपभोग घेऊं लागला.

पांडव अरण्यांत गेल्यावर, यानें, आपणास सर्वांनीं चांगलें म्हणावें या हेतूनें, अतिशयं उत्तम नीतीनें राज्य केलें; परंतु पांडवांचा होईल तितका नाश करण्याची यास अलंबुद्धि नव्हती म्हणून, ते कोठें असतात, व काय करितात, त्याचा हा निरंतर गुप्त शोध ठेवी. एकदां पांडव द्वैतवनांत आहेत असें यानें जाणून, घोषयात्रेचें ( गोधनअवलोकनार्थ गमनाचें ) निमित्त धृतराष्ट्रास सांगून कर्ण, शकुनि, दुःशासन, इत्यादिंकांसहित तेथें गमन केलें, व गायी, वत्स, वृषभ, इ० कांची संख्या करणें झाल्यावर, द्वैतवनासमीपच्या एक्या सरोवरावर जलक्रीडा करण्यास गेला. त्यापूर्वींच तेथें, पांडवांस यापासून अपाकार न व्हावा म्हणून, इंद्रानें चित्रसेन गंधर्वास पाठविलें होतें. त्यामुळें याची व त्याची ऐतीच गांठ पडली. तेव्हां चित्रसेनानें दूतांसमागमें दुर्योधनास सांगून पाठविलें कीं, मी या सरोवरावर स्त्रियांसहवर्तमान क्रीडा करीत आहे, तर

तूं येथें येऊं नयेस. परंतु गंधर्वदूतांचा यानें अतिक्रम करून, उलट संदेश ( निरोप ) पाठविला कीं, तूंच या वनांतून सत्वर निघून जा. न जाशील तर राजा दुर्योधनाशीं प्रसंग आहे. त्यावरून चित्रसेनास क्रोध येऊन, तो याच्यावर युद्धार्थ चालून आला असतां, उभयतांचें मोठ्या निकराचें युद्ध झालें. गंधर्वांनें यांचे व कर्णानें गंधर्वांचे बरेच सहचर मारिलें, तथापि शेवटीं गंधर्वांनें कर्णास पळवून इतरांच्या पराभवपूर्वक दुर्योधनास बद्ध करून नेलें (भार० वन० अ० २४२).

कर्णादिकांचा पराभव होऊन ते पळाल्यामुळें, व दुर्योधन बद्ध झाल्यामुळें, अवशिष्ट सहचर अरण्यांत इतस्ततः हिंडत असतां, त्यांस पांडव भेटले. तेव्हां त्यांनीं त्यांस झालेलें सर्व वृत्त कळविलें. तें ऐकून भीमसेन म्हणाला,जें आम्हास इष्ट होतें तेंच चित्रसेनानें केलें; परंतु युधिष्ठिरास दया येऊन तो भीमास बोलला कीं, अशा भाषणाचा हा समय नव्हे, तर तूं व अर्जुन सत्वर जाऊन, चित्रसेनापासून दुर्योधनाची तुम्ही उभयतांनीं सुटका होईल असें करावें. त्यावरून निरुपाय होऊन भीमार्जुन चित्रसेनाकडे गेले. तेव्हां चित्रसेन म्हणाला, तुम्ही येथें कशाकरितां आला ? इंद्रानें तर मला तुमच्याच संरक्षणार्थ पाठविलें; कारण दुर्योधन हा तुम्हांस अपाकार करावा. अशाच बुद्धीनें आला होता. यास्तव मीं यास बद्ध केलें तें योग्यच आहे असें जाणून, तुम्हीं परत जावें हेंच बरें. तें चित्रसेनाचें भाषण ऐकून अर्जुन म्हणाला, तूं म्हणतोस तें सर्व सत्य आहे; परंतु युधिष्ठिराची आज्ञा जशी आम्हास वंद्य आहे, तशीच तुला असावी. यास्तव दुर्योधनास मुक्त करून तूं स्वस्थलीं गमन कर. हें म्हणणें चित्रसेन ऐकेना. त्यावरून अर्जुनाचें व त्याचें युद्ध होऊन चित्रसेन पराभव पावला असतां तो अर्जुनास म्हणूं लागला कीं, बरें तर तूं म्हणतोस तसेंच कां होईना ? परंतु मी दुर्योधनास युधिष्ठिरासमीप मुक्त करीन. असें म्हणून तो दुर्योधनास घेऊन भीमार्जुनासहित युधिष्ठिराकडे आला, व तेथें त्यानें दुर्योधनास मुक्त करून, युधिष्ठिराच्या आज्ञेनें परत गेला. तो जातांच, युधिष्ठिर बोलला, दुर्योधना, तुला असें करणें अगदीं अनुचित आहे. यास्तव झाली गोष्ट ती बरीच झाली, परंतु तूं इतःपर अशा साहसकर्मास प्रवृत्त होत जाऊं नको. असें म्हणून त्यानें यास हस्तिनापुरास जाण्याची आज्ञा दिली ( भार० वन० अ० २४४-२४६ ).

याप्रमाणें दुर्योधन अपमान पावून, युधिष्ठिरास वंदन करून, परमलज्जेनें तेथून निघाला तो हस्तिनापुराकडे चालला. इतक्यांत कर्ण, दुःशासन व शकुनि, इत्यादिक आसमंतात् होतेच त्यांनीं येऊन यास गांठिलें, व याचें सांत्वनही बहुतप्रकारें केलें कीं, वेळेचा गुण, कसें झालें असेल तें असो; नाहींतर आम्ही समीप असतां, असें होऊं नये. परंतु दुर्योधन म्हणाला, मी प्राणत्यागाचा निश्चय केला आहे, तो आतां फिरणार नाहीं, तर तुम्हीं सर्वांनीं हस्तिनापुरास जावें. असें म्हणून यानें अग्नि प्रज्वलित केला आणि त्या सन्मुख दर्भासन घालून अग्नींत उडी टाकण्याच्या उद्देशानें त्यावर ध्यानस्थ झाला. इतक्यांत त्यास स्वप्नाप्रमाणें भास झाला तो असा.-(भार० वन० अ० २४७-२४९ ).

दुर्योधन ध्यान करीत असतां, त्यांत त्यास स्वप्नाप्रमाणें कित्येक असुर भासमान होऊन ते असें म्हणूं लागले, हे दुर्योधना, तूं पांडवांच्या नाशाविषयीं दृढमति धारण कर, आम्ही तुझें साह्य करूं. नरकासुर आदिकरून जे असुर मृत झाले आहेत, ते सर्व भीष्म, द्रोण, कर्ण. इत्यादिक स्वपक्षीय वीरांच्या शरीरांत शिरलेच आहेत, तसेच कांहीं असुर संशप्तक होऊन, क्षत्रियरूपानें पृथिवीवर जन्मले आहेत, ते तुझें साह्य करून, पांडवांस मारतील, यास्तव मरणापासून तूं निवृत्त हो. इतकें बोलून ते अंतर्धान पावले असतां, दुर्योधन जागृताप्रमाणें ध्यानांतून सावध झाला, आणि त्यास त्यापासून कांहीं धैर्य येऊन, तो, हा स्वप्न कोणापाशींही न सांगतां, कर्णादिकांसहवर्तमान हस्तिनापुरास मोठ्या उल्हासानें प्रविष्ट झाला ( भार० वन० अ० २४७-२५२ ).

दुर्योधन हस्तिनापुरांत असतां, पांडवांचा नाश कसा होईल याचेंच तो सर्वकाळ चिंतन करीत असे. तों एकदां असें झालें कीं, दुर्वास ऋषि आपल्या अयुत शिष्यांसहित हस्तिनापुरीं सहजगत्या प्राप्त झाला. त्याची यानें अत्यंत कठिण अशी दीर्घकालपर्यंत सेवा केली. त्यावरून दुर्वास प्रसन्न होऊन, यास वर माग असें म्हणाला असतां, यानें कर्ण, शकुनि इत्यादिकांच्या अनुमतानें असा वर मागितला कीं, आपण येथें जसें अतिथि आला, तसेंच शिष्यांसहित पांडवांकडे काम्यक वनांत जावें, व द्रौपदीचें भोजन झाल्यावर अन्न मागून त्यांचा छल करावा. हें ऐकून दुर्वासास बरें वाटलें नाहीं; परंतु निरुपाय होऊन, तो काम्यक वनांत गेला, व तेथें त्यानें संकेतानुरूप अन्नाची

याचना केली. ती त्यांनीं पुरविल्यामुळें, पांडव दुर्वासापासून अपकार न पावतां, दुर्वासानें स्वस्थळीं गमन केलें ( २ दुर्वासा श० पहा ).

एकदां दुर्योधन, कर्णादिकांसहित सभेंत पांडवांची निंदा करीत बसला आहे तों, तेथें भीष्म प्राप्त झाला, व त्यानें पांडवांची निंदा ऐकून सर्वांचा पराकाष्ठेचा धिक्कार केला, तथापि त्यांत कर्णाची इतकी निर्भर्त्सना केली कीं, त्यास क्रोध येऊन तो दिग्विजयासच गेला, आणि अनेक राजे जिंकून, त्यानें अपरिमित द्रव्य आणून दुर्योधनास सांगितलें, तूंही पांडवांप्रमाणें राजसूय यज्ञ कर. त्यावरून दुर्योधनानें पुरोहितास बोलावून यज्ञाचा विचार पुसला. तेव्हां त्यानें व इतर ब्राह्मणांनीं सांगितलें कीं, तुझ्या कुलांत हा यज्ञ युधिष्ठिरानें केला असून, तो विद्यमान असल्यामुळें त्याचा अधिकार तुला राहिला नाहीं, यास्तव तूं दुसरा एकादा यज्ञ कर. त्यावरून कोणता यज्ञ करावा, हा विचार होतां होतां, विष्णुयाग करण्याचें सर्वानुमतें ठरलें ( भार० वन० अ० २५३–२५४ ).

नंतर यज्ञाची सिद्धता करून ब्राह्मणांस आमंत्रणें केलीं, व सुवर्णाच्या नांगरानें यज्ञभूमीची सिद्धता करून यज्ञास आरंभ झाल्यावर, यज्ञास पांडवांनीं यावें म्हणून त्यांस बोलावण्यासाठीं यानें वनांत दूत पाठविला. तो दूत तेथें जाऊन यज्ञास चलावें, असें युधिष्ठिरास म्हणूं लागला असतां, त्यानें दूतास उत्तर केलें कीं, आम्ही यज्ञास यावें हें खरें, परंतु तेरा वर्षे पूर्ण झाल्याशिवाय आम्हांस येतां येत नाहीं, म्हणून आम्ही येत नाहीं, एऱ्हवीं दुर्योधन यज्ञ करतो त्याचा आम्हांस संतोष आहे, असें तूं त्यास सांग. त्यावरून दूत परत जाण्यास निघाला असतां, भीमसेनानें त्यास हाक मारून सांगितलें कीं, तेरा वर्षे पूर्ण झाल्यावर युद्धयज्ञ होणार आहे, त्यासमयीं शस्त्रास्त्ररूप अग्नींत दुर्योधनाची आहुति होण्याच्या प्रसंगापूर्वींच आम्ही तेथें येऊं, बोलावण्याची वाट पाहणार नाहीं, असा सर्व कौरवांस माझा निरोप सांग. त्याप्रमाणेंच दूतानें येऊन दुर्योधनास कळविलें. सारांश, या निरोपानें दुर्योधन विमनस्क जरी झाला, तरी त्यानें विष्णुयाग यथासांग शेवटास लावून, संपूर्ण ब्राह्मणांस अपार धनवस्त्रादिकेंकरून गौरवून मार्गस्थ केलें ( भार० वन० अ० २५५–२५६ ).

पांडव द्वादशवर्षें वनवास करून, अज्ञातवासार्थ विराटगृहीं राहिले असतां, यास, कीचकवधावरून तेथें ते असल्याचा संशय आला. तेव्हां अज्ञात त्यांस आपण ओळखून काढिल्यास, पुनः बारा वर्षें वनवासास घालविण्यास नीट पडेल. या हेतूनें विराटनगराच्या दक्षिणेकडून विराटाचीं गोधनें हरण करण्यासाठीं यानें सुशर्म्यास पाठविलें, तेथें त्याचा पराभव झाला ( ३ विराट श० पहा ). व भीष्मादिकांसहवर्तमान उत्तरेकडून विराटनगरावर जाऊन गोधनें हरण करीत असतां स्वतःही पराभव पावला ( बृहन्नटा श० पहा ).

याप्रमाणें यानें जे जे उपाय योजिले, ते ते सर्व निष्फळ होऊन पांडव प्रकट झाले, व त्यांनीं उपप्लव्य ना०नगरांत राहून, कौरवांनीं आपल्यास यथान्याय राज्याचा अर्धा विभाग द्यावा म्हणून, धृतराष्ट्राकडे द्रुपदपुरोहितास प्रथमतः साम करण्यास पाठविलें. परंतु त्याच्यापासून कांहीं उपयोग न होतां, तो पांडवांकडे परत येऊन पोहोंचतो तों, मागोमाग धृतराष्ट्रानें संजयास पाठविलें. त्यावरून संजय पांडवांकडे येऊन, धृतराष्ट्रानें सांगितल्याप्रमाणें युधिष्ठिराशीं असें बोलूं लागला—हे युधिष्ठिरा, धृतराष्ट्रानें तुजकडे मला जें बोलण्यास पाठविलें आहे, तितकेंच मी बोलतों, अधिक किंवा उणें बोलत नसून तें माझेंच मत आहे, असें न समजतां, सावकाशपणें ऐकून घे. धृतराष्ट्राचें म्हणणें असें आहे कीं, तूं व तुझे बंधु धर्मात्मे आहां, यास्तव तुम्हीं हिंसेनें व्याप्त जें युद्ध त्यास प्रवृत्त न होतां भिक्षाचर्येनें उपजीविका करून कोठेंतरी स्वस्थ असावें, भिक्षेनें क्षत्रियास निर्वाह करणें निंद्य आहे, असें म्हणून युद्ध करण्याचें मनांत आणाल तर, तसेंही करण्याची तुम्हास तादृश आवश्यकता नाहीं. कारण कृष्ण तुमचा परम आप्त असून, द्रुपद राजा तर श्वशुरच आहे. यास्तव तुम्हीं तेथें राहिल्यास त्यांच्यानें तुम्हांस नाहीं म्हणवेल असें नाहीं. सारांश, यांतून जो उपाय तुम्हांस योग्य वाटेल तो तुम्ही करून, राज्याचा विभाग न मागतां स्वस्थ राहावें. हें संजयाचें भाषण ऐकून युधिष्ठिरास आश्चर्य झालें, व मग त्यानेंही धृतराष्ट्राकडे उलट निरोप सांगून पाठविला. तो ऐकून घेऊन संजय तथास्तु म्हणून हास्तिनापुरास गेला असतां, युधिष्ठिरानें शेवटीं साम करण्यासाठीं कौरवांकडे कृष्णास पाठविलें ( ४ कृष्ण श० पहा ).

पुढें युद्धाचा निश्चय ठरून, पांडव आणि दुर्योधन या उभयतांनीं सैन्य जमा केलें, व ज्यानें त्यानें आपआपल्या महारथ्यास स्वस्वपक्षाकडे नेलें. त्यांत मद्रदेशाधिपति शल्य राजा, पांडवांकडे जात असतां, त्यास दुर्योधनानें आपणाकडे युक्तीनें अनुकूल करून

घेतलें ( शल्य श० पहा ). धार्तराष्ट्र आणि पांडव यांमध्यें जें घोर युद्ध झालें, त्यास भारती युद्ध असें नांव आहे ( भारती युद्ध श० पहा ). हें युद्ध होत असतां, जयद्रथवधापूर्वी, दुर्योधन अर्जुनावर चालून जाऊन अत्यंत पराभव पावला ( भार० द्रोण० अ० १०२—१०३ ).

भीष्म, द्रोण आणि कर्ण, हे तिघे, तसेच दुःशासन व शकुनि, आदिकरून कित्येक महारथी मरण पावल्यावर, दुर्योधन अतिशय उदास झाला. तेव्हां अश्वत्थाम्याच्या सूचनेनें त्यानें शल्यास सैनापत्य दिलें. परंतु तोही मरण पावल्यामुळें, दुर्योधन हा, भयभीत होत्साता, जलस्तंभविद्येच्या योगानें द्वैपायन ना० डोहांत जाऊन लपला. त्यावरून पांडव त्याचा शोध करूं लागले; परंतु तो कोठें सांपडेना, म्हणून त्यांनीं अशी वार्ता प्रकट केली कीं, जो कोणी दुर्योधनास धरून देईल, त्यास अमुक द्रव्य मिळेल. ती ऐकून कित्येक लुब्धकांनीं युधिष्ठिरास येऊन कळविलें कीं, दुर्योधन द्वैपायनऱ्हदांत आहे, त्यावरून भीमसेनानें संतुष्ट होऊन, वचनाप्रमाणें त्यास द्रव्य दिलें. नंतर कृष्ण व युधिष्ठिर यांसहित तो तेथें जाऊन, त्यानें, व युधिष्ठिर आणि कृष्ण या प्रत्येकानें, त्यास अनेक इतिहास सांगून, युक्तीनें डोहाच्या बाहेर काढिलें. सारांश, युद्धाच्या अठराव्या दिवशीं दोन प्रहरानंतर भीमाच्या व याच्या युद्धास आरंभ झाला ( भार० शल्य० अ० ३०—३४ ).

याशीं भीमाचें युद्ध प्रवृत्त झालें असतां, तीर्थयात्रेस गेलेला बलराम, सर्व यात्रा करून एकाएकीं तेथें आला, व त्यानें दोघांसही बहुत उपदेश केला, परंतु ते युद्धापासून निवृत्त होईनात. इतक्यांत दुर्योधनाच्या मांडीवर भीमानें गदेचा प्रहार करून त्यास भूमीवर पाडिलें. तें कृत्य पाहून बलरामास अतिशय क्रोध येऊन, तो भीमावर धांवला; कारण गदायुद्धांत कटिप्रदेशाखालीं कोठेंही गदेचा प्रहार करूं नये, असा असलेला नियम त्यानें मोडिला. परंतु कृष्णानें त्याचें सांत्वन करून सांगितलें कीं, तुझ्या मांडीवर गदा बसून तूं मरण पावशील असा मैत्रेयऋषीचा शाप दुर्योधनास होता, त्याप्रमाणें हें झालें असें समजून भीमावर क्रोध करूं नये. त्यावरून बलराम शांत होऊन द्वारकेस गेला ( भार० शल्य० अ० ६० ). पुढें हा रणांत पडला असतां, याकडे अश्वत्थामा आला, त्यास यानें सैनापत्य देऊन तो धृष्टद्युम्नादिक पांचाल व पांडवेय, यांस मारून परत आल्यावर, यानें त्याचा शब्दांनीं गौरव करून प्राण सोडिला ( भार० सौप्तिक० अ० ९ ). ( १ अश्वत्थामा श० पहा ).

वरील इतिहासावरून दुर्योधनाचा स्वभाव कसा होता हें ध्यानांत येईलच, म्हणून त्याशिवाय याचें विशेष वर्णन करणें नको. यास लक्ष्मण नांवाचा एक पुत्र, व लक्ष्मणा ना० कन्या, अशीं दोन अपत्यें होतीं. त्यांतून पुत्र तर हा असतांच अभिमन्यूच्या हातून मरण पावला असून, कन्या मात्र कृष्णपुत्र सांबास दिलेली याच्यामागें होती.

**दुर्वासा**—स्वायंभुव मन्वंतरांतील अत्रि ऋषीपासून कर्दमकन्या अनसूया तिच्या ठायीं झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा. यानें कांहीं अपराधावरून इंद्रास शाप दिला होता कीं, तुझी सर्व संपत्ति समुद्रांत पतन पावेल, त्याप्रमाणें ती पतन पावली. व याच्याच उःशापानें पुनः समुद्रमंथनद्वारा बाहेर निघून तिची त्यास प्राप्ति झाली. ही गोष्ट चाक्षुप मन्वंतरांत स्वर्गामध्यें जो मंत्रद्रुम नांवाचा इंद्र होता, तत्संबंधानेंच झाली असावी. कारण समुद्रमंथन चाक्षुप मन्वंतरांत झालें असून, एका इंद्रास झालेला शाप, दुसऱ्यास बाधक व्हावा, हा असंभव दिसतो.

२—वैवस्वत मन्वंतरांतील अत्रि ऋषीपासून, अनसूयेच्या ठायीं झालेल्या चार पुत्रांतील दुसरा. हा महातपस्वी असून, कालाग्निरुद्राच्या अंशानें जन्मला होता म्हणून, महादेवाच्या आज्ञेवरून श्वेतकी ना० राजानें, यास आपल्या यज्ञांत ऋत्विज केलें होतें ( श्वेतकी श० पहा ). हा उत्तम कोटींतील ब्रह्मवेत्ता असतांही, याच्या स्वभावांत कोप स्वाभाविक होता. अंबरीषराजावर ज्यानें कृत्या सोडून द्वादशी तिथीची अभिमानी देवता विष्णु, त्याचें सुदर्शन आपल्यामागें लावून घेतलें होतें तो हाच ( २ अंबरीष० श० पहा ).

एकदां हा द्वारकेस गेला असतां, कृष्णानें याचा मोठा सत्कार करून, आपणासमीप ठेवून घेतलें. तेव्हां यानें कृष्णास अनेकप्रकारें छळिलें, तें असें कीं कृष्णाकडून क्षिप्रा ( खीर ) करवून आणून, ती याच्या व रुक्मिणीच्या अंगास स्वहस्तें लेपन केली, तरी त्यास क्रोध आला नाहीं असें पाहून, रथास अश्व न जोडतां कृष्ण आणि रुक्मिणी या उभयतांस रथास जोडून रुक्मिणीस, नीट चालेना म्हणून कशेनें ( चाबुकानें ) ताडन करीत संपूर्ण द्वारकेंत फिरला. तरीही कृष्णास क्रोध आला नसून, रुक्मिणीचीही मुखमुद्रा यानें प्रसन्न पाहिली, त्या योगानें संतुष्ट होऊन उभयतांस

अनेक इच्छित वर देऊन हा स्वस्थलीं जातां झाला ( भार० अनु० अ० १५९ ).

अशीच याची सेवा दुर्योधनानें करून यास प्रसन्न केलें, आणि वर मागितला कीं, पांडवांकडे तुम्ही अतिथि जाऊन, मध्यरात्रीनंतर जरी भोजन करणें नाहीं तरी त्यांचें सत्त्व पाहण्यासाठीं भोजन मागावें, न दिल्यास त्यास शापून भस्म करावें. ( दुर्योधनास पक्कें ठाऊक होतें कीं, द्रौपदीचें भोजन झाल्यावर सूर्यदत्त स्थालींतून अन्न उत्पन्न होत नाहीं. म्हणून त्यानें दुर्वासास असें करण्यास सांगितलें ). हें दुर्योधनाचें म्हणणें दुर्वासास रुचलें नाहीं. परंतु वर माग म्हटलें होतें त्यामुळें निरुपाय होऊन, हा अयुत शिष्यांसहित युधिष्ठिराकडे मध्यरात्रीस काम्यक वनांत गेला, व यानें त्याजवळ अन्नाची याचना केली. त्यावरून युधिष्ठिर तथास्तु म्हणून बोलला कीं, स्नान करून येणें असल्यास यावें, तोंपर्यंत मी सिद्धता करवितों. त्यावरून ऋषि स्नानास गेले, व युधिष्ठिर आश्रमांत येऊन, त्यानें द्रौपदीस जागृत करून ऋषि आल्याचें वृत्त कळविलें. तें ऐकून ती घाबरली, व लागलेंच तिनें कृष्णाचें स्मरण केलें. तों तत्काळ तेथें कृष्ण प्रकट होऊन, त्यानें आपण विश्वात्मा आहों, ही प्रतीति तिला, व पांडवांना दाखविण्यासाठीं, स्थालींत शाकपत्र निर्माण करून, तें स्वतः भक्षण करतांच तिकडे संपूर्ण ऋषींसहित दुर्वासा तृप्त होत्साता द्रौपदीसमीप अनेक अन्नाचे ढीग उत्पन्न झाले. ते पाहून द्रौपदीस धीर आला; व तिनें ऋषींस पाचारण करण्याविषयीं युधिष्ठिरास विनंति केली. त्यावरून त्यानें सहदेवास ऋषींकडे पाठविलें, परंतु त्यास ते कोठेंही आढळले नाहींत; कारण ते तिकडल्या तिकडेच तृप्त झाल्यामुळें, युधिष्ठिराचें कल्याण असो, असा आशीर्वाद देऊन चालते झाले होते ( भार० वन० अ० २६२–२६३ ).

**दुर्वाक्षी**–कृष्णपिता वसुदेव, त्याच्या वृक ना० बंधूची स्त्री. हिला तक्ष, पुष्कर इ० पुत्र होते.

**दुर्विरोचन**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**दुर्विषह**– ,, ,,

**दुःशल**– ,, ,,

**दुःशला**–शतपुत्रांनंतर धृतराष्ट्रास झालेली कन्या. ही सिंधुदेशाधिपति जयद्रथास दिली होती.

**दुःशासन**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक व दुर्योधनाचा कनिष्ठ भ्राता. हाही दुर्योधनाप्रमाणेंच शूर, पराक्रमी, व महारथी असून अत्यंत दुष्ट असे. रणांनीं कपटद्यूतेंकरून पांडवांची संपत्ति हरण करून, पांडवांसहित द्रौपदीस जिंकलें, तेव्हां यानें दुर्योधनानें सांगितल्यावरून, द्रौपदी एकवस्त्रा ( रजस्वला ) असतां तिच्या केशांचें आकर्षण करून, अंतःपुरांतून ओढीत तिला सभेंत आणिलें, व लज्जा सोडून नग्न करण्याचा यत्न केला; परंतु कृष्णाच्या अलौकिक सामर्थ्यानें तें याच्यानें झालें नाहीं, व हा त्या कर्मापासून उपरम पावला. तात्पर्य, त्या रोषानें यास मारून, याचें मी रक्त प्राशन करीन अशी भीमानें घोर प्रतिज्ञा केली.

हा, दुर्योधनाच्या अनुमतानें वागे, म्हणून त्यानें यास यौवराज्यावर स्थापिलें होतें. ज्या काळीं भारती युद्ध प्रवृत्त झालें, त्या काळीं पार्वतीय राजांसहित याचें सात्यकीशीं मोठें युद्ध होऊन, त्यांत पराभव, व द्रोणाचार्यापासून निर्भर्त्सना पावला ( भार० द्रोण० अ० १२१ ). शेवटीं भीमसेनानें प्रतिज्ञा केल्याप्रमाणें यास मारून, याचें रक्तपान केलें. ( १ भीम शब्द पहा ).

**दुष्कंत**–रावणानें पराभूत केलेला एक राजा.

**दुष्कर्ण**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**दुष्प्रधर्षण**– ,, ,,

**दुष्यंत**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्व पुत्र ऋतेयु, त्याच्या कुलांत जन्मलेल्या रैभ्य राजाचा पुत्र. यास, तुर्वसुकुलोत्पन्न मरुत राजानें, अनपत्यत्वास्तव आपला पुत्र मानून, आपलें सर्व राज्य दिलें होतें. यास शकुंतला नांवाची स्त्री होती, व तिजपासून सर्वदमन या नामांतरानें भरत नांवाचा पुत्र झाला होता ( शकुंतला श० पहा ).

**दुःसह**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**दुःस्वभाव**–धृतराष्ट्र ना० नागाच्या पुत्रांतील एक ( बभ्रुवाहन श० पहा ).

**दूर्व**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय नृपंजय राजाचा पुत्र, याचा पुत्र तिमि ना० राजा.

**दूषण**–खर राक्षसाचा सेनापती. यास वज्रवेग आणि प्रमाथि असे दोन भ्राते असत. व हा आपल्या चार अमात्यांसहित, जनस्थानीं रामाच्या हातून मरण पावला होता ( १ खर श० पहा ).

**दूषणा**–ऋषभदेववंशीय भौवन राजाची स्त्री. हिचा पुत्र त्वष्टा.

**दृढ**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ७ ).

२–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक ( भार० द्रोण० अ० १३७ ).

**दृढद्युम्न**–एक ब्रह्मर्षि ( २ अगस्त्य श० पहा ).

**दृढधन्वा**–द्रौपदीस्वयंवरांतील एक राजा ( भार० आदि० अ० १८६ ).

**दृढनेत्र**–विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक ( वा० रा० बाल० स० ५७ ).

**दृढनेमी**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिपुत्र दवमीढ अ० द्विमीढ, तद्वंशीय सत्यधृति राजाचा पुत्र. यास सुपार्श्व ना० पुत्र होता.

**दृढरथ**–एक राजर्षि ( भार० अनु० अ० १६५ ).

२–धृतराष्ट्रशतपुत्रांतील एक.

**दृढरुचि**–प्रियव्रतपुत्र हिरण्यरेता, त्याच्या सात पुत्रांतील तिसरा. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२–कुशद्वीपाच्या सात वर्षांतील तिसरा.

**दृढवर्मा**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**दृढसंध**– ,, ,,

**दृढसेन**–द्रोणाचार्यांनीं मारिलेला पांडवपक्षीय राजा. ( भार० द्रोण० अ० २१ ).

**दृढस्यु**–अगस्त्य ऋषीपासून लोपामुद्रेस सप्तसंवत्सरात्मक गर्भवासानंतर झालेला पुत्र. हा बाल्यापासून वेदवेदांगपारग व महातपस्वी असा असे. यानें बाळपणांत सहस्र पुरुषांनीं आणावयाचा इध्मभार ( समिधांचा भारा ) नेहमीं आणीत असावा. त्यामुळें कौतुकेंकरून अगस्त्यानें यास इध्मवाह असें म्हणत असावें, यास्तव तेंच नांव यास पडलें होतें. क्रतु ऋषि अनपत्य असल्यामुळें, त्यानें यास पुत्रत्वेंकरून मानिलें होतें. ( भार० वन० अ० ९९ ).

**दृढहनु**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिपुत्र अजमीढ राजा, त्याच्या बृहदिषु ना० पुत्राच्या वंशांतील सेनजित् राजाच्या चार पुत्रांतील दुसरा. रुचिराश्वाचा कनिष्ठ भ्राता.

**दृढहस्त**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**दृढक्षत्र**– ,, ,,

**दृढायुध**– ,, ,,

**दृढाश्व**–(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुवलाश्व राजाच्या एकवीस सहस्र पुत्रांतून वांचलेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. यास पुत्र प्रमोद या नांवाचा होता.

**दृढास्य**–अगस्त्यपुत्र दृढस्यूचा भ्राता (मत्स्य०अ०२०१).

**दृषद्वती**–सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न अनरण्यपुत्र हर्यश्व राजाची स्त्री.

२–भारतवर्षीय नदी ( २ हिमालय श० पहा ). पांडवांच्या वेळेस, ही हस्तिनापूर व कुरुक्षेत्र ( कौरवपांडवांची युद्धभूमि ) या दोहोंच्या मध्यें असे.

**दृप्तरथ**–एक राजर्षि ( भार० अनु० अ० १६५ ).

**देव**–स्थूलसूक्ष्म पदार्थ, व त्यांचें कारण, या सर्वांसही जो आपल्या प्रकाशानें प्रकाशित करणारा अ० द्योतन करणारा परमात्मा तो.

२–ज्यांस, निमिषोन्मेषांचा व्यापार नाहीं, ज्योतिरूप देह असल्यामुळें छाया नाहीं व पृथिवीवर आले असतां भूमीस पादस्पर्श नाहीं, असे जे ( दिव् ) स्वर्ग या उपलक्षणानें सत्यादिलोकवासी, त्यांस देव असें म्हटलेलें आहे. अदितिपुत्रांसही हें नांव सामान्यतः चालतें.

### श्लोक.

पितामहो जगन्नाथः सावित्री ब्रह्मगः सती ॥ वेदभूरथ कर्ता च विष्णुर्नारायणः प्रभुः ॥ ९ ॥ उमापतिर्विरूपाक्षः स्कंदः सेनापतिस्तथा ॥ विशाखो हुतभुग्वायुश्चंद्रसूर्यौ प्रभाकरौ ॥१०॥ शक्रः शचीपतिर्देवो यमो धूमोर्णया सह ॥ वरुणः सह गौर्या च सह रुद्धया धनेश्वरः ॥११॥ सौम्या गौः सुरभिर्देवी विश्रवा च महान् ऋषिः ॥ संकल्पः सागरो गंगा स्रवंत्योथ मरुद्गणः ॥१२ ॥ आदित्या वसवो रुद्राः साश्विनः पितरोपि च ॥ धर्मः श्रुतं तपो दीक्षा व्यवसायः पितामहः ॥१६॥ शर्वर्यो दिवसाश्चैव मारीचः कश्यपस्तथा ॥ शुक्रो बृहस्पतिर्भौमो बुधो राहुः शनैश्वरः ॥ १७ ॥ नक्षत्राण्यृत वश्चैव मासाः पक्षाः सवत्सराः॥वैनतेयाः समुद्राश्च कद्रुजाः पन्नगास्तथा ॥ १८ ॥

याप्रमाणें ब्रह्मदेवापासून नागांपर्यंत, तसेंच वालखिल्यादिक, नारदादिक, उर्वश्यादिक अप्सरा, शतद्रु आदिकरून नद्यांच्या देवता, आणि हिमवान् आदिकरून पर्वतांच्या देवता, या सर्वांस देव अशी संज्ञा आहे ( भार० अनु० अ० १६५ ).

**देवऋषभ**–वैवस्वत मन्वंतरांतील धर्मऋषीस, भानु ना० स्त्रीपासून झालेला पुत्र. याचा पुत्र इंद्रसेन.

**देवक**–(सो० वं०) यदुकुलोत्पन्न सात्वत राजा, तद्वंशीय आहुक राजाच्या दोन पुत्रांतील पहिला, उग्रसेनाचा ज्येष्ठ भ्राता. यास **देववान्**, **उपदेव**, **सुदेव** आणि **देववर्द्धन**, असे चार पुत्र, व **धृतदेवा**, **शांतिदेवा**-**उपदेवा**, **श्रीदेवा**, **देवरक्षिता**, **सहदेवा** आणि **देवकी**, अशा सात कन्या असून, त्या सर्व वसुदेवास दिल्या होत्या.

२–युधिष्ठिरास पौरवीपासून झालेला पुत्र.

**देवकल्प**–ब्रह्मदेवाचा साहवा दिवस. अ० कल्प० ( ४ कल्प श० पहा ).

**देवकी**–देवक राजाची कन्या, व वसुदेवाची स्त्री. हिला कृष्ण इत्यादि आठ पुत्र होते.

**देवकुल्या**–स्वायंभूमन्वंतरांतील मरीचिऋषीचा पुत्र पूर्णिमा त्याची कन्या. हिनें जन्मांतरीं भगवंताचें पादप्रक्षालन केलें होतें, त्या पुण्यप्रभावानें सांप्रत स्वर्धुनी झाली आहे.

२–ऋषभदेववंशीय भूमा राजाची दुसरी स्त्री, प्रस्तावाची माता.

**देवकूट**–मेरूच्या परिस्तरणगिरींतील पूर्वेकडील गिरी.

२–भारतवर्षीय तीर्थ.

**देवगंधर्व**– कश्यपऋषीस मुनी ना० भार्येपासून झालेले १६ गंधर्व ते. त्यांचीं नांवें. **भीमसेन, उग्रसेन, सुपर्ण, वरुण, गोपती, धृतराष्ट्र, सूर्यवर्चा, सत्यवाक्, अर्कपर्ण, प्रयुत भीम, चित्ररथ, शालिशिरा, पर्जन्य, कलि** आणि **नारद** ( भार० आदि० अ० ६५ श्लो० ४२–४४ ).

२–कश्यपास प्राधेपासून झालेले १० देवगंधर्व ते. त्यांचीं नांवें. **सिद्ध, पूर्ण, बर्हि, पूर्णायु, ब्रह्मचारी, रतिगुण, सुपर्ण, विश्वावसु, भानु** आणि **सुचंद्र.** यांशिवाय **अतिबाहु, हाहा, हूहू** आणि **तुंबुरु,** असेहि चार हिचेच पुत्र असें पुराणांतरीं आढळतें.

**देवगर्भा**–कुशद्वीपस्थ नदी.

**देवजाति**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**देवजिव्ह**–ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**देवताजित्**–ऋषभदेवपुत्र भरत, त्याच्या सुमति ना० पुत्रापासून वृद्धसेनेच्याठायीं झालेला पुत्र, यास आसुरी ना० स्त्री असून, तिजपासून झालेला देवद्युम्न ना० पुत्र होता.

**देवदत्त**–शरीरस्थ उपप्राणांतील एक.

२–( सू० वं० ) नरिष्यंतकुलोत्पन्न उरुश्रवा राजाचा पुत्र. याचा पुत्र अग्निवेश्य.

३–इंद्रानें दिलेला अर्जुनास शंख तो ( भार० वन० अ० १६८ ).

**देवदूत**–एक देवर्षि.

**देवद्युम्न**–ऋषभदेववंशीय देवताजित् राजास, आसुरी स्त्रीपासून झालेला पुत्र. यास धेनुमती ना० स्त्री, व तिच्याठायीं झालेला परमेष्ठी नांवाचा पुत्र होता.

**देवधानी**–मानसोत्तर पर्वतावरील द्वादशादित्यांतील इंद्र आदित्याची नगरी. हिला वस्त्वेकसारा, व माहेंद्री अशीं नांवें पुराणांतरीं आढळतात. हिच्या याम्योत्तरावर ज्या काळीं सूर्य येतो, त्या काळीं तेथें मध्यान्ह असून, उत्तर दिग्पालाच्या विभावरी ना० नगरींत सूर्य अस्तास जाण्याचा समय असतो, तसाच दक्षिण दिग्पालाच्या संयमिनी नगरींत सूर्योदयाचा समय असून,पश्चिम दिग्पालाच्या निम्लोचिनी नगरींत तर मध्यरात्र असत्ये. याचप्रमाणें इतर नगऱ्यांच्या याम्योत्तरांवर सूर्य आला असतां, क्रमानें मध्यान्हादिक होत जातात. येथें पूर्वादि दिग्पाल असें जें म्हटलें आहे, तें भरतवर्षाच्या दिग्प्रत्ययावरून म्हटलें आहे असें समजावें.

**देवपति**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**देवपथ**–भारतवर्षीय तर्थि.

**देवपाल**–शाकद्वीपस्थ एक पर्वत.

**देवप्रस्थ**–अर्जुनानें जिंकलेल्या सेनाबिंदुराजाची उत्तरेकडील नगरी ( भार० सभा० अ० २७ ).

२–गोपवि०. कृष्ण आणि बलराम यांचा बाल्यावस्थेतलि सखा ( भाग० दशम० अ० २२ ).

**देवप्रहरण**–स्वर्गांतील देववि०. ( मत्स्य० अ० ६ ).

**देवबाहु**– ( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय, हृदीक राजाच्या पांच पुत्रांतील एक.

**देवभाग**–(सो० वं०) सात्वतवंशीय शूर राजास मारीषा स्त्रीपासून झालेल्या १० पुत्रांतील दुसरा. वसुदेवाचा कनिष्ठ भ्राता. यास कंसभगिनी कंसा ना० स्त्रीपासून चित्रकेतु, वृहव्दल, आणि उद्धव,असे तनि पुत्र झाले होते.

**देवमत**–एक ब्रह्मर्षि ( भार० अश्वमे० अ० २४ ).

**देवमति**–एक ब्रह्मर्षि ( अंगिरा श० पहा ).

**देवमीढ**–( विदे० वं० ) कृतिरथ जनकाचा पुत्र. याचा पुत्र विश्रुत जनक.

२– सोमवंशीय पूरुकुलोत्पन्न हस्तिराजाचा पुत्र द्विमीढ त्यासच नामांतर.

३–( सो० वं० ) सात्वतकुलोत्पन्न हृदीकराजाच्या पांच पुत्रांतील एक. याचा पुत्र शूर राजा.

**देवयजन**–मांधाताराजानें ज्या स्थळीं यज्ञ केले त्यास नांव.

**देवयान**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**देवयानी**–वारुणी भृगूचा पुत्र जो शुक्र, त्याची ही कन्या हिचें जन्म, पुरंदर इंद्राची कन्या जयंती, तिच्या उदरीं झालें होतें. ही बाल्यापासून तपस्विनी, विद्यासंपन्न व पित्यास परमप्रिय अशी असे. शुक्राचार्याकडे बृहस्पतीचा पुत्र कच तो येऊन मृतसंजीवनी-विद्येच्या गुरुत्वासह अध्ययन करीत राहिला असतां,

त्यावर हिचें प्रेम बसून, हिनें त्यास, तो दैत्य दानवांच्या हातून कित्येक वेळां मरण पावला असतां वांचविलें होतें; कारण त्यास आपण वरावें असें हिच्या मनांत होतें. परंतु त्यानें हिचा कांहींएक कारणानें अंगीकार केला नाहीं ( १ कच श० पहा ).

कच निघून गेल्यावर, एकदां ही वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा आपल्या सख्यांसहवर्तमान वनविहारा गेली असतां, तिजसमागमें स्वसंख्यासहित गेली होती. तेथें क्रीडा झाल्यावर सरोवरांत स्नान करावें अशा हेतूनें सर्वजणी आपआपलीं वस्त्रें सोडून ठेवून, त्यांत स्नानास उतरल्या, व बराच वेळपर्यंत जलक्रीडा झाल्यावर, त्यांनीं बाहेर येऊन आपआपलीं वस्त्रें परिधान केलीं, त्यांत शर्मिष्ठेनें चुकून हिचें वस्त्र परिधान केल्यावर, मागून ही तेथें येऊन पाहात्ये तों, आपणास शर्मिष्ठेचें वस्त्र परिधानार्थ बदल राहिलें आहे. त्यावरून हिला क्रोध येऊन शर्मिष्ठेस निर्भर्त्सनापूर्वक ही ह्मणूं लागली कीं, तुझ्या पित्यास परम मान्य जो माझा पिता शुक्राचार्य, त्याची मी कन्या, म्हणून तुलाही मान्य असतां, तूं माझें वस्त्र परिधान केलेंस हा मोठा अन्याय केलास. माझ्या पित्याच्या बळावर तुह्मी सर्व दैत्यदानव सुखी आहां; नाहींतर कधींच रसातळास गेलां असतां. इत्यादि प्रकारेंकरून हिचें भाषण ऐकून शर्मिष्ठेनें, झालेली गोष्ट चुकून झाली, असें लीनतेचें भाषण करावें, तें न करतां, हिला म्हणूं लागली कीं, मी दात्याची, व तूं याचकाची कन्या; म्हणून तुजमध्यें व मजमध्यें महदंतर असतां, तुझें वस्त्र परिधान केल्यानें मलाच हीनत्व आलें असून, आपला श्रेष्ठपणा वर्णन करित्येस त्या तुला लज्जा कशी वाटत नाहीं ? सारांश, हिचें एक व तिचें एक, असें भाषण होतां होतां, अविचारानें शर्मिष्ठा इतक्या निकरावर आली कीं, तिनें हिला आपलें वस्त्र नेसूं न देतां, व तिचें तिलाही न देतां, तशीच नग्न ठेवून एका कूपांत लोटून देऊन आपल्या सख्यांसहित स्वगृहीं गमन केलें.

इकडे देवयानीच्या सख्या शोक करीत कूपाभोंवत्या फिरत असतां, देवयानीस कूपांत कांहीं आधार सांपडून, त्यास धरून ती त्यांत तरंगत आहे, असें त्यांनीं पाहिलें. त्यावरून तिला बाहेर काढावें म्हणून त्या यत्न करूं लागल्या; परंतु कांहीं उपाय चालेना. तेव्हां, ही त्यास आंतून असें म्हणाली कीं, तुह्मी सत्वर नगरांत जा. आणि शर्मिष्ठेनें केलेली माझी अवस्था माझ्या पित्यास श्रुत करा, म्हणजे तो माझा यत्न करील. त्यावरून सख्या नगरांत गेल्या, इतक्यांत इकडे असें झालें कीं, नहुषपुत्र ययाति राजा मृगया करीत करीत तेथें प्राप्त झाला, व त्यानें शोकाचा ध्वनि कूपांत होत असलेला ऐकून, त्यासमीप आगमन केलें. त्यास देवयानीनें पाहून ती त्यास म्हणाली कीं, आधीं परिधानार्थ मला कूपांत वस्त्र टाक तें त्यानें टाकतांच, हिनें सरासरी शरीर झांकलें, व त्यास पुसलें, तूं कोण, व तुझें नांव काय ? तें सांग. मी दैत्यगुरु शुक्राचार्य त्याची कन्या देवयानी आहे, त्यावरून त्यानें आपलें कुलगोत्र व नांव तिला सांगितलें. तें ऐकून देवयानी त्यास म्हणाली, हा संबंध ईश्वरेच्छेनेंच घडून आला आहे, तर आतां, तूं माझा हस्त धरून मला बाहेर काढ. ब्रह्मर्षि व राजर्षि यांमध्यें असे संबंध पुष्कळ झालेले आहेत, यास्तव शंका न धरतां, माझ्या वचनावर विश्वास ठेवून मला बाहेर काढण्यास अनमान करूं नको. त्यावरून ययातीनें हिच्या हस्ताचें ग्रहण करून हिला बाहेर काढिलें, व हिचा निरोप घेऊन तो स्वनगरास गेला.

वर सांगितलें आहे कीं, देवयानीनें आपल्या सख्यांस आपल्या पित्याकडे पाठविलें. त्याप्रमाणें त्यांनीं तिकडे जाऊन शुक्राचार्यास देवयानीची अवस्था सांगितली. ती ऐकतांच तो त्वरेनें ती होती तेथें आला, आणि पाहतो तों ती कूपाबाहेर बसली आहे. नंतर आरंभापासून ययाति राजानें आपणास बाहेर काढिलें तेथपर्यंत साकल्य वर्तमान सांगून ती पित्यास म्हणूं लागली कीं, या उन्मत्त दानवांजवळ इतःपर तुम्हांस राहणें योग्य नाहीं. इतक्यावर आपण राहण्यास इच्छित असाल तर आपण नगरांत जावें, मला येणें नाहीं. शुक्राचार्यानें तिची बहुतांप्रकारें समजूत केली परंतु ती, कांहींच ऐकेना. त्यावरून निरुपाय होऊन, तो तेथेंच राहिला. हें वर्तमान वृषपर्व्यास कळून तो तत्काळ तेथें आला, व शुक्राचार्याची त्यानें बहुत प्रार्थना केली कीं, आपण नगरांत चलावें, आमचा त्याग करून आपण गेल्यास मग आम्हीं कोणाच्या बळानें देवाशीं टिकाव धरावा? शुक्राचार्यांनीं उत्तर केलें, माझी समजूत करून उपयोग नाहीं, देवयानीची समजूत कर, आणि ती जर नगरांत आली तरच मी येईन, एऱ्हवीं येणार नाहीं. त्यावरून वृषपर्व्यानें देवयानीची प्रार्थना केली कीं, शर्मिष्ठेच्या अपराधाची क्षमा करून नगरांत चल. तेव्हां देवयानी ह्मणाली, माझा पिता मला जेथें विवाह करून देईल, तेथें मजसमागमें तुझ्या कन्येनें

कित्येक दासींसहवर्तमान माझी दासी होऊन दास्य करण्यांस यावें, हें जर तुला व तुझ्या कन्येला मान्य असेल, तर तिला येथें बोलावून आणून पूस, मान्य झाल्यास मग मी नगरांत येईन.

तात्पर्य, वृषपर्व्यानें शर्मिष्ठेस तेथें बोलाविलें, व ती येतांच तिला त्यानें देवयानीचें म्हणणें कळविलें. तें तिनें मान्य केलें असतां, देवयानी तिला ह्मणाली, याचकाच्या कन्येचें दास्य, दात्याच्या कन्येस कसें घडेल? शर्मिष्ठा म्हणाली, एकाकारितां सर्व कुल नाश पावूं देणें योग्य नाहीं, हें जसें न्याय्य आहे, तसाच विचार हा असल्यामुळें. दानवांच्या हिताकरितां मीं दास्य स्वीकारलें आहे, त्यावरून देवयानी उगीच राहिली, व नगरांत गेल्यावर तिचा विवाह ययाति राजाशीं झाला असतां, शर्मिष्ठा तिजसमागमें दासी होऊन गेली ( ययाति श० पहा ).

**देवरत**–एक ब्रह्मर्षि ( १ विश्वामित्र श० पहा ).

**देवरक्षिता**–देवक राजाची कन्या, व वसुदेवाची स्त्री, हिला गद इत्यादि नऊ पुत्र होते.

**देवरात**–( विदे० वं० ) सुकेतुनामक जनकाचा पुत्र, याचा पुत्र बृहद्रथ जनक. रुद्रानें ठेविलेलें धनुष्य याच्याच घरीं होतें, व तें सीतास्वयंवरकाळीं रामानें भांगिलें ( वा० रा० बाल० स० ६६ ). ( भार० शांति० अ० ३१८ ).

२–भृगुकुलोत्पन्न अजीगर्ताचा पुत्र शुनःशेप, त्यास नामांतर ( शुनःशेप श० पहा ).

३–( सो० वं० यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या वंशांतील करंभी राजाचा पुत्र. याचा पुत्र देवक्षत्र.

**देवरारी**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**देवल**–चालू वैवस्वत मन्वंतरापूर्वीचा एक ऋषि. यानें हूहू गंधर्वास तूं नक्रयोनि पावशील असा शाप दिला होता. हा नक्र गजेंद्राच्या समागमेंच उद्धरला होता म्हणून, प्राचीन असल्यामुळें, हा शाप देणाराहि तसाच प्राचीनच म्हटला पाहिजे.

२–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

३–प्रत्यूष ना० वसूचा पुत्र, यास क्षमावंत आणि मनीषि असे दोन पुत्र होते.

४–कृशाश्वऋषीस, धिषणेपासून झालेल्या ४ पुत्रांतील एक ( भाग० षष्ठ० अ० ६ ).

५–जनमेजयाच्या सर्पसत्रांतील एक सदस्य. पांडवांचा जो उपाध्याय धौम्यऋषी, त्याचा हा बंधु होता.

**देववर्णिनी**–भारद्वाज ऋषींची कन्या आणि विश्रवा ऋषीची स्त्री ( २ विश्रवा श० पहा ).

**देववती**–ग्रामणी ना० गंधर्वाची कन्या, व सुकेश राक्षसाची स्त्री.

**देववर्धन**–( सो० वं० ) यदुकुलांतील अंधकवंशांत जन्मलेल्या आहुक राजाचा पौत्र, व देवक राजाच्या ४ पुत्रांतील चवथा.

**देववर्ष**–प्रियव्रत राजाचा पौत्र, व यज्ञबाहूच्या ७ पुत्रांतील चवथा. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२–शाल्मली द्वीपाच्या सात वर्षांतील चवथा.

**देववान**–( सो० वं ) यदुकुलोत्पन्न अंधकवंशीय देवक राजाच्या ४ पुत्रांतील पहिला.

२–अक्रूराच्या पुत्रांतील ज्येष्ठ.

३–पुढें होणाऱ्या रुद्रसावर्णि मनूच्या पुत्रांतील एक.

**देववीती**–मेरूच्या नऊ कन्यांतील नववी, व आग्नीध्रपुत्र केतुमाल त्याची स्त्री.

**देवव्रत**–भीष्माचें मूळ नांव.

**देवशर्मा**–एक ब्रह्मर्षि. त्याची स्त्री रुचि ( भार० अनुशा० अ० ४० ).

२–जनमेजयाच्या सर्पसत्रांतील सदस्य.

**देवश्रवा**–या नांवाचे दोन ब्रह्मर्षि ( १ विश्वामित्र श० पहा ).

२–( सो० वं० यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय शूर राजा, त्यास मारीषेपासून झालेल्या १० पुत्रांतील एक. हा वसुदेवाचा भ्राता असून, यास कंसभगिनी कंका ती स्त्री होती, व तिजपासून सुवीर आणि इषुमान् असे याला दोन पुत्र झाले होते.

**देवश्रेष्ठ**–पुढें होणाऱ्या रुद्रसावर्णि मनूच्या पुत्रांतील एक.

**देवसखा**–भारतवर्षीय पर्वत ( वा० रा० किष्किं० स० ४३ ).

**देवसावर्णि**–चालू श्वेतवाराहकल्पांत पुढें होणारा तेरावा मनु. याचें मन्वंतर याच्याच नांवानें चालून यास ऋतधामा असेंही लोक म्हणतील. याला चित्रसेन, विचित्र, इ० पुत्र होतील, व याच्या मन्वंतरांत स्वर्गामध्यें सुकर्मा इ० देव, आणि त्यांचा स्वामी दिवस्पति ना० इंद्र होईल. तसेच निर्मोक तत्त्वदर्शी, इ० सप्तर्षि होऊन, देवहोत्रापासून बृहती ना० भार्येच्याठायीं, योगेश्वर नांवानें विष्णूचा अवतार होऊन तो इंद्राचें साह्य करील ( भाग० ८ स्कं० अ० १३ ).

**देवसेना**–प्रजापतीच्या दोन कन्यांतील एक. हिला केशी

दैत्यापासून इंद्रानें सोडविल्यावर, हिनें कार्तिकेयास वरिलें होतें ( भार० वन० अ० २२३ ).

**देवस्थान**–एक ब्रह्मर्षि.

**देवस्थानि**– ” ”

( ३ अंगिरा श० पहा ).

**देवहव्य**–एक ब्रह्मर्षि.

**देवहूति**–स्वायंभूमनूच्या तीन कन्यांतील दुसरी, व कर्दमऋषीची स्त्री. हिला कर्दम प्रजापतीपासून कला, अनसूया, इ० नऊ कन्या, व कपिल ना० पुत्र झाला होता. कपिल हिला आत्मतत्त्वोपदेश करून निघून गेल्यावर नदीरूप होऊन हिनें आपला देह टाकिला ( भाग० ३ स्कं० अ० ३३ ).

**देवहोत्र**–प्रथमार्थक उपरिचर राजाच्या यज्ञांतील एक ऋत्विज.

२–देवसावर्णि मन्वंतरांतील विष्णु अवताराचा पिता.

**देवक्षत्र**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा तद्वंशीय ज्यामघकुलोत्पन्न क्रथवंशांत जन्मलेल्या देवरात राजाचा पुत्र, याचा पुत्र, मधु ना० राजा.

**देवांतक**–मारुतीनें मारिलेला रावण पुत्र.

( वा० रा० युद्ध० स० ७० ).

**देवातिथि**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशसंभूत जन्हु राजा, तद्वंशीय क्रोधन राजाचा पुत्र, याचा पुत्र, ऋष्य राजा.

**देवाधिप**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

( भार० आदि० अ० ६७ ).

**देवानीक**–( सो० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशवंशीय क्षेमधन्वा राजाचा पुत्र, हा मोठा प्रतापी असे, व यास अनीह अ० अहीनर या नांवाचा पुत्र होता.

२–कुशद्वीपांतील एक पर्वत.

**देवापि**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशसंभूत जन्हु राजा, तद्वंशीय प्रतीप राजाच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. हा, शंतनु आणि वाल्हीक, त्यांहून ज्येष्ठ असतांही, पित्याच्या मागें राज्याधिकारी जरी झाला, तरी कुष्ठी असल्यामुळें, प्रजेनें त्यास राज्यावरून काढून टाकून, शंतनूस राज्यावर बसविलें होतें. त्यामुळें हा, कलापग्रामीं तप करीत राहिला. परंतु इकडे, ( ज्येष्ठ बंधु अविवाहित राहून कनिष्ठानें लग्न केलें असतां, जसा तो परिवेत्ता होतो ) तसा प्रकार, याचा अनादर करून राज्य करण्यानें शंतनूस घडल्यामुळें, त्याच्या राज्यांत बारा वर्षें अवर्षण पडलें. तेव्हां शंतनु याकडेस आला, व त्यानें झालेल्या अपराधाची यास क्षमा मागितली. त्या कालीं यानें सांगितलें, आतां तुला माझी आज्ञा आहे, तूं जाऊन स्वस्थ राज्य कर. त्या वरून शंतनु पूर्ववत् राज्य करूं लागला, व राज्यांत वृष्टिही झाली ( भार० शल्य० अ० ४० ). हा प्रस्तुत कलापग्रामीं तप करीत असून, येणाऱ्या कृतयुगांत सोमवंशाची वृद्धि करणारा होईल.

२–कर्णानें मारिलेला भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ५६ ).

**देवावृध**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा तद्वंशीय सात्वत राजाच्या सात पुत्रांतील पांचवा. याचा पुत्र बभ्रुराजा.

२––सहदेवपुत्र शतानीक त्यानें मारिलेला भारतीयुद्धांतील दुर्योधन पक्षीय राजा. ( भार० कर्ण० अ० ८५ ).

**देविका**––भारत वर्षीय नदी ( २ हिमालय श० पहा ).

**देवी**–एक अप्सरा.

२–अथर्वण वेदोपनिषत्.

**दैर्ध्यतम**–( सो०वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, तद्वंशीय काश्यकुलोत्पन्न दीर्घतमा राजाचा पुत्र धन्वंतरि राजा त्यासच म्हटलेलें आहे.

**दैत्य**–देवांशी विरोध करणारे ते सर्व दैत्यच, तथापि चालू मन्वंतरांत दितीचे जे पुत्र ते.

**दैत्यसेना**–देवसेनेची ज्येष्ठ भगिनी. केशी दैत्याची स्त्री.

**दैवराति**–देवरात जनकाचा पुत्र जो बृहद्रथ जनक त्यास नामांतर.

**दोषा**––उत्तानपादवंशीय पुष्पार्णाच्या दोन स्त्रियांतील दुसरा ( पुष्पार्ण श० पहा ).

**दौर्मुखी**–दुर्मुख पांचालाचा पुत्र यशोधर त्यास नामांतर. यास जनमेजयही म्हटलेलें आढळतें.

**दौःशलेय**–जयद्रथस्त्री दुःशला तिचा पुत्र सुरथ तोच.

**दौःशासनि**––दुःशासनाचा पुत्र, याचें मूळ नांव आढळत नाहीं. अभिमन्यूच्या मरणास शेवटीं हा उर्गीच निमित्त झाला होता.

**दौष्यंति**–दुष्यंतास शकुंतलेपासून झालेला भरत ना०पुत्र, त्यास म्हटलेलें आहे.

**द्युः**–अष्टवसूंतील एक वसु. भारतांत लिहिलेल्या अष्टवसूंत हें नांव कोणाचे त्याचा शोध लागला नाहीं. असो. एकदां सर्व वसु आपआपल्या स्त्रियांसहित वनविहार करीत पृथिवीवर हिंडत असतां त्यांनीं वसिष्ठाची कामधेनु पाहिली, तिचें हरण करावें असें सर्व स्त्रियांच्या मनांत येऊन, त्यांनीं आपआपल्या पतींस

ती गोष्ट कळविली. तेंव्हां त्यांनीं त्यांस होय मात्र म्हटलें, परंतु तिचें हरण केलें नाहीं. यानें तिचें लागलेंच हरण केलें. हें वर्तमान वासिष्ठास कळतांच, त्यानें तुम्हांस पृथिवीवर जन्म घडेल असा शाप दिला. तेच पुढें शंतनूपासून गंगेच्या उदरीं येऊन त्वरित स्वर्गास गेले, परंतु धेनूचा प्रत्यक्ष अपहारकर्ता हा वसु, भीष्म होऊन बहुतकाळ पृथिवीवर राहिला होता व भारती युद्धांत मरण पावून नंतर स्वर्गी गेला.

**द्युति**-द्रुती शब्द पहा.

**द्युतिमान्**-स्वायंभूमनूच्या दाहा पुत्रांतील एक.

२-( सू० वं० ) इक्ष्वाकुपुत्र दशाश्व त्याचा पौत्र, मदिराश्व राजाचा पुत्र, याचा पुत्र सुवीर ( भार० अनु० अ० २ ).

३-शाल्ववंशीय एक राजा यानें आपलें सर्व राज्य ऋचीक ऋषीस अर्पण करून, उत्तम लोकाची प्राप्ति करून घेतली होती [ भार० शांति० अ० २३५ ].

४-दक्षसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षीतील एक.

**द्युमत्सेन**-शाल्वदेशीय चित्राश्व अ० सत्यवान् राजाचा पिता. सावित्रीचा श्वशुर.

२-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न उपरिचर, त्याच्या जरासंधकुलांतील शम राजाचा पुत्र. याचा पुत्र सुमति.

**द्युमान्**-स्वायंभूमन्वंतरांतील वसिष्ठऋषीच्या सात पुत्रांतील एक.

२-स्वारोचिष मनूच्या पुत्रांत होऊन गेलेला एक पुत्र तो.

३-( सो० वं० ) काश्यकुलोत्पन्न प्रतर्दन राजास नामांतर.

४-कृष्णाच्या हातून मरण पावलेला शाल्व राजाचा प्रधान.

**द्युम्न**-चक्षुर्मनूस नड्वलेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**द्यौ**-द्युः शब्द पहा.

**द्रविड**-कृष्णापासून जांबवतीस झालेल्या पुत्रांतील एक.

**द्रविडदेश**-अपरपांड्य देशाच्या दक्षिणेस असणारा भारतवर्षीय देश ( भार० सभा० अ० ३१ ).

**द्रविण**-उत्तानपादवंशीय पृथुराजास अर्चीपासून झालेल्या पांच पुत्रांतील चौथा.

२-धर ना० वसूचा पुत्र.

३-कुशद्वीपांत असणारा एक पर्वत.

**द्रुति**-ऋषभदेववंशीय नक्तराजाची स्त्री. हिला द्युति असें नामांतर असून, गय ना० पुत्र होता.

**द्रुपद**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील, त्याच्या वंशांत जन्मलेल्या जंतु अ० पृषत राजाचा पुत्र. यास बलानीक, श्रुत, सुरथ, शत्रुंजय, असे चार पुत्र, व शिखंडिनी ना० कन्या प्रथमतः झाली होती. नंतर अग्नींतून द्रोणाचार्याच्या वधार्थ धृष्टद्युम्न झाला असून द्रौपदी ना० कन्याही त्यांतूनच उत्पन्न झाली. द्रुपद राजास यज्ञसेन, पृषताचा पुत्र म्हणून पार्षत, आणि पंचालकुलोत्पन्न म्हणून पांचाल, अशीं नांवें होतीं.

द्रुपद राजानें बाळपणांत द्रोणाचार्यांचा पिता भारद्वाजऋषि, त्यापासून द्रोणाचार्यासमागमें धनुर्विद्या संपादिली होती. म्हणून द्रोणाचार्य, व हा, उभयतां गुरुबंधु होते. धनुर्विद्या पूर्ण झाल्यावर द्रुपदानें भारद्वाजास गुरुदक्षिणा देऊन, द्रोणास सांगितलें होतें कीं, पित्याच्या मागें मी राज्याधिकार पावलों असतां, जर तुम्ही मजकडे आला तर मी आपणास ओळखीन, असें म्हणून द्रुपद स्वनगरास गेला. या गोष्टीस बराच काळ लोटल्यावर, द्रुपदास राज्याधिकार प्राप्त झाला. व तिकडे द्रोणाचार्यास अश्वत्थामा ना० पुत्र होऊन, त्यास त्यानिमित्त द्रव्याचें कारण उपस्थित झालें, म्हणून तो याकडेस आला असतां, द्रुपदानें मदांधपणानें त्याचा उपहास करून, त्यास कांहींच न देतां परत लाविलें. त्यावरून द्रोणास क्रोध येऊन, तो, मी शिष्याच्या हातून या द्रुपदाचा पराभव करीन, अशी प्रतिज्ञा करून निघून गेला.

पुढें द्रोणाचार्यानें, आपण केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणें, कौरवपांडवांस धनुर्विद्या शिकवून, मुख्यत्वें अर्जुनाकडून, याचा पराभव करवून, यास बांधवून आपणाजवळ आणविलें, व याचें अर्धराज्य घेऊन, सोडून दिलें ( द्रोणाचार्य श० पहा ). द्रुपदराजा अपमान पावून द्रोणाचार्यापासून निघाला, व त्यानें माकंदी, छत्रवती, कांपिल्य, इ० नगरें आपल्या अर्धराज्यांत नवीं वसवून, व अहिच्छत्रा ना० एक सुंदर नगरी आपली राजधानी करून, तेथें राज्य करीत राहिला. परंतु तें राज्य करणें यास रुचत नसे, म्हणून तो द्रोणाचार्यास मारील असा पुत्र उत्पन्न करावा, या हेतूनें सर्वदा वनोपवनें हिंडे.

एकदां हा अरण्यांत हिंडत असतां, यमुनातीरीं भिन्न भिन्न आश्रम करून राहणारे, काश्यपगोत्रोत्पन्न याजोपयाज नांवांचे दोघे बंधु असत. त्यांतील उपयाज ऋषीच्या आश्रमास जाऊन, यानें त्यास आपला

हेतु कळविला. परंतु तो त्यानें मान्य केला नाहीं. असें असतांही, द्रुपदराजा त्याची सेवा करीत तेथेंच राहिला. तें पाहून त्यानें द्रुपदास स्पष्ट सांगितलें कीं, तुझें इष्ट मजकडून सिद्ध होणार नाहीं; परंतु माझा वडील बंधु याजऋषि, कांहींसा द्रव्यलोभी आहे, यास्तव तूं त्याजकडेस जा, आणि त्यानें तुझें कार्य केल्यास पहा. त्यावरून हा तथास्तु म्हणून त्याकडे गेला, व आपलें इच्छित त्यानें त्यास कळविलें. त्यास त्यानें अनुमोदन देतांच, द्रुपदानें त्यास तत्काळ आपल्या नगरास आणिलें. पुढें त्यानें यज्ञ केला असतां अग्निकुंडांतून धनुर्बाणधर असा धृष्टद्युम्न ना० पुत्र, व कृष्णा ना० एक कन्या निर्माण झाली. त्यांस पाहून द्रुपद राजा संतुष्ट होत्साता, त्यानें याजऋषीचा सत्कार करून, व त्यास अपार द्रव्य देऊन, आश्रमास पोहोंचविलें ( भार० आदि० अ० १६५-१६७ ).

धृष्टद्युम्न मोठा होत चालला असतां, द्रुपदानें धनुर्वेदाची शिक्षा, त्यास द्रोणाचार्याकडूनच देवविली. तींत तो प्रवीण झाला असें पाहून, व कृष्णा (द्रौपदी) उपवर झाली असें जाणून, त्यानें तिचें स्वयंवर आरंभिलें. त्यांत मत्स्ययंत्रभेदाचा पण केला होता, त्यावरून पांचालपुरास अनेक देशींचे राजे आले होते. पुढें मत्स्ययंत्राचा भेद कोणास होत नाहीं असें पाहून, त्याच्या भेदार्थ कर्ण उठला होता. त्यास द्रौपदीनें मी वरणार नाहीं असें म्हटल्यावरून, त्याचा भेद विप्रवेषधारी अर्जुनानें केला, व द्रौपदीस वरिलें ( भार० आदि० अ० १८८ ).

द्रुपदानें आपली कन्या ब्राह्मणास दिली असें पाहून सर्व राजे रुष्ट झाले, व त्यांनीं त्याशीं युद्धप्रसंग आरंभिला. तेव्हां भीमार्जुन पुढें होऊन, त्यांनीं सर्वांचा पराभव केला, व द्रौपदीस घेऊन उतरले होते त्या कुलालगृहीं ते गेले. तेव्हां ते ब्राह्मणच आहेत किंवा कसें, याविषयीं द्रुपदास संशय येऊन, त्यानें त्यांचा गुप्तपणानें शोध करावा या हेतूनें धृष्टद्युम्नास तिकडे जाण्याची आज्ञा केली असतां, तो कुलालगृहाच्या बाह्यप्रदेशीं रात्रीं उभा राहून त्यांचीं भाषणें काय होतात तीं ऐकूं लागला. त्यांत त्यानें त्यांच्या भाषणावरून ते क्षत्रिय आहेत असें जाणून, तें वृत्त पित्यास (द्रुपदास) येऊन कळविलें, त्यावरून द्रुपदास कांहींसा आनंद होऊन दुसऱ्या दिवशीं पांचांसही त्यानें राजमंदिरीं बोलाविलें. त्यांत युधिष्ठिराच्या भाषणावरून ते पांडव आहेत असा निश्चय होतांच तर त्यास पराकाष्ठेचा आनंद झाला; कारण त्याचा पहिल्यापासून निश्चय, द्रौपदी अर्जुनास द्यावयाची असाच होता.

नंतर द्रौपदीचा अर्जुनाशीं विवाह करावयाची सिद्धता द्रुपद करूं लागला असतां, युधिष्ठिरानें, कुंतीच्या वचनाप्रमाणें आम्हास करणें अवश्यक असल्यामुळें, तिचा विवाह आम्हां पांचांसमागमेंही झाला पाहिजे, असें म्हटलें. त्यावरून द्रुपदास विचार पडला कीं, असें कसें होईल ? इतक्यांत तेथें कृष्णद्वैपायन व्यास प्रकट होऊन, त्यांनीं पांडव हे पूर्वीचे पांच इंद्र असून द्रौपदी, ही शची आहे, यास्तव तिचा विवाह पांचांशीं विरुद्ध नसून, कुंतीनेंही तुम्ही आणिलेली भिक्षा, समसमान वांटून घ्या असें म्हटलें आहे. त्या अर्थी हिचा विवाह निंद्य नाहीं असें सांगितलें. याविषयीं त्यांनीं जटिलेचा इतिहास द्रुपदास सांगतांच, त्यानें द्रौपदी पांचांसही दिली, व विवाहसमारंभ यथासांग उरकल्यावर दास, दासी, वस्त्रें, भूषणें व अपार धन देऊन, धृतराष्ट्राकडून त्यांस हस्तिनापुरास नेण्यासाठीं विदुर आला असतां, त्यासहित त्यांस यानें निरोप दिला ( भार आदि० अ० १९८-१९९ ).

भारती युद्ध होऊं लागलें, त्या वेळेस द्रुपदराजा, आपले पुत्र बांधव, व अनेक पांचाल, यांसहित पांडवांकडे आला, तेव्हां याचें जयद्रथाशीं मोठेंच युद्ध झालें होतें ( भार० भीष्म० अ० ४५ ). पुढें रात्रियुद्धांत हा द्रोणाचार्याच्या हातून मरण पावला (भार० द्रोण० अ० १८६ ).

**द्रुम**– भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**द्रुमकुल्य**–भारतवर्षीय देश. येथील जन अतिशय दुराचारी असून समुद्रास फार पीडा देत, म्हणून समुद्राच्या प्रार्थनेवरून रामानें तेथें बाण टाकिला, व त्यांचा नाश केला; तेथेंच मरु नांवाचें अरण्य झालें ( वा० रा० युद्ध० स० २२ ).

**द्रुमसेन**–धृष्टद्युम्नानें रात्रियुद्धांत मारलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० १७० ).

**द्रुमिल**–ऋषभ देवाच्या शतपुत्रांत जे नऊ पुत्र सिद्ध होते त्यांतील एक.

**द्रुहिण**–ब्रह्मदेव.

**द्रुह्यु**–( सो० वं०) आयुपुत्र नहुष त्याचा पौत्र, व ययाति राजास शर्मिष्ठेपासून झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा. यानें पित्याची जरा घेतली नाहीं, म्हणून यास सार्वभौमत्व मिळालें नाहीं. यास बभ्रु नांवाचा पुत्र होता.

**द्रोण**–प्रलयमेघांतील एक.

२–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).
३–भारतवर्षीय एक पर्वत.
४–क्षीरसमुद्रतीरीं असणारा एक पर्वत.
५–एक वसु, हा भारतोक्त अष्टवसूंतील कोणता, त्याचा निर्णय होत नाहीं. परंतु याची स्त्री धरा असून, हीं च स्त्रीपुरुषें पुढें नंद व यशोदा झालीं होतीं ( भाग० १० स्कं० अ० ८ श्लो० ४८ ).
६–द्रोणाचार्य शब्द पहा.

**द्रोणाचार्य**–भारद्वाज ऋषीस बृहस्पतीच्या अंशानें झालेला पुत्र. हा घृताची अप्सरेच्या दर्शनानें भारद्वाजाचें रेत पतन पावून, तें त्यानें द्रोणकलशांत ठेविलें, त्यापासून याची उत्पत्ति झाली म्हणून यास हें नांव पडलें. द्रोणाचार्य आपल्या पित्यापासून वेदवेदांगपारग, व धनुर्विद्यानिपुण होत असतां, त्या वेळेस याचा सहाध्यायी द्रुपदराजा असे. यानें पुढें अग्निवेश्य ऋषीपासून कवचविद्या, व ब्रह्मशिर ना० अस्त्र संपादिल्यावर हा जामदग्न्य रामाकडे गेला व तेथून अस्त्रांचीं रहस्यें व उपसंहार, इ० संपादून श्रेष्ठ झाल्यामुळें, लोकांत यास द्रोणाचार्य असें नांव पडलें ( भार० आदि० अ० १३० ).

यानें कांहीं कालपर्यंत तपही केलें होतें. नंतर कृपाचार्याची भगिनी कृपी तिशीं यानें विवाह केला. कांहीं कालानें यास अश्वत्थामा नांवाचा पुत्र झाला असतां, हा द्रुपदराजाकडे द्रव्य मागावें या हेतूनें गेला; परंतु याचा त्यानें अपमान केल्यामुळें, व परशुरामाजवळही यास देण्यापुरतें द्रव्य नसल्यामुळें, यानें स्त्री व पुत्र यांस घेऊन, कृपाचार्याकडे हस्तिनापुरास गमन केलें. कारण, तो भीष्माच्या आश्रयास असून संपन्नही होता. कृपाचार्य, द्रोणाचार्य आल्यानें हर्षित होऊन त्यास त्यानें मोठ्या आदरानें ठेवून घेतलें.

एकदां धार्तराष्ट्र आणि पांडव, विटीदांडूचा खेळ खेळत असतां, त्यांची सोन्याची विटी, समीप एक कूप होता त्यांत पडली. तेव्हां ती बाहेर कशी काढावी, या विचारांत तीं सर्व मुलें निमग्न होऊन कूपाभोंवतीं जमलीं आहेत, इतक्यांत त्या मार्गानें द्रोणाचार्य चालले होते त्यांनीं त्या मुलांस पाहिलें व पुसलें कीं, तुम्ही कोणाचीं मुलें आहां, व येथें काय पाहतां ? त्यांनीं सांगितलें, आम्ही धृतराष्ट्र व पंडुराजा, यांचे पुत्र असून, भीष्म आमचा पितामह ( आजा ) आहे, व आमची सुवर्णाची विटी कूपांत पडलेली काढण्याच्या विचारांत आहों. हें त्यांचें भाषण ऐकून, द्रोणाचार्यानें त्या कूपांत आपल्या हातांतील सुवर्णमुद्रिका सर्व मुलांदेखत टाकून, त्यामागून मुष्टीभर दर्भ अभिमंत्रित केलेले टाकिले, तेव्हां ते दर्भ एकास एक चिकटून रज्जूप्रमाणें लांब झाले व कूपांतील शेवटला दर्भ आंगठीस चिकटून, बाहेरील शेवटला दर्भ द्रोणाचार्याच्या हातांत आला. तो येतांच त्यानें ती आंगठी वर ओढून घेतली. हा चमत्कार पाहून मुलांनीं प्रार्थना केली कीं, आमची ही विटी काढून द्यावी. त्यावरून द्रोणाचार्यानें त्यांची विटी, वरील क्रमाप्रमाणेंच काढून दिली व जाण्यास सिद्ध झाला. त्या काळीं मुलांनीं पुसलें, आपण कोण, कोठें असतां व आपलें नांव काय, तें आम्हांस सांगावें. द्रोणाचार्य म्हणाला, तुमचा पितामह भीष्म मला जाणतो, व मी कृपाचार्यांच्या घरीं असतों. याप्रमाणें बोलून द्रोणाचार्य निघून गेला असतां, सर्व मुलें भीष्माकडे आलीं, व एका ब्राह्मणानें कूपांत पडलेली आमची विटी, अशा अशा प्रकारें बाहेर काढिली म्हणून त्यास सांगितलें. त्यावरून भीष्मानें अनुमान केलें कीं, हें कृत्य द्रोणाचार्यांचेंच निश्चयेंकरून आहे. मग तो लागलाच कृपाचार्यांच्या घरीं गेला, व द्रोणाचार्यांची भेट त्यानें मोठ्या सन्मानानें घेतली. पुढें प्रार्थना करून विनंति केली कीं, आपण येथें आलां, हें चांगलें झालें; तर आतां येथें राहून, हीं सर्व मुलें धनुर्विद्येंत प्रवीण करणें आपणाकडे आहे. असें म्हणून, एका सुंदर गृहांत सर्व वस्तूंची सिद्धता करून देऊन त्यांत द्रोणाचार्यास ठेविलें आणि सर्व मुलें त्याच्या स्वाधीन करून तो स्वगृहीं निघून गेला.

द्रोणाचार्यानें, भीष्मानें केलेली विनंति आपल्कालास्तव मान्य करून, सर्व मुलांस धनुर्विद्या शिकविण्यास आरंभ केला. हें वर्तमान कालेंकरून देशोदेशीं पसरल्यावर अंधक, वृष्णि, पांचाल, बाल्हीक, सौराष्ट्र, आदिकरून राजांनीं आपआपले पुत्र द्रोणाचार्याकडे विद्याभ्यासास पाठविले. यांतच कर्णानें व अश्वत्थाम्यानें अभ्यास केला. एकदां हिरण्यधनुक ना० निषादाचा पुत्र एकलव्य, द्रोणाचार्यासमीप येऊन म्हणूं लागला कीं, मलाही धनुर्विद्या शिकवावी; परंतु हें त्याचें म्हणणें यानें मान्य केलें नाहीं. त्यावरून त्यानें, द्रोणाचार्याच्या पादुका मागून घेतल्या, व अरण्यांत जाऊन द्रोणाचार्यांची मृण्मय मूर्ति करून, धनुर्विद्येंत उत्कृष्ट निपुण झाला ( एकलव्य श० पहा ) ( भार० आदि० अ० १३१–१३२ ).

द्रोणाचार्यासमीप जरी सहस्रावधि राजकुमार धनुर्विद्या संपादन करीत होते, तरी अर्जुनाची तत्परता, व तीव्र बुद्धि पाहून, त्यावर आचार्यांचें अत्यंत प्रेम वसलें. त्यास हयविद्या, गज, रथ, इ० विद्या चांगल्याच साध्य झाल्या. रहस्यमंत्रांत अश्वत्थामा प्रवीण झाला, गदायुद्धांत भीम व दुर्योधन, खड्गयुद्धांत नकुल आणि सहदेव, व रथयुद्धांत युधिष्ठिर, उत्तम प्रकारें प्रवीण झाले. याचप्रमाणें सर्व राजपुत्र आपआपल्या बुद्धीप्रमाणें धनुर्विद्यादिकांत निष्णात झाले असतां, एके दिवशीं द्रोणाचार्य सर्व शिष्यांस घेऊन नदीवर स्नानास गेले, व सर्वांचीं स्नानें झाल्यावर, आपण स्नानार्थ जलांत उतरले, तों दैवयोगानें असें झालें कीं, त्यांच्या पायांस नक्रानें धरिलें. त्यावरून आचार्य ओरडून सर्वांस म्हणाले कीं, मला नक्रापासून सत्वर सोडवा. तो शब्द ऐकून सर्व मुलें घावरलीं, व त्यांस काय करावें तें सुचेनासें झालें. परंतु अर्जुन न घावरतां, त्यानें तत्काळ बाण सोडून नक्राचा वध केला, व आचार्यांस त्यापासून मुक्त केलें ( भार० आदि० अ० १३३ ).

आचार्यांस अर्जुनानें मुक्त केल्यावर, त्यांनीं सुप्रसन्न होऊन ब्रह्मशिर ना० अस्त्र अर्जुनास दिलें व सर्व शिष्यांस गुरुदक्षिणा मागितली कीं, तुम्ही द्रुपदराजास बद्ध करून मजजवळ घेऊन यावें. त्यावरून आचार्यांस समागमें घेऊन सर्व विद्यार्थी पांचालपुरास गेले, व त्यांनीं द्रुपदाशीं युद्ध केलें; परंतु तो पराक्रमी असल्यामुळें त्यापुढें कोणाचा उपाय चालेना. असें पाहून, अर्जुन पुढें झाला, व त्यानें त्याशीं युद्ध करून त्यास बद्ध करीत होत्साता आचार्यांसमीप आणिलें. त्यास पाहून द्रोणाचार्यांनीं पूर्वीच्या अपमानाचें स्मरण दिलें, व पांचालाचे दोन भाग करून, एक भाग त्याकडेस ठेविला, आणि त्याला अभय देऊन मुक्त केलें ( भार० आदि० अ० १३८ ).

दुर्योधनानें पांडवांचा छळ करून, त्यांस वनवासास पाठविलें असतां, त्यांनीं प्रतिज्ञेप्रमाणें द्वादशवर्षें वनवास, व एक वर्ष अज्ञातवास भोगून, प्रकट झाल्यावर न्यायाप्रमाणें दुर्योधनानें आपणास अर्धराज्य द्यावें, यासाठीं हस्तिनापुरीं कृष्णास साम करण्यास पाठविलें. त्या प्रसंगीं द्रोणाचार्यांनें दुर्योधनास बहुत उपदेश केला, व सांगितलें कीं, भीष्म व मी अतिशय वृद्ध झालों आहों, यास्तव त्यांच्याशीं युद्धांत आमच्यानें टिकाव धरवेल असें होणार नाहीं. तर तूं पांडवांचा द्वेष न करतां त्यांचा विभाग त्यांस दे. न देशील तर व्यर्थ मरशील. परंतु दुर्योधन कांहींच वळेना असें पाहून द्रोणाचार्य म्हणाले, अश्वत्थाम्याहून अर्जुनावर माझी अधिक प्रीति आहे. असें असून या दुष्ट दुर्योधनामुळें त्याशीं मला युद्धाचा प्रसंग येणार, तस्मात् या क्षात्रधर्मास धिक्कार असो ( भार० उद्यो० अ० १३९ ).

दुर्योधनानें कोणाचेंही ऐकिलें नाहीं, व युद्धावरच प्रसंग आणिला. तेव्हां भीष्मास अनुसरून द्रोणाचार्यांनें अश्वत्थाम्यासह निरुपायास्तव त्याचा पक्ष धरिला. पुढें भारती युद्ध चालू होऊन, भीष्म १० दिवस युद्ध करून रणांत पडल्यावर, यास सैनापत्य प्राप्त झालें असतां, यानेंही पांच दिवसपर्यंत मोठें भयंकर युद्ध केलें. त्यांत प्रथम दिवशीं धृष्टद्युम्नाशीं याचें युद्ध झाल्यावर, दुर्योधनानें याची, युधिष्ठिर धरून मजजवळ द्यावा, अशी प्रार्थना केली. परंतु यानें अर्जुन येथें असतां हें माझ्यानें होणार नाहीं, म्हणून सांगतांच, त्यानें त्रिगर्तांस संशप्तक करून तिकडे अर्जुनास गुंतविलें. असें यानें पाहून, युधिष्ठिरास धरण्याचा बहुत यत्न केला; परंतु अर्जुनानें धृष्टद्युम्नास त्याच्या रक्षणाविषयीं निक्षून आज्ञा केली होती, तीमुळें त्यानें द्रोणाचार्याचा यत्न व्यर्थ केला. त्यावरून द्रोणानें अत्यंत कोपाविष्ट होऊन, प्रतिज्ञा केली कीं, उद्यीक पांडवांकडील कोणीतरी एक मोठा वीर मारीन. असें म्हणून त्यानें दुसऱ्या दिवशीं चक्रव्यूह रचिला, त्यांत अभिमन्यू सांपडून, त्याचा वध झाला ( २ अभिमन्यु श० पहा ).

अभिमन्यूच्या वधानें अर्जुन संतप्त होऊन, त्यानें जयद्रथवधाची प्रतिज्ञा केली. तीवरून द्रोणाचार्यानें त्या दिवशीं अत्यंत भयंकर असे एकांत एक तीन व्यूह रचिले; तथापि अर्जुनानें जयद्रथास मारिलें ( ३ जयद्रथ श० पहा ). जयद्रथ मरण पावला असें पाहून दुर्योधनास अनिवार दुःख झालें, व त्या दुःखानें तो आचार्यास म्हणूं लागला कीं, आपण नीट लक्ष्य लावून युद्ध करीत नाहीं. तें त्याचें भाषण ऐकून द्रोणास अनिवार क्रोध आला, व त्यानें अशी प्रतिज्ञा केली कीं, आज अस्तमानीं अंगांतून मुळीं मी कवचच काढणार नाहीं, रात्रीसही दीपिकांच्या प्रकाशानें युद्ध करीन, मग त्यांत होणार असेल तें होईल. हा विचार पांडवांस कळतांच, त्यांनींही दीपिकांची ( मशालींची ) सिद्धता केली. सारांश, तो दिवस युद्धाचा पंधरावा होता, व दिवसास झालेल्या युद्धानें, जरी उभयपक्षांचे वीर श्रमले होते,

तरी ईर्षेनें सर्वांनीं रात्रींही चांगलें युद्ध केलें. परंतु पहांटेच्या सुमारास कित्येक वीरांस निद्रेनें इतकें व्यापिलें कीं, हें युद्ध होत आहे, याचेंही त्यांस भान न राहतां, जेथें ज्यास जें स्थळ सांपडलें, तेथें तो निद्रित झाला. याच संधींत इंद्रवर्मा राजाचा नामांकित अश्वत्थामा ना० गज मरण पावला, असें पाहून कृष्णानें भीमास सुचविलें कीं, गज हीं दोन अक्षरें हळूच उच्चारून, अश्वत्थामा मरण पावला अशी गर्जना द्रोणाचार्यांसमीप जाऊन कर. त्याचप्रमाणें भीमसेनानें करितांच, ती गर्जना द्रोणाचार्यांच्या श्रवणारूढ झाली. तेणेंकरून तो युद्ध करीत असतां, त्यापासून एकाएकीं स्तब्ध झाला. आणि गज, हीं अक्षरें न ऐकिल्यामुळें, अश्वत्थामा पराक्रमी व चिरंजीवी असतां कसा मरण पावला, असें आश्चर्य करूं लागला. तथापि पुनरपि धैर्य धरून, त्यानें ब्रह्मास्त्र सोडिलें, व वीस सहस्र पांचाल, पंचशत मात्स्य आणि सृंजयवीर सहा सहस्र मारिले.

इतक्यांत असें झालें कीं, भीमसेनानें अश्वत्थामा मेला अशी पूर्ववतच पुनः गर्जना केली. ती ऐकून द्रोणाचार्य युधिष्ठिराकडे गेला, व त्यास त्यानें अश्वत्थाम्याविषयीं विचारिलें. त्यानेंही कृष्णाच्या सूचनेवरून भीमाप्रमाणेंच सांगितलें असतां, तो तेथून माघारा परतला तों, भरद्वाजादिक द्रोणाचार्यांचे पितर, त्यास प्रत्यक्ष होऊन म्हणूं लागले कीं, तूं वेदवेदांगपारग ब्राह्मण असून, तुला युद्ध करणें अनुचित आहे; तथापि झालें तें झालें. आतां तुझा अंतकाळ समीप आला असून, आम्ही तुला न्यावयास आलों आहों, तर तूं युद्ध सोडून शाश्वतमार्गाचा अवलंब कर. त्यावरून द्रोणाचार्य जीविताविषयीं निराश होऊन, त्यानें शस्त्र भूमीवर ठेविलें, व योगधारणा करून प्राणोत्क्रमण करीत आहे तों, धृष्टद्युम्नानें येऊन त्याचा शिरच्छेद केला ( भार० द्रोण० अ० १७० ).

द्रोणाचार्य, चार दिवस व एक अहोरात्र युद्ध करून मरण पावला. त्या वेळेस त्याचें वय चारशें वर्षांचें होतें ( भार० द्रोण० अ० १२५ श्लोक ७३ पहा ). मनुस्मृति अध्याय पहिला श्लोक ८३ यांत मनूनें " अरोगाः सर्वसिद्धार्थाश्चतुर्वर्षशतायुषः ॥ कृतेत्रेतादिपु ह्येषामायुर्ह्रसति पादशः " असें म्हटलें आहे. म्हणजे कृतयुगांत मनुष्य चारशें, त्रेतायुगांत तीनशें. द्वापारांत दोनशें आणि कलींत शंभर वर्षे वांचतो, त्यास हें मान साधारण आहे असें समजावें. कारण उक्तकालापूर्वी, जर अविचारी व अनियमित मनुष्य मरतो असें दृष्ट आहे, तर विचारी व नियमशील, वर वांचण्याचाही अवश्य संभव आहे.

द्रोणाचार्य उत्तमप्रकारचा सदाचारसंपन्न होता. प्रत्यहीं स्नान झाल्यावर प्रातःसंध्या करून अग्न्यौपासन झाल्याशिवाय तो युद्धास येत नसे, अशा विषयींचा दर्शक-याच्या रथावर कृष्णाजिन, कमंडलु आणि वेदी, या चिन्हांचा ध्वज असे ( भार०द्रोण० अ० २३ ). याची अंगकांति कृष्णवर्ण असून, कौरवपांडवांस, जेव्हां हा धनुर्विद्या शिकवूं लागला, तेव्हांच कुबड आलेला असून, वांकत चालणारा असा होता.

**द्रोणी**–भारतवर्षीय नदी.

**द्रोणायन**–भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**द्रौणि**–द्रोणपुत्र अश्वत्थामा. हा, प्रस्तुत चाललेला अठ्ठाविसावा पर्यय ( चौकडी ) समाप्त झाल्यावर, एकूणतिसाव्या पर्यायाच्या द्वापारांत, या नांवानें व्यास होणार आहे. " एकोनत्रिंशे संप्राप्ते द्रौणिर्व्यासो भविष्यति " ( व्यास० श० पहा. ).

**द्रौपदी**–द्रुपदराजाची कन्या कृष्णा ती. हिला पित्याच्या नांवावरून, पांचाली व याज्ञसेनी अशींही नांवें असत. ही द्रुपदराजाच्या यज्ञांत शचीच्या अंशानें अग्नींतून निर्माण झाली असून, हिची अंगकांति गौरवर्णांत किंचित् शामतामिश्रित असल्यामुळें, द्रुपदराजानें, हिचें नांव कौतुकानें कृष्णा असें ठेविलें होतें. ही उपवर झाली असतां, स्वयंवरांत पांडवांनीं हिला वरिलें ( द्रुपद श० पहा ). सुभद्रा ही कृष्णाची प्रत्यक्ष भगिनी असून, तिची द्रौपदी सपत्नी ( सवत ) असल्यामुळें, जरी कृष्ण हिला भगिनी मानीत होता, तरी मुख्यत्वें या नात्यास हिचा सुस्वभावच कारण होता. हिला **युधिष्ठिर**, **भीमसेन**, **अर्जुन**, **नकुल**, आणि **सहदेव**, या पांचांपासून **प्रतिविंध्य**, **श्रुतसेन**, **श्रुतकीर्ति**, **शतानीक**, **श्रुतकर्मा**, असे अनुक्रमें पांच पुत्र झाले होते. ते पांचही विश्वेदेवांचे अंश असून महारथी होते, व प्रायः द्रौपदेय अशा नांवानें प्रख्यात असत.

राजसूय यज्ञ झाल्यावर कपटद्यूतेंकरून कौरवांनीं पांडवांची संपत्ति हरण केली, व पांडवांसही पणास लावून घेऊन त्यांस जिंकल्यावर द्रौपदीस जिंकलें. नंतर तिला सभेंत आणिलें त्या काळीं हिनें भीष्मादिकांस प्रश्न केला कीं, मला दुर्योधनानें जिंकलें, हें यथार्थ कीं अयथार्थ ? त्यावरून भीष्म " धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां " असें बोलून मोकळा झाला. तथापि विदुर

आणि विकर्ण यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, तुला कौरव जिंकिलें म्हणतात हा अधर्म आहे ( भार० सभा० अ० ६७–६८ ).

पांडवांनीं बारा वर्षे वनवास, व एक वर्षपर्यंत अज्ञातवास केला, त्यांत ही होती. हिनें विराटगृहीं सैरंध्री नांव धारण करून सुदेष्णेचें सेवन केलें होतें ( भार० विराट० अ० ९ ). तेथें असतां कीचकानें हिजविषयीं पापबुद्धि धारण केली; परंतु ही त्यास वश झाली नाहीं, व तोच मरण पावला ( कीचक श० पहा ). पुढें अज्ञातवासांतून पांडव प्रकट झाल्या-वर,कौरवांकडे जाऊन साम करावें, अशा हेतूनें युधि-ष्ठिराच्या आज्ञेवरून कृष्ण जाऊं लागला असतां, भीमानें कृष्णास सांगितलें कीं, होईल तेथपर्यंत युद्धाचा प्रसंग टळेल असें कर. त्यावरून हिला अति-शय क्रोध आला, व आपला केशपाश हस्तांत धारण करून, ही कृष्णापुढें आली, आणि म्हणाली कीं, हे केश दुःशासनानें धरून मला अंतर्गृहांतून सभेंत ओढीत आणिलें याचें तुला स्मरण असूं दे. पांडव जर साम करूं इच्छित असतील, तर करोत, माझे पांच पुत्र अभिमन्यूच्या साह्यानें कौरवांशीं युद्ध करून त्यांस जिंकतील. कृष्णा, काय सांगूं, मी थोर कुलांत उत्पन्न झाल्यें असून,व थोरांची स्त्री असून, मजसारखी हतभाग्य स्त्री कोणीच नसेल ! असें म्हणून रुदन करूं लागली. त्यावरून कृष्णानें तिचें सांत्वन केलें आणि सांगितलें कीं, शोक करूं नको, कौरव नाश पावतील, असेंच मी करीन. असें बोलून कृष्ण हस्तिनापुरास गेला ( भार० उद्योग० अ० ८२ ).

द्रौपदी ही परमपतिव्रता, सद्गुणी,व क्षमाशील असे. हिचे पांच पुत्र निजल्या जागीं अश्वत्थाम्यानें मारिले असतां, भीमार्जुनांनीं त्यास धरून हिजपुढें आणून उभें केलें, व पुढें मारावें तों, हिला दया येऊन हिनें असें म्हटलें कीं, मी जशी माझ्या पुत्रांच्या मरणानें दुःखी झाल्यें आहें, अशीच याची माताही होईल. यास्तव याचा वध करूं नका. त्यावरून त्यांनीं अश्व-त्थाम्यास सोडून दिलें. सारांश, पुढें पांडवांनीं राज्य केलें व निजधामास जाऊं लागले तेव्हां, ही त्यांज-समागमें गेली, व मार्गानें जात असतां हिचा देह पतन पावला.

**द्रौपदेय**--द्रौपदीचे प्रतिविंध्यादिक जे पांच पुत्र, त्यांस म्हणत असत.

**द्वादशादित्य**--चालू मन्वंतरांत कश्यप ऋषीपासून, अदिती ना० त्याच्या ज्येष्ठ स्त्रीच्या ठायीं झालेले बारा आदित्यसंज्ञक देव ते. यांची गणना प्रस्तुतच्या सप्तविधदेवांत असून, भारतोक्त यांचीं नांवें आहेत तीं अशीं.--**धाता, मित्र, अर्यमा, शक्र, वरुण, अंशुमान्, भग, विवस्वान्, पूषा, सविता, त्वष्टा** आणि **विष्णु**. हीं नांवें पुराणांत मागें पुढें सां-गितलेलीं आढळतात,व शक्राच्या ठिकाणीं इंद्र, आणि विष्णूच्या ठिकाणीं उरुक्रम, इतकाच फेर दिसतो. वस्तुतः बारा संख्येंत कोठेंही फेर नाहीं.

**द्वापर**--चार युगांतील तिसरें, व त्याची मूर्तिमान् देवता. देवमानानें याचा काल २४०० वर्षांचा असून, मनुष्यमानानें आठ लक्ष चौसष्ट सहस्र असतो. याचा संधि व संध्यंशकाल आदि अंतीं मिळून देवमानानें ४०० वर्षांचा सांगितलेला आहे ( मत्स्य० अ० १६४ ).

**द्वारका**--कुशस्थलीना० नगरीसच हें नांव आहे. ही आनर्त देशाची राजधानी असून, येथें संपूर्ण यादवां-सहित कृष्ण व बलराम राहत असत.ही नगरी प्रथमतः भूमीवरच होती, परंतु जरासंध व कालयवन, हे वारंवार येऊन त्रास देत, त्यामुळें विश्वकर्म्याकडून हिचें स्थापन कृष्णानें समुद्रांत करविलें होतें. ही बारा योजनें विस्तीर्ण, व अत्यंत शोभायमान असे (भाग० दशम० अ० ५१ ). कृष्ण निजधामास गेल्यावर, हिला सातव्या दिवशीं समुद्रानें बुडविलें ( भार० मौसल० अ० ७ ). हिला द्वारवती, द्वारावती असेंही ग्रंथांतून म्हटलेलें आढळतें.

**द्विजराज**--चंद्रास नांव.

**द्विजिह्व**--लंकेंतील रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

२–सर्पास साधारण नांव (देवी० द्वितीय० अ० १२).

**द्वित**–ब्रह्ममानसपुत्रांतील एक.

२–गौतम ऋषीच्या तीन पुत्रांतील एक.

**द्विमीढ**–द्वितीयार्थक देवमीढ शब्द पहा.

**द्विमूर्धा**–अग्नि.

२–दनुपुत्र एक दानव.

**द्विविद**–सुषेण वानराच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. मैंद वानराचा कनिष्ठ भ्राता ( वा० रा० युद्ध० स० ७६). हा, दहा सहस्र गजांच्या बलानें युक्त असून, अंग-दाचा मातुल व सुग्रीवाचा सचिव असे. यानें युद्ध-समयीं रामाचें उत्तम साह्य केलें होतें.

२–नरकासुराचा मित्र एक वानर. कृष्णानें नरकासुरास

मारिलें असें ऐकून, हा कृष्ण व बलराम यांशीं अतिशय द्वेष करूं लागला. तो असा कीं, यानें वारंवार आनर्तदेशीं येऊन पुरें, घोष, गृहें, दग्ध करावीं, मोठमोठाले पाषाण आणून देशांवर टाकावे, देशांतील कुलस्त्रिया भ्रष्ट कराव्या, आणि ऋषींस त्रास द्यावा. एकदां बलराम रैवतक पर्वतीं स्त्रियांसहित क्रीडा करावयास गेला असतां, तेथें जाऊन हा त्यास उपद्रव करूं लागला, तेव्हां बलरामाचें व याचें युद्ध होऊन, त्यांत हा त्याच्या हातून मरण पावला ( भाग० १० स्कं० अ० ६७ ).

**द्वैतवन**–हें वन सरस्वती नदीतिरीं असून यासमीप मरुधन्व देश आहे ( भार० शल्य० अ० ३७ ). पांडव हस्तिनापुरांतून वनवासास निघाले, त्या काळीं ते प्रथमतः या वनांत आले होते. येथें कांहीं काळ राहून, पुढें काम्यक वनांत गेल्यावर, द्वैपायनादिक अनेक ऋषि त्यांस येऊन भेटले. तेथें युधिष्ठिराशीं सर्व भ्राते व द्रौपदी यांचा धर्मपर संवाद झाला होता. प्रतिस्मृति ना० विद्या, ताहीं युधिष्ठिरास प्राप्त होऊन, त्यानें ती अर्जुनास उपदेशिली. नंतर सर्व पांडव पुनः याच वनांत आले ( भार० वन० अ० २३–२६ ).

पांडव तीर्थयात्रा करीत नरनारायणाश्रम, आर्ष्टिषेणाश्रम, आदिकरून स्थलें अवलोकन करून गंधमादनपर्वतीं ( हिमालयाच्या शिखरविशेषीं ) गेले असतां, अस्त्रें संपादन करून स्वर्गीहून अर्जुन आलेला त्यांस भेटला. नंतर यामुनपर्वतीं नहूषाचा उद्धार झाला. ( यामुन श० पहा ). तेथून पांडव निघून या वनांत आले, व चातुर्मास्य राहिले. येथें असतां युधिष्ठिरास असा स्वप्न झाला कीं, तुम्ही या वनांत राहिल्यानें येथील बहुतेक मृग नष्ट झाले असून, बीजभूत मृग मात्र कांहीं अवशिष्ट राहिले आहेत. तेही तुम्हीं आणखी येथें राहिल्यास नष्ट होतील, यास्तव तुम्हीं दुसऱ्या वनांत जावें. त्यावरून युधिष्ठिर येथून निघून काम्यक वनांत गेला ( भार० वन० अ० २५८ ).

**द्वैपायन**–कृष्णद्वैपायन जो प्रस्तुतचा व्यास तोच.

**द्वैपायनऱ्हद**–या नांवाचा एक डोह. यांत दुर्योधन लपला होता, व त्यास युधिष्ठिरादिकांनीं बोध करून युद्धास नेलें होतें.

**द्व्यक्षी**–अशोकवनिकेंतील एक राक्षसी.

**द्व्याख्येयव**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

---

## ध.

**धनक**–( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजित् त्याच्या वंशांतील भद्रसेनक अ० रुद्रश्रेण्य राजाच्या दोन पुत्रांतील दुसरा. यास कृतवीर्य, कृताग्नि, कृतवर्मा आणि कृतौजा असे चार पुत्र होते.

**धनंजय**–चालू मन्वंतरांतील सोळावा व्यास ( व्यास श० पहा ).

२– अत्रिकुलोत्पन्न एक ऋषि ( २ अत्रि श० पहा ).

३– एक ब्रह्मर्षि. याची स्त्री कुमारी ( भार० उद्योग० अ० ११७ ).

४– एक ब्रह्मर्षि ( १ विश्वामित्र श० पहा ).

५– कद्रुपुत्र एक नाग. हा माघमासीं सूर्यासमागमें असतो ( तपा श० पहा ).

६– शरीरस्थ पंच उपप्राणांतील एकाचें नांव.

७– अग्नीचें नांव.

८– अर्जुनाचें नांव.

**धनद**–कुबेर. अशा अर्थाचीं यास अनेक नांवें आहेत. जसें श्रीद इ० आणि ईश अशा अर्थानें धनेश, वित्तेश इ०.

**धनरत्न**–द्वितीयार्थक चंद्रकांतनगर तेंच.

**धनिष्ठा**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक, प्राचेतस दक्षाची कन्या.

**धनी**–कप ना० देवांचा दूतवि०.

**धनुर्ग्रह**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**धनुर्वेद**–यजुर्वेदाचा उपवेद व त्याची मूर्तिमान् देवता. हा ब्रह्मदेवाच्या दक्षिणमुखांतूनच यजुर्वेदाप्रमाणें निघाला होता.

**धनुपाक्ष**–एक ब्रह्मर्षि ( बालधी श० पहा ).

**धनुष्य**–प्रथमार्थक उपरिचराच्या सोळा ऋत्विजांतील एक.

**धन्या**–उत्तानपादपुत्र ध्रुवाची स्त्री.

**धन्वंतरी**–समुद्रमंथनानंतर त्यांतून निघालेला आयुर्वेदप्रवर्तक देव तो ( भाग० अष्टम० अ० ८ ).

२– ( सो० वं० ) आपुत्र क्षत्रयुद्ध, तद्वंशीय काश्यकुलोत्पन्न दीर्घतमा राजाचा पुत्र. याचा पुत्र केतुमान्.

**धन्वती**–पारियात्र पर्वतापासून निघालेली भारतवर्षीय नदी.

**धन्वी**–चौथ्या तामसमनूच्या दहा पुत्रांत एक होता पुत्र तो.

**धमनी**–ऱ्हाद ना० असुराची स्त्री.

**धमिल्ला**–अनुशाल्व राजाची स्त्री ( जैमि० अश्वमे० अ० ६१ ).

**धर**—अष्टवसूंतील एक. यास कल्याणिनी स्त्री, व द्रविण ना० पुत्र होता.

**धरणीस्थ**—एक ऋषि.

**धरा**—द्रोण ना० वसूची स्त्री हीच कृष्णावतारीं नंदस्त्री यशोदा झाली होती.

२– पृथिवीस नांव.

**धरिणी**—अग्निष्वात्तादिक पितरांच्या दोन कन्यांतील एक, वयुनेची भगिनी. ही ब्रह्मनिष्ठ होती.

२– अष्टवसूंतील एका वसूची स्त्री.

**धर्म**—धर्मऋषि.

२–चार पुरुषार्थांतलि एक.

३– यमास नांव.

४– ( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजित् तद्वंशीय हैहय राजाचा पुत्र. याचा पुत्र नेत्र.

५– ( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय पृथुश्रवा राजाचा पुत्र. याचा पुत्र उशना.

६– ( सो० वं० ) द्रुह्युकुलोत्पन्न गांधार राजाचा पुत्र. याचा पुत्र धृत.

७– पंडुपुत्र युधिष्ठिरास म्हणत असत.

**धर्मऋषि**—स्वायंभूमन्वंतरांत स्तनाग्रापासून उत्पन्न झालेला ब्रह्ममानसपुत्र. यास, त्याच मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र दक्षानें आपल्या १६ कन्यांतील तेरा कन्या भार्यार्थ दिल्या होत्या. त्यांचीं नांवें.—**श्रद्धा, मैत्री, दया, शांति, तुष्टि, पुष्टि, क्रिया, उन्नति, बुद्धि, मेधा, तितिक्षा, ऱ्ही,** आणि **मूर्ति**, या प्रत्येकीस क्रमानें बारांपर्यंत **शुभ, प्रसाद, अभय, सुख, संतोष** अ० **हर्ष, गर्व, योग, अभिमान, अर्थ, स्मृति, क्षेम,** आणि **प्रश्रय,** असा एकेक पुत्र होता. व तेरावी मूर्ति, तिला **नरनारायण** या नांवाचे दोन पुत्र होते ( देवीभा० ४ स्कं० अ० १६.) ( भाग०४ स्कंध अ० १० ).

२.—तिसऱ्या उत्तम मन्वंतरांतील विष्णु अवताराचा पिता. या धर्मास सूनृता ना० स्त्री होती.

३– वैवस्वत मन्वंतरांतलि ब्रह्ममानसपुत्र. यास उत्तानपादवंशीय प्राचेतस दक्ष ना० राजानें, आपल्या साठ कन्यांतून १० कन्या भार्यार्थ दिल्या होत्या. त्यांचीं नांवें अशीं होतीं;—**मरुत्वती, वसु, यामी, लंबा, भानु, अरुंधती, संकल्पा, मुहूर्ता, साध्या,** आणि **विश्वा.** यांत पहिलीस मरुत्वान् आणि जयंत, असे दोन पुत्र होते. दुसरीचे अष्टवसु, तिसरीचा स्वर्ग ना० पुत्र व नागवींथी ना० कन्या, चौथीचे घोषसंज्ञक पुत्र, पांचवीचा पुत्र देवऋषभ, साहवींचे कित्येक प्राणी, सातवींचे संकल्पसंज्ञक देव, आठवींचे मूहूर्त ना० देव, नववीचे साध्यदेव, आणि दाहावीचे विश्वेदेव ( मत्स्य० अ० २०२ ). ( भार० आदि० अ० ६६ ).

४– एक ब्रह्मर्षि. याची स्त्री धृति ( भार० उद्योग० अ० ११७ ).

**धर्मकेतु**– ( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, तद्वंशीय काश्यकुलोत्पन्न सुकेतन राजाचा पुत्र. याचा पुत्र सत्यकेतु.

**धर्मध्वज**—रथध्वज ना० राजाचा पुत्र, कुशध्वजाचा ज्येष्ठ भ्राता. याची कन्या तुलसी.

२– (वि० वं०) कुशध्वज जनकाचा पुत्र. यास कृतध्वज आणि मितध्वज, असे दोन पुत्र होते.

**धर्मपाल**—दशरथाच्या आठ अमात्यांतील मंत्रपाल ना० अमात्य तो. वा० रा० बाल० स० ७ ).

**धर्मप्रस्थ**—भारतवर्षीय तीर्थ.

**धर्मभृत्**—दंडकारण्यांतील एक ऋषि (वा०रा० अर० स० ११ ).

**धर्मरथ**– ( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न अंगवंशीय दिविरथ राजाचा पुत्र, यास बृहद्रथ असें म्हणत असत, व याला चित्ररथ अ० रोमपाद ना० पुत्र होता.

**धर्मराज**—यमास व युधिष्ठिरास म्हटलेलें आहे.

**धर्मवर्धन**—केकयदेशांतून अयोध्येस येतांना मार्गांत भरतास लागलेला ग्रामवि० ( वा० रा० अयो० स० ७१ ).

**धर्मवृद्ध**– ( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय श्वफल्काच्या तेरा पुत्रांतील एक. अकुर यादवाचा भ्राता.

**धर्मव्याध**- मिथिला नगरींत राहणारा एक व्याध. एकदां कोणी ब्राह्मण वृक्षाखालीं अध्ययन करीत बसला असतां, बलाकानें ( बगळीनें ) त्याच्या अंगावर मलविसर्जन केलें म्हणून त्यानें वर पाहिलें, तों ती बगळी दग्ध झाली. तेणेंकरून त्यास तपाचा किंचित् गर्व आला, व नित्याप्रमाणें ग्रामांत मधुकरीस जातां जातां कोणी पतिव्रतेच्या घरीं गेला.

तेथें भिक्षेस तिजकडून विलंब झाल्यामुळें, त्यानें तिजकडे क्रोधानें पाहिलें; परंतु ती दग्ध झाली नाहीं. म्हणून तो खेद करीत आहे इतक्यांत, ती त्यास म्हणाली, ब्राह्मणा, तूं बगळी दग्ध केलीस, तें मी जाणत्यें, व तूंही, मी पतिव्रता असल्यामुळें दग्ध झाल्यें नाहीं असें जाणत असशील. अस्तु. आतां तुला इतकेंच सांगत्यें कीं, तूं मिथिला नगरीस जा, व तेथें धर्म नांवाचा कोणी व्याध आहे, तो मजपेक्षांही

ज्ञानी असल्यामुळें, तुला कांहीं संशय असतील ते त्यास विचार. त्यावरुन ब्राह्मण तिकडे गेला, व त्याचा याचा बराच संवाद होऊन, स्त्रियांस पतिसेवा व पुत्रांस माता–पितरांची सेवा श्रेष्ठ इ० सिद्धांत, व आपली पूर्वकथा सांगून, यानें त्यास मार्गस्थ केलें ( भार०वन०अ०२०६–२१६ ).

**धर्मसारथि**–( सो० वं० ) आयुपुत्र अनेना तद्वंशीय त्रिककुत् राजाचा पुत्र. याचा पुत्र शांतरय.

**धर्मसावर्णि**–पुढें होणारा अकरावा मनु, याचें मन्वंतर याच्याच नांवानें चालून, यास मेरुसावर्णि असेंही लोक म्हणतील. सत्य, धर्म इ०यास दहा पुत्र होतील. विहंगम, कामगम, निर्वाणरुचि, या नांवाचे स्वर्गांत त्रिविध देव होऊन, त्यांचा स्वामी वैधृति ना० इंद्र होईल. तसेंच अरुण आदिकरुन सप्तर्षि होऊन, आर्यक ना० कोणी ब्राह्मणास वैधृता भार्येच्या ठायीं धर्मसेतु ना० विष्णूचा अवतार होऊन तो इंद्राचें साह्य करील ( भाग०अष्टम०अ०१३ ).

**धर्मसूत्र**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न जरासंधवंशांतील सुव्रत राजाचा पुत्र. याचा पुत्र शम.

**धर्मसेतु**–धर्मसावर्णि मन्वंतरांत होणारा विष्णूचा अवतार.

**धर्मसेन**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न युवनाश्व पुत्र मांधाता राजा, त्याच्या अंबरीष ना० पुत्रास नामांतर.

**धर्मा**–चालू वैवस्वत मन्वंतरांतील चौदावा व्यास (व्यास श० पहा ).

**धर्मारण्य**–एक ब्रह्मर्षि. यानें पद्मनाभ ना० नागापासून अध्यात्मविद्या संपादन केली होती, व कृतार्थ झाला होता ( भार०शांति०अ०३६१ ).

२–पुरूरवापुत्र विजय, तत्कुलोत्पन्न मूर्तय राजानें स्थापिलेलें नगर.

३–एक अरण्य व तत्संबंधीं तीर्थ.

**धर्मेयु**–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्व राजाच्या दशपुत्रांतील एक.

**धातकी**–प्रियव्रतपुत्र वीतिहोत्र, त्याच्या दोन पुत्रांतील एक. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२–पुष्कर द्वीपांतील दुसरा वर्ष.

**धाता**–ब्रह्मदेव.

२–स्वायंभुव मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र भृगुऋषि, त्यास ख्याति ना० भार्येपासून झालेल्या तीन पुत्रांतील पहिला. यास मेरुकन्या आयती ती स्त्री असून, तिजपासून मृकंड ना० पुत्र झाला होता.

३–द्वादशादित्यांतील एक. हा चालू मन्वंतरांत प्रतिवर्षी चैत्रमासांत सूर्यमंडलाचा अधिपति होत असतो ( ९ मधु श० पहा ).

**धात्रेय**–एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

**धान्यमालिनी**–रावणाच्या स्त्रियांतील एक. हिचा पुत्र अतिकाय ( वा० रा० सुंदर० स० २२ ).

२–शापानें मकरी झालेली एक अप्सरा. कालनेमि राक्षसाच्या वधकालीं, हिचा मारुतीनें उद्धार केला होता.

**धान्यायनि**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**धामा**–ऋषिवि०. ( भार० उद्योग० अ० १११ ).

**धारा**–भारतवर्षीय नदी.

**धारातीर्थ**–तीर्थवि०.

**धार्तराष्ट्र**–दुर्योधनादिक जे धृतराष्ट्राचे शतपुत्र ते सर्व.

**धार्मिक**–दाशरथि रामाच्या सुज्ञ ना० मंत्र्याच्या पुत्रांतील एक.

**धार्ष्ट**--धृष्टकुलोत्पन्न क्षत्रिय जे ब्राह्मण झाले, त्यांस संज्ञा.

**धिषणा**–प्रथमार्थक हविर्धानीस नामांतर.

२–कृशाश्व ऋषीची दुसरी स्त्री.

**धीमान्**–तामस मन्वंतरांत जे सप्तर्षि होऊन गेले,त्यांतील एक.

**धुंधु**–एक असुर. मधुकैटभाचा पुत्र ( भार० वन० अ० २०२ ). हा, वाळूमध्यें पुरुन घेऊन तप करी, व वर्ष पूर्ण झाल्यावर एकदां श्वास सोडी. यास ब्रह्मदेवांनीं तूं अवध्य होशील, असा वर दिला होता. तथापि यास, उत्तंक ऋषीच्या प्रेरणेनें सूर्यवंशीय कुवलाश्व राजानें मारिलें.

**धुंधुमार**–कुवलाश्वराजास नामांतर.

**धूतपाप**–भारतवर्षीय तीर्थ.

**धूतपापा**–भारतवर्षीय नदी ( २ हिमालय श० पहा ).

**धूतवाहिनी**–भारतवर्षीय नदी ( ऋष्यवान् श०पहा ).

**धूमकेतु**–दैत्यवि० ( वा० रा० उत्तर० स० २२ ).

**धूमावति**–भारतवर्षीय नदी.

**धूमित**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**धूमिनी**–सोमवंशीय अजमीढ राजाच्या चार स्त्रियांतील एक.

**धूमोर्णा**–यमाची स्त्री.

२–मार्कंडेय ऋषीची स्त्री ( भार० अनु० अ० १४६ श्लो० ४ ).

**धूम्र**–एक ब्रह्मर्षि.

२–गद्गदवानराचा पुत्र. रामसेनेंतील एक वानर.

**धूम्रकेतु**–प्रियव्रतवंशीय ऋषभदेवाचा पौत्र. भरतास पंचजनीपासून झालेल्या ५ पुत्रांतील कनिष्ठ.

२–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न तृणबिंदु राजास, अलंबुषा अप्सरेपासून झालेल्या तीन पुत्रांतील कनिष्ठ.

**धूम्रकेश**–उत्तानपादवंशीय पृथुराजास, अर्चिभार्येपासून झालेल्या पांच पुत्रांतील दुसरा.

२–कृशाश्वऋषीस अर्चिभार्येपासून झालेला पुत्र.

**धूम्रपराशर**–पराशरकुलोत्पन्न एक ऋषि. याच्या कुलांत **खल्वायन, वार्ष्णायन, तैलेय, यूथप** आणि **तंति**, असे पांच ऋषि प्रख्यात होते.

**धूम्रलोचन**–कालिकेनें मारिलेला शुंभनिशुंभांचा प्रधान एक असुर.

**धूम्रानीक**–प्रियव्रतपुत्र मेधातिथि त्याच्या सात पुत्रांतील चवथा. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२–शाकद्वीपाच्या सात वर्षांतलि चौथा वर्ष.

**धूम्राश्व**–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न हेमचंद्राचा पौत्र, व सुचंद्र राजाचा पुत्र. यास धूम्राक्ष असेंही म्हटलेलें असून, यास संयम अ० सृंजय नांवाचा पुत्र होता.

**धूम्राक्ष**–वरील शब्द पहा.

२–लंकेंतील रावणपक्षीय एक राक्षस ( भार० वन० अ० २८६ ). यास मारुतीनें मारिलें होतें ( वा० रा० युद्ध० स० ५२ ).

**धूर्जटि**–महादेव.

**धृत**–( सो० वं० ) द्रुह्युकुलोत्पन्न धर्माचा पुत्र. याचा पुत्र दुर्मना.

**धृतदेवा**–वसुदेवाच्या स्त्रियांतील एक. देवकराजाची कन्या. हिचा पुत्र विपृष्ठ.

**धृतराष्ट्र**–कश्यपास मुनी भार्येपासून झालेल्या देवगंधर्वांतील एक. हा, आश्विनमासीं सूर्यासमागमें असतो ( ३ इष श० पहा ). यास एकदां इंद्रानें मरुत्तराजाकडे कांहीं निरोप सांगण्यास पाठविलें होतें ( भार० अश्वमे० अ० १० ).

२–कश्यपापासून कद्रूस झालेल्या नागांतील एक. यापासून अनेक नागकुळें निर्माण झालीं होतीं. त्यांतून जनमेजय याच्या सत्रांत जळालीं; त्यांचीं नांवें अशीं–शंकुकर्ण, पिठरक, कुठारमुख, सेचक, पूर्णांगद, पूर्णमुख, प्रहास, शकुनि, दरि, अमाहठ, कामठक, सुषेण, मानस, अव्यय, भैरव, मुंड, वेदांग, पिशंग, उद्रपारक, ऋषभ, वेगवान. पिंडारक, महाहनु, रक्तांग, सर्वसारंग, समृद्ध, पटवासक, वराहक, वीरणक, सुचित्र, चित्रवेगिक, पराशर, तरुणक, मणिस्कंध आणि आरुणि.

३–विरोचन दैत्याचा पौत्र, व बलीच्या शतपुत्रांतील एक.

४–एक राजा. याजकडे एकदां बकदाल्भ्य ऋषीनें येऊन यज्ञार्थ पशु मागितला; परंतु यानें त्याचा उपहास करून म्हटलें कीं, ही मृत धेनु घेऊन जावी. त्यावरून ऋषीस क्रोध येऊन, त्यानें यास भय उत्पन्न केलें. त्यावरून राजा त्यास शरण आला, व त्याला त्यानें पशु देऊन मार्गस्थ केलें ( भार० शल्य० अ० ४१ ).

५–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय जन्हु राजा, त्याच्या वंशांतील शंतनुपुत्र विचित्रवीर्य, तो मरण पावला असतां, सत्यवतीच्या आज्ञेनें कृष्णद्वैपायन व्यासानें, त्याची ज्येष्ठ स्त्री अंबिका, तिच्याठायीं उत्पन्न केलेला पुत्र ( भार० आदि० अ० १०५–१०६ ). हा जन्मांध असून, हंस ना० गंधर्वाच्या अंशानें जन्मास आला होता (भार० आदि० अ० ६७ ). व मोठा झाल्यावर, भीष्मानें सुबल राजाची कन्या गांधारी, तिशीं याचा विवाह केला ( भार० आदि० अ० ११० ). यापासून गांधारीस, कलीच्या अंशानें दुर्योधन, व पौलस्त्यांच्या अंशानें दुःशासनादिक नव्याण्णव मिळून शतपुत्र झाले होते, व दुःशला ना० एक कन्या, सर्वांमागून झाली होती. याशिवाय युयुत्सु या नामेंकरून यास एक दासीपुत्रही होता.

याच्या शतपुत्रांत, दुर्योधन, दुःशासन, दुःसह, दुर्मर्षण, विकर्ण, चित्रसेन, विविंशति, जय, सत्यव्रत, पुरुमित्र, हे दहा–व दासीपुत्र युयुत्सु, मिळून अकरा महारथी होते ( भार० आदि० अ० ६३ ). त्यांमध्यें दासीपुत्र शिवायकरून, महारथी दहा, व इतर नव्वद भारती युद्धांत भीमसेनाने मारिले. धृतराष्ट्राच्या शतपुत्रांत एक विकर्ण मात्र नीतिमान् होता (विकर्ण श० पहा ). धृतराष्ट्रानें आपली कन्या दुःशला सिंधुदेशाचा राजा वृद्धक्षत्र, त्याच्या जयद्रथ ना० पुत्रास देऊन, इतरांचेही, यथायुक्त कन्या पाहून विवाह केले होते.

धृतराष्ट्र हा ज्ञाता असून, आपल्या उन्मार्गवर्ती पुत्रांच्या वात्सल्यास्तव ( ममतेस्तव ) त्यांच्या अधीन होऊन वागे, व त्यांस, त्याला निग्रह करण्याचें

सामर्थ्य असतां करीत नसे, हा मोठाच दोष याच्याठायीं होता. बाल्यापासून दुर्योधनानें पांडवांचा द्वेष आरंभून अनेक रीतीनें त्यांचा छळ केला. तो असा कीं, युक्तीनें त्यांस वारणावत ना० नगरांत घालवून, तेथें त्यांना, व पित्याला नकळत लाक्षागृह निर्माण केलें, व त्यांस दग्ध करण्याचा विचार केला; परंतु तो फसून, पांडव त्यांतून वांचले. व तेथून निघून त्यांनीं द्रुपदपुरांत जाऊन द्रौपदीस वरिलें. पांडव दग्ध झाले, असें धृतराष्ट्रानें ज्या दिवशीं ऐकिलें, त्या दिवशीं त्यानें बहुत शोक केला; परंतु तो केवळ बाह्यात्कारीं मात्र होता, असें त्याच्या पुढील कृतीवरून अनुमान होतें. तें असें.–द्रुपदपुरांत पांडव प्रकट झाल्यावर, लोकांनीं आपणास दुष्ट म्हणूं नये अशा हेतूनें, यानें पांडवांस परत आणून, त्यांस अर्ध राज्य दिलें, व खांडवप्रस्थांत ( इंद्रप्रस्थांत ) त्यांस राहण्याची आज्ञा केली. तेथें त्यांनीं आपल्या पराक्रमानें अपार संपत्ति मिळवून राजसूययज्ञ केला. तें त्यांचें ऐश्वर्य पाहून, कपटद्यूतेंकरून जेव्हां दुर्योधन हरण करूं लागला, तेव्हां संजयास आपणासमीप बसवून त्यास वारंवार काय जिंकलें, काय जिंकलें, असें पुसे, व अमुक अमुक जिंकलें, असें त्यानें सांगितलें कीं, त्यास पराकाष्ठेचा हर्ष होई. अशीच द्रौपदीची विटंबना केली असतांही, हा कांहींएक बोलला नाहीं.

पुढें पांडव, आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें वनवासास गेले, व तो करून, अज्ञातवासांतून ते प्रकट झाल्यावर, त्यांनीं राज्याचा विभाग मागितला. तें यास बरें न वाटून, त्यांकडे यानें चमत्कारिकच निरोप सांगून संजयास पाठविलें. त्या निरोपांतील तात्पर्य असें.–हे युधिष्ठिरा, तूं धर्मनिष्ठ आहेस, याकरितां क्रूर युद्धास प्रवृत्त होऊं नकोस. दुर्योधनानें तुला राज्यविभाग नच दिला तर, तूं भिक्षेनें उपजीविका कर; परंतु युद्ध करून तेरा वर्षे आचरिलेल्या तपाचा व कीर्तीचा नाश करून घेऊं नकोस. देह हा क्षणविनाशी आहे. याच्या ठायीं अहंता धरून, नश्वर विषयांच्या ठायीं सुज्ञ पुरुष आसक्त होत नाहींत. तर जीवमान आहे तोंपर्यंत ते तपांतच आपलें आयुष्य घालवून परलोकचे अक्षय भोग भोगण्याकडे दृष्टि ठेवून असतात. म्हणून तूं तसेंच करावेंस. असा स्वार्थपर धृतराष्ट्राचा उपदेश संजयानें सांगितलेला ऐकून, युधिष्ठिरास व इतरांस मोठें आश्चर्य झालें. व त्यावरून त्यानें धर्माधर्मपर संजयाशीं बरेंच भाषण केलें. नंतर कृष्ण संजयास म्हणाला, संजया, कौरवांनीं पांडवांचे बहुत अपराध केले आहेत, यास्तव त्यांचा नाशच होणें योग्य आहे. आम्ही आजपर्यंत तुम्हाविषयीं पुष्कळ क्षमा धरिली, परंतु आतां युद्धाशिवाय तुम्ही ऐकतच नाहीं, त्या अर्थी युद्धच करणें आम्हास आवश्यक आहे. इतक्यांत युधिष्ठिर म्हणाला, संजया, अर्ध राज्य राहिलें, आम्हां पांचजणांस पांच गांव तरी द्या, परंतु कुलांचा नाश करून घेऊं नका. सारांश, असा निरोप व वृद्धांस वंदनें सांगून युधिष्ठिरानें संजयास मार्गस्थ केलें ( भार० उद्योग० अ० २३–३१ ).

संजय युधिष्ठिराकडून उपप्लव्य नगराहून निघून, धृतराष्ट्राकडे हस्तिनापुरीं आला, व त्यानें भीष्म, द्रोण इ०कांसहित सभेंत धृतराष्ट्र बसला आहे असें पाहून, पांडवांकडील निरोप सांगितला. नंतर पुनः बोलला कीं, पांडवांशीं साम केलें तरच कौरव वांचतील. दुर्योधन, कर्ण इ० मूर्खांच्या बुद्धीस लागून युद्धच करशील, तर कौरवांचा समूळ नाश होईल. कृष्णानें तर असें सांगितलें आहे कीं, तुम्ही दान करून घ्या; सुहृदांस भेटा, स्त्रियांशीं विलास करून घ्या; कारण तुमचा मृत्यु समीप आला आहे. असा संजयानें सांगितलेला पांडवांचा निरोप ऐकून, दुर्योधनादिक दुष्ट व तत्पक्षपाती राजे क्रोधानें सभेंतून उठून गेले. परंतु धृतराष्ट्र भयभीत होऊन, पांडवांस अर्ध राज्य देण्याचा त्यानें निश्चय केला. इतक्यांत दुर्योधन तेथें पुनः येऊन म्हणूं लागला कीं, तूं अर्ध राज्य पांडवांस कशाचें देतोस ? ते आपणास पांच गांव मागतात, अर्थात् ते आपणास भितात, हें उघड आहे. यास्तव मी त्यांशीं युद्धच करून त्यांस जिंकीन ( भार० उद्योग० अ० ५५ ). इतकें बोलून दुर्योधन गेल्यावर, विदुर, व्यास, आणि गांधारी, यांच्या साक्षीनें संजय धृतराष्ट्रास म्हणाला, धृतराष्ट्रा, कृष्ण तुला अगदीं सामान्य वाटतो, परंतु हें वाटणें फार दिवस न टिकतां, कालरूपानें तो तुझ्या कुलाचा नाश करील. यास्तव विचार कर ( भार० उद्योग० अ० ५९–७० ).

पुढें थोड्याच दिवसांनीं धृतराष्ट्राकडे साम करण्यासाठीं युधिष्ठिरानें कृष्णास पाठविलें ( ४ कृष्ण श० पहा ). कृष्ण परत गेल्यावर भारतीयुद्धास आरंभ होऊन, कौरवपक्षीय राजे, व याचे शतपुत्र, त्यांत संपूर्ण मरण पावले. मात्र कृपाचार्य, अश्वत्थामा, आणि कृतवर्मा, तिघे वांचले, असें धृतराष्ट्रानें ऐकून, तो पुत्रशोकानें अगदीं दग्धप्राय झाला, व गांधारी स्त्री, शतस्नुषा यांसहित रणभूमिवर येऊन अनेकप्रकारें

शोक करूं लागला. इतक्यांत युधिष्ठिर समीप येऊन, त्यानें यास वंदन केलें. त्यावरून धृतराष्ट्रानें त्यास आलिंगन देऊन आशीर्वाद दिला. नंतर भीमास आलिंगन द्यावें म्हणून, त्यास हा बोलावूं लागला असतां, भीम पुढें जाऊं लागला तों, कृष्णानें त्यास मागें ओढून घेतलें, व लोहमय भीमाची प्रतिमा कृष्णानें पूर्वीच करविलेली भेटण्यास पुढें केली. तिला धृतराष्ट्रानें इतक्या क्रोधेंकरून व बलेंकरून प्रत्यक्ष भीमच आहे असें जाणून आलिंगन दिलें कीं, त्या लोहप्रतिमेचें अगदीं चूर्ण झालें (भार० स्त्री० अ०१२).

युधिष्ठिर बंधूंसहवर्तमान हस्तिनापुरांत राज्याभिषेक होऊन राज्य करूं लागला असतां, त्यानें धृतराष्ट्र आणि गांधारी, या उभयतांस आपणासमीप ठेवून, मातापित्याप्रमाणें त्यांचा सत्कार ठेविला. याप्रमाणें त्यांनीं तेथें पंधरा वर्षे वास केला. परंतु भीमसेन कधीं कधीं त्यांस मर्मभेदक भाषण करी, तेणेंकरून यास इतकें दुःख होई कीं, येथें राहणें नको. युधिष्ठिरास राज्याभिषेक झाल्यावर, अल्पच काळपर्यंत विदुर हस्तिनापुरांत होता. पुढें कांहीं अरण्यांत, व कांहीं नगरांत, असा काळ कंठीत असतां असतां, नंतर अरण्यांतच सतत राहूं लागला. एकदां तो फिरत फिरत धृतराष्ट्राकडे आला, व त्यानें त्याची पराकाष्ठेची निर्भर्त्सना केली. ती अशी कीं, तुझे शतपुत्र पांडवांनीं मारिले असतां, त्यांच्याच घरीं श्वानाप्रमाणें पिंड भक्षीत राहिला आहेस, त्याचा तुला कसा अपमान वाटत नाहीं. तुझें वय निघून गेलें, शरीरास क्षीणता आली, तथापि अजून तुला जीविताशा सुटत नाहीं हें मोठें आश्चर्य आहे. याप्रमाणें विदुराची तीक्ष्ण भाषणें ऐकून, तो आधींच हस्तिनापुरांत राहण्यास उदास झाला होता म्हणून, त्यास तत्काळ वैराग्य उत्पन्न झालें, व दुसऱ्या दिवशीं पाहांटेस कोणासही न कळवितां, अरण्यांत जाण्यास विदुरासमागमें निघाला. त्यामागून गांधारी व कुंती ह्याही निघाल्या. नंतर त्यांसहित तो हिमवान् पर्वतावर गेला, व तेथें वानप्रस्थ धर्माप्रमाणें त्यानें तीन संवत्सरपर्यंत वास करून, योगाग्नीनें त्यानें आपल्या देहाचा त्याग केला. त्याच अग्नींत गांधारीनेंही आपला देह विसर्जिला. ( भार० आश्रम० अ० ३९ ). ( भाग० १ स्कं० अ० १३ ). धृतराष्ट्र अंध असून, बुद्धीनेंच सर्व विषय जाणणारा होता म्हणून, त्यास प्रज्ञाचक्षु असें नांव असे.

**धृतराष्ट्री**-ताम्रेच्या कन्यांतील एक.

**धृतवती**-भारतवर्षीय नदी.

**धृतवर्मा**-सूर्यवर्मा ना० त्रिगर्ताचा भ्राता ( भार० अश्व० अ० ७४ ).

**धृतव्रत**-स्वायंभूमन्वंतरांतील अथर्वण ऋषीस चित्ती ना० भार्येपासून झालेल्या तीन पुत्रांतील पहिला.

२-चक्षुर्मनूस नड्वलेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

३-( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न रोमपाद, तद्वंशीय धृतिराजाचा पुत्र. याचा पुत्र सत्कर्मा अ० सत्यकर्मा.

**धृतसेन**-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा ( भार० शल्य० अ० ६ ).

**धृतायुध**-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा ( भार० शल्य० अ० ७ ).

**धृति**-(विदे० वं०) वीतिहव्य जनकाचा पुत्र. याचा पुत्र बहुलाश्व जनक.

२-चतुर्थार्थक धर्मऋषीची स्त्री.

३-( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न रोमपादवंशीय विजय राजाचा पुत्र. याचा पुत्र धृतव्रत.

४-आठव्या सावर्णिमनूच्या पुत्रांत होईल एक पुत्र तो.

**धृतिमान्**-पांचव्या रैवतमनूच्या पुत्रांत होऊन गेलेला पुत्र तो.

२-कृतिमान् राजास नामांतर.

३-सुदरिद्र ब्राह्मणाच्या चार पुत्रांतील एक ( पितृवर्त्ती श० पहा ).

**धृष्ट**-वैवस्वतमनूच्या पुत्रांतील एक. याची संतति तपानें ब्राह्मण झाली होती, व तिला धार्ष्ट अशी संज्ञा होती. ( भाग० ९ स्कं० अ० २ ).

**धृष्टकेतु**-( विदे० वं० ) सुधृति ना० जनकाचा पुत्र. याचा पुत्र हर्यश्व जनक.

२-( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, तद्वंशीय काश्यकुलांतील सत्यकेतु राजाचा पुत्र. याचा पुत्र सुकुमार.

३-एक केकयदेशाधिपति. याची स्त्री वसुदेवाच्या पांच भगिनींतील श्रुतकीर्ति नांवाची होती. यास संतर्दनादिक पांच पुत्र व एक कन्या अशीं अपत्यें होतीं ( भाग० ९ स्कं० अ० २४ ).

४-चेदीदेशाचा राजा शिशुपाल, त्याच्या पुत्रांतील एक. शिशुपालाच्या मागें हाच राजा झाला. यानें आपली भगिनी करेणुमती पंडुपुत्र नकुलास दिली होती. हा मोठा पराक्रमी असून भारती युद्धांत पांडवांकडे होता. याच्या रथाचे अश्व सारंग्या रंगाचे होते. यानें कौरवपक्षीय अनेक विरांशीं युद्ध केल्यावर, शेवटीं यास

द्रोणाचार्यांनें मारिलें ( भार० द्रोण० अ० १२५ ).

५-पांचालकुलोत्पन्न द्रुपद राजाचा पौत्र, धृष्टद्युम्नाच्या पुत्रांतील एक. हा पांडवांकडे असून, भारती युद्धांत मरण पावला.

**धृष्टद्युम्न**-(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय पांचाल राजा द्रुपद त्याचा पुत्र. याचें जन्म अग्नींतून द्रोणाचार्यास मारण्याकरितांच झालें होतें (द्रुपद श० पहा). हा जन्मापासून भयंकरस्वभावी असून, धनुर्विद्येंत द्रोणाचार्यांचाच शिष्य होता. युद्धारंभीं भीष्मपर्वांत गीतेच्या प्रथमाध्यायांत दुर्योधनाची उक्ति द्रोणाचार्यास याविषयीं अशी आहे.—

"पश्यैतांपांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ॥
व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥"

कौरव आपली सेना सिद्ध करून, युद्धभूमीवर कुरुक्षेत्रीं आले असतां, पांडवही आपली सेना सिद्ध करून तेथें आले.त्या काळीं कृष्णानुमतानें यास त्यांनीं सैनापत्य दिलें होतें. यानें सर्व युद्ध होईपर्यंत आपला अधिकार, उत्तम प्रकारें केला, व ज्या ज्या प्रसंगीं अर्जुनास बुद्धिपूर्वक कोणी युद्धास बोलावी, त्या त्या प्रसंगीं तो तिकडे गेला असतां, हा, पराजय न पावतां सेनेचें रक्षण करून युधिष्ठिरास सांभाळी. युद्धसमयीं याच्या रथाचे अश्व पारव्या रंगाचे होते. असें आढळतें ( भार० द्रोण० अ० २३ ).

अश्वत्थामा मरण पावला असें ऐकून, द्रोणाचार्यांनें आपलीं शस्त्रास्त्रें भूमीवर ठेविलीं, व योगधारणेनें प्राणोत्क्रमण करीत असतां, यानें जाऊन त्याचा शिरच्छेद केला. तें ऐकून अर्जुनास कोप आला, व त्यानें याची केवळ निर्भर्त्सना केली इतकेंच नाहीं, तर यास मारण्यासही धांवला. परंतु कृष्णानें अर्जुनाचें सांत्वन करून, यास त्यापासून सोडविलें. पुढें युद्धाच्या अठराव्या रात्रीं हा शिबिरांत निद्रित असतां, अश्वत्थाम्यानें याचा शिरश्छेद करून यास ठार मारिलें. याला, क्षत्रधर्मा, धृष्टकेतु आणि क्षत्रंजय, असे तीन पुत्र असून ते युद्धांत याच्या पूर्वींच मरण पावले होते.

**धृष्टश्री**-खालचा शब्द पहा.

**धृष्टबुद्धि**-कुंतल राजाचा प्रधान ( १ चंद्रहास श०पहा).

**धृष्टि**-दाशरथि रामाच्या अष्टप्रधानांतील एक( वा० रा० बाल० स० ७ ).

२- ( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा तद्वंशीय ज्यामघकुलांतील क्रथवंशांत जन्मलेल्या कुंतिराजाचा पुत्र. याचा पुत्र निवृत्ति अ० विदूरथ.

**धृष्णु**-वारुणि कवीच्या आठ पुत्रांतील तिसरा.

**धेनुक-धेनुकासुर**-वृंदावनासमीपच्या तालवनांत रहाणारा एक असुर. हा, आपल्या अनुचरांसहित तेथें राहात असे, व फलांस जो कोणी स्पर्श करी त्यास मारीत असे. एकदां त्या वनासमीप कांहीं गोपाल गायी चारीत गेले असतां तेथील फलांच्या सुगंधानें त्यांच्या भक्षणाची त्यांस इच्छा झाली, म्हणून बलरामानें वृक्ष कंपित करून फळें पाडलीं, त्यावरून हा असुर गर्दभाचें मोठें रूप धारण करून त्यावर धांवला. तेव्हां बलरामानें यास उचलून आपटिलें त्यायोगानें हा तत्काळ मरण पावला ( भाग० १० स्कं० अ० १५ ).

**धेनुमति**-प्रियव्रतकुलोत्पन्न ऋषभदेव, तद्वंशीय देवद्युम्न राजाची स्त्री, परमेष्ठि राजाची माता.

**धौतपापा**-भारतवर्षीय नदी. उगम आढळत नाहीं.

**धौतमूलक**-पांडवांच्याही पूर्वी असणारा चीन देशाचा राजा. कृष्ण शिष्टाईसाठीं दुर्योधनाकडे चालला, त्या वेळेस भीमसेनानें सांगितलेले प्राचीन उन्मार्गवर्ती राजे, त्यांत हें नांव आहे.

**धौंधुमारि**-कुवलाश्व जो धुंधुदैत्यास मारणारा, त्याच्या दृढाश्वादिक पुत्रांस संज्ञा.

**धौम्य**-व्याघ्रपादऋषीच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ, उपमन्युऋषीचा कनिष्ठ भ्राता. उपमन्युऋषीची कृष्णासी अशी उक्ति आहे-" व्याघ्रपाद इति ख्यातो वेदवेदांगपारगः ॥ तस्याहमभवं पुत्रो धौम्यश्चापि ममानुजः" ( भार० अनुशा० अ० १४ श्लो० ११२ ). हा मोठा विद्वान् व तपस्वी असे ( भार० आदि० अ० ३ ). याचा शिष्य आरुणि, त्यासच पुढें उद्दालक नांव पडलें होतें.

२-पांडवांचा पुरोहित, देवलऋषीचा कनिष्ठ भ्राता. ( भार० आदि० अ० १८३ ). हा पांडवांसमागमें वनांत असून, यानें त्यांस अनेक तीर्थयात्रा सांगितल्या होत्या ( भार० वन० अ० ८३-९० ). तसेंच विराटगृहीं पांडव जाऊं लागले, त्या वेळेस राजगृहीं कसें वागावें तीही नीति सांगितली होती ( भार० विराट० अ० ४ ).

३-याच नांवाचा दुसरा एक ऋषि ( भार० वन० अ० २९८ ).

**ध्यानबिंदु**-मुख्य यजुर्वेदोपनिषित्.

**ध्रुव**-स्वायंभू मनूचा पौत्र, उत्तानपाद राजास सुनीतीपासून झालेला पुत्र. ध्रुवाच्या मातेवर राजाची प्रीति नसे, त्यामुळें हाहि त्यास अप्रियच होता. एकदां याचा सापत्न भ्राता उत्तम तो राजाच्या मांडीवर बसला असतां,

हाही बसण्यासाठीं चढूं लागला. तें पाहून, सुरुचीनें (सापत्नमातेनें) याचा धिक्कार केला. त्यावरून हा रुदन करीत स्वमातेकडे गेला असतां, तिलाही शोक होऊन ती यास म्हणाली, परमेश्वराचें आराधन केल्याशिवाय ऐश्वर्य कोठून प्राप्त होणार ? त्यावरून हा तत्काळ नगराबाहेर पडून अरण्यांत जाऊं लागला. इतक्यात यास मार्गामध्यें नारद भेटले, व तूं लहान आहेस, यास्तव माघारा परत जा, असें यास म्हणूं लागले; परंतु यानें तें ऐकिलें नाहीं.

नंतर नारदास याची दया येऊन, त्यांनीं यास एक मंत्र व भगवद्ध्यान, यांचा उपदेश केला. त्यांचें यानें श्रद्धापूर्वक अनुष्ठान केलें असतां, अल्पच काळांत भगवान् यास प्रत्यक्ष झाले. त्यावरून यास स्तुति करावी असें वाटलें, परंतु सामर्थ्य नसल्यामुळें हात जोडून तटस्थ उभा राहिला. हें भगवंतानीं जाणून, याच्या गालास आपल्या हस्तांतील शंखाचा स्पर्श केला. त्यावरून यास स्तुति करण्याचें सामर्थ्य येऊन यानें भगवंताची स्तुति केली. तीवरून भगवान् संतुष्ट होऊन यास म्हणाले कीं, ज्यास ग्रह आणि नक्षत्रें प्रदक्षिणा करितात, असें माझें अचल स्थान मीं तुला दिलें आहे. परंतु तूं राज्याच्या हेतूनें माझें आराधन केलें आहेस, यास्तव तूं नगरांत जा, व पित्याच्या मागें छत्तीस सहस्र वर्षें राज्य करून, नंतर या स्थानीं ये. त्यावरून ध्रुव नगराकडे यावयास निघाला, हें वर्तमान उत्तानपादास कळून, तो मोठ्या समारंभपूर्वक प्रेमानें सामोरा आला, व यास नगरांत घेऊन गेला. कांहीं काळानें उत्तानपादानें यास राज्याभिषेक करून आपण तपार्थ अरण्यांत गमन केलें (भाग० ४ स्कं० अ० ८-९).

पिता अरण्यांत गेल्यावर, ध्रुवानें शिशुमार प्रजापतीची कन्या भ्रमी तिशीं विवाह केला. तिचे ठायीं यास, कल्प आणि वत्सर असे दोन पुत्र झाले. त्यावर वायूनें आपली इला ना० कन्या यास दिली असतां, तिच्या ठायीं उत्कल ना० एक पुत्र, व एक कन्या, अशीं दोन अपत्यें झालीं. यांशिवाय मत्स्य पुराणावरून यास तिसरी धन्या ना० स्त्री होती असें आढळतें, व तिला यापासून एकच शिष्ट नांवाचा पुत्र होता.

ध्रुवाचा सापत्न भ्राता उत्तम, त्याचा विवाह पुढें होणार तों, एकदां तो मृगया करण्याकरितां हिमवान् पर्वतावर गेला; परंतु तेथें यक्षांशीं त्याचा कलह होऊन त्यांत तो मरण पावला. तें वर्तमान त्याची माता सुरुचि, तिला कळून, तें तिनें ध्रुवांस न सांगतां, त्याच्या शोधास गेली व तिकडेच मरण पावली. पुढें हें साद्यंत वृत्त ध्रुवास कळलें, व तो सक्रोध होऊन तत्काळ रथारूढ होत्साता यक्षांकडे गेला. तेथें यक्षांशीं त्याचें अनिवार युद्ध होऊन, यानें सहस्रावधि यक्ष मारिले. त्यावरून कुबेर येऊन त्यानेंही याशीं बरेंच युद्ध केलें. शेवटीं तेथें स्वायंभूमनु प्रकट होऊन, त्यानें ध्रुवास उपदेश केला, व युद्धापासून निवृत्त करून स्वनगरास जाण्याची आज्ञा केली. तिवरून कुबेरास संतोष होऊन, ते परस्पर आपआपल्या स्थळीं निघून गेले.

ध्रुवानें सहस्रावधि यज्ञ केले, व प्रजेचें इतकें उत्तम पालन केलें कीं, तीं सर्व, यास आपला पिता असें म्हणे. याप्रमाणें यानें छत्तीस सहस्र वर्षें राज्य करून, शेवटीं राज्य पुत्रास देऊन अरण्यांत गेला, व तेथें तपें करून, देह क्षीण करून त्याचा त्याग करीत होत्साता, भगवद्वराप्रमाणें अढळपदीं गेला (भाग० ४ स्कं० अ० १०-१२). (मत्स्य० अ० ४). अढळपद म्ह० ध्रुवमंडल समजावें.

२-एक वसु (अष्टवसु श० पहा). यास काल ना० पुत्र होता.

३-(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न ऋतेयुपुत्र अंतिभार, त्याच्या तीन पुत्रांतलि दुसरा.

४-(सो० वं०) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय, वसुदेवास रोहिणीपासून झालेल्या सात पुत्रांतील सहावा.

५-जयद्रथवधानंतर रात्रियुद्धांत भीमानें मारिलेला कलिंगदेशीय दुर्योधनपक्षीय राजा (भार० द्रोण० अ० १५५).

६-एक ब्रह्मर्षि.

**ध्रुवसंधि**-(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न रामवंशीय पुष्य राजाचा पुत्र. याचा पुत्र सुदर्शन. या ध्रुवसंधीस भारतांत पौष्य राजा असें म्हटलेलें आहे, व मनोरमा आणि लीलावती अशा यास दोन स्त्रिया होत्या.

**ध्रुवाश्व**-(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न भानुमान् राजास नामांतर.

**ध्रुवोधर**-भारती युद्धांतलि पांडवपक्षीय राजा (भार० द्रोण० अ० १५८).

**ध्वजग्रीव**-लंकेंतलि रावणपक्षीय राक्षस (वा० रा० सुंदर० स० ६).

**ध्वजवती**-हरिमेधा ऋषीची कन्या.

## न

**नकुल**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, तद्वंशीय जन्हुकुलांत जन्मलेल्या पंडुराजाचा पुत्र. हा, पंडूस माद्री म्हणून दुसरी स्त्री होती, तिच्याठायीं अश्विनीकुमारांच्या अंशानें जन्मलेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ, सहदेवाचा ज्येष्ठ भ्राता. हा रूपानें अतिशय सुंदर असे ( भार० आश्रम० अ० २५ ). नकुलास द्रौपदीपासून शतानीक नांवाचा पुत्र असून, शिशुपालकन्या करेणुमती, ती यास दुसरी स्त्री होती, व तिच्याठायीं यापासून निरमित्र नांवाचा पुत्र याला झाला होता.

धृतराष्ट्रानें पांडवांस इंद्रप्रस्थांत आणून ठेविल्यावर त्यांनीं तेथें राजसूय यज्ञ केला. तेव्हां युधिष्ठिरानें, आपल्या चारी भ्रात्यांस चारी दिशा जिंकून द्रव्य आणण्याची आज्ञा केली. त्यांत हा पश्चिमदिशेकडे गेला होता. त्यावेळेस हा, ज्या ज्या देशांत जिंकून परत आला, तो याचा दिग्विजय असा—भारतांत याचा दिग्विजय अगदीं संक्षिप्त आहे, म्हणून इंद्रप्रस्थाहून आनर्तदेशास जातांना जे देश मध्यें लागतात, ते क्रमानें मीं येथें कांहीं अन्य ग्रंथांवरून घेतले आहेत.

युधिष्ठिराची आज्ञा घेऊन, इंद्रप्रस्थाहून नकुल प्रथम निघाला, तो त्याच्या पश्चिमेस असणारा अगदीं निकट पहिला जांगल देश, तेथें गेला. तेथून क्रमानें पश्चिम पांचाल, पश्चिम शूरसेन, यामून देश, ब्रह्मावर्तदेश, कुरुक्षेत्र देश, पश्चिम मत्स्यदेश, सारस्वत देश, इ० यानें क्रमेंकरून अतिक्रामित केले. ( भाग० १ स्कं० अ० १० ). पुढें ज्यामध्यें अपारधन, व गायींचाही समुदाय मोठा, असें कार्तिकेयाचें ( सहस्रार्जुनाचें ) रोहितकपुर त्यांत गमन केलें व तेथें मत्तमयूरक संज्ञेचे प्रसिद्ध रहिवासी, त्यांशीं मोठें युद्ध करून त्यांस जिंकलें. नंतर तेथून मरुधन्व देशांत गेला तो जिंकल्यावर बहुधान्यक देश, शैरीषक देश, महेत्थ देशींचा आक्रोश राजा, त्याशीं याचें मोठें युद्ध झालें. तेथून पश्चिम दशार्ण देश, तेथील राजा हिरण्यवर्मा यास जिंकून, शिबी, पश्चिम त्रिगर्त येथील क्षेमंकर इ० पांच राजे, अंबष्ठ देश, पश्चिम मालव (माळवा), हे देश जिंकले. त्यापुढें पंच कर्पटक, मध्यमकेय, वाटधान, यांतील लोकांस जिंकलें. नंतर कोणत्या दिशेकडे वळला तें स्पष्ट नाहीं, परंतु वळला, व पुष्करारण्यवासी जिंकले.

तदनंतर पश्चिम उत्सवसंकेतवासी जिंकून, सिंधुनदीतीरवासी ग्रामणीय राजे ( वेश्यापुत्र ) जिंकल्यावर, सरस्वतीतीरस्थ शूद्र आभीरगण स्वाधीन करून संपूर्ण पंचनदवासी, व अमरपर्वत जिंकिला. त्यापुढ नकुल उत्तर ज्योतिष, व दिव्य कटकपुर तेथें गेला. यावरून हा उत्तरेकडे वळला होता असें समजावें. तेथून रामठ देश, व हारहूण, हे पश्चिमदिशावासी जिंकल्यावर, पश्चिम आनर्त देशीं हा कृष्णाच्या नगरास ( द्वारकेस ) गेला. त्यानें यास प्रीतीनें कर दिला असतां, याचा मातुल ( मामा ) शल्य मद्रदेशाधिपति, त्याच्या शाकल नगरास यानें गमन केलें. तेथें त्यानेंही याचा प्रीतीनें सन्मान करून, अपार द्रव्य दिल्यावर, त्यापुढें पश्चिमेस सागरकुक्षींत राहणारे दारुण ( भयंकर ) म्लेच्छ, पल्हव, बर्बर, किरात, यवन, शक, इ० कांस यानें जिंकून, व त्यांपासून अपार द्रव्य घेऊन, दहा सहस्र उंटांवर तें द्रव्य सर्व घालून, इंद्रप्रस्थास येऊन युधिष्ठिरास समर्पण केलें ( भार० सभा० अ० ३२ ).

पांडवांची संपत्ति द्यूतांत हरण होऊन त्यांस वनवास प्राप्त झाला असतां, हाही त्यांत होताच, व तो सरल्यावर अज्ञातवासकाळीं, जशीं सर्वांनीं नांवें बदललीं, व विराटगृहीं राहिले, तसेंच हाही ग्रंथिक नाम धारण करून, तेथें राहिला (भार० विराट० अ० १२). अज्ञातवासांतून प्रकट झाल्यावर कौरवांकडे साम करण्यास कृष्ण जाऊ लागला. तेव्हां यानें त्यास असें सांगितलें कीं, दुर्योधनानें आम्हास किती त्रास दिला, हें तूं जाणतच आहेस; यास्तव होईल तेथपर्यंत युद्धाचाच विचार ठरवून ये ( भार० उद्योग० अ० ८० ).

पुढें भारती युद्धास आरंभ झाला असतां, याचें प्रथमतः दुःशासनाशीं युद्ध प्रवृत्त झालें. याच्या रथाचे अश्व कांबोजदेशोत्पन्न पोपटी रंगाचे असून, रथावरील ध्वज भयंकर शरभ पक्ष्याच्या चिन्हाचा होता. याचा युद्धसमयीं वाजविण्याचा शंख, सुघोष नांवानें प्रसिद्ध असून, हा आपल्या हातांत वैष्णव ना० धनुष्य बागवी ( भार० द्रोण० अ० २३ ). युद्ध समाप्त झाल्यावर पांडवकांडील जे अवशिष्ट सात वीरं राहिले होते, त्यांतील हा एक असून, पुढें युधिष्ठिरासमागमेंच निजधामास गेला.

**नक्र**–प्रियव्रतवंशीय ऋषभदेव, तत्कुलोत्पन्न पृथुषेण राजास, आकूती ना० स्त्रीच्या ठायीं झालेला पुत्र. यास द्रुती

किंवा श्रुती ना०स्त्री असून, तिच्या ठायीं झालेला गय नांवाचा पुत्र होता.

**नक्र**–जलचर ( १ हूहू श० पहा ).

**नग**–शत्रुघ्नाचा सेनापति ( कुशलित्र श० पहा ).

**नग्नजित्**–कृष्णाची स्त्री सत्या, जिला नाग्नजिति असें नामांतर असे, तिचा पिता. ( भाग० दशम० अ० ५८ ). कर्णानें यास, आपल्या दिग्विजयकाळीं जिंकिलें होतें ( भार० वन० अ० २५४ ). याचें जन्म इषुपात् ना० असुरांशानें झालें होतें ( भार० आदि० अ० ६७ ) व त्यामुळें हा, भारती युद्धांत दुर्योधनाकडे होता.

**नग्नहू**–एक ब्रह्मर्षि ( मत्स्य० अ० १४४ ).

**नचिकेता**–गौतमगोत्रोत्पन्न जो आरुणि ऋषि त्याचा पुत्र. हा सुमारें पांच वर्षांच्या वयाचा असतां, एके काळीं याच्या पित्यानें, उत्तम उत्तम गायी याच्या साठीं निवडून ठेवून, ब्राह्मणांस देण्यासाठीं इतर ठेवि-लेल्या यानें पाहिल्या. त्यावरून हें गोप्रदान आपल्या पित्यास श्रेयस्कर होणार नाहीं असें जाणून, व गायीं-च्या बदला आपणच ब्राह्मणांस दान व्हावें असा हेतु धरून, पित्यास पुसूं लागला कीं,आपण मला कोणत्या ब्राह्मणास दान देणार तें सांगा. तें ऐकून आरुणीनें ( उद्दालकानें ) यास कांहींच उत्तर दिलें नाहीं. म्हणून यानें पुनः पुसलें, तरीही तो कांहीं बोलला नाहीं. शेवटीं यानें तिसऱ्यानें पुसलें असतां, उद्दाल-कास क्रोध येऊन त्यानें यास उत्तर केलें कीं, आप-ल्यास पंडित मानणारा असा जो तूं, त्या तुला मी मृत्यूप्रत ( यमाप्रत ) समर्पण करणार. याप्रमाणें क्रोधाच्या आवेशांत उद्दालक बोलून गेला,परंतु आतां यास यम नेईल,हें त्याच्या मनांत येऊन, त्यास अति-शय वाईट वाटलें. तें पाहून, यानें धैर्यकरून पित्यास म्हटलें कीं, आपण चिंता करूं नये, मला मृत्यूस द्यावयाचें, असें जें आपण बोललां, तें आपलें वचन आपण सत्य करावें. त्यावरून उद्दालकानें यास यमास समर्पण करितांच हा यमलोकीं गेला. तेव्हां यमदूत यास पुसूं लागले कीं, तूं येथें कशासाठीं आलास? आयुष्य सरल्याशिवाय यम येथें कोणास आणीत नाहीं, आणि तुझें आयुष्य तर अजून सरलें नाहीं. यास्तव तूं येथून सत्वर परत जा. सारांश, त्यांनीं यास जा म्हणून सांगत असावें, असें होत होत, हा तेथें तसाच अन्नपाण्यावांचून तीन दिवस राहिला असतां, यम अन्यलोकीं गेलेला तिसऱ्या दिवशीं तेथें आला त्यास दूतांनीं याचें वर्तमान सांगतांच, यम याकडे येऊन म्हणूं लागला कीं, तूं माझ्या गृहीं अतिथि प्राप्त झालास असतां, तुझें आतिथ्य मज-कडून झालें नाहीं, हा मला मोठा अन्याय घडला. असें म्हणून यमानें याचें उत्तमप्रकारें आतिथ्य केलें, व तीन दिवस अन्नोदकरहित असल्यामुळें तीन वर मागण्याची यास आज्ञा केली. त्यावरून यानें तीन वर मागितले; त्यांत एका वरांत यानें ब्रह्मविद्या मागितली, ती यमानें याच्या वैराग्याची अनेक प्रकारें परीक्षा करून यास दिल्यावर, उर्वरित वरांनीं हा पुनः पित्याकडे परत आला. हा इतिहास कठवल्ली उपनिष-दांत सविस्तर आहे.

**नडायन**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु० श० पहा ).

**नड्वला**–वीरण प्रजापतीची कन्या जी वीरिणी, तिलाच हें नांव असून, ही चक्षुर्मनूची स्त्री होती.

**नंद**–विष्णूच्या पार्षदांतील एक.

२–वसुदेवास मदिरा स्त्रीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

३–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

४–गोकुलांतील संपूर्ण गोपालांचा स्वामी. हा वसुदे-वाचा परम मित्र असे, म्हणूनच त्यानें आपली एक स्त्री रोहिणी, व मागून पुत्र कृष्ण, त्यास येथें ठेविलें होतें. नंदास यशोदा ना० स्त्री होती.

५–क्रौंच द्वीपांतील एक पर्वत.

**नंदक**–विष्णूचा खड्ग.

२–दुर्योधनपक्षीय एक योद्धा ( भार० भीष्म० अ० ६४ ).

३–वसुदेवास वृकदेवीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**नंदनवन**–स्वर्गीं इंद्राचें वनवि० आहे तें.

२–मेरूच्या पूर्वेस मंदर पर्वतावर असणारें वन ( भाग० ५ स्कं० अ० १६ ).

३–हिमालयावर असणारें वन.

४–क्रौंच द्वीपांतील एक पर्वत.

**नंदा**–धर्म ऋषीच्या हर्ष ना० पुत्राची स्त्री.

२–कुबेर नगरीच्या बाह्य प्रदेशीं वाहणारी नदी ( भाग० ४ स्कं० अ० ६ ).

३–शाल्मली द्वीपांत असणारी एक नदी.

**नंदिक—नंदिकेश्वर**–नंदी शब्द पहा.

**नंदिग्राम**–अयोध्येपासून एका कोसावर पूर्वीं होता ग्राम तो. राम अरण्यांत गेला असतां येथें भरत चौदा वर्षें राहिला होता ( वा० रा० अयो० स० ११५ ).

**नंदिनी**–कश्यपापासून सुरभीस झालेली कन्या.

**नंदिवर्धन**–( विदे० वं० ) उदावसु जनकाचा पुत्र. याचा पुत्र सुकेतु जनक.

**नंदी**–धर्मऋषीस यामीपासून झालेल्या स्वर्ग ना० पुत्राचा पुत्र.

२–कश्यपास मुनी भार्येपासून झालेल्या देवगंधर्वांतील एक. हें नांव १६ देवगंधर्व लिहिले आहेत, त्यांतील कोणत्याचें त्याचा निर्णय होत नाहीं.

३–कामधेनूचा पुत्र, व शिवगणांतलि एक. याची सर्व आकृति मनुष्यासारखी असून, मुख वानरासारिखें आहे, व भुज ऱ्हस्व आहेत. दक्षयज्ञविध्वंसकालीं, यानें भग ना० ऋत्विजास बद्ध केलें होतें, यावरून हा, स्वायंभू मन्वंतरांत होता, असें स्पष्ट होतें ( भाग० चतुर्थ० अ० ५ ). याचा रावणास शाप झाला होता ( वा० रा० उत्तर० स० १५ ).

**नभ**–दुसरा स्वारोचिष मनु, त्याच्या पुत्रांतील एक.

२–तिसरा उत्तम मनु, त्याच्या पुत्रांतील एक.

३–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

४–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न दाशरथि रामाचा पौत्र जो अतिथि, त्याचा हा पौत्र. निषध राजाचा कनिष्ठ पुत्र. याचा पुत्र पुंडरीक राजा.

५–श्रावणमास, या मासांत सूर्यमंडलाधिपति इंद्र आदित्य असून, त्यासमागमें अंगिरा ऋषि, विश्वावसु गंधर्व, प्रम्लोचा अप्सरा, वर्य राक्षस, एलापत्र नाग, आणि श्रोता ना० यक्ष, इतके असतात ( भाग० १२ स्कं० अ० ११ ).

**नभग**–वैवस्वत मनूच्या दहा पुत्रांतील नववा. याचा पुत्र नाभाग.

**नभस**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अतिथि राजाचा प्रपौत्र, निषधाचा पौत्र, व नलराजाचा पुत्र.

**नभस्य**–वर्षांतील द्वादशमासानुक्रमानें साहवा मास. याची पूर्णिमा भाद्रपदा नक्षत्रानें युक्त असत्ये म्हणून यास भाद्रपद म्हणण्याची रूढि आहे. यांत सूर्यमंडलाधिपति विवस्वान् ना० आदित्य असून, त्यासमागमें भृगु ऋषि, उग्रसेन गंधर्व, असारण यक्ष, शंखपाल नाग, अनुम्लोचा अप्सरा, व्याघ्र ना० राक्षस, इतकें संचार करण्यास असतात. ही व्यवस्था याच मन्वंतरांतील समजावी ( भाग० द्वादश० अ० ११ ).

२–स्वारोचिष मनूच्या पुत्रांतील एक.

३–उत्तम मनूच्या पुत्रांतील एक.

**नभस्वती**–उत्तानपादवंशीय विजिताश्व राजाची दुसरी स्त्री. हिचा पुत्र हविर्धान.

**नभस्वान्**–मुर दैत्याच्याा सात पुत्रांतील एक ( नरकासुर श० पहा ).

**नमस्यु**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न प्रवीर राजाचा पुत्र, याचा पुत्र चारुपद.

**नमूचि**–एक इंद्रानें मारिलेला सैंहिकेय.

२–दनुपुत्र एक दानव.

३–दक्षिणदिशेकडे राहाणारा एक ब्रह्मर्षि ( वा० रा० उत्तर० स० १ ).

**नर**–स्वायंभूमन्वंतरांतील धर्मऋषीचा पुत्र, नारायण ऋषीचा सहोदर.

२–तामस मनूच्या पुत्रांतील एक.

३–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न सुधृति राजाचा पुत्र, यास सौधृतेय नामांतर असून, केवल ना० पुत्र होता.

४–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न भरतपौत्र मन्यु, त्याच्या पांच पुत्रांतील चौथा. याचा पुत्र संकृति.

**नरक**–पातकी जनांच्या शासनार्थ यमलोकीं जीं स्थलें आहेत तीं. त्यांचीं नांवें–तामिस्र, अंधतामिस्र, रौरव, महारौरव, कुंभीपाक, कालसूत्र, असिपत्रवन, सूकरमुख, अंधकूप, कृमिभोजन, संदंश, तप्तसूर्मि, वज्रकंटक,शाल्मली, वैतरणी, पूयोद, प्राणरोध, विशसन, लालाभक्ष, सारमेयादन, अवीचि, अयःपान,क्षारकर्दम, रक्षोगणभोजन, शूलप्रोत, दंदशूक, अवटनिरोधन, पर्यावर्तन, सूचिमुख ( भाग० ५ स्कं० अ० २६ ).

२–विष्णूनें मारिलेला एक दानव ( भार० वन० अ० १४२ ).

३–तेरा सैंहिकेयांतील एक.

**नरकासुर**–असुरवि०. हा भूमीचा पुत्र म्हणून, यास भौमासुर असेंही नांव होतें. भूदेवीनें विष्णूस प्रसन्न करून, त्यापासून याजकरितां वैष्णवास्त्र संपादिलें होतें, त्या योगानें हा मोठा बलाढ्य होता. पुढें तें अस्त्र यानें आपल्या भगदत्त ना० पुत्रास दिलें असे ( भार० द्रोण० अ० २९ ).

यानें देवांस मोठी पीडा देऊन, त्यांची व इंद्राची सर्व संपत्ति हरण करून प्राग्ज्योतिषपुरास आणिली होती. त्यावरून तें आपणावर आलेलें संकट इंद्रानें कृष्णास निवेदन केलें असतां, कृष्ण सत्यभामेस समागमें घेऊन प्राग्ज्योतिष नगरास गेला. तेथें नगराच्या बाह्य प्रदेशीं जलाच्या आवरणांत पंचमुख मुर ना० दैत्य याचा पक्षपाती निद्रित असे, तें कृष्णास विदित असल्यामुळें, त्यानें पांचजन्य शंखाचा ध्वनि करून त्यास जागृत केलें. नंतर तो कृष्णावर धांवला. त्यांत उभयतांचें युद्ध होऊन, कृष्णानें त्याचीं पांचही मस्तकें तोडिलीं, त्यावरून ताम्र, अंतरिक्ष, श्रवण, विभावसु,

वसु, नभस्वान् आणि अरुण, ह्या त्याच्या सात पुत्रांस क्रोध येऊन, ते कृष्णावर चालून आले. त्यांबरोबर नरकासुराचा पीठ ना० सेनापतिही होता. त्या सर्वांस सेनेसहित कृष्णानें मारिलें असें ऐकून, नरकासुर कृष्णावर स्वतः चालून युद्धास आला, त्याचाही वध झाला. नंतर भूदेवीनें नरकासुराचा ( भौमासुराचा ) पुत्र भगदत्त, कृष्णाच्या पायांवर घालून, त्याकडून अदितीचीं कुंडलें कृष्णास परत करविलीं. तीं कृष्णानें इंद्रास देऊन, त्याची संपत्ति त्यास दिली. नंतर नरकासुरानें बंदींत आणून ठेविलेल्या सोळा सहस्र कन्या सोडवून, त्यांनीं कृष्णास मनेंकरून वरिल्यामुळें, त्यांस त्यानें द्वारकेंस नेण्याचें मनांत आणून, भगदत्तास प्राग्ज्योतिषपुरीच्या राज्यावर स्थापिलें, व भगदत्तानें चतुर्दंताचे चौसष्ट गज, व कित्येक अश्व, रथ, तसेंच धन, दिलेलें घेऊन, सोळा सहस्र कन्यांसहित द्वारकेस आला, व त्यांशीं त्यानें विवाह केला ( भाग १० स्कं० अ० ५९ ). येथें इंद्र म्हणून जो म्हटला आहे, तो द्वादशादित्यांतील पूर्वदिग्पाल अदितीचा पुत्र समजावा. स्वर्गांतील पुरंदर ना० जो प्रस्तुत इंद्र तो समजूं नये; कारण तो अदितीचा पुत्र नसून, त्याचा तिच्या कुंडलांशीं अगदीं संबंध नाहीं.

**नरनारायण**–स्वायंभुव मन्वंतरांतील धर्म ऋषीस मूर्ति ना० भार्येपासून विष्णूच्या अंशानें झालेले पुत्र.

**नरवाहन**–कुबेरास नांव आहे.

**नरसिंह**–नृसिंह श० पहा.

**नरांतक**–अंगदानें मारिलेला रावणपुत्र ( वा० रा० युद्ध० स० ६९ ).

२–प्रहस्त ना० रावणप्रधानाच्या चार प्रधानांतील एक. यास द्विविदवानरानें मारिलें होतें ( वा० रा० युद्ध० स० ५८ ).

**नरिष्यंत**–वैवस्वत मनूच्या दहा पुत्रांतील सातवा. यास चित्रसेन आणि दम असे दोन पुत्र होते.

**नर्मदा**–सोमप ना० पितरांची मानसकन्या.

२–एक गंधर्वी. हिनें सुंदरी, केतुमती, आणि वसुदा, अशा आपल्या तीन कन्या सुकेश राक्षसाचे तीन पुत्र माल्यवान, सुमाली आणि माली, या तिघांस अनुक्रमानें दिल्या होत्या (वा० रा० उत्तर० स० ५ ).

३–एक नागकन्या; सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न मांधाता राजाचा पुत्र पुरुकुत्स त्याची स्त्री.

४–कलिंगदेशांतील अमरकंटक पर्वतापासून निघालेली नदी ( मत्स्य० अ० १८५ ). हिची समुद्रापर्यंत लांबी शत योजनें, व रुंदी दोन योजनें वर्णिलेली आहे.

५–पारियात्र पर्वतापासून निघालेली नदी.

**नर्मदाद्वार**–भारतवर्षीय तीर्थ.

**नल**–तेरा सैंहिकेयांतील एक.

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न निषध राजा, त्याच्या दोन पुत्रांतील पहिला. याचा पुत्र नभस.

३–ज्यानें समुद्रावर सेतुबंधन केलें, तो रामसेनेंतील वानर.

४–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न यदुराजाच्या चार पुत्रांतील तिसरा.

५–निषधदेशाधिपति वीरसेन राजाचा पुत्र. "नलौ द्वावेव विख्यातौ पुराणेषु दृढव्रतौ ॥ वीरसेनसुतश्चान्यो यश्चेक्ष्वाकुकुलोद्भवः ॥ ऋतुपर्णस्य पुत्रोभूत्सार्वभौम जनेश्वरः ॥" ( लिंगपु० अ० ६६ श्लो० २४–२५ ). हा रुपानें सुंदर, सत्यवादी, आणि अश्वविद्येंत कुशल असा असे तारुण्यांत आल्यावर यानें, विदर्भदेशाधिपति भीमराजा, त्याची दमयंती कन्या अति सुंदर आहे असें ऐकिलें, व तिजविषयीं त्यास इच्छा होऊन विरहानें आतुर होत्साता, अरण्यांत मृगयेनिमित्त एके काळीं हिंडत आहे तों एक हंसपक्षी याच्या दृष्टीस पडला. तेव्हां त्यास यानें धरून, व आपलें अभिप्रेत कळवून दमयंतीकडे पाठविलें. त्यावरून हंस निघून दमयंतीकडे गेला, व त्यानें तिला नलाचें सर्व वृत्त सांगितलें. दमयंतीनेंही, हंस येण्यापूर्वी नलाचें रूपगुणश्रवण करून अशीच त्याविषयीं इच्छा धरिली होती, त्यामुळें तिला आनंद झाला, व तिनें नलास वरण्याविषयींचा दृढ निश्चय हंसास कळवून, त्यास नलाकडे परत पाठविलें ( भार० वन० अ० ५३ ).

कांहीं कालानें दमयंतीचें स्वयंवर आरंभलें, असें नलानें ऐकून तो तिकडे जाण्यास निघाला. इतक्यामध्यें मार्गांत इंद्र, यम, अग्नि, वरुण, दमयंतीचें स्वयंवर पाहण्यासाठीं चाललेले यास आढळले, व त्यांनींही यास पाहिलें तेव्हां त्यांनीं, हा नल आहे असें जाणून, याचें सत्त्व पाहाण्यासाठीं यास म्हटलें कीं, हे राजा, तूं आमचा दूत हो, आणि दमयंतीस जाऊन सांग कीं, आम्ही तुला वरण्याची इच्छा करितों. त्यावरून नल तथास्तु म्हणून, त्यानें कुंडिनपुरीं येऊन दमयंतीच्या मंदिरांत प्रवेश केला. त्यांत तो, दमयंती व तिच्या सख्या, यांवांचून इंद्राच्या वरप्रभावानें कोणासही दिसला नाहीं; म्हणून दम-

यंती होती, तेथपर्यंत सुखानें गेला (भार० वन० अ० ५४–५५).

नलाचा, दमयंतीच्या मंदिरांत प्रवेश होतांच, तिच्या सर्व सख्या तटस्थ झाल्या, व दमयंतीही मोहित झाली. नंतर हंसाच्या मुखानें जें वृत्त तिनें श्रवण केलें होतें, त्यावरून हाच नल असें तिनें ओळखिलें, व आनंद पावून पुढें ती कांहीं बोलणार तों यानें तिला देवांचा निरोप कळविला. तो ऐकून दमयंती म्हणाली, मीं तुला मनेंकरून वरलें आहे; यास्तव इंद्रादिक देव असोत, कीं अन्य कोणी असोत, मी कोणासही वरणार नाहीं; तथापि तूं ज्यांचें दूतत्व स्वीकारून आला आहेस, त्यांस मीं स्वयंवरास बोलाविलें आहे, असें सांग; म्हणजे तुझें काम तूं केलेंस असें होईल. त्यावरून नल तेथून निघून देवाकडे परत आला, व त्यानें तिचा निरोप जशाचा तसाच त्यांस कळविला. तो ऐकून ते सर्व कुंडिनपुरास आले, व दमयंतीची परीक्षा पाहण्यासाठीं नलासारखींच रूपें धारण करून त्यास-मीप सभेंत येऊन बसले. सारांश, स्वयंवराकरितां आलेले सहस्रावधि राजे, त्यांस दमयंतीनें न वरितां, जेथें नल बसला होता, तेथें ती आली, आणि पाहते तों, एकसारख्या रूपाचे पांच पुरुष ओळीनेंच बसले आहेत. तेव्हां तिला विचार पडला कीं, आतां येथें कसें करावें! नंतर तिनें आपल्या मनाशीं अशी प्रतिज्ञा केली कीं, नलराजावांचून इतरांस माझ्या मनानें स्पर्श केला नसेल, तर माझा वास्तविक पति नल, मला गोचर होवो. असें म्हणतांच, या तिच्या पातिव्रत्यबलानें, तिनें चौघांस निमेषोन्मेष, व भूमीस पादस्पर्श यांविरहित एकाएकीं पाहिलें, व तसें त्यांस पाहून लागलेंच नलास वरिलें (भार० वन० अ० ५६–५७).

नलास दमयंतीनें वरिल्यावर, उभयतांचें रूप, तसेच गुण इ० समान पाहून चौघांही देवास आनंद झाला. नंतर ते जाण्यास निघाले असतां, चौघांनींही त्यास एकेक वर दिला. त्यांत इंद्राचा वर असा कीं, तूं यज्ञ करशील, त्यांत सर्व देव तुला गोचर होऊन, अंतीं उत्तम गतीस जाशील. अग्नीचा वर असा कीं, तूं इच्छिशील तेथें मी प्रकट होत जाईन. वरुणाचा वर असा कीं, तूं म्हणशील तेथें मी प्रकट होईन, व तुजजवळ असलेलीं पुष्पें सर्वकाळ नूतन व सुगंध राहतील आणि यमाचा वर असा कीं, तुला पाकपरिज्ञान उत्कृष्ट होईल. याप्रमाणें बोलून देव गेले असतां, भीमराजानें दमयंतीच्या स्वयंवराचा मोठा समारंभ केला, व नलास बरेच दिवस ठेवून घेतल्यावर दमयंतीसहित त्यानें त्यास निषधदेशीं पोहोंचतें केलें. नल राजा आपल्या देशीं आल्यावर त्यानें उत्तम प्रकारें प्रजेचें पालन केलें, व अनेक यज्ञ करून देवासही तृप्त केलें. कालांतरेंकरून यास दमयंतीचे ठायीं इंद्रसेन ना० पुत्र, व इंद्रसेना कन्या, अशीं दोन अपत्यें झालीं. त्यायोगानें तो अतिशय शोभूं लागला; कारण तीं अपत्यें यास तशींच अनुरूप होतीं. याप्रमाणें नलाकडील वृत्त झालें. आतां देवांकडील असें कीं, चौघेही देव, नलास वर देऊन स्वलोकीं जाण्यास निघाले असतां, मार्गामध्यें त्यांनीं द्वापार आणि कलि, या दोघांस लगबगीनें जातांना पाहिलें व त्यावरून त्यांस पुसलें कीं, इतक्या त्वरेनें तुम्ही कोणीकडे चाललां? उभयतां म्हणाले, दमयंतीच्या स्वयंवरास जातों. तें ऐकून इंद्र म्हणाला, दमयंतीचें स्वयंवर होऊन तिनें नलराजास वरिलें, व तेथून हेच आम्ही निघून स्वलोकीं जात आहों. इतकें बोलून इंद्रानें नलाची बहुत स्तुति केली, व आपल्या लोकीं निघून गेला (भार० वन० अ० ५८).

इंद्रानें केलेली नलराजाची स्तुति कलीस सहन न होऊन, तो, इंद्र गेल्यावर द्वापरास म्हणाला कीं, जर तूं माझें साह्य करशील, तर मी नलास राज्यभ्रष्ट करीन. द्वापरानें वरें आहे असें म्हटल्यावर, कलि त्यास घेऊन निषधदेशीं गेला, व तेथें नलराजाच्या शरीरांत प्रवेश करण्याची संधी पाहात गुप्तरूपानें अनेक वर्षें राहिला. तों एकदां असें झालें कीं, नलराजा मूत्रोत्सर्ग करून, कांहीं व्यग्रतेनें पादप्रक्षालन उत्तम प्रकारें न करितां, तसाच संध्योपासन करण्यास बसला. ही संधी पाहून तत्काळ कलि, त्याच्या शरीरांत प्रवेशला. प्रवेशतांच नलास द्यूत खेळावेंसें वाटूं लागलें, व ती इच्छा त्यास इतकी अनावर झाली कीं, लागलेंच त्यानें पुष्कर म्हणून त्याचा भ्राता होता त्यास बोलाविलें, व राज्याचा पण लावून द्यूत खेळण्यास आरंभ केला. हें वर्तमान नागरिक जनांस कळतांच त्यांनीं, मंत्र्यांनीं व स्वतः दमयंतीनें राजाचें बहुतांप्रकारें निवारण केलें, परंतु अंगांतील कलीच्या प्रादुर्भावानें त्यानें, कोणाचेंही न ऐकिल्यामुळें दास, दासी, रथ, वाजी, कोश इ० कांसहित आपलें सर्व राज्य हरविलें. त्याच संधींत दमयंतीनें आपलीं दोनही मुलें वार्ष्णेय ना० सारथ्यासमागमें रथांत बसवून कुंडिनपुरास आपला पिता भीमक त्याकडे पाठवून दिलीं; कारण आपल्यामुळें त्यांस कष्ट न होवोत

असा तिनें विचार केला ( भार०वन०अ०५९-६० ).

पुष्करानें, नलाचें सर्व राज्य हरण करतांच, त्यास एक वस्त्र नेसायास देऊन नगराबाहेर घालविलें, त्यासमागमें दमयंतीही, त्याचप्रमाणें एक वस्त्रानें निघाली. नंतर त्या दोघांनीं अरण्याचा मार्ग धरिला. जातां जातां क्षुधा व तृषा यांनीं तीं दोघें अत्यंत पीडित होऊन एका वृक्षाखालीं बसलीं, इतक्यांत नलाच्या दृष्टीस कांहीं पक्षी पडले, त्यांची कांति सुवर्णासारखी असल्यामुळें त्यांस धरावें असें त्याच्या मनांत येऊन, त्यानें त्यांस आपल्या वस्त्रांत धरिलें; परंतु ते पक्षी कलिच स्वतः होऊन आला होता म्हणून, तो तें वस्त्र घेऊन उडून गेला. सारांश, नलास जें एक वस्त्र होतें, तेंही जाऊन तो नग्न झाला असतां, त्यानें आपलें शरीर वृक्षाच्या पर्णांनीं आच्छादित केलें, व पुढें चालूं लागला. जातां जातां नलानें, दमयंतीस असें सुचविलें कीं, हा पहा मार्ग, कोसल देश, व विदर्भदेश तिकडे जात आहे. त्यावरुन ती समजली कीं, याचा अभिप्राय मीं विदर्भदेशास जावें असा आहे. तेव्हां ती म्हणाली, आपण दोघेंही विदर्भदेशास जाऊं, परंतु तें त्यास न रुचल्यामुळें त्यानें तिला कांहींच उत्तर दिलें नाहीं, व तसाच तो मार्ग क्रमीत पुढें चालला. अस्तमानीं मार्गांत त्यास एक धर्मशाळा आढळली. तींत दोघेंही उतरलीं असतां, त्यांत दमयंतीस मार्गसंबंधीं श्रम झाल्यामुळें तत्काळ निद्रा लागली, असें यानें पाहून, आतां हिला टाकून आपण एकटेंच कोणीकडे तरी जावें असें मनांत आणिलें, व हळूच तिचें अर्ध वस्त्र फाडून घेऊन, तें त्यानें परिधान केलें, व मुकाट्यानेंच तिला तेथें टाकून तो निघून गेला ( भार० वन० अ० ६१-६२ ).

नलराजा दमयंतीस सोडून गेल्यावर पहांटेच्या सुमारास ती एकाएकीं जागी झाली, व पाहूं लागली तों, आपलें अर्ध वस्त्र फाडलेलें असून राजाही समीप नाहीं. तेव्हां तो इकडे तिकडे जवळच कोठें तरी असेल, असें तिला वाटून, तिनें त्याचा पुष्कळ शोध केला, परंतु तो कोठेंही नाहीं असें पाहून, तिला जो शोक झाला त्याचें वर्णन करतां येत नाहीं. नंतर ती अर्धवस्त्रानेंच कसेंतरी आपलें शरीर झांकून, तशीच तेथून निघून वेड्यासारखी अरण्यांत हिंडूं लागली. इतक्यांत एका मोठ्या अजगरानें तिला येऊन गिळिलें. तेव्हां तिनें मोठ्यानें आक्रोश आरंभिला. तो, एक व्याध तेथें समीपच होता, त्यानें ऐकून तो तेथें आला व अजगरास मारून, त्यानें त्यापासून तिची सुटका केली. नंतर तिला कांहीं आहारासही देऊन स्वस्थ केल्यावर, तिनें त्याचा आभार मानावा तों, त्याच्या मनांत दुर्दैवानें तिजविषयीं कामबुद्धि उत्पन्न होऊन, तो तत्काळ तिच्या दृष्टीनें दग्ध झाला. नंतर दमयंती तेथून निघाली, तों तिला मार्गांत ऋषींचे कांहीं आश्रम आढळले. तेथें तिनें नलाचा शोध केला असतां, त्यांनीं सांगितलें कीं, नलराजा क्षेम आहे, तुझी त्याची भेट होऊन, तुम्ही दोघे आपलें राज्य पावाल. याप्रमाणें आशीर्वचन झालेलें ऐकून, दमयंतीनें त्यास वंदन केलें, व पुढें निघाली. इतक्यांत मार्गामध्यें तिला वैश्यांचा मोठा समुदाय भेटला. त्यांच्या आश्रयानें ती चेदी देशांत सुबाहु राजाच्या नगरांत सुखरूप पोहोंचली. तेथें तिला राजमंदिरीं अंतर्गृहांत आश्रय मिळाल्यामुळें, दमयंतीनें विनयपूर्वक सुनंदेची सेवा करीत आपल्या अनिष्ट कालाचे दिवस काढिले ( भार० वन० अ० ६४-६५ ).

दमयंतीस सोडून नलराजा मध्यरात्रीं निघाला असतां, अरण्यांत हिंडूं लागला, तों एकदां हिंडतां हिंडतां, एके स्थलीं त्यानें दवाग्नि प्रदीप्त झालेला पाहिला. व त्यांतून माझें रक्षण कर, असा दीन स्वर श्रवण केला. त्यावरुन नल तेथें उभा राहिला, व त्या अग्नींत सांपडलेल्या कर्कोटक नागास त्यानें बाहेर काढिलें. तेव्हां नाग प्रसन्न होऊन तो यास म्हणूं लागला कीं, तूं एक, दोन, अशा क्रमानें पावलें मोजीत चल, म्हणजे माझ्या मनांतून तुझें कल्याण करावयाचें आहे, तें करून तुझ्या उपकारांतून उत्तीर्ण होईन. असें ऐकतांच नलराजा बरें म्हणून, पावलें मोजीत चालतां चालतां दहावें पाऊल टाकतांना त्यानें दश असें म्हटलें, त्याबरोबर कर्कोटक नाग, यास येऊन चावला. तें पाहून नलानें आश्चर्य पावून त्यास पुसलें कीं, हें तूं काय केलेंस ? कर्कोटक म्हणाला, चिंता करूं नको; माझ्या विषाची तुला बाधा न होतां, ज्यानें तुला अशा निकृष्ट स्थितीस आणिलें, त्या तुझ्या शरीरस्थ कलीस त्याची बाधा होईल, व तूं कुरूप, कृष्णवर्ण झाल्यानें तुला कोणी ओळखणार नाहीं, म्हणून मीं हें असें केलें आहे. आतां तूं असें कर कीं, आपणास बाहुक असें नामांतर धारण करून, अयोध्येमध्यें ऋतुपर्ण राजा आहे, त्याच्या घरीं जाऊन रहा, आणि जेव्हां तुला वाटेल कीं, आतां आपण पूर्ववत् सुरूप व्हावें, तेव्हां माझें स्मरण कर, म्हणजे मी तत्काळ येऊन तुला सुरूप करीन. इतकें

बोलून कर्कोटक अंतर्धान पावला ( भार० वन० अ० ६६ ).

कर्कोटक गेल्यावर नलराजा अयोध्येस जाण्यास निघाला, व दहा दिवसांनीं तेथें पोहोंचून ऋतुपर्णास भेटून म्हणाला कीं, मला अश्वविद्या व सारथ्य इ०-कांचें चांगलें परिज्ञान आहे, म्हणून तुजकडे आलों आहें; आश्रय दिलास तर राहीन. त्यावरून त्यानें यास, आपल्या आश्रयास ठेविलें, व वार्ष्णेय आणि जीवल, आपले जुने सारथि याचे हस्तक केले. या गोष्टीस कित्येक दिवस लोटल्यावर, एकदां बाहुक आपली दमयंती स्त्री, व कन्यापुत्र यांचें स्मरण करून विलाप करूं लागला. त्यावरून वार्ष्णेयानें, त्याचें कारण विचारलें, तेव्हां यानें, अशी एक गोष्ट झालेली मीं पाहिली इ० निमित्त सांगून स्तब्ध राहिला.

पूर्वी सांगितलें आहे कीं, नलाच्या वार्ष्णेय सारथ्यानें दयमंतीच्या आज्ञेवरून, तिची दोनही मुलें कुंडिनपुरास भीमराजाकडे पोहोंचविलीं, व नलराजा द्यूतासक्त झाल्याचें कळवून तो निघून गेला. त्यावर त्यास असें समजलें कीं, नलराजा राज्यभ्रष्ट होऊन, दमयंतीसहवर्तमान अरण्यांत गेला, म्हणून त्यानें उभयतांच्या शोधाकरितां देशोदेशीं ब्राह्मण पाठविले. त्यांतून एक सुदेव नांवाचा ब्राह्मण फिरत फिरत चेदी देशांत आला असतां, तेथें त्यानें दमयंतीस पाहून ओळखिलें व मी तुझ्या पित्याकडून तुझा शोध करीत हिंडत आहें, म्हणून सांगितलें. त्यावरून दमयंतीस इतकें रडें कोसळलें कीं, तें तिला आवरेना. तें वर्तमान सुनंदेनें मातेस कळवितांच ती तेथें आली, व सुदेवाच्या मुखानें वर्तमान ऐकून तिलाही अनिवार शोक झाला; कारण ती दमयंतीची मातृभगिनी ( मावशी ) होती ( भार० वन० अ० ६७-६८ ).

नंतर दमयंतीचा तिच्या मावशीनें मोठा सत्कार करून, समागमें सेना देऊन शिबिकारूढ तिला कुंडिनपुरास पावतें केलें. त्यावरून भीमकराजास ( दमयंतीच्या पित्यास ) परम हर्ष झाला; कारण दमयंतीचा शोध लागल्यानें दुहेरी काळजींतून एका काळजीचें ओझें उतरलें असें त्यास वाटलें. या गोष्टीस थोडे दिवस लोटल्यावर, दमयंती अंमळ स्वस्थ झाली असतां, तिनें कित्येक खुणेचीं वाक्यें सांगून, नलाच्या शोधासाठीं, अनेक देशीं अनेक ब्राह्मण पाठविले. त्यांत पर्णाद नांवाचा ब्राह्मण तिनें कोसलदेशीं अयोध्येस पाठविला. तो तेथें जाऊन जागोजाग दमयंतीनें सांगितलेलीं वाक्यें म्हणत नगरांत हिंडत असतां, त्यांचा अर्थ कोणासही कळला नाहीं. परंतु तीं वाक्यें ऐकून बाहुकास अतिशय वाईट वाटलें, व तो एकांतीं पर्णादास गांठून म्हणाला कीं, माझी स्त्री दमयंती व मुलें खुशाल आहेत ना? पर्णादा, काय सांगूं मी दमयंतीचा त्याग केला, तो केवळ माझा निरुपाय झाल्यामुळें केला, नाहींतर अशा पतिव्रतेचा त्याग कोण करील ! इतकें झाल्यावर, पर्णाद जो तेथून त्वरेनें निघाला, तो कुंडिनपुरास येऊन, त्यानें तें वृत्त दमयंतीस कळविलें. परंतु हा रूपावरून नलच असेल असा निश्चय मला करितां येईना असें म्हणून तो स्तब्ध राहिला. तेव्हां दमयंतीनें आपल्या मनाशीं त्याचा विचार केला, व शेवटीं निश्चित केलें कीं, नलास ओळखण्याच्या आणखी अनेक गोष्टी आहेत, त्यावरून त्याचा निश्चय करण्यास अवघड नाहीं. असें म्हणून प्रथम तिनें तो तेथें यावा, व त्यांतच त्याची परीक्षा व्हावी, यास्तव युक्ति योजिली. ती अशी;-( भार० वन अ० ६९ ).

दमयंतीनें, पूर्वीच्या सुदेव ब्राह्मणास बोलावून असें सांगितलें कीं, ब्राह्मणश्रेष्ठा, तूं अयोध्येस जाऊन, ऋतुपर्ण राजास एकांतीं प्रातःकाळीं इतकें कळीव कीं, उदयीक सूर्योदयीं दमयंती आपलें स्वयंवर करीत आहे यास्तव इच्छा असेल तर आपण तेथें जावें. त्याप्रमाणें तो ब्राह्मण अयोध्येस गेला, व त्यानें त्यास दमयंतीनें सांगितल्याप्रमाणें कळविलें, त्यावरून त्यास आश्चर्य तर झालेंच, परंतु बाहुक अश्वविद्येंत व सारथ्यविद्येंत कसा कुशल आहे, तें पाहण्याचें त्याच्या मनांत फार दिवस होतें. त्यावरून ही संधि बरी आहे, असें त्यास वाटून, त्यानें बाहुकास सांगितलें कीं, कुंडिनपुरास जाण्याकरितां आतांच निघणें आहे, व अस्तमानीं तेथें जाऊन पोहोंचलेंच पाहिजे. तेव्हां कसें करायाचें ? बाहुक म्हणाला, कांहीं चिंता नाहीं, आपण सिद्धता करावी. असें म्हणून अश्वशाळेंत त्यानें जाऊन, कृश असे अश्व निवडून रथास जोडले, व राजा रथारूढ होतांच रथ इतक्या वेगानें हांकिला कीं, ऋतुपर्णाचें उत्तरीय वस्त्र मार्गांत पडलें असतां, बाहुका, रथ उभा कर, वस्त्र पडलेलें घेऊं दे, इतकें म्हणत आहे तों, बाहुकानें उत्तर केलें कीं, आपलें वस्त्र एक योजनावर मागें राहिलें आहे. त्यावरून ऋतुपर्णाचा निश्चय झाला कीं, बाहुक, या विद्येंत उत्कृष्ट निपुण खरा. ( येथें कित्येक अर्वाचीनांची कल्पना आहे कीं, ऋतुपर्ण अग्निरथांत किंवा विमानांत बसून कुंडिनपुरास गेला असावा, तर त्या बृहस्पतींस माझा इतकाच प्रश्न आहे कीं, तर मग, ऋतुपर्णास

आपण अस्तमानीं कसे जाऊन पोहोंचूं अशी चिंता होण्याचें कारण काय ? म्हणून येथें नलाचें चातुर्य म्हणा, अथवा मंत्रसामर्थ्य म्हणा, परंतु तेंच मुख्य कारण असें समजावें (भार० वन० अ० ७०–७१).

अशा रीतीनें बाहुक रथ चालवीत असतां, सायंकाल झाला नाहीं तों, त्यानें रथ कुंडिनपुरच्या बाह्य प्रदेशीं आणून उभा केला, व ऋतुपर्णास हें कुंडिनपुर पहा म्हणून सांगितलें. तें त्याचें भाषण ऐकून ऋतुपर्णास पराकाष्ठेचा आनंद झाला, व त्यानें त्यास प्रसन्न मनानें अक्षहृदयविद्या शिकवून, त्याजवळची अश्वविद्या आपण ग्रहण केली. बाहुकास (नलराजास) अक्षविद्या प्राप्त होतांच, कलि त्याच्या शरीरांतून बाहेर निघाला. त्यास पाहून नलराजा त्यास शाप देण्यास उद्युक्त झाला असतां, त्यानें प्रार्थना केली कीं, हे पुण्यश्लोका, मी तुला शरण आहें, यास्तव आतां मला शाप देऊं नको. कां म्हणशील तर, कर्कोटक नागाच्या विषानें माझा देह दग्ध झाला आहे. शिवाय, दमयंतीचेही अभिशाप; यास्तव, जो कोणी आजपासून तुझें नामसंकीर्तन करील, त्यास माझी बाधा होणार नाहीं. हें वरप्रदान घे, व मला जाऊं दे. असें म्हणून तो अंतर्धान पावला (भार० वन० अ० ७२)

पुढें रथारूढ होऊन, ऋतुपर्ण राजा नगरांत आला, आणि स्वयंवराची वार्ता सुद्धां तेथें नाहीं हें पाहून त्यास विशेष आश्चर्य झालें असें नाहीं; कारण स्त्रियांचा एकवार विवाह झाल्यावर पुनः स्वयंवर घडत नसून मागें घडलेंही नाहीं, हें त्यांस पक्कें ठाऊक होतें. परंतु दमयंतीनें असें निमित्त करून मलाच येथें कां आणविलें, यांतील बीज त्याच्या ध्यानांत येईना. इतक्यांत ऋतुपर्ण आल्याचें वृत्त भीमकराजास कळतांच तो तत्काळ त्याकडे आला, व त्यास आदरानें स्वमंदिरीं त्यानें नेऊन, त्याचें अतिथ्य उत्तमप्रकारें केलें (भार० वन० अ० ७३).

ऋतुपर्ण राजा आल्याचें वर्तमान दमयंतीस कळतांच, तिनें आपल्या केशिनी ना० दासीस शोधास पाठविलें, व तो आला हें खरेंच असें समजतांच, तिनें निश्चय केला कीं, एका दिवसांत अयोध्येहून येथें ज्या अर्थी ऋतुपर्णाचें येणें झालें, त्या अर्थी हें कृत्य नलाचेंच, इतराचें नव्हे. अशी तिनें या एका प्रकारावरून नलाची परीक्षा केली. नंतर तिनें दुसऱ्या परीक्षा करून नलास ओळखावें, हा विचार मनांत आणून दासीकडून त्यास अग्नि आणि उदक न देववितां, इतर पाकाचें साहित्य देवविलें. तें घेऊन, त्यानें जल व अग्नि उत्पन्न करून पाक केला. हें वर्तमान दमयंतीस दासीनें कळवितांच, नलराजा हाच असा तिचा पूर्ण निश्चय झाला (भार० वन० अ० ७४).

नंतर दमयंतीनें आपल्या मातापितरांस असें कळविलें कीं, नलराजाच्या बहुतेक खुणा बाहुक म्हणून ऋतुपर्णाचा सारथि आहे, त्याच्या ठायीं दिसतात; परंतु रूपावरून थोडा संशय वाटतो; यास्तव आज्ञा होईल तर मी स्वतः त्याकडे जात्यें, व परीक्षा करून पाहात्यें. त्यावरून त्यांनीं आज्ञा देतांच, ती बाहुकाकडे येऊन म्हणूं लागली कीं, पतिव्रता आणि निरपराधी अशा आपल्या स्त्रीस, एकाकी अरण्यांत सोडून जाणारा नलराजावांचून पृथ्वीवर दुसरा कोणी नाहीं. असें ऐकतांच, बाहुक म्हणाला, पति सदाचारवर्ती व विद्यमान असतां, स्वयंवर करणारी तरी तुजवांचून पृथिवीवर दुसरी कोण आहे ? त्यावरून उभयतांची ओळख पटून दमयंतीनें उत्तर दिलें कीं, हा सर्व उपक्रम तुजकरितांच आहे. वास्तविक स्वयंवर करणें असतें तर, अन्य राजे मी कां बोलाविले नसते ? असें म्हणून उगीच राहिली. इतक्यांत दमयंती निष्पाप असल्याची आकाशवाणी ऐकून, नलानें कर्कोटकाचें स्मरण केलें, तों त्यानें तत्काळ येऊन, आपलें विष उतरून घेतलें व त्यास पूर्ववत् सुरूप केलें. तें पाहून नल व दमयंती यांनीं परस्परांस आलिंगनें दिलीं (भार० वन० अ० ७५–७६).

याप्रमाणें झालेलें वर्तमान दमयंतीनें मातापितरांस कळविलें. त्यावरून त्यांस आनंद होऊन, त्यांनीं त्याची भेट घेतली व स्वमंदिरीं नेलें. हें वर्तमान ऋतुपर्णास कळतांच तोही तेथें आला, व नलास अत्यादरानें भेटला. आणि दमयंतीनें आपणासच येथें कां बोलाविलें, त्याचें बीज न कळून जें पहिल्यानें त्यास गूढ वाटलें होतें, तेंही त्याचें तत्काळ उकलून त्यास समाधान झालें. नंतर त्यानें मीं तुजकडून जीं नीच कार्यें करविलीं, त्याची क्षमा कर, इ० भाषणांनीं विनंती केली. नलानें उत्तर केलें, तें कांहींएक मनांत न आणितां, तुझ्याशीं माझें सख्य झालें, हा मला मोठा लाभ झाला. असा त्याचा गौरव करून, त्या दिवशीं सर्वांनीं एकत्र भोजनें केलीं, व ऋतुपर्ण राजा अयोध्येस निघून गेला. (भार० वन० अ० ७७).

ऋतुपर्ण अयोध्येस गेल्यावर, नलास भीमकराजानें थोडे दिवस आपणापाशीं ठेवून घेऊन, दमयंती व मुलें यांसहित निषधदेशीं मार्गस्थ केलें. तेव्हां नल

तेथें येतांच त्यानें पुष्करास बोलाविलें, आणि त्याशीं द्यूत खेळून पुनः आपलें राज्य त्यापासून परत घेतलें. नंतर पुष्करास एक मासपर्यंत जवळ ठेवून घेऊन, त्यास त्याच्या नगरास जाण्यास सांगितल्यावर पूर्वीप्रमाणें तो आपलें राज्य करूं लागला ( भार० वन० अ० ७८ ).

६-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ऋतुपर्ण राजाच्या दोन पुत्रांतील दुसरा ( लिंगपु० अ० ६६ ).

**नलकूवर**-कुबेराचा पुत्र. माणिग्रीवाचा ज्येष्ठ भ्राता. एके काळीं हे उभयतां, मद्यप्राशन करून स्त्रियांसहवर्तमान गंगाजलांत क्रीडा करीत असतां, त्या मार्गानें चाललेल्या नारदास यांनीं पाहिलें; परंतु जलाबाहेर येऊन नमस्कार केला नाहीं. त्यावरून त्यानें कोपेंकरून शाप दिला कीं, तुम्ही वृक्षयोनि पावाल. तेव्हां त्यांनीं अन्याय क्षमा करून उःशाप द्यावा म्हणतांच, कृष्णावतारीं तुम्ही मुक्त होऊन पूर्व योनि पावाल, असें म्हणून गमन केलें. हेच पुढें गोकुलांत वृक्ष झाले असतां, कृष्णानें यांचा उद्धार केला ( भाग १० स्कं० अ० १० ). येथें कुबेर म्हणजे प्रथमार्थक वैश्रवण समजावा.

**नलिनी**-स्वर्धुनीसप्तप्रवाहांतील एक प्रवाह. हा मेरुपर्वतावर आहे.

२-इंद्राच्या नगरीस नांव ( वा०रा० अयो० स० ९४).

**नवतंतु**-विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक.

**नवनिधि**-महापद्म, पद्म, शंख, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद, नील, खर्व, असे कुबेराचे नवनिधि ते.

**नवरथ**-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा तद्वंशीय भीमरथाचा पुत्र. याचा पुत्र दशरथ.

**नवराष्ट्र**-भारतवर्षीय देश, व एक नगरी.

**नवसिद्ध**-ऋषभदेवास जयंतीपासून झालेल्या शतपुत्रांत जे नऊजण सिद्ध होते ते ( ऋषभदेव श० पहा० ).

**नहुष**-( सो० वं० ) बुधपुत्र पुरूरव्याचा पौत्र, आयुराजाच्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ. यास सुस्वधा पितरांची मानसकन्या विरजा ना० स्त्री असून, तिजपासून यति, ययाति, संयाति, अयति, वियति आणि कृति, असे साहा पुत्र होते. हा राजा पराक्रमी व सद्गुणी होता, म्हणून, वृत्रासुराच्या हत्येनें इंद्र पीडित होऊन जलामध्यें विश्रांति घेत असतां, संपूर्ण देव आणि ऋषि यांनीं मिळून, यास इंद्रपदाचा अधिकारी केलें होतें. हा तेथील अधिकार, व ऐश्वर्य भोगीत असतां, कांहीं कालानें यास असें वाटलें कीं, इंद्राणीचाही उपभोग आपणास घडावा. यास्तव यानें तिला पाचारण्याकारितां, देवदूतांस तिजकडे पाठविलें. तेव्हां तिला विचार पडला कीं, मी, जो शतक्रतु केलेला, त्याची मात्र भोग्य आहें, इतरांची नाहीं; तेव्हां कसें करावें ! असें म्हणून ती बृहस्पतीकडे गेली, व नहुषानें आपणांस बोलाविल्याचें वृत्त तिनें त्यास कळविलें. त्यावरून त्यानें सांगितलें कीं, अगदींच नहुषाकडे न जाणें तुला योग्य नाहीं; तर असें कर कीं, तूर्त तूं त्याकडेस जा, आणि कांहीं कालावधीनें मी काय तें कळवीन, असें निमित्त सांगून परत ये. पुढें मग तुला कांहीं युक्ति सांगेन, त्याप्रमाणें कर. त्यावरून इंद्राणी नहुषाकडे जाऊन, कांहीं निमित्त त्यास सांगून परत आली ( भार० वन० अ० १९५ ).

पुढें बृहस्पति, व इतर देव एकत्र होऊन इंद्राची ब्रह्महत्या कशी जाईल, त्याचा विचार करीत बसले. इतक्यांत विष्णु तेथें प्रकट होऊन, त्यानें सांगितलें कीं, तुम्ही इंद्र आहे तेथें जा, व त्याकडून एक अश्वमेध करवा, म्हणजे तो ब्रह्महत्येपासून मुक्त होईल, व सत्वरच आपल्या स्थानीं येईल. त्याप्रमाणें देवांनीं केल्यावर, इंद्राची ब्रह्महत्या, वृक्ष, नद्या, पर्वत, पृथिवी आणि स्त्रिया, या पांच ठिकाणीं विभागली जाऊन तो शुद्ध झाला. इतक्या अवकाशांत इकडे इंद्राणीनें नहुषास सांगून पाठविलें कीं, तुम्ही अपूर्व वहानांत बसून मजकडे यावें, म्हणजे मी आपल्या सेवेस सादर होईन. त्यावरून यानें अपूर्व वाहन म्हणजे काय ? त्याविषयीं विचार करून दुर्दैवानें असें निश्चित केलें कीं, सप्तर्षीस आजपर्यंत कोणी वाहनास लाविलें नाहीं, त्या अर्थीं हेंच अपूर्व वाहन म्हटलें पाहिजे. असें म्हणून त्यानें सप्तर्षीस बोलावून वाहनास लाविलें व आपण त्यांत आरूढ होऊन इंद्राणीकडे चालला. मार्गानें जात असतां, इंद्राणीकडे केव्हां जाईन, अशी यास त्वरा झाल्यामुळें, यानें ऋषींच्या मस्तकास पादस्पर्श करून, **सर्प, सर्प** (लवकर चला, लवकर चला) असें म्हटलें, त्यावरून अगस्त्य ऋषीनें शाप दिला कीं, तूंच सर्प होऊन पृथिवीवर पतन पाव. त्यावरून नहुष सर्प होऊन पृथिवीवर पडतो तों, इंद्रही येऊन स्वपदारूढ झाला ( भार० उद्योग० अ० ११-१७). ( भाग० ६ स्कं० अ० १३ ).

सप्तर्षींत अगस्त्यऋषि नसून, त्यानें नहुषास शाप दिला, हें असंभूत दिसतें. याविषयीं मूळांत कांहीं जरी आढळत नाहीं, तरी, वाहनास वाहण्यासाठीं सातजण अडनीड पडतात; म्हणून आठवा अगस्त्य, भरतीसाठीं नहुषानें लाविला असावा असें वाटतें.

सारांश, नहुषराजा अजगर होऊन यामुन पर्वतावरील सरोवरांत पडला, व चालू द्वापारांतीं भीमसेनास ग्रासिल्यावरुन युधिष्ठिराच्या दर्शनानें त्याचा उद्धार झाला ( १ यामुनगिरी श० पहा ).

**नक्षत्र**–आकाशांत दिसणारीं अनेक तेजस्वी मंडलें, तें प्रत्येक. **श्लोक**–"दृश्यंते दिविताः सर्वा विश्वं चेदं पुनः पुनः ॥ न क्षीयंते यतस्तानि तस्मान्नक्षत्रता स्मृता" २६ ( लिंगपु० अ० ६० ).

**नाकुश्य**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**नाकुलि**–भृगुकुलोत्पन्न ऋषि.

२–नकुलपांडवाच्या शतानीक आणि निरमित्र, उभय पुत्रांस संज्ञा ( भार० द्रोण० अ० २५ ).

**नाग**–मेरुकर्णिका पर्वतांतील एक.

२–शरीरस्थ पंचउपप्राणांतील एक.

३–भारतवर्षीय तीर्थ.

**नागदत्त**–धृतराष्ट्रशतपुत्रांतलि एक.

**नागदत्ता**–एक अप्सरा.

**नागपुर**–हस्तिनापुरासच नांव.

**नागवीथी**–धर्मऋषीस यामीपासून झालेली कन्या.

**नागसाव्हय**–हस्तिनापुर.

**नाग्नजिति**–कोसलदेशाधिपति नग्नजित् राजाची कन्या सत्या ती.

**नागोद्भेद**–भारतवर्षीय तीर्थ.

**नाचिकि**–विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक.

**नाचिकेत**–नचिकेताऋषींचा पुत्र ( भार० अनुशा० अ० ७१ ).

**नाडायन**–एक ब्रह्मर्षि ( ३ आंगिरा श० पहा ).

**नाडीजंघ**–प्रसिद्ध बकवि० ( १ इंद्रद्युम्न श० पहा ).

**नाद**–चाक्षुषमन्वंतरांतल्या सप्तर्षींतलि एक.

२–अमृतनाद शब्द पहा.

**नाभ**–खालचा शब्द पहा.

**नाभाग**–वैवस्वतमनूच्या दहा पुत्रांतलि नववा जो नभग त्याचा हा पुत्र. हा गुरुगृहीं असतां, याच्या भ्रात्यांनीं सर्व दायभाग विभागून घेऊन, हा आल्यावर यास म्हटलें कीं, तुझ्या विभागास आम्हीं तुला पिता ठेविला आहे. त्यावरुन यानें पित्याकडे येऊन तें वृत्त कळवितांच, पिता म्हणाला, बरें आहे. असें बोलून त्यानें. यास सांगितलें कीं, प्रस्तुत अंगिराऋषि यज्ञ करीत असून, त्या यज्ञांतील ऋत्विज दोन सूक्तें म्हणण्यास चुकत आहेत, यास्तव तूं तेथें जा, आणि तीं त्यांस म्हणायास सुचीव, म्हणजे ते तुला द्रव्य देतील. याप्रमाणें बोलून तीं दोन सूक्तें त्यानें यास सांगितलीं. त्यावरुन हा तेथें गेला, व पित्यानें सांगितलेलीं दोन सूक्तें त्यांस सुचविलीं. तेणेंकरुन ऋत्विज संतुष्ट होऊन, त्यांनीं यज्ञ समाप्त होतांच अवशेष द्रव्य यास घेण्यास सांगितलें. तें हा घेत असतां, एक कृष्णवर्ण पुरुष तेथें प्रकट होऊन, त्यानें याचें निवारण केलें. तेव्हां हा, याचें कारण काय म्हणून त्या पुरुषास विचारुं लागला. त्यानें सांगितलें, तूं आपल्या पित्यासच पूस म्हणजे तो यथार्थ काय तें सांगेल. म्हणून हा पित्याकडे आला, व तेथील वृत्त यानें त्यास सांगितलें. तेव्हां नभग म्हणाला, पूर्वीं दक्षयज्ञापासून असा नियम ठरला आहे कीं, यज्ञांतील अवशिष्ट द्रव्याचा स्वामी रुद्र होय. हें पित्याचें वाक्य ऐकून, यानें रुद्रास तसेंच येऊन कळविलें. त्यावरुन रुद्र संतुष्ट होऊन, त्यानें त्यास तें सर्व दिलें, व यानें मागितल्यावरुन ब्रह्मविद्याही देऊन अंतर्धान पावला असतां, हा सर्व द्रव्य घेऊन परत आला. यास अंबरीष नांवाचा पुत्र होता ( भाग० ९ स्कं० अ० ४ ).

२–( सू० वं० ) वैवस्वत मनूचा पुत्र दिष्ट, त्याचा पुत्र. याचा पुत्र भलंदन.

३–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न भगीरथ राजाच्या दोन पुत्रांतलि कनिष्ठ. यास नाभ असेंही म्हटलेलें असून, पुत्र अंबरीषच होता.

**नाभि**–प्रियव्रतपुत्र आग्नीध्र, त्यास पूर्वचित्ति अप्सरेपासून झालेल्या नऊ पुत्रांतील ज्येष्ठ. यास, मेरुदेवी ना० स्त्री असून, तिचेठायीं ऋषभदेव ना० पुत्र झाला होता. याच्या वर्षास अजनाभवर्ष असें नांव होतें.

**नाभिगुप्त**–प्रियव्रतपुत्र हिरण्यरेता, त्याच्या सात पुत्रांतलि चौथा. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२– कुशद्वीपांतलि चौथा वर्ष.

**नायकि**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा).

**नारद**–स्वायंभुव मन्वंतरांत, ब्रह्मदेवांनीं दश मानसपुत्र निर्माण केले, त्यांत हा, त्याच्या उत्संगापासून(मांडीपासून ) झालेला असून दहावा होता. "दशमस्तत्र नारदः" ( महर्षि श० पहा ). याचा शापेंकरुन देहपात झाला होता. हा पूर्वकल्पीं दासीपुत्र असून, प्रस्तुत कल्पीं ब्रह्मपुत्रत्व पावला होता, व यानें स्त्रीपरिग्रह मुळींच केला नव्हता.

२–शापेंकरुन देहपात पावलेला नारद पुनः ऋषिकुलांत जन्मास आला. याच्या पित्याचें नांव उपलब्ध होत नाहीं, परंतु हा पर्वत ऋषींचा मातुल ( मामा ) इत-

केंच आढळतें. श्लोक.-"अत्र ते वर्णयिष्यामि यथावृत्तं जनेश्वर ॥ नारदः पर्वतश्चैव द्वावृषी लोकसत्तमौ ॥ ४ ॥ मातुलो भागिनेयश्च देवलोकादिहागतौ ॥ विहर्तुकामौ संप्रीत्या मानुषेषु पुरा विभो" ५(भारत० शांति० अ० ३० ). यांनीं आपआपल्या मनांत शुभ किंवा अशुभ आलेला संकल्प परस्परांस सांगण्यास चोरूं नये, चोरल्यास शाप द्यावा असा नियम होता. ह्या वृत्ताविषयीं याची स्त्री दमयंती, तिचा पिता ( ७ संजय श० पहा ).

३- कोणीएक ब्रह्मर्षि, याचाही पिता कोण तें आढळत नाहीं; परंतु यास अरुंधती नांवाची भगिनी असून, ती यानें मैत्रावरुणी वसिष्ठास दिली होती. श्लोक.- "नारदस्तु वसिष्ठायारुंधतीं प्रत्यपादयत् ॥
अरुंधत्यां वसिष्ठस्तु सुतानुत्पादयच्छतं । ७९
ज्यायसोजनयच्छक्तेरदृश्यंति पराशरं" ८३ ( लिंगपु० अ० ६३ ). याविषयीं आणखी ( ३ वसिष्ठ श० पहा ). सत्यवती ना० कोणी कन्या ती याचीच स्त्री असावी ( भार० उद्योग० अ० ११७ ).

४- कश्यपऋषीस चालू मन्वंतरांत मुनी ना० भार्येपासून झालेल्या सोळा देवगंधर्वांतील एक. कलि ना० पंधराव्या देवगंधर्वाचा कनिष्ठ भ्राता. "गंधर्वौ कलिनारदौ" ( भार० आदि० ). हा वैशाखमासींच्या सूर्यासमागमें प्रतिवर्षी संचार करण्यास असतो ( २ माधव श० पहा ) . इकडल्या गोष्टी तिकडे सांगून, कलह लावणारा जो नारद पुराणांतून आढळतो, तो प्रायः हाच असावा असें वाटतें.

५-कुबेर सभेंत वास करणारा ऋषि तो. यानेंच इंद्रादि लोकपालांच्या सभांचें वर्णन युधिष्ठिरास सांगून,नीति सांगितलेली नारदनीति या नांवानें भारतसभापर्वांत प्रसिद्ध आहे ( भार० सभा० अ० ५-११ ). हा वरुणसभेंतीलच असल्याविषयीं प्रमाण आहे तें असें.- "सदा भगवती लक्ष्मीस्तत्रैव नलकूबरः । अहंच बहुशस्तस्यां भवंत्यन्येच मद्विधाः १९ ब्रह्मर्षयो भवंत्यत्र तथा देवर्षयोपरे ॥ क्रव्यादाश्च तथैवान्ये गंधर्वाश्च महाबलाः २० " ( भार० सभा० अ० १० ).

६-विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक. जनमेजयानें केलेल्या सर्पसत्रांत जो एक सदस्य होता, तो बहुधा हाच असेल.

७-दाशरथि रामाच्या सभेंत जे आठ धर्मशास्त्री होते, त्यांतलि एक ( वा० रा० उत्तर० स० ७४ ).

८-मेरुकर्णिका पर्वतांत एक पर्वत आहे तो.

**नारदपरिव्राजक**-अथर्वणवेदोपनिषत्.

**नारदी**-विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**नारसिंह**-नृसिंह शब्द पहा.

**नारसिंहकल्प**-ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील होऊन गेलेला सोळावा कल्प अ० दिवस [ ४ कल्प श० पहा ]. जसें, प्रस्तुत कल्पारंभीं वराहावतार झाल्यामुळें, या कल्पास वाराहकल्प नांव आहे, तसें सोळाव्या कल्पारंभीं नृसिंहावतार प्रथम झाला होता म्हणून, त्यासही हें नांव होतें.

**नारायण**-सकल जगतास आधारभूत परमात्मा तो.

२-स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषीचा पुत्र (नरनारायण श० पहा ).

३-चालू वैवस्वत मन्वंतरांतील धर्म ऋषीस साध्येपासून झालेल्या बारा साध्यदेवांतील एक ( साध्यदेव श० पहा ).

**नारायणगण**-या नांवाचा गणसमुदाय. यांतून कांहीं गण कृष्णानें दुर्योधनास देऊन, कांहीं पांडवांकडे ठेविले होते. ते भीष्म इ०कांच्या हातून सर्व मरण पावले.

**नारायणसरोवर**-सिंधुनदाचा जेथें समुद्राशीं संगम होतो, तेथील तीर्थवि०.

**नारायणामृतबिंदु**-मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**नारायणी**-नारायण जो परमात्मा, त्याची शक्ति.

२-मुद्गल ऋषीची स्त्री इंद्रसेना ती.

**नारी**-आग्नीध्र पुत्र कुरु त्याची स्त्री, मेरूच्या नऊ कन्यांतलि एक.

**नारीकवच**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अश्मक राजाचा पुत्र जो मूलक राजा, तोच.

**नारीतीर्थ**-पंडुपुत्र अर्जुन, तीर्थयात्रा करीत करीत मणिपुरास येऊन, तेथून दक्षिणसमुद्रतीरानें फिरत असतां, त्यानें पुण्यकारक अशीं सौभद्र, पौलोम, आगस्त्य, कारंधम आणि भारद्वाज, अशीं पांच तीर्थें परस्परांजवळ परस्पर पाहिलीं. त्या सर्वांचें एकच साधारण नांव नारीतीर्थ असें होतें. परंतु तीं मनुष्यांनीं विवर्जित अशीं पाहून, त्यांच्या आसमंतात् राहणाऱ्या ऋषींस त्यानें त्याचें कारण विचारिलें. त्यांनीं प्रत्येकांत एकेक मोठी मगरी राहत्ये, असें सांगून म्हटलें कीं, तूं तिकडे अगदीं जाऊं नको; परंतु अर्जुनानें तें न ऐकून तिकडे गमन केलें, आणि पहिल्यानें तो सौभद्रतीर्थीं स्नानार्थ उतरला. तों त्यांतील मगरीनें त्याच्या पायांस धरिलें. अर्जुन सावध होतांच, म्हणून त्यानें आपल्या शारीरसामर्थ्यानें तिला बाहेर ओढून काढतांच, ती दिव्य स्त्री झाली असें पाहून, तो तिला

पुसूं लागला कीं, तूं कोण आहेस ? व तुझें मूळ वृत्त काय ? तें सांग. अप्सरा म्हणाली, मी कुबेरसभेंतील अप्सरा असून, माझें नांव वर्गा असें आहे. एकदां मी, सौरमेयी, समीची, बुद्बुदा आणि लता, या माझ्या चौघी सख्यासहवर्तमान अरण्यांत गायन करीत फिरत असतां, एकेस्थळीं आम्ही फार वेळ रमलों. तेथें कोणी ऋषिपुत्र अध्ययन करीत गुप्त असलेला आम्ही पाहिला नव्हता, त्यामुळें आमच्या क्रीडेपासून त्याच्या अध्ययनास विक्षेप झाला. म्हणून त्यानें कोपेंकरून आम्हास शाप दिला कीं, तुम्हीं जलामध्यें नक्ररूप होऊन पडाल. त्यावरून आम्ही भयभीत झालों, व त्यास वंदन करून उःशाप मागितला. तेव्हां तो म्हणाला, आजपासून शतवर्षांनीं, कोणी एका पुरुषाच्या स्पर्शानें तुमचा उद्धार होऊन, पुनः तुम्हीं पूर्ववत् स्वलोकीं गमन कराल. त्या त्याच्या वचनानुरूप आज आमचीं शतवर्षें पूर्ण झाल्यामुळें, तुझ्या स्पर्शानें जशीं मी पूर्वरूप पावल्यें, असेंच माझ्या चौघी सख्यांस तूं करण्यास योग्य आहेस. त्यावरून अर्जुनानें प्रत्येकांत स्नानास उतरून त्यांचाही उद्धार केला असतां, त्यांनीं त्याची स्तुति करून, कुबेरलोकीं गमन करितांच, तोही, तीं तीर्थें निर्भय झाल्यानें हर्षित होऊन, पुनः मणिपुरास प्राप्त झाला ( भार० आदि० अ० २१६–२१७ ).

**नासत्य**–आश्विनेयांतील एक ( आश्विनेय श० पहा ).

**नाहुष**–नहुषराजासच म्हटलेलें आढळतें. अगस्त्य ऋषीची देवांनीं जी स्तुति केली, तींत असें म्हटलें आहे.–– " नाहुषेणाभितप्तानां त्वं लोकानां गतिः पुरा. " ( भार० वन० अ० १०३ ).

२–नहुषराजाचा पुत्र ययाति राजा तो. " अत्रैव नाहुषो राजा राजन् क्रतुभिरिष्टवान् ॥ ययातिर्बहुरत्नौघैर्यत्रेंद्रो मुदमभ्यगात् " ॥ लोमशयुधिष्ठिरसंवाद. ( भार० वन० अ० १२९ ).

**निकुंभ**–दनुपुत्र एक दानव.

२–हिरण्यकशिपूचा पौत्र. प्रल्हादाच्या पुत्रांतील एक. याचे पुत्र सुंदोपसुंद.

३–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हर्यश्व राजाचा पुत्र. याचा पुत्र संहताश्व.

४–कुंभकर्णाच्या दोन पुत्रांतील एक ( कुंभनिकुंभ श० पहा ).

५–नील वानरानें युद्धांत मारिलेला एक रावणाचा प्रधान ( वा० रा० सुंदर० स० ४९ ). ( युद्ध० स० ४३ ).

**निकुंभनाभ**–बलीदैत्याच्या शतपुत्रांतील एक.

**निकुंभिला**–लंकेच्या पश्चिमेस असणारें एक स्थान. येथें याच नांवाची एक भद्रकालीची मूर्ति असे. इंद्रजिताची अभिचार कर्मभूमि ( जारणमारणप्रयोगभूमि ) ती हीच. येथें शुक्राच्या साह्यानें त्यानें अनेक यज्ञही केले होते ( वा० रा० उत्तर स० २५ ).

**निकृतिज**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**निखर्वट**–तार वानरानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस.

**निघ्न**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अनरण्य राजाचा पुत्र. याचा पुत्र अनमित्र राजा.

**निचंद्र**–दनुपुत्र एक दानव.

**निचिता**–भारतवर्षीय नदी.

**निजधृति**–शाकद्वीपस्थ नदी.

**नितंभू**–एक ऋषि.

**नित्य**–मरीचिकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि.

**निदाघ**–द्वितीयार्थक कश्यपकुलोत्पन्न ऋषि. हा ऋभुऋषींचा शिष्य होता.

**निध्रुव**–कश्यपवंशीय ऋषि ( २ कश्यप श० पहा ).

**निबंधन**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हर्यश्व राजाचा पौत्र. अरुण राजाचा पुत्र. यास पुराणांतरीं त्रिबंधन असें नांव असून, सत्यव्रत ( त्रिशंकु ) आणि सत्यरथ असे दोन पुत्र होत.

**निमि**–सूर्यवंशीय इक्ष्वाकुराजा, त्याच्या शतपुत्रांतील दुसरा. हा, गौतमाश्रमासमीप वैजयंत ना० नगर स्थापून तेथें राज्य करीत असे. यानें वैवस्वत मन्वंतरारंभीं उत्पन्न झालेला ब्रह्मपुत्र वसिष्ठ, तो पित्यापासून कुलगुरु असल्यामुळें, त्याच्या साह्यानें अनेक यज्ञ केले. नंतर कांहीं अवकाशानें हा, पुनः एकादा मोठा यज्ञ आरंभावा, असें मनांत आणून वसिष्ठाकडे गेला. तेव्हां वसिष्ठ म्हणाला, मला इंद्राकडे यज्ञार्थ जाणें आहे, यास्तव मी येईपर्यंत अवकाश कर. त्यावरून वसिष्ठऋषि तिकडे जातांच, यानें जीवित अशाश्वत जाणून, गौतमऋषीस उपाध्याय केले, व अन्यऋषि बोलावून पंचसहस्रवर्षात्मक यज्ञ आरंभिला. कांहीं कालानें इकडे इंद्राचा यज्ञ समाप्त करून, वसिष्ठ येऊन पाहातो तों, यानें यज्ञास आरंभ केला आहे. तेणेंकरून वसिष्ठास कोप येऊन, त्यानें तुझा देह पतन पावेल, असा यास शाप दिला. म्हणून यानेंही त्यास तोच शाप दिला. त्यावरून उभयतांचे देह पतन पावून, आत्मे ब्रह्मदेवाकडे गेले असतां, त्यांनीं त्यांस पुनः देहधारणाची आज्ञा केली. ती, वसिष्ठानें मान्य करून मित्रावरुणापासून त्यानें देहधारण केलें; परंतु निमीनें प्रार्थना केली कीं, मला आतां देहधारण

नको; कारण देही होऊन, अशीं सुखदुःखें भोगावीं, त्यापेक्षां विदेहस्थिति बरी. त्यावरून, ब्रह्मदेवांनीं तथास्तु म्हणून, प्राणिमात्रांच्या नेत्रांवर याची स्थापना केली. इकडे ऋत्विजांनीं, याचा देह तसाच रक्षण करून, यज्ञ समाप्त केल्यावर, राज्यास अधिकारी पाहिजे म्हणून देहाचें मंथन केलें, त्यापासून जो पुत्र निर्माण झाला, तोच मिथि अशा नांवानें प्रसिद्ध झाला असतां, त्याच्या नांवावरून वैजयंत नगरास मिथिला नांव पडलें. मिथिराजा, मातेच्या संबंधावांचून, केवळ जनकोत्पन्नच म्हणून, व विदेहाचा वंशज म्हणून, जनक आणि वैदेह असें नांव पावला, तें त्याच्या सर्व वंशजास पुढें चालू झालें. याप्रमाणें हें कुल तेव्हांपासून सूर्यवंशांतून भिन्न पडून, गौतमकुल त्याचें उपाध्याय झालें (वा० रा० उत्तर० स० ५५–५७).

२–स्वायंभूमन्वंतरांतल्या दत्त ऋषीचा पुत्र.

३–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय दंडपाणि राजाचा पुत्र. याचा पुत्र क्षेमक.

४–एक असुरवि०.

**निमिचक्र**–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय असीमकृष्ण राजाचा पुत्र. हा, हस्तिनापुरांत राज्य करीत असतां, नदीनें तें पुर वाहविलें, म्हणून कौशांबी नगरींत जाऊन राहिला. याचा पुत्र चित्ररथ राजा. निमिचक्र हा, सर्पसत्र करणाऱ्या जनमेजयाच्या पुढला पांचवा पुरुष होता.

**निम्न**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वत राजाचा पुत्र वृष्णि, तद्वंशीय अनमित्र राजाचा मध्यम पुत्र. यास सत्राजित् आणि प्रसेन असे दोन पुत्र होते.

**निम्लोचि**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतपुत्र भजमान, त्याच्या पहिल्या स्त्रीच्या तीन पुत्रांतील एक.

**निम्लोचिनी**–मानसोत्तर पर्वतावरील पश्चिमदिग्पाल वरुणाची नगरी. हिला सूषा असेंही म्हटलेलें आहे. मेरूच्या आसमंतात् सूर्य फिरत असतां, जेव्हां हिच्या याम्योत्तरावर येतो, तेव्हां येथील लोकांस मध्यान्ह, विभावरींत सूर्योदय, संयमिनींत अस्त, आणि देवधानींत मध्यरात्र असते.

**नियतायु**–अर्जुनानें मारिलेला दुर्योधनपक्षीय श्रुतायु राजाचा पुत्र ( भार० द्रोण० अ० ९३ ).

**नियती**–मेरूची कन्या. स्वायंभुव मन्वंतरांतील भृगुपुत्र विधाता त्याची स्त्री.

**नियुत्सा**–ऋषभदेववंशीय प्रस्ताव राजाची स्त्री. विभुराजाची माता.

**निरामित्र**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न जरासंधवंशांतील अयुतायूचा पुत्र. याचा पुत्र सुनक्षत्र.

२–नकुलपांडवास करेणुमतीपासून झालेला पुत्र.

३–सहदेवानें मारिलेला त्रिगर्तदेशीय राजा ( भार० द्रोण० अ० १०७ ).

**निरालंब**–यजुर्वेदोपनिषत्.

**निर्ऋति**–एकादश रुद्रांतील एक. हा नैर्ऋत्यदिग्पाल, व भूतराक्षसांचा अधिपति आहे.

२–वरुणपुत्र अधर्माची स्त्री.

**निर्मोक**–आठवा होणारा सावर्णि मनु, त्याच्या पुत्रांत एक होईल तो.

२–पुढें होणाऱ्या देवसावर्णि मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

**निर्मोचन**–नगरवि० ( भार० उद्योग० अ० १३० ).

**निर्वाण**–ऋग्वेदोपनिषत्.

**निर्वाणरुचि**–धर्मसावर्णि मन्वंतरांतील देववि०.

**निर्विंध्या**–विंध्याचलापासून निघालेली नदी.

**निर्वीरतीर्थ**–वसिष्ठाश्रमासमीपचें तीर्थवि०.

**निर्वृत्ति**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्यामघकुलांतील क्रथवंशांत जन्मलेल्या वृष्टि राजाचा पुत्र. यास विदूरथ असें नामांतर होतें, व पुत्र दशार्ह ना० राजा होता.

**निल**–बिभीषणाच्या चार अमात्यांतील एक.

**निवातकवच**–प्रल्हादभ्राता संऱ्हाद त्याचे पुत्र. हे समुद्रतीरीं राहात असून इंद्रासही अजिंक्य होते. या सर्वांचा वध अर्जुनानें केला ( भार० वन० अ० १६९–१७० ).

**निवारा**–भारतवर्षीय नदी.

**निशठ**–एक यादव ( जैमि०अश्वमे०अ० १०श्लो० २८).

२–एक राजर्षि.

**निशाकरमुनि**–चंद्रमामुनीचाच नामपर्याय.

**निशीथ**–उत्तानपादपुत्र ध्रुव, त्याचा पौत्र, पुष्पार्ण राजास दोषा ना० दुसऱ्या स्त्रीपासून झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा.

**निशुंभ**–शुंभासुराचा भ्राता ( शुंभनिशुंभ श० पहा ).

**निश्चला**–द्वितीयार्थक हिमालयापासून निघालेली नदी.

**निश्च्यवन**–बृहस्पतीपासून तारेस झालेल्या साहा पुत्रांतील दुसरा, याचा पुत्र विपाप्मा.

२–गत स्वारोचिष मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

**निषंगि**–धृतराष्ट्रशतपुत्रांतील एक.

**निषध**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न रामवंशीय अतिथि राजाचा पुत्र. यास नल आणि नभ असे दोन पुत्र होते.

२–मेरुकर्णिका पर्वतांतील एक.

३–भारतवर्षीय देश, येथील राजा दमयंतीचा पति नल राजा.

४–आपण राहतों या अंगाकडे असणारा जंबुद्वीपांतील एक महापर्वत. हा हरिवर्षाच्या उत्तरेस असून, पूर्वपश्चिम क्षार समुद्रास स्पर्शून राहिलेला आहे. ( भार० भीष्म० अ० ६ ). यावर विष्णुपद नांवाचें सरोवर आहे ( भाग०५ स्कं० अ० १६ ).

**निषधाश्व**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, तद्वंशीय कुरु राजाच्या पांच पुत्रांतील चौथा.

**निषाद**–वेन राजाचा देह मंथन केला असतां, प्रथम कृष्णवर्ण, ऱ्हस्वभुज असा निर्माण झालेला पुरुष. यास ऋषींनीं निषीद ( बैस ) असें म्हटलें, त्यामुळें त्यास निषाद असें नांव चालू झालें.

**निषाददेश**–निषादांचा भारतवर्षीय देश, याचे पूर्व, दक्षिण आणि अपरदक्षिण निषाद, असे तीन भेद, इंद्रप्रस्थ मध्य मानून, या ग्रंथांत धरिले आहेत.

**निष्कृति**–विपाप्मा शब्द पहा.

**निसंदी**–एक असुर ( वा० रा० उत्तर० स० २२ ).

**नीद**–राजसूय यज्ञांत, पांडवांस गृहकार्यांत साह्य करणारा राजा.

**नीप**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र बृहदिषु, तद्वंशीय पार अ० विभ्राज राजाच्या दोन पुत्रांतील दुसरा. यास अणुह असें नामांतर असून, शुकाचार्याची कन्या कृत्वी अ० कीर्तिमती, ती याची स्त्री होती. व तिच्या ठायीं याला, ब्रह्मदत्त ना० पुत्र झाला होता. यास दुसऱ्या स्त्रीपासून श्रीमान् इ० शत पुत्र झाले असत.

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हरित राजाचा पुत्र देवमीढ, तद्वंशीय कृति राजाचा पुत्र. याचा पुत्र उग्रायुध.

**नील**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

२–विश्वकर्मांशानें जन्मलेला रामसेनेंतील वानर. यानेंच सेतु बांधला होता ( वा० रा० किष्किं० स० ३९ ).

३–अग्नीच्या अंशानें जन्मलेला दुसरा एक वानर (वा० रा० किष्किं० स० ४० ).

४–( सो० वं० ) यदूच्या पुत्रांतील एक.

५–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ, त्यास नीलिनीपासून झालेला पुत्र तो. याचा पुत्र शांति.

६–भारतीय युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा ( भार० वन० अ० २५४ ).

७–भारती युद्धांतील पांडवपक्षीय अनूप देशाचा राजा. यास अश्वत्थाम्यानें मारिलें होतें ( भार० उद्योग० अ० १७१ ).

८–कुबेराच्या नवनिधींतील आठवा निधि.

९–आपण राहतों याच्या व्युत्क्रम अंगीं असणारा पर्वत. याच्या दक्षिणेस रम्यक वर्ष असून, हा पूर्वपश्चिम क्षारसमुद्रास स्पर्शून राहिलेला आहे ( भार० भीष्म० अ० ६ ).

१०–किष्किंधेच्या दक्षिणेस असणाऱ्या माहिष्मती नगरीचा राजा. यास राजसूययज्ञकाळीं, सहदेवानें जिंकलें होतें ( भार० सभा० अ० ३१ ). पुढें अश्वमेधकाळींही हा, अर्जुनास शरण येऊन साह्य झाला होता.

**नीलकंठ**–समुद्रमंथनकाळीं, त्यांतून निघालेलें हालाहल विष, त्रैलोक्यास दहन करूं लागलें असतां, तें देवांच्या प्रार्थनेवरून शंकरानें ग्रहण केलें, त्या योगानें कंठ नीलवर्ण झाला, तेणेंकरून हें पडलेलें नांव. अशा अर्थाचीं पुष्कळ नांवें आणखी आहेत ( भाग० ८ स्कं० अ० ७ ).

**नीलकुंड**–भारतवर्षीय तीर्थ.

**नीलकेतु**–नीलध्वज शब्द पहा.

**नीलध्वज**–हस्तिनापुराच्या दक्षिणेस नर्मदेच्या काठीं असणाऱ्या माहिष्मती पुरीचा राजा. यास सुनंदा नांवाची स्त्री, व पुत्र प्रवीर ना० होता. एकदां प्रवीर आपल्या मदनमंजरी स्त्रीसहवर्तमान वनांत विहार करण्यास गेला असतां, त्यानें पांडवांचा अश्वमेधीय श्यामकर्ण अश्व, फिरत आलेला पाहून धरिला. त्यानिमित्त त्याचें पांडवपक्षीय वृषकेतूशीं युद्ध झालें; त्यांत वृषकेतु मूर्च्छित झाला. म्हणून अनुशाल्व पुढें होऊन, त्यानें प्रवीराशीं युद्ध केलें, व त्याचा पराभव केला. हें वर्तमान नीलध्वजास समजतांच, तो येऊन अर्जुनाशीं युद्ध करूं लागला, त्यांत तो अग्नीच्या साह्यानें अर्जुनास आवरेना. म्हणून त्यानें नारायणास्त्र सोडिलें. त्यावरून अग्नीनें नीलध्वजाचें अर्जुनाशीं सख्य करून दिलें, म्हणून त्यानें अर्जुनास नानाविध रत्नें, भूषणें दिलीं, व त्याचें साह्य करण्यासाठीं त्यासमागमें दक्षिणदिशेस गेला ( जैमिनी अश्वमे० अ० १५ ).

नर्मदा नदीच्या दक्षिणेस किष्किंधा नगरी पुष्कळ दूर आहे, म्हणून दोन माहिष्मत्या असल्या पाहिजेत, अर्थात् राजेही भिन्न भिन्न असावेत हें उघड आहे. परंतु संशय इतकाच कीं, एकाचें नांव नील, आणि दुसऱ्याचें नीलध्वज एवढाच काय तो भेद, आणि दोघांसही अग्नी साह्य होता, असें म्हटलें आहे, म्हणून हें काय असेल तें असो.

**नीलपराशर**–पराशरकुलांतील एक ऋषि व त्याचें कुल. यांत अपोहय, वाह्यमय, ख्यातेय, कौतुजाति, आणि हर्यश्वी, इतके प्रासिद्ध ऋषि होते.

**नीललोहित**–महादेवाचा एक अवतार.

**नीललोहितकल्प**–ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील दुसरा कल्प अ० दिवस ( ४ कल्प श० पहा ). या कल्पारंभीं नीललोहित ना० शिवावतार झाला होता,म्हणून या कल्पास हें नांव होतें.

**नीली**–भारतवर्षीय नदी.

**नीलांवर**–निळें रेशमीवस्त्र परिधान करण्यानें बलरामास नांव.

**नीलिनी**–अजमीढ राजाच्या चार स्त्रियांतील एक.

**नवातकवच**–निवातकवच शब्द पहा.

**नृग**–( सू० वं० ) वैवस्वतमनूच्या दहा पुत्रांतील दुसरा. याचा पुत्र सुमति.

२ ( सू० वं० ) नृगकुलोत्पन्न ओघरथ राजाचा पुत्र. यानें पुष्करतीर्थी कोट्यावधि गोप्रदानें केलीं होतीं, त्यांत एकेकाळीं असें झालें होतें कीं, पूर्वी एका ब्राह्मणास दिलेल्या गोप्रदानांतील एक गाय चुकून, ती राजाच्या घरच्या कळपांत आली, व पुनः दुसऱ्या ब्राह्मणास दिलेल्या गोप्रदानांत दान केली गेली. त्यावरून उभय ब्राह्मणांचा तीनिमित्त कलह झाला, व ते राजाकडे आले; परंतु राजानें, त्या कलहाचा निर्णय इतका लांबणविर पाडिला कीं, ब्राह्मणांस त्यापासून बहुत कष्ट झाले, त्यामुळें प्रथम प्रतिग्रहीता ( दान घेणारा ) ब्राह्मण कोपून, त्यानें राजास तूं, कृकलास (सरडा) होशील, असा शाप दिला. तो राजास श्रुत होतांच त्यानें ब्राह्मणाची प्रार्थना करून उःशाप मागितला. तेव्हां कृष्णाच्या हस्तें तुझा उद्धार होईल, असें ब्राह्मण म्हणाला. त्यावरून राजानें, आपल्या वसु ना० पुत्रास राज्याभिषेक करून, आपण अरण्यांत गेला असतां सरड होऊन पडला, व पुढें कृष्णाच्या हस्तस्पर्शानें उद्धार पावला ( वा० रा० उत्तर० स० ५३–५४ ). ( भार० अनुशा० अ० ७० ).

**नृचक्षु**–( सो० वं० )पूरुकुलोत्पन्न पांडववंशांतील सुनीथ राजाचा पुत्र, याचा पुत्र सुखीनल.

**नृपंजय**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय मेधावि राजाचा पुत्र. याचा पुत्र दूर्व राजा.

**नृभणा**–प्लक्षद्वीपांतील नदी.

**नृषद्गु**–एक ब्रह्मर्षि ( वा० रा० उत्तर० स० १७ ).

**नृसिंह**–चालू वैवस्वत मन्वंतरांतील चतुर्थयुगांतील ( चौथ्या चौकडींतील ) कृतयुगांत झालेला विष्णूचा अवतार. हा अर्धा नर व अर्धा सिंह अशा आकृतीचा होता म्हणून, यास असें नांव होतें. यानें हिरण्यकशिपूस मारून प्रऱ्हादाचें संरक्षण केलें(देवीभा० ४ स्कं० अ० १६ ) (मत्स्य० अ० ४७).

**नृसिंहतापिनी**–अथर्वणवेदोपनिषत्.

**नेतिष्य**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**नेत्र**–( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजित् तद्वंशीय हैहयकुलोत्पन्न धर्म ना० राजाचा पुत्र, याचा पुत्र कुंति.

**नैर्ऋति**–निर्ऋति दिशा.

**नैकजिव्ह**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**नैकदृक्**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**नैकपृष्ठ**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**नैकशि**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु० श० पहा ).

**नैगमेय**–अनल ना० वसूचा पुत्र.

**नैद्राणि**–ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

**नैध्रुव**–ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा ).

**नैमिष**–शतद्रुनदींतील तीर्थ.

**नैमिषकुंज**–तीर्थवि०.

**नैमिषारण्य**–नर्मदेच्या उत्तरेस, व कुरुदेशाच्या पश्चिमेस असणारें वन.

**नैश्रेयस**–वैकुंठांतील वनवि० ( भाग० ३ स्कं० अ० १५ ).

**नैषध**–धृष्टद्युम्नानें मारिलेला दुर्योधनपक्षीय निषधदेशाचा राजा ( भार० द्रोण० अ० ३२ ).

**नैषादि**–द्रोणशिष्य एकलव्य ना० निषाद तो.

**नौबंधन**–पूर्वकल्पांतील रात्रींत, ब्रह्मदेव निद्रित झाले असतां, संपूर्ण समुद्र एकवटून जलमय झालें, त्या वेळेस मत्स्यरूपी भगवंताच्या आज्ञेवरून, सत्यव्रत राजानें आपण बसलेल्या नौकेस, ज्या पर्वतशृंगास बांधिलें होतें, त्याचें नांव (भार० वन० अ० १८७). मूळांत हिमालयाचें शृंग म्हणून लिहिलें आहे; परंतु नित्यप्रलयाचें लक्षण असें आहे कीं, भूलोक, भुवर्लोक आणि स्वर्लोक, हे बुडून जातात, इतकें उंच पाणी चढतें. त्यांत हिमालयाचें शिखर उघडें राहण्याचा संभव नाहीं; म्हणून तो लेख, लेखकाचा प्रमाद असेंच म्हटलें पाहिजे.

**न्यग्रोध**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न उग्रसेनाच्या नऊ पुत्रांतील तिसरा. कंसाचा भ्राता. यास बलरामानें धनुर्यागकाळीं मारिलें.

२–कृष्णाच्या पौत्रांतील एक, त्यास हेंच नांव होतें.

## प

**पंक्तिरथ**–दशरथ राजा.

**पंचकर्पट**–पश्चिम मालव. ( माळवा ) देशाच्या पश्चिमेकडील देश ( भार० सभा० अ० ३२ ).

**पंचगण**–अपर उत्तर उलूकदेशाच्या उत्तरेकडील देश ( भार० सभा० अ० २७ ).

**पंचचूडा**–एक अप्सरा. हिचा नारदाशीं स्त्रीस्वभावाविषयीं संवाद. ( भार० अनुशा० अ० ३८ ).

**पंचजन**–एक प्रजापति, याची कन्या असिक्री अ० पांचजनी, ती प्राचेतस दक्षाची स्त्री.

२– संन्हाद दैत्याचा पुत्र. हा समुद्रांत राहत असे. कृष्ण ज्या काळीं सांदपिनी गुरूच्या मृतपुत्रांचा शोध करण्यास निघाला, त्या वेळेस त्यानें यास मारून, त्याच्या अस्थींचा शंख केला होता, व म्हणूनच तो पांचजन्य या नांवानें प्रसिद्ध असे ( भाग० १० स्कं० अ० ४५ ).

**पंचजनी**–ऋषभदेवाचा पुत्र भरत राजा त्याची स्त्री.

**पंचनद**–आभीरदेशाच्या पश्चिमेकडील देश ( भार० सभा० अ० ३२ ). हा कांहींसा वायव्येकडे असून, पांच नद्यांमध्यें वसलेला असल्यामुळें, यास असें नांव आहे.

**पंचपदी**–शाक द्वीपांतील नदी.

**पंचबाण**–मदन.

**पंचब्रह्म**–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**पंचमी**–भारतवर्षीय नदी.

**पंचवक्त्र**–पांच मुखांनीं युक्त महादेव तो. अशा अर्थाचीं पंचानन इ० अनेक नांवें आहेत.

**पंचवटी**–गोदावरी नदीच्या उत्तरतीरीं असणारें स्थल. दाशरथि राम दंडकारण्यांत फिरत असतां, अगस्त्य ऋषींच्या आज्ञेवरून येथें कांहीं काल वास करण्यासाठीं आला होता, व लक्ष्मणाकडून पर्णकुटिका बांधवून तींत सीतेस घेऊन त्यासहित राहिला होता. येथें बराच काळ राहिल्यावर, एकदां शूर्पणखा याकडे येऊन,मला तूं वर,असें कपटानें रामास म्हणूं लागली. त्यावरून त्यानें तिला लक्ष्मणास वर म्हणून सांगितलें असतां, लक्ष्मणानें तिचें नाक छेदिलें ( शूर्पणखा श० पहा ). नंतर ती, विरूपकरणानें दुःखित होऊन खर ना० राक्षसाकडे गेली. त्यावरून तो क्रोधाविष्ट होऊन रामावर चालून आला, व संपूर्ण अनुचरांसहित मरण पावला ( १ खर श० पहा ).

पुढें मारीच राक्षस रावणाच्या आज्ञेनें मृगरूप धारण करून रामाकडे आला असतां, त्याचा रामानें वध केला ( ४ मारीच श० पहा ). मारीचानें अरण्यांत मरणसमयीं कपटानें 'लक्ष्मणा, धांव' असा ध्वनि करून प्राण सोडिला असतां, सीतेनें लक्ष्मणास रामाकडे जाण्यास सांगितलें; परंतु तो, हा ध्वनि रामाचा नव्हे असें म्हणून तिचें सांत्वन करूं लागला असतां, तीस न रुचून, तिनें त्यास दुःसह वाग्बाणांनीं ताडित केलें. त्यावरून त्यानें तिची निर्भर्त्सना करून रामाकडे गमन केलें ( वा० रा० अरण्य० स० ४४–४५ ).

इतक्यांत रावण भिक्षुवेषानें सीतेकडे आला. तें कपट तिनें न जाणून त्याचा सत्कार केल्यावर रावणानें तिला विचारिलें कीं, तूं रूपानें सुंदर असून, अशा राक्षसांनीं व्याप्त अरण्यांत किमर्थ राहिलीस तिनें त्याचें संक्षेपानें उत्तर दिल्यावर, रावण तिला म्हणाला, तूं मजसमागमें लंकेंत चल, येथें रामाच्या संगतीस राहूं नको. माझें ऐश्वर्य मोठें असून, मी लंकेचा राजा रावण आहें, व तुला न्यावें याच हेतूनें आलों आहें. सीता म्हणाली, परस्त्री हरण करणें चांगलें कर्म नाहीं, यास्तव हा तुझा विचार उत्तम नसून तुला घातक होणारा आहे, तर तूं तो सोडून देऊन लंकेस जावेंस हें बरें. परंतु रावणास तें तिचें भाषण न रुचून त्यानें आपलें घोररूप प्रकट केलें, व तिला रथांत घालून तो दक्षिणदिशेकडे चालला. तेव्हां सीता आक्रोश करून रामलक्ष्मणांस हांका मारूं लागली. तो तिचा आक्रोश ऐकून जटायु तेथें आला, व सीतेस सोडविण्याकरितां रावणाशीं युद्ध करून मरण पावला ( जटायु श० पहा ).

मारीचास मारून राम पंचवटीकडे परतला असतां, मार्गांत त्यास दुश्चिन्हें जाणवूं लागलीं, त्यावरून तो विमनस्क होऊन चिंतायुक्त चालला आहे तों, त्यानें लक्ष्मणास आपणाकडे येतांना पाहिलें. इतक्यांत तो समीप येऊन पोहोंचला असें पाहून, त्यास म्हणूं लागला कीं, सीतेस सोडून तूं इकडे किमर्थ आलास? त्यानें तिचें भाषण कळवून विनंती केली कीं, माझा निरुपाय झाल्यामुळें आलों. राम म्हणाला, हें तूं चांगलें केलें नाहींस, अस्तु. असें म्हणून आश्रमीं येऊन पाहूं लागला, तों तेथें सीता नाहीं. त्यावरून तो शोक करीत, व पशुपक्ष्यादिकांस सीतेविषयीं विचारीत भ्रमण करूं लागला. सारांश, रामलक्ष्मण पंचवटींतून निघून, प्रस्रवण पर्वताच्या अंगानें सीतेचा

शोध करींत दक्षिण दिशेस चालिले ( वा० रा० अरण्य० स० ५७-६४ ). पंचवटी हें नांव पडण्यास कारण, तेथें अतिशय मोठे पांचवट असत हेंच होय.

**पंचशिख**-एक ब्रह्मर्षि. हा कपिला ना० ब्राह्मणीचा पुत्र, म्हणून यास कापिलेय म्हणत असत. जनदेव नांवाचा जनक, तो याचा ब्रह्मविद्येसंबंधानें अत्यंत उत्कृष्ट शिष्य होता.

**पंचशिरा** अ० **शीर्षक**-एक ब्रह्मर्षि.

**पंचाब्दपितर**-वत्सर, संवत्सर, परिवत्सर, इडवत्सर आणि अनुवत्सर, यांच्या क्रमेंकरून रुद्र, अग्नि, सूर्य, सोम, आणि वायु, ह्या ज्या पांच देवता, त्यांस, ही संज्ञा. ( मत्स्य० अ० १४० ).

**पंचाप्सरसरोवर**-दंडकारण्यांतील सरोवर ( मांडिकर्णी श० पहा ).

**पंचाल**-भर्म्याश्व शब्द पहा.

**पटच्चर**-एक राक्षस. यास शूरतर राजानें मारिलें होतें.

**पटच्चरदेश**-भारतवर्षीय दक्षिण अपरमत्स्य देशाच्या दक्षिणेकडील देश ( भार० सभा० अ० ३१ ).

**पटुश**-पनस वानरानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस.

**पंडितक**-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**पंडु**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, तद्वंशीय कुरुपुत्र जन्हु, त्याच्या कुलांत जन्मलेल्या विचित्रवीर्य राजाचा पुत्र. हा, त्याच्या मरणानंतर कृष्णद्वैपायन व्यासापासून अंबालिकेच्या ठायीं झाला होता ( अंबालिका श० पहा ). याचें जन्म, जरी धृतराष्ट्राच्या मागून झालें होतें, तरी धृतराष्ट्र अंध असल्यामुळें, भीष्मानें यासच राज्यावर बसविलें होतें. पुढें राज्यावर बसून हा राज्य करूं लागला असतां, कुंतिभोज राजानें आपली कन्या कुंती, व मद्रदेशाधिपतीनें आपली कन्या माद्री, यास अनुक्रमें विवाहविधीनें दिल्या ( कुंती व माद्री श० पहा ).

पंडुराजा, आपल्या उभय स्त्रियांसहित सुखानें राहून, भीष्मानुमतें नीतीनें राज्य करीत असतां, बराच काळ लोटल्यावर, एकदां दोघी स्त्रियांस घेऊन अरण्यांत वनविहारार्थ गेला. तेथें एके दिवशीं मृगया करतां करतां, दम ना० कोणी ऋषि मृगवेषानें स्वस्त्रीशीं क्रीडा करीत असलेला यास विदित नव्हता. म्हणून, अन्यमृगांवर बाण टाकण्यांत, एक बाण यानें त्यावरही टाकिला, तो त्यास लागून, तो मरणोन्मुख होत्साता त्यानें आपलें पूर्वरूप धरिलें, व प्राण सोडतांना पंडूस शाप दिला कीं, तूंही असाच स्त्रीसमागम होतांच मृत्यु पावशील. तो ऐकून यास अनिवार दुःख होऊन, तें वर्तमान यानें आपल्या स्त्रियांस कळविलें, त्यावरून त्याही शोकाविष्ट झाल्या. परंतु निरुपाय होऊन त्या दिवसापासून इतकें मात्र त्यांनीं केलें कीं, राजा आपणाशीं समागमास न प्रवर्तेल, अशाविषयीं त्या अतिशय जपूं लागल्या.

पुढें पंडूनें विचार केला कीं, आतां मी राज्यावर जाऊन, सुखानें देह पाळूं लागलों तर, कदाचित् स्त्रियांशीं समागमाची इच्छा होऊन मरण प्राप्त होईल. तर राज्यावर न जातां, आतां अरण्यांतच देह क्षीण करून तपांत काळ घालवावा हें बरें. असें म्हणून त्यानें तें वृत्त भीष्मास कळविलें, व त्याच्या आज्ञेनें, हिमालयाच्या शतशृंग ना० शिखरावर स्त्रियांसहित जाऊन तेथें त्यांसहवर्तमान तो तप करीत राहिला.

याप्रमाणें पंडुराजा तप करीत, व तेथें आणखी तपस्वी होते त्यांच्या समागमांत अनेक इतिहास श्रवण करीत, काळ घालवीत असतां, कुंतीनें एकदां यास असें कळविलें कीं, मला बाळपणांत दुर्वास ऋषीपासून पुत्रप्राप्ति करून देणारे मंत्र मिळालेले आहेत; त्यांच्या जपानें पुत्र उत्पन्न करण्याची आज्ञा होईल तर, मी तसें करीन; कारण संतति होण्यास आतां अन्य मार्गच राहिला नाहीं. त्यावरून यास आनंद होऊन, अनुमोदन दिलें असतां, तिनें यमधर्म, वायु आणि इंद्र, यांच्या मंत्रांपासून युधिष्ठिर, भीम आणि अर्जुन, असे तीन पुत्र तीन संवत्सरांत क्रमेंकरून निर्माण केलें. नंतर अवशेष राहिलेला एक मंत्र, याच्या सांगण्यावरून तिनें माद्रीस दिला; त्याच्या दोन वेळ जपानें तिला नकुल आणि सहदेव दोन पुत्र झाले. मिळून पांच पुत्र पाहून, व ते दिवसेंदिवस बल, तेज इ० कांनीं वृद्धिंगत होत चाललेले अवलोकन करून, यास व इतर तपस्वी जनांस मोठा हर्ष झाला ( भार० आदि० अ० ११८-१२४ ).

एकदां असें झालें कीं, पंडूस शापाची विस्मृति पडून, त्यानें ती निवारण करीत असतांही माद्रीशीं बलात्कारानें समागम केला, त्या योगानें तो तत्काळ मरण पावला. तें अवलोकन करून सर्वांसही अनिवार दुःख झालें; परंतु निरुपाय होऊन स्तब्ध राहिले. माद्रीस तर अतिशयच दुःख झालें; कारण राजास तिच्या योगानें मरण आलें होतें. त्यावरून तिनें आपले दोनही पुत्र कुंतीच्या स्वाधीन करून आपण स्वतः सहगमन केलें ( भार० आदि० अ० १२५ ).

पंडूस पुत्र झाल्याचें वर्तमान हस्तिनापुरीं भीष्मादिकांस पूर्वीं कळलेंच होतें, तों कांहीं काळानें त्याच्या मरणाचेंही वर्तमान जाऊन पोहोंचलें. नंतर भीष्मानें कुंतीस व तिच्या पुत्रांस नगरांत आणावें असा विचार केला; इतक्यांत तपस्व्यांनीं त्यांस आणून हस्तिनापुरीं पोहोंचविलें. त्यावरून भीष्म संतुष्ट होऊन, त्यानें तपस्व्यांस सत्कारपूर्वक निरोप दिला, व पुत्रांसहित कुंतीस ठेवून घेतलें.

**पणि**—पातालांतील असुरवि० ( भाग० ५ स्कं० अ० २४ ).

**पतंग**-स्वायंभूमन्वंतरांतील मरीचि ऋषीच्या साहा पुत्रांतलि चौथा. हाच पुढें कृष्णाच्या बंधूंत जन्मास आला होता ( १ ऊर्णा श० पहा ).

२—मेरुकर्णिका पर्वतांतलि एक पर्वत.

**पतंजल**-कपिगोत्रोत्पन्न एक ब्रह्मर्षि. यास काप्य असेंही म्हटलेलें आढळतें.

**पतंजलि**-कद्रुपुत्र एक नाग.

२—एक ब्रह्मर्षि ( ३ आंगिरा श० पहा ).

**पतन**—रावणपक्षीय राक्षस ( भार० वन० अ० २८५ ).

**पद्म**-कद्रुपुत्र एक नाग.

२—एक राजर्षि.

३—कुवेराच्या नवनिधींतलि एक.

**पद्मचित्र**-कद्रुपुत्र एक नाग.

**पद्मनाभ**-कद्रुपुत्र नागांतील एक. हा आत्मविद्यासंपन्न होता; म्हणून धर्मारण्य, याचा शिष्य झाला होता.

२—धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतलि एक.

३—विष्णूस नांव आहे, व एक तीर्थही आहे.

**पद्मभू**-आत्मयोनिरूप कमलांतून उत्पत्ति म्हणून ब्रह्मदेवास नांव, अशा अर्थाचीं अनेक नांवें आहेत.

**पद्मा**-लक्ष्मीस नांव आहे.

**पद्माक्ष**-चंद्रहास राजाचा कनिष्ठ पुत्र.

**पनस**-राम सेनेंतलि या नांवाचे दोन वानर राजे.

२—बिभीषणाच्या चार राक्षस अमात्यांतील एक.

**पंपा**-दंडकारण्यांतील एक नदी ( वा० रा० अरण्य० स० ६ ).

**पंपासरोवर**-ऋष्यमूक पर्वतासमीपचें सरोवर ( वा०रा० अरण्य० स० ७५ ).

**पयस्य**-वारुणीआंगिरा ऋषीच्या आठ पुत्रांतील एक.

**पयस्विनी**-भारतवर्षीय नदी.

**पयोद**-विश्वामित्र कुलोत्पन्न एक ऋषि.

**पयोष्णी**-विंध्याचलापासून निघालेली नदी.

**पयोष्णीसंगम**-पयोष्णीचा समुद्राशीं जेथें संगम झाला आहे, तेथलि तीर्थ.

**पर**-विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतलि एक.

**परकाशय**—भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**परण्य**—तृतीयार्थक अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**परंतप**-तामसमनूच्या दहा पुत्रांतील एक.

**परपुरंजय**-हैहयकुलोत्पन्न एक राजा. हा, कोणाचा पुत्र तें आढळत नाहीं; परंतु याचा इतिहास येवढाच आढळतो कीं, एकदां यानें मृग अशा भ्रांतीनें एका ऋषिपुत्रास मारिल्यावर, यास मोठा पश्चात्ताप झाला, व तो कोणाचा पुत्र असावा, त्याविषयीं शोध करूं लागला, तों तार्क्ष्यऋषीचा यानें आश्रम पाहिला. नंतर आंत जाऊन ऋषीस वंदन करून बसला; इतक्यांत, मारलेला ऋषिपुत्र तेथें त्यास दृष्टीस पडला. तेणेंकरून यास आश्चर्य होऊन, ऋषीस पुसणार तों ऋषि म्हणाला, राजा, आश्चर्य मानूं नको; कारण आम्ही तपोबलानें इच्छामरणी आहों. यास्तव तूं जा, ब्रह्महत्या झाली म्हणून साशंकित होऊं नको. तें ऐकून यानें ऋषीचें स्तवन करून, स्वनगरास गमन केलें ( भार० वन० अ० १८४ ).

**परब्रह्म**-अथर्वणवेदोपानिषत्.

**परमकांबोज**-लोहदेशाच्या उत्तरेकडील देश. यास अपरकांबोजहि म्हटलें असतां चालेल. याच्यापुढें उत्तरेस ऋषिकदेश पांडवांच्या वेळेस होता ( भार० सभा० अ० २७ ).

**परमहंस**-यजुर्वेद व अथर्वणवेद, यांत या नांवाचीं दोन उपानिषदें आहेत.

**परमेष्ठि**-ब्रह्मदेव.

२—ऋषभदेववंशीय देवद्युम्न राजास धेनुमतीच्या ठायीं झालेला पुत्र. यास सुवर्चला ना० स्त्री, व तिच्या ठायीं झालेला प्रतीह नांवाचा पुत्र होता.

**परवीराक्ष**-खर राक्षसाच्या बारा अमात्यांतील एक.

**परशुराम**-चालू वैवस्वतमन्वंतरांतील भृगुऋषि, ज्यास वारुणीभृगु असें प्रसिद्ध नांव असे, तद्वंशीय प्रख्यात ऋचीक ऋषीचा पुत्र जमदग्नि, त्याच्या पांच पुत्रांतील एक. हा, उन्मत्त क्षत्रियांच्या वधार्थ विष्णुतेजानें जन्मला होता. याचें जन्म चालू मन्वंतरांतलि एकोणिसाव्या पर्ययाच्या ( चौकडीच्या ) त्रेतायुगांत झालें होतें ( देवी भाग० ४ स्कं० अ० १६ ). ( मत्स्य० अ० ४७ ).

हा आश्रमांत नसतां, कार्तवीर्य राजानें याच्या पित्याची कामधेनु एके काळीं बलात्कारानें हरण करून स्वनगरास गमन केलें. तें वर्तमान यास कळ-तांच, तिकडे जाऊन. त्यास यानें निरोप पाठविला कीं, तुम्ही आणलेली माझ्या पित्याची धेनु सत्वर परत यावी; नाहीं तर युद्धास यावें. त्या वरून कार्त-वीर्यास क्रोध येऊन, तो याशीं युद्धास आला. तेव्हां उभयतांचें बराच काळ युद्ध होऊन त्यांत यानें त्याचे सहस्र हस्त तोडिले, व त्यास ठार मारिलें, व धेनु घेऊन आश्रमीं आला ( कार्तवीर्य श० पहा ).

या गोष्टीस बरेच दिवस लोटले असून, कार्तवी-र्याचे पुत्र संधी पाहातच होते, तों एकदां, हा आश्रमीं नाहीं असें पाहून ते एकाएकीं आले, व जमदग्नीचा वध करून पळून गेले. त्यावरून यास पराकाष्ठेचा कोप आला, व यानें प्रतिज्ञा केली कीं, "पृथिवीवरील संपूर्ण क्षत्रिय मारून ऋचीकादि पितरांस, त्यांच्या रक्तानें तर्पण करून तृप्त करीन." इतकें बोलून, प्रथम यानें रेणुकेचा ( आपल्या मातेचा ) शोक शांत करण्या करितां जमदग्नीस ( पित्यास ) सजीव केलें ( भारतांत दहन केलें असें आहे; परंतु तो लेख विरोधी आहे ). आणि तो लागलाच तेथून निघून कार्तवीर्याच्या नगरास प्राप्त झाला. तेथें त्याच्या पुत्राशीं याचे मोठें भयंकर युद्ध होऊन, त्यांत यानें त्या सर्वांस ठार मारिलें.

नंतर हा, संपूर्ण भरतवर्षांत एकवीस वेळां हिंडला, व त्यास यानें क्षत्रिय रहित करून टाकिलें, त्यांत कित्येक क्षत्रियांचीं मुलें, त्यांच्या त्यांच्या मातांनीं ऋषींच्या आश्रमांत नेऊन सोडिलीं, त्यामुळें तीं वाचलीं जाऊन सूर्यवंशीय मूलक नांवाचा राजा तर स्त्रियांत लपून राहिल्यानें वांचला. ( तोच पुढें नारी-कवच नांवानें प्रसिद्ध झाला ). तसाच विदेही जनक ब्रह्मनिष्ठ म्हणून वांचला. इतकें परशुरामानें करून क्षत्रियांच्या रक्तानें पांच डोह भरिले, ते **रामन्हद** अशा नांवानें प्रसिद्ध झाले. पुढें यानें, त्या रक्तानें ऋचीकादि पितरांस तर्पणद्वारा तृप्त करून, संपूर्ण भारतवर्षीय भूमि कश्यपास दान केली, व तप करीत स्वस्थ राहिला. तथापि अमुक स्थळीं क्षत्रिय आहे, असें यास कळलें कीं, लागलाच तेथें जाऊन त्यास मारी. त्यावरून कश्यपानें यास सांगितलें कीं, तूं मला दिलेल्या भूमींत असें आतां करण्यास योग्य नसून, तींत तुला राहणेंहि अनुचित आहे. तेव्हां परशुराम समुद्रतीरीं गेला, व त्यापासून स्थळ मागून घेऊन, त्यास त्यानें 'शूर्पारकदेश' असें नांव देऊन, त्यांत वास्त-व्य केलें. तो शूर्पारक देश 'कोंकण' या नांवानें प्रसिद्ध आहे (शूर्पारक श० पहा).

याप्रमाणें नियम झाला असतांही, चोवीसाव्या पर्यंयांत ( चौकडींत ) जेव्हां दाशरथि राम उत्पन्न झाला, व त्यानें सीतास्वयंवरकाळीं माहेशचाप ( शि-वाचें धनुष्य ) पणनिमित्तानें भांगिलें म्हणून यानें श्रवण केलें, तेव्हां त्याच्यावर हा चालून गेला, त्याव-रून, व हा चिरजीवी असल्यानें तेथपर्यंत याच्यांत विष्णुतेज राहिल्यास क्षत्रिय वांचणार नाहींत म्हणून, भगवदिच्छेनें याच्यांतील विष्णुतेज दाशरथि रामाच्या शरीरांत प्रविष्ट झालें. तेव्हांपासून याची गणना केवळ ऋषींत होऊन, तदनुरूपच हा पुढें वागूं लागला ( वा० रा० बाल० स० ७४–७६ ). हा, पुढील आठव्या सावर्णि मन्वंतरांत सप्तर्षींत एक होणार आहे.

हा इतिहास, वाल्मीकि रामायण, व अध्यात्म रामायण यांत लिहिलेल्याचा सारांश आहे; म्हणून न्यूनाधिक्याचा विकल्प मनांत कोणी आणूं नये.

**परस्परायणि**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**परांतदेश**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**परावसु**–रैभ्यऋषीचा पुत्र, व विश्वामित्र ऋषीचा पौत्र ( यवक्रीत श० पहा ).

२–एक असुर.

**पराशर**–मैत्रावरुणिवसिष्ठाचा पौत्र, व शक्ति ऋषीचा पुत्र. याच्या मातेचें नांव अदृश्यंति असें होतें. एकदां हा, वसिष्ठ ऋषीपुढें खेळत असतां त्यास यानें 'तात !' अशी हाक मारिली, ती तिनें ऐकून तिच्या नेत्रांत अश्रु आले. ते यानें पाहून तिला रोदनाचें कारण विचारिलें. तिनें सांगितलें, वसिष्ठऋषि तुझा पिता नसून पितामह आहे. तुझा पिता राक्षसानें भक्षिला, त्यावरून यास अनिवार दुःख झालें. कांहीं काळानें हा मोठा झाल्यावर तपाच्या योगानें तेजस्वी होत्सा-ता, राक्षससत्र करावें असें मनांत आणून त्यास यानें आरंभ केला, व सहस्रावधि राक्षस जाळून मारिले. असें पाहून पुलस्त्य ऋषि याकडे येऊन सत्र समाप्त करण्याविषयीं यास प्रार्थूं लागला, परंतु हा, तें ऐकेना. तेव्हां पुलस्त्य वसिष्ठाकडे जाऊन, सत्र समाप्त कर-ण्यास पौत्रास सांगावें म्हणून प्रार्थना करूं लागला. त्यावरून वसिष्ठ याकडे येऊन, त्यानें याचा कोप शांत करून, याजकडून तें सत्र समाप्त करविलें ( भार० आदि० अ० १७८ ).

हा, वसिष्ठकुलांतील मंत्रद्रष्टा असून, याच्या वंशांत वसिष्ठ, मित्रावरुण आणि कुंडिन, या तीन प्रवरांचे गौरपराशर, नीलपराशर, श्वेतपराशर, कृष्णपराशर, श्यामपराशर, आणि धूम्रपराशर, असे सहा भेद झाले होते. यासच पुढें कृष्णद्वैपायन हा पुत्र झाला होता ( मत्स्य० अ० २०० ).

**परिकूट**–एक ब्रह्मर्षि ( १ विश्वामित्र श० पहा ).

**परिप्लव**–( सो० वं० ) पांडववंशीय सुखीनल राजाचा पुत्र. याचा पुत्र सुनय राजा.

**परिव्राजकान्नपूर्णा**–अथर्वणवेदोपनिषत्.

**परिष्वंग**–स्वायंभुव मन्वंतरांतील मरीचिऋषीच्या साहा पुत्रांतील एक. हा कृष्णाच्या बंधूंत जन्मास येऊन, कंसाच्या हातून मरण पावला होता.

**परीक्षित्**–( सू० वं० ) इक्ष्वाकुलोत्पन्न एक राजा. ( वंशावळींत नांव नाहीं ). यास, आयु ना० मंडूकाधिपतीची कन्या सुशोभना ती स्त्री असून शल, बल आणि दल, असे तीन पुत्र होते ( भार० वन० अ० १९२ पहा ).

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय संवरण राजाचा पौत्र, व कुरु राजाच्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ.

३–या नांवाचा एक राजा, कुल आढळत नाहीं; परंतु यासही जनमेजय नांवाचाच पुत्र होता.

४–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अर्जुनपांडवाचा पौत्र, व अभिमन्यूस उत्तरेपासून झालेला पुत्र. गर्भामध्यें ज्या भगवंतानें याचें रक्षण अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रापासून केलें होतें, त्यास यानें तेथें पाहिलें होते म्हणून, मातेच्या उदरांतून बाहेर पडल्यावर, ज्याच्या त्याच्या मुखाकडे हा परीक्षापूर्वक पाही, त्यामुळें याचें नांव परीक्षित् असें ठेविलें होतें ( भाग १ स्कं० अ० १२ ).

हा, मोठा झाल्यावर यानें कृपाचार्यापासून वेदविद्या व धनुर्विद्या संपादन करून, तींत चांगला प्रवीण झाला होता. याच्या वयाच्या छत्तीसाव्या वर्षी पांडव, यास हस्तिनापुराच्या राज्यावर स्थापून, व सुभद्रेस याजजवळ ठेवून निजधामास गेले ( भार० महाप्रस्था० अ० १ ).

परीक्षित् राजास, याचा मातुल विराटपुत्र उत्तर, त्याची कन्या इरावती, ती स्त्री होती, व तिजपासून यास, जनमेजय, श्रुतसेन, भीमसेन, आणि उग्रसेन, असे चार पुत्र झाले होते. यानें पांडवांच्या मागें उत्तम प्रकारें राज्य केलें. एकदां हा रथांत बसून अरण्यांत फिरत असतां. राजचिन्हें धारण केलेला कोणी शूद्र, एक गाय आणि एक वृषभ, या उभयतांस पीडा देत आहे असें यानें पाहिलें. त्यावरून त्या गोवृषभांचा व याचा कांहीं संवाद झाल्यानें, त्यास पीडा देणारा शूद्र कलि आहे व गाय भूदेवी असून वृषभ तो धर्म आहे असें यानें जाणलें. नंतर शूद्रास धरून त्यास दंड करणार इतक्यांत, त्यानें शरण येऊन मला मारूं नको अशी यास विनंती केली. तेव्हां हा कलीस याप्रमाणें बोलला;—" न तेगुडाकेश यशोधराणां बद्धांजलेर्वै भयमस्ति किंचित् ।। न वर्तितव्यं भवता कथंचन क्षेत्रे मदीये त्वमधर्मबंधुः ॥३०॥ त्वां वर्तमानं नरदेवदेहेष्वनुप्रवृत्तो यमधर्मपूगः ॥ लोभोऽनृतं चौर्यमनार्यमंहो ज्येष्ठा च माया कलहश्च दंभः ।। ३१ ॥ न वर्तितव्यं तदधर्मबंधो धर्मेण सत्येन च वर्तितव्ये ।। ब्रह्मावर्ते यत्र यजंति यज्ञैर्यज्ञेश्वरं यज्ञवितानविज्ञाः ॥ ३२ ॥ " ( भाग० १ स्कं० अ० १७ ).

यानें तीन अश्वमेध यज्ञ केले, व त्या वेळेस भद्राश्व, केतुमाल, भरतवर्ष, आणि उत्तरकुरु, इत्यादिक जंबुद्वीपाचे भाग जिंकले म्हणून भागवतांत आढळतें; परंतु हा लेख, अर्जुनानें राजसूयज्ञकालीं केलेल्या दिग्विजयांतील " पार्थ नेदं त्वया शक्यं पुरं जेतुं कथंचन " या वाक्यावरून बाधित होतो, म्हणून कृतक असें मला वाटतें. असे लेख मला पुराणांतून पुष्कळ आढळले, व ते मी पूर्वापरविरोधास्तव गाळून टाकून या कोशाची रचना केली आहे.

परीक्षित् राजा असा नीतिमान् असतांही, प्रारब्धयोगानें त्यास दुर्बुद्धि उत्पन्न होऊन; त्यानें समाधिस्थ शमीकऋषीच्या गळ्यांत मृतसर्पाचें कलेवर घातलें, त्यामुळें त्याच्या शृंगी ना० पुत्रास कोप येऊन त्यानें यास सर्पदंशानें सातव्या दिवशीं मरण पावशील असा शाप दिला ( २ शमीक श० पहा ). पुढें यानें आपला मरणकाळ समीप आला असें जाणून, जनमेजयास राज्यावर स्थापिलें, आणि आपण गंगेच्या ( भागीरथीच्या ) दक्षिणतीरीं प्रायोपवेशन करून बसला तेथें शुकाचार्यानें यास भागवत ऐकविलें असतां सातवा दिवस पूर्ण होतांच, तक्षकदंश होऊन हा मरण पावला ( भार० आदि० अ० ४०–४४ ).

परीक्षित् राजा छत्तीसाव्या वर्षी राज्यावर बसला, व साठ वर्षे राज्य करून शाण्णवव्या वर्षी मरण पावला; ( देवीभा० २ स्कं० अ० १६ ). परीक्षित् राजा भारतवर्षांत राहात होता हें उघड असून, "यदा परीक्षित्कुरुजांगले वसन् कलिं प्रविष्टं निजचक्रवर्तिते " या वाक्यावरून कुरुदेशाच्या हस्तिनापुरराजधानींत

हा राज्य करीत होता, असेंही स्पष्ट होतें. परंतु भारतवर्षाच्या कोणत्या खंडांत होता अशी शंका येत्ये, तर असें समजावें कीं, कलीशीं जें याचें भाषण झालें आहे, त्यांत यानें स्पष्ट म्हटलें आहे कीं, तूं ब्रह्मावर्त ना० माझ्या क्षेत्रांत राहूं नको. यारून भारतवर्षांतील ब्रह्मावर्तखंडांत ( भरतखंडांत ) हा रहात होता, असें निश्चयात्मक समजावें; कारण पांडव हे, भरतखंडांत झाले होते, हें सर्वमान्य आहे.

**परुष**-खर राक्षसाच्या बारा अमात्यांतील एक.

**परोक्ष**-( सो० वं० ) ययातिपुत्र अनुराजा,त्याच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ.

**पर्जन्य**-रैवतमन्वंतरांतल्या सप्तर्षींत होता ऋषि तो.
२-सविता ना० आदित्यास नामांतर. हा फाल्गुनमासीं प्रतिवर्षी सूर्यमंडलावर आधिपत्य पावत असतो. ( १ तपस्य श० पहा ).
३-मुनीच्या देवगंधर्व पुत्रांतील एक.

**पर्णवि**-एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा. )

**पर्णशाल**-गंगा आणि यमुना यांच्यामधील यामुनगिरी त्याच्या पायथ्याशीं पूर्वी होता ग्राम तो ( भार० अनु० अ० ६८ ).

**पर्णा**-हिमवान् पर्वताची कन्या, व जैगीषव्यऋषीची स्त्री.

**पर्णागारि**-एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**पर्णाद**-दमयंतीनें नलराजाच्या शोधास पाठविलेला ब्राह्मण. ( ५ नल श० पहा ).

**पर्णाशा**-पारियात्र पर्वतापासून निघालेली भारतवर्षीय नदी.

**पर्यावर्तन**-जे कोणी अनाहूत अतिथींवर नेत्र वटारतात, त्यांचे नेत्र गृध्रपक्षी जेथें फोडितात त्या नरकाचें नांव.

**पर्वण**-रावणपक्षीय राक्षस, ( भार. वन० अ० २८५ ).

**पर्वतऋषि**-नारदऋषीचा भागिनेय ( भाचा ) ( २ नारद श० पहा ). जनमेजयानें केलेल्या सर्पसत्रांत हा सदस्य होता.

**पर्वतायू**-वालधी ऋषीचा पुत्र मेधावी, त्यास नामांतर ( बालधी श० पहा ).

**पलाला**-मातृगणांतील एक देवता.

**पलिंगु**-एक ब्रह्मर्षि.

**पलित**-लोमशमार्जारास पाशांतून सोडविणारा एक मूषक ( भार० शांति० अ० १३८ ).

**पल्हवदेश**-मद्रदेशाच्या पश्चिमेस असणारा समुद्रांतील देश ( भार० सभा० अ० ३२ ).

**पवन**-उत्तममनूच्या पुत्रांतील एक.
२-एक राजर्षि.
३-मेरूच्या परिस्तरणगिरींतील एक.

**पवनन्हद**-भारतवर्षीय तीर्थ.

**पवमान**-अग्नीस स्वाहेपासून झालेल्या चार पुत्रांतील एक. याचा पुत्र हव्यवाह. अरणीपासून जो अग्नि उत्पन्न करितात तो याचाच अंश असून, त्यास गार्हपत्य असें नांव असतें, आणि तो गृहस्थास मुख्यत्वें पूज्य असतो.
२-उत्तानपादवंशीय विजिताश्व राजास, शिखंडिनीपासून झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा. हा पूर्वजन्मीं अग्नि असतां, वसिष्ठ ऋषीच्या शापानें उभय बंधूसहित यास जन्मांतर घडलें होतें.
३-प्रियव्रत पुत्र मेधातिथि, त्याच्या सात पुत्रांतील तिसरा. हा, शाकद्वीपांतील याच नांवाच्या वर्षाचा अधिकारी होता.
४-शाक द्वीपांतील तिसरा वर्ष.

**पवित्र**-इंद्रसावर्णि मन्वंतरांतील देववि०.

**पवित्रकूट**-भारतवर्षीय पर्वत .

**पवित्रपाणि**-एक ब्रह्मर्षि.

**पवित्रवती**-क्रौंच द्वीपांतील नदी.

**पवित्रा**-भारतवर्षीय नदी.

**पशुपति**-महादेव.

**पश्चिमआनर्त**-पश्चिमेकडील देशवि०. याची राजधानी कुशस्थली अ० द्वारका. येथें पांडवांच्या वेळेस बलराम आणि कृष्ण, हे राहात असत ( भार० सभा० अ० ३२ ).

**पश्चिमउत्सवसंकेत**-वाटधान देशाच्या किंचित् वायव्येस असणारा देश. येथें इंद्रप्रस्थ मध्य मानून हा दिशाक्रम आहे असें समजावें ( भार० सभा० अ० ३२ ).

**पश्चिमकिरात**-पश्चिम बर्बराच्या पश्चिमेकडील देश. याच्या पश्चिमेस पश्चिम यवन आहे.

**पश्चिमकांबोज**-पश्चिम शूरसेन देशाच्या नीट पश्चिमेस नव्हे, कांहींसा वक्र असा देश तो ( भार० शांति० अ० १०१ ).

**पश्चिमत्रिगर्त**-शिबी देशाच्या पश्चिमेकडील देश. येथें पांडवांच्या वेळेस क्षेमंकर इ० पांच राजे असत (भार० उद्यो० अ० १६१ ).

**पश्चिमदशार्ण**-महेत्थ देशाच्या पश्चिमेकडील देश. येथें पांडवांच्या वेळेस हिरण्यवर्मा ना० राजा होता.

**पश्चिमपांचाल**-जांगल देशाच्या पश्चिमेकडील देश. पांडवांच्या वेळेस येथील राजा द्रुपद होता ( भाग० १ स्कं० अ० १० ).

**पश्चिमबर्बर**-पश्चिम समुद्रांतील देश.

**पश्चिममत्स्य**–कुरुक्षेत्र देशाच्या पश्चिमेस, व सारस्वत देशाच्या पूर्वेस असणारा देश.

**पश्चिममालव**–इंद्रप्रस्थाच्या पश्चिमेस असणारा माळवा देश.

**पश्चिमयवन**–पश्चिम समुद्रांतील यवनांचा देश.

**पश्चिमशक**–पश्चिम समुद्रांतील शक लोकांचा देश.

**पश्चिमशूरसेन**–पश्चिम पांचालाच्या पश्चिमेकडील देश. याची राजधानी मथुरा नगरी.

**पाक**–इंद्रानें मारिलेला एक असुर, म्हणूनच इंद्रास पाकशासन नांव आहे.

**पांचजनी**–प्रथमार्थक असिक्नी शब्द पहा.

**पांचजन्य**–कृष्णाच्या शंखाचें नांव. पंचजन दैत्याच्या अस्थीपासून झालेला.

२–या नांवाचा एक अग्नि (भार० वन० अ० २२०).

३–जंबुद्वीपाच्या आसमंतात् असणाऱ्या अष्ट उपद्वीपांतील सहावें.

**पांचाल**–पांचाल राजांचा देश. हा, इंद्रप्रस्थाच्या पूर्वेस एक, आणि पश्चिमेस एक, आहे म्हणून, या ग्रंथांत त्यास तशींच नांवें दिलीं आहेत (भर्म्याश्व श० पहा).

**पांचाली**–द्रुपदराजाची कन्या द्रौपदी ती.

**पाटलावती**–भारतवर्षीय नदी.

**पाटिक**–श्यामपराशरकुलोत्पन्न ऋषि.

**पांडव**–पंडुराजाच्या दोन स्त्रिया कुंती आणि माद्री त्यांपासून झालेले युधिष्ठिर, भीमसेन, अर्जुन, नकुल आणि सहदेव, हे पांच पुत्र तो प्रत्येक. हे, पूर्वकल्पांतील विश्वभुक्, भूतधामा, शिबि, शांति आणि तेजस्वी, असे क्रमानें पांच इंद्र होत (भार० आदि० अ० १९७).

**पांडवी**–पांडवपुत्रांस आणि वंशजांस साधारण संज्ञा.

**पांडुर**–एक ऋषि (३ अंगिरा श० पहा).

**पांडुराष्ट्र**–भारतवर्षीय देश (भार० भीष्म० अ० ९).

**पांडुरोचि**–ब्रह्मर्षि (३ भृगु श० पहा).

**पांड्य**–भारतवर्षीय देश (भार० वन० अ० २५४). हा, इंद्रप्रस्थाची दक्षिणदिशा अनुलक्षून असणाऱ्या किष्किंधानगरीच्या अलीकडे पांडवांच्या वेळेस होता. येथील राजा सागरध्वज याचा जो, आणखी एक याच दिशेकडील भेद आहे, त्यास दक्षिण अपरपांड्य असें या ग्रंथांत नांव दिलें आहे (भार० सभा० अ० ३१).

२–अश्वत्थाम्यानें मारिलेला भारतीयुद्धांतील पांडवपक्षीय राजा (भार० कर्ण० अ० २०).

**पाणिक**–एक ऋषि (अंगिरा श० पहा).

**पाणिखात**–भारतवर्षीय तीर्थ.

**पाणिन**–कद्रुपुत्र नागांतील एक.

**पाणिनि**–एक ऋषि (१ विश्वामित्र श० पहा). व्याकरणाचा कर्ता हाच असावा.

**पाणिमान्**–वरुणलोकांतील नागवि०.

**पाताल**–भूमीच्या अधोभागीं जे सात बिलस्वर्ग आहेत त्यांतील सातव्यास, व इतरांस साधारण नांव. यांचीं नांवें अशीं.–अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल आणि पाताल.

**पादप**–ब्रह्मर्षि (३ वसिष्ठ श० पहा).

**पापहर**–भारतवर्षीय तीर्थ.

**पापहरा**–भारतवर्षीय नदी.

**पापाशिनी**– ,, ,,

**पार**–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न अजमीढ पुत्र; बृहदिषु तद्वंशीय रुचिराश्व राजाचा पुत्र. यास विभ्राज असें नामांतर असून पृथुसेन आणि नीप, असे दोन पुत्र होते.

२–दक्षसावर्णि मन्वंतरांतील देववि०.

**पारण**–एक ब्रह्मर्षि (२ अगस्त्य श० पहा).

**पारद**–भारतवर्षीय देश.

**पारसीक**–देश, परंतु हा भारतांत आढळला नाहीं, त्यावरून पूर्वी याचें नांव भिन्न असून, हें नांव अर्वाचीन असावें.

**पारा**–पारियात्र पर्वतापासून निघालेली नदी.

२–प्रथमार्थक कौशिकी नदीस नामांतर.

**पाराशर**–पराशरऋषीचे वंशज ते.

**पाराशर्य**–कृष्णद्वैपायनांस नामांतर.

**पारिकारारि**–ब्रह्मर्षि (३ अंगिरा श० पहा).

**पारिजात**–मयसभा पाहण्यास नारदासमागमें आलेला ऋषि.

**पारिप्लव**–भारतवर्षीय तीर्थ.

**पारिभद्र**–प्रियव्रतपुत्र यज्ञबाहु, त्याच्या सात पुत्रांतील पांचवा, याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२–शाल्मली द्वीपाच्या सात वर्षांतील पांचवा.

**पारियात्र**–(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशवंशीय अनीह राजाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. याचा पुत्र बल.

२–मेरूच्या परिस्तरणगिरींतील एक.

३–भारतवर्षीय एक पर्वत. यापासून वेदस्मृता, वेत्रवती, वृत्रघ्नी, सिंधु, पर्णाशा, नर्मदा, कावेरी, महती, पारा, धन्वती, रूपा, विदिशा, वेणुमती, शिप्रा, अवंती,

कुंती इ० नद्या निघालेल्या आहेत ( मत्स्य० अ० ११३ ).

**पारीक्षित्**-परीक्षित् राजाच्या पुत्रांस साधारण नांव, परंतु जनमेजयास म्हणण्याची विशेष रूढि.

**पार्थ**-पृथेचे अ० कुंतीचे युधिष्ठिरादिक तीन पुत्र त्यांस संज्ञा. परंतु अर्जुनाविषयीं विशेष रूढि.

**पार्थिव**-ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**पार्वतिका**-भारतवर्षीय नदी.

**पार्वती**-दक्षयज्ञांत सतीनें देहत्याग केल्यावर, हिमालय पर्वताच्या उदरीं आली असतां, त्याच्या संबंधानें पडलेलें नांव. अशा अर्थाचीं हैमवती, गिरिजा, इ० अनेक नांवें आहेत.

**पार्वतीय**-हें नांव भारतामध्यें दुर्योधनाचा मातुल शकुनि, त्यास आढळतें.

**पार्षत्**-पृषत राजाचा पुत्र द्रुपद राजा, त्यास नामांतर.

**पार्षती**-द्रौपदीस नांव.

**पार्ष्णि**-चेकितान राजाचा सारथि.

**पालंकायन**-ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**पालिशय**- ,, ,,

**पालेह**- ,, ,,

**पावक**-अग्नीस स्वाहेपासून झालेल्या चार पुत्रांतील एक. विद्युल्लतेंत असणाऱ्या अग्नीस हेंच नांव असून, हा अग्नि ब्रह्मचाऱ्यास पूज्य आहे. याचा पुत्र सहरक्ष ना० अग्नि.

२-उत्तानपादवंशीय विजिताश्व राजा, त्याच्या तीन पुत्रांतील एक.

**पावकाक्ष**-रामसेनेंतील वानर ( वा० रा० युद्ध० स० ७३ ).

**पावकि**-कार्तिकेयास नांव (अग्निभू श० पहा).

**पावन**-कृष्णास मित्रविंदेपासून झालेला पुत्र.

२-भारतवर्षीय तीर्थ.

**पावनी**-सरस्वती नदीस नांव.

**पावमान्य**-ऋषि.

**पाशिनी**-शुक्तिमान् पर्वतापासून निघालेली नदी.

**पाशिवाट**-भारतवर्षीय देश.

**पाशुपत**-अथर्वणवेदोपनिषत्. असेंच एका तीर्थाचें, व शिवाच्या अस्त्राचें नांव आहे.

**पाषंडकपुर**-संजयंतीपुरीच्या आग्नेयी दिशेकडील नगरवि० ( भार० सभा० अ० ३१ ).

**पिंग**-एक ब्रह्मर्षि, व एक तीर्थ.

**पिंगल**-सूर्याच्या अनुचरांतील एक.

२-जनमेजयाच्या सर्पसत्रांतील सदस्य ऋषि.

३-तृतीयार्थक भृगुकुलोत्पन्न ऋषि. हा जनमेजयाच्या सर्पसत्रांत सदस्य होता.

**पिंगलक**-एक गंधर्व.

**पिंगला**-मिथिलानगरींत राहणारी एक वेश्या. ही आपल्या वेश्याधर्माच्या नियमाप्रमाणें एके दिवशीं सायंकाळीं नित्याप्रमाणें सुंदर वेष करून दारांत उभी राहिली, व पुरुषाची मार्गप्रतीक्षा करूं लागली; परंतु त्या दिवशीं तिजकडे कोणीच पुरुष आला नाहीं, तथापि ती वारंवार मार्गाकडे पाहीच, असें होतां होतां मध्यरात्र लोटली, व कोणी पुरुष आला नाहीं, असें पाहून तिला वैराग्य झालें. नंतर तिनें हृदयस्थ जो परम पुरुष परमात्मा, तोच आपला सनातनपति असें पूर्वपुण्यानें उमजून, इतर पुरुषांच्या निंदापूर्वक गीत गायिलें तें असें.-

**श्लोकः**-संतं समीपे रमणं रतिप्रदं वित्तप्रदं नित्यमिमं विहाय ।। अकामदं दुःखभयादिशोकमोहप्रदं तुच्छमहं भजेऽज्ञा ॥ " ( भाग० ११ स्कं० अ० ८ ). यांतील भाव-माझा हृदयस्थ सनातन इत्यादि गुणांनीं युक्त पति मी सोडून, अनित्यत्वादिगुणयुक्तास मी भजत्यें, तेव्हां मजहून दुसरी अज्ञान स्त्री कोण आहे ? सारांश, पुढें तो व्यवहार तिनें सोडून दिला, व आत्मस्वरूपीं रममाण होऊन कृतार्थ झाली.

**पिंगलाक्ष**-शिवाच्या रुद्रगणांतील एक.

**पिच्छिला**-भारतवर्षीय नदी.

**पिंजला**- ,, ,,

**पिठर**-वरुणलोकांतील एक असुर.

**पिठारक**-द्वारकेसमीपचें तीर्थवि० ( भाग० ११ स्कं० अ० १ ).

**पितर**-देवयोनींतील जातिविशेषाचे देव. हे निरंतर स्वर्गामध्यें राहणारे असून, कामरूपधर, व अतितेजस्वी असे आहेत. यांचे अग्निष्वात्त, सौम्य, काव्य, बर्हिषद अ० आर्तव, सोमप, सुस्वधा अ० आज्यप, हविष्मंत, अर्यमा, साग्नय, निरग्नय, वैराज, इ० अनेक भेद आहेत. स्वायंभुव मन्वंतरांतील दक्षप्रजापतीनें, यांस आपल्या सोळा कन्यांतील स्वधा ना० कन्या दिली होती. तिला यांपासून वयुना आणि धरिणी, अशा दोन ब्रह्मनिष्ठ कन्या झाल्या होत्या ( मत्स्य० अ० १३-१५ ). यांत अग्निष्वात्त, बर्हिषद, सोमप, हविष्मंत, आज्यप आणि सुकाली, हे अनुक्रमें मरीचि, अत्रि, भृगु, अंगिरा, पुलस्त्य आणि वसिष्ठ यांचे पुत्र असून, देव, दैत्य, ब्राह्मण, क्षत्रिय,

वैश्य व शूद्र, यांस पूज्य आहेत ( मनुस्मृति अ० ३ श्लो० १९६-१९९ ).

**पितामह**-आपल्या मानसपुत्रांकडून प्रजा निर्माण करविल्यानें, त्या प्रजेच्या संबंधानें ब्रह्मदेवास पडलेलें नांव.

**पितृकल्प**-ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील तिसावा होणारा कल्प अ० दिवस ( ४ कल्प श० पहा ). हा कल्प ब्रह्मदेवाची अमावस्या समजावा.

**पितृतीर्थ**-भारतवर्षीय तीर्थ.

**पितृवर्ती**-पूर्वी कुरुदेशांत कौशिक नांवाचा एक ब्राह्मण होता, त्याच्या सात पुत्रांतील हा कनिष्ठ. साहांचीं नांवें याप्रमाणें होतीं.-स्वसृप, क्रोधन, हिंस्र, पिशुन, कवि, वाग्दुष्ट आणि सातवा पितृवर्ती, हे सातही गर्गमुनीसमीप अध्ययनार्थ राहिले असत, व तेथें असतां यांचा पिता मरण पावला, तेव्हां सर्वांनीं त्याचें और्ध्वदेहिक करून पुनः गुरूजवळ येऊन राहिले. यांनीं, गुरुगृहींची सेवा करून, त्याची सवत्सधेनु अरण्यांत चारावयास नित्य नेत असावी, असा क्रम बहुत काळपर्यंत चालविला असतां, देशांत अनावृष्टि झाली. त्या योगानें अन्न मिळेनासें होऊन, हे सातजणही बहुत उपवास पडून पीडित झाले. एके दिवशीं नित्यक्रमानुरूप, हे सर्व भ्राते धेनु अरण्यांत घेऊन गेल्यावर, यांस क्षुधा इतकी अनावर झाली कीं, आतां ही धेनुच भक्षण करावी असें यांस वाटलें. तो सर्वांचा विचार ऐकून, सर्वांत कनिष्ठ जो पितृवर्ती तो म्हणाला, जर तुम्हांस धेनु भक्षणेंच आहे, तर पितरांस समर्पण करून भक्षा. तें याचें भाषण सर्वांस मान्य होतांच, पितृवर्ती, यजमान होऊन, त्यानें दोघां बंधूंस देवस्थानीं, व तिघांस पितृस्थानीं बसविलें, आणि एकास अतिथि करून त्या गायीचा विनियोग, केला. नंतर सायंकाळीं घरीं येऊन, गुरूच्या स्वाधीन वत्स करीत होत्साते बोलले कीं, धेनु व्याघ्र घेऊन गेला.

कालांतरानें, सातही भ्राते मरण पावून मागील हिंसेच्या व अनृत भाषणाच्या योगानें, सात व्याध होऊन दशारण्यांत जन्मले; परंतु पितृभक्तीच्या बळानें त्यांस जातिस्मरत्व ( पूर्वजन्मीं आपण कोण होतों त्याचें स्मरण ) होतें, त्यामुळें त्यांनीं त्या देहांत वैराग्य धारणपूर्वक निरशनव्रतें करून देह शुष्क केलें, म्हणून अल्पच काळांत त्या देहांचा त्याग करून सातही जण एकाच वेळीं कालंजर पर्वतावर सात मृग होऊन जन्मले, नंतर तिसऱ्या जन्मीं चक्रवाक होऊन, चौथ्या जन्मीं मानससरोवरावर सातही हंसपक्षी झाले.

हे सात हंसपक्षी मानससरोवरावर असतां, सोमवंशीय पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र बृहदिषूचा वंशज विभ्राज ना० राजा, तेथें स्त्रियांसहवर्तमान वनक्रीडेस आलेला त्यांनीं पाहिला. त्यावरून पितृवर्ती आदिकरून तिघांस, त्याचें ऐश्वर्य पाहून तद्विषयक लोभ उत्पन्न झाल्यामुळें योगभ्रष्टता प्राप्त झाली, म्हणून मुख्य पितृवर्तीस पक्षिदेहाचा त्याग घडतांच, तो त्याच राजाच्या नीप ना० पुत्राच्या उदरीं ब्रह्मदत्त नांवानें राजपुत्र होऊन जन्मला, व दुसरे दोघे प्रधान पुत्र झाले. अवशिष्ट राहिलेले चार, त्याच राजाच्या नगरांत सुदरिद्र ना० कोणी ब्राह्मण राहात असे त्याचे पुत्र झाले. तशीच श्राद्धविधीनें विनियोग पावलेली धेनु, त्या पुण्यसंस्कारानें गौ, सन्नती अ० सरस्वती, या नांवानें देवल ऋषीची कन्या होऊन जन्मली होत्साती, ब्रह्मदत्त राजाची स्त्री झाली.

ब्राह्मणगृहीं धृतिमान्, तत्त्वदर्शी, तपोत्सुक आणि आणि विद्याचंड, या नामांनीं जन्मलेले चौघे भ्राते, व्रतबंधसंस्कार झाल्यावर, पित्यास म्हणूं लागले कीं, आम्हास तपाचरणार्थ अरण्यांत जाण्याची आज्ञा द्यावी तेव्हां तो बोलला, मी दरिद्री असून वृद्ध आहें, यास्तव मला टाकून तुम्हांस जाणें योग्य नाहीं. त्यावरून चौघांनीं विचार करून पित्यास एक श्लोक लिहून देऊन सांगितलें कीं, आपण हा श्लोक नेऊन येथील ब्रह्मदत्त राजास दाखवावा, म्हणजे तो आपल्यास बहुत धन देईल. त्यावरून चौघे अरण्यांत जातांच सुदरिद्र ब्राह्मण तो श्लोक घेऊन ब्रह्मदत्त राजाकडे गेला. तो श्लोक असा- "ये विप्रमुख्याः कुरुजांगलेषु दाशास्तथा दाशपुरे मृगाश्च ॥ कालंजरे सप्त च चक्रवाका ये मानसे ते वयमत्र सिद्धाः" ॥ ९ ॥

याप्रमाणें ब्राह्मणानें आणून दिलेला श्लोक पाहतांच, ब्रह्मदत्त राजास, ऐश्वर्यलोभानें पूर्वजन्माचें विस्मरण झालें होतें, त्याचें एकाएकीं स्मरण होऊन मूर्च्छा आली, व कंडरीक आणि सुबालक, दोघे प्रधानपुत्र तेही तो श्लोक पाहून मूर्च्छित पडले. पुढें कांहीं वेळानें तिघेही सावध होऊन, त्यांतून राजानें ब्राह्मणास अपार धन देऊन मार्गस्थ केल्यावर, लागलाच विष्वक्सेन ना० पुत्रास राज्याभिषेक करून, दोघे प्रधान व स्त्री, यासहवर्तमान जेथें चौघे भ्राते तप करीत होते तेथें गमन केलें, व त्यांसमागमें

तप करीत राहून देहाच्या अंतीं तो सर्वांसहित स्वर्गगतीस पावला ( मत्स्य० अ० २०-२१ ).

**पिनाक**-महादेवाच्या अजगव धनुष्यास नांव.

**पिनाकि**-एकादश रुद्रांतील एक.

२- पिनाक धनुष्य धारण करण्यानें शिवास नांव.

**पिप्पलाद**-कोणी एक ब्रह्मनिष्ठ ऋषि.

**पिप्पलायन**-ऋषभदेवाच्या नऊ सिद्ध पुत्रांतील एक.

**पिप्पली**-ऋष्यवान् पर्वतापासून निघणारी नदी.

**पिप्पल्य**-एक ऋषि ( २ कश्यप श० पहा ).

**पिशाच**-भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

२-देवयोनींत गणलेली अशी एक जाति.

**पिशुन**-कौशिक ऋषीच्या सात पुत्रांतील एक ( पितृवर्ति श० पहा ).

**पिलि**-ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**पीठ**-कृष्णानें मारिलेला नरकासुराचा सेनापति ( नरकासुर श० पहा ).

**पीतहव्य**-वीतहव्य तोच.

**पीतांबर**-विष्णूस पीतवस्त्र प्रिय असल्यामुळें नांव.

**पीवरी**-बर्हिषद पितरांची मानसकन्या. हिला वीरिणी असेंही म्हटलेलें असून, ही शुक्राचार्यांची स्त्री होती.

**पुंजिकस्थला**-एक अप्सरा. हीच शाप पावून अंजना झाली होती.

**पुंजिकस्थली**-वैशाखमासींच्या सूर्यासमागमें असणारी अप्सरा ( २ माधव श० पहा ).

**पुंडरीक**-अष्ट दिग्गजांतील दक्षिण दिशेकडील गज.

२-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयसंभूत निषध राजाचा पौत्र, व नभराजाचा पुत्र. याचा पुत्र क्षेमधन्वा.

३-पातालांतील एक नाग ( बभ्रुवाहन श० पहा ).

**पुंडरीका**-एक अप्सरा.

**पुंड्र**-( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न बली राजाच्या साहा पुत्रांतील एक.

२-वसुदेवास सुतनूपासून झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ ( वसुदेव श० पहा ).

**पुंड्रदेश**-अंगदेशाच्या पुढें मोदागिरि उल्लंघून असणारा भारतवर्षीय देश, येथें पांडवांच्या वेळेस पौंड्रकवासुदेव ना० राजा होता ( भार० सभा० अ० ३० ).

**पुत्रच**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**पुनर्वसु**-सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक. प्राचेतस् दक्षाची कन्या.

२-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न 

शीय अरिद्योत राजाचा पुत्र. यास आहुक पुत्र, व आहुकी कन्या अशीं दोन अपत्यें होतीं.

**पुनश्चंद्रा**-काम्यक वनाच्या दक्षिणेकडील नदी.

**पुरंजय**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ककुत्स्थ राजास नामांतर.

२-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय सुधनु राजा, तत्कुलोत्पन्न जरासंधवंशांत जन्मलेला रिपुंजय राजा, ज्यास शुनक नांवाच्या प्रधानानें मारिलें, त्याचेंच नामांतर ( ३ रिपुंजय श० पहा ).

**पुरंदर**-चालू जें वैवस्वत मन्वंतर, यांत स्वर्गामध्यें देवांचें आधिपत्य करणारा इंद्र आहे तो. अदितीच्या ठायीं कश्यपापासून झालेला वामन ना० विष्णूचा अवतार, तो याचा साह्यकर्ता समजावा. सूर्यवंशोत्पन्न पृथुराजा, त्याच्या चरित्रांत या इंद्राचें नांव आढळतें तें वाक्य असें.-"एषोश्वमेधान् शतमाजहार सरस्वती प्रादुरभावि यत्र ॥ अहारषीद्यस्य हयं पुरंदरः शतक्रतुश्चरमे वर्तमाने ॥ २४ ॥" ( भाग० ४ स्कं० अ० १६ ).

यानें आपली जयंती ना० कन्या शुक्राचार्यास दिली होती, म्हणून हा देवयानीचा मातामह होता. कचास शुक्राचार्याकडे यानेंच पाठवून, मृतसंजीवनी विद्या स्वर्गांत आणविली. विश्वरूपवध आणि वृत्रासुरवध यानेंच केला. बली दैत्याच्या यज्ञास यानेंच विघ्न करवून, तो पुढील सावर्णि मन्वंतरांत इंद्र व्हावा असें वामनाकडून करविलें, इ० अनेक खटपटी याच्या कालसत्तेंत झालेल्या आहेत. हा स्वर्गाधिपति झाल्याला, अठ्ठावीस महायुगें ( चौकडया ) होत आल्या असून, त्रेचाळीस महायुगें आणि वर कांहीं काळ अजून हा स्वर्गांत आधिपत्य करील.

हा इंद्र आत्मज्ञानसंपन्न असल्याविषयीं इतिहास आढळतो. तो असा.-एकदां हा आत्मज्ञानाची प्राप्ति व्हावी म्हणून, सत्यलोकास गेला असतां, प्रल्हादपुत्र विरोचन तोही त्याच हेतूनें तेथें प्राप्त झाला होता. नंतर उभयतांनीं, ब्रह्मदेवाची प्रार्थना करून, ब्रह्म म्हणजे काय तें आम्हास सांगा असा प्रश्न केला. त्यावरून ब्रह्मदेवानीं, दोघेही ब्रह्मविद्येस अधिकारीच आहेत, किंवा कसें हें पहावें म्हणून, संकेतानें ब्रह्माचा उपदेश केला, आणि याचा विचार करा म्हणून सांगितलें. त्यावरून दोघेही माघारे परतले. त्यांत विरोचनानें मुळीं विचारच केला नाहीं. हा मात्र संशय उत्पन्न झाला कीं, ब्रह्मदेवाकडे जाई, व असे याप्रमाणें यानें ब्रह्मदेवाकडे चार वेळ जाऊन,

बत्तीस वर्षेपर्यंत विचार केला, तेणेंकरून निःसंशय आत्मसाक्षात्कार पावून, कृतार्थ झाला. हा इतिहास, उपनिषदांतील येथें घेतला आहे.

**पुरमालिनी**–भारतवर्षीय नदी.

**पुरावती**— " "

**पुरु**–उत्तानपादवंशीय चक्षुर्मनूस, नड्वलेपासून झालेल्या पुत्रांतील ज्येष्ठ. यास कोठें पुरुष असेंही म्हटलेलें आढळतें.

२–वसुदेवास सहदेवेपासून झालेल्या आठ पुत्रांतील ज्येष्ठ.

३–काम्यक वनाच्या उत्तरेस पुरूरव्याचें जन्मस्थान असा पर्वतवि०.

**पुरुकुत्स**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न मांधाता राजास, बिंदुमतिपासून झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. हा पित्याप्रमाणेंच शूर असून, त्याच्या मागें राज्याधिकारी झाला असतां, एका प्रसंगीं यानें नागांस उत्तम प्रकारें साह्य केलें, त्यावरून त्यांनीं आपली नर्मदा ना० कन्या यास भार्यार्थ दिली. तिच्या ठायीं याला वसुद आणि त्रसद्दस्यु असे दोन पुत्र झाले होते.

२–ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**पुरुज**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील राजा, तद्वंशीय सुशांति राजाचा पुत्र, याचा पुत्र अर्क ना० राजा.

**पुरुजित्**–( वि० वं० ) अजनामक जनकाचा पुत्र. याचा पुत्र अरिष्टनेमि जनक.

२–(सो० वं०)यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय रुचक राजाच्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ.

३–वसुदेवभ्राता आनक, त्यास कंकेपासून झालेल्या दोन पुत्रांतील कनिष्ठ.

४–कुंतिभोज राजाचा पुत्र, कुंतीचा भ्राता, व युधिष्ठिर, भीम आणि अर्जुन, यांचा मातुल. हा भारतीयुद्धांत पित्यासहित पांडवांकडे होता (भार० उद्योग० अ० १७२ ). याच्या रथाचे अश्व इंद्रधनुष्याच्या रंगासारखे असत ( भार० द्रोण० अ० २३ ). यास युद्धांत अश्वत्थाम्यानें मारिलें.

५–कृष्णास जांबवतीपासून झालेल्या पुत्रांतलि एक.

**पुरुमित्र**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**पुरुमीढ**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्ति राजाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ.

**पुरुष**–प्रथमार्थक पुरु राजासच नांव.

२–पुरुष राक्षसास असें नांव आढळतें.

**पुरुहूत**–चौदाही इंद्रांस साधारण नांव.

**पुरुहोत्र**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा त्याच्या ज्यामघ कुलांतील क्रथवंशांत जन्मलेल्या अनु राजाचा पुत्र, याचा पुत्र आयु राजा.

**पुरूरवा**–सोमपुत्र बुधापासून, इलेस झालेला पुत्र. हा सोमवंशाचा मूळ पुरुष होय. याची राजधानी पूर्वी प्रयागाजवळ प्रतिष्ठान पुर होतें ( देवी भा० १ स्कं० अ० १३ ). हा इलेचा पुत्र म्हणून, यास ऐलविल असें म्हटलेलें आहे. यास उर्वशी अप्सरेनें वरिलें होतें, त्यामुळें तीच याची स्त्री होती. त्याविषयींचा इतिहास असा आहे.–वैवस्वत मन्वंतरारंभीं उर्वशीस मित्र ना० आदित्याचा शाप झाला होता कीं, तूं पृथिवीवर पतन पावशील. त्याप्रमाणें ती पतन पावत असतां मध्येंच तिला केशी दैत्य धरून पळूं लागला. त्यापासून तिला यानें सोडविलें म्हणून तिनें यास वरिलें होतें. तिचेठायीं यापासून **आयु, श्रुतायु, सत्यायु, रय, विजय** आणि **जय**, असे साहा पुत्र झाले होते. ब्राह्मणादिक चार वर्णांनीं परस्परांशीं कसें वागावें, त्याविषयीं त्याचा कश्यप ऋषीशीं संवाद झाला होता ( भार० शांति० अ० ७२–७३ ).

**पुरोचन**–म्लेंच्छवि०. दुर्योधनाचा मित्र. यानें दुर्योधनाच्या सांगण्यावरून, पांडवांस दग्ध करण्याकरितां, वारणावत नगरांत लाक्षागृह निर्माण केलें होतें. नंतर पांडवांसमागमें तेथें राहण्याच्या उद्देशानेंही हाच गेला होता. हा त्यांसमागमें गेला, त्या वेळेस याच्या रथास खर जोडले होते असें भारतांत लिहिलें आहे. त्यावरून पांडवांच्या वेळेपर्यंत, यवनादिक म्लेंच्छजाति आपल्या रथास अश्व जोडीत नसत असें दिसतें ( भार० आदि० अ० १४४ ). पुढें पांडवांस यानें दग्ध करावयाचें एकीकडे राहून, हाच त्यांत दग्ध होऊन मरण पावला.

**पुरोजव**–प्रियव्रतपुत्र मेधातिथि त्याच्या सात पुत्रांतील पहिला, याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२–शाकद्वीपाच्या सात वर्षांतील पहिला.

**पुरोजवा**–अनील ना० वसूचा पुत्र.

**पुलस्त्य**–स्वायंभुव मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र. हा त्याच्या कर्णापासून उत्पन्न झाला असून, याची स्त्री, कर्दमप्रजापतीची कन्या हविर्भुवा ती होती, व तिजपासून यास, अगस्त्य आणि विश्रवा असे दोन

पुत्र झाले होते. हा बहुधा मन्वंतरसमाप्तीपर्यंत असेल असें वाटतें. पुढें सर्व ब्रह्मपुत्र महादेवाच्या शापानें मरण पावले, त्यांत हाही मृत झाला होता ( महर्षि श० पहा ). याचे पुत्र आज्यप ना० पितर.

२–पूर्वीचे मृत झालेले ब्रह्मपुत्र, त्यांस ब्रह्मदेवानें पुनः चालू वैवस्वतमन्वंतरारंभीं उत्पन्न केलें, त्यांत हा, ब्रह्मदेवानें स्वतः केलेल्या यज्ञांत अग्नीच्या पिंगट केशांपासून उत्पन्न झाला होता. पुढें हा, याच मन्वंतराच्या अकराव्या पर्ययाच्या ( चौकडीच्या ) सत्ययुगांत, मेरु पर्वताच्या पार्श्वभागीं पूर्वीपासूनच तप करीत बसलेला असतां, तेथें गंधर्वादिकांच्या कन्या येऊन गायन इ० करीत, तेणेंकरून तपास विघ्न होऊन हा विमनस्क होई. त्यामुळें यानें असा शाप देऊन ठेविला होता कीं, जी कन्या आजपासून मजसंमुख येईल, ती गरोदर होईल. तेव्हांपासून तिकडे कोणी कन्या जाईनातशा झाल्या. हा शाप, तृणबिंदु ना० राजाची कन्या गौ, तिला विदित नसून, ती तेथें गेल्यामुळें गरोदर झाली ( भार० वन० अ० २७४–श्लोक० १२ ) म्हणून तृणबिंदूनें तिला पुलस्त्यासच विवाह करून दिली. नंतर तिनें याची सेवा अतिशय उत्कृष्ट केली, व श्रद्धापूर्वक वेदाध्ययन श्रवण केलें, म्हणून पूर्ण काळीं प्रसूत होऊन पुत्रास प्रसवली असतां, त्याचें नांव यानें विश्रवा असें ठेविलें ( वा० रा० उत्तर० स० २ ). हा सांप्रत प्रतिचैत्रमासीं सूर्यासमागमें संचार करण्यास असतो ( ९ मधु० श० पहा ).

३–युधिष्ठिरास तीर्थयात्रा ज्यानें सांगितल्या तो ऋषि ( भार० वन० अ० ८२–८५ ).

**पुलह**–स्वायंभुव मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र. हा, ब्रह्मदेवाच्या नाभीपासून उत्पन्न झाला होता, व यास, कर्दमकन्या गति, ती स्त्री होती. याला कर्मश्रेष्ठ, वरीयान् आणि सहिष्णु असे तीन पुत्र होते. हाही महादेवाच्या शापानें सर्व ब्रह्मपुत्रांत मरण पावला होता ( महर्षि श० पहा ).

२–पूर्वीचे मरण पावलेले ऋषि, पुनः ब्रह्मदेवानें उत्पन्न केले, त्यांत हा ब्रह्मदेवाच्या स्वतःच्या यज्ञांत अग्नीच्या लांब केशांपासून निर्माण झाला होता, व यास येथें संध्या नांवाची स्त्री, आणि कर्दम नांवाचा पुत्र होता ( भार० उद्योग० अ० ११७ ). हा प्रस्तुतच्या मन्वंतरांत प्रतिवैशाखमासींच्या सूर्यासमागमें संचार करण्यास असतो ( २ माधव श० पहा ).

३–एक ऋषि. विशेष आढळत नाहीं.

**पुलिंददेश**–इंद्रप्रस्थाच्या दक्षिण दिशेकडे पूर्वी एक देशविशेष होता ( भार० सभा० अ० ३१ ).

**पुलिंदनगर**–कोणत्या देशाची राजधानी, तें कळत नाहीं; परंतु पांडवांच्या वेळेस येथें सुकुमार आणि सुमित्र असे, उभयता बंधु असावेत, ते राजे होते ( भार० सभा० अ० २९ ).

**पुलोमा**–वैश्वानर दानवाची कन्या, मारीच दानवाच्या दोन स्त्रियांतील पहिली. हिचे पुत्र पौलोम.

२–चालू मन्वंतरांतील वारुणि भृगूची स्त्री. हिचे च्यवन इ० पुत्र सात.

**पुष्कर**–एक वरुण पुत्र, हा वरुणाचा बलाध्यक्षही आहे ( वा० रा० उत्तर० स० २३ ). याची स्त्री सोमकन्या ज्योत्स्ना ( भार० उद्योग० अ० ९८ ).

२–एक ब्रह्मर्षि ( कृष्णपराशर श० पहा ).

३–पंचमार्थक नल राजाचा भ्राता.

४–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न दशरथपुत्र भरत. त्यास मांडवीपासून झालेल्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. याची राजधानी गांधारदेशांत पुष्कलावत अ० पुष्करावती होती ( वा० रा० उत्तर० स० १०१ ).

५–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशवंशीय सुनक्षत्र राजाचा पुत्र. यास किन्नराश्व नामांतर असून, पुत्र अंतरिक्ष नांवाचा होता.

६–( सो० वं० ) वसुदेवभ्राता वृक, त्याच्या पुत्रांतील एक.

७–( सो० वं० ) कृष्णाच्या पौत्रांतील एक.

८–भारतवर्षीय तीर्थ.

**पुष्करद्वीप**–पृथिवीच्या सप्तमहाद्वीपांतील सातवें. हें दधिमंडोदाच्या ( दह्यांच्या समुद्राच्या ) बाह्यप्रदेशीं असून, याची रुंदी चौसष्ट लक्ष योजनें आहे, व तितक्याच रुंदीच्या गोड्या पाण्याच्या समुद्राचें त्यास वेष्टन आहे. प्रियव्रत राजाचा पुत्र वीतिहोत्र, तो या द्वीपाचा अधिपति असून, त्यानें या द्वीपाचे दोन भाग केले, व ते रमणक आणि धातकी या दोन पुत्रांस देऊन, त्यांचींच नांवें त्यांस दिलीं. या दोन भूभागांची सीमा करणारा मानसोत्तरपर्वत जो मध्यें आहे तो होय.

**पुष्करमालिनी**–इंद्राच्या सभेचें नांव.

**पुष्करारण्य**–वाटधान देशासमीप असणारें वन ( भार० सभा० अ० ३२ ).

**पुष्करारुणि**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्वपुत्र

ऋतेयु राजा, तद्वंशीय भरतकुलांतील दुरितक्षय राजाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. हा तपानें ब्राह्मण झाला होता.

**पुष्करावती**–सूर्यवंशोत्पन्न पुष्कर राजाच्या नगरीचें नांव.

**पुष्करिणी**–उत्तानपादवंशीय व्युष्टराजाची स्त्री.

२–उत्तानपादवंशीय उल्मुक राजाची स्त्री.

**पुष्कल**–दशरथपुत्र भरत, त्याच्या पुष्कर पुत्रास नामांतर.

२–इक्ष्वाकुकुलोत्पन्न लांगल राजास नामांतर.

**पुष्कलावत**–पुष्करावती नगरीस नामांतर.

**पुष्टी**–स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक.

**पुष्प** अ० **पुष्पवर्ष**–शाल्मली द्वीपांतील पर्वत.

**पुष्पक**–या नांवाचें इच्छागामि विमान, हें वैश्रवणानें तपेंकरून प्राप्त करून घेतलें होतें ( वा० रा० उत्तर० स० ३ ). तेंच रावणानें त्यापासून पुढें बलात्कारानें हरण केलें. त्यानंतर रामानें रावणास मारिल्यावर तें रामासमीप होतें.

**पुष्पजा**–मलयपर्वतापासून निघालेली नदी.

**पुष्पदंत**–अष्टादिग्गजांतील वायव्य दिशेचा दिग्गज.

२–एक गंधर्व. ( देवी भा० ९ स्कं० अ० २० .) यानें महिम्न ना० स्तोत्र केलेलें प्रसिद्ध आहेच.

**पुष्पदंष्ट्र**–कद्रुपुत्र नागांतील एक.

**पुष्पधन्वा**–मदनास, पुष्पांचें धनुष्य हातांत धरण्यानें नांव.

**पुष्पभद्र**–स्वर्गांतील देवांचें वनवि०.

**पुष्परथ**–दाशरथि रामाचा वसण्याचा एक प्रसिद्ध रथ.

**पुष्पवती**–भारतवर्षीय नदी.

**पुष्पवर्ष**–पुष्प शब्द पहा.

**पुष्पवान्**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न उपरिचर वसूचा पुत्र बृहद्रथ, तद्वंशीय सत्यहित राजाचा पुत्र. याचा पुत्र जहु.

**पुष्पवाहन**–एक राजा, वंश आढळत नाहीं. याची स्त्री लीलावती, व यास पुत्र सहस्र होते.

**पुष्पानन**–एक गंधर्व.

**पुष्पान्वेषि**–एक ब्रह्मर्षि ( ३ आंगिरा श० पहा ).

**पुष्पार्ण**–उत्तानपादवंशीय ध्रुवाचा पौत्र, व वत्सरास स्वर्वीथीपासून झालेल्या सहा पुत्रांतील ज्येष्ठ. यास, प्रभा ना० स्त्रीपासून **प्रातः**, **मध्यान्ह**, आणि **सायान्ह**, असे तीन पुत्र, व दोषा ना० दुसऱ्या स्त्रीपासून **प्रदोष**, **निशीथ** आणि **व्युष्ट**, याप्रमाणें तीन पुत्र झाले होते.

**पुष्पितक**–भारतवर्षीय पर्वत.

**पुष्पोत्कटा**–सुमाली राक्षसाची कन्या, विश्रवा ऋषीची स्त्री.

**पुष्पोदका**–यमलोकाच्या मार्गांत असणारी नदी (भार० वन० अ० २०० ).

**पुष्य**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशवंशीय हिरण्यनाभ राजाचा पुत्र. याचा पुत्र ध्रुवसंधि ( देवीभा० ३ स्कं० अ० १४ ).

**पूजनी**–चिमणी पक्षीण ( ३ ब्रह्मदत्त श० पहा ).

**पूतना**–कंसाची अनुचर राक्षसी. हिला बकी असेंही म्हटलेलें आहे. ही, कंसाच्या आज्ञेनें गोकुलांतील बालकांचा संहार करीत, शेवटीं तरुण स्त्रीचें रूप धारण करून नंदगृहीं प्रवेशली. तें हिचें कपट कोणास न समजल्यामुळें, यशोदा आणि रोहिणी, यांनीं तिला ती गोकुलांतीलच असेल असें जाणून, निवारण केलें नाहीं; म्हणून ती कृष्ण जेथें शय्येवर होता तेथें गेली व त्यास अंकावर घेऊन पाजूं लागली. परंतु तिनें स्तनांत विष भरिलें होतें, तें कृष्णास कळून त्यानें विषप्राशन करतां करतां त्यांत तिच्या प्राणांचेंही आकर्षण आरंभिलें. त्यावरून तिला व्यथा होऊन, कृष्णास, सोड सोड असें म्हणून ओरडूं लागली. सारांश, त्या वेदनेनें ती मरण पावली ( भाग० १० स्कं० अ० ६ ).

**पूतिमाष**–आंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**पूयोद**–रक्त इ० कांनीं भरलेला एक नरक, जे प्राणी शुद्री इ०कांशीं रममाण होऊन, यथेष्टाचरणानें वागतात, त्यांस येथें यातना भोगाव्या लागतात.

**पूरण** विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

२–एक ऋषि ( भार० शांति० अ० ४७ ).

**पूरु**–( सो० वं० ) पूरूरवा राजाचा पुत्र. आयु ना० राजा, त्याचा पुत्र नहुष, त्याच्या ययाति ना० पुत्रापासून, शर्मिष्ठेस झालेल्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. यानें पित्याची जरा ग्रहण करून बहुत दुःख सोशिलें, त्यामुळें यास, ययातीनें राज्याधिकारी केलें होतें. याला वंशविस्तारक, एकच जनमेजय नांवाचा पुत्र होता.

२–( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न जन्हु राजाचा पुत्र, यास, अज अ० अजमीढ असें नामांतर असून पुत्र बलाकाश्व नांवाचा होता.

**पूर्ण**–प्राधापुत्र देवगंधर्वांतील एक.

**पूर्णभद्र**–वैश्रवणाच्या सात अमात्यांतील एक यक्ष. यास, यज्ञ अ० हरिकेश नांवाचा पुत्र होता ( मत्स्य० अ० १७९ ).

**पूर्णमास**–एक ब्रह्मर्षि, व त्याचें कुल ( २ अगस्त्य श० पहा ).

२–कृष्णास कालिंदीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**पूर्णायु**–प्राधापुत्र देवगंधर्वांतलि एक.

**पूर्णिमा**–स्वायंभुव मन्वंतरांतल्या मरीचि ऋषीच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. यास, विरज आणि विश्वग, असे दोन पुत्र व देवकुल्या ना० कन्या अशीं तीन अपत्यें होतीं.

**पूर्णिमागतिक**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**पूर्य**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**पूर्वकिरात**–पूर्वेकडे इंद्रपर्वतासमीप असणारा किरात देश. येथें पांडवांच्या वेळेस सात किरात राजे आधिपत्य करणारे असत. या ग्रंथांत, इंद्रप्रस्थ मध्य धरून त्याच्या पूर्वेकडील हा देश असल्यामुळें यास असें नांव दिलें आहे ( भार० सभा० अ० ३० ).

**पूर्वकोसल**–इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील कोसल. हें नांव साधारण आहे. परंतु यांत ईशान्य कोसल आणि आग्नेय कोसल, असे दोन भेद, इंद्रप्रस्थ मध्य धरून, नीट उलगडा होण्यासाठीं मानिले आहेत.

**पूर्वचित्ति**–आग्नीध्र राजाची स्त्री, स्वायंभुव मन्वंतरांतील अप्सरा.

२–वैवस्वत मन्वंतरांतील प्राधेच्या अप्सरारूप कन्यांतील एक. ही, पौषमासींच्या सूर्यासमागमें संचार करण्यास सांप्रत प्रतिवर्षी असत्ये ( सहस्य श० पहा ).

**पूर्वदशार्ण**–पहिल्या विदेहदेशाच्या पूर्वेकडील देश. येथें पांडवांच्या वेळेस सुधर्मा ना० राजा होता. ( भार० सभा० अ० २९ ).

**पूर्वनिषाद**–भर्गना० देश तो. येथें पांडवांच्या वेळेस मणिमान् प्रमुख निषाद राजे होते ( भार० सभा० अ० ३० ).

**पूर्वपांचाल**–कुरु देशाच्या पूर्वेकडील पहिला देश. ( भार० सभा० अ० २९ ).

**पूर्वपालि**–भारतीयुद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० उद्योग० अ० ४ ).

**पूर्ववर्वर**–पूर्वशक देशाच्या पूर्वेकडलि वर्वर ( भार० सभा० अ० ३० ).

**पूर्वमत्स्य**–सुपार्श्व देशाच्या पूर्वेकडील देश. येथें पांडवांच्या वेळेस विराटच राजा असला पाहिजे; कारण, पांडव अज्ञातवास करण्याकरितां ( न कळण्याजोगे राहण्याकरितां ) मत्स्यदेशीं गेले होते, असें भारतांत मुग्ध आहे; आणि मत्स्यदेश तर आणखी दोन, दक्षिणेकडे सहदेवाच्या विजयांत आहेत. तेव्हां विराटाचा मत्स्य देश कोणता म्हणावा ? हा विचार पडला, त्यांत मीं निश्चित केलें आहे, तें असें.–दक्षिणेकडील दोनही मत्स्यदेश, कुरुदेशास समीप असल्यामुळें, तेथें पांडवांचें अज्ञात राहणें, दूर असणाऱ्या, पूर्वमत्स्य देशाप्रमाणें निर्विघ्न शेवटास जाण्याचा संभव नाहीं, अतएव येथीलच राजा विराट माझ्या मतें आहे.

**पूर्वमित्रपद**–भारतवर्षीय तीर्थ.

**पूर्वशक**–अपर विदेहाच्या पूर्वेकडील देश ( भार० सभा० अ० ३० ).

**पूर्वसुह्म व प्रसुह्म**–हे दोनही देश पूर्वकिराताच्या पूर्वेस क्रमानें पांडवांच्या वेळेस असत. ( भार० सभा० अ० ३० ).

**पूर्वा**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

**पूर्वातिथि**–एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

**पूर्वाभाद्रपदा**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

**पूर्वाभिरामा**–भारतवर्षीय महानदी.

**पूर्वाषाढा**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

**पूर्वेंद्र**–पूर्व कल्पांतील पांच इंद्र पांडवरूपानें जन्मले होते ते ( पांडव श० पहा ).

**पूषा**–दक्षप्रजापतीच्या यज्ञांतील ऋत्विज. हा पूषा,स्वायंभुव मन्वंतरांतला कोणी एक ऋषि समजावा. द्वादशादित्यांतील आदित्य समजूं नये; कारण, द्वादशादित्य त्या मन्वंतरांत मुळींच नव्हते. सांप्रतच्या मन्वंतरांतले आहेत.

२–द्वादशादित्यांतील माघमासींचा सूर्य ( तपा श० पहा ).

**पृथा**–शूरसेन राजापासून कुंतिभोजानें दत्त घेतलेली कन्या, तिलाच पुढें कुंती नांव पडलें.

**पृथाश्व**–एक राजर्षि.

**पृथिवी**–पृथुराजाच्या संबंधानें भूमीस पडलेलें नांव.

**पृथिवींजय**–वरुणसभेंतील एक असुर.

**पृथु**–तामस मन्वंतरांतल्या सप्तर्षीतलि एक.

२–चक्षुर्मनूच्या पौत्राचा प्रपौत्र. अंग राजाचा पौत्र, वेनराजाचा पुत्र. वेन राजा अति दुष्ट होता, म्हणून ऋषींनीं त्यास शापदग्ध केलें. परंतु राज्यास अधि-

कारी पाहिजे, यास्तव त्याच्या मृत देहाचें मथन करून, यास उत्पन्न केलें. यासमागमेंच उत्पन्न झालेली अर्चि ना० कन्या, तीच ऋषींनीं यास स्त्री करून दिली. पृथु हा, वेनपुत्र म्हणून वैन्य नामांतरानें प्रसिद्ध असे ( भार० द्रोण० अ० ६९ ). यानें, पृथिवी सत्त्वरहित झालेली पूर्ववत् करावी म्हणून, शंकरानें दशचंद्र, व देवींनें शतचंद्र असे यास दोन खड्ग अनुक्रमें दिले. अग्नीनें अजगव धनुष्य दिलें, व वरुणानें अमृतमय छत्र दिलें, त्या योगानें यानें बलाढ्य होऊन, पृथिवी अतिशय विषम असलेली सम केली. नंतर दोहन करणारा, दोहनपात्र आणि वत्स, यांच्या कल्पना करून यानें भूमीचें दोहन केलें, असा लेख आढळतो; परंतु तो सूर्यवंशीय पृथूविषयीं असला पाहिजे, कारण, दैत्यांमध्यें, प्रऱ्हादाविषयीं वत्सकल्पना केली आहे, ती चाक्षुष मन्वंतरांत संभवत नाहीं. चालू मन्वंतरांत संभवत्ये. अस्तु, यास विजिताश्व अ० अंतर्धान, धूम्रकेश, हर्यक्ष, द्रविण आणि वृक, असे पांच पुत्र असत. पुढें यानें विजिताश्वास राज्य देऊन भार्येसहित अरण्यांत गमन केलें, व तेथें देहाचा त्याग केला ( भाग० ४ स्कं० अ० १५–२३ ).

३–(सू० वं०)इक्ष्वाकुकुलोत्पन्न ककुत्स्थ राजाचा पौत्र, सुयोधन अ० अनेना राजा त्याचा पुत्र. हा, वैवस्वत मन्वंतर आरंभल्यावर मोठा पराक्रमी, व धर्मसंस्थापक होऊन गेला. हा. पृथिवीवर सुधर्मा, शंखपद, केतुमान् आणि हिरण्यरोमा, असे पूर्वादिक दिशाक्रमानें चार भूदिग्पाल स्थापून आपण मध्यें राहात असे. त्याविषयीं असें, आढळतें–"चतुर्भिरेतैः पृथुनामधेयो नृपोभिषिक्तः प्रथमः पृथिव्याम्॥ गतेंतरे चाक्षुषनामधेये वैवस्वताख्ये च यदा प्रवृत्ते ॥१२॥ प्रजापतिः सोस्य चराचरस्य बभूव सूर्यान्वयवंशचिन्हः ॥" ( मत्स्य पु० अ० ८ ). यानें शत यज्ञ केले होते, व यास विश्वग, विश्वरंधि आणि विश्वराश्व, असे तीन पुत्र होते.

४–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

५–रामसेनेंतील एक नामांकित वानर ( वा० रा० युद्ध० स० ४७ ).

६–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय रुचक राजाच्या पांच पुत्रांतील चौथा.

७–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वत राजा, त्याच्या वृष्णि ना० पुत्राच्या वंशांतील वृष्णिपुत्र चित्ररथ राजा, त्याचा ज्येष्ठ पुत्र. हा, यादवांत मोठा पराक्रमी व कीर्तिमान् होता.

**पृथुग्रीव**–खर राक्षसाच्या अमात्यांतील एक. यास पृथुश्याम असेंहि नामांतर होतें.

**पृथुदर्भ**–औशीनर शिबीचा पुत्र बृहद्दर्भ तो.

**पृथुलाश्व**–एक राजर्षि.

**पृथुलाक्ष** ( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न अंगवंशीय चतुरंग राजाचा पुत्र. यास बृहद्रथ, बृहत्कर्मा, बृहद्भानु, आणि चंप, असे चार पुत्र होते.

**पृथुवेग**—एक राजर्षि.

**पृथुश्याम**—पृथुग्रीव तोच.

**पृथुश्रवा**—( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय महाभोज राजाचा प्रमुख पुत्र, याचा पुत्र धर्म.

२—द्वैतवनांत पांडवांसमागमें असणारा ऋषि.

**पृथुषेण**—ऋषभदेववंशीय भरतकुलोत्पन्न विभुजराजाचा पुत्र. यास आकूतिना० स्त्री व नक्त नावांचा पुत्र होता.

**पृथुसेन**—( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र बृहदिषु, तद्वंशीय पार राजाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ.

२—कर्णाच्या पुत्रांतील एक.

**पृथूदक**–भारतवर्षीय तीर्थ.

**पृश्नि**–स्वायंभुवमन्वंतरांतील सुतपा प्रजापतीची स्त्री. हीच कृष्णावतारीं देवकी झाली होती.

२–द्वादशादित्यांतील सविता आदित्याची स्त्री.

**पृश्निगर्भ**–एक विष्णूचा अवतार.

**पृषत्**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील, तद्वंशीय पांचालकुलोत्पन्न सोमक राजाचा पुत्र, याचा पुत्र द्रुपद राजा.

**पृषदश्व**–( सू० वं० ) वैवस्वत मनूचा पुत्र नभग, तद्वंशीय अंबरीषपुत्र विरूप राजा, त्याचा पुत्र. हा अंगिरा ऋषीच्या सेवेनें ब्राह्मण होऊन, त्याच गोत्राचा झाला, याचा पुत्र रथीतर होता.

**पृषध्र**–वैवस्वत मनूच्या दहा पुत्रांतील आठवा. हा वसिष्ठ ऋषीच्या आश्रमांत, कांहीं काळ सेवा करून राहात असतां धेनूंचें संरक्षण करणें, ही सेवा, याकडे होती. एकदां अंधाऱ्या रात्रीस गायी बांधल्या होत्या तेथें व्याघ्रानें प्रवेश केला त्यामुळें गाई ओरडूं लागल्या असें ऐकून यानें हातांत खड्ग घेऊन तेथें गमन केलें, आणि अंधारास्तव न दिसल्यामुळें, व्याघ्र असें जाणून एका धेनूचाच वध केला. त्या गोवधानें हा क्षात्रधर्मापासून भ्रष्ट होऊन, अरण्यांत हिंडत असतां,

दवाग्नींत दग्ध होऊन मरण पावला. ( भाग० ९ स्कं० अ० २ ).

२–अश्वत्थाम्यानें भारती युद्धांत मारिलेला पांडवपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० १५६ ).

**पैंगल**–यजुर्वेदोपनिषत्.

**पैंगलायन**–भृगुकुलोत्पन्न ऋषि. हे पिंगल ऋषींचे वंशज.

**पैंग्य**–पिंग ऋषीचा वंशज तो.

**पैजवन**–या नांवाचा कोणी शूद्र होता. यानें आपणास स्वाहाकार, वषट्कारादिक वेदमंत्रांचा अधिकार नाहीं म्हणून ऐंद्राग्नविधानानें कांहीं कर्म करुन ब्राह्मणांस दक्षिणा दिली होती ( भार० शांति० अ० ६० श्लोक ३७–३९ ).

**पैप्पल**–कश्यपकुलोत्पन्न एक, आणि वसिष्ठकुलोत्पन्न एक, असे दोन ऋषि.

**पैल**– स्वयंभुव मन्वंतरांतील स्वायंभूना० व्यासाचा संपूर्ण ऋग्वेद पढणारा शिष्य.

**श्लोक**–" सुमंतुनाथपैलेन तथा जैमिनिना च वै " अशी याज्ञवल्क्याची उक्ति आहे, म्हणून स्वयंभू व्यासाचा शिष्य पैलऋषि भिन्न असून, कृष्णद्वैपायनाचा भिन्न होय.

२–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० ) पहा.

३– ,, ( ३ भृगु श० ) पहा. हा पिली ऋषीचा वंशज म्हणून, यास हें नांव.

४–ऋक्शाखाध्ययन करणारा कृष्णद्वैपायन व्यासाचा शिष्य, हा वसु ऋषीचा पुत्र असून, पांडवांच्या राजसूय यज्ञांत होता ना० ऋत्विज झाला होता.

**पौंडव**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० ) पहा.

**पौंड्र**–पांडवांतील भीमसेनाच्या शंखाचें नांव.

**पौंड्रकवासुदेव**–पुंड्रदेशाचा राजा. याचें नांव वासुदेव असें होतें. पांडवांच्या वेळेस कृष्ण तोहि वासुदेव या नांवानें सर्व देशांत अतिप्रसिद्ध होता, तसाच आपली प्रसिद्धि असावी म्हणून हा, मत्सरानें कृष्णासारखींच सर्व चिन्हें धारण करी, व कृष्णाशीं अतिशय द्वेषानें वागे. यानें एकदां दूताबरोबर कृष्णास निरोप सांगून पाठविला कीं, खरा वासुदेव मी असून, तूं माझीं चिन्हें वागवितोस, हें नीट नाहीं, यास्तव तीं सत्वर टाकून मला शरण ये. तो निरोप दूतानें यादवांसमक्ष कृष्णास कळविला. त्यावरुन सर्व यादवांस हंसें आलें. इतक्यांत दूतास कृष्णानें सांगितलें कीं, परत जा, आणि तुझ्या राजास, मी तुझी शुद्धि कण्यास लवकरच येतों असें सांग. तो निरोप दूतानें यास येऊन कळवितांच, हा काशींत गेला, व काशी राजाशीं स्नेह होता म्हणून, त्यास हें वर्तमान कळवून त्यापांशीं राहिला. पुढें थोड्याच दिवसांनीं, यादवांस समागमें घेऊन, कृष्ण याकडे यावयास निघाला असतां, हा काशींत असल्याचें वर्तमान त्यास कळलें. त्यावरुन त्यानें काशीस जाऊन, सर्व द्वारें रोधिलीं. तें ऐकून, हा आपलें दोन अक्षौहिणी सैन्य व काशीराजाचें तीन अक्षौहिणी सैन्य घेऊन, त्यासहित बाहेर कृष्णासंमुख आला. त्या वेळेस यानें पीतांबर परिधान केलें असून, मकरकुंडलें व कृत्रिम गरुडध्वज, कृत्रिम कौस्तुभ, इ० धारण केलें होतें. तें प्रत्यक्ष पाहून तर, सर्व यादवांस फारच हंसूं आलें. सारांश, पुढें कृष्णाचें व याचें बरेंच भाषण होऊन, काशी राजासहित कृष्णानें यास मारलें, व द्वारकेस परत गमन केलें ( भाग० १० स्कं० अ० ६६ ).

**पौंड्रमात्स्यक**–भारतीययुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**पौदन्यपुरी**–सूर्यवंशीय अश्मक राजानें स्थापिलेली नगरी.

**पौर**–३ भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**पौरव**–विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक.

२–पूरुकुलोत्पन्न एक महा दानशूर राजा याचे वंशजांस पौरव असें नांव असें ( भार० द्रोण० अ० ५७ ).

३–अश्वत्थाम्यानें मारिलेला पांडपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० २०० ).

४–पांडवांनीं मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा. यास, दमन ना० पुत्र होता.

**पौरवी**–वसुदेवाच्या स्त्रियांतील एक.

२–युधिष्ठिराची स्त्री होती ती.

**पौरुकुत्स**–पुरुकुत्साचा पुत्र त्रसद्दस्यु तो.

**पौरुषेय**–ज्येष्ठ मासींच्या सूर्यसामागमें असणारा राक्षस. ( ५ शुक्र श० ) पहा.

**पौर्णमास**–एक ऋषि ( २ अगस्त्य श० ) पहा.

**पौलकायनि**–तृतीयार्थक अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**पौलमौलि**–एक ऋषि ( २ कश्यप श० पहा ).

**पौलस्त्य**–पुलस्त्य ऋषीचा पुत्र विश्रवा ऋषि तो.

२–एक ऋषि ( ३ भृगु श० पहा ).

३–एक ऋषि ( २ अगस्त्य श० पहा ).

**पौलह**–पुलह ऋषींचे वंशज.

**पौलि**–एक ऋषि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**पौलोम**–पुलोमेचे पुत्र. हे हिरण्यपुरांत राहत असत. यांस अर्जुनानें मारिलें.

२–दक्षिणसमुद्राकडील तीर्थवि० ( नारीतीर्थ श० पहा).

**पौलोमी**–द्वादशादित्यांतील शक्र ना० आदित्याची स्त्री.

ही पुलोमेची कन्या असावी; कारण ही, असुरकन्या असें ग्रंथांत फार आढळतें. "शक्रस्त्वमेव पौलोमी सीता स्वाहानलो भवान्" (अध्या० रा० अयो० स० १). हीच शची असें कोणी म्हणतात, परंतु ती चूक आहे.

**पौषजिति**–ब्रह्मर्षि (३ अंगिरा श० पहा).

**पौष्य**–सूर्यवंशीय पुष्प राजाचा पुत्र ध्रुवसंधि तो. याच्या स्त्रीनें, गुरुदक्षिणेनिमित्त आपल्या कानांतील दिव्य कुंडलें उत्तंक ऋषीस दिलीं होतीं.

**पौष्यायन**–एक ब्रह्मर्षि (भृगु श० पहा).

**प्रकाश**–तम ऋषीचा पुत्र, याचा पुत्र वागींद्र (वीतहव्य श० पहा).

**प्रकाशक**–रैवत मनूच्या पुत्रांत होता एक पुत्र तो.

**प्रगाथा**–एक ब्रह्मर्षि.

**प्रघस**–मारुतीनें मारिलेला रावणपक्षीय राक्षस (वा० रा० सुंदर० स० ४६).

२ सुग्रीवानें मारिलेला दुसरा एक राक्षस (वा० रा० युद्ध० स० ४३).

**प्रघसा**–अशोकवनिकेंतील सीतासंरक्षणास असलेली राक्षसी (वा० रा० सुंदर० स० २४).

**प्रघास**–रावणपक्षीय राक्षस.

**प्रघोष**–कृष्णापासून लक्ष्मणेस झालेल्या पुत्रांतील एक.

**प्रचंड**–विष्णूच्या आठ पार्षदांतील एक.

**प्रचिन्वान्**–(सो० वं०) पुरु राजाचा पौत्र, जनमेजयाचा पुत्र, याचा पुत्र प्रवीर.

**प्रचेतस्**–उत्तानपादवंशीय प्राचीनबर्हि राजास, शतद्रु अ० सवर्णा भार्येपासून झालेले दहा पुत्र. हे सर्व एका शीलाचे असून, तपेंकरून यानीं रुद्रास प्रसन्न केलें, तेथून लब्धमनोरथ झाल्यावर यांनीं पृथ्वी, आतिशय वृक्षांनीं व्याप्त झालेली पाहिली. म्हणून हे नेत्राग्नींनें वृक्षांस जाळूं लागले असतां, कंडुक ऋषीस प्रम्लोचा अप्सरेपासून झालेली मारीषा ना० कन्या, जिचें वृक्षांनीं पालन केलें होतें म्हणून, जिला वार्क्षी असें म्हणत असत, ती त्यानीं यांस दिली, व यांचा कोप शांत केला. असे हे समर्थ असत. त्या वार्क्षीपासून पुढें यास, चंद्रवती ना० कन्या, व दक्ष नांवाचा पुत्र झालेला प्राचेतस दक्ष या नांवानें प्रसिद्ध होता.

**प्रचेता**–वरुणास नांव आहे.

२–(सो० वं०) द्रुह्युकुलोत्पन्न दुर्मना राजाचा पुत्र. यास प्राचेतस नांवाचे शत पुत्र होते.

**प्रजंघ**–अंगदानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस (वा०रा० यु० स० ७५).

२–रामपक्षीय वानर. यानें संपाति इ० राक्षसांस मारिलें (वा० रा० युद्ध० स० ४३).

**प्रजन**–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न कुरु राजाच्या पांच पुत्रांतील कनिष्ठ.

**प्रजागरा**–एक अप्सरा.

**प्रजापति**–मुख्यत्वेंकरून ब्रह्मदेवास नांव.

२–संपूर्ण मरीच्यादिक ब्रह्ममानसपुत्र ते व त्यांचेही कश्यपादिक पुत्र ते.

३–वैवस्वत मन्वंतराच्या दुसऱ्या पर्ययांतील व्यास (व्यास श० पहा).

**प्रतपन**–नलानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस (वा० रा० युद्ध० स० ४३).

**प्रतर्दन**–(सो० वं०) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या काश्य ना० पौत्राच्या वंशांतील दिवोदास ना० राजा, त्याचा पुत्र. हा त्यास माधवीपासून झाला होता (३ गालव श० पहा). हा मोठा पराक्रमी असून, यानें त्या पराक्रमाच्या बळानें, द्युमान्, शत्रुजित्, कृतध्वज, कुवलयाश्व, अशीं चार नांवें संपादन केलीं होतीं. यास अलर्कप्रमुख कित्येक पुत्र होते. हा प्रतर्दन, काश्यकुलोत्पन्न असल्यामुळें, हा काशीपतीचा पुत्र असा यावर आरोप केलेला पुराणांत आढळतो; परंतु ती चूक आहे, असें मी बहुग्रंथतात्पर्य पाहून निश्चित केलें आहे.

२–काशीपुरीचा राजा सुदेव, त्याच्या सौदेव अ० दिवोदास ना० पुत्रास, भारद्वाज ऋषीच्या प्रसादानें झालेला पुत्र. हा झाल्यावर याच्या पित्यास पराकाष्ठेचा आनंद झाला. कांहीं कालानें हा मोठा होऊन, भारद्वाजाच्याच शिक्षेनें शस्त्रास्त्रांत निपुण झाला असतां, पित्यास पुसूं लागला कीं, आपणास राज्य इ० ऐश्वर्य कां नाहीं ? तेव्हां त्यानें पूर्ववृत्त सांगितलें कीं, वैवस्वत मनूचा पुत्र शर्याति राजा, त्याच्या, हैहय ना० पुत्राच्या वीतहव्य पुत्रानें माझें राज्य हरण केलें, त्यामुळें जीव बांचवून येथें मी राहिलों असून, त्याच्या पराभवार्थ तुला उत्पन्न केलें, तर आतां तुला कळेल तसें कर. याप्रमाणें पित्याचें वाक्य ऐकून, त्यास पराकाष्ठेचा क्रोध आला, व लागलेंच पित्यास वंदन करून निघाला, तो तत्काळ काशीस गेला, तेथें वीतहव्याशीं याचें मोठें युद्ध झालें, त्यांत त्याचे शतदि पुत्र यानें मारून त्याची सेना बहुतेक नष्ट केली. तें पाहून वीतहव्य तेथून पळाला, तो आपल्या सुकन्या ना० भगिनीचा पति च्यवन भार्गव, त्याच्या आश्र-

मांत येऊन, व प्रतर्दन पाठीस लागल्याचा वृत्तांत सांगून लपला. वीतहव्य पळत सुटतांच, प्रतर्दन हा त्यामागें लागून, तोंही भार्गवाश्रमीं येऊन पोहों-चला, व ऋषीस वंदन करून म्हणूं लागला कीं, येथें जो कोणी क्षत्रिय असेल, तो माझ्या स्वाधीन कृपा करून करावा, परंतु ऋषीनें याचा सत्कार करून सांगितलें, राजेंद्रा, येथें क्षत्रिय कोणीच नाहीं, आम्ही सर्व ब्राह्मणच आहों. त्यावरून हा, तसेंच असो असें म्हणून, ऋषीची आज्ञा घेऊन माघारा परतला ( वीतहव्य श० पहा ). सारांश, यानें पुनः पित्यास राज्यावर पूर्ववत् स्थापिलें. कालांतरानें पिता अरण्यांत तपार्थ गेला असतां, हाच राजा झाला. हा दान-शूरही इतका असे कीं, यानें आपला पुत्र देखील एकदां एक्या ब्राह्मणास दान केला ( भार० शांति० अ० २३५ ) व ( भार० अनु० अ० १३७ ).

कौषीतकी ना० उपनिषदांत, याचा एक पराक्रम-विषयक, व चातुर्यविषयक इतिहास असा आहे.— यानें सर्व भूमि हस्तगत करून, संपूर्ण राजे पादाक्रांत केल्यावर, याच्या मनांत आलें कीं, सुरलोक जिंकावा, म्हणून हा हस्तामध्यें धनुष्यबाण धारण करून, एक दूत समागमें घेऊन निघाला, तो इंद्रलोकीं गेला, आणि बाहेर आपण उभा राहून दूतास इंद्राकडे पाठवून कळविलें कीं, मी युद्धास आलों आहे, तर सत्वर युद्धास येऊन मला जिंकावें, किंवा हरलों असें म्हणावें. त्याप्रमाणें दूतानें जाऊन कळवितांच इंद्रास आश्चर्य झालेंच, तथापि देवसेना घेऊन इंद्र तेथें आला आणि पाहतो तर, हा एकटाच युद्धार्थ उभा आहे. त्यावरून तर अतिशयच आश्चर्य पावून त्यानें देवांस याशीं युद्धाची आज्ञा केली. तेव्हां देवांचें व याचें चांगलेंच युद्ध होऊन, सर्व देवांस यानें मूर्च्छित पाडिलें. तो याचा पराक्रम पाहून, इंद्र संतुष्ट हो-त्साता यास म्हणाला कीं, मी तुजवर प्रसन्न झालों आहे, वर माग. तें इंद्राचें भाषण ऐकतांच, यानें नम्र होत्साता, त्यास साष्टांग नमस्कार घातला. नंतर हस्त जोडून याप्रमाणें बोलूं लागला कीं, हे देवराज, तूं धन्य आहेस. मी रजोगुणानें युक्त होऊन, सुरलोक जिंकावा म्हणून आलों असून तुशीं युद्धही केलें, एवढा माझा अपराध असून, मी केवळ तुझा शत्रूच असतां, जेव्हां तूं उदार बुद्धीनें वर द्यावयास सिद्ध झालास, तस्मात् देव सत्त्वगुणी आहेत असें जें मीं ऐकिलें होतें, तें सत्य खरेंच. अस्तु, आतां ज्या अर्थीं तूं मला वर देणार, त्या अर्थीं या सृष्टींत वर ( श्रेष्ठ ) काय तें मला कळत नाहीं म्हणून, तूंच विचार करून तें मला दे. या चातुर्ययुक्त भाषणानें इंद्रास संतोष तर झालाच; परंतु सृष्टींत श्रेष्ठ एक ब्रह्मविद्या, ती यास मी कशी द्यावी, तें संकट त्यास पडलें; कारण ब्रह्म-विद्या जर मी यास द्यावी, तर हा मशीं शत्रुभावानें युद्धास आल्यामुळें, मुमुक्षु नाहीं. बरें न द्यावी, तर मी माग असें म्हटलें असून, मलाच आणखी विचार करून दे, असें मुमुक्षुसारखें म्हणतो. सारांश, इंद्रानें आपल्या मनाशीं त्या गोष्टींचा बहुत विचार करून, शेवटीं यास ब्रह्मविद्या दिली, व कृतार्थ करून मार्गस्थ करितांच, हा, काशीपुरीस परत आला. हा राजा दाशरथि रामाचा परम मित्र होता.

**प्रताप**–जयद्रथमित्र एक राजा ( ३ जयद्रथ श० पहा ).

**प्रति**–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न सुहोत्रपुत्र कुश, त्याचा पुत्र. याचा पुत्र संजय राजा.

**प्रतिबाहु**–( सो० वं० ) श्वफल्काच्या तेरा पुत्रांतील कनिष्ठ.

२–कृष्णाचा प्रपौत्र, याचा पुत्र सुबाहु

**प्रतिभानु**–कृष्णास सत्यभामेच्या ठायीं झालेल्या पुत्रां-तलि एक.

**प्रतिमत्स्य** अ० **मत्स्य**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**प्रतिरूपा**–आग्नींध्रपुत्र किंपुरुष, त्याची स्त्री, व मेरूची कन्या.

**प्रतिविंध्य**–पंडुपुत्र युधिष्ठिरापासून, द्रौपदीस झालेला पुत्र. हा, शत्रुप्रहरणाविषयीं, विंध्यपर्वतासारखा अचल असा जन्मकालीं दिसला म्हणून यास हें नांव होतें. युद्धकाळीं याच्या रथाचे अश्व, संपूर्ण अंग शुभ्रवर्णाचे व कंठ मात्र नीलवर्णाचा अशा जातीचे असत ( भार० द्रोण० अ० २३ ). हा संपूर्ण भारती युद्ध समाप्त होईपर्यंत वांचला होता, परंतु अठराव्या दिवशीं हा, शिबिरांत कित्येक वीरांसहित निद्रित असतां, अश्वत्थाम्यानें यास मारिलें.

२–शाकलदेशाधिपति दुर्योधनपक्षीय भारती युद्धां-तील राजा.

**प्रतिव्योम**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वय-संभूत वत्सवृद्ध राजाचा पुत्र, याचा पुत्र भानु.

**प्रतिश्रुत**–वसुदेवास शांतिदेवेपासून झालेला पुत्र.

**प्रतिष्ठानपुर**–इलापुत्र पुरूरवा राजा, त्याची नगरी.

**प्रतिहर्ता**–[illegible] भरतान्वयसंभूत प्रतीह राजास

सुवर्चला स्त्रीपासून झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. हा, यज्ञकर्मांत अतिनिपुण असे, व यास स्तुति ना० भार्येपासून, अज आणि भूमा, असे दोन पुत्र झाले असत.

**प्रतीक**–( सू० वं० नृगकुलोत्पन्न वसुराजाचा पुत्र, याचा पुत्र ओघवान्.

**प्रतीकाश्व**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वय-संभूत भानुमान् अ० ध्रुवाश्व राजाचा पुत्र. याचा पुत्र सुप्रतीक.

**प्रतींधक**–प्रदीपक शब्द पहा.

**प्रतीप**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढान्वयसंभूत कुरुपुत्र जन्हु, तद्वंशीय दिलीप राजाचा पुत्र. यास बरीच वृद्धावस्था प्राप्त झाली होती तरी संतति नव्हती म्हणून यानें पुत्रप्राप्त्यर्थ, गंगाद्वारीं जाऊन तप आरं-भिलें. कांहीं कालानें गंगा, यास प्रत्यक्ष होऊन, याच्या दक्षिणांकावर येऊन बसली तें पाहून हा गंगेस म्हणाला कीं, तूं माझी स्नुषा व्हावेंस अशी माझी इच्छा आहे. तेव्हां गंगा तथास्तु म्हणून अंतर्धान पावतांच, हा स्वदेशीं आला. कांहीं कालानें यास, **देवापि, शंतनु** आणि **बाल्हीक,** असे तीन पुत्र झाले. ते मोठे झाल्यावर, याची शंतनूवर अतिशय प्रीति होती म्हणून, यानें त्यास सांगून ठेविलें होतें कीं, तूं जेव्हां कधीं अरण्यांत जाशील, तेव्हां जी कोणी स्त्री, तुला होऊन वरील तिला नाहीं न म्हणतां स्वीकार. इतकें सांगितल्यावर हा राजा अल्पच काळानें मरण पावला. पुढें शंतनूस गंगेनें वरिलें ( शंतनु श० पहा ).

**प्रतीह**–ऋषभदेववंशीय भरतकुलोत्पन्न परमेष्ठि राजास सुवर्चलेपासून झालेला पुत्र. यासही सुवर्चलाच नांवाची स्त्री होती आणि तिजपासून प्रतिहर्ता, प्रस्तोता आणि उद्गाता, असे तीन पुत्र झाले होते.

**प्रतोष**–देववि० ( तुषित श० पहा ).

**प्रत्यक्स्रोता**–भारतवर्षीय नदी.

**प्रत्यग्र**( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न वसुराजा ( उपरिचर वसु ) त्याच्या पुत्रांतील एक. यास सत्यश्रवा असें नामांतर होतें.

**प्रत्यूष**–एक वसु ( अष्टवसु श० पहा ).

**प्रत्यूह**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**प्रदीपक**–( विदे० वं० ) मरु ना० जनकाचा पुत्र, यास वाल्मीकी रामायणांत प्रतींधक म्हटलें असून, कृति-रथ नांवाचा पुत्र होता.

**प्रदोष**–उत्तानपादवंशीय पुष्पार्णास दोषा ना० दुसऱ्या स्त्रीपासून, झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.

**प्रद्युम्न**–चक्षुर्मनूस नड्वलेपासून झालेल्या अकरा पुत्रांतील एक. यास सुद्युम्न असेंही नामांतर होतें.

२–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न कृष्णास रुक्मिणीपासून झालेला प्रथम पुत्र.हा महारथी होता.(भाग०१०स्कं० अ० ५५ ). हा, मदनच जन्मास आला असून, याच्या हातून शंकरासुराचा मृत्यु होता. जेव्हां शंब-रानें ऐकिलें कीं,द्वारकेंत मदनाचें जन्म झालें,तेव्हां तो गुप्तरूपानें तेथें आला, व यास दहा दिवस होण्या-पूर्वीच समुद्रांत नेऊन टाकून आपण. स्वस्थळीं निघून गेला. यास समुद्रांत टाकिलें असतां मत्स्यानें गिळिलें. तोच मत्स्य कांहीं काळानें धीवरास सांपडून, त्यानें शंबरासुरास अर्पण केला. शंबरानें सूदाच्या ( पाक कर्त्याच्या ) स्वाधीन करून, त्याचा पाक करण्यास सांगितलें. तेव्हां सूदानें तो पाकार्थ चिरला, इत-क्यांत त्यांतून एक दिव्य बालक निघाला. असें पाहून मायावती तेथें होती तिला त्यानें तो दाखविला ( मायावती, मदनाची अनादि स्त्री, रति ती ). ही शंबरासुराच्या वधार्थ मदन येऊन आपणास भेटेल, अशा आशयानें, त्याच्या घरीं पाळलेली कन्या या नात्यानें राहिली होती. तिनें त्या बालकास पाह-तांच हर्षयुक्त होऊन आपणाजवळ ठेविलें, व मत्स्या-चा पाक सूदास करण्यास सांगितल्यावर, बालकास घेऊन, आपल्या अंतःपुरांत प्रवेशली, इतक्यांत तेथें नारद येऊन, म्हणूं लागला कीं, तुझा भर्ता मदन, जो पूर्वी शंकरानें दग्ध केला, तोच रुक्मिणीच्या उदरीं जन्मास येऊन, शंबराच्या वधार्थ येथें आला आहे, तर तूं याचें चांगलें पालन कर. इतकें सांगून नारद गेला असतां, मायावतीस (रतीस) हर्ष झाला; कारण ती याचीच वाट पाहत तेथें राहिली होती.

मायावतीनें, त्या बालकाची उत्तम व्यवस्था ठेवून वाढविलें असतां, तो बराच मोठा झाला, व आपल्या सौंदर्यानें त्यानें सर्वांचीं मनें हरण केलीं, त्यांत रतीचेंही हरण केल्यामुळें, ती त्याकडे काम-दृष्टीनें पाहूंलागली. त्यावरून तिला यानें कांहीं प्रश्न केले, त्यांचीं उत्तरें तिनें त्यास देऊन जन्मांतरींचें स्मरण दिलें. तेणेंकरून त्याचें समाधान होऊन, अल्पच काळांत त्यानें शंबराचा वध केला. नंतर रतीनें त्याच्या वयास शोभेल असें रूप धारण करून, त्यास घेऊन निघाली, व द्वारकेकडे येऊं लागली. हें वर्तमान नारदानें कृष्ण व रुक्मिणी इ०कांस कळ-

विलें तों, रतीस घेऊन प्रद्युम्न तेथें प्राप्त झाला, त्यास पाहून सर्वांस मोठा आनंद झाला; कारण गेलेला पुत्र येण्याचा संभव नसून तो आला.

याचा मातुल ( मामा ) रुक्मि, त्याची कन्या रुक्मवती तिला, तिच्या स्वयंवरांत यानें हरण करून आणलेली, ती यास दुसरी स्त्री होती ( भाग० दशम अ० ६१ ). व तिला यांपासून अनिरुद्ध नांवाचा पुत्र झाला होता ( भाग १० स्कं० अ० ९० ). प्रद्युम्न हा धनुर्विद्येविषयीं अर्जुनाचा शिष्य होता. कौरवपांडवांचें युद्ध समाप्त झाल्यावर, त्यांस राज्य प्राप्त झालें असतां, त्यांनीं त्याचा बराच उपभोग घेतला. पुढें प्रभासक्षेत्रीं सर्व यादव मरण पावले, त्यांत हा मरण पावला, व रतीसहवर्तमान देवलोकास प्राप्त झाला.

**प्रद्योत**–रिपुंजय राजास मारणाऱ्या शुनक प्रधानाचा पुत्र, हाच पुढें, सोमवंशाचें राज्य बुडून राजा झाला होता.

**प्रद्वेशी**–दीर्घतमा ऋषीची स्त्री. दीर्घतमा ऋषि अंध असल्यामुळें ही, पुनर्विवाह करणार होती. परंतु त्यानें तिला शाप दिल्यामुळें उगीच राहिली.

**प्रधान**–एक राजर्षि. याची कन्या सुलभा नामेंकरून, ब्रह्मनिष्ठत्वानें प्रसिद्ध होती.

**प्रपतन**–प्रयागांतील तीर्थ.

**प्रबल**–कृष्णास लक्ष्मणेपासून झालेला पुत्र.

**प्रबालक**–एक किन्नरवि०.

**प्रबुद्ध**–ऋषभ देवाच्या नऊ सिद्ध पुत्रांतील एक.

**प्रभ**–रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० उत्तर० स० ३६ ).

**प्रभंजन**–वायूस नांव.

२–मणिपुरीचा राजा. यास रुद्राचें असें वरप्रदान होतें कीं, तुझ्या वंशांत एकच अपत्य होऊन, तें राज्य चालवीत जाईल. त्या नियमाप्रमाणें याच्या वंशांत चित्रवाहनापर्यंत राजे झाले. पुढें यास पुत्र व्हावा, तो न होतां चित्रांगदा नांवाची कन्या झाली, ती यानें पुत्रिकाधर्मानें अर्जुनास दिली. ( पुत्रिकाधर्म म्हणजे तिला पुत्र होईल तो आपण घेणें ) व त्यांपासून तिला झालेला बभ्रुवाहन पुत्र आपण घेऊन, त्यास यानें मणिपूरचें राज्य दिलें.

**प्रभद्रक**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजे.

**प्रभद्रा**–कर्णपुत्र वृषकेतूची स्त्री. हिला भद्रावती असेंही म्हणत ( जैमि० अश्व० अ० ६२ ).

**प्रभव**–बारा भार्गवदेवांतील एक.

**प्रभा**–उत्तानपादवंशीय पुष्पार्णाच्या दोन स्त्रियांतलि पहिली.

२–राहूची कन्या, व विवस्वान् आदित्याच्या स्त्रियांतील एक. ही संज्ञेची सपत्नी ( सवत ) असून अनपत्य होती.

३–( सू० वं० ) सगर राजा, त्याच्या सुमति ना० ज्येष्ठ स्त्रीस नामांतर.

**प्रभानु**–कृष्णास सत्यभामेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**प्रभावती**–स्वयंप्रभेस नामांतर ( भार० वन० अ० २८२ ).

२–यौवनाश्व राजाची स्त्री.

३–हंसध्वजपुत्र सुधन्व्याची स्त्री.

**प्रभास**–एक वसु ( अष्टवसु श० पहा ). यास आंगिरसी ना० स्त्री, व विश्वकर्मा पुत्र होता.

२–या नांवाचें एक तीर्थ, व क्षेत्र. अर्जुन तीर्थयात्रा करीत, मणिपुराहून गोकर्णास जाऊन येथें आला असतां, कृष्णाची व त्याची येथें भेट झाली. पुढें रैवतक पर्वतावर कांहीं काळ राहून, सुभद्रेचें पाणिग्रहण करून, इंद्रप्रस्थास गेला. हें तीर्थ मोठें पुण्यरूप असे ( भार० शल्य० अ० ३५ ).

**प्रभु**–बारा साध्यदेवांतील एक.

२–ब्रह्मसभेंतील एक ऋषि.

**प्रमतक**–जनमेजयाच्या सर्पसत्रांतील सदस्य ( सभासद ).

**प्रमति**–वागींद्राचा पुत्र. यास, घृताची अप्सरेपासून रुरु ना० पुत्र झाला होता.

२–चाक्षुष मन्वंतराच्या शेवटल्या कलियुगांत झालेला विष्णूचा अवतार ( मत्स्य० अ० १४३ ).

३–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न प्रांशु राजाचा पुत्र. याचा पुत्र खनित्र.

४–बिभीषणाच्या चार राक्षस अमात्यांतील एक ( वा० रा० युद्ध० स० ३७ ).

**प्रमथ**–निशाचरजातीय रुद्रगण ( भार० अनुशा० अ० १३१ ).

**प्रमंथु**–ऋषभदेववंशीय वीरव्रत राजास, भोजेपासून झालेल्या दोन पुत्रांतील कनिष्ठ.

**प्रमद्वरा**–विश्वावसुगंधर्वास मेनकेपासून झालेली कन्या. हिचें स्थूलकेश ऋषीनें पालन करून, पुढें हिला, रुरु ना० ऋषीस विवाह करून दिलें होतें ( २ रुरु श० पहा ).

**प्रमाणकोटि**–भागीरथीसंबंधीं तीर्थ. यांत कौरवांनीं, भीमास विष चारून बुडविलें होतें.

**प्रमाथ-प्रमाथिं**-दूषणाच्या राक्षस अमात्यांतील एक. यास रामानें मारिलें होतें.

२-रामसेनेंतील एक वानर.

**प्रमाथि**-बलाका राक्षसीस विश्रवा ऋषीपासून झालेला पुत्र. दूषणाचा भ्राता. यास नीलानें मारिलें होतें (भार० वन० अ० २८६).

**प्रमाथिनी**-एक अप्सरा.

**प्रमीला**-स्त्रीराज्यदेशाची स्वामिणी. हिनें पांडवांचा श्यामकर्ण अश्व धरून, अर्जुनाशीं युद्ध केलें; परंतु अर्जुनानें तिला जिंकून, ती अश्व देईना म्हणून मारूं लागला, त्या काळीं अशी आकाशवाणी झाली कीं, तूं हिला मारण्यास समर्थ होणार नाहींस, तर तूं हिशीं पाणिग्रहण करून अश्व घे. त्यावरून अर्जुनानें तिशीं विवाह केला (जैमि० अश्वमे० अ० २१-२२).

**प्रमुचि**-दाशरथि रामास, अयोध्येंत भेटण्यास आलेल्या ऋषींतील एक (वा० रा० उत्तर० स० १).

**प्रमोद**-कंठापासून झालेला ब्रह्मपुत्र. यास हर्ष असेंही म्हटलें आहे.

२-(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न दृढाश्व राजाचा पुत्र. याचा पुत्र हर्यश्व.

**प्रमोदन**-एक ब्रह्मर्षि (वा० रा० उत्तर० स० ९०).

**प्रम्लोचा**-एक चालू मन्वंतरापूर्वीची अप्सरा.

२-चालू मन्वंतरांतील एक अप्सरा. ही श्रावणमासींच्या सूर्यासमागमें संचार करण्यास प्रतिवर्षी असते (५ नभ श० पहा).

**प्रयाग**-भागीरथी आणि यमुना यांचें संगमस्थान, व तेथील क्षेत्र तें.

**प्रयुत**-मुनीच्या देवगंधर्वपुत्रांतील एक.

**प्ररुज**-रावणपक्षीय राक्षस (भार० वन० अ० २८५).

**प्रलंब**-दनुपुत्र दानवांतील एक.

२-एक असुर, कृष्ण आणि बलराम, यांच्या नाशार्थ गोकुळांत येऊन, गोपवेषानें गोपाळांत मिसळला होता. पुढें खेळतां खेळतां, बलरामास पाठीवर घेऊन, एकाएकीं पळूं लागला. तें कपट बलरामानें तत्काळ जाणलें, व त्याचा वध केला (भाग० १० स्कं० अ० १८).

**प्रलंबदेश**-भारतवर्षीय देश (वा० रा० अयो०स०६८).

**प्रलंबायन**-ब्रह्मर्षि (३ वसिष्ठ श० पहा).

**प्रलंबासुर**-प्रलंब शब्द पहा.

**प्रलयमेघ**-मेघ (१ श० पहा).

**प्रवरा**-भारतवर्षीय नदी.

**प्रवर्षण**-हा पर्वत आनर्तदेशीं द्वारकेसमीप असावा; कारण जरासंधाच्या भयानें एकदां राम आणि कृष्ण, याच्यावर लपून राहिले होते, व त्यानें यास अग्नि लावून गमन केल्यावर, उभयतांहीं त्यावरून उड्या टाकून द्वारकेंत शिरले होते.

२-किष्किंधेसमीपचा एक पर्वत (३ माल्यवान् श० पहा).

**प्रवहण**-उत्तम मन्वंतरांतल्या सप्तर्षींत होता एक ऋषि तो.

**प्रवीर**-(सो० वं०) आयुपुत्र नहुष राजा, तत्कुलोत्पन्न पूरुवंशीय प्रचिन्वान् राजाचा पुत्र, याचा पुत्र नमस्यु राजा.

२-हरिश्चंद्रराजास, विकत घेणारा काशींतील चांडाल, यास वीरबाहु हें प्रसिद्ध नांव होतें.

३-नीलध्वज राजाचा पुत्र.

**प्रवेणी**-काम्यकवनाच्या दक्षिणेस कण्वाश्रमासमीपची नदी.

**प्रशमी**-एक अप्सरा.

**प्रशस्ता**-भारतवर्षीय नदी.

**प्रश्न**-अथर्वणवेदोपनिषत्.

**प्रश्रय**-स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषीस ऱ्ही ना० भार्येपासून झालेला पुत्र.

**प्रश्रवण**-भारतवर्षीय तीर्थ.

**प्रश्रुत**-प्रसुश्रुत शब्द पहा.

**प्रसन्न**-(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कृताश्व अ० कृशाश्व राजाचा पुत्र, यास श्येनजित् हें नामांतर असून, पुत्र युवनाश्व होता.

**प्रसभ**-रामसेनेंतील वानर (वा० रा० युद्ध० स० ४२).

**प्रसाद**-स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषीस मैत्री स्त्रीपासून झालेला पुत्र.

**प्रसुश्रुत**-(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयसंभूत मरु राजाचा पुत्र, यास प्रश्रुत असें नामांतर होतें, व पुत्र संधि या नांवाचा राजा होता.

**प्रसूति**-स्वायंभूमनूच्या तीन कन्यांतील एक, दक्षप्रजापतीची स्त्री.

**प्रसृति**-स्वारोचिष मनूच्या पुत्रांतील एक.

**प्रसेन**-(सो० वं०) यदुकुलोत्पन्न सात्वत पुत्र वृष्णि, तद्वंशीय निम्न राजाचा दुसरा पुत्र, सत्राजित् राजाचा कनिष्ठ भ्राता.

२-सात्यकीनें मारिलेला कर्णाच्या पुत्रांतील एक. वृषसेनाचा कनिष्ठ भ्राता (भार० कर्ण० अ० ८२).

**प्रसेनजित**–एक प्रख्यात राजर्षि ( भार० शांति० अ० २३५ ).

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयसंभूत विश्वस राजाचा पुत्र. याचा पुत्र तक्षक राजा.

३–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयसंभूत लांगल राजाचा पुत्र. याचा पुत्र क्षुद्रक राजा.

४–जमदग्नीचा श्वशुर जो रेणु राजा, त्यास नामांतर.

**प्रस्कण्व**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्वपुत्र ऋतेयु राजा, त्याच्या अप्रतिरथ ना० पौत्राचा प्रपौत्र, कण्वाचा पौत्र, व मेधातिथीचा पुत्र. हे सर्व ब्राह्मण झाले.

**प्रस्ताव**–ऋषभदेववंशीय भूमा राजास देवकुल्येपासून झालेला पुत्र. यास नियुत्सा ना० स्त्रीपासून विभु नांवाचा पुत्र झाला होता.

**प्रस्तोता**–(प्रियव्रत वं०) ऋषभदेवकुलोत्पन्न प्रतीह राजास सुवर्चलेपासून झालेल्या तीन पुत्रांतील मध्यम.

**प्रस्थल**–वाहीक देशसंबंधीं देशवि० ( वा० रा० किष्किं० स० ४३ ). ( भार० कर्ण० अ० ४४ श्लोक ४७ ).

**प्रस्रवण**–जनस्थानाच्या दक्षिणेकडील पर्वत ( वा० रा० अर० स० ६४ ).

**प्रस्तुत**–गरुडानें मारिलेला दैत्यवि०

**प्रहरण**–कृष्णास भद्रेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**प्रहस्त**–सुमाली राक्षसास, केतुमतीपासून झालेल्या दहा पुत्रांतील ज्येष्ठ. हा रावणाचा मातुल ( मामा ) होय ( वा० रा० उत्तर० स० ११ ). रावण बलाढ्य झाल्यावर, त्याच्या तृतीयांश सेनेचा हा अधिपति होऊन, मुख्य प्रधान झाला ( वा० रा० सुंदर० स० ४९ ). हा, निरंतर रावणासमागमें असे, व रामरावणयुद्धाच्या पांचव्या दिवशीं नरांतक, कुंभहनु, महानाद आणि समुन्नत, या चौघांसहित युद्धार्थ जाऊन, ते मेल्यावर याचें नील वानराशीं घोर युद्ध झालें, व त्यांत हा, त्याच्या हातून मरण पावला ( वा० रा० युद्ध० स० ५७–५८ ).

२–विश्रवा ऋषीस पुष्पोत्कटेपासून झालेला पुत्र. हाही रामरावणयुद्धांतच मरण पावला.

**प्रहास**–वरुणाचा मंत्री ( वा० रा० उत्तर० स० २३ ).

**प्रहेति**–राक्षसांचा मूळ पुरुष ( वा० रा० उत्तर० स० ४ ). याचा कनिष्ठ भ्राता हेति ना० राक्षस.

२–वैशाखमासींच्या सूर्यासमागमें असणारा राक्षस ( २ माधव श० पहा. ) याचा ब्रह्मघाता ना० पुत्र, वैश्रवणाचा सेवक होय.

३–वृत्रासुराचा अनुचर राक्षस.

**प्रऱ्हाद**–हिरण्यकशिपूस कयाधूपासून झालेल्या चार पुत्रांतील ज्येष्ठ. हा गर्भामध्यें असतांच भगवन्निष्ठ झाला होता ( कयाधू श० पहा ). हा, जन्म दिवसापासून, विष्णूचा ( व्यापक परमात्म्याचा ) उपासक असे. त्यामुळें हिरण्यकशिपूनें याचा बहुत छळ केला. शेवटीं नृसिंहानें हिरण्यकशिपूस मारून याचें संरक्षण केलें ( भाग० ७ स्कं० ). हा, चाक्षुष मन्वंतरांत दैत्यदानवांचा अधिपति असून, यास आयुष्मान, शिबि बाष्कल, विरोचन, कुंभ, निकुंभ, इ० पुत्र होते.

**प्रल्हाद**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**प्रज्ञाचक्षु**–अंध असून केवळ बुद्धीनेंच जाणणारा म्हणून हें नांव धृतराष्ट्रास होतें.

**प्राक्श्रृंगवान्**–गालववंशोत्पन्न ऋषि ( कुणिर्गर्ग श० ) पहा.

**प्रागाथ**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा.)

**प्राग्ज्योतिषपुर**–शाकल देशाच्या उत्तरेस देश व पुरवि० ( मूळांत शाकलद्वीप असें म्हटलें आहे ). परंतु तें द्वीपच असें समजूं नये. येथें पांडवांच्या वेळेस नरकासुराचा पुत्र भगदत्त राजा रहात असे ( भार० सभा० अ० २६ ).

२–मद्रदेशाधिपति शल्य राजा, त्याचें नगर. हें शाकल नगराहून प्रायः भिन्न असावें ( भार० उद्योग० अ० ५५ श्लोक ६३ ).

**प्राग्रायण**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा. )

**प्राग्वटपुर**–कुटिकोष्ठिका नदीसमीप असणारें नगर ( वा० रा० अयो० स० ७१ ).

**प्राचीतत्**–( सो० वं० ) पूरुपुत्र जनमेजय, त्याच्या प्रचिन्वान् पुत्रासच हें नांव.

**प्राचीनगर्भ**–प्रथमार्थक सारस्वत ऋषीसच नामांतर.

**प्राचीनबर्हि**–स्वायंभुव मन्वंतरांतील एक राजा. दक्ष-प्रजापतीनें यज्ञ केला, व त्यांत सतीचा अपमान होऊन तिनें देह त्यागिला, त्या वेळेस हा राजा भरत-खंडाधिपति होता ( १ दक्ष श० पहा).

२–उत्तानपादवंशीय हविर्धान राजास हविर्धानीपासून झालेला बर्हिषद ना० पुत्र तो. यास, शतद्रुती अ० सवर्णा ना० समुद्रकन्या स्त्रीपासून, प्रचेतस संज्ञक दहा पुत्र झाले होते. दक्ष म्हणून राजा, ज्यास प्राचेतस दक्ष म्हणतात, तो या राजाचा पौत्र होता.

**प्राचेतस**–वाल्मीकिऋषीस नांव ( भाग० ९ स्कं० अ० ११ ).

२-( सो० वं० ) द्रुह्युकुलोत्पन्न प्रचेता राजा, त्याच्या शतपुत्रांस नांव. हे उत्तरेकडे अधिपति झाले.

**प्राचेतसदक्ष**-द्वितीयार्थक प्राचीनबर्हिराजाचा पौत्र. दहा प्रचेत्यांस, मारीषा अ० वार्क्षी तिच्या ठायीं झालेला पुत्र. यास कन्या ६० होत्या व त्या त्यानें कोणास किती दिल्या त्याविषयीं ( ५ दश श० )पहा.

**प्राचेता**-एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० ) पहा. हा प्रायः वाल्मीकिच असेल.

**प्राचेय**-ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० ) पहा.

**प्राण**-स्वायंभुव मन्वंतरांतील भृगुऋषीचा पौत्र, विधाता ऋषीचा पुत्र, यास पुत्र वेदशिरा होता.

२-स्वारोचिष मन्वंतरांतल्या सप्तर्षीतलि एक.

३-आंगिरस देवांतील चालू मन्वंतरांतील एक देव.

४-देववि० ( साध्यदेव श० ) पहा.

५-अष्टवसूंतील धरवसूचा पुत्र. याची माता मनोहरा.

६-शरीरस्थ पंचप्राणांतील पहिला.

**प्राणरोध**-ब्राह्मण असून कुत्रें व गाढव पाळणारा, तसाच क्षात्रिय किंवा वैश्य असून, विहित कर्मावांचून मृगयाद्वारा मृगहिंसा करणारा, त्यास प्राप्त होतो नरक तो.

**प्राणाग्निहोत्र**-मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**प्रातः-प्रातःकाल**-उत्तानपादवंशीय पुष्पार्णास प्रभा ना० ज्येष्ठ स्त्रीपासून, झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.

**प्रातिकामि**-दुर्योधनाचा सूत ( सारथि ). हा, द्रौपदीस सभेंत चल म्हणून दुर्योधनाच्या सांगण्यावरून बोलावण्यास द्यूतप्रसंगीं गेला होता.

**प्रातीप**-प्रतीप राजाचे पुत्र देवापी, शंतनु, बाल्हीक, तो प्रत्येक.

**प्राद्युम्नि**-प्रद्युम्नपुत्र अनिरुद्ध तो.

**प्राधा**-चालू मन्वंतरांतील कश्यपऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक. हिजपासून अप्सरा व गंधर्व झाले. त्यांत अप्सरांचीं नांवें अशीं.—**अनवद्या, मनु, वंशा, असुरा, मार्गणप्रिया, अरूपा, सुभगा, भासी, अलंबुषा, मिश्रकेशी, विद्युत्पर्णा, तिलोत्तमा, अरुणा, रक्षिता, रंभा, मनोरमा, केशिनी, सुबाहु, सुरता, सुरजा, सुप्रिया, उर्वशी, पूर्वचित्ति, सहजन्या, मेनका, विश्वाचि, घृताची, अनुचाना, चित्रसेना, शुचिस्मिता,** आणि **चारुनेत्रा.** गंधर्वांचीं नांवें ( २ देवगंधर्व श० पहा ).

**प्राप्ति**-धर्मपुत्र शमाची स्त्री

२-जरासंधराजाची कन्या, कंसाची दुसरी स्त्री.

**प्रावहि**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**प्रावारकर्ण**-हिमवान् पर्वतावर राहणारा उलूकवि० ( १ इंद्रद्युम्न श० पहा ).

**प्रावृषदेश**-भारतवर्षीय देश.

**प्राचेपि**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**प्रांशु**-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न वत्सप्रीति राजाचा पुत्र. याचा पुत्र प्रमति राजा.

**प्रियमेध**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, त्याच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ. हा, व याची संतति तपानें ब्राह्मण झाली.

**प्रियमेलक**-भारतवर्षीय तीर्थ व क्षेत्र.

**प्रियव्रत**-स्वायंभूमनूस, अनंती अ० शतरूपा, तिच्याठायीं झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. उत्तानपाद राजाचा ज्येष्ठ भ्राता. यास विश्वकर्म्याची कन्या बर्हिष्मती ती स्त्री असून, तिच्याठायीं यापासून, **आग्नीध्र इध्मजिव्ह, यज्ञबाहु, महावीर, हिरण्यरेता, घृतपृष्ठ, सवन, मेधातिथि, वीतिहोत्र, कवि,** असे दहा पुत्र आणि **ऊर्जस्वती** नांवाची एक कन्या, अशीं अपत्यें झालीं होतीं. त्यांत कन्या, कविपुत्र उशना, त्यास दिली होती ( तो कवि स्वायंभूमन्वंतरांतील भृगुपुत्र समजावा ). आतां दहा पुत्र होते त्यांत, महावीर, सवन आणि कवि, हे तिघे विरक्त असल्यामुळें, त्यांनीं दारपरिग्रह न करतां, परमहंस होऊन अरण्यांत गमन केलें. तेव्हां राहिलेल्या सात पुत्रांस प्रियव्रतानें पृथिवीचीं जीं सप्तमहाद्वीपें त्यांचें एकेकास आधिपत्य दिलें. तें असें—**जंबुद्वीपाचें** आग्नीध्रास, **प्लक्षद्वीपाचें** इध्मजिव्हास, **शाल्मलीद्वीपाचें** यज्ञबाहूस, **कुशद्वीपाचें** हिरण्यरेत्यास **क्रौंचद्वीपाचें** घृतपृष्ठास, **शाकद्वीपाचें** मेधातिथीस आणि **पुष्करद्वीपाचें** वीतिहोत्रास. प्रियव्रतास दुसरी एक स्त्री होती ( नांव आढळत नाहीं ). तिचेठायीं **उत्तम, तामस,** आणि **रैवत** असे तीन महासमर्थ पुत्र झालेले, पहिलें स्वायंभुव आणि दुसरें स्वारोचिष अशीं मन्वंतरें सरल्यावर, क्रमानेंच पुढें, तिघे तीन मन्वंतराधिपति झाले.

प्रियव्रत मोठा पराक्रमी होता. तो एकदां एकचक्री रथांत बसून, पृथिवीवर मेरुसभोंवतीं सात अहोरात्रें असा फिरला कीं, मेरुच्या ज्या अंगाकडे सूर्य असेल, त्याच्या समोरील अंगीं आपण राहून, सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें, इकडे प्रकाश करून, कोणास त्यानें त्या काळांत रात्रच होऊं दिली नाहीं, व प्रथम

दिवशीं मेरूपासून जितक्या अंतरावर उभें राहावें, त्याच्या दुपटीनें दुसऱ्या दिवशीं पुढें, असाही क्रम सात अहोरात्रांत असेल, त्यामुळें त्याच्या रथचक्रानें भूमीचें मर्दन होऊन, ज्या सात परिखा ( खंदक ) उत्पन्न झाले, तेच सप्त समुद्र होऊन, मधील भूमि द्वीपें झालीं. यानें दहा कोटि वर्षांचें एक अर्बुद, अशीं अकरा अर्बुदें कालपर्यंत राज्य केलें.

पुढें यानें आपल्या सर्व पुत्रांस सद्धर्माचा उपदेश करून, आपण नारदानें उपदेशिलेल्या ध्यानयोगाप्रमाणें, भगवत्स्वरूपीं चित्त स्थिर करून मोक्षपदास प्राप्त झाला ( भाग० ५ स्कं० अ० १ ).

**प्रोषकदेश**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९).

**प्रौष्ठपद**–कुबेराचा धनाध्यक्ष मंत्री ( वा० रा० उत्तर० स० १५ ).

**प्लवंग**–रामसेनेंतील वानर (वा० रा० उत्तर० स० ४०).

**प्लक्षद्वीप**–पृथिवीच्या सप्त महाद्वीपांतील दुसरें. हें क्षार समुद्राच्या बाह्य प्रदेशीं मेरूभोंवतें वलयाकार. असून, याची रुंदी दोन लक्ष योजनें आहे, व तितक्याच रुंदीचें यास इक्षुरसोदाचें ( उंसाच्या रसासारख्या गोड जलाचें ) बाहेरून वेष्टन आहे. प्रियव्रत राजाचा दुसरा पुत्र इध्मजिव्ह, तो येथील अधिपति होता. त्यानें या द्वीपाचे सात भाग करून, आपल्या सात पुत्रांस, तेथील आधिपत्य दिलें होतें ( इध्मजिव्ह श० पहा ). या द्वीपांत मणिकूट, वज्रकूट, इंद्रसेन, ज्योतिष्मान्, सुपर्ण, हिरण्यष्ठिव आणि मेघमाल, असे सात महापर्वत. तशाच अरुणा, नृम्णा, आंगिरसी, सावित्री, सुप्रभाता, ऋतंभरा, आणि सत्यंभरा अशा सात महानद्या आहेत. यांत प्लक्षवृक्ष ( पिंपरीचा वृक्ष ) एक अतिशयच मोठा असल्यामुळें, त्या योगानें या द्वीपास हें नांव पडलेलें आहे ( भाग० ५ स्कं० अ० २० ). ( देवीभा० ८ स्कं० अ० १२ ).

**प्लक्षादेवी**–भारतवर्षीय नदी.

**प्लक्षावतरण**–यमुनानदीसंबंधीं तीर्थ ( भार० वन० अ० १२९ ). हें कुरुक्षेत्राचें द्वार मानिलें असल्यामुळें, यास स्वर्गद्वार असेंही म्हणतात. येथें मरुत्त राजानें यज्ञ केले होते.

---

## फ

**फलकक्ष**–एक यक्ष.

**फलकीवन**–भारतवर्षीय तीर्थ.

**फलाहार**–एक ब्रह्मर्षि ( १ आंगिरा श० पहा ).

**फलोदक**–यक्षवि०.

**फल्गुनदी**–भारतवर्षीय नदी. हिचा प्रवाह भूमींतून आहे.

**फाल्गुन**–पंडुपुत्र अर्जुनास नांव.

**फाल्गुनि**–पंडुपुत्र अर्जुनाचे अभिमन्यु इ० पुत्र, त्यांस म्हटलेलें आहे.

**फेनप**–रसातलांत राहणारा एक ब्रह्मर्षि.

२–भूमीवरील एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा. )

---

## ब

**बक–बकदाल्भ्य**–या नांवाचा एक ऋषि, चिरजीवी सुखें व दुःखें कोणतीं असतात, त्यांविषयीं याचा व इंद्राचा संवाद झालेला होता ( भार० वन० अ० १९३ ). अश्वमेध यज्ञ पांडवांनीं केला तेव्हां त्यांचा अश्व फिरत फिरत याच्या आश्रमाजवळ गेला. त्यामागून अर्जुनादिक वीर चालले असतां, मस्तकावर वटपत्र धेऊन,उभा राहिलेल्या या ऋषीस त्यांनीं पाहिलें. त्या काळीं अर्जुनानें यास वंदन करून,मस्तकावर वटपत्र घेण्याचें कारण विचारिलें. यानें छायेनिमित्त म्हणून उत्तर देतांच, आपण गृह कां बांधीत नाहीं, असा अर्जुनानें प्रश्न केला. त्याचें उत्तर, यानें आयुष्य अल्प आहे असें दिलें. पुनः अर्जुन म्हणाला, आपलें आयुष्य किती गत झालें ? यानें उत्तर दिलें, मीं ब्रह्मदेवाचीं वीस अहोरात्रेंच कायतीं पाहिलीं ( जैमि० अश्वमे० अ० ६० ). त्यावरून अर्जुनास अतिशय आश्चर्य झालें. नंतर उभयतांचा बराच संवाद होऊन, कृष्णानें यास शिबिकेंत बसवून, अश्वमेधार्थ हास्तिनापुरी नेलें.

**बकनख**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**बकासुर**–कंसपक्षीय असुर. यमुनातीरीं वृंदावनामध्यें, एकदां गोपालांसहवर्तमान कृष्ण क्रीडा करीत असतां, तेथें यानें बकवेषानें येऊन, त्यास गिळिलें. तेणेंकरून याच्या गलप्रदेशीं दाह होऊन, यानें कृष्णास मुखाबाहेर टाकिलें, व त्यास पुनः मारायास धांवला, तें याचें दुष्ट कृत्य पाहून कृष्णानें याचे दोनही चंचू धरिले, आणि ते फाडून, यास मारून टाकिलें(भाग० १० स्कं० अ० १२ ).

२–एकचक्रा नगरीचे समीप, वैत्रकीय ना० वनांत ( वेताच्या वनांत ) राहणारा राक्षस. हा, जटासुराचा पुत्र होय. यानें त्या नगरींतील जनांस अतिशय पीडा दिली. त्यामुळें सर्व नागरिक त्रासून एकत्र

झाले, व त्यांनीं याशीं असा निश्चय ठरविला कीं, आम्ही तुला, प्रत्येक गृहस्थ क्रमानें प्रतिदिवशीं वीस खंडींचें अन्न, व एक महिष ( टोणगा ) देत जाऊं, तो तूं घेऊन आमचें रक्षण शत्रु इ० कांपासून करीत जावेंस. तें त्यानें मान्य केल्यावर, प्रत्येक गृहावर तो कर चालू झाला.

कांहीं काळानें ती पाळी, एका दरिद्री ब्राह्मणाच्या घरावर आली असतां, त्याच्या घरांत मोठा आकांत झाला. त्यापूर्वी थोडे दिवस कुंतीसहवर्तमान पांडव, लाक्षागृहांतून वांचून तेथें येऊन उतरले होते, त्यांनीं तो श्रवण करून, कुंतीकडून त्यास त्याचें कारण विचारविलें. तिनें तें पुसून पुत्रांस कळवून भीमास सांगितलें कीं, तूं जा, व त्या राक्षसास मारून ब्राह्मणास सुखी कर. तेव्हां भीमानें थोडें अन्न ब्राह्मणाकडून सिद्ध करवून, गाड्यावर घातलें, व त्यावर आपण बसून वैत्रकीय वनांत गेला. पुढें राक्षस तेथें आला असतां, भीमसेनाचें व त्याचें बरेंच युद्ध होऊन त्यांत यास भीमानें मारिलें ( भार० आ० अ० १६३-१६४ ).

**बकी**-पूतना राक्षसी.

**बदरिकाश्रम**-हिमालयावरील स्थलवि०. येथें नरनारायण ऋषि, तप करीत राहिले आहेत. प्रस्तुत जो हिमालय आपण पाहतों, येथेंही हें स्थळ कल्पित आहे. बदरिकाश्रम या नांवाचें प्रयोजन येवढेंच आहे कीं, तेथें बदरिवृक्ष ( बोरींचीं झाडें ) असंख्य असून, त्यांचीं फळें अत्यंत मोठीं, व उत्कृष्ट रुचिकर आहेत.

**बदरीपाचन**-एक तीर्थ. येथें श्रुतावती ना० ऋषिकन्येनें, इंद्र आपणास पति मिळावा म्हणून तप केलें होतें ( श्रुतावती श० पहा ).

**बंदी**-वरुणाचा पुत्र. यानें ऐंद्रद्युम्नि जनकाच्या वेळेस, बहुत ब्राह्मण वादमिषानें जिंकून, उदकांत बुडविले, व त्यांस वरुणाच्या यज्ञास पाठविलें, त्यांत शेवटीं याचा, बादामध्यें अष्टावक्रानें पराभव केला ( अष्टावक्र श० पहा ).

**बंधु**-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न वेगवान् राजाचा पुत्र. याचा पुत्र तृणबिंदु.

**बंधुमान्**-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न केवल राजाचा पुत्र, याचा पुत्र वेगवान् राजा.

**बभ्रु**-कश्यपकुलोत्पन्न संपातीच्या पुत्रांतील एक.

२-विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक. याचे वंशज बाभ्रव्य नांवानें प्रसिद्ध आहेत.

३-एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

४-ऋषभपर्वतावर राहणारा एक गंधर्व.

५-( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न ययाति राजाचा पौत्र व द्रुह्यूचा पुत्र, याचा पुत्र सेतु ना० राजा.

६-( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न ययातिपुत्र यदु, तत्पुत्र क्रोष्टून्वयांतील ज्यामघपुत्र विदर्भ राजाचा पौत्र, व रोमपाद राजाचा पुत्र; याचा पुत्र कृति ना० राजा.

७-( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न ययाति पुत्र यदु, तद्वंशीय सात्वत राजाचा पौत्र व देवावृध राजाचा पुत्र. हे दोघे पिता-पुत्र, आपल्या कुलांतील बहुत पुरुषांचा उद्धार करणारे होऊन गेले. "पुरुषाः पंचषष्टिश्च षट्सहस्राणि चाष्टच ॥ येऽमृतत्वमनुप्राप्ता बभ्रोर्देवावृधादपि" ( भाग० ९ स्कं० अ० २४ श्लोक १० ).

८-ज्याची स्त्री शिशुपालानें हरण केली होती तो एक यादववि०.

**बभ्रुवाहन**-पंडुपुत्र अर्जुनापासून, मणिपुर नगरींचा राजा चित्रवाहन, त्याची कन्या चित्रांगदा, तिच्याठायीं झालेला पुत्र. चित्रवाहन मरण पावल्यावर, हाच मणिपुरीचा राजा झाला होता ( चित्रवाहन श० पहा ). कौरवपांडवांचें युद्ध होऊन, त्यांत सर्व कौरव मरण पावले, व पांडवांस निष्कंटक राज्य प्राप्त होऊन त्यांनीं अश्वमेध आरंभिला, त्या काळीं त्यांचा अश्वमेधीय श्यामकर्ण अश्व फिरत फिरत मणिपुरास गेला असतां तो यानें धरिला, परंतु त्याच्या मस्तकीं असलेली स्वर्णपत्रिका वाचून पाहिल्यावरून, तो अश्व आपल्या पित्याचा आहे असें यास कळलें, म्हणून हा नानाविध रत्नांचीं उपायनें घेऊन, पित्याकडे गेला, व तीं त्यापुढें ठेऊन त्यास वंदन करून नम्रतेनें पुढें उभा राहिला. त्यावरून अर्जुनास संतोष व्हावा तो न होतां, उलटा क्रोध येऊन यास म्हणाला कीं, मूर्खा, तूं भिऊन क्लीवासारखा ( नपुंसकासारखा ) ज्या अर्थीं मला शरण आलास, त्या अर्थीं, मी जो क्षत्रिय, त्या माझा तूं पुत्रच नव्हेस, अरे तूं क्षत्रियपुत्र असतास, तर युद्ध केल्यावांचून कधींच राहतासना, यास्तव तुला धिक्कार असो. पुत्र एक मला अभिमन्यूच होऊन गेला. तुला जारकर्म करून चित्रांगदेनें उत्पन्न केलें असावें यांत संशय नाहीं. इत्यादि मर्मभेदक भाषणें पित्याचीं श्रवण करून यास पराकाष्ठेचा क्रोध आला, व लागलाच सुबुद्धि ना० मंत्री, व सुमति नांवाचा सेनापति, त्यांस यानें त्या आवेशांत अशी आज्ञा केली कीं, हा श्याम-

कर्ण अश्व नगरांत नेऊन बांधून ठेवा, आणि सत्वर सैन्य सिद्ध करून रणभूमीवर या. त्याप्रमाणें त्यांनीं करतांच यानें अर्जुनाशीं युद्ध आरंभिलें. तेव्हां प्रथम अर्जुन आपण पुढें न होतां प्रद्युम्न आणि अनिरुद्ध इ० वीरांस, त्यानें यापुढें युद्धास होण्यास सांगितलें. त्याशीं याचें युद्ध होत असतां, त्यांस यानें युद्धांत जर्जर करून, व बांधून नगरांत पाठवून दिलें. नंतर अनुशाल्व, हंसध्वज, सुवेग, यांस मूर्च्छित पाडून, पांच दिवस वृषकेतूशीं युद्ध करून, त्याचें शिर उडविलें. तें पाहून अर्जुन त्याच्याजवळ जाऊन शोक करूं लागला. इतक्यांत हा तेथें जाऊन अर्जुनास धनुष्यानें ताडन करीत, व त्याच्या मागील पराक्रमाचा धिक्कार करीत म्हणूं लागला कीं, तूं क्षत्रिय असून युद्ध न करितां स्त्रीप्रमाणें रडत बसलास हें काय? अरे जारिणींच्या पुत्रानें तुझे वीर मारिले त्याची तुला लज्जा कशी वाटत नाहीं? त्यावरून अर्जुन उठला, व त्याचें याचें परम भयंकर युद्ध झालें, परंतु कालगति विपरीत, तन्मुळें त्या युद्धांत बभ्रुवाहनानें अर्जुनाचें शिर उडवून त्यास ठार मारिलें, व जयघोष करीत मोठ्या हर्षानें नगरांत परतला.

हें वर्तमान चित्रांगदा, उलूपी, त्या दोघींस कळतांच, त्यांनीं याची अतिशय निर्भर्त्सना केली, व अनिवार शोक केला. त्यावरून यासही पराकाष्ठेचें वाईट वाटून शोक झाला. परंतु यानें पुनः शोक आवरून, मातेस विनंति केली कीं प्रथम मी होऊन हा अन्याय केला नाहीं. मी तर नम्रतेनेंच गेलों होतों, परंतु पित्यानें माझा अतिशय धिक्कार करून, तुला जारिणी म्हटलें, त्याचाच मला अतिशय क्रोध आला. अस्तु. आतां मी ज्याअर्थी तुला वैधव्य येण्यास कारण झालों आहे त्याअर्थी मी आपला देह अग्नींत दग्ध करितों, असें म्हणून अग्नि सिद्ध करूं लागला. तें पाहून उलूपी म्हणून जी नागकन्या चित्रांगदेची सपत्नी ( सवत ) होती, तिनें याचें सांत्वन करून सांगितलें कीं, पातालामध्यें शेषाजवळ संजीवनमणि आहे, तो मी आणण्याचा प्रयत्न करित्यें. तूं देह दग्ध करून घेऊं नको. इतकें म्हणून तिनें पुंडरीक नागास बोलावून आपलें कंठसूत्र त्याच्याजवळ अभिज्ञानार्थ देऊन, शेषाकडे मणि आणण्यास पाठविलें. तो जाऊन शेषास भेटला, व कंठसूत्र दाखवून मणि मागूं लागला; परंतु मृत्युलोकीं मणि देऊं नये असें बहुत नागांचें मत पडल्यामुळें, पुंडरीकास रिकामेंच माघारें यावें लागलें. त्यावरून उलूपीस क्रोध येऊन तिनें बभ्रुवाहनास मणि आणण्याची आज्ञा केली. तीवरून तो पाताळांत गेला, व नागांशीं युद्ध करून त्यानें तो मणि, मणिपुरास आणिला.

बभ्रुवाहन मणि घेऊन येतो तों, धृतराष्ट्र ना० नागानें दुःस्वभाव आणि दुर्बुद्धि, या आपल्या दोन पुत्रांकडून गुप्तरूपानें अर्जुनाचें शिर पळविलें, व आपण नाहींसा झाला. पुढें इकडे बभ्रुवाहन पाहूं लागला तों अर्जुनाचें शिर कोठें नाहीं, म्हणून सर्व शोक करीत आहेत इतक्यांत, हस्तिनापुरामध्यें कुंतीस अर्जुनमरणसूचक दुष्ट स्वप्न झाल्यामुळें तिनें तो युधिष्ठिरादिकांस सांगितल्यावरून कृष्ण हा, भीम, कुंति व देवकी, यांसह तेथें एकाएकीं प्राप्त झाला, आणि पाहतो तर, अर्जुनादिक वीर खरेच मृत झाले आहेत. नंतर कृष्णानें आपल्या सुकृताची प्रतिज्ञा करून, अर्जुनाचें शिरं येवो म्हणतांच, तें पुढें येऊन पडलें. त्यास पाहून कृष्णानें मणिप्रभावेंकरून सर्वांस सजीव केलें, व मणि परत शेषाकडे पाठवून देऊन, पितापुत्रांच्या भेटी करविल्या. नंतर मणिपुरांत पांच दिवस राहून, व कुंती इ० कांसहित भीमास हस्तिनापुरीं परत पाठवून आपण बभ्रुवाहनास समागमें घेऊन, अश्वाचें संरक्षण करण्यास्तव त्यामागें त्यानें गमन केलें ( जैमिनि अश्व० अ० २१-४० ). ( भार० अश्वमे० अ० ७९-८१ ).

**बर्बर**–पूर्वपश्चिमभेदानें असणारा देशवि०.

**बर्हणाश्व**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न संहताश्व राजाचा पुत्र. यास रणाश्व असेंहि म्हणत.

**बर्हि**–प्राधापुत्र गंधर्वांतील एक.

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्षान्वयसंभूत बृहत् अ० बृहद्राज राजाचा पुत्र. याचा पुत्र कृतंजय.

**बर्हिकेतु**–मयूरध्वज राजास नामांतर.

**बर्हियोग**–एक ब्रह्मर्षि ( २. कश्यप श० ) पहा.

**बर्हिषद**–स्वायंभुव मन्वंतरांतील पितर वि०. हे अत्रि ऋषीचे पुत्र असून, विभ्राज ना० लोकांत राहतात. हे दैत्य. दानव, गंधर्व इ० कांस पूज्य होत, व यांचे प्राधान्य नांदीश्राद्धांत असतें. सौम्य, देव आणि आर्तव, असे यांत तीन भेद आहेत ( मत्स्य० अ० १४० ).

२–द्वितीयार्थक प्राचीनबर्हि राजाचें मूळचें नांव.

३–एक ब्रह्मर्षि ( भार० शांति० अ० ३४८).

**बर्हिष्मती**–स्वायंभू मनूचा ज्येष्ठ पुत्र प्रियव्रत राजा, त्याची स्त्री. ही, त्याच मन्वंतरांतल्या विश्वकर्मा ना० प्रजापतीची कन्या.

२–भारतवर्षीय ब्रह्मावर्तखंडांतील ( भरतखंडांतील ) ब्रह्मावर्त देशाची राजधानी. येथें स्वायंभू मनु राहात असे. यज्ञवराहानें आपलें अंग कंपित केल्यामुळें, त्यावरील जे रोम या स्थळीं पडले, त्यांचेच कुश ( दर्भ ) झाले. ते कुश सर्वदां तेथें हरित ( हिरवेगार ) राहतात म्हणून, त्या नगरीस असें नांव पडलें होतें. येथें स्वायंभूमनूनें व अन्य ऋषींनीं अनेक यज्ञ केले ( भाग० तृती० अ० २२ ).

**बर्हिसादि**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**बल**–विष्णूच्या आठ पार्षदांतील एक.

२–अतलामध्यें राहणारा मयासुराचा पुत्र.

३–इंद्रानें मारिलेला दनायूच्या पुत्रांतील एक असुर तो.

४–कुंभकर्णानें भक्षिलेला रामसेनेंतील एक प्रतापी वानर ( भार० वन० अ० २८७ ).

५–ज्येष्ठेपासून वरुणास झालेला पुत्र.

६–प्रथमांक परीक्षित् राजास सुशोभनेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

७–उत्तानपादवंशीय हविर्धान राजास, हविर्धानी अ० धिषणा स्त्रीपासून झालेल्या पुत्रांतील एक. हें नांव, वंशावळींत जे सहा पुत्र आहेत, त्यांतील कोणत्याचें, त्याचा निर्णय होत नाहीं.

८–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयसंभूत पारियात्र राजाचा पुत्र. याचा पुत्र स्थल ना० राजा.

९–( सो० वं० ) वसुदेवास रोहिणीपासून झालेल्या पुत्रांतील ज्येष्ठ. यास बलदेव, बलभद्र, बलराम, इ० नांवें होतीं.

१०–कृष्णापासून लक्ष्मणेस झालेला पुत्र.

**बलदेव**–बलराम.

**बलभद्र**–बलराम.

२–शाकद्वीपांतील एक पर्वत.

**बलराम**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न वसुदेवापासून, शेषांशानें प्रथम देवकीच्या उदरीं प्रवेशून, नंतर भगवन्मायेनें रोहिण्युदरीं प्रवेशलेला, व पूर्णकालीं जन्मास आलेला पुत्र तो. हा सर्व जनास प्रिय होईल म्हणून राम, बलवान् म्हणून बल, आणि देवकीच्या उदरांतून उत्तमप्रकारें आकर्षित होऊन, रोहिणीच्या उदरीं प्रवेशला, यास्तव संकर्षण, अशीं यास नांवें होतीं. हा कृष्णाहून ज्येष्ठ होता, व त्यासमागमेंच गोकुळांत वाढला. यानें कृष्णाप्रमाणेंच गोकुळांत गोपांसमागमें अनेक क्रीडा केल्या, कित्येक असुर मारिले, व अक्रूर मथुरेस न्यावयासाठीं आला असतां, कृष्णासहित तेथें जाऊन, प्राप्त झालेल्या कित्येक असुरांचा यानें वध केला.

कंस मरण पावून, उग्रसेन राज्यावर बसल्यानंतर, त्यानें वसुदेवास कारागृहांतून देवकीसहित तत्काळ मुक्त केलें त्यावरून पुढें त्यानें रोहिणीस गोकुळांतून मथुरेस आणवून, याचा व कृष्णाचा मोठ्या समारंभानें व्रतबंध केला. पुढें हा व कृष्ण, उभयतां, सांदीपनि ना० ऋषीच्या गृहीं वेदाध्ययनार्थ राहिले. तेथें यांनीं त्याची अनेक प्रकारें सेवा करून वेदाध्ययन पूर्ण झाल्यावर, ब्रह्मविद्याही संपादिली. त्या वेळेस यास तेथें कुचैल ( सुदामा ) ब्राह्मण सहाध्यायी होता, व तो, वयानें ज्येष्ठ असून, यांच्या पूर्वीचा अध्ययन करणारा होता म्हणून, हे त्यास ज्येष्ठ गुरुबंधु मानीत असत.

अध्ययन पूर्ण झाल्यावर, यानें व कृष्णानें, शास्त्रपद्धतीप्रमाणें सांदीपनीस गुरुदक्षिणा दिली, व गृहस्थाश्रमधर्म संपादन करण्याच्या हेतूनें उभयतां मथुरेस परत आले. नंतर याचा विवाह, सूर्यवंशीय शर्याति राजाचा पौत्र, व आनर्त राजाचा पुत्र रेवत राजा, त्याच्या रेवती ना० कन्येशीं झाला. आणि त्यावरूनच आनर्त देश यास मिळून, त्या देशाचें आधिपत्य प्राप्त झालें असावें. यास पुत्रसंतति असलेली ग्रंथांत आढळत नाहीं, त्यावरून यास पुत्र नव्हताच असें दिसतें. मात्र जैमिनि भारतांतील वनपर्वावरून याला एक वत्सला ना० कन्या होती इतकें आढळतें.

बलरामानें गदायुद्धाची शिक्षा, कोणापासून घेतली होती, तें कोठें आढळत नाहीं, परंतु त्या युद्धांत त्यासारखा निपुण, त्या काळीं सर्व भरतखंडांत तोच होता, असें म्हणायास चिंता नाहीं. कारण जरासंध गदायुद्धांत इतका निपुण असतांही, त्याचा यानें सत्रावेळ पराभव केला होता. कांहीं काळानें यानें, हळू हळू शूरसेन देश, व त्याची राजधानी मथुरा, सोडीत सोडीत आनर्तदेशीं कुशस्थलींत ( द्वारकेंत ) आपली वस्ति बळकट केली आणि मथुरेंत दुसऱ्या यादवकुळाची स्थापना करून, वसुदेव, कृष्ण, व सर्व परिवार घेऊन तींत जाऊन राहिला.

हा एकदां, नंदयशोदेस भेटण्यासाठीं, मथुरेहून गोकुळास गेला असतां, त्यांनीं याचा अत्यंत सत्कार करून, चैत्र आणि वैशाख दोन मासपर्यंत यास ठेवून घेतलें. तेथें असतां, याप्रीत्यर्थ वरुणानें वारुणी मदिरा वृक्षकोटरांतून प्रवाहरूपानें नित्य वाहावी अशी व्यवस्था

ठेविली होती. कारण तिच्या सुगंधानें सर्व वन सुगंधित राहून, याच्या चित्तास आराम व्हावा. यावरून असें समजावें कीं, याला वारुणी मदिरा अत्यंत प्रिय असे. याच काळांत एके रात्रीं, हा, यमुनातीरीं स्त्रीसहित क्रीडेस गेला असतां ज्या स्थळीं बसला होता, तेथें यमुनाजलानें वाहावें असें यास वाटून, तिला यानें बोलाविलें, पण ती येईना असें पाहून, तिचा प्रवाह यानें नांगरानें अलीकडे ओढला, तो तेथें अजून वक्र आहे ( भाग० दशम० अ० ६५ ). असेंच यानें, हस्तिनापुरही एकदां नांगरानें ओढून डोंगराच्या उतरत्या प्रदेशासारखें कांहींसें वक्र केलें होतें ( २ लक्ष्मणा श० पहा ).

कौरवपांडवांचा युद्धप्रसंग होणार, असें ठरलें असतां, हा एकदां युधिष्ठिराकडे आला. तेव्हां त्यानें याचा सत्कार करून, काय आज्ञा आहे म्हणून विचारिलें. बलराम म्हणाला, युद्ध न व्हावें, असा माझा फार हेतु होता, परंतु तो घडला नाहीं; आणि जिकडे धर्म तिकडे जय, व कृष्ण तिकडे मीही असल्यामुळें कौरव निश्चयेंकरून नाश पावतील. त्यांत भीम आणि दुर्योधन दोघे माझे शिष्य असून भीमास जय येऊन दुर्योधन मरणार, तें माझ्यानें पाहवणार नाहीं, यास्तव मी अठरा दिवसपर्यंत तीर्थयात्रेस जावें असें मनांत आणून, तुला सांगून जावें म्हणून आलों आहें. इतकें बोलून बलराम तीर्थयात्रेस निघून गेला ( भार० उद्योग० अ० १५७ ).

बलराम तीर्थयात्रेस निघाला तो प्रभास, पृथूदक, बिंदुसर, त्रितकूप, सुदर्शन, विशाल, ब्रह्मतीर्थ, चक्रतीर्थ, तसींच भागीरथी आणि यमुना यासंबंधीं अनेक तीर्थें पाहात, व तेथें तेथें स्नानदानादिक करीत, नैमिषारण्यांत प्राप्त झाला असतां त्यानें ऋषींचें पुराणचर्चासत्र चाललेलें पाहिलें, म्हणून तेथें गेला. तेव्हां ऋषींनीं याचा सत्कार करून अभ्युत्थान दिलें; परंतु उच्चस्थानीं बसलेल्या रोमहर्षणानें अभ्युत्थान दिलें नाहीं असें पाहून, त्यावर यानें क्रोधेंकरून एक कुश टाकिला, तेणेंकरून तो तत्काळ मरण पावला. तें याचें कर्म ऋषींनीं अवलोकन करून यास म्हटलें कीं, तुम्ही असें कसें केलेंत ? आम्ही तर यास सत्रसमाप्तीपर्यंत स्थापिलें होतें, व हा, प्रतिलोमज ( उत्तम वर्णाच्या स्त्रीच्या ठायीं नीच वर्णाच्या पुरुषापासून झालेला ) असा असतांही, यास ब्रह्मासन दिलें होतें. त्यावरून बलरामानें, याचा पुत्र उग्रश्रवा सौति (सूत पुराणिकाचा पुत्र ) दीर्घायु होऊन, त्यास पुराण सांगेल, असा आशीर्वाद देऊन, व त्यांस उपद्रव देणाऱ्या बल्वल राक्षसास मारून, ऋषींची आज्ञा घेऊन गमन केलें.

नंतर यानें भारतवर्षीय अनेक तीर्थें करून प्रभासास गमन केलें. तेथें यास कळलें कीं, सर्व कौरव आणि त्यांची सेना नष्ट झाली, मात्र दुर्योधन आणि भीम यांचें युद्ध चालू आहे. त्यावरून, अर्जुनदुर्योधनास दोन बऱ्या गोष्टी सांगाव्या अशा आशयानें हा तेथें गेला व युद्ध पुरे करा म्हणून सांगूं लागला, परंतु ते दोघेही ऐकतना. तेव्हां कृष्णानें यास तेथून युक्तीनेंच द्वारकेकडे लावून दिलें. जातां जातां, नैमिषारण्यांत यास कित्येक ऋषि भेटले, त्यांनीं यज्ञाचा महिमा वर्णन करून यास ऐकविला असतां, यानें द्वारकेस जाऊन यज्ञ केला ( भाग० दशम० अ० ७८–७९ ).

कांहीं कालानें यादवकुलास शाप होऊन, सर्व यादव मरण पावले असतां यानें पश्चिमसमुद्रतीरीं जाऊन, कृष्णापूर्वीच योगबलानें आपला देह त्यागिला. बलराम, स्वभावानें उदार व सरळ, असा असे; परंतु पराकाष्ठेचा क्रोधी होता. याची भीति संपूर्ण यादवांस इतकी असे कीं, अन्याय कसा तो त्यांस मुळींच ठाऊक नव्हता. यास अक्षविद्येचें बरेंच व्यसन होतें, तथापि अन्याय करणें यास अगदीं आवडत नसे. यानें यासंबंधीं अन्यायास्तव कलिंग राजाचे तलहस्तानें दांत पाडून, रुक्मि राजास तर ठारच मारिलें होतें ( २ रोचना श० पहा ). याची अंगकांति गौर असून, नीलांबर परिधान करणें यास अतिशय आवडे, व वारुणी मदिरा, याला प्रिय असल्याचें वर लिहिलेंच आहे; म्हणून तिचें प्रायः हा सेवन करीच. नांगर आणि मुसल, हीं याचीं स्वाभाविक आयुधें होतीं, त्यांवरून यास हली, हलायुध, सीरपाणि, मुसली, इ० नांवें असत.

**बलाक**–गर्गकुलोत्पन्न एक ऋषि, बालाकि ऋषीचा पिता.

२–एक मातापितरांचा भक्त असा कोणी व्याध. यानें प्रत्यहीं श्वापद मारून आणून त्यांचें संरक्षण करीत असावें. एकदां यास अरण्यांत अस्तमान झाला तरी कांहीं मिळालें नाहीं, तों एक श्वापद यास सांपडलें, तें यानें मारून घरीं आणिलें. तें जातीनें अंध होतें, अंध श्वापद मारणें हा अधर्म आहे; परंतु यास त्याच्या वधानें अधर्म घडला नाहीं; कारण तें जनांस मोठें पीडा देणारें होतें. म्हणून हा अधर्म अस-

तांही यास धर्मच घडला. कृष्णार्जुनसंवाद ( भार० कर्ण० अ० ६९ ).

**बलाकाश्व**–( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न जन्हु राजाचा पौत्र, पुरु अ० अज राजाचा पुत्र. याचा पुत्र अजक राजा.

**बलाकी**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**बलानीक**–द्रुपद राजाच्या पुत्रांतील, अश्वत्थाम्यानें मारलेला पुत्र ( भार० द्रोण० अ० १५६ ).

**बलाहक**- कद्रुपुत्र नागांतील एक.

२–प्रलयमेघांतील एक.

३–कृष्णाच्या रथास जे चार अश्व असत, त्यांतील एक.

४–तृतीयार्थक जयद्रथ राजा, त्याच्या साहा भ्रात्यांतील एक.

**बलि**–एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

२–प्रल्हादपुत्र विरोचनाचा पुत्र, म्हणून यास, वैरोचन अ० वैरोचनि असें म्हणत असत. हा मोठा बलाढ्य असून, यास विंध्यावली नांवाची स्त्री, मुख्य होती. याला कोटरा म्हणून दुसरी स्त्री आढळत्ये; परंतु तें नांव विंध्यावलीचेंच किंवा ती स्त्री निराळी होती, त्याचा निर्णय होत नाहीं; तथापि बाणासुराचीच ती माता आढळत्ये म्हणून, बहुधा तें नांव विंध्यावलीसच असावेंसें वाटतें.

यानें इंद्र होण्यासाठीं, चालू मन्वंतराचा सातवा पर्यय असावा, त्यांत नव्याण्णव यज्ञ नर्मदातीरीं करून शंभराव्यास आरंभ केला होता, तो शेवटास जाण्याच्या संधीस विष्णूनें वामनरूपेंकरून याकडे येऊन त्रिपाद भूमीची याचना केली. तिचें यानें उदक सोडल्यावर, वामनानें मोठें रूप धारण करून, दोन पावलांत पृथिवी व आकाश आटोपून तिसऱ्या पाउलाची भूमि कोठें आहे ती दे, असें यास म्हणूं लागला. त्यावरून बलि कुंठित होऊन, माझ्या शरीरावर तिसरें पाऊल ठेव म्हणतांच वामनानें तसेंच करून यास पाताळांत नेऊन बसविलें, आणि वर दिला कीं, तूं येथें वैवस्वत मन्वंतर सरेपर्यंत ऐस, तुला मी उपेंद्र नांव दिलें असून, पुढें येणाऱ्या आठव्या सावर्णि मन्वंतरांत, तूं स्वर्गामध्यें इंद्र होशील.

बलिदैत्यास, बाण अ० बाणासुर, धृतराष्ट्र, सूर्य, चंद्र, चंद्रांशुतापन, निकुंभनाभ, गुर्वक्ष, कुक्षिभीम, बिभीषण, इ० शत पुत्र होते व याला अश्रोत्रिययुक्त श्राद्ध, अश्रद्धापूर्वक दान, असन्मार्गी याचा यज्ञ, अशुचीनें केलेलें देवब्राह्मणपूजन आणि गुरूच्या अभक्ताचें कर्म, या पांचांतील जो कांहीं पुण्यांश, तो ज्याचा त्याला प्राप्त न होतां, तुला प्राप्त होत जाईल, असें वामनानें वरदान दिलें (देवीभा० नवम० अ० ४५ ).

३–( सो० वं ) आयुकुलोत्पन्न ययाति पुत्र अनु ना० राजा, तद्वंशीय सुतपाराजाचा पुत्र. यास सुदेष्णा नांवाची स्त्री होती, व तिच्या ठायीं यानें, दीर्घतमा ऋषीकडून **अंग, वंग, सुह्म, पुंड्र, अंध्र** आणि **कलिंग**, असे सहा पुत्र निर्माण करविले होते.

यानें, दीर्घतम्याची पुत्रार्थ प्रार्थना केली असतां, जीं वाक्यें पुराणांत आढळतात, तीं, हा बलि दैत्यच अशा अर्थाचीं आढळतात.

**श्लोक.**

" अंतःपुरेजुगोपैनं भक्ष्यं भोज्यैश्च तर्पयन् ॥
तस्माच्च स वरं वव्रे पुत्रार्थे दानवर्षभः ॥५८॥
संतानार्थं महाभाग भार्यायां ममयानद ॥
पुत्रान् धर्मार्थतत्त्वज्ञानुत्पादयितुमर्हसि ॥ ६० ॥
एवमुक्तोथ देवर्षिस्तथास्त्वित्युक्तवान् प्रभुः ॥
स तस्य राजा स्वां भार्यां सुदेष्णां नाम प्राहिणोत् ॥ ६१ ॥ ( मत्स्य० अ० ४८ ).

याप्रमाणें मोह उत्पन्न करणारीं वचनें पुराणांतून शतावधि आढळून, मनुष्य असा घोटाळ्यांत पडतो कीं, जर हा बलि दैत्यच आहे, तर यास, विंध्यावली स्त्री सांगावयाची ती न सांगतां, सुदेष्णा सांगितली, हें काय ? बरें पुढें एकाद्यानें, ही सुदेष्णा बलिदैत्याची दुसरी स्त्री असेल किंवा विंध्यावलीसच नामांतर असेल अशी कल्पना लढविलीच तर त्याला तोंडघशी देण्याचें वचन अगोदर बरेंच मागें लांब पल्ल्यावर सांगून ठेविलेलें असतें. तें असे,—

**श्लोक.**

" सेनस्य सुतपा जज्ञे सुतपस्तनयो बलिः ॥
जातो मानुषयोन्यां तु क्षीणे वंशे प्रजेच्छया "२३
( मत्स्य० अ० ४८–४९ ).

म्हणजे, बलिदैत्यच, त्याची संतति क्षीण झाल्यामुळें, प्रजा उत्पन्न करावी या हेतूनें सेन राजाचा पुत्र सुतपा राजा, तत्पुत्ररूपानें मनुष्ययोनींत जन्मास आला, व त्यानें येथें अशा रीतीनें प्रजा निर्माण करविली.

याप्रमाणें, पूर्वजन्मांतील नांवांचे संबंध, नारद, वसिष्ठ इ०कांवर, त्यांस दोन दोन तीन तीन

जन्म झाले तरी, ब्रह्ममानसपुत्रादिकच असे लिहून पुराणांत गोंधळ केलेला आढळतो. यासाठीं ते ग्रंथ पाहणारांनीं हें तारतम्य या उदाहरणानें चांगलें लक्षांत ठेवावें.

**बलिविंध्य**-रैवतमनूच्या पुत्रांतील एक.

**बली**-बलि शब्द पहा.

**बलीनर**-एक असुर.

**बलिभद्र**-शिवाच्या रुद्रगणांतील एक.

**बलीमुख**-रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० युद्ध० स० ४ ).

**बलेक्षु**-एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**बलोन्मत्त**-रुद्रगणांतील एक.

**बल्लव**-अज्ञातवाससमयीं, पंडुपुत्र भीमसेनानें हें नांव धारण केलें होतें, व तो विराटगृहीं राहिला होता ( भार० विराट० अ० ८ ). येथें यानें कीचकादिकांस मारिलें होतें ( कीचक श० पहा ).

२-बल्लव हें नांव गौळ्यास साधारण आहे, हे गोरक्षण करीत असतात, यांची जाति वैश्य असून, यांनीं राजगृहीं पाक करावा, असेंही यांचें कर्म, पूर्वीं पांडवांपर्यंत असे. यांनीं केलेल्या पाकाचें भोजन, ब्राह्मणही करीत असत, आतां मात्र बंदी आहे.

**बल्लवदेश**-भारतवर्षीय बल्लवांचा देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**बल्वल**-विप्रचित्ति दानवाचा पौत्र, व इल्वलाचा पुत्र. नैमिषारण्यांतील ऋषींस हा, अतिशय त्रास देई. त्यामुळें यास, ऋषींच्या आज्ञेवरून गेल्या द्वापाराच्या अंतीं बलरामानें मारिलें होतें ( बलराम श० पहा ).

**बहिर्गिरि**-अंतर्गिरि शब्द पहा.

**बहुगव**-( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न ययातिपुत्र पूरुराजा, तद्वंशीय सुद्यु राजाचा पुत्र, याचा पुत्र संयाति.

**बहुगुण**-एक गंधर्व.

**बहुदंष्ट्र**-रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

**बहुधान्यक**-मरुभूमिदेशाच्या पश्चिमेकडील देश (भार० सभा० अ० ३२ ).

**बहुरथ**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिपुत्र देवमीढ अ० द्विमीढ, तद्वंशीय रिपुंजय राजाचा पुत्र.

**बहुरूप**-एक रुद्र, भारतोक्त रुद्रांतील हें नांव कोणत्याचें तें कळत नाहीं.

२-प्रियव्रतपुत्र मेधातिथि, त्याच्या सात पुत्रांतील सहावा. याचा वर्ष याचे नांवानें प्रसिद्ध आहे.

३-शाकद्वीपांतील साहवा वर्ष.

**बहुल**-कद्रुपुत्र एक नाग.

**बहुलध्वज**-ताम्रध्वज राजाचा प्रधान.

**बहुला**-भारतवर्षीय नदी.

२-कृत्तिका नक्षत्रास नांव.

**बहुलाश्व**-( विदे० वं० ) धृतिना० जनकाचा पुत्र. याकडे एकदां कृष्ण गेला होता (१ श्रुतदेव श० पहा). हा जनक पांडवांच्या वेळेस मिथिलेंत राज्य करीत होता. याचा पुत्र कृतिना० जनक.

**बहुवीति**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**बव्हृच**-ऋक्शाखाध्यायी ब्राह्मणांस संज्ञा व ऋग्वेदोपनिषत्.

**बव्हाशी**-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**बाण**-दनुपुत्र एक दानव, आणि बलिदैत्याचा एक पुत्र ( बाणासुर श० पहा ).

**बाणासुर**-एक दानव, याची स्त्री अनौपम्या. हा त्रिपुर निर्माण करून अंतरिक्षांत राहिला होता; मयासुरनिर्मित हें त्रिपुर समजूं नये ( मत्स्य० अ० १८६ ).

२-बलिदैत्याच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ. यास महाकाल असें नामांतर आढळतें. यानें तांडव नृत्यकरून शंकरास प्रसन्न करून घेऊन, तुमचा एक रुद्रगण माझ्या नगरसंरक्षणास असावा, व मला सहस्र हस्त प्राप्त व्हावे, असें मागितलें असतां महादेवांनीं तें त्यास दिलें होतें. याचा थोडा इतिहास उषाचरित्रांत आहे ( ऊषा श० पहा ).

**बादरायण**-बदरीवनांत तप करण्यानें कृष्णद्वैपायनव्यासास नांव.

**बादरायणि**-शुकाचार्यास नांव.

**बादरि**-श्यामपराशरकुलोत्पन्न ऋषि.

**बाभ्रव्य**-विश्वामित्रकुलोत्पन्न बभ्रुऋषीचा पुत्र, व त्याचें कुल.

**बाभ्रव्यायणि**-विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**बार्हदीषव**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र बृहदिषु, त्याच्या वंशजांस नांव.

**बार्हद्रथ**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न उपरिचर वसु, त्याच्या बृहद्रथ ना० पुत्राच्या वंशजांस संज्ञा.

**बालडि**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० ) पहा.

**बालधि-धी**-एक ब्रह्मर्षि. यास, प्रथम एक पुत्र होऊन मरण पावला असतां, दुःख झाल्यामुळें, आतां पुत्र अमर व्हावा अशा बुद्धीनें यानें तप आरामल. तेव्हां

देवता प्रसन्न होऊन वर माग म्हणाली असतां, अमर पुत्र पाहिजे असें यानें मागितलें. तो अप्राप्त आहे असें देवतेनें म्हणतांच, हा जो संमुख पर्वत दिसत आहे, इतका तरी आयुष्मान् असावा, याप्रमाणें हा म्हणाला. त्यावरून देवता तथास्तु म्हणून अंतर्धान पावल्यावर,कालेंकरून यास पुत्र झाला,त्याचें नांव यानें मेधावि असें ठेविलें;परंतु तो पर्वताइतक्या आयुष्याचा होता म्हणून, त्यास प्रीतीनें पर्वतायु अशी हाक मारी. पुढें तो थोर झाला, व आपण पर्वताइतक्या आयुष्याचे आहोंत असें त्यास कळलें, त्यावरून उन्मत्त होऊन, त्यानें प्राणिमात्रांस पीडा आरंभिली. तींत एकदां त्यानें धनुषाक्ष ऋषीस निष्कारण त्रास दिल्यावरून,त्यानें त्यास तूं मरशील असा शाप दिला. परंतु तो तत्काळ न मेल्यामुळें ऋषीस आश्चर्य होऊन, त्यानें त्याचें कारण काय तें दिव्यदृष्टीनें शोधिलें, तों त्यास अमुक पर्वत याच्या आयुष्यास कारण आहे असें जाणून, तपोबलानें महिषांकडून तो पर्वत खणून नाहींसा करविला, तेणेंकरून मेधावि तत्क्षणींच मरण पावला ( भार० वन० अ० ३१५ ).

**वालपि**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० ) पहा.

**वालाकी**– ,, ,, ,,

२–भरद्वांजांगिरसकुलांतील गर्गगोत्रोत्पन्न बलाक ऋषि, त्याचा पुत्र. हा, वेदवेदांगपारग असतांही, ब्रह्मविद्या-विवर्जित असल्यामुळें, काय तो विद्वान् मीच, इतर सर्व तुच्छ, असा यास अभिमान होऊन दिग्विजयास निघाला. त्यांत अनेक देशांतील अनेक पंडितांस जिंकीत, व जयपत्रें घेत, काशीस गेला. तेथें नगरांतील बहुतेक विद्वानांस यानें वादांत जिंकल्यानें अत्यंत उन्मत्त होऊन, मोठ्या प्रौढीनें तेथील राजाकडे गमन केलें. त्यास पाहून राजानें याचा सत्कार केला, व आसनावर बसवून, येण्याचा उद्देश विचारिला. यानें उत्तर केलें, मी तुजकडेसच अशा हेतूनें आलों आहे कीं, मी जें कांहीं पुसेन त्याचीं उत्तरें तूं मला द्यावींस; नाहीं तर माझा शिष्य व्हावेंस. बहुधा मला वाटतें कीं, तुझ्यानें उत्तरें देववणार नाहींतच; तस्मात् तूं शिष्यच होण्यास योग्य आहेस. यास्तव तुला काय पुसणें असेल तें पूस,मी तें तुला समजून सांगतों. असें याचें भाषण काशीराजानें श्रवण करून, तो स्वतः ब्रह्मविद्यासंपन्न असल्यामुळें यास, अतिशय शांतवृत्तीनें म्हणाला कीं, हे ब्राह्मणा, तुझ्या भाषणानें मला बहुत संतोष झाला; कारण आजपर्यंत मजकडे मोठमोठे वृद्ध ब्राह्मण येऊन गेले; परंतु तूं आमचा शिष्य हो, आम्ही तुला सांगतों,असें कोणीच म्हटलें नाहीं,आणि तूं तरुण असून मी तुला सांगतों असें म्हणतोस, तस्मात् तूं धन्य आहेस. तर आतां सशास्त्र सहस्र गायींची, ही दक्षिणा तुजकरितां सिद्ध केली आहे, यास्तव तूं मला काय सांगणार, तें सांगण्यास कृपा करून सत्वर आरंभ कर.

राजाचें भाषण बालाकीस सत्य वाटलें; कारण त्याची योग्यता काय, ती त्यास वास्तविक कळली नव्हती. त्यावरून तो गर्वानें म्हणाला, राजा, मी तुला ब्रह्मविद्या सांगतों, ती तूं सावधान श्रवण कर. असें बोलून अंगभूत विषय सांगण्यास हा प्रवृत्त होतांच राजानें त्याचें खंडन केलें. तेव्हां बालाकि पुनः आणखी बोलूं लागला, त्याचेंहि राजानें खंडन केलें. तात्पर्य, यानें जें जें बोलावें त्याचें राजानें खंडन करावें. असें होतां होतां बालाकीस पुढें आतां काय बोलावें तें सुचेनासें होऊन स्तब्ध बसला. तें पाहून राजा म्हणाला, ब्राह्मणा स्तब्ध कां बसलास? अरे, पुढें बोल, तूं मला प्रथम सांगेन अशी प्रतिज्ञा करून, आतां सांगत नाहींस हें काय ? असत्य भाषण कर-करणारास शासन कोणतें, तें तर तुला, मी सांगावें असें नाहीं; तूं जाणतच आहेस. यास्तव असें करूं नको. तथापि बालाकि कांहींच बोलेना शेवटीं. राजा म्हणाला, बालाके, मी राजा असल्यामुळें माझ्या देशांत अपराधच मी मुळीं घडूं देत नाहीं, इतक्यावर झाल्यास लागलाच धर्मशास्त्रप्रमाणें दंड करितों, उपेक्षा करीत नाहीं. त्याचप्रमाणें मी तुला दंड करावा, परंतु ब्राह्मण दंडास पात्र नाहीं, हें मी जाणत असल्यामुळें तुला सोडितों, तर तूं आतां येथून जा, व पुनः असें मिथ्या भाषण करूं नको. असें बोलून राजा सभेंतून उठून अंतःपुरांत गेला.

पुढें बालाकि पश्चात्ताप पावून, ब्रह्मविद्येनिमित्त काशीराजास शरण आला असतां, राजा यास म्हणाला, हें असें उलटें कसें होईल ? काय, तूं माझें मन तर पाहात नाहींसना ? अरे, याजन, अध्यापन आणि प्रतिग्रह, हीं तीन कर्मे ब्राह्मणासच अधिक आहेत, यास्तव मी जें कांहीं तुला भाषण केलें, त्या माझ्या अपराधाची क्षमा करून, ही मी यथाशक्ति तुझी संभावना करितों, ती ग्रहण करून आपल्या आश्रमास जा. तथापि बालाकि ऐकेना. तो म्हणूं लागला, राजा, माझी उपेक्षा करूं नको, मी तुला वास्तविकच शरण आलों आहें.

असें याचें निश्चयात्मक भाषण ऐकून, राजानें

यास सिंहासनावर बसविलें, आणि आपण पुढें बसून याची पूजा केली, व म्हणाला, वालाके, तूं माझा शिष्य व मी तुझा गुरु असें श्रुतिविरुद्ध कर्म मी कधींच करणार नाहीं; तर आतां तुला सांगतों कीं, दान देणें हें माझें कर्म असून, प्रतिग्रह घेणें हें तुझें कर्म आहे, यास्तव माझा तुझा, दातृयाचकसंबंध असें मी समजून, तुला ब्रह्मविद्या देतों. असें बोलून राजानें यास ब्रह्मविद्येचें दान केलें असतां, बालाकि निःसंशय समाधान होईपर्यंत काशीस राहून, निरभिमान होत्साता, स्वगृहास गमन करिता झाला. हा इतिहास उपनिषदांतून घेतला आहे.

**वालिशायनि**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० )पहा.

**वाल्हीक**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न प्रतीप राजाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. शंतनूचा कनिष्ठ भ्राता, याच्या पुत्राचें नांव सोमदत्त.

२–वाल्हीक देशासंबंधीं सामान्य राजे. हे दुर्योधनाकडे होते, व यांस पांडवांनीं मारिलें ( भार० द्रोण० अ० १५७ ).

**वाल्हीकदेश**–हा देश, उत्तरेकडे चोल आणि दरद या दोन देशांच्या मध्यें पांडवांच्या वेळेस होता ( भार० सभा० अ० २७ ).

**वाष्कल**–एक ब्रह्मर्षि.

२–शिवाच्या रुद्रगणांतील एक.

३–हिरण्यकशिपु दैत्याच्या पुत्रांतील एक.

४–प्रऱ्हादाच्या पुत्रांतील एक.

५–द्वितीयार्थक महिषासुराच्या प्रधानांतील एक.

६–अनुऱ्हादाच्या पुत्रांतील एक.

**वाष्कलि**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**वाहु**–इंद्रसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षींतील एक.

**वाहुक**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरिश्चंद्रवंशीय वृक ना० राजाचा पुत्र. हा राजा वृद्ध होईपर्यंत यास संतति झाली नाहीं, व राज्यही शत्रूंनीं हरण केलें. त्यामुळें हा स्त्रियांसहवर्तमान अरण्यांत जाऊन जप करूं लागला. या गोष्टीस बराच काळ लोटल्यावर यास मरण येऊन, याची ज्येष्ठ स्त्री सहगमन करूं लागली; परंतु ती गर्भिणी आहे असें जाणून, और्व ऋषीनें तिला सहगमन करूं दिलें नाहीं. अशा अवस्थेंतही हें वर्तमान तिच्या सत्पत्नींस ( सवतींस ) सहन न होऊन त्यांनीं तिला विष दिलें, परंतु ती मरण न पावतां अल्पच काळानें प्रसूत झाली, आणि विषानें व्याप्त झालेल्या अशा पुत्रास प्रसवली. तोच गर म्हणजे विष तें[illegible] जन्मला, म्हणून ऋषींनीं त्याचें नांव सगर असें ठेविलें, व आपल्या कृपाकटाक्षानें त्यास विषबाधारहित करून, वाढविलें असतां, तो पुढें मोठा पराक्रमी राजा झाला ( भाग० नवम० अ० ८ ).

२–ऋतुपर्ण राजाच्या घरीं, नलराजानें धारण केलेलें नांव.

३ एक यादववि०.

**वाहुदा**–द्वितीयार्थक हिमालयापासून निघणारी नदी. हिला, सैतवाहिनी असेंहि नांव आहे.

**वाहुलेय**–साहा कृत्तिकांपासून जन्मल्यामुळें क्वचित् कोठें कार्तिकेयास म्हटलेलें आढळतें.

**वाह्य**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**वाह्यक**– " ( वसिष्ठ श० पहा ).

**वाह्यका**–सोमवंशीय पूरुकुलोत्पन्न सात्वतपुत्र भजमान राजा, त्याच्या दोन स्त्रियांतील दुसरी.

**वाह्या**–सह्याद्रि पर्वतापासून निघालेली नदी.

**विडाल**–महिषासुराच्या प्रधानांतील एक.

**विंदु**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

२–अमृतबिंदु श० पहा.

३–दनुपुत्र दानवांतलि एक.

**विंदुमती**–ऋषभदेववंशीय मरीचि राजाची स्त्री.

२–सूर्यवंशोत्पन्न युवनाश्वपुत्र मांधाता राजाची स्त्री.

**विंदुमाधव**–काशीक्षेत्रांतील देववि०.

**विंदुमान्**–प्रियव्रतवंशोत्पन्न ऋषभकुलांत जन्मलेल्या मरीचि राजास, बिंदुमतीपासून झालेला पुत्र, यास सरघा ना० स्त्रीपासून मधु नांवाचा पुत्र झाला होता.

**विंदुसर**–कर्दम प्रजापतीनें सरस्वतीतिरीं तप केल्यावर, त्यावर प्रसाद करावा म्हणून विष्णू आले, त्या काळीं कर्दमास पाहून विष्णूस अति संतोष झाल्यामुळें नेत्रांतून आनंदाश्रु येऊन जे बिंदु भूमीवर पडले, त्यांपासून झालेलें सरोवर तें ( भाग० ३ स्कं० अ० २१ ).

२–भागीरथीचा ओघ शंकरानीं मस्तकीं धारण केला, त्यांतून जे बिंदु भूमीवर पडले, त्यांपासून झालेलें सरोवर तें. हें हिमालयाच्या हिरण्यशृंग ना० शिखराच्या पायथ्यासमीप आहे ( मत्स्य० अ० १२० ).

**विद्वात्मप्रबोध**–ऋग्वेदोपानिषत्.

**विभीषण**–बलि दैत्याच्या शतपुत्रांतील एक.

२–एक गंधर्ववि०.

३–विश्रवा ऋषीची दुसरी स्त्री कैकसी, तिच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ ( भार० वन० अ० २७५ ). यानें [illegible] आणि कुंभकर्ण, या उभय भ्रात्यांसमागमेंच

पांच सहस्र वर्षेपर्यंत गोकर्णक्षेत्रीं तप केलें, व तें झाल्यावर पुनः एका पायावर उभें राहून तितकींच वर्षे मिळून दहा सहस्र वर्षे तप झाल्यावर ब्रह्मदेव यास प्रसन्न होऊन वर माग असें बोलले. तेव्हां यानें माझी मति सर्वदा सधर्मी रत असावी, व ब्रह्मास्त्र मला असावें. त्यावरुन तो राक्षस असतां, असें मागतो हें जाणून, प्रसन्न मनानें यानें मागितलेलें यास तर दिलेंच, व शिवाय अमरत्व देऊन स्वलोकीं गमन केलें ( वा० रा० उत्तर० स० १० ).

पुढें हा, उभय बंधु श्लेष्मातक वनांत पित्याकडे गेले, त्यांसमागमें तिकडे गेला, आणि कांहीं काळानें लंकानगरी रावणास मिळाली असतां तो तींत जाऊन राहिला. नंतर दशग्रीव आणि कुंभकर्ण यांचे विवाह झाले, त्या काळीं शैलूषगंधर्वानें, आपली कन्या सरमा, यास, विवाहविधीनें दिली ( वा० रा० उत्तर स० १२ ).

कांहीं काळानें रावणानें सीता हरण करून आणून लंकेमध्यें अशोकवनिकेंत ठेविली असतां, मारुति तिच्या शुद्धीस आला, व रावणाची अशोकवनिका भंग करून सहस्रावधि राक्षस मारिले. त्यावरून रावणानें त्यास इंद्रजिताकडून धरून आणवून मारण्याची आज्ञा केली; परंतु यानें असें करूं नये, म्हणून रावणास सांगून मारुतीस सोडविलें ( वा० रा० सुंदर० स० ५२ ).

वज्रदंष्ट्र राक्षसानें, रामलक्ष्मणादिकांच्या पराभवाची युक्ति काढिली, तिचें यानें खंडन करून, प्रहस्त आणि इंद्रजित् त्यांचीहि, त्यांनीं निष्कारण वल्गना केल्यामुळें अतिशय निर्भर्त्सना केली. तसाच रावणासही बहुत प्रकारांनीं बोध केला, परंतु त्यास तो न रुचून, त्यानें यास मर्मभेदक वाक्यांनीं पुष्कळ ताडन केलें, त्यावरून हा, गृहदारासक्ति सोडून यानें चार प्रधान समागमें घेतले, व समुद्राच्या उत्तरतीरीं रामास शरण गेला ( वा० रा० युद्ध० स० ९-१०. १४-१५, १६ ).

रावण मरण पावल्यावर, हाच पुढें लंकेचा राजा झाला, व ब्रह्मदेवाचा कल्प सरेपर्यंत याचें आयुष्य असल्यामुळें, अजून हा लंकेंत राज्य करीत आहे ( २ राम श० पहा ).

**बिल्वक**–तीर्थवि०.

**बिल्वि**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**बीज**–दहा विश्वेदेवांतील एक.

**बीजवाप–वापि**–एक ब्रह्मर्षि व कुल ( २ अत्रि श० पहा ).

**बीभत्सु**–पंडुपुत्र अर्जुनास नामांतर.

**बुद्ध**–कीकटदेशांत झालेला विष्णूचा अवतार. हा, वैदिक मंत्रांनीं यज्ञ करणारे जे शूद्रजातीय राजे त्यांच्या बुद्धीस मोह उत्पन्न करण्यासाठीं अजन ना० कोणी पुरुषापासून चालू कलियुगारंभीं उत्पन्न झाला. यानें जें त्यांस बुद्धिकल्पित मत शिकविलें, त्यांस बौद्धमत असें नांव चालू आहे ( भाग० १ स्कं० अ० ३ ).

**बुद्धि**–स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषीची स्त्री. हिचा पुत्र अर्थ.

२–इंद्रसावर्णि मनूच्या पुत्रांत एक होईल तो.

**बुद्बुदा**–शापानें मकरी झालेली अप्सरा, ( नारीतीर्थ श० पहा ).

**बुध**–चालू मन्वंतरांतील सोमाचा पुत्र. हा सोमास रोहिणीपासून झाल्यामुळें, यास रौहिणेय व सौम्य असें म्हटलेलें आहे. इलेपासून यालाच पुढें पुरूरवा राजा पुत्र झाला होता.

**बुधकौशिक**–एक ब्रह्मर्षि. हा विश्वामित्रकुलोत्पन्न किंवा अन्य, तें कांहींच आढळत नाहीं. रामरक्षास्तोत्र यानेंच केलेलें आहे.

**बृहक**–एक गंधर्व.

**बृहच्छुक्ल**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**बृहज्जाबाल**–अथर्वणवेदोपनिषत्.

**बृहंत**–उलूक पर्वतावरील त्याच देशाचा राजा. ( भार० सभा० अ० २७ ). हा भारती युद्धांत पांडवांकडे होता, व शकुनीच्या हातून मरण पावला ( भार० द्रोण० अ० २५ ). याचा सहोदर क्षेमधूर्ति.

**बृहती**–देवसावर्णिमन्वंतरांतील विष्णूच्या अवताराची माता.

**बृहत्**–बृहद्राज राजा तोच.

**बृहत्कर्मा**–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न अंगवंशीय पृथुलाक्ष राजाच्या चार पुत्रांतलि एक.

**बृहत्कल्प**–ब्रह्मदेवाच्या चालू मासांतलि सातवा दिवस अ० कल्प ( ४ कल्प श० पहा ).

**बृहत्काय**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र बृहदिषु, त्याचा पौत्र, व बृहद्धनूचा पुत्र, याचा पुत्र जयद्रथ.

**बृहत्वा**–एक गंधर्व.

**बृहत्सेन**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. हा, मद्रदेशांतील सामान्य राजा असून याची कन्या

लक्ष्मणा कृष्णाची स्त्री होती, अर्थात् हा कृष्णाचा श्वशुर होता.

२-कृष्णास भद्रेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

३-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न जरासंधवंशांतील सुनक्षत्र राजाचा पुत्र. याचा पुत्र कर्मजित्.

**बृहत्सेना**--दमयंतीची परिचारिका.

**बृहत्क्षत्र**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्वपुत्र ऋतेयु, तद्वंशीय मन्यू राजाच्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ. याचा पुत्र हस्तीराजा.

२-धृष्टद्युम्नानें मारिलेला भारतीं युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० ३२ ).

३-द्रोणाचार्यानें मारिलेला कैकयदेशीय पांडवपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० १२५ ).

**बृहदश्व**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न शावास्त राजाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. हा मोठा शूर, धर्मात्मा व ईश्वरभक्तिपरायण असा असे. यानें दीर्घकालपर्यंत उत्तम प्रकारच्या नीतीनें राज्य करून, वृद्धावस्था झाली असतां, कुवलाश्वपुत्रास राज्यावर स्थापून अरण्यांत गमन केलें. त्या गमनसंधीस याच्याकडे कांहीं कार्यानिमित्त उत्तंक ऋषि आला होता, परंतु तें कार्य करण्यास यानें पुत्रासच सांगितलें ( कुवलाश्व श० पहा ).

२-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अनरण्यराजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. हर्यश्वाचा भ्राता.

३-पांडवांकडे द्वैतवनांत आलेला ऋषि. यानें युधिष्ठिरास अनेक इतिहास ऐकविले होते, व अक्षविद्या आणि अश्वहृदयविद्या, तीही सांगितली होती. या दोन विद्यांचा उपयोग असा होता कीं, पुनः द्यूताचा प्रसंग आल्यास अनुकूल अक्ष ( फांसे पडावेत, आणि युद्धांत पराजय होऊं नये ( भार० वन० अ० ७९ ).

**बृहदारण्यक**-यजुर्वेदोपनिषत्.

**बृहदिषु**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ राजा, त्याच्या चार पुत्रांतील तिसरा. याचा पुत्र बृहद्धनु. बृहदिषूच्या वंशास बार्हदीषव संज्ञा असे.

२-( सो० वं ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील, तद्वंशीय भर्म्याश्व राजाच्या पंचालसंज्ञक पांच पुत्रांतील तिसरा.

**बृहदुक्थ**-एक ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० ) पहा.

**बृहद्गर्भ**- ( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न उशीनरपुत्र शिवि, त्याच्या पांच पुत्रांतील एक, यास पृथुदर्भ असें नामांतर असे. याच्या मांसाचें भोजन सत्त्व पाहण्यास आलेल्या ब्राह्मणास देण्याकरितां, याच्या पित्यानें यास वधिलें होतें. ( ६ शिबि श० ) पहा.

**बृहद्धनु**- ( सो० वं) पूरुकुलोत्पन्न बृहदिषु राजाचा पुत्र. याचा पुत्र बृहत्काय राजा.

**बृहद्बल**- ( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयसंभूत तक्षक राजाचा पुत्र. हा भारती युद्धांत दुर्योधनाकडे होता व यास अभिमन्यूनें मारिलें होतें. अयोध्येंत राज्य करणारा, पांडवांच्या वेळेस हाच असून, यास पुत्र बृहद्रण नांवाचा होता.

२- ( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न वसुदेवभ्राता देवभाग, त्यास कंसेपासून झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा. उद्धवाचा सहोदर.

३ गांधार राजाच्या पुत्रांतील एक, शकुनीचा भ्राता.

**बृहद्भानु**-इंद्रसावर्णि मन्वंतरांत होणारा विष्णूचा अवतार.

२- ( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न अंगवंशीय पृथुलाक्षाच्या चार पुत्रांतील तिसरा.

३ कृष्णापासून सत्यभामेस झालेला पुत्र.

**बृहन्मना**- ( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न अंगवंशीय पृथुलाक्षपुत्र बृहद्रथ, त्याचा पुत्र. याचा पुत्र जयद्रथ.

**बृहद्द्युम्न**- अर्वावसु आणि परावसु, यांस यज्ञार्थ वरणारा राजा ( भार० वन० अ० १३८ ).

**बृहद्रण**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशवंशीय बृहद्बल राजाचा पुत्र. याचा पुत्र उरुक्रिय अ० उरुक्षव.

**बृहद्रथ**-(विदे०वं०) देवरात जनकाचा पुत्र, म्हणून यास दैवराति असेंहि म्हटलेलें आहे. यानें, शाकल्यादिक ऋषि, तसाच याज्ञवल्क्य इत्यादिकांस बोलावून, दानार्थ कांहीं गायी मांडिल्या, आणि म्हणाला कीं, जो ब्रह्मनिष्ठ असेल त्यानें ह्या गायी न्याव्या ( मनांतील हेतु, या समाजांत आपल्या ब्रह्मनिष्ठत्वाचा दृढ निश्चय कोणांत आहे, तो पाहून, नंतर त्यास शरण जावें.) पुढें त्या गायी याज्ञवल्क्यानें नेल्या. त्यावरून हा याज्ञवल्क्याचा शिष्य झाला होता. ( याज्ञवल्क्य श० पहा ). याचा पुत्र महावीर्य जनक.

२-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न उपरिचर वसुराजाच्या पुत्रांतील ज्येष्ठ, यास महारथ असेंहि नामांतर असे. हा बहुत कालपर्यंत निपुत्रिक होता. एकदां असें झालें कीं, हा अरण्यांत फिरत असतां एका आम्रवृक्षाखालीं बसलेल्या चंडकौशिक ऋषीस यानें पाहिलें. त्यावरून त्यासमीप जाऊन, वंदन करून पुढें उभा राहिला. ऋषीनें यास क्षेम विचारिलें असतां, संततीवांचून आपल्या कृपेनें सर्व यथास्थित आहे म्हणून यानें

सांगितलें. तें ऐकून ऋषि क्षणमात्र ध्यानस्थ झाला, इतक्यांत वृक्षाचें पक्व फल त्याच्या अंकांवर पडलें, तें त्यानें नेत्र उघडून हातीं घेतलें, व यास देऊन बोलला कीं, हें तूं आपल्या स्त्रीस भक्षायास दे म्हणजे तुला पुत्र होईल. त्यावरून यास आनंद होऊन, ऋषीस यानें नमस्कार केला, व स्वनगरास येऊन, यास दोन स्त्रिया असल्यामुळें, तें त्यांस चिरून भक्षायास दिलें; कारण याची प्रीति दोघींवरहि समान होती. पुढें दोघी गर्भवती होऊन पूर्णकाळीं प्रसूत झाल्या, परंतु दोघीस पृथक् पृथक् एकेक शकल झालें, सबंध पुत्र झाला नाहीं. त्यावरून त्या दोघी, व राजा अतिशय दुःखी होऊन, तीं शकलें त्यांनीं निर्जनस्थळीं टाकविलीं. तेथें कोणी जरा ना० राक्षसी दैवयोगानें प्राप्त होऊन, तिनें तो पुत्र सांधून, राजास आणून दिला, त्यावरून राजा अत्यंत हर्षित होऊन, त्यानें त्याचें नांव जरासंध असें ठेविलें. या राजास कुशाग्र नांवाचा पुढें दुसराहि एक पुत्र झाला होता. बृहद्रथ राजा, जात्या तरी मोठा पराक्रमी होता असें दिसतें; कारण त्यानें ऋषभ ना० एका बलाढ्य राक्षसास मारून, त्याच्या अंगावरील चर्माच्या मोठाल्या दोन दुंदुभि करून, आपल्या गिरिव्रज राजधानीच्या महाद्वारावर ठेविल्या होत्या. (भार० सभा० अ० १६–१७). याच्या वंशास बार्हद्रथ अशी संज्ञा होती.

३–(सो० वं०) अनुवंशोत्पन्न एक राजपुत्र. याचा पिता दिविरथ असून, यास धर्मरथ असेंहि पुढें नांव पडलें. यास मातेनें, परशुराम निःक्षत्रिय पृथिवी करीत चालला असतां, गृध्रकूट पर्वतावर लपविलें होतें. (भार० शांति० अ० ४९). याचाच पुत्र चित्ररथ, ज्यास रोमपाद किंवा लोमपाद म्हणत असत, तो होता.

४–(सो० वं०) अनुकुलोत्पन्न अंगवंशीय पृथुलाक्षाच्या चार पुत्रांतील पहिला. याचा पुत्र बृहन्मना.

–५भारतीय युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा (भार० उद्योग० अ० १९५).

६–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय तिमिराजाचा पुत्र. याचा पुत्र सुदास ना० राजा.

**बृहद्राज**–(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्षपुत्र सुमित्र राजा, त्याचा पुत्र. यास बृहत असेंहि म्हणत असत, व यास पुत्र बर्हि नांवाचा होता.

**बृहद्वती**–भारतवर्षीय नदी.

**बृहन्नटा**–अरण्यवासाचीं बारा वर्षें झाल्यावर, अज्ञातवास करण्याकरितां पांडव विराटगृहीं राहिले, त्यांत युधिष्ठिरादिकांनीं, जसीं आपलीं नांवें व वेष बदलले होते, त्याप्रमाणें अर्जुनानेंहि आपला वेष बदलला होता. (हा वेष उर्वशीच्या शापानें बदलला जाऊन, स्त्रीवेषधारी षंढ जसे सांप्रत आपल्या पाहण्यांत येतात तसा झाला होता). आणि हें नांव आपणास स्वीकारून, यानें, विराट राजाची कन्या उत्तरा, तिला नृत्यगायन शिकविण्याचें पतकरलें होतें (भार० विराट० अ० ११).

अज्ञातवासाचें वर्ष कांहींसें संपत आलें असतां, कीचकवधावरून पांडव पूर्वमत्स्यदेशांत असावेत असा दुर्योधनानें तर्क बांधिला. परंतु पुरुष चौघे, व स्त्रिया दोन असें त्यास उडत उडत कळलें होतें म्हणून त्याला ते द्रौपदीसहित सत्य पांडवच असतील, असा निश्चय जरी करवेना, तरी त्यानें मत्स्यदेशावर जावें असें मनांत आणून, त्रिगर्ताधिपति सुशर्म्यास त्यानें दक्षिण दिशेकडून तेथें सैन्यासहित जाण्याची आज्ञा केली, व त्यास तिकडे पाठविल्यावर, आपण भीष्म, द्रोण, कृप, कर्ण, अश्वत्थामा, इत्यादिकांसहित उत्तरदिशेकडून तिकडे गेला, आणि विराटाचीं गोधनें आडवून धरून, सैन्यासहित तेथें निवेश केला (भार० विराट० अ० ३५).

दुर्योधनानें गोधनें हरण केलीं असें गोपांनीं पाहून तो कदाचित् आपणांसहि धरील म्हणून तेथून पलायन केलें, आणि नगरांत येऊन, तें वर्तमान राजास सांगावें तर, त्यास कळलें कीं तो नगरांत नाहीं, त्यावरून राजपुत्र उत्तर अंतःपुरांत होता, त्याकडे जाऊन त्यांनीं तें वृत्त त्यास कळविलें. तें त्यांचें भाषण ऐकून उत्तर म्हणाला, मी आतांच येऊन, कौरवांस जिंकून, गोधनें आणिलीं असतीं, परंतु माझा सारथि एका युद्धांत मेल्यामुळें, प्रस्तुत तो मला नाहीं. तेव्हां मी एकट्यानें येऊन काय करावें? हें भाषण, उत्तर गोपांशीं करीत असतां त्याची माता सुदेष्णा, व भगिनी उत्तरा या दोघी संनिध असल्यामुळें, बृहन्नटा (अर्जुन) आणि सैरंध्री (द्रौपदी) उभयतां तेथेंच होतीं, त्यांनीं तें ऐकिलें. म्हणून बृहन्नटेनें सैरंध्रीस, नेत्रसंकेतानें सूचना करितांच, सैरंध्री, बृहन्नटेचा आशय जाणून उत्तरेस म्हणूं लागली कीं, बृहन्नटा सारथ्य करण्यास उत्तम जाणते. यास्तव ती जर तुमच्या भावाबरोबर जात असेल तर विचारा. त्यावरून उत्तरेनें बृहन्नटेस विचारिलें, त्यांत ती, होय नाहीं म्हणतां म्हणतां, जाण्यास मान्य



झाली; परंतु उत्तर ऐकेना, तो म्हणूं लागला कीं, हिला नेऊन मी काय करूं? हिच्यानें सारथ्य कशाचें होतें? हें युद्धाचें काम आहे, उग्याच पोकळ गोष्टी नव्हत. इतक्यांत गोप म्हणाले, तुम्ही लवकर आलां तर बरें; नाहीं तर गोधनें गेलीं असें समजा. त्यामुळें सरशेवटीं, त्यानें बृहन्नटेचें सारथ्य मान्य केलें, आणि तिजकडून रथ सिद्ध करवून आपण अंगांत कवच घालून बृहन्नटेसही दिलें, व युद्धासाठीं गमन केलें ( भार० वि० अ० ३६-३७ ),

उत्तर रथांत बसला असें पाहून बृहन्नटेनें अश्वांस अशी प्रेरणा केली कीं, त्यांनीं उत्तराचा रथ हां हां म्हणतां, कौरवसेनेच्या जवळ जवळ आणिला, त्यामुळें कौरवांची सेना, व तिजमधील भीष्मादिक मोठमोठे योद्धे, दुरून त्याच्या दृष्टीस पडले. त्यांस पाहून उत्तर पराकाष्ठेचा भ्याला,आणि बृहन्नटेस म्हणूं लागली कीं, रथ नगराकडे सत्वर माघारा फिरव. बृहन्नटा म्हणाली, तूं असें कसें बोलतोस ? बायकांत घरीं बसून तूं काय बोलत होतास त्याचें स्मरण कर. अरे, तूं क्षत्रिय असून, आवेशानें येथवर आलास, आणि आतां गोधनें न सोडवितां, माघारा रथ फिरव म्हणतोस, हें तुला योग्य आहे काय? तथापि उत्तर तें कांहीं एक न ऐकतां रथाखालीं उडी टाकून नगराकडे जाण्यास पळूं लागला, त्यामागोमाग बृहन्नटेनें कौरवांस पाठ न दाखवितां जाऊन त्यास धरलें, व रथावर आणून बसविलें. नंतर आश्वासन देऊन, तिनें त्यास सांगितलें कीं, तूं घाबरूं नको, धीर धर, यांशीं युद्ध मी करितें ( भार० विराट० अ० ३८ ).

याप्रमाणें बोलून, बृहन्नटेनें, अज्ञातवासार्थ नगरांत प्रवेश करतांना, ज्या स्थळीं वृक्षावर शस्त्रास्त्रें ठेविलीं होतीं, तिकडे रथ वळविला, व उत्तराकडून त्यांतील मोठें धनुष्य इ० काढवून, रथाचें स्मरण केलें. तों अकस्मात् तो तेथें उतरला. नंतर नगरांतून आणलेला रथ तेथेंच ठेवून, आलेल्या रथांत बृहन्नटा बसली, आणि उत्तरास सारथी करून, तिनें त्यास तो रथ रणभूमीवर कौरवांसमोर नेण्याची आज्ञा केली. हें कृत्य पाहून उत्तरास आश्चर्य झालें, व तो बृहन्नटेस पुसूं लागला कीं, हीं अस्त्रें कोणाचीं? येथें कशीं आलीं? व तुला हीं कशावरून ठाऊक? तें मला सांग. बृहन्नटेनें प्रथम उडत उडतच उत्तर दिलें, परंतु तो अशा वरवर बोलण्यानें ऐकेना, तेव्हां बृहन्नटेनें पांडवांचें साद्यंत वृत्त सांगून, कंक, तो युधिष्ठिर इ० सांगितल्यावर, अर्जुन मी असें सांगितलें. त्यावरून अर्जुनाचीं नांवें किती आहेत, व प्रत्येकाचा अर्थ काय, तो त्यास ऐकून ठाऊक होताच, तथापि खूण पटण्यासाठीं बृहन्नटेस त्यानें बुद्ध्या पुसलें. तिनें त्याचें उत्तर देतांच बृहन्नटा, अर्जुनच सत्य असा उत्तराचा निश्चय होऊन त्याची सर्व भीतिच उडाली, व धैर्य येऊन, त्यानें बृहन्नटेस वंदन केलें, आणि तिनें सांगितल्याप्रमाणें त्यानें रथ आणून कौरवांपुढें पूर्ववत् उभा केला (भार. विराट० अ० ३९-४५ ).

तिकडे कौरवसेनेंत, परस्पर वीर परस्परांशीं बोलूं लागले कीं, आजपर्यंत मोठ्या सेनेवर एक रथ त्यांत एक स्त्री व एक बालक, अशीं चालून आलेलीं कधींच पाहिलीं नव्हतीं, तस्मात् हें आश्चर्य काय असेल तें असो. त्यांत भीष्माशीं दुर्योधनानें असें भाषण केलें कीं, ही जी स्त्री दिसत्ये ती स्त्री नव्हे, तर तिच्या बाहूंच्या आकृतीवरून अर्जुनच असें मला वाटतें. आणि तसें असेल तर अज्ञातवासाचें वर्ष पुरें होण्यापूर्वी आम्ही त्यांस ओळखिलें, अतएव त्यांनीं पुनः बारा वर्षें वनवास करावा. त्याचें भीष्मानें केलेलें उत्तर ( भीष्म श० ) पहा.

त्यानंतर कर्ण इ०कांचीं भाषणें होऊन, बृहन्नटेनें उत्तरास सर्वांचे रथ, व त्यांचे ध्वज इ०कांच्या खुणा सांगून, त्याप्रमाणें त्याजकडून तेथें तेथें आपला रथ नेववून, प्रत्येकाशीं युद्ध केलें, व सर्वांचा पराभव करून, गोधनें नगराकडे वळीवलीं ( भार० विराट० अ० ४७-६६ ). पुढें शस्त्रास्त्रें आदिकरून बृहन्नटेनें पूर्वस्थळीं नेऊन ठेविलीं, व नगरांतून आणलेल्या रथांत आरोहण करून तिकडे गमन करीत असतां तिनें उत्तरास सांगितलें कीं, तूं नगरांत गेलास म्हणजे लागलीच आमची प्रसिद्धि करूं नको, मी सांगितलेलें तूर्त सर्व मनांत ठेव, व विराटानें पुसलें असतां कौरवांचा पराजय तूंच केलास असें सांग, माझें नांव अगदीं कोणास कळूं देऊं नको. असें सांगून ती नगरांत येतांच नित्यक्रमाप्रमाणें नृत्यागारांत गेली, व उत्तर विराटाकडे सभेंत गेला, आणि त्यानें, एक देवदूत येऊन त्यानें कौरवांचा पराभव केला म्हणून त्यास सांगितलें ( भार० विरा० अ० ६७-७१ ).

**बृहस्पति**–स्वायंभुव मन्वंतरांतील अंगिरा ऋषीच्या तीन पुत्रांतील दुसरा. देवांचा गुरु. हा स्वारोचिष मन्वंतरांत सप्तर्षीमध्यें एक होता.

२–चालू वैवस्वतमन्वंतरांतलि जो ब्रह्मपुत्रांतील अंगिराऋषि, त्याच्या आठ पुत्रांतील ज्येष्ठ. हा, अग्निवंशाच्या [illegible] दुसरा. पदवीच्या अग्नींत गणिलेला

आहे; कारण अंगिरा ऋषीस, वरुणयज्ञनिमित्तेंकरून अग्नीनें आपला पुत्र मानिलें आहे. स्वायंभुव मन्वंतरांतील जो बृहस्पती, तोच हा पुनः जन्मला होता म्हणून, देवांसहवर्तमान स्वर्गांतील प्रस्तुतच्या पुरंदर ना० इंद्रानें, यास गुरुत्वेंकरून वरिलें होतें. यास शुभा आणि तारा अशा स्त्रिया दोन.त्यांतून शुभेस भानुमति, रागा, सिनीवाली, अर्चिष्मती, हविष्मती, महिष्मति आणि महामति, अशा कन्या सात, आणि तारेस शंयु, निश्चवन, विश्वजित्, विश्वभुक्, वडवाग्नि, स्विष्टकृत्, असे साहा पुत्र, व स्वाहा नांवाची एक कन्या सातवी, अशीं क्रमानें अपत्यें होतीं. तारेच्या ६ पुत्रांत, कच असें नांव कोणास होतें त्याचा निर्णय आढळत नाहीं ( भार० वन० अ० २१७-२२२ ). हा चालू मन्वंतरांत चौथा व्यास होऊन गेलेला आहे ( व्यास श० ). पहा.

बृहस्पतींची स्त्री तारा, सोमानें हरण केली इ० वृत्त पुराणांतून आढळतें, तें नीट नाहीं; कारण देवलोकांत अशा अनीतीच्या गोष्टी घडण्याचा असंभवच होय. या कामीं माझा, व माझे साह्यकर्ते मित्र शास्त्रीबावा त्यांचा, बराच वाद झाला, त्यांत मी त्यांस सांगितलें, पुराणकर्ते व्यास, त्यांना आम्ही वैदिकधर्मानुसारी लोकांनीं वेडे म्हणावें, अथवा अपशब्द बोलावे, असें करण्याकरितां बौद्धादिक नास्तिक लोकांनीं, असे लेख नवे नवे करून घातले नसतील म्हणून कशावरून ? यास्तव असले श्रुतिस्मृतीविरुद्ध लेख कृतक असावेत एक, किंवा पुराणकर्त्यांनीं मनुष्यांच्या अंगीं विचारशक्ति कितपत आहे, तिची परीक्षा करण्याकरितां, कूट घातलें असावें एक.

मनुस्मृतींत मनूनें असें म्हटलें आहे.—श्लोक.—गुरुवत्प्रतिपूज्याः स्युः सवर्णा गुरुयोषितः ॥ असवर्णास्तु संपूज्याः प्रत्युत्थानाभिवादनैः (मनुस्मृति अ० २ श्लोक २१० ). म्हणजे गुरु जसा पूजा करण्यास शिष्यास योग्य आहे, तशीच त्याची स्त्रीहि आहे. यास्तव सोम हा, देवांत असलेला, आपले गुरु बृहस्पति त्यांच्या स्त्रीशीं गमन कसा करील ? कारण मनुष्यांस नीति लागण्याचा मार्ग देवांकडून असणें सरळ आहे.

सोमानें तारेचें हरण करून तिला आपल्या गृहीं आणिल्यावर, त्याकडे बृहस्पति आला, आणि म्हणूं लागला कीं, माझी स्त्री दे. तेव्हां त्यानें, तुला दरिद्री ब्राह्मणाला इतकी सुंदर स्त्री कशाला पाहिजे ? असें म्हटलेलें, देवीभागवत व अन्य पुराणें यांत मला आढळलें;परंतु सोमानें तूं दरिद्री इ० केलेलें भाषण, श्रुतीस पराकाष्ठेचें विरुद्ध आहे. यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेंतलि श्रुतींत, मानुषानंदापासून ब्रह्मदेवापर्यंत अकरा आनंद क्रमानें शतशतगुणित अधिक असे वर्णिले आहेत, त्यांत सोम हा, अष्टवसूंतील एक वसु असल्यामुळें त्याची गणना देवांत असून, दवांच्या आनंदाहून शतगुणित आनंदी इंद्र आहे,व त्याहून शतगुणित बृहस्पति आनंदी आहे, तेव्हां सोमाचें तूं दरिद्री असें बृहस्पतीस म्हणणें अगदीं असंभाव्य होय. त्या श्रुतीच्या अर्थास अनुसरून श्लोक.—वसुरुद्रादिदवोनामानंदा ये शतं स्मृताः॥ इंद्रस्यैकः स विज्ञेय आनंदो जगदीशतुः ॥ २८८ ॥ आनंदा यत्र शक्रस्य शतं स तु बृहस्पतेः ॥ ( आत्म० अ० १० ). हें अर्वाचीन प्रमाण मी येथें घेऊं नये; परंतु श्रुति, येथें लिहितां येत नसल्यामुळें, तिच्या अर्थाबाहेर हें वाक्य तिळमात्र नाहीं असें जाणून घेतलें आहे.

सारांश पुराणकर्त्यांनीं, असले श्रुतिस्मृतिविरुद्ध लेख मुळींच लिहिलेले नसून, कोणी वंचकांनीं प्रतारणा करण्याकरितां नवे घातलेले असल्यामुळें कृतकच होत. यावर शास्त्रीबावांचें म्हणणें पडलें कीं, कृतक म्हणण्यापेक्षां कूटच म्हणावें हें बरें. मी पुसलें, कूट कसें ? त्यावर त्यांनीं सांगितलें, ( उमया सहितः सोमः ) म्हणजे उमेनेंसहित जो, त्याला सोम म्हणावें अर्थात् सोम शब्दाचा अर्थ शिव असा झाला. त्यानें,तारा असें पार्वतीला नांव आहे, तिचें हरण केलें म्हणजे तिला वरिलें. हा अर्थ मला कूट अशा दृष्टीनें बरा वाटला,व मी त्यांस म्हटलें,हा सर्वमान्य झाल्यास मलाही मान्य आहे. परंतु तारेस बुधपुत्र झाला, त्याची सिद्धि कशी ? गणपतिवर बुधाची कल्पना करावी किंवा कसें ? यावर ते म्हणूं लागले, व्युत्पत्तीनें समास होऊन जो अर्थ होतो, तो मी तुम्हास चमत्कारार्थ सांगितीला, पुढील बुधसंबंधीं प्रकरण तुमचें तुम्ही पहा. परंतु इतकें खरें कीं सोमानें तारेचें हरण केल्यावर, बृहस्पति त्याकडे येऊन त्यास म्हणूं लागला, सोमा, मीं परदारेचें हरण केलें, असें तूं मान्य कर म्हणजे मी जातों. तें सोम मान्य करीना; तो म्हणूं लागला, तारा ही माझी पूर्वजन्मींची भार्या आहे, यास्तव ती परस्त्री असें मी कसें मान्य करीन ? यावर त्यानें साक्षही पटविली असल्याची गाथा ऋक्संहितेंत आहे. यावर हें प्रकरण तुम्हास योग्य दिसेल तसें लावा.

ही गाथा मी पाहिली नाहीं, परंतु श्रुतींत असल्यास, तारा ही सोमभार्या पूर्वीची असेल आणि

तेवढ्याच बळानें, जर तो प्रस्तुत तिचा विवाह बृहस्पतीशीं झाला असतां तिचें हरण करितो, तर उघड सिद्ध होतें कीं, सोम हा परस्त्रीकामुक व गुरुस्त्रीकामुक खरा, यांत संशय नाहीं; पण एवढ्या भानगडीचें येथें मुळींच प्रयोजन नाहीं. तें असें.—

प्राचेतस दक्षानें सोमास आपल्या कन्यांतील सत्तावीस कन्या दिल्यावर, त्यानें सर्वांस घरीं आणिलें; परंतु सर्वांवर समान प्रीति ठेवावी ती न ठेवतां, इतरांचा अतिक्रम करून, सर्वांत अतिरूपवान् प्रमुख तारा रोहिणी, तिलाच सर्वदा घेऊन तो तिशीं रममाण होऊं लागला, त्या योगानें इतरांस संतति न होतां, तिला मात्र अत्यंत रूपवान् असा बुध नांवाचा पुत्र झाला, आणि याच कारणास्तव त्या बुधास रौहिणेय म्हटलेलें ग्रंथांतून दृष्टहि आहे. म्हणून हा अर्थ सरळ, व श्रुतिस्मृतींस अविरुद्ध जाणून, बुद्धिमानांनीं कुतर्काचा त्याग करावा.

**बोधदेश**–भारतवर्षीय देश.

**बोधप**–ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**बोध्य**–ययातिराजाशीं संवादकर्ता ऋषि ( भार० शांति० अ० १७८ ).

**बौद्ध**–पाखंडप्रवर्तक विष्णूचा एक अवतार. यानें पाखंड मोडावें असें युक्त असून वाढविलें, हें त्यानें सदोष कृत्य केलें; म्हणून त्यास वैदिकधर्मी मानीत नाहींत.

**ब्रध्नश्व**–एक राजर्षि. याकडेस एकदां द्रव्ययाचनेनिमित्त अगस्त्य ऋषि आला होता. त्यावरून यानें आपले आयव्यय त्यास दाखविले, ते पाहून त्याला वाटलें कीं, यापासून द्रव्य घेतल्यास याच्या प्रजेस पीडा होईल, म्हणून यास त्यानें समागमें घेऊन, त्रसद्दस्यु राजाकडे गमन केलें ( भार० वन० अ० ९८ ).

**ब्रह्म**–जेथें गुणत्रय, भेदत्रय, परिच्छेदत्रय नाहीं, माया व अविद्या हे उपाधि नाहींत, असें जें उत्पत्तिनाशरहित, वाणी व मनास अविषय, परंतु सच्चित्सुखमात्र पदार्थमात्रांच्या निषेधास अवधिभूत कांहीं वस्तु आहे तें.
२– वेदास व ब्राह्मणास, या नांवानें कधीं कधीं व्यवहार होतो.
३– मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**ब्रह्मकमंडलू**–तीर्थवि०.

**ब्रह्मचारि**–प्राधापुत्र गंधर्वांतील एक.

**ब्रह्मज्योति**–अग्निवि०.

**ब्रह्मतीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ.

**ब्रह्मतुंग**–भारतवर्षीय एक सामान्य पर्वत.

**ब्रह्मदत्त**–कालगौतम ऋषीच्या शापानें गृध्रयोनि पावलेला एक प्राचीन राजा. दाशरथि रामाच्या वेळेस, याचा व एका उलूकाचा गृहानिमित्त वाद पडला असतां उभयतां, रामसभेस आले, त्यावेळेस याचे रामाशीं भाषण होऊन, यास पूर्वयोनि प्राप्त झाली. ( वा० रा० उत्तर० क्षेपकस० ३ ).
२–सोमदा गंधर्वीस चूलिऋषीनें दिलेला पुत्र. हा कांपिली नगरींत राज्य करीत असे, व यास कुशनाभ राजानें आपल्या शंभर कन्या विवाह करून दिल्या होत्या ( कुशनाभ श० ) पहा.
३– ( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न एक प्राचीन राजा, याच्या पुत्रानें पूजनी ना० पक्षिणीचा पुत्र मारिल्यामुळें, तिनें त्याचे नेत्र फोडिले होते. त्यावरून ब्रह्मदत्तास दुःख होऊन, त्याचा व पूजनीचा बराच संवाद झाला होता. ( भार० शांति० अ० १३९ ).
४– ( सो० व० ) पुरुकुलोत्पन्न नीप अ० अणुहराजा, त्यापासून शुकाचार्याची कन्या कृत्वी अ० कीर्तिमती तिच्या ठायीं झालेला पुत्र. हा जन्मांतरींचा पितृवर्ती ब्राह्मण होय. यानें जैगिषव्य ऋषीच्या प्रसादानें योगमार्ग संपादन करून, योगतंत्र ना० ग्रंथ रचिला. यास गौ अ० सन्नति किंवा सरस्वती ना० स्त्री होती, व तिच्या ठायीं विष्वक्सेन नांवाचा पुत्र झाला होता.
५– अगस्त्य ऋषींनें रामचंद्रास दिलेला बाण. या बाणानें त्यानें मोठमोठे असुर मारिले ( वा० रा० अरण्य स० १२).

**ब्रह्मदेव**– सृष्टीच्या उत्पत्तीस कारणीभूत जो रजोगुण, त्याची मूर्तिमान् देवता. रजोगुण म्हणजे सत्त्वगुणाची आणि तमोगुणाची मध्यमावस्था; किंवा निमित्त कारण आणि विवर्तोपादानकारण त्या दोहींची मध्यमावस्था होय. म्हणून ब्रह्मदेव हा, सत्त्वगुणांत किंचित् मलिनता एतदुपाधिविशिष्ट असल्यामुळें, त्याच्याठायीं त्याच मानानें जरी कांहीं जीवत्वदशा आहे, तरी तो व्यष्टि जीवाप्रमाणें एकदेशी जीव नसून, समष्टीचा जीव आहे ( समष्टिजीव म्हणजे ब्रह्मांडांतील यच्चयावत् जीवांचा आधारभूत जीव ) अर्थात् संपूर्ण जीवांचा तो ईश्वर आहे. यानें जी मूर्ति धारण केली, ती केवळ स्वकीय इच्छेनेंच केली, या कारणास्तव यास स्वयंभू, व आत्मभू अशीं नावें असून, उपवेदांसहित चारही वेदांचें पूर्वादिदिशाक्रमानें हाच उत्पत्तिस्थान होय, अतएव यास चतुर्मुख चतुरानन इ. अर्थाचीं नावें आहेत. याची मूर्ति केवळ ज्योतिरूप असून, हा निरंतर सत्यलोकीं राहतो. यानें

संकल्पमात्रेंकरूनच सर्व सृष्टि निर्माण केली, म्हणून हा जरी तिचा कर्ता आहे, तरी व्यष्टि जीव जसा एका देहाचें तादात्म्य ( मी असा अभिमान ) धरितो, तसें संपूर्ण ब्रह्मांडाचें यास तादात्म्य असल्यामुळें, याच्या निद्राकाळीं सर्व जीव लय पावून, उत्थानकाळीं पुनः उत्पन्न होतात. तथापि याच्या मुक्तत्वानें सर्व जीव मुक्त होत नाहींत; कारण मोक्ष हा विचारसाध्य असल्यामुळें, तें म्हणणें श्रुतियुक्तिविरुद्ध आहे.

संपूर्ण देव, ऋषि, प्रजापति, यांचा हाच कर्ता असल्यामुळें, यास धाता, विश्वसृट् इ. अर्थाचीं अनेक नांवें असून पुत्रांकडून कांहीं प्राणी उत्पन्न करविल्यानें पितामह असेंही याला म्हटलेलें आहे ( भार० आदि० अ० ६५ ); ( भार० शांति० अ० ३३६); ( मत्स्य० अ० ३ ); ( भाग० ४ स्कं० अ० ८ ).

त्रेचाळीस लक्ष वीस सहस्र वर्षांचा एक पर्यय (चौकडी) असे सहस्र पर्यय झाल्यानें याचा एक दिवस होतो, व तितक्याच प्रमाणाची याची रात्र, अशा अहोरात्रास कल्प अशी संज्ञा आहे. याच्या प्रत्येक कल्पांत पृथिवीवर चौदा मनु, व स्वर्गांत चौदा इंद्र होतात. अशा ३६० कल्पांचें याचें वर्ष. या मानानें हा शतायु असून, सांप्रत याचें (प्रथम परार्ध ) पन्नास वर्षें गत होऊन, द्वितीय परार्ध चाललें आहे. त्यांत प्रथम वर्षाचा मास कितवा तो शोध लागत नाहीं; परंतु त्या मासांतील श्वेतवाराह संज्ञक सव्विसावा कल्प म्हणजे कृष्णपक्षांची एकादशी चालली आहे. यांत साहा मनु गत होऊन, सातव्या वैवस्वतमनूचे सत्तावीस पर्यय होऊन गेले आहेत, व अठ्ठाविसाव्या पर्ययांतील कलियुगाचीं पांच सहस्र वर्षें भरत आलीं आहेत ( भाग० ३ स्कं० अ० ११ ).

नूतन कल्प आरंभला म्हणजे, यास पुनः नूतन सृष्टि उत्पन्न करावी लागत्ये असें समजूं नये, तर ( यथापूर्वमकल्पयत् ) याप्रमाणें हा जागृत होतांच क्रम चालू होतो. कांहीं अव्यवस्थित झालेलें किंवा न्यून झालेलें, तेवढेंच पूर्ण करावें लागतें. म्हणून हा संपूर्ण चराचरांचा स्वामी, व गुरु असा म्हटलेला आहे.

२– भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० उद्योग० अ० १९६ श्लो० २५ ).

**ब्रह्मधाता**–प्रहेति राक्षसाचा पुत्र. हा कुबेराचा अनुचर होय.

**ब्रह्मपुरेयक**–एक ब्रह्मर्षि ( ३ वशिष्ठ श० ) पहा.

**ब्रह्मबल**– „ „ „

**ब्रह्मबली**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**ब्रह्ममाल**–भारतवर्षीय देश. ( वा० रा० किष्किंधा० स० ४० ).

**ब्रह्मयोनि**–भारतवर्षीय तीर्थ.

**ब्रह्मवादिनी**–अष्टवसूंतील प्रभास ना० वसूची स्त्री.

**ब्रह्मवान्**–एक ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० ) पहा.

**ब्रह्मविद्या**–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**ब्रह्मवेधी**–भारतवर्षीय नदी.

**ब्रह्मशत्रु**–रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ५४ ).

**ब्रह्मसर**–गयराजानें यज्ञ केलेलें गयसीर पर्वतासमीपचें तीर्थ.

**ब्रह्मसावर्णी**–पुढें होणारा दाहवा मनु, हा उपश्लोक ना० पुरुषापासून उत्पन्न होऊन, यास भौत्य असेंही नामांतर चालेल. याला भूरिषेण इ० पुत्र होतील, व हविष्मान्, सुकृत, सत्य, जय, मूर्ति, इ० यांच्या मन्वंतरांत सप्तर्षि होऊन स्वर्गामध्यें सुवासन, विरुद्ध इ० देव, व त्यांचा स्वामी शंभु नांवाचा इंद्र होईल. तसाच विश्वसृट् ऋषीपासून विषूची भार्येच्या ठायीं विष्वक्सेन म्हणून विष्णूचा अवतार होऊन, तो त्या इंद्राचें साह्य करील ( भाग० अष्टम० अ० १३ ).

**ब्रह्मस्थान**–भारतवर्षीय तीर्थ.

**ब्रह्मा**–ब्रह्मदेवप्रथमार्थक तोच.

**ब्रह्माणी**–ब्रह्मदेवाची शक्ति, सावित्री ती.

**ब्रह्मापेत**–सूर्यासमागमें असणारा आश्विनमासांचा राक्षस ( ३ इष श० पहा ).

**ब्रह्मावर्त**–ऋषभदेवाच्या शतपुत्रांत जे नऊ खंडांचे नऊ अधिपति, त्यांतील तिसरा. याचा खंड याच्याच नांवानें प्रसिद्ध होता.

२–भरतवर्षाच्या नऊ खंडांतील तिसरा. यासच प्रस्तुत भरतखंड असें नांव चालत आहे.

३–ब्रह्मावर्त अ० भरतखंडांतील एक महादेश. हा, यामुनदेश आणि कुरुक्षेत्र देश यांच्यामध्यें आहे. स्वायंभू मनु येथें राहात असे, व त्यानें आपली राजधानी बर्हिष्मती नगरी केली होती. या देशाविषयीं मनुस्मृतींत असें म्हटलेलें आढळतें.

**श्लोक.**

सरस्वतीदृषद्वत्योर्देवनद्योर्यदंतरम् ॥
तं देवनिर्मितं देशं ब्रह्मावर्तं प्रचक्षते ॥ १७ ॥
कुरुक्षेत्रं च मत्स्याश्च पंचालाः शूरसेनकाः ॥
एष ब्रह्मर्षिदेशो वै ब्रह्मावर्तादनंतरः ॥ १९ ॥
( मनुस्मृति अ० २ ).

४–भागीरथीच्या तीरीं सांप्रत असणारें क्षेत्र.

**ब्रह्मिष्ठ**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील तद्वंशीय मुद्गल ना० पंचालाचा पुत्र, याचा पुत्र इंद्रसेन.

**ब्राह्मणमंडल**–यजुर्वेदोपनिषत्.

**ब्राह्मणाद्वयतारक**– ,, ,,

**ब्राह्मणी**–भारतवर्षीय नदी.

**ब्राह्मी**–ब्रह्माणीस नांव. मातृगणांतील देवता.

---

## भ

**भग**–स्वायंभुव मन्वंतरांत झालेल्या दक्षयज्ञांतील ऋत्विज. यानें शिवगणांस क्रोधदृष्टीनें पाहिल्यावरून, वीरभद्रानें याचे नेत्र फोडिले होते ( भाग० ४ स्कं० अ० ५ ).

२–प्रतिपौषमासीं सूर्यमंडलावर आधिपत्य करणारा, द्वादशादित्यांतील आदित्य तो ( सहस्य श० पहा ).

**भगदत्त**–प्राग्ज्योतिष देश व नगर, तेथील राजा. हा, भौमासुर ज्यास नरकासुर असेंही म्हणत, त्याचा पुत्र होता. यास किरात व चीन इ० देशांतील राजांचा मोठा आश्रय असे. पांडवांनीं राजसूययज्ञ केला, त्या काळीं अर्जुन, उत्तरदिशा जिंकीत जात असतां, याकडे आला होता, व याशीं त्याचें आठ दिवस युद्ध झालें होतें; परंतु हा अर्जुनाच्या मारानें जर्जर होऊन त्यास युक्तीनें असें बोलूं लागला कीं, तुझें शौर्य पाहून मी संतुष्ट झालों, व इंद्र माझा सखा असून, तूं त्याचा पुत्र असल्यामुळें, तुशींही माझें सख्यच आहे. तर तुझें इष्ट मी काय करावें तें मला सांग. युधिष्ठिरानें यज्ञ आरंभिला आहे असें अर्जुन बोलला असतां, यानें द्रव्य पाहिजे असें जाणून, अपार द्रव्य दिलें, व त्यास मार्गस्थ केलें ( भार० सभा० अ० २६ ).

भारती युद्धांत हा दुर्योधनाकडे होता, व यानें प्रथम विराट राजाशीं युद्ध केलें ( भार० भीष्म० अ० ४३ ). गजयुद्ध करण्यांत हा मोठा कुशल असून, याजवळ गजही तसेच असत. यानें पांडवांच्या सेनेंत शिरून बहुतवेळा दाणादाण केली असे. एकदां हा, पांडवसेनेंत शिरून युद्ध करीत असतां, संशप्तकांकडे अर्जुन गेलेला त्यांचा पराभव करून माघारा परतला, आणि पाहातो तर, त्यानें सेनेंत मोठी गडबड करून दिली आहे. त्यावरून तो याच्यावर चालून जाऊन, याशीं त्यानें मोठें युद्ध केलें. त्या काळीं अर्जुनावर यानें वैष्णवास्त्र सोडिलें, त्याचा त्यानें नाश करून लागलेंच यासही मारिलें ( भार० द्रोण० अ० २९ ). यास कृतप्रज्ञ आणि वज्रदत्त असे दोन पुत्र, याच्या मागें होते.

२–याच नांवाचा दुसरा एक दुर्योधनपक्षीय राजा.

**भगपाद**–एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

**भगवत्पदी**–भागीरथी.

**भंगास्वन**–हा राजा मृगयेस गेला असतां, एका सरोवरांत स्नान करितांच स्त्री झाला अशी त्याची कथा आहे. तींत विशेष तात्पर्य नसल्यामुळें घेतली नाहीं ( भार० अनुशा० अ० १२ ).

**भगीरथ**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न सगरवंशीय दिलीप राजाचा पुत्र; दिलीप राजानें पूर्वजांच्या उद्धारार्थ गंगा प्राप्त व्हावी, म्हणून दीर्घकालपर्यंत तप केलें, परंतु ती सिद्धि त्यास न होतां तो मरण पावला. पुढें राज्यावर असलेला भगीरथ, यानेंही राज्याची व्यवस्था ठेवून पित्याप्रमाणेंच तप आरंभिलें, हें तप यानें हिमालयावरील गोकर्णक्षेत्रीं सहस्र वर्षे केलें (भार० वन० अ० १०८ ).

या तपेंकरून गंगा प्रसन्न होऊन यापुढें साक्षात् उभी राहिली, तीस पाहून यानें वंदन केलें, आणि प्रार्थना केली कीं, तूं आपल्या जलानें माझ्या पूर्वजांचा उद्धार करावास. तिनें सांगितलें, मी तुजकरतां यावें हें खरें, परंतु शारीरपातकी जन, मजमध्यें स्नानें करून आपआपलीं पातकें माझ्या ठायीं टाकतील, यास काय उपाय तो सांग. भगीरथ म्हणाला, पुण्यवान् प्राणी तुजमध्यें स्नानें करून, त्या पातकापासून तुला सोडवितील, आणि तसें झालें असतां तुला त्या पातकापासून बाधा होणार नाहीं. यास्तव कृपा करून मजवर अनुग्रह कर. तें याचें म्हणणें गंगेनें मान्य केलें, व अकलनंदा ना० प्रवाहानें तीं पूर्वीच स्थित असलेली, याच्या मागून येत येत हिमालयावर येऊन या भरतखंडांत आली, व तिनें याच्या पूर्वजांचा उद्धार केला. तेव्हांपासून गंगेस भागीरथी असें नांव पडलेलें अजून चालत आहे ( भार० वन० अ० १०९ ). ही कथा पुष्कळ लांबलचक आहे, परंतु मी येथें सारांश घेतला आहे.

भगीरथ मोठा दाता असे. यानें आपली कन्या हंसी कौत्सऋषीस दिली होती ( भार० अनुशा० अ० १३७ ). नाभ अ० नाभाग, आणि श्रुत, असे यास दोन पुत्र असत.

२–द्रौपदीस्वयंवरास आलेल्या राजांतील एक ( भार० आदि० अ० १८६ ).

**भगीवसु**-एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० ) पहा. भरद्वसु हाच असावा.

**भजमान्**-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या ज्यामघ-कुलांतील कथवंशीय सात्वत राजा, त्याच्या सात पुत्रांतील ज्येष्ठ. यास संजया आणि बाह्यका अशा दोन स्त्रिया होत्या. त्यांतून पहिलीस निम्लोचि, किंकिण आणि वृष्णि, असे तीन पुत्र, व दुसरीस शताजित्, सहस्राजित्, आणि अयुताजित्, असेहि तीनच पुत्र होते.

२-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतपुत्र अंधक, त्याच्या चार पुत्रांतील दुसरा.

३-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतपुत्र वृष्णि, तद्वंशीय अनमित्रपुत्र वृष्णि, तत्कुलोत्पन्न शूर ना० राजाचा पुत्र. यास शिनि नांवाचा पुत्र होता.

**भजि**-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वत राजा, त्याच्या सात पुत्रांतील दुसरा.

**भत्स्य**- एक ब्रह्मर्षि. ( २ कश्यप श० पहा .)

**भद्र**-देववि० ( तुषित श० पहा ).

२-तृतीयार्थक वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि. हा इंद्रप्रमदि ऋषीचा पुत्र. याचा पुत्र उपमन्यु ऋषि.

३-रामसभेंतील हास्यकार.

४-( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न शिवि, त्याच्या पांच पुत्रांतील तिसरा.

५-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न वसुदेवास, देवकीच्या ठायीं झालेल्या पुत्रांतील एक.

६-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न वसुदेवास पारवीपासून झालेल्या पुत्रांतलि एक.

७-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न कृष्णापासून कालिंदीस झालेल्या पुत्रांतील एक.

८-कर्णानें मारिलेला भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा. ( भार० कर्ण० अ० ५६ ).

९-भारतवर्षीय देश ( भार० वन० अ० २५४ ).

१०- भारतवर्षीय तीर्थ.

**भद्रकर्णेश्वर**-भारतवर्षीय क्षेत्र व तीर्थ.

**भद्रकाली**- पार्वतीस नांव.

**भद्रकालेश्वर**-क्षेत्र व तीर्थ.

**भद्रचारु**- कृष्णास रुक्मिणीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**भद्रतुंग**-भारतवर्षीय तीर्थ.

**भद्रमना**-कश्यपास क्रोधेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**भद्रवट**-भारतवर्षीय तीर्थ.

**भद्रवाह**-वसुदेवास पौरवीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**भद्रसाल**-भद्राश्ववर्षांतील वनवि...

**भद्रसेन**-ऋषभदेवाच्या नऊ खंडाधिपति पुत्रांतील एक. याच्या खंडास नांव हेंच.

२-भरतवर्षाच्या नऊ खंडांतील एक खंड.

३-वसुदेवापासून देवकीस झालेल्या पुत्रांतील एक.

**भद्रसेनक**-( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजित्, तत्पौत्र हैहयवंशीय महिष्मान् राजाचा पुत्र. हा रुद्रश्रेण्य अशा नामांतरानें प्रसिद्ध असे, व यास, दुर्मद आणि धनक असे दोन पुत्र असत.

**भद्रा**-मेरूची कन्या, व आग्नीध्रराजाचा पुत्र भद्राश्व त्याची स्त्री.

२-आत्रिपुत्र सोमाची कन्या, व उतथ्य ऋषीची स्त्री. (भार० अनुशा० अ० १५४) .

३-व्युषिताश्व राजाची स्त्री.

४-वसुदेवाच्या स्त्रियांतील एक. हिला संतति नव्हती.

५-केकयदेशाधिपति धृष्टकेतु, त्यास, वसुदेवभगिनी श्रुतकीर्ति, तिजपासून झालेली कन्या. हिला हिचे बंधु संतर्दनादिक त्यांनीं, विवाह करून कृष्णास दिली होती ( भाग० १० स्कं० अ० ५८ ).

६-भगवत्पदीचा उत्तरेकडील प्रवाह. हा कुरु देशांतून जाऊन समुद्रास मिळतो (भाग० ५ स्कं० अ० १७).

**भद्रायु**-एक राजपुत्र, यास ऋषभयोगी ऋषीनें शिव-कवच दिलें होतें.

**भद्रावती**-यौवनाश्व राजाची स्त्री.

२-वृषकेतूची प्रभद्रा ना० स्त्री तीच.

**भद्राश्व**-प्रियव्रतपुत्र आग्नीध्र, त्यास पूर्वचित्ती अप्सरे-पासून झालेल्या नऊ पुत्रांतील आठवा. त्याची स्त्री मेरुकन्या भद्रा असून, याच्या वर्षास हेंच नांव होतें.

२-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुवलाश्व राजाच्या तीन पुत्रांतील तिसरा, यास चंद्राश्व, चंडाश्व, अथवा दंड, अशीं नामांतरें होतीं.

३-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील तद्वंशीय भर्म्याश्व राजास नामांतर.

**भद्राश्ववर्ष**-जंबुद्वीपाच्या नऊ वर्षसंज्ञक भागांतील एक. हा वर्ष गंधमादन पर्वत आणि क्षारसमुद्र यांच्या मध्यें आहे. येथील अधिपति आग्नीध्रपुत्र भद्राश्व तो असे.

**भय**-अधर्मापासून निर्ऋतीच्या ठायीं झालेला पुत्र.

**भयंकर**-एक राजा ( ३ जयद्रथ श० पहा ).

**भया**-हेति ना० राक्षसाची स्त्री. विद्युत्केशाची माता. ( वा० रा० उत्तर० स० ४ ).

**भरणी**-प्राचेतस दक्षाची कन्या, व सोमाची स्त्री.

**भरत**-प्रियव्रतवंशीय ऋषभ देवापासून, जयंती भार्येच्या

ठायीं झालेल्या शतपुत्रांतील ज्येष्ठ. यास पंचजनी नांवाची स्त्री होती, व तिच्याठायीं यास, सुमति, राष्ट्रभृत, सुदर्शन, आवरण, आणि धूम्रकेतु, असे पांच पुत्र झाले होते. याच्या ऋषभदेव पित्यानें, अजनाभ वर्षाचे नऊ भाग अ० खंड करून, नऊ पुत्रांस दिले, आणि सर्वांवर प्रमुख यास केलें. त्यामुळें, व हाहि तसाच पराक्रमी असल्यामुळें, अजनाभवर्ष हें नांव मागें पडून त्यास, भरतवर्ष असें नांव पडलें, तें अजून तसेंच चालत आहे. याशिवाय, भरत हा, ब्रह्मावर्त ना० भ्राताच्य ब्रह्मावर्त खंडांत प्रायः राही म्हणून तेंहि नांव कांहींसें मागें राहून, त्याला भरतखंड असें नाव पडलें, म्हणूनच आम्ही वैदिकधर्मी संपूर्ण लोक कांहीं कार्याच्या आरंभीं संकल्प करतांना, ( भरतवर्षे, भरतखंडे, जंबुद्वीपे, ) असें म्हणत असतों ( भाग० १ स्कं० अ० १७ ). ( भाग० ५ स्कं० अ० ५ ).

या भारत राजानें, दहा सहस्र वर्षांचें एक अयुत, अशीं सहस्र अयुत वर्षे राज य केल्यावर, आपली संपत्ति आपल्या पुत्रांस विभागून देऊन, चक्रनदीतीरीं असणाऱ्या पुलह ऋषीच्या आश्रमांत तपार्थ गमन केलें ( भाग० ५ स्कं० अ० ७ गद्य ८ ). तेथें तप करीत असतां हा, त्याच जन्मांत ब्रह्मकैवल्यास पावावा, परंतु दैवगतीनें प्रतिबंध प्राप्त होऊन मध्यें यास हरिणयोनि प्राप्त झाली, तींतून सुटल्यावर, दुसऱ्या जन्मीं यास जडभरत या नांवाचा देह प्राप्त झाला, व तेथें हा कैवल्यपद पावला ( जडभरत श० पहा ).

२–शंयु ना० अग्नीचा पुत्र.

३–नाट्यशास्त्रप्रणेता एक ऋषि.

४–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्वपुत्र ऋतेयु, तत्पुत्र अंतिभारवंशान्वयसंभूत दुष्यंत राजास, शकुंतलेच्या ठायीं झालेला पुत्र ( शकुंतला श० पहा ). पित्याच्या मागें हाच राज्याधिकारी झाला. यास, विदर्भ राजाच्या तीन कन्या त्या तिघीहि स्त्रिया होत्या, व त्यांचे ठायीं याला पुत्रही झाले होते; परंतु ते रुपानें व पराक्रमानें यासारखे नव्हते म्हणून, त्यांनीं त्यांचा वध करून, यास ते मृत झाल्याचें कळविलें. त्यावरून हा दुःखी होऊन, बहुत काळपर्यंत अनपत्य असतां ममता ना० ब्राह्मणीचा पुत्र, वितथ या नांवाचा होता, तो यास मरुद्गणांनीं आणून दिला, व याचा जन्मदाता एक असून, तूं भरण करणारा दुसरा आहेस, त्या अर्थी याचें नांव भरद्वाज असो, असें म्हणून ते गेल्यावर, यानें त्यास पुत्र मानून, त्याचें संरक्षण केलें ( भाग० ९ स्कं० अ० २० ). ( भार० आदि० अ० ९४ ). यानें अनेक यज्ञ करून, कण्व ऋषीस अपार द्रव्य दिलें ( भार० शांति० अ० २९ ). यास पितृमातृसंबंधानें दौष्यंति, व शाकुंतलेय अशीं नांवें असत. याच्या मागें भारद्वाजच राज्याधिकारी झाला. दमन अ० सर्वदमन अशींही यास आणखी नांवें होतीं.

५–( सू० वं ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अजपुत्र दशरथास, कैकेयीपासून झालेला पुत्र. हा रामाचा सापत्न भ्राता असून, आकृतीनें त्यासारखाच असे. विश्वामित्र ऋषीनें रामलक्ष्मणांस यज्ञसंरक्षणार्थ नेऊन तो निर्विघ्न सिद्धीस गेल्यावर, तसेंच मिथिला नगरीस नेलें. त्या काळा रामाचा विवाह सीतेशीं झाला असतां, सीरध्वजाचा बंधु कुशध्वज त्यानें, आपल्या मांडवी ना० कन्येशीं याचाही विवाह केला, व पुढें यास युधाजितानें ( याच्या मातुलानें ) केकय देशीं शत्रुघ्नासहित नेलें, त्यावरून हा कांहीं काळपर्यंत तिकडे गेला होता.

या गोष्टीस बरेच दिवस लोटले असतां, दशरथाच्या मनांत आपला वार्धक्यविचार येऊन, रामास यौवराज्यावर स्थापावें असें त्यानें मनांत आणून, तद्विषयक सर्व सिद्धता केली. परंतु कैकेयीनें त्या समारंभास विघ्न करून, रामास अरण्यांत पाठविलें. त्या योगानें दशरथ अत्यंत दुःखी होऊन, मरण पावला असतां, वासिष्ठानें यास आणायासाठीं, सिद्धार्थ ना० प्रधानास केकयदेशीं पाठविलें. तेथें सिद्धार्थ जाऊन पोहोंचतो तों भरतास दुष्ट स्वप्न आधींच होऊन चिंताग्रस्त बसला होता. नंतर त्यास पाहतांच अयोध्येकडील वर्तमान पुसूं लागला. त्यानें क्षेम आहे असें सरासरी वरवर सांगून अयोध्येस सत्वर चलावें म्हणून म्हटलें. त्यावरून भरतानें मातामहास ( आईच्या बापास ), व मातुलास पुसून निघण्याची सिद्धता केली. तेव्हां त्यांनीं यास, अयोध्येस जाण्याची आज्ञा देतांच, हा निघून सिद्धार्थासहवर्तमान स्वनगरीं येऊन पोहोंचला.

नगरींतून राजमंदिरीं भरत जात असतां, त्याला ती उत्साहरहित दिसली, त्यावरून कांहीं तरी विपरीत आहे, असें त्यानें अनुमान केलें. तथापि तसेंच धैर्य धरून राजमंदिरीं गेला, परंतु तेथें पिता नाहीं असें पाहून, आपल्या मातेच्या मंदिरांत असेल अशा उत्कंठेनें तेथेंही जाऊन पाहतो तों, माता एकटीच दृष्टीस पडली. म्हणून तिला वंदन करून पुसूं लागला

कीं, पिता कोठें आहे तें सत्वर सांग; कारण त्यास न पाहिल्यानें मला भय व दुःख होतें. याप्रमाणें त्याचें भाषण श्रवण करून, त्यास, आलिंगनपूर्वक कैकेयी बोलूं लागली, भरता, स्वस्थ हो, व सांगत्यें तें श्रवण कर.

तूं मातुलगृहीं गेल्यावर, राजानें ( तुझ्या पित्यानें ) रामास यौवराज्य द्यावें असें मनांत आणून सर्व सिद्धता केली, तें वर्तमान मला समजतांच, मला पूर्वी राजानें दोन वर देऊन ठेविलेले मी मागून घेऊन, एका वरेंकरून रामानें दंडकारण्यांत जावें, व दुसऱ्या वरानें तुला राज्य प्राप्त व्हावें असें केलें. त्यावरून राम, लक्ष्मण व सीता यांस समागमें घेऊन, अरण्यांत गेल्यानें राजा शोकाकुलित होऊन मरण पावला. तर आतां तूं शोक अगदीं करूं नयेस; कारण, दुर्लभ राज्य प्राप्त झालें असून, मृताकरितां किती जरी शोक केला, तरी तो व्यर्थच होय. असें भरतानें मातेचें वाक्य श्रवण करून, त्यास अनिवार दुःख, व संताप होऊन त्यानें तिची अतिशय निर्भर्त्सना केली, व तसाच तेथून निघून कौसल्येच्या मंदिरांत गेला, व तिला वंदन करून, अधोमुख होत्साता रुदन करीत तिजपुढें उभा राहिला.

भरतास पाहून, कौसल्येनें त्यास आलिंगन दिलें, आणि ती विशेष कांहीं न बोलतां, इतकेंच म्हणून शोक करूं लागली.—

### श्लोक.

" पुत्र त्वयि गते दूरमेवं सर्वमभूदिदम् ॥ उक्तमात्रा श्रुतं सर्वं त्वया ते मातृचेष्टितम् ॥ ८४ ॥ पुत्रः सभार्यो वनमेव यातः सलक्ष्मणो मे रघुरामचंद्रः ॥ चीरांबरो बद्धजटाकलापः संत्यज्य मां दुःखसमुद्रमग्नाम् ॥ ८५ ॥ हा राम हा मे रघुवंशनाथ जातोसि मे त्वं परतः परात्मा ॥ तथापि दुःखं न जहाति मां वै विधिर्बलीयानिति मे मनीषा ॥ ८६ ॥ ( अध्या० रा० सं० ७ अयो० ). असा तिचा शोक पाहून, भरतास कसें झालें असेल, याची कल्पना वाचणारांनींच करावी. सारांश, भरत तिला असें म्हणूं लागला कीं, मातेनें केलेलें कृत्य मला किंचित्‌ही विदित नाहीं. याविषयीं त्यानें तिच्या पायांचीच शपथ केली. पुढें वसिष्ठ तेथें येऊन, त्यांनीं भरताचें पुष्कळ प्रकारांनीं सांत्वन करून, राजाचें और्ध्वदेहिक त्याकडून सर्व यथासांग करविलें.

पुढें सर्व जिकडील तिकडे झाल्यावर, वसिष्ठांनीं सभा करून, तींत भरतास बोलाविलें आणि तो आल्यावर, त्यास सांगितलें कीं, तुझ्या मातेनें तुजकरितां संपादिलेलें राज्य, तूं ग्रहण करावेंस. तें वसिष्ठ गुरूचें भाषण ऐकून, भरतास असें झालें कीं, मरण आलें असतें तरी बरें होतें, परंतु हे शब्द श्रवण करणें नकोत. त्यानें मनांत म्हटलें कीं, लक्ष्मण मोठा भाग्यवान् होय, अस्तु. असा आपल्या जन्माविषयीं तिरस्कृतांतःकरण झालेल्या भरतानें वसिष्ठांस विनंती केली कीं मला राज्य स्वीकारणें नाहीं, या राज्याचा वास्तविक अधिकारी रामचंद्रच असून, त्यानें राज्य करावें व आम्ही त्याची आज्ञा पालन करून असावें, असें असतां प्रस्तुत असा प्रसंग ज्या अर्थी आला आहे, त्या अर्थी याचा प्रतिबंध करण्याकरितां मी रामाकडे जाणार, व त्यास, अरण्यांतून माघारें आणून, त्याचें राज्य त्यास देणार. इतकें बोलून यानें निघण्याची सिद्धता केली. ती पाहून अयोध्यावासी सर्व जनांनीं याची स्तुति केली.

रामास परत आणण्याकरितां, मातादिकांसहवर्तमान भरत निघाला, तो गुहना० किराताधिपतीच्या शृंगवेर पुरासमीप सैन्यासहित येऊन उतरला ( गुह-शब्द पहा ). गुहानें यास भागीरथींतून नौकांनीं पार केल्यावर, हा तेथून निघाला तो मार्गांत लागलेल्या भरद्वाजाश्रमासमीप उतरला. नंतर पादचारी, व एकाकी जाऊन त्यानें ऋषीचें दर्शन घेतलें. ऋषीनेंही त्याचें आतिथ्य उत्तम प्रकारानें करून त्यास मार्गस्थ केलें (वा० रा० अयोध्या० स० ९०-९१). पुढें चित्रकूट पर्वतावर जाऊन रामास भेटला, व तेथें याचें त्याचें काय भाषण व्हावयाचें तें होऊन, रामानें यास अयोध्येस परत लाविलें (१ चित्रकूट श० पहा). यानें पुढें शत्रुघ्नाकडे राज्याची व्यवस्था सांगून, राम अरण्यांतून परत येईपर्यंत चौदा वर्षें नंदिग्रामांत वास्तव्य केलें.

रामचंद्र रावणास मारून परतल्यावर भरद्वाजाश्रमास येतांच, त्यानें, आपण आल्याचें वृत्त यास सत्वर कळावें म्हणून नंदिग्रामीं मारुतीस याकडे पाठविलें, त्यानें तें जाऊन कळवितांच, याला पराकाष्ठेचा हर्ष झाला, व यानें अयोध्या नगरी शृंगारवून, रामाच्या येण्याकडे नेत्र लाविले. पुढें राम येतांच, यानें त्याचें राज्य त्यास दिलें, व आपण त्याचा आज्ञाधारक होऊन राहिला. रामानेंही यास आपला युवराजा केलें.

रामचंद्र राज्य करीत असतां, त्यानें एके काळीं

श्रवण केलें कीं, गांधार देशांत गंधर्व उन्मत्त होऊन, त्यांनीं प्रजेस अतिशय पीडा दिली आहे. त्यावरून तिकडे जाण्याची आज्ञा भरतास झाली असतां, त्यानें तक्ष आणि पुष्कर या दोन पुत्रांस समागमें घेऊन सैन्यासहित गांधार देशीं गमन केलें, व गंधर्वांस पराभवपूर्वक तेथून हकून लावून, दोघांच्या नांवांचीं दोन नगरें त्यांत वसवून, त्यास तेथें स्थापिलें, व अयोध्येस परत आला ( वा० रा० उत्तर० स० १०१ ). अशीच कारुपथ देशांत, रामानें याकडून चंद्रकांत नगरी वसवून तेथें लक्ष्मणाचा पुत्र चंद्रकेतु, त्याचीही स्थापना करविली ( वा० रा० उत्तर० स० १०२ ). पुढें रामचंद्र निजधामास गेला असतां हाही त्यासमागमेंच स्वर्लोकीं प्राप्त झाला (२ राम श० पहा).

**भरतखंड**–प्रियव्रतवंशीय ऋषभदेवाच्या नऊ खंडाधिपति पुत्रांतील तिसरा जो ब्रह्मावर्त ना० पुत्र, त्याचा त्याच नांवाचा खंड तो, येथें नवांवरहि आधिपत्य करणारा भरत राहात असे म्हणून, त्यास हें नांव पडलें. यास द्वीप, असें पुराणांत म्हटलेलें आढळतें; परंतु हें द्वीप नाहीं, खंडच आहे ( खंड श० पहा ). याची उत्तरेकडील पूर्वपश्चिम लांबी नऊ सहस्र योजनांहून कांहीं उणी आहे, व पश्चिमेकडील समुद्राशीं संलग्न झालेल्या प्रथमार्थक हिमालयाच्या टोंकापासून तिर्कस रुंदी कुमारीपर्यंत दहा सहस्र योजनें असून, केवळ लंबरूप दाक्षिणोत्तर रुंदी कुमारीपासून गंगेच्या उगमापर्यंत सहस्र योजनें आहे. **श्लोक.**–योजनानां सहस्रं तु खंडोयं दक्षिणोत्तरः ॥ आयतस्तु कुमारीतो गंगायाः प्रवहावधिः ॥ तिर्यगूर्ध्वं तु विस्तीर्णः सहस्राणि दशैव तु ॥ ९ ॥ ( मत्स्य० अ० ११३ ). म्हणून याची आकृति, आमच्या मोडी अक्षरांतील व प्रमाणें ᨀ अशी आहे.

हा खंड भरतवर्षाचा नववा भाग आहे, म्हणून याचें क्षेत्रफळ, त्याच्या नवव्या भागाइतकेंच एकाहत्तर लक्ष, बारा सहस्र, तीनशें अकरा, व एक नवमांश योजनें; म्हणजे पंचेचाळीस कोटी, एकावन्न लक्ष सत्यायशीं सहस्र, नऊशें अकरा, व एक नवमांश, इतकें चौरस मैल आहे.

भास्कराचार्यप्रभृति अर्वाचीन ब्राह्मण, ज्योतिषी, व न्यूटनप्रभृति युरोपियन ज्योतिषी, यांस जी भूमि दृग्गोलावरून गणितानें गोचर झाली, तिचा व्यास, त्यांनीं आठ सहस्र मैल, व परिधि पंचवीस सहस्र मैल निश्चित करून, ती गोलाकार आहे अशा कल्पनेनें तिचें पृष्ठफळ, पंधरा कोटी मैल काढिलें आहे. परंतु ती भूमि गोलाकार नसून वर्तुलाकार आहे म्हणून, तिचें क्षेत्रफळच केलें पाहिजे, व तें पांच कोटी मैल आहे. हें क्षेत्रफळ, सर्व भरतखंडाच्या नवव्या भागाइतकेंच असल्यामुळें, अर्वाचीन ज्योतिष्यांस, संपूर्ण भरतखंडाचा थांग नसून केवळ नववाच भाग मात्र सरासरी गोचर आहे. सारांश असा जो भरतखंडाचा नववा भाग, त्यांतच एशिया युरोपादिक खंडें युरोपियनांनीं मानिलीं आहेत असें समजून, भरतखंड म्हणजे हिंदुस्तान, असा जो त्यांनीं समज करविला आहे, किंवा आपणास झाला आहे तो केवळ चुकीचा असें ध्यानांत ठेवावें.

भरतखंड हा, आसमंताद्भागीं सर्वत्र म्लेंछांनीं व्याप्त असून, याच्या पूर्वपश्चिम दिशांस तर, यवन आणि किरात हेच असतात, यामध्यें शतयोजनें औरस चौरस प्रमाणाचे देश सातशें आहेत, आणि त्यावरून प्रमाण काढिल्यास गोचर नवव्या भागांत देश सुमारें अठ्याहत्तर असल्यामुळें, भारतांत सांगितलेले सर्व देश येथें अनुभवास येत नाहींत.

पृथिवी अल्प परिमाणाची, गोलाकार व सूर्यासभोंवतीं फिरत्ये, इत्यादिक कल्पना आमच्या प्राचीन इतिहासकार ऋषींस संमत नसल्यामुळें, त्यांस अनुसरून लिहिणाच्या मला तर संमत नाहींतच; परंतु माझ्या वैदिकधर्मी सर्व बांधवांसही नसाव्यात; कारण, तिजभोंवतीं पूर्वपश्चिम प्रदक्षिणा करून आलेल्यांस अजून दक्षिणोत्तर प्रदक्षिणा झाली नाहीं व कल्पसमाप्तीपर्यंत किंवा पुढें होईल, असेंहि कधीं होणार नाहीं.

तर मग गोलाकारादिक कल्पना व्यर्थच कीं काय? त्यास असेंहि नाहीं, व्यक्त संख्या सुलभ रीतीनें सांपडण्यास, जशीं अव्यक्त पदें कल्पितच, परंतु क्षणभर उपयुक्त आहेत; तशाच सुलभोपायानें गणितव्यहार सिद्ध होण्यास, गोलाकारादिक कल्पनाही आहेत. मात्र त्या वास्तविक नव्हत; कारण व्यवहारानिर्वाहार्थ केलेल्या कल्पना, वास्तविकाच्या बाधक होत नाहींत ( ग्रह श० पहा ).

**भरतवर्ष**–प्रियव्रतपुत्र आग्नीध्र राजा, त्याच्या नाभि ना० ज्येष्ठ पुत्राचा जो अजनाभ नांवाचा वर्ष, त्यासच हें नांव पुढें पडलें. हा वर्ष जंबुद्वीपाचा नववा भाग आहे. याच्या चतुःसीमा, उत्तरेस हिमालय पर्वत ( हा हिमालय प्रथमार्थक, समजावा ), व पूर्व, पश्चिम आणि दक्षिण, या तीन दिशांकडे अपार क्षार ( खारा ) समुद्र आहे. याची उत्तरेकडे पूर्वपश्चिम लांबी, हिमालयाइतकीच म्ह० ऐशीं सहस्र योजनें

असून हिमालयापासून क्षारसमुद्रापर्यंत दक्षिणोत्तर रुंदी, पूर्ण बाराशें योजनें आहे. श्लोक- हिमाद्रेर्दक्षिणं वर्षं भरताय न्यवेदयत् ॥ तस्मात्तु भारतं वर्षं तस्य नाम्ना विदुर्बुधाः ॥२३-२४॥ ( लिंग० अ० ४७ ).

जंबुद्वीप हें मेरुसभोंवतें वर्तुलाकार स्थितीनें स्थित आहे म्हणून, त्याच्या आसमंतात् असणारा क्षारसमुद्र, तोही तशाच आकाराचा आहे, आणि त्याच कारणामुळें, मेरूच्या दक्षिणोत्तर प्रदेशीं क्षारसमुद्रासमीप, धनुष्याकृति असे, दोन वर्षसंज्ञक भूभाग झालेले आहेत ( धनुर्वत्संस्थिते ज्ञेये द्वे वर्षे दक्षिणोत्तरे ) ( मत्स्य० अ० ११२ श्लो० ३२ ). ( भार० भीष्म० अ० ६ ). सारांश, ज्या ( दोरी ) चढविलेल्या धनुष्याप्रमाणें याचा आकार असून, याच क्षेत्रफळ, साहा कोटी, चाळीस लक्ष, दहा सहस्र, आठशें योजनें आहे. करून पाहणें असल्यास, दोनतृतीयांश ज्या, तिला उंचीनें अथवा रुंदीनें गुणून त्या गुणाकारांत, उंचीचा घन दुप्पट ज्या तिनें भागून येईल भागाकार तो मिळवावा, म्हणजे धनुष्याकृतीचें क्षेत्रफळ होतें ( येथें ज्या म्ह० हिमालयाची ऐशीं सहस्र योजनें लांबी, ती समजावी ).

या वर्षाचे ऋषभदेवानें नऊ भाग करून,आपल्या नऊ पुत्रांस दिले, तेच नऊ खंड कुशावर्तादिकांच्या नांवानें प्रसिद्ध आहेत. यांत, दुसरा हिमालय, महेंद्र, मलय, सह्याद्रि, विंध्याद्रि, शुक्तिमान्, ऋष्यवान् आणि पारियात्र, असे आठ मुख्य उपपर्वत असून, सहस्रावधि महानद्या, व शतयोजनें चौरस चौरस प्रमाणाचे महादेश, सहा सहस्र तीनशें आहेत. याशिवाय लहान लहान पर्वत, वर लिहिलेल्या उपपर्वतांच्या नांवांचे कित्येक असून कित्येक अन्यनांवांचेही आहेत. हा कर्मभूमि असून इतर वर्ष व द्वीपें भोग्य भूमि भरतवर्ष आहेत. म्हणजे त्यांस भौम स्वर्ग अशी संज्ञा आहे.

**भरती**-भरत ना० अग्नीची कन्या.

**भरद्वसु**-एक ब्रह्मर्षि. भगीवसुहि यासच म्हणत असतील असें वाटतें.

**भरद्वाज**-हा ब्रह्मर्षि पूर्व मन्वंतरांतील होय.यास श्रुतावती नामक कन्या होती ( श्रुतावती श० पहा ).

२-शंयु नांवाचा अग्नीचा पुत्र. यास, वीरा स्त्रीपासून वीर ना० पुत्र झाला होता. हाच भरद्वाज चालू मन्वंतरांतल्या सप्तर्षींतलि बहुधा एक असावा, व प्रतिवर्षीं फाल्गुनमासींच्या सूर्यासमागमें संचार करणारा तोही हाच असेल ( १ तपस्य श० पहा ).

३-आंगिरसकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि. रैभ्यऋषीचा मित्र. ( यवक्रीत श० पहा ).

४-वाल्मीकि ऋषीचा शिष्य (वा० रा० बाल० स०२). हा, प्रयागामध्यें राहात असे. दाशरथि राम दंडकारण्यांत चालला असतां, याच्या दर्शनास आला होता, व मला राहण्यास एकादें स्थळ सांगा, असा त्यानें यास प्रश्न केला होता. त्यावरून यानें येथून दहा कोसांवर चित्रकूट पर्वत आहे, तेथें जाऊन राहण्यास सांगितलें, व आपल्या शिष्यांकडून तिकडे जाण्याचा मार्ग दाखविल्यावरून, रामचंद्र तिकडे गेला ( वा० रा० अयो० स० ५४-५५ ).

असाच भरतही याच्या भेटीस, रामास आणायास चालला असतां आला होता. नंतर भरत नंदिग्रामीं जाऊन राहिल्यावर, रामानें रावणवधादिक कृत्य आटोपल्यावर, पुनः अयोध्येस परत येत असतां, याची भेट घेतली होती ( वा० रा० युद्ध० स० १२६ ).

५-( सो० वं० )पूरुकुलोत्पन्न दुष्यंतपुत्र भरत, त्यास मरुद्गणांनीं दिलेला पुत्र, भरताच्या मागें हाच राज्याधिकारी झाला. यास वितथ आणि वरुथ, अशीं नामांतरें असून, पुत्र मन्यु अशा नांवाचा होता.

**भरा**-विशालपुरीच्या राजाची कन्या, हिला करूष देशाधिपतीच्या पुत्रास, हिच्या पित्यानें दिलें असतां, ती आपली मातुलभगिनी आपणास मिळावी, या हेतूनें हिचा विवाह झाल्यावर असेल, हिच्या पतीचें रूप धारण करून शिशुपालानें हिचें हरण केलें होतें. भरेचा पिता शिशुपालाचा सापत्न मातुल असावा; कारण याचा प्रत्यक्ष मातुल वसुदेव होता.

**भरुक**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरिश्चंद्रवंशीय विजय राजाचा पुत्र, यास रुचक असें नामांतर असून, पुत्र वृक नांवाचा होत .

**भर्ग**-शिवास नांव, व एक रुद्र आहे तो ( एकादश रुद्र श० पहा ).

२- ( सो० वं० ) तुर्वसूचा पौत्र, व वन्हि ना०राजाचा पुत्र, याचा पुत्र भानुमान्.

३-( सो० वं० )आयुपुत्र क्षत्रवृद्ध, तद्वंशीय काश्यकुलोत्पन्न वीतिहोत्राचा पुत्र. याचा पुत्र भार्गभूमि.

४-भारतवर्षीय पूर्वनिषाद देश तो.

**भर्तृस्थान**-भारतवर्षीय तीर्थ.

**भर्म्याश्व**-(सो० वं०)आयुकुलोत्पन्न पूरुवंशीय अजमीढपुत्र नीलान्वयसंभूत अर्क राजाचा पुत्र भद्राश्व तोच. हा मोठा पराक्रमी होता. यास मुद्गल, यवीनर,

बृहदिपु, कांपिल्य आणि संजय, असे पांच पुत्र याच्याचप्रमाणें पराक्रमी असत. त्यामुळें हा, संतोषानें असें म्हणे कीं, माझें राज्य संरक्षण करण्यास, हे पंच पुत्र अलं ( पुरत ) म्हणून त्या पांचांस पंचाल असें नांव पडलें, आणि याच कारणास्तव त्यांच्या देशास, व वंशास पांचाल असें नांव पडलें होतें (भार० वन० अ० २१ ).

**भलंदक**–वैश्यजातीय मंत्रद्रष्टा ऋषि ( मत्स्य० ).

**भलंदन**–एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

२–( सू० वं० ) दिष्टपुत्र नाभागाचा पुत्र. याचा पुत्र वत्सप्रीति.

**भल्लाट**–भारतवर्षीय देश.

**भल्लाद**–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न पूरु, तद्वंशीय अजमीढपुत्र बृहदिपु, त्याच्या वंशांतील उदक्स्वन राजाचा पुत्र.

**भव**–शिवास नांव असून, एक रुद्रही आहे.

२–वसुदेवास रथराजीपासून झालेला पुत्र.

**भवनंदि**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**भवानी**–सतीस म्ह० पार्वतीस हें नांव आहे.

**भस्म**–अथर्वणवेदोपनिषत्.

**भस्मासुर**–शिवाच्या भस्मापासून उत्पन्न झालेला असुर. यानें ज्याच्या मस्तकीं हात ठेवावा त्यानें दग्ध व्हावें, असें यास वरप्रदान होतें; परंतु यानें पुढें दुर्बुद्धि धारण करून, प्राणिमात्रांस पीडा आरंभिली, त्यामुळें, विष्णूनें याचा हात याच्या कडूनच याच्या मस्तकीं युक्तीनें ठेवून यास दग्ध करविलें.

**भागवित्तायन**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**भागवित्ति**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**भांगासुरि**–ऋतुपर्ण राजास नामांतर. या नांवाचें प्रयोजन काय, तें आढळलें नाहीं.

**भागिल**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**भागीरथी**–भगीरथानें आणल्यामुळें गंगेस नांव ( १ गंगा श० पहा ).

२–द्वितीयार्थक हिमालयापासून निघालेली नदी, हिला गंगा असेंहि नांव आहे.

**भागुरि**–युधिष्ठिराश्वमेधांतील सदस्य.

**भांडायनि**-ऋषिवि०.

**भानु**–सूर्यास साधारण नांव.

२–स्वारोचिषमनूच्या पुत्रांतील एक.

३–प्राचेतस दक्षाची कन्या, व धर्मऋषीच्या स्त्रियांतील एक. हिचा पुत्र देवऋषभ.

४–प्राधापुत्र गंधर्वांतील एक.

५–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अनीहपुत्र सहस्राश्व, तद्वंशीय चंद्रगिरि राजाचा पुत्र. याचा पुत्र चंद्रराजा.

६–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ध्रुवसंधिवंशीय प्रतिव्योम राजाचा पुत्र. याचा पुत्र दिवाक् अ० दिवाकर.

७–कृष्णापासून सत्यभामेस झालेल्या पुत्रांतील एक.

**भानुदत्त**–भीमानें मारिलेल्या शकुनीच्या भ्रात्यांतील एक ( भार० द्रोण० अ० १५७ ).

**भानुदेव**–कर्णानें मारिलेला पांडवपक्षीय पांचाल ( भार० कर्ण० अ० ४८ ).

**भानुनीथ**–एक बलाढ्य यादव.

**भानुमंत**–भीमानें मारिलेला दुर्योधनपक्षीय कलिंग राजा ( भार० भीष्म० अ० ५३ ). ( भार० द्रोण० अ० १५५ ). याचा बंधु वृषक, आणि पुत्र शक्रदेव.

**भानुमती**–सूर्यवंशीय सगर राजाच्या दोन स्त्रियांतील एक. असमंजाची माता.

२–बृहस्पतीची स्त्री शुभा, तिच्या सात कन्यांतील ज्येष्ठ.

**भानुमान्**–ईशान्यकोसल देशाचा राजा. कौसल्येचा पिता ( वा० रा० बाल० स० १३ ).

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ध्रुवसंधिवंशीय सहदेव राजाचा पुत्र. यास ध्रुवाश्व असें नामांतर असून, पुत्र प्रतीकाश्व होता.

३–( विदे० वं० ) केशिध्वज जनकाचा पुत्र. याचा पुत्र शतद्युम्नजनक.

४–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न तुर्वसुवंशीय भर्ग राजाचा पुत्र. याचा पुत्र त्रिभानु.

५–कृष्णास सत्यभामेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**भानुविंद**–एक यादव.

**भानुसेन**–भीमानें मारिलेला एक कर्णपुत्र (भार० कर्ण० अ० ४८ ).

**भारत**–कृष्णद्वैपायन व्यासानें रचलेला इतिहास. याची श्लोकसंख्या एक लक्ष असून, हा पूर्ण होण्यास तीन वर्षें लागलीं होतीं ( भार० स्वर्गारोहण० अ० ५ श्लो० ४८ ).

**भारतीयुद्ध**–कौरवपांडवांचें, हस्तिनापुरासमीप असणाऱ्या कुरुक्षेत्रांत झालेलें युद्ध तें. या युद्धांत पांडवांकडे यादवांसंबंधी कृष्ण आणि सात्यकि, दोघे असून, कृतवर्मा दुर्योधनाकडे दिला होता. कौरवपांडवांची सेना युद्धभूमीवर आली असतां, तिला शिबिरें देऊन उतरण्यास, औरस चौरस पांच योजनें म्ह० वीस कोस लांब व तितकीच रुंद, इतकी भूमि आटली

होती ( भार० उद्यो० अ० १९५ श्लो० १५ ).

या युद्धांत, पांडवांकडे सेना सात अक्षौहिणी व कौरवांकडे अकरा, मिळून अठरा अक्षौहिणी होती. सांप्रत अक्षौहिणीची संख्या लोकप्रचारांत अशी आहे. २१,८७० हत्ती, तितकेच रथ, तिप्पट अश्वारोह ( स्वार ) आणि पांचपट पदाति ( पायदळ ) मिळून दोन लक्ष, अठरा सहस्र, सातशें, यांची अठरापट ३७,३६,६००. यावरून कौरवपांडवांचें सैन्य काय तें इतकेंच असें वाटतें; परंतु संपूर्ण युद्ध समाप्त झाल्यावर, धृतराष्ट्रानें युधिष्ठिरास सर्व सैन्य किती मरण पावलें असा प्रश्न केला असतां, त्याचें उत्तर त्यानें असें दिलें आहे.—

**श्लोक.**

दशायुतानामयुतं सहस्राणि च विंशतिः ॥
कोट्यः षष्टिश्च षट् चैव ह्यस्मिन् राजन् मृधे हताः ॥९॥
( भार० स्त्रीपर्व० अ० २६ ).

यावरून एका अक्षौहिणीची संख्या, तीन कोटींवर आहे असें दिसतें.

भारतीयुद्धास, कार्तिक शुक्लपक्षींच्या त्रयोदशीस आरंभ झाला होता (भार० द्रोण० अ० १८४). युद्ध आरंभल्यापासून, तें समाप्त होईपर्यंत, अठरा दिवस पांडवांकडे एकच सेनापति धृष्टद्युम्न होता, आणि तितक्याच काळांत कौरवांकडे दहा दिवस भीष्म, पांच दिवस द्रोणाचार्य, दोन दिवस कर्ण, आणि एक दिवस शल्य, यांतच अर्धा दिवस दुर्योधनाचा; परंतु दुर्योधन स्वतः राजा, म्हणून वगळून सेनापति चार झाले होते. या अष्टादशदिनात्मक भयंकर युद्धांत, कौरवांचा व पांडवांचा पक्ष धरून आलेले सर्व राजे सैन्यासहित मरण पावले, एकही स्वदेशीं परत गेला नाहीं. केवळ दहा योद्धे मात्र वांचले; म्हणजे पांडवांकडे पांच पांडव, कृष्ण आणि सात्यकि, असे सात; आणि कौरवांकडे अश्वत्थामा, कृपाचार्य आणि कृतवर्मा, असे तीन, मिळून दहा ( १ अश्वत्थामा शब्दावरील श्लोक पहा ).

**भारद्वाज**—एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा. ) हा बहुतकरून चालू मन्वंतरांत बारावा व्यास झाला असावा ( व्यास श० पहा).

२—द्युमत्सेन राजाचा अरण्यांतील सखा एक ऋषि(भार० वन० अ० २९८ ).

३—द्रोणाचार्यास हें नांव ग्रंथांत आढळतें (भार०उद्योग० अ० १९५

४—दक्षिणसमुद्रतीरीं तीर्थवि० ( नारीतीर्थ श० पहा ).

**भारद्वाजि**—भारद्वाज ऋषीचा पुत्र ( ३ अंगिरा श० पहा).

**भारद्वाजी**—भारतवर्षीय नदी.

**भारुंडवन**—केकयदेशांतून अयोध्येकडे येतांना मार्गांत लागणारें वन.

**भार्गभूमी**—( सो० वं०) आयुपुत्र क्षत्रवृद्ध,ह्याच्या काश्य वंशीय भर्ग राजाचा पुत्र.

**भार्गव**—भृगुवंशोत्पन्न ऋचीक, जमदग्नि, परशुराम इ०कांस साधारण नांव.

२—चालू मन्वंतरांतील पंचविसावा व्यास ( व्यास श० पहा).

३—भारतवर्षीय देश.

**भार्गवत**—ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा).

**भार्गेय**—ब्रह्मर्षि (३ भृगु श० पहा).

**भालुकि**—पांडवांसमागमें द्वैतवनांत होता ऋषि तो.

**भावन**—उत्तममनूच्या मन्वंतरांतील देववि०.

**भावना**—अथर्वणवेदोपनिषत्.

**भावास्यायनि**—ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा).

**भासकर्ण**—मारुतीनें मारिलेला रावणसेनापति राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ४६ ).

**भासी**—कश्यपापासून ताम्रेस झालेल्या कन्यांतील एक.

२—काश्यपापासून प्राधेस झालेल्या अप्सरांतील एक.

**भास्कर**—सूर्यास नांव.

**भास्करी**—ब्रह्मर्षि ( भार० शांति० अ० ४७ ).

**भिक्षु**—यजुर्वेदोपनिषत्.

**भीम**—शिवास नांव आहे.

२—मुनीस झालेल्या देवगंधर्वांतील एक. यास भीमसेनही म्हटलें आहे.

३—( सो० वं० ) पुरूरव्याचा पुत्र विजय राजा, त्याचा पुत्र. याचा पुत्र कांचन राजा.

४—शंकरानें मारिलेला एक दैत्य ( भार० शांति० )

५—लंकेंतील रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

६—विदर्भदेशाधिपति एक राजा. हा बहुतकालपर्यंत अनपत्य असतां एकदां दमन ना० ऋषि याकडे आला, तेव्हां यानें स्त्रीसहित त्याची, बरेच दिवस घरीं ठेवून घेऊन उत्तम सेवा केली. त्यावरून ऋषि प्रसन्न होऊन बोलला कीं, तुला उत्तम अपत्य होईल. पुढें ऋषि गेल्यावर, लवकरच यास, एक कन्या, व तीन पुत्र झाले. ते दमन ऋषीच्या प्रसादानें झाले म्हणून, यानें कन्येचें नांव दमयंति, आणि पुत्रांचीं

दम, दांत व दमन, अशीं नांवें ठेविलीं. तीच दमयंति पुढें नल राजाची स्त्री झाली.

७–कुंतीचा द्वितीय पुत्र तो. ( भीमसेन श० पहा).

**भीमक**–विदर्भदेशाचा अधिपति, यास भीष्मकहि म्हटलें आहे. हा रुक्मिणी इ०कांचा पिता.

**भीमकी**–रुक्मिणीस नांव.

**भीमजानु**–एक राजर्षि.

**भीमनाद**–प्रलयमेघांतील दुसरा.

**भीमबल**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**भीमरथ**–( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, तद्वंशीय काश्यकुलोत्पन्न केतुमान् राजाचा पुत्र. यास भीमसेन असेंहि नामांतर असे. याला पुत्र एक दिवोदास ना० होता.

२–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय ज्यामघकुलोत्पन्न क्रथ ना० राजवंशांत जन्मलेल्या विकृति- अ० विमल राजाचा पुत्र. याचा पुत्र नवरथ.

३–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

४–धृतराष्टाच्या शतपुत्रांतील एक

**भीमरथी**–सह्याद्रीपासून निघालेली नदी.

**भीमविक्रम**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**भीमवेग**– ,, ,,

**भीमशर**– ,, ,,

**भीमसेन**–( सो० वं. ) आयुकुलोत्पन्न ययाति पुत्र पूरुराजा, तद्वंशीय अजमीढपुत्र ऋक्ष तदन्वयसंभूत कुरुपुत्र जन्हुवंशांत जन्मलेल्या, पंडुराजाच्या कुंती ना० ज्येष्ठ स्त्रीपासून झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा. हा वायूच्या मंत्रप्रभावापासून जन्मला होता म्हणून यास वायुपुत्र असेंहि म्हणत. हा जन्मल्यापासूनच आकृतीनें भव्य व बलाढ्य, असा असे. या कारणास्तव यास भीम नांव ठेविलें होतें. तसाच याचा जठराग्नि अतिशय प्रदीप्त होता, व त्यामुळें याचा आहारही मोठा असे म्हणून वृकोदर असेंही यास नांव पुढें पडलें होतें. याची क्षुधा कुंतीच्या हातचें खाल्यावांचून शांत होत नसे. दुर्योधनादिक शतबंधू, व हा, प्रायः समवयी असून जेव्हां जेव्हां त्यांच्यांत क्रीडा करण्यास जाई, तेव्हां तेव्हां प्रत्यहीं दहापांचांस तरी याच्या हातून दुखापत होईच. त्यामुळें एकदां त्या सर्वांनीं गुप्तविचार करून याला विषयुक्त अन्नाचें अतिशय भोजन घालून पाण्यांत बुडविलें; परंतु त्यापासून हा न मरतां, पातालांतील अमृत प्राशन यास घडून, दहा सहस्र गजांच्या बळानें हा युक्त होऊन, पुनः हस्तिनापुरीं आला ( आर्यक श० पहा ).

यानें आपले भ्राते व कौरव यांसहित, द्रोणाचार्यासमीप शस्त्रास्त्रविद्येचा अभ्यास केला, त्यांत याची प्रवीणता बरीच होती. तथापि गदायुद्धांत हा उत्कृष्ट निपुण झाला, त्यावर आणखी यानें, ती शिक्षा बलरामापासून घेतल्यामुळें तर याची साम्यता करण्यास, जरासंध मरण पावल्यावर, एक दुर्योधनावांचून अन्य कोणीच नव्हता.

कांहीं कालानें कौरव आणि पांडव, उभयतां थोर झाले, व युधिष्ठिर यौवराज्य पावला, तें दुर्योधनास सहन न होऊन, त्यानें त्यांशीं द्वेष आरंभिला, त्यामुळें वारंवार कलह होऊं लागले, तेव्हां धृतराष्ट्रास मोठा विचार पडला कीं, या गोष्टीस आतां काय करावें ! शेवटीं त्यानें निश्चय केला कीं, हे एकत्र असल्यास असाच अधिकाधिक कलह वाढून, यांचें अतिशय वैर पडणार, यास्तव यांस कोठें तरी दूर ठेवावें. म्हणून त्यानें कुंतीसहवर्तमान यांना वारणावत नगरांत जाऊन राहण्याची आज्ञा केली. त्यावरून हे तेथें जाऊन राहिले. परंतु दुर्योधनानें तेथें, पांडव जाणार असें ऐकून, लाक्षागृह आधींच निर्माण करवून यांस दग्ध करण्याचा विचार केलेला विदुराच्या सूचनेवरून कळल्यामुळें युधिष्ठिरानें सावध राहून, त्यानें भीमाकडून युक्तीनेंच तें गृह दग्ध करविलें, व तो माता व भ्राते यांसहित वांचून, गंगेच्या पार निघून गेला.

भीमसेन हा युधिष्ठिरादि भ्राते व माता यांसहवर्तमान गंगेपार झाल्यावर, त्या सर्वांसहित मार्गक्रमण करीत निघाला तो, हिडिंब राक्षसाच्या अरण्यांत उतरला. तेथें त्याचें व याचें युद्ध होऊन, त्यांत यानें त्यास मारिलें व त्याची भगिनी हिडिंबा, ती आपणास स्त्री केली (हिडिंब श० पहा). नंतर हा एकचक्रानगरीस गेला असतां, तेथें त्यानें बकासुराचा वध केला ( २ बकासुर श० पहा ). पुढें द्रौपदीचें पाणिग्रहण होऊन धृतराष्ट्रानें यास, बंधु इ०कांसहित हस्तिनापुरास आणवून, अर्धे राज्य दिलें, व खांडवप्रस्थीं स्थापिलें.

हा, खांडवप्रस्थांत असतां, युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ करावा असें मनांत आणिलें, त्यावरून यानें प्रथम कृष्णासमागमें मगधदेशीं जाऊन, युद्ध करून जरासंधास मारिलें ( १ जरासंध श० पहा ). नंतर दिग्विजयास जाऊन द्रव्य आणावें अशी युधिष्ठिराची आज्ञा झाल्यावरून हा पूर्वदिशा जिंकण्यास निघाला. तो याचा दिग्विजय असाः–

युधिष्ठिराची आज्ञा घेऊन, भीमसेन इंद्रप्रस्थाहून पूर्वेकडे निघाला, तो प्रथम पूर्वपांचाल देशांत गेला, व तेथें यानें त्या राजाचें अनेक उपायांनीं सांत्वन करून करभार घेतला, ( यावरून तेथील राजा द्रुपद नव्हता असें दिसतें ). नंतर गंडक आणि विदेहदेश, ते यानें क्रमेंकरून जिंकले. पुढें पूर्व दशार्णदेशींचा सुधर्मा ना० राजा, मोठा भयंकर योद्धा होता, त्यानें याशीं आयुध ( शस्त्र ) हातांत घेतल्यावांचून, असें युद्ध केलें कीं, तेणेंकरून यानें संतुष्ट होऊन, त्यास आपल्या सेनेचें अधिपत्य देऊन समागमें घेतलें. नंतर अश्वमेधपुरींचा रोचमान् ना० राजा जिंकला, व दक्षिणेकडे वळून पुलिंद नगरचे सुकुमार आणि सुमित्र ( हे परस्पर भ्राते असतील ) त्यांस जिंकून, तसाच चेदि देशास शिशुपालाकडे हा गेला. तेथें त्यानें याचा सत्कार करून, तेरा रात्रीं ठेवून घेतलें, व करभार देऊन मार्गस्थ केलें ( भार० सभा० अ० २९ ).

नंतर भीमानें कुमार ना० देशींचा श्रेणिमंत राजा जिंकून, आग्नेय कोसलाधिपति बृहद्बल, व दीर्घयज्ञ यांस जिंकलें. पुढें गोपालकक्षदेश जिंकून, उत्तरेकडे वळला. व उत्तर कोसल; ज्यास ईशान्य कोसल असें या ग्रंथांत म्हटलें आहे, तेथील राजास व मल्लाधिपतीस जिंकून तसाच हिमवान् पर्वताच्या पार्श्वभागीं राहणारा जलोद्भव राजा जिंकला ( हा, हिमालय द्वितीयार्थक होय ). त्यापुढें भल्लाटदेश, व शुक्तिमान् पर्वत तेथील अधिपति जिंकिले. तेथून पूर्वेकडील काशीचा राजा सुबाहु जिंकल्यावर, सुपार्श्व देशींचा क्रथ ना० राजा जिंकला. नंतर मत्स्य देश, मलददेश इ० कांस जिंकून मंदधार देशींचा त्याच नांवाचा राजा जिंकिला. त्यापुढें सोमधेय, वत्सभूमि इ० राजांस जिंकल्यावर, निषादाधिपति भर्गदेशींचा राजा जिंकिला, तेथून मणिमान्प्रमुख कित्येक राजे जिंकून, दक्षिणेकडे वळून भोगवंत पर्वत, व दाक्षिण मल्ल जिंकले. नंतर शर्मक आणि वर्मक, त्यांस शांतपणानें वश करून घेऊन, अपरपूर्व विदेहदेशींचा जनकराजा ( बहुलाश्व )जिंकला तेथून पुढील शक आणि बबर राजे कपटानें जिंकून, इंद्रपर्वतासमीपचे इंद्रदेशीय वैदेहस्थ ना० किराताधिपति सातजण तेही जिंकले. तेथून सुह्म आणि प्रसुह्म देशींचे राजे स्वाधीन करून घेऊन, दंड व दंडधार ह्या मागधांसहित गिरिव्रजास गेला. गिरिव्रज, ही मगध-देशाची राजधानी व तेथील राजा जरासंधाचा पुत्र सहदेव, त्यापासून शांतपणानें करभार घेऊन, त्यासहित, कर्णाच्या अंगदेशीं गेला, व त्याशीं युद्ध करून त्यास जिंकून करभार घेतल्यावर पर्वतवासी मोदागिरविरील राजा जिंकिला. त्यापुढें पुंड्रदेशाधिपति वासुदेव राजा जिंकून ( हा पौंड्रक वासुदेव समजावा ). कौशिकी कच्छीनिलय म्हणून पाणथळ प्रदेश तिकडे गेला. तेथून वंग देश ( बंगालदेश ), तेथील राजे समुद्रसेन व चंद्रसेन त्यांस जिंकून कर्वटदेशाधिपति ताम्रलिप्त राजा जिंकला. त्याच्यापुढें दुसरा सुह्म, व सागरवासी अनेक म्लेंछ जिंकून, अपरमित द्रव्यांसहित इंद्रप्रस्थास माघारा आला, आणि आणलेलें द्रव्य यानें सर्व युधिष्ठिरास सर्मपण केलें ( भार० सभा० अ० ३० ).

राजसूय यज्ञ झाल्यावर, दुर्योधनानें द्यूतमिषेंकरून त्यांची सर्व संपत्ति हरण केली, व त्यांस अरण्यांत पाठविलें, तेव्हां हाहि निरुपाय होऊन, युधिष्ठिराच्या मर्यादेस्तव कांहीं न बोलतां अरण्यांत गेला. परंतु धृतराष्ट्राचे शत पुत्र मारीन अशी मात्र जातांना यानें प्रतिज्ञा केली. त्यांत दुःशासनाचें रक्त प्राशन करणें, हें प्रतिज्ञावचन अधिक होतें. युधीष्ठिरासमागमें अरण्यांत असतां, यानें किर्मीर व जटासुर, इ० राक्षसांचा वध केला. याचा कदलीवनांत प्रवेश; ( भार० वन० अ० १४६ ) त्यापुढें याचा मारुतीशीं संवाद, ( भार० वन० अ० १४७–१५१ ) सौगंधिक पुष्पांचें हरण; ( भार० वन० अ० १५२–१५५) त्यानंतर अजगरानें यास गिळिलें असतां, त्यापासून याची मुक्तता; (१ यामुन गिरि श० पहा ).

बारा वर्षे वनवास झाल्यावर, सर्व पांडव विराटगृहीं अज्ञातवासार्थ राहिले. त्यांत हाही बल्लव नाम धारण करून राहिला होता ( भार० विराट० अ० ८ ). तेथें यानें जीमूत इ० मल्लास मारून, कारणवशेंकरून बंधूंसहवर्तमान कीचकाचाहि वध केला ( कीचक श० पहा ). कीचकाच्या मरणानंतर दुर्योधनानें मत्स्य देशीं पांडव असावेत असें अनुमान करून, सुशर्म्यास दाक्षिण दिशेकडून तिकडे पाठविलें. त्यावरून विराट राजा त्यावर चालून गेला, तेव्हां यासही त्यानें समागमें नेलें होतें. त्यांत विराटाचा सुशर्म्यानें पराभव करून, त्यास बांधिलें असतां, यानें त्यास सोडविलें, ( ३ विराट श० पहा ).

अज्ञातवास करून पांडव प्रकट झाल्यावर, त्यांनीं दुर्योधनानें राज्याचा अर्धा भाग सामोपचारानें आपणास द्यावा, अशा हेतूनें कृष्णास त्याकडे साम करण्यास पाठविण्याचा विचार केला. त्यावरून कृष्ण, हस्तिनापुरास जाण्यास निघाला असतां, सर्वांची अनु-

मतें घेत घेत याकडे आला. त्या वेळेस जें यानें आपलें अनुमत दिलें, तें याच्या दयाळू स्वभावाचें खरोखर उदाहरण आहे. वस्तुतः हा बलवान्, आणि परम कोपिष्ट असा असतां. याकडून असें अनुमत मिळूं नये. यानें, कृष्णास पाहतांच, दुर्योधनानें आपणास अर्ध राज्य न दिल्यास भयंकर युद्ध होऊन, गांधारी व धृतराष्ट्र यांस पुत्रशोकानें दुःख होईल हें मुख्य मनांत आणून, कृष्णास म्हटलें, कृष्णा, जेणेंकरून दुर्योधन भरतकुलाच्या नाशास प्रवृत्त न होईल, असें तूं त्याशीं भाषण कर. दुर्योधन कपटी, पापात्मा व अदीर्घदृष्टि आहे खरा; परंतु त्यानें युद्धास प्रवृत्त होऊन ज्ञातींचा नाश करून घेऊं नये. पूर्वी हैहयोत्पन्न उदावर्त राजा, नीपकलोत्पन्न जनमेजय, तालजंघांचा बहुल, सुवीरांचा अजबिंदु, सुराष्ट्रांचा रुषर्धिक, चीनांचा धौतमूलक, विदेहांचा हयग्रीव, चेदि मत्स्यांचा सहज, इ० अनेक राजे उन्मार्गवर्ती होऊन, पुत्रबांधवासह नाश पावले. तसा हा दुर्योधन न पावो. तूं ज्ञाता आहेस, म्हणून सुयुक्त बोलशीलच हें मी जाणतों, तथापि मला जें वाटलें, तें मी तुला सुचविलें आहे.

याप्रमाणें भीमसेनाचें भाषण ऐकून कृष्णास याच्या शांतीचें अति आश्चर्य झालें व तो यास किंचित् विनोदानें म्हणाला, भीमा, अरे तुझें नित्याचें भाषण सहज पहावें तर क्रोधयुक्त असतें; तुझ्या सहज चालण्यांत भूमि कंपित होत्ये, एकाद्या अरण्यांत गेलास तर सहज दहा वीस झाडें उपटून पार, त्या तुझ्या ठायीं आज एवढी शांति आली कोठून? तस्मात् मला असें वाटतें कीं, तूं खाचित कौरवांस भ्यालास. इतकें ऐकून भीम म्हणाला, कृष्णा, तूं मला उगीच शब्द ठेवूं नको, मी भीम आहे, परंतु भरतकुल नाश न पावावें, येवढ्याच हेतूनें मी तुशीं तसें बोललों. त्यावरून कृष्णास हर्ष होऊन तो म्हणाला, भीमसेना, तूं शूर आहेस हें मी जाणतों मी तुझा उगाच विनोद केला, आतां मी जातों, व शम होण्याचा होईल तितका यत्न करितों. नच झाल्यास युद्ध हें होणारच असें समज. इतकें बोलून कृष्ण हस्तिनापुरास गेला ( भार० उद्योग० अ०७४-७७).

शेवटीं कृष्णाच्या सामाचा उपयोग न होऊन, कौरवपांडवांत घोर युद्ध होण्याचें ठरलें, व उभयतांचीं सैन्यें कुरुक्षेत्रीं येऊन उतरलीं, त्या वेळेस याचे भ्राते युद्धभूमीवर आले असतां हाही त्यांत आला. याचा बसण्याचा रथ चांगला बळकट व मोठा असून, त्यास अस्वली रंगाचे अश्व जोडले असत. ध्वजावर मोठा सिंह असे व विशोक नांवाचा सारथि याचा रथ हांकी. हा आपल्या हातांत वायव्य ना० धनुष्य व वाजविण्याकरितां पौंड्र नांवाचा शंख वागवी; परंतु मयासुरानें वृषपर्व्याच्या वेळचीं यास दिलेली गदा, तीं याचें मुख्य आयुध असून, जेव्हां ती स्कंधावर टाकून, हा रणांगणीं येई तेव्हां केवळ यमच असा हा सर्वांस भासे. ती गदा यासच उचलण्याचें सामर्थ्य होतें ( भार० द्रोण० अ०२३).

युद्धाच्या चवथ्या दिवशीं याचें दुर्योधनाशीं थोडेंसें युद्ध झालें, त्यांत यानें त्याचा पराभव करून, एकदां चौदा, दुसऱ्यानें आठ, मिळून धृतराष्ट्राचे बेवीस पुत्र मारिले ( भार० भीष्म० अ० ६४ ). अभिमन्यु मरण पावल्यावर, अर्जुनानें जयद्रथवधाची प्रतिज्ञा केली असतां, त्याच्या संरक्षणार्थ द्रोणाचार्यांनें व्यूह रचिला, त्याचा भेद करून कृष्णाजुन आंत गेल्यावर बऱ्याच वेळानें शंखाचा विपरीत ध्वनि युधिष्ठिरानें श्रवण केला, त्यावरून त्यानें त्यांच्या साह्यास सात्यकीस पाठविलें; परंतु तेवढ्यानें त्यास चैन पडेना म्हणून भीमास जाण्याची आज्ञा केली. त्यावरून हा निघाला व व्यूहद्वारावर आचार्य होते तेथें येऊन, आतां आंत प्रवेश करणार तों, आचार्य यास म्हणाले, भीमा मशीं युद्ध केल्याशिवाय तूं व्यूहांत जाऊं नयेस. त्यावरून यानें तथास्तु म्हणून युद्धास आरंभ केला; त्यांत पहिल्यानें आचार्यांचें धनुष्य तोडून रथासहित त्यास उचलून फेकून दिलें. पुनः दुसऱ्या रथांत आचार्य बसून आले असतां तसेंच केलें, याप्रमाणें यानें त्यांचे आठ रथ मोडिले, व शेवटीं त्यांस मूर्च्छित करून, यानें व्यूहांत प्रवेश केला. तेथें याच्या अंगावर चालून आलेला कृतवर्मा, व कित्येक म्लेच्छ, त्यांचा यानें पराभव करून, सात्यकीसहित जाऊन कृष्णार्जुनास गांठिलें ( भार० द्रोण० अ० १२७-१२९ ).

भीमसेनानें व्यूहांत गेल्यावर, कृष्णार्जुन क्षेम असून, त्यांस आपण गांठिलें असें युधिष्ठिरास कळावें म्हणून, आपला शंख वाजविला; त्यावरून तो यांचें कुशल समजला. नंतर इकडे भीमानें, त्या दिवशीं धृतराष्ट्राचे एकतीस पुत्र मारिले ( भार० द्रोण० अ० १५७ ). पुढें जयद्रथ मेल्यावर द्रोणाचार्यांनें रात्रियुद्धाचा प्रसंग घातला असतां त्यांत पांचव्या दिवशीं म्हणजे युद्धाच्या पंधराव्या दिवशीं मालवदेशाधिपति इंद्रवर्मा राजाचा नामांकित अश्वत्थामा गज

मरण पावला असतां, कृष्णाच्या संज्ञेवरून 'अश्वत्थामा गज मेला, अश्वत्थामा गज मेला,' असें हा मोठ्यानें ओरडून म्हणत म्हणत द्रोणाचार्यासमीप येऊन उभा राहिला; परंतु अश्वत्थामा हीं अक्षरें मोठ्यानें म्हणून, गज हीं अक्षरें मनांत म्हणे, तेंच द्रोणाचार्याच्या मरणास कारण झालें ( भार० द्रोण० अ० १७० ).

कौरवांकडील बरेच वीर मरण पावल्यावर, भीमसेन कौरवसैन्यांत फिरत असतां, त्याच्या अंगावर दुःशासन चालून आला. त्यावरून याचें व त्याचें घोर युद्ध आरंभिलें, त्यांत उभयतां एकमेक एकमेकांस मारीत असतां, यानें दुःशासनावर गदेचा प्रहार करून त्यास भूमीवर पाडिलें, व मस्तकास लत्तेनें ताडन करून,त्यावर पाय तसाच ठेवून त्यास विचारूं लागला कीं, दुःशासना, राजसूय यज्ञांत अभिषिक्त झालेले द्रौपदीचे केश, तूं कोणत्या हस्तानें धरून तिला सभेंत ओढून आणिलीस ? अरे,ती एकवस्त्रा(रजस्वला) अशी असतां, तूं तिला स्पर्श तरी करावास काय ? बरें केलास, तर तुला आतां असें पुसतों कीं, तूं तिचें वस्त्र फेडण्यास कोणता हात पुढें केला होतास ? इतकें त्यास विचारून दुर्योधन, कर्ण, कृपाचार्य, अश्वत्थामा इत्यादिक वीरांकडे क्रोधानें पाहून, त्यांस म्हणूं लागला कीं, मी प्रतिज्ञा केल्याप्रमाणें आज तुम्हांसमक्ष यास मारून, याचें रक्त प्राशन करितों, यास्तव कोणास सामर्थ्य असेल, तर यास सोडवावें. इतकें बोलून पुनः दुःशासनास म्हणाला, कायरे, 'गौर्गौः, 'असें आम्हांस वनांत जातांना म्हणणारा तोचना तूं ?' असें ऐकून दुःशासन जरी मरणोन्मुख अवस्थेस प्राप्त झाला होता, तरी आपला सव्य हस्त पुढें करून, भीमास म्हणाला कीं, स्त्रियांचे पीनपयोधर ( पुष्ट स्तन ) मर्दन करणारा, व सहस्रावधि गाई ब्राह्मणांस दान करणारा, गजशुंडेसारखा हा जो हस्त, यानेंच द्रौपदीच्या केशांचें आकर्षण केलें, आणि तिला सभेंत ओढून आणून तिचें वस्त्र फेडिलें. तें ऐकतांच भीमानें, त्याचा तो हस्त तत्काळ त्याच्या शरीरापासून उपटून, कंठ फोडिला, आणि अंजलींत रक्त घेऊन प्राशन केलें, तेणेंकरून दुःशासन मरण पावला ( भार० कर्ण० अ० ८३ ). पुढें याचें व दुर्योधनाचें युद्ध होऊन त्यांत दुर्योधनासही यानें मारिलें ( २ दुर्योधन श० पहा ).

संपूर्ण कौरव मरण पावून, युधिष्ठिरास राज्याभिषेक झाल्यावर, त्यानें अश्वमेधाचा विचार केला असतां, त्यानिमित्त यानें श्यामकर्ण अश्व आणिला, व युधिष्ठिराकडून यज्ञास आरंभ करविला ( ३ यौवनाश्व श० पहा ).

भीमसेनाचें शरीर भव्य, आणि अंगकांति तप्तसुवर्णासारिखी गौरवर्ण होती ( भार० आश्रम० अ० २५ श्लो० ६ ). यास, द्रौपदीपासून श्रुतसेन, आणि हिडिंबेपासून घटोत्कच, यांशिवाय काली म्हणून एक याला स्त्री होती, तिजपासून सर्वग अ० सर्वगत, असे मिळून तीन पुत्र होते. युधिष्ठिरास राज्याभिषेक झाल्यावर, हा युवराजा झाला होता. पुढें कृष्ण निजधामास गेल्याचें वृत्त ऐकून, युधिष्ठिर महाप्रस्थानास निघाला असतां, हाही त्यासमागमें निघाला, व मार्गांत देहपात पावून स्वर्गास गेला (भार० स्वर्गारोहण अ० ३).

२-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अभिमन्युपुत्र परीक्षित् राजा, त्याच्या चार पुत्रांतील तिसरा.

**भीमा**-भारतवर्षीय नदी ही सह्याद्रीपासून निघालेली आहे.

**भीमेश्वर**-भारतवर्षीय तीर्थ.

**भीषण**-अष्टभैरवांतील एक.

२-बकासुराचा पुत्र. पांडवांचा अश्वमेधीय श्यामकर्ण अश्व, याच्या नगरासमीप आला असतां, यानें मेदोहा पुरोहिताच्या अनुमतानें धरिला; कारण, भीमानें याच्या पित्यास मारिलेलें, याच्या ध्यानांत होतें. पुढें अर्जुनाचें व याचें युद्ध होऊन, त्यांत त्यानें यास मारिलें ( जैमि० अश्वमे० अ० २२ ).

**भीष्म**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढान्वयांतील कुरुपुत्र जन्हु राजा, तद्वंशीय शंतनु राजापासून गंगेच्या उदरीं जन्मलेल्या, आठ पुत्रांतीस कनिष्ठ. हा, द्यु ना० वसूच्या अंशानें जन्मला होता ( द्यु श० पहा ). हा कसा वांचला त्याचें प्रयोजन असें आहे.-पूर्वी अष्टवसूंस वसिष्ठाचा शाप झाला होता कीं, तुम्हास मृत्युलोकीं जन्म घडेल, त्यावरून त्यांनीं गंगेची प्रार्थना केली कीं, तुलाही पृथ्वीवर जन्मण्याचा शाप आहे, त्या अर्थी आम्ही तुझ्या उदरीं जन्मास येतों, परंतु तूं आमचें जन्म होतांच आम्हांस पाण्यांत बुडवीत जा,म्हणजे आम्हास सत्वर पूर्व योनींस येण्यास बरें पडेल. तें गंगेनें मान्य केलें, व ती पुढें शंतनूची स्त्री झाली. त्यांत तिनें त्याशीं असा नियम ठरविला होता कीं, मी जें कांहीं करीन तें तुला मान्य असावें; ज्या दिवशीं तुजकडून यांत अंतर होईल त्या दिवशीं मी लागलीच तुला सोडून जाईन. त्यावरून शंतनूनें तथास्तु म्हणून तिला वरिलें असतां, क्रमानेंच तिला सात पुत्र झालेले तिनें पाण्यांत

बुडविले. पुढें आठवा पुत्र, हा झाला असतां, यासहि बुडविण्यास ती घेऊन चालली तेव्हां शंतनु म्हणाला, तूं सात पुत्र बुडविलेस, परंतु मी तुला कांहीं बोललों नाहीं; त्यास आतां येवढा तरी पुत्र राहूं दे. त्यावरून गंगा तथास्तु म्हणून, तिनें त्यास आपल्या वचनाचें स्मरण दिलें, आणि म्हणाली कीं, हा मोठा होई-पर्यंत मजजवळ असूं दे; मोठा झाला म्हणजे तुला आणून देईन. इतकें बोलून ती पुत्रासहित अंतर्धान पावली ( भार० आदि० अ० १०० ).

कांहीं काळानें, हा कांहींसा मोठा होतांच,गंगेनें यास वसिष्ठ ऋषींकडे वेदाध्ययनार्थ नेऊन ठेविलें. तें पूर्ण झाल्यावर धनुर्वेद शिक्षेसाठीं जामदग्न्य रामाकडे घेऊन गेली. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, क्षत्रियास धनुर्वेद न शिकविण्याची माझी प्रतिज्ञा आहे, यास्तव तूं यास परत घेऊन जा; परंतु गंगेनें प्रार्थना करून म्हटलें कीं, मजकरितां यास आपण विद्या शिकविलीच पाहिजे. त्यावरून रामास भीड पडून, त्यानें यास ती विद्या उत्तम प्रकारें शिकविली. तीतही हा पूर्ण झाला असें पाहून, गंगेनें यास आणून शंतनूच्या स्वाधीन केलें, व आपण अंतर्धान पावली. हा गंगेपासून झाला होता, म्हणून यास गांगेय असें नांव असून, ब्रह्मचर्यव्रताच्या प्रभावानें देवांसारिखा देदीप्यमान् दिसे, यास्तव देवव्रत असेंहि यास म्हणत. पूर्वी गंगा गेल्या दिवसापासून, तिचा शंतनूस विरह होतांच, तो, यास आणून तिनें पोहोंचवून पुनः अंतर्धान पावल्यावर अधिक वाढला; परंतु निरुपायानें तसाच राहिला असतां, एकदां नदीतीरीं फिरतांना एक सुंदर व तरुण अशी कन्या त्यानें पाहिली. त्यावरून शंतनु कामाधीन होऊन, तूं माझी स्त्री हो असें तिला म्हणूं लागला. तिनें मी धीवराची कन्या आहे, असें म्हणून माझ्या पित्यास विचारून पहा म्हणून सांगितलें असतां, शंतनूनें आधीं ती कोणाची कन्या, याचा शोध करवून, क्षत्रियकन्या आहे असा पूर्ण निश्चय होतांच, त्या धीवरास विचारिलें.त्यानेंहि ती आपणास कशी प्राप्त झाली इ० वास्तविक वृत्त सांगून शंतनूस म्हटलें कीं, तुला प्रथम स्त्रीचा पुत्र असून तो शूर आहे, व प्रस्तुत तुझें यौवराज्य त्यानेंच संभाळिलें आहे; तेव्हां हिला तुजपासून पुत्र झाल्यास त्यास राज्यप्राप्तीचा उपाय कसा, याचा विचार करून मला कळीव, व हिच्या पुत्रांस राज्य प्राप्त होईलच असें असेल, तर ही कन्या सिद्धच आहे.

असें धीवराचें भाषण शंतनूनें ऐकून, तो निराश होऊन घरीं आला; परंतु त्या कन्येच्या स्मरणानें तो दिवसेंदिवस क्षीण होत चालला. असें पाहून भीष्मानें त्याचें कारण एक दोन वेळा त्यास विचारिलें; परंतु पुत्रास हें कसें सांगावें अशी त्यास लज्जा वाटून तो यास कांहींच बोलला नाहीं. शेवटीं हें गुह्य कळत कळत भीष्माच्या कानावर येतांच तो त्या धीवराकडे गेला, व त्यास म्हणाला कीं, ही तुझी कन्या, माझी भीति न धरतां माझ्या पित्यास दे, हिला पुत्र होईल तो मी राज्यावर बसवीन, व आजन्म ब्रह्मचर्यानेंहि राहीन. त्यावरून त्यानें ती सत्यवती ना० कन्या शंतनूस दिली, व तेणेंकरून शंतनु भीष्मावर प्रसन्न होऊन त्यानें त्यास तूं इच्छामरणी होशील असा वर दिला.

शंतनूनें सत्यवतीचा उपभोग बराच काळ घेतला, व त्यापासून तिच्याठायीं त्यास, चित्रांगद आणि विचित्रवीर्य असे दोन पुत्रहि झाले. ते कांहींसे मोठे होत आहेत तों, शंतनु राजा स्वर्गवासी झाला. तेव्हां भीष्मानें आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें चित्रांगदास राज्यावर बसवून, आपण सर्व राज्य संभाळीत असतां चित्रांगद हा, चित्रांगद ना० गंधर्वाशीं युद्धास जाऊन त्यांत त्याच्या हातून मरण पावला ( भार० आदि० अ० १०१ ). त्यावरून भीष्मानें विचित्रवीर्यास राज्यावर बसविलें, व काशी राजाच्या तीन कन्या स्वयंवरांत हरण करून आणलेल्या, त्यांतून अंबा परत गेल्यामुळें, अंबिका व अंबालिका त्या दोघी त्यास स्त्रिया करून दिल्या. अंबा परत गेलेली तें वृत्त ( ३ अंबा शब्दावर पहा ).

विचित्रवीर्य, भीष्माच्या अनुमतानें उत्तम प्रकारें राज्य करीत असतां,व त्याच्या दोघी स्त्रियाहि तरुण, सुंदर आणि पतीस सानुकूल अशा असतां, त्यास, अल्पवयांतच राजयक्ष्मा ना० रोग उत्पन्न होऊन, संतति न होतां मरण आलें (भार० आदि० १०२). त्यावरून त्याच्या स्त्रियांस व मातेस अनिवार शोक झाला. परंतु दैवगतीपुढें उपाय नाहीं म्हणून सत्यवतीनें शोक आवरिला,आणि ती भीष्मास म्हणूं लागली कीं, आतां या दोघींच्या ठिकाणीं तूं प्रजा उत्पन्न कर; परंतु यानें एकच उत्तर दिलें कीं,माझी प्रतिज्ञा मी मोडणार नाहीं,व तूंहि अशी आज्ञा मला करूं नयेस. त्यावरून तिला विचार पडला कीं, पुढें कसें करावें ? इतक्यांत तिला कौमारदशेंत झालेल्या कृष्णद्वैपायन पुत्राचें स्मरण झालें. त्यावरून तो तेथें तत्काळ प्रकट झाला. नंतर

त्यास सर्व वृत्त सांगून म्हणाली कीं, या दोघींच्याठायीं तूं प्रजा निर्माण करावीस. तें ऐकून त्यानें तथास्तु म्हणून दोघींच्या ठिकाणीं दोन पुत्र निर्माण केले. तेच धृतराष्ट्र आणि पंडु अशा नांवांनीं प्रख्यात असून, दासीच्याठायीं एक झाला, तो विदुरहि प्रसिद्धच आहे.

धृतराष्ट्र व पंडु, दोघे मोठे झाल्यावर, धृतराष्ट्र जन्मांध असल्यामुळें भीष्मानें पंडूस राज्यावर बसविलें, आणि गांधारदेशाधिपति सुबल राजा, त्याची कन्या गांधारी धृतराष्ट्रास स्त्री करून देऊन, पंडूस एक कुंतिभोजराजाची कन्या कुंती ( पृथा ) आणि दुसरी मद्रदेशाधिपतीची कन्या माद्री, अशा दोन स्त्रिया करून दिल्या. त्यांत धृतराष्ट्रास दुर्योधनादिक शतपुत्र, व एक कन्या झाली, आणि पंडूस युधिष्ठिरादिक पांच पुत्र झाले. नंतर कांहीं काळानें पंडु मरण पावला असतां, मुख्य राजस्थानीं भीष्मानें धृतराष्ट्रासच स्थापिलें, व धार्तराष्ट्र आणि पांडव यांस, विद्यादिकांत प्रवीण करून युधिष्ठिर हा यास उत्तम दिसल्यामुळें, त्यास यानें यौवराज्य दिलें, व आपण स्वस्थ राहिला.

याप्रमाणें भीष्मानें सुरळीत सर्व व्यवस्था केली असतां, धृतराष्ट्राचे पुत्र, एकाहून एक अधिक असे दुष्ट निघाल्यामुळें, ते पांडवांचा द्वेष करूं लागले. तो असा कीं, त्यानीं भीमास विष चारून पाण्यांत तर बुडविलें; त्यांतून तो वांचला असें पाहून, सर्वांस लाक्षागृहांत दग्ध करण्याचा विचार केला; त्यांतूनहि वांचले असतां, धृतराष्ट्रानें त्यांस अर्ध राज्य देऊन खांडवप्रस्थीं स्थापिल्यावर त्यांनीं स्वपराक्रमानें मिळविलेली संपत्ति राज्यासहित द्यूतमिषानें हरण करून, त्यांस वनवासास घालविलें. द्रौपदीचाहि अनेकप्रकारें छळ केला. त्या प्रसंगीं भीष्मानें त्यांस पुष्कळ उपदेश केला, परंतु त्यांनीं ऐकिला नाहीं. आतां इतकें मात्र कीं, हा समर्थ होता, म्हणून यानें त्या दुष्टांचा निग्रह करायाचा होता, तो जेव्हां यानें केला नाहीं, तेव्हां असें वाटतें कीं, याच्या बुद्धीस, वृद्धापकाळामुळें खचित कांहीं तरी अंतर पडलें होतें, व पुढील गोष्टीवरून तें दृढहि होतें.

अरण्यवास सरून पांडव अज्ञातवासांत असतां, दुर्योधन उत्तरेकडून मत्स्यदेशावर चालून गेला, त्या वेळेस यानें खरोखर अशा क्षुल्लक कार्यासाठीं त्या समागमें जावें काय ? मी येत नाहीं म्हणता, तर दुर्योधन याचें काय करणार होता ? अस्तु. मात्र याच्या जाण्यांत पांडवांस सहजीं लाभ येवढाच झाला कीं, पांडव, अज्ञातवासाचे सात महिने गेले असून, पांच जाणें आहेत असें समजत होते, व दुर्योधनहि तसेंच समजत होता. त्याचें यानें बोलतां बोलतां बारा वर्षांत अधिक मास पांच पडले, त्यामुळें त्यांचें अज्ञातवासाचें वर्ष पूर्ण झालें असें दुर्योधनापुढें बोलून स्पष्टीकरण केलें. तें पांडवांस कळून, ते लौकरच प्रकट झाले.

पुढें पांडवांनीं सामोपचारानें अर्ध राज्य कौरवांजवळ मागितलें असतां त्यांकडून तें मिळत नाहीं असें होऊन, युद्धावर प्रसंग येऊन पोहोंचला. त्या वेळेस दुर्योधनानें आपल्या सेनेंत, यास सैनापत्य दिलें. यानें युद्ध मोठ्या नीतीनें केलें होतें, ते याचे नियम असे.—रथ्यानें रथ्याशीं, पदात्यानें पदात्याशीं, अश्वारोहानें अश्वारोहाशीं, महारथ्यानें महारथ्याशींच युद्ध करावें. एकावर अनेकांनीं शस्त्र धरूं नये. मूर्छा पावलेला, शरणागत, असावध, आणि पलायन करीत असलेला, यांवर कोणीहि शस्त्र धरूं नये. सायंकाळ होतांच उभयपक्षींच्या सेनापतींनीं आपआपल्या सेनेचा अवहार करून, सर्वांकडून शस्त्रें ठेववावीं, शस्त्रें ठेवल्यावर सूर्योदय होईपर्यंत, परस्पर सैनिकांनीं परस्परांस मित्रभावानें भेटावें, व बोलावें. याप्रमाणें यानें दहा दिवस युद्ध केलें. हा नियम, द्रोणाचार्य युद्ध करूं लागल्यापासून न राहतां, संकुलयुद्धच पुढें चालूं लागलें. संकुलयुद्ध मिश्रयुद्ध असें समजावें.

प्रत्यहीं दहा सहस्र रथी मारणें, अशा नियमाप्रमाणें भीष्म युद्ध करीत असतां नऊ दिवस गत झाले असें पाहून, दुर्योधन याच्या शिबिरांत येऊन म्हणूं लागला कीं, आपण मनापासून युद्ध करीत नाहीं; त्यावरून यानें सांगितलें कीं, उदयीक शिखंडी मजपुढें न येईल, तर मी निष्पांडवी पृथिवी करीन, त्यावरून शिखंडीचा त्यानें इतिहास पुसला असतां, यानें सर्व सांगितला. तो ऐकून दुर्योधन गेला. हें वर्तमान पांडवांस कळून, त्यांस मोठी भीति पडली, व युधिष्ठिर आपल्या शिबिरांतून निघून मध्यरात्रीं याकडेस आला, व पांडव वांचण्यास उपाय काय म्हणून पुसूं लागला. यानें उदयीक शिखंडीस पुढें करून अर्जुनानें मशीं युद्ध करावें, म्हणजे तुम्ही वांचाल असें सांगितलें. त्याप्रमाणेंच दुसऱ्या दिवशीं अर्जुनानें करून, याचें सर्वांग बाणांनीं व्याप्त केलें. त्यावरून हा शरशय्येवरच निद्रिताप्रमाणें पडला.

हा, ज्या वेळेस युद्धांत पडला, त्या वेळेसच याचें प्राणोत्क्रमण व्हावें; परंतु दक्षिणायन असून, यास, तूं इच्छामरणी होशील, असें पित्याचें वरप्रदान होतें, म्हणून यानें उत्तरायण निघेपर्यंत तसेच प्राण धारण केले. भीष्म पडला असें पाहून कौरव पांडव उभयतांही त्याच्या आसमंतात् जमले; त्यांत दुर्योधन तर, शस्त्रवैद्यांस समागमें घेऊन आला; परंतु यानें सांगितलें कीं, आतां मला कोणी स्पर्श करूं नका, असाच पडूं द्या, इतक्यांत अर्जुनानें पाहिलें कीं, हा आतां पडला असून, याचें मस्तक अव्यवस्थित लोंबत आहे तें व्यवस्थित करावें, असें म्हणून त्यानें तीन बाण अशा बेतानें याच्या मस्तकास मारले कीं, उशीवर मस्तक ठेवून निजल्याप्रमाणें त्या बाणांपासून यास सुख झालें. नंतर यानें पाणी मागितलें असतां दुर्योधन उदकपात्र घेऊन पुढें आला. त्याचा यानें धिक्कार करतांच, अर्जुनानें भूमींत बाण मारून, पातालगंगेचा ओघ काढून, ती धार याच्या मुखांत जाईल असें केलें. तेणेंकरून यास पराकाष्ठेचा संतोष झाला.

भीष्म शरपंजरीं पडल्यापासून, पुढें आठ दिवसांनीं कौरवपांडवांच्या युद्धाचा शेवट झाला. नंतर कौरवांचें और्ध्वदेहिक युधिष्ठिरानें केलें, व त्यास राज्याभिषेकही झाला; परंतु ज्ञातिवधाचा जो त्याच्या अंतःकरणांत खेद झाला, त्याचें निवारण कृष्णाच्यानेंहि होईना. त्यावरून कृष्णानें त्यास भीष्माकडे नेलें. त्या काळीं भीष्माकडे आलेल्या ब्रह्मर्षि व राजर्षि इत्यादिकांचा मोठा समाज जमला होता, त्यांत त्यानें युधिष्ठिरास, शांतिपर्व आणि अनुशासनपर्वद्वारा, त्याचें समाधान करून मार्गस्थ केलें, व उत्तरायण निघतांच, सर्व समाज अवलोकन करीत असतां, परमेश्वरस्वरूपीं चित्त स्थिर करून, देहाचा त्याग केला. मरणकाळीं याचें वय किती होतें, त्याविषयीं भारतांत कांहींच आढळत नाहीं; परंतु द्रोणाचार्याहून याचें वय दुपटीपेक्षांहि अधिक असावें असें वाटतें.

भीष्म हा, गुणांनीं अतिशय उत्तम होता. त्यानें केलेली प्रतिज्ञा कधींच ढळत नसे. याच्या ब्रह्मचर्याची उपमा हाच असें म्हटले तरी शोभेल. धनुर्वेदांत याची प्रवीणता पराकाष्ठेची असून त्यांत स्त्रियांवर शस्त्र धरणें नाहीं, हा जो याचा नियम होता, तो तर मरेपर्यंत बिघडलाच नाहीं. त्याविषयीं अंबा, शिखंडी होऊन पुरुषत्व पावली, तरी यानें त्यावर शस्त्र धरलें नस-

त्याचें उदाहरण स्पष्टच आहे. याचें श्रुत्यर्थस्मृत्यर्थविषयक ज्ञान मोठें अगाध असून, वक्तृत्व तर इतकें मनोरंजक होतें कीं, तें ऐकण्यास मोठमोठे ऋषि यासमीप येत. अनुशासन पर्वाचें वक्तृत्व चाललें असतां, यास एकदां घेरी आल्यामुळें तें पूर्ण करण्यास यानें कृष्णास सांगितलें. त्यावरून याच्या खालोखाल वक्तृत्व करणारा त्या वेळेस कृष्ण असून, यासही त्याचें वक्तृत्व मनोरंजक होई असें दिसतें. सारांश इतके गुण जसे याच्यांत अमूल्य होते, त्याप्रमाणेंच त्या सर्व गुणांचा मुकुटमणि जी परमेश्वरी निष्ठा, तीहि तशीच होती.

**भीष्मक**–विदर्भ देशाचा राजा. याची राजधानी कुंडिनपुर. यास रुक्मि, रुक्मरथ, रुक्मबाहु, रुक्मकेश आणि रुक्ममाली, असे पांच पुत्र, व रुक्मिणी नांवाची एक कन्या होती. तिला कृष्णानें वरिलें होतें (रुक्मिणी श० पहा). या भीष्मकास हिरण्यरोमा असें नामांतर होतें ( भार० उद्यो० अ० १५८ ).

२–भोजकोट नगरीचा राजा. यानें सहदेव, दक्षिण दिशा जिंकण्यास निघाला असतां त्याशीं दोन दिवसपर्यंत मोठें युद्ध केलें होतें ( भार० सभा० अ० ३१ ).

**भीष्मसू**–भीष्मास प्रसवल्यामुळें हें नांव गंगेस पडलें होतें.

**भुंजकेश**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**भुजातपुर**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**भुज्यु**–ब्रह्मर्षि, यास लाह्यायनी हें नामांतर होतें.

**भुमन्यु**–एक गंधर्व.

**भुवन**–एक ब्रह्मर्षि.

२–बारा भार्गव देवांतील एक.

**भुवमन्यु**–मन्यु शब्द पहा.

**भूत**–भृगुपुत्र एक ब्रह्मर्षि.

२–वसुदेवापासून पौरवीस झालेल्या पुत्रांतील एक.

**भूतकर्मा**–सभापति ना० दुर्योधनपक्षीय भारती युद्धांतील राजा.

**भूतकेतु**–दक्षसावर्णि मनूच्या पुत्रांत एक होणार आहे तो.

**भूतज्योति**–( सू० वं० )नृग राजाचा पौत्र. याचा पुत्र वसु.

**भूतधामा**–पूर्वेंद्रांतील एक.

**भूतपति**–विवर्तोपादानरूपानें पंचमहाभूतांस आधार, असा जो शिव तो.

२–भूतप्रेतपिशाच इत्यादिकांचा अधिपति रुद्र तो.

**भूतरय**–रैवत मन्वंतरांतील देववि०.

**भूतशर्मा**–दुर्योधनपक्षीय राजा.

**भूतसंतापन**–हिरण्याक्षाच्या पुत्रांतील एक.

**भूति**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**भूमा**–प्रियव्रतवंशीय ऋषभदेवकुलोत्पन्न प्रतिहर्ता राजापासून स्तुतीस झालेल्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. यास ऋषिकुल्येपासून उद्गीथ, आणि देवकुल्येपासून प्रस्ताव असे २ पुत्र झाले होते.

**भूमिंजय**–विराट्पुत्र उत्तराचें नामांतर.

२–दुर्योधनपक्षीय एक राजा.

**भूमिनी**–अजमीढाच्या चार स्त्रियांतील एक.

**भूमिपाल**–दुर्योधनपक्षीय एक राजा.

२–पांडवपक्षीय भारती युद्धांतील राजा (भार० उद्योग० अ० ४).

**भूयसि**–एक ब्रह्मर्षि ( ३ आंगिरा श० पहा ).

**भूरि**–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न पूरु राजा, तद्वंशीय अजमीढान्वयसंभूत कुरुपुत्र जन्हु राजा, त्याच्या कुलांत जन्मलेल्या बाल्हीक राजाचा पौत्र, व सोमदत्त राजाच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ. हा, भारती युद्धांत दुर्योधनाकडे होता, व यास रात्रियुद्धांत सात्यकीनें मारिलें ( भार० द्रोण० अ० १६६ ).

**भूरितेजा**–पांडवपक्षीय राजा ( भार० उद्योग अ० ४ ).

**भूरिद्युम्न**–एक राजपुत्र (कृशतनु श० पहा).

**भूरिश्रवा**–शुकाचार्यास पीवरीपासून झालेला पुत्र.

२–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न पूरु राजा, तद्वंशीय बाल्हीक राजाचा पौत्र व सोमदत्ताच्या चार पुत्रांतील एक. याचा दुर्योधनाशीं अत्यंत स्नेहभाव असल्यामुळें, हा भारती युद्धांत दुर्योधनाकडे होता. यानें सात्यकीचे दहा पुत्र मारिले, व यासही युद्धांत जर्जर करून त्याचे केश धरिले, आणि मस्तक तोडणार इतक्यांत कृष्णानें दुरून पाहून अर्जुनास सुचवितांच, त्यानें तेथूनच असा एक बाण सोडिला कीं, याचा खड्गासहित हस्त त्या बाणानें तुटून एकीकडे पडला ( भार० द्रोण० अ० १४२ ). हात तुटल्यानें विव्हल होऊन, हा मग काष्ठशय्या करून, तिजवर प्राणोत्क्रमणाच्या उद्देशानें बसला. इतक्यांत सात्यकि सावध होऊन, हातांत खड्ग घेऊन यासमीप आला, तेंव्हां उभयतांचीं कांहीं भाषणें होऊन, शेवटीं त्यानें यास मारिलें ( भार० द्रोण० अ० १४३ ).

**भूरिश्रुत**–प्रथमार्थक भूरिश्रवा शब्द पहा.

**भूरिषेण**–वैवस्वत मनूचा पौत्र, शर्याति राजाच्या पुत्रांतील एक.

२–पुढें होणाऱ्या ब्रह्मसावर्णि मनूच्या पुत्रांतील एक.

**भृगु**–स्वायंभुव मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्रांतील एक. हा त्याच्या त्वचेपासून उत्पन्न झाला होता. कर्दम प्रजापतीची कन्या ख्याति, ती याची स्त्री असून तिचे ठायीं यापासून धाता, विधाता, कवि आणि सोमप, नांवाचे पितर, असे पुत्र झाले होते, व श्री नांवाची एक कन्या झालेली, ती यानें विष्णूस दिली होती. यावर अशी कोणी कल्पना करील कीं, ब्रह्मदेवाच्या प्रत्येक कल्पांत ( दिवसांत ) भृगु उत्पन्न होऊन, त्याला श्री कन्या जी होत्ये, ती तो विष्णूस देतो किंवा कसें ? त्यास असें समजूं नये. ब्रह्मदेव ज्या काळीं प्रथमतः देह धारण करून उत्पन्न झाला, त्याच वेळेस विष्णु आणि शिव, हेही स्वकीय इच्छेनें देह धारण करून नित्यमुक्तस्थितींनें उत्पन्न झाले. तेव्हां जे ब्रह्मदेवानें मानसपुत्र निर्माण केले, त्यांतील भृगूनें व दक्षानें, क्रमेंकरून श्री आणि सती, ह्या कन्या, त्या विष्णुशिवांच्या विभूत्यवतारांतील दोघांस क्रमेंकरून एकवार दिल्या, त्याचाच अनुवाद प्रत्येक कल्पाविषयीं उगाच गौरवार्थ केला आहे. वस्तुतः वारंवार असें होत नाहीं; हें ( यथापूर्वमकल्पयत् ) यावरून ध्यानांत आणावें.

चालू श्वेतवाराहकल्पांतील, प्रस्तुत चाललेल्या वैवस्वत मन्वंतरांत, जरी मरीच्यादिक महर्षि महादेवाच्या शापानें मरण पावले असून, त्यांस ब्रह्मदेवानें पुनः उत्पन्न केलें आहे, तरी असें वारंवार होतेंच, किंवा व्हावयाचेंच असें कधींहि समजूं नये. यास उदाहरण आपलेंच पाहावें. तें असें–काल आपणास झालेला पुत्र, रात्रीं आपण निजलों, म्हणज जसा मरत नसून, दुसऱ्या दिवशीं आपल्या स्त्रीच्या उदरांतून कालच्या प्रमाणेंच निघाला पाहिजे याची आवश्यकता नाहीं त्याप्रमाणें. दुसरें, काल झालेल्या पुत्रास एके दिवशीं ज्वर आला असतां, प्रत्येक रात्र उजाडली, कीं पुनः ज्वर आलाच पाहिजे अ० येतोच असेंहि नाहीं. हाच न्याय, ब्रह्मकल्पाविषयीं, व त्याच्या मानसपुत्रादिकांविषयीं समजावा.

२–चाक्षुष मन्वंतरांतल्या सप्तर्षींत एक होता ऋषि तो.

३–पूर्वींचे ब्रह्ममानसपुत्र, महादेवाच्या शापानें मरण पावले असतां, चालू मन्वंतरारंभीं त्यांस ब्रह्मदेवानें पुनः उत्पन्न केलें; त्यांत हा, वरुणाच्या यज्ञांत अग्नींतून उत्पन्न झाला होता, व वरुणानें यास आपल्याकरितां पुत्रत्वानें ग्रहण केलें होतें, म्हणून हा वारुणि भृगु अशा नांवानें विशेष प्रख्यात आहे ( महर्षि श० पहा ). ( भार० अनुशा० अ० ८५ ). या भृगूस, येथें पुलोमा नांवाची स्त्री होती. तिचेठायीं यापासून

प्रथमतः बारा देव उत्पन्न होऊन, नंतर सात ऋषि निर्माण झाले, यांचीं नांवें अशीं.–भुवन, भौवन, सुजन, सुजन्य, शुचि, क्रतु, मूर्द्धा, त्याज्य, वसुद, प्रभव, अव्यय आणि दक्ष. ऋषींचीं नांवें,–**च्यवन, वज्रशीर्ष, शुचि, और्व, शुक्र, वरेण्य** अ० विभु, आणि **सवन** (भार० अनुशा०अ० ८५ श्लोक० १२८-१२९ ). हा भृगु प्रस्तुत, प्रतिभाद्रपदमासींच्या सूर्यासमागमें संचार करण्यास असतो ( १ नभस्य श० पहा ).

या भृगूच्या कुलांत, केवलभृगु आणि जामदग्न्यभृगु अशा दोन वंशमालिका आहेत. त्यांमध्यें केवल भृगूंत **आर्ष्टिषेण, यस्क, मित्रयु, वैन्य** आणि **शुनक** असे भेद पांच आणि जामदग्न्य भृगूंत **वत्स** आणि **विद**, असे दोन मिळून सात भेद आहेत. यांत **आर्ष्टिषेण**-कुलोत्पन्न भृगुदास, अमार्गपथ, ग्राम्यायनि, कटायनि, आपस्तंबि, बिल्वि, नैकाशि, कपि, दुसराआर्ष्टिषेण, गार्दभि, कार्दमायनि, आश्वलायनि, हे सर्व ऋषि **भार्गव, च्यावन, आप्नवान्, आर्ष्टिषेण, अनूप**; अ० **रूपी** असे पंचप्रवरी किंवा **भार्गव, आर्ष्टिषेण, अनूप**, असे त्रिप्रवरी होते. **यस्क**कुलोत्पन्न **भार्गव; वैतहव्य, सावेतस**, असे त्रिप्रवरी होते. **मित्रयु**कुलोत्पन्न यस्क, वीतहव्य दुसरा मथित, दम, जैवंत्यायनि, मौंज, पिलि, चालि, भागिल, भागावित्ति, कौशापि, काश्यपि, बालपि, श्रमदागेपि, सौर, तिथि, गार्गीय, जाबालि, पौष्णायन, ग्रामद, दुसरा भृगु, वीतिहव्य, रैवस, वैवस, शालायनि, शाकटाक्ष, मैत्रेय, खांडव, द्रौणायन, रौक्मायन, आपिशलि, आपिकायनि, हंसजिव्ह, एकायन, याज्ञपति, मत्स्यगंध, प्रत्यूह, सौरि, औक्षि, कार्दमायनि, गृत्समद, आणि सनक, हे सर्व ऋषि **भार्गव, वाध्र्यश्व, दैवोदास** असे तीन प्रवरी किंवा **भार्गव, च्यावन, दैवोदास** असे तीन प्रवरी अ० **वाध्र्यश्व**, अशा एकाच प्रवराचे कित्येक होते. **वैन्य**कुलोत्पन्न **भार्गव, वैन्य, पार्थ**, अशा तीन प्रवराचे; आणि शुनककुलोत्पन्न **शौनक** या एका प्रवराचे; किंवा **गार्त्समद**, या एका प्रवराचे' अथवा **भार्गव**, गार्त्समद, अशा दोन प्रवरांचे किंवा **भार्गव**, शौनहोत्र, गार्त्समद, अशा तीन प्रवरांचे असतात.

दुसरी जामदग्न्यभृगुंवंशमालिका, तिजमधील वत्स आणि विद असे भेद दोन, त्यांची प्रवरव्यवस्था अशी. **वत्स**कुलोत्पन्न वात्स्य, दंडी, नडायन, वैगायन, वीतहव्य, पैल, शौनक, शौनकायन, जीवंति, आवेद, कार्पणि, वैहिनरि, विरूपाक्ष, रौहित्यायनि, वैश्वानरि, नील, लुब्ध, सावर्णिक, विष्णु, पौर, बालाकि, ऐलिक, अनंतभागि, दुसरा भृगु, भार्गेय, मार्कंड, जवि, वीति, मंड, मांडव्य, मांडूक, फेनप, स्तनित, स्थलपिंडी, शिखावर्ण, शार्कराक्षि, जालधि, सौधिक, क्षुभ्य, कुत्सन्य, मौद्गलायन, कर्मायन, देवपति, पांडुरोचि, गालव, सांकृत्य, चातकि, सर्पि, याज्ञपिंडायन, गार्ग्यायन, गायन, गार्हायन, गोष्ठायन, वात्यायन, वैशंपायन, वैकर्णिनि, शाकरव, याज्ञेयि, भ्राष्ट्रकायनि, लालाटि, नाकुलि, लौक्षिण्य उपरिमंडल, अलुकि, सौचाकि, कौत्स, पैंगलायनि, सात्यायनि, मालायनि, कौटिलि, कौचहस्तिक, सौहसोक्ति, कौवाक्षि, कौशि, चांद्रमसि; नैकजिव्ह, जिह्मक, व्यधाव, लोहवैरि, शारद्वतिक, नैतिष्य, लोलाक्षि, चलकुंडल, वागायनि, अनुमति, पूर्णिमागतिक, हे सर्व ऋषि **भार्गव, च्यावन, आप्नवान्, और्व, जामदग्न्य** अशा पंच प्रवरांचे, किंवा **भार्गव, और्व, जामदग्न्य**, या तीन प्रवरांचे होते. यामध्यें जमदग्नि दुसरा, विद, पौलस्त्य, वैजभृत, उभयजात, कायनि, शाकटायन, और्वेय, मारुत, हे ऋषि तर **भार्गव, च्यावन, आप्नवान्**, याच तीन प्रवरांचे होते. **विद**-कुलोत्पन्न **भार्गव, च्यावन, आप्नवान्, और्व, वैद**, असे पंच प्रवरी किंवा **भार्गव, और्व, जामदग्न्य**, असे त्रिप्रवरी असून, **भार्गव, वैद, वैधव, ज्योतिष**, आणि **भार्गव, शाठर, माठर**, असेहि तीन तीन प्रवर कित्येक असतात.

याच्या कुलांत काश्यप, प्राचेता, दधीच, ऊर्व, जमदग्नि, वेद, सारस्वत, आर्ष्टिषेण, च्यवन, वीतहव्य, सवेधस, वैन्य, पृथु, दिवोदास, ब्रम्हवान्, गृत्समद, शौनक, आत्मवान् आणि हा स्वतः मिळून मंत्रद्रष्टे एकोणीस ऋषि होते ( मत्स्य० अ० १४४ ). यांत वीतहव्य क्षत्रिय असून ब्रह्मर्षींत मिळालेला होता, असें समजावें.

४–वारुणि कवीच्या पुत्रांतील एक.

५–एक ऋषि ( ३ भृगु श० पहा ).

६–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**भृगुतुंग**–ययाति राजानें ज्यावर तप केलें होतें, तो पर्वत.

**भृगुदास**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**भृगुप्रस्रवण**–सगर राजानें तप केलेलें हिमालयाचें शिखर

**भृंगी**–एक शिवगण.

**भृत**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**भृतकील**–ब्रह्मर्षि ( १ विश्वामित्र श० पहा ).

**भृशाश्व**–एक ऋषि, देवप्रहरणाचा पिता.
**भेरुंड**–जटायूच्या पुत्रांतील एक.
**भैमसेनि**–घटोत्कच.
**भैम्य**— ,,
**भैरव**–अष्टभैरव शब्द पहा.
**भोगवंत**–पूर्वनिषाद देशाच्या दक्षिणेस पर्वतवि० (भार० सभा० अ० ३० ).
**भोगवती**–पातालांतील नागांची नगरी. येथें जीं नागकुलें आहेत, त्यांचीं नांवें मुख्यत्वेंकरून अशीं आहेत. शेष, वासुकि, तक्षक, कर्कोटक, दुसरा कर्कोटक, धनंजय, कालिय, नहुष, कंबल, अश्वतर वाह्यकुंड, मणिनाग, आपूरण, खग, वामन, चैलपत्र, कुकुर, कुकुण, आर्यक, नंदक, कलश, पोतक, कैलासक, पिंजरक, ऐरावत, सुमामुख, दधिमुख, शंखनद, उपनंदक, आप्त, कोटरक, शिखि, निष्ठुरक, तित्तिरि, हस्तिभद्र,कुमुद, माल्यपिंडक, पद्म, दुसरा पद्म, पुंडरीक, पुष्प,मुद्गरपर्णक, करवीर. पीठरक, संवृत्त,वृत्त, पिंडारक, बिल्वपत्र, मूषकाद, शिरीषक, दिलीप, शंखशीर्ष, ज्योतिष्क, अपराजित, कौरव्य, धृतराष्ट्र, कुहुर, कृशक, विरजा, धारण, सुबाहु, मुखर, जय, वधिर, अंध, विशुंडि, विरस आणि सुरस. यांतील जीं विशेष प्रसिद्ध, तेवढ्यांचीं नांवें अक्षरक्रमांत घेऊन, इतरांचीं विस्तारभयास्तव घेतलीं नाहींत.
२–नागलोकांतील नदी. हा स्वर्धुनीचा तिसरा ओघ समजावा.
**भोगावती**–सरस्वती नदीस नांव.
**भोज**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).
२–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वत राजा, त्याच्या महाभोज पुत्राच्या वंशजांस नांव.
३–कुंतिभोज शब्द पहा.
४–हैहयकुलांतील एका कुलाचें नांव.
५–भोजकट शब्द पहा.
**भोजकट**–दोन नगरें ( भार० सभा० अ० ३१ ). यांत विदर्भदेशांतील एक असून, दुसरें मात्र कोणत्या देशांतलें तें कळत नाहीं.
**भोजनगर**–उशीनर राजाची राजधानी.
**भोजन**–क्रौंचद्वीपांतील पर्वत.
**भोजयायन**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).
**भोजा**–ऋषभदेववंशीय वीरव्रत राजाची स्त्री. मंथु आणि प्रमंथु यांची माता.
२–आर्यक नागाची कन्या. हिला मारीषा असें नामांतर असे. ही यदुकुलोत्पन्न शूरराजाची स्त्री. वसुदेव इ० पुत्रांची माता.
३–ज्यामघानें हरण करून आणिलेली कन्या, त्याच्या विदर्भ ना० पुत्राची स्त्री.
**भौत्य**–ब्रह्मसावर्णि मनूस नामांतर.
**भौम**–मंगळ ना० ग्रह.
**भौमासुर**–नरकासुर शब्द पहा.
**भौमतापन**–गौरपराशरकुलोत्पन्न ऋषि.
**भौमन**–विश्वकर्म्यास नामांतर.
**भौवन**–ऋषभदेववंशीय मंथु ना० राजास, सत्येपासून झालेला पुत्र. यास दूषणा ना० स्त्री आणि तिजपासून झालेला त्वष्टा नांवाचा पुत्र होता.
२–बारा भार्गव देवांतील एक.
**भ्रमर**–एक राजपुत्र ( ३ जयद्रथ श० पहा ).
**भ्रमी**–उत्तानपादपुत्र ध्रुवाची स्त्री, ही शिशुमार प्रजापतीची कन्या.
**भ्राजिष्ठ**–प्रियव्रतपुत्र घृतपृष्ठ त्याच्या सात पुत्रांतील पांचवा, याचा वर्ष याच नांवानें प्रसिद्ध आहे.
२–क्रौंच द्वीपाच्या सात वर्षांतील पांचवा वर्ष.
**भ्राष्ट्रकायन**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).
**भ्राष्ट्रकृत**– ,, ,, ( ३ अंगिरा श० पहा ).

---

## म

**मंकणक**–वायुभार्या सुकन्या तिचा पुत्र. यानें सारस्वततीर्थी तप केल्यावर, एकदां याच्या हातास दर्भ लागून रक्त निघालें, व तें उसाच्या रसाप्रमाणें वाहूं लागलें, त्यावरून आपल्या तपाची सिद्धि झाली, असा यास अभिमान झाला, तो शिवांनीं झाडिला, व तेणेंकरून हा सावध झाला ( भार० वन० अ० ८३ ). यास वायुवेग, वायुबल, वायुहा, वायुमंडल, वायुज्वाल, वायुरेता, आणि वायुचक्र असे सात पुत्र होते (भार० शल्य० अ० ३८).
**मकर**–कुबेराच्या नऊ निधींतील एक.
२–मेरूच्या परिस्तरणगिरींतील उत्तरेकडील गिरि तो.
**मकरध्वज**–महामत्स्य ज्याच्या ध्वजावर असतो, असा जो मदन तो. अशा अर्थाचीं हीं नांवें पुष्कळ आहेत.
२–कंठगत श्लेष्मा मारुतीनें समुद्रांत टाकिलेला एका मगरीनें गिळिला, त्यापासून झालेला पुत्र तो.
३–चंद्रहास राजाचा ज्येष्ठ पुत्र.
**मकराक्ष**–जनस्थानीं राहणाऱ्या खर राक्षसाचा पुत्र.

यास रामानें लंकेंत मारिलें (वा० रा० यु० स० ७८).

**मकरी**–भारतवर्षीय नदी.

**मंकि**–कृषीवल ( शेतकरी ). हा एकदां, आपल्या दोन बैलांच्या मानेवर जूं घालून त्यांस हाकीत शेताकडे चालला असतां, समोरून एक उंट आला, व त्यानें आपली लांब मान बैलांपुढें सहज केली. तिला पाहून बैल बुजून उधळले. तेणेंकरून दोघांच्या मानेवरील जूं तसेंच असून, उंटाच्या मानेवर आल्यानें, त्यानें वर मान करितांच बैल दोहींकडे लोंबूं लागले. तें उंटास मोंठ लचांड होऊन मान झाडीत पळत असतां, दोन्ही बैल खालीं पडून मरण पावले. त्यावरून यास प्रारब्धाचा चमत्कार वाटून वैराग्य झालें ( भार० शांति० अ० १७७ ).

**मखोपेत**–कार्तिकमासीं सूर्यासमागमें असणारा राक्षस ( ३ ऊर्ज श० पहा ).

**मगधदेश**–पूर्व सुह्म व प्रसुह्म देशाच्या पूर्वेकडील देश. या देशासभोंवते वैहार, वराह, वृषभ, ऋषिगिरि आणि चैत्यक, असे पांच सामान्य मर्यादापर्वत असून याची राजधानी गिरिव्रज आहे. येथें पूर्वी दशरथ राजाचा श्वशुर जो सुमित्रेचा पिता शूरसेन, तो राजा होता. आणि पांडवांच्या वेळेस जरासंध, व त्यापुढें त्याचा पुत्र सहदेव, हे राजे होते ( भार० सभा० अ० ३० ).

**मंगल**–आदिवराहापासून भूदेवीस झालेला पुत्र. हा कल्पारंभींचा मंगलमंडलाधिपति होय. प्रस्तुत त्या स्थानीं, वीरभद्र ना० शिवगण मंगल झाला आहे. यास अंगारक हेंही नांव आहे.

२–दाशरथि रामाच्या सभेंतील हास्यकार.

**मंगलप्रस्थ**–भारतवर्षीय पर्वत.

**मघवा**–इंद्रास नांव. याच नांवाचा चालू मन्वंतरांतला सातवा व्यास ( व्यास श० पहा ).

**मघा**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

**मचक्रुक**–एक स्थलवि० ( २ कुरुक्षेत्र श० पहा ). हें तीर्थही आहे.

**मंजुला**–वंजुला शब्द पहा.

**मंड**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**मणिकंधर**–कुबेरसेनापतींतील एक.

**मणिकर्णिका**–भागीरथीसंबंधीं तीर्थवि०.

**मणिकार्मुकधर**–कुबेरसेनापतींतील एक.

**मणिकूट**–लक्षद्वीपस्थ सात पर्वतांतील एक.

**मणिग्रीव**–कुबेरपुत्र, व नलकूबराचा कनिष्ठ भ्राता.

**मणिद्वीप**–द्वीपवि० हें सप्तद्वीपांतील नव्हे, एकादें अष्ट उपद्वीपांतील या नामांतरानें सामान्यद्वीप असावें. येथें महिषासुर राहात होता.

**मणिधर**–लोहितपर्वतावर राहणारा यक्षवि०.

**मणिनाग**–एक नाग, व भारतवर्षीय तीर्थ.

**मणिपुर**–चित्रवाहन राजाची नगरी. येथें अर्जुनपुत्र बभ्रुवाहन राज्य करीत होता.

२–निवातकवचाचें नगर ( वा० रा० उत्तर०स०२३).

**मणिपुष्पक**–सहदेवाचा युद्धकाळीं वाजविण्याचा शंख.

**माणिभद्र**–शिवगण.

२–कुबेरसेनापतींतील एक. हा चंद्रप्रभा पर्वतावर राहात असे.

**मणिभूष**–कुबेरसेनापतींतील एक.

**मणिमती**–भारतवर्षीय नदी व एक नगरी. हिला दुर्जया असेंही म्हटलेलें आहे.

**मणिमान**–पाताललोकांतील नागवि०.

२–कुबेरसेनापति राक्षसवि०. हा कुबेराचा अतिप्रिय सेवक होता. एकदां याकडून अगस्त्य ऋषीचा कांहीं अपराध घडला, त्यामुळें तूं लवकरच मरशील असा त्यानें यास शाप दिला होता. पुढें त्याचप्रमाणें, पांडव हिमवान्पर्वतीं असतां, कमलें आणायासाठीं भीम कुबेरवनांत गेला. तेव्हां त्यानिमित्त उभयतांचें युद्ध होऊन त्यांत यास भीमानें मारिलें ( भार० वन० अ० १६० ).

३–रुद्रगणवि०.

४–भारतीययुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा ( भार०द्रोण० अ० २५ ).

५–द्रोणाचार्यानें मारिलेला पांडवपक्षीय राजा. हा पूर्वेकडील राजा होय.

**मणिवक्र**–आप ना० वसूचा पुत्र.

**मणिवाहन**–( सो० वं० ) उपरिचर वसूस गिरिकेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**मणिस्रग्वि**–कुबेरसेनापतींतील एक यक्ष.

**मतंग**–दाशरथि रामास फळें देणाऱ्या शबरीचा गुरु ( वा० रा० अरण्य० स० ७४ ).

२–कोणी एक ऋषिपुत्र. हा, पित्यास समिधा व दर्भ अरण्यांतून आणून देई. एकदां यानें रथास रासभी(गाढवी) व तिचा पुत्र जोडून अरण्यांत गमन केलें ( अर्थात्, हा ब्रह्मबीज नव्हता हें उघड सिद्ध होतें; कारण यवन चांडाल इ०कांवांचून रथास पूर्वी रासभ कोणी जोडीत नसत ). सारांश, मार्गानें हा रथांत बसून जात असतां रासभीप्रमाणें तिचा पुत्र लहान असल्यामुळें चालेना, म्हणून यानें त्यास वारंवार मारावें असें होऊं लागलें,

त्यांत त्याचें नाक फुटून त्यास अतिशय दुःख झाल्यामुळें रडूं आलें, असें पाहून माता त्यास म्हणाली, तूं रडं नको, प्राणिमात्रांस दुःख द्यावें, हा चांडालांचा स्वभावच आहे. तें बोलणें यास समजून हा रथाखालीं उतरला, व रासभीस पुसूं लागला कीं, मी चांडाल कसा तें सांग. त्यावरून तिनें तुझ्या मातेस शूद्रसमागम घडून, तूं उत्पन्न झालास. असें सांगतांच यास पश्चात्ताप झाला;व यानें लागलेंच उभयतांस सोडून देऊन ब्राह्मण्य प्राप्त होण्यासाठीं तप आरंभिलें; परंतु त्या जन्मांत यास तें प्राप्त झालें नाहीं. मात्र फार तप झाल्यामुळें, हा छंदोदेव झाला ( भार० अनु० अ० २७ ).

**मतंगपर्वत**–ऋष्यमूक आणि मलय या दोन शृंगांचा आधार पर्वत.

**मतंगसर**–पंपासरोवरापासून जवळच असणारें दुसरें एक सरोवर तें.

**मतंगाश्रम**–क्रौंचारण्याच्या पूर्वेकडे असणारा मतंग ऋषीचा आश्रम तो.

**मतिनार**–अंतिभार राजासच हें नांव आहे.

**मत्त**–लंकेंतील एक बलाढ्य राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

२–महापार्श्वासही हें नामांतर आढळतें.

**मत्तमयूरक**–रोहितकपुरींतील अध्यक्षवि०,अ०लोकविशेष.

**मंत्रद्रुम**–चाक्षुष मन्वंतरांतलि स्वर्गांमधील इंद्र.

**मंत्रमाला**–कुशद्वीपांतील नदी.

**मंत्रिका**–यजुर्वेदोपनिषत्.

**मंत्रेश्वर**–एक योजन दीर्घ असें नर्मदेच्या उत्तरतीरींचें तीर्थ.

**मत्स्यगंध**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**मत्स्यगंधा**–कृष्णद्वैपायनमाता सत्यवती, तिचें मूळचें नांव.

**मत्स्यदग्ध**–ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**मत्स्यदेश**–इंद्रप्रस्थ नगर मध्य धरून, पूर्व पश्चिम, दक्षिण व अपरदक्षिण, अशा भेदानें हा देश चार प्रकारचा. तो त्या त्या अक्षरक्रमांत पाहावा.

**मत्स्यनदी**–भारतवर्षीय नदी.

**मत्स्यराज**–उपरिचर वसु राजास मत्स्यीच्या उदरीं, झालेले कन्यापुत्ररूप मिथुन, त्यांतील पुत्र. मत्स्यगंधेचा भ्राता.

**मत्स्यवाहन**–वरुण.

**मत्स्याच्छाद्य**–ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**मत्स्यावतार**–ब्रह्मदेवाचा घोर ना० पंचविसावा कल्प ( दिवस ) समाप्त होऊन, रात्र प्रवृत्त झाली असतां, ब्रह्मदेव निद्रित झाल्यामुळें नित्यप्रलय झाला, त्या काळीं हयग्रीव ना० कोणी असुर, वेद हरण करावे अशा बुद्धीनें ब्रह्मदेवाकडे जाऊं लागला असें पाहून, त्याच्या नाशार्थ झालेला विष्णूचा मत्स्यरूपी अवतार तो. **श्लोक**—आसीदतीतकल्पांते ब्राह्मो नैमित्तिको लयः ॥ समुद्रोपप्लुतास्तत्र लोका भूरादयो नृप ॥ ७ ॥ कालेनागतनिद्रस्य धातुःशिशयिषोर्बली॥ मुखतो निसृतान् वेदान् हयग्रीवोंतिके हरत् ॥ ८ ॥ ज्ञात्वा तद्दानवेंद्रस्य हयग्रीवस्य चेष्टितम् ॥ दधार शफरीरूपं भगवान् हरिरीश्वरः ॥ ९ ॥ ( भाग० ८ स्कं० अ० २४ ). हा अवतार जरी पूर्वकल्पाच्या आणि चालू कल्पाच्या संधींत झाला होता, तरी याची गणना चालू कल्पांतच आहे.

या मत्स्याचा, सत्यव्रत राजाशीं संबंध झाला होता त्याचा इतिहास असा—कोणे एके काळीं पूर्वकल्पीं सत्यव्रत संध्या करीत बसला असतां, त्याच्या अंजलींत अकस्मात् एक मत्स्य पडला.तो त्यानें संध्यापात्रांत टाकितांच लागलाच तेवढा होऊन, राजा माझें रक्षण कर असें म्हणूं लागला; म्हणून त्यानें त्यास कूपांत, सरोवरांत अनुक्रमें सोडिलें. तेथेंही तो तेवढा होऊन पूर्ववतच रक्षण कर म्हणून बोलूं लागला. असें पाहून राजानें त्यास समुद्रांत सोडितांच, त्यानें सर्व समुद्र व्यापिला,त्यावरून राजा आश्चर्य पावून त्यास म्हणूं लागला कीं, तूं मत्स्य नसून कोणी अलौकिक प्राणी असा ईश्वरच आहेस. इतकें बोलून त्यानें त्याची स्तुति केली.ती ऐकून मत्स्यरूपी भगवान् त्यास म्हणाला, राजा, आतां लौकरच प्रलय होणार आहे, तो होऊन जातांच नूतन कल्प आरंभला म्हणजे, त्यांत तूं सातवा वैवस्वत नांवानें मनु होशील. त्यावरून राजानें प्रलयकाळीं स्थिति कशी असते ती पाहण्याची इच्छा दर्शविली असावी, म्हणून मत्स्यानें त्यास नौका सिद्ध करण्यास, व प्रलय उपस्थित झाला असतां, तींत बसण्यास आज्ञा करून, पुनः तुला, मी याच रूपानें प्रत्यक्ष होईन असें सांगून अंतर्धान पावला ( मत्स्य० अ० १ ). अशी या कथेची पूव संगति समजावी.

**मथन**–विष्णूनें मारिलेला तारकासुरपक्षीय असुर (मत्स्य० अ० १५१ ).

**मंथरा**–विरोचन दैत्याची कन्या. हिनें सर्व पृथिवीचा नाश करावा अशी इच्छा धरून, त्या कर्मास प्रवृत्त झालेली असतां, इंद्रानें हिला मारिलें ( वा० रा० बाल० स० २५ ).

२–दशरथ राजाची तिसरी स्त्री कैकेयी, तिची दासी. ही पूर्वीची दुंदुभिना० गंधर्वी होय. रामचंद्रास यौवराज्याचा समारंभ होत असतां, हिनें कैकेयीस भय प्रदर्शित करून, पूर्वी दशरथानें दिलेल्या दोन वरांचें स्मरण करून दिलें, व एका वरानें रामानें अरण्यांत जाऊन दुसऱ्या वरानें भरतास यौवराज्य मिळावें, असें राजापाशीं मागण्यास तिला शिकविलें. ही तीन ठिकाणीं वक्र असे, म्हणून हिला त्रिवक्रा कुब्जा असें नामांतर असे ( वा० रा० अयोध्या० स० ७–९ ).

**मथित**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**मंथु**–ऋषभदेववंशीय वीरव्रत राजाचा ज्येष्ठ पुत्र. यास भौवन ना० पुत्र होता.

**मथुरा**–पूर्वी मधुना० असुर–रावणभगिनी कुंभीनसी तिचा पति, येथें तप करीत असल्यामुळें, मधुवन या नांवानें या देशाची प्रख्याति होती. पुढें त्याचें तप पूर्ण होऊन रुद्रवरेंकरून तो संपन्न झाल्यावर, त्यानें मधुरा नांवाची पुरी स्थापून तींत वास्तव्य केलें. कांहीं काळानें मधु मरण पावला, व त्याचा पुत्र लवणासुर तेथें राज्य करूं लागला; परंतु तो दुष्ट असल्यामुळें रामाच्या आज्ञेवरून, त्याच्या शत्रुघ्न ना० भ्रात्यानें त्यास मारून, आपण तींत राज्य करूं लागला ( वा० रा० उत्तर० स० ७० ). या देशांतील सेना शूर होईल, असा देवांचा वर शत्रुघ्नास झाल्यामुळें, याचें नांव तेव्हांपासून शूरसेनदेश असें पडून मधुपुरी त्याची राजधानी झाली. तिलाच मथुरा हें नांव पुढें पडलें. पांडवांच्या वेळेस, ही नगरी पश्चिम शूरसेन देशाची राजधानी होती. प्रस्तुत शूरसेन देश हें नांवच बुडालें असून, नगरी मात्र अजून या नांवानेंच प्रसिद्ध आहे.

**मद**–ब्रह्मपुत्र.

२–इंद्राचा पराभव करण्याकरितां, च्यवनभार्गवानें अग्नींतून उत्पन्न केलेला राक्षस.

३–रामचंद्राच्या सुज्ञ ना० मंत्र्याचा पुत्र.

**मंद**–रावणपक्षीय राक्षस.

**मंदक**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**मंदगा**–शुक्तिमान् पर्वतापासून निघालेली नदी.

**मंदधार**–भीमसेनानें पूर्वदिग्विजयकाळीं जिंकलेला राजा.

**मदन**–ब्रह्मपुत्र, काम अशा नांवानें याची प्रसिद्धि.

२ धृष्टबुद्धि प्रधानाचा ज्येष्ठ पुत्र (१ चंद्रहास श०पहा).

**मदनमंजरी**–नीलध्वजपुत्र प्रवीराची स्त्री.

**मदनसुंदरी**–शत्रुघाती राजाची स्त्री.

**मदनालसा**–चंपक गंधर्वाची स्त्री.

**मंदपाल**–कोणी तपस्वी ऋषि. खांडववन अर्जुनानें अग्नीस दिलें, त्या वेळेस त्यांत जे चार पक्षी वांचले, त्यांचा हा पक्षिदेहानें पिता होता.

**मदयंती**–सूर्यवं० कल्माषपाद अ० मित्रसह राजाची स्त्री. अश्मक राजाची माता.

**मंदर**–मेरूस पूर्व दिशेकडून असणारा आधारभूत पर्वत. येथें कधीं कधीं शिव येऊन राहतात ( भार० द्रोण० अ० ९४ ).

२–समुद्रमंथनकालीं मंथास्थानीं योजिलेला दुसरा एक पर्वत.

**मंदरहरिण**–अष्टउपद्वीपांतील पांचवें.

**मंदराचल**–मंदर पर्वतच.

**मंदवाहिनी**–शुक्तिमान् पर्वतापासून निघालेली नदी.

**मंदाकिनी**–भागीरथी.

२–ऋष्यवान् पर्वतापासून निघालेली नदी.

**मंदाकिन्य**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**मंदार**–हिरण्यकशिपु नांवाचा जो दानव त्याचा पुत्र. यानें रुद्रवरेंकरून इंद्राशीं बहुतकालपर्यंत युद्ध केलें होतें ( भार० अनु० अ० १४ ).

**मदालसा**–एक राजपत्नी ( २ अलर्क राजाची माता). ही परम ब्रह्मनिष्ठ होती.

**मदिरा**–वसुदेवाच्या स्त्रियांतील एक.

**मदिराश्व**–( सू० वं० ) इक्ष्वाकुराजर्षीचा पौत्र, व दशाश्वराजांचा पुत्र. याची राजधानी माहिष्मती नगरी (भार० अनु० अ० २). यानें आपली कन्या सुमध्यमा हिरण्यहस्तऋषीस दिली होती ( भार० शांति० अ० २३५ ). यास द्युतिमान् नांवाचा पुत्र होता.

२–विराट राजाचा भ्राता. हा युद्धांत पांडवांकडे होता, व द्रोणाचार्यांनें यास मारिलें ( भार० विराट अ० ३१ ). याला मदिराक्षहि म्हटलेलें आहे.

**मदिराक्ष**–द्वितियार्थक मदिराश्व तोच.

**मदोत्कट**–रुद्रगण.

**मंदोदरी**–मयासुरास हेमा अप्सरेपासून झालेल्या तीन कन्यांतील दुसरी. ही रावणाची स्त्री (वा० रा०युद्ध० स० १२).

२–सिंहलद्वीपींच्या चंद्रसेन राजापासून गुणवती भार्येच्या ठायीं झालेली कन्या. ही रूपानें अति सुंदर असून, वयांत आली असतां, पित्यानें इंद्रदेशींचा राजा सुधन्वा, त्याच्या कंबुग्रीव पुत्राशीं हिच्या विवाहाचा निश्चय केला; परंतु हिनें पित्यास सांगितलें कीं, बहुधा पुरुष परस्त्रियांशीं रत होऊन, विवाहित स्त्रींचा त्याग करणारे असतात; म्हणून मला विवाहच कर्तव्य नाहीं. यावरून राजानें तिला पुष्कळ बोध केला; परंतु ती

ऐकत नाहीं असें जाणून, तो विवाह यानें राहित केला. कांहीं काळानें हिची कनिष्ठ भगिनी इंदुमती, तिचा विवाह होऊं लागला असतां, त्या समारंभास अनेक देशींचे राजपुत्र आले. त्यांत मद्रदेशाचा चारुदेष्णा ना० अतिरूपवान् राजपुत्र आला होता.त्यास पाहून हिचें मन पहिल्या निश्चयापासून ढळलें, व तिनें पित्यास मला अमुकाशीं विवाह कर्तव्य आहे म्हणून कळविलें. त्यावरून त्यास आनंद होऊन, त्यानें इंदुमतीच्या विवाहसमारंभांतच हिचा विवाह केला. कालेंकरून हिनें जें पूर्वीं पुरुषांविषयीं भविष्य केलें होतें, तेंच हिच्या अनुभवास येऊन हिला दुःख झालें ( देवीभा० पंचम० अ० १७-१८ ).

**मद्रक**-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

२-मद्रदेश.

**मद्रदेश**-भारतवर्षीय देश. हा पश्चिम आनर्त देशाच्या पश्चिमेस असून, याची राजधानी शाकलना० नगरी आहे ( भार० सभा० अ० ३२ ). येथें दशरथ राजा व सीरध्वज जनक, यांच्यावेळीं चारुदेष्ण राजा होता, आणि पांडवांच्या वेळेस शल्य राजा होता.

**मधु**-होऊन गेलेला उत्तम ना० तिसरा मनु त्याच्या दहा पुत्रांतील एक.

२-ऋषभदेववंशीय बिंदुमान् राजास सरघा स्त्रीपासून झालेला पुत्र तो. याचा पुत्र वीरव्रतराजा.

३-कैटभ असुराचा कनिष्ठ भ्राता ( मधुकैटभ श० पहा ).

४-एक राक्षस यानें, रावणमातृभगिनीची कन्या कुंभीनसी हरण करून आणून, तिशीं आपला विवाह केला होता. याची माता लोला ना० राक्षसी यानें बहुत कालपर्यंत तीव्र तप केल्यावर, रुद्र प्रसन्न होऊन त्यानें यास एक शूळ दिला, व सांगितलें कीं, जोंपर्यंत तूं देव आणि ब्राह्मण यांचा द्वेष करणार नाहींस तोंपर्यंत हा तुजजवळ राहील, व हस्तांत असतां तूं अजेय होशील. मधूनें पुनः विनंति केली कीं, हा माझ्या वंशाकडे सतत असावा. रुद्रानें तें अमान्य करून, तुझ्या पुत्रांपर्यंत मात्र राहील, इतकें सांगून तो अंतर्धान पावला. पुढें मधूनें मधुपुरी स्थापून तींत स्त्रीसहवर्तमान राहिला असतां, कालेंकरून त्यास लवणासुर ना० पुत्र झाला. तो मोठा झाल्यावर, पुढें आपला अंतकाळ समीप आला असें यानें जाणून, पुत्रास जवळ बोलाविलें, आणि शूळ त्यास देऊन म्हणाला कीं, अधर्मानें अगदीं वागूं नको; नाहींतर लवकर क्षय पावशील. इतकें बोलून प्राण सोडिला ( वा० रा० उत्तर० स० ६१ ).

५-( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजितकुलोत्पन्न कार्तवीर्य राजाच्या प्रमुख पांच पुत्रांतील चौथा. यास वृष्णि इ० शत पुत्र होते.

६-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय क्रथान्वय-संभूत देवक्षत्राचा पुत्र. याचा पुत्र कुरुवश राजा.

७-यदुवंशांतील एक प्रसिद्ध कुल.

८-कृष्णाच्या पौत्रांतील एक.

९-वर्षांतील पहिला मास. याची पूर्णिमा चित्रानक्षत्रयुक्त असत्ये म्हणून, यास चैत्र असें म्हटलेलें आहे. या मासांत धाता ना० आदित्य सूर्यमंडलाधिपति असून त्यासमागमें संचार करण्यास पुलस्त्य ऋषि, कृतस्थली अप्सरा, तुंबुरु गंधर्व, वासुकि नाग, रथकृत, यक्ष, आणि हेति राक्षस इतके असतात ( भाग० १२ स्कं० अ० ११ ).

**मधुकुल्या**-कुशद्वीपांतील नदी.

**मधुकैटभ**-विष्णूच्या कर्णमलापासून उत्पन्न झालेले दोन असुर ( देवी० १ स्कं० अ० ४ ). हे विष्णूसच भीति दर्शवूं लागले असतां, तो यास म्हणूं लागला कीं, वर मागा. हे म्हणाले,'तूंच पाहिजे तर वर माग; त्यावरून विष्णूनें तुम्हीं मला वध्य असावें म्हणून मागितलें. यांनीं तथास्तु असें म्हटल्यावर, पुढें यांस त्यानें मारिलें. त्या काळीं यांच्या शरीरमेदानें संपूर्ण पृथिवी भरली, व तेव्हांपासून तिला मेदिनी नांव पडलें ( भार० वन अ० २०३ ). ( देवी०१ स्कं० अ० ९ ). यांचाच पुत्र धुंधु ना० असुर.

**मधुच्छंदस**-विश्वामित्रऋषीचा पुत्र.

**मधुपुर**-मथुरा नगरी.

**मधुमंत**-दंडक देशाचा राजा दंडक, त्याची राजधानी.

२-भारतवर्षीय देश.

**मधुमत्त**-दाशरथि रामाच्या सभेंतील हास्यकार.

**मधुरा**-मधुपुर.

**मधुरुह**-प्रियव्रतपुत्र घृतपृष्ठ, त्याच्या सात पुत्रांतील दुसरा. याच्या वर्षास नांव हेंच.

२-क्रौंचद्वीपाच्या सात वर्षांतील दुसरा वर्ष.

**मधुवटी**-भारतवर्षीय तीर्थ.

**मधुवन**-यमुनातीरीं असणारें वन. येथें मधु राक्षसानें तप केलें होतें, म्हणून तेंच नांव पडलें. यासच पुढें शूरसेन देश नांव पडलें. कृष्णाच्या वेळचें मधुवन, तो याचा एक प्रदेश होता.

२-किष्किंधेसमीप होतें वालीचें वन तें ( वा० रा० सुंदर० स० ६१ ).

**मधुविला**-समंगा नदीचें पहिलें नांव.

**मधुष्पंद**-विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक ( वा० रा० बाल० स० ५७ ).

**मधुस्रव**-भारतवर्षीय तीर्थ.

**मध्यान्ह**-उत्तानपादवंशीय पुष्पार्णास, प्रभा ना० स्त्री-पासून झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा.

**मन**-बारा साध्यदेवांतील एक.

**मनसा**-कश्यपऋषीची कन्या, जरत्कारु अ०. जरद्गौरी ती हीच ( आस्तिक श० पहा ).

**मनस्विनी**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अंतिभार राजाची स्त्री.

**मनीषी**-प्रत्यूषवसूचा पुत्र देवल, त्याच्या दोन पुत्रांतील एक.

**मनु**-एका ब्रह्मकल्पांत चौदा मनु होऊन जातात. मनु हें नांव साधारण आहे; परंतु एकेकास भिन्न भिन्न नांव असतें. प्रत्येक मनूच्या कालसत्तेस मन्वंतर म्हणतात. एक मन्वंतर एकाहत्तर पर्यय ( चौकड्या ) व वरती कांहीं काळ इतकें असतें. प्रस्तुतचा श्वेतवाराहकल्प चालू झाल्यापासून, **स्वायंभू**, **स्वारोचिष**, **उत्तम**, **तामस**,**रैवत** आणि **चाक्षुष**, इतके मनु व त्यांचीं मन्वंतरें होऊन गेलीं असून, सांप्रत **वैवस्वत** नांवाच्या मनूचे सत्तावीस पर्यय, व अठ्ठाविसाव्या पर्ययां-यांतील कृत, त्रेता, द्वापर आणि कलीचीं चार सहस्र नऊशें सत्याहत्तर वर्षें गत झालीं आहेत. शेष कलि-युग आणि त्रेचाळीस पर्ययासहित वरील काल गेला म्हणजे हें मन्वंतर पूर्ण होऊन, पुढें **सावर्णि**, **दक्ष-सावर्णि**, **ब्रह्मसावर्णि**, **धर्मसावर्णि**, **रूद्रसा-वर्णि देवसावर्णि**, आणि **इंद्रसावर्णि** हे मनु होतील, व चौदाव्या मनूची कालसत्ता पूर्ण झाली असतां, हा कल्प सरून ब्रह्मदेवाची रात्र प्रवृत्त होईल, म्ह० नित्य प्रलय होईल. ती रात्र सरतांच वैराज नांवाचा सत्ताविसावा कल्प उजाडेल.

प्रत्येक मनु चक्रवर्ती अ० सार्वभौम असतो. सार्व-भौम म्ह० सप्त महासागरांसहित सप्तद्वीपा भूमि ज्याच्या सत्तेंत तो.क्वचित् केवळ सर्व भरतवर्ष ज्याच्या सत्तेंत त्याला जरी सार्वभौम पुराणांतून म्हटलेलें आढ-ळतें, तरी तो गौण सार्वभौम समजावा. अर्थात् इत-रांस सार्वभौम हें नांव व्यर्थ होय.

२-कृशाश्व ऋषीस धिषणेपासून झालेल्या चार पुत्रां-तील एक.

३-प्राधेस झालेल्या अप्सरारूप कन्यांतील एक.

**मनुज**-दहा विश्वेदेवांतलि एक.

**मनुष्यधर्मा**-कुबेरास नांव.

**मनोजव**-प्रियव्रतपुत्र मेधातिथि, त्याच्या सात पुत्रांतलि दुसरा; याच्या वर्षाचें नांव हेंच.

२-शाकद्वीपाच्या सात वर्षांतील दुसरा.

**मनोरमा**-प्राधेच्या अप्सराकन्यांतील एक.

२-सूर्यवंशीय ध्रुवसंधि राजाची स्त्री. सुदर्शन राजाची माता.

३-सरस्वती नदीच्या सप्तप्रवाहांतील एक प्रवाहरूप नदी.

**मनोहरा**-एक अप्सरा.

**मन्मथ**-मदन अ० काम.

**मन्यु**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न ऋतेयुवंशीय दुष्यंत-पुत्र भरत राजा, त्याचा पौत्र, भरद्वाज राजाचा पुत्र. यास बृहत्क्षत्र, जय, महावीर्य,नर आणि गर्ग असे पुत्र पांच होते.

**ममता**-उशिज अ० ऋचिज ऋषीची स्त्री. दीर्घतमा ऋषीची माता. दीर्घतम्याच्या वेळेस ही गर्भिणी असतां,हिशीं बृहस्पति संभोगाची इच्छा करूं लागला. त्यावरून गर्भांतून दीर्घतम्यानें त्याचा निषेध केला असतां, तूं जन्मांध होऊन जन्मशील, असा बृहस्प-तीनें त्यास शाप दिला ( ही कथा धर्मशास्त्रविरुद्ध असल्यामुळें कृतक होय; कारण गर्भिणीशीं संभोग वर्ज्य असें धर्मशास्त्र आहे ).

**मय-मयासुर**-त्रिपुरांतलि एक महामायावी असुर ( त्रिपुर श० पहा ).

२-देवांचा जो शिल्पी, त्यास जसें विश्वकर्मा हें नांव साधारण असतें, तसा असुरांचा शिल्पी मय असावा असें वाटतें. हा चालू मन्वंतरांतील विप्रचित्ति दान-वाचा पुत्र असून, यास उपदानवी आणि कुहू अशा दोन कन्या होत्या. त्यांत कुहू कोणास दिली होती तें आढळत नाहीं; परंतु उपदानवी हिरण्याक्षास दिली होती ( हा हिरण्याक्ष कल्पारंभीं वराहानें मारलेला तो नव्हे, दुसराच समजावा; तथापि हिरण्यकशि-पूचा भ्राताही नव्हे ). मयासुरास हेमा अप्सरेपासून दुंदुभि, आणि मायावी हे दोन पुत्र, व मंदोदरी नांवाची एक कन्या होती. तीच पुढें यानें रावणास दिली असे ( वा० रा० उत्तर० स० १२ ).

खांडव वन अर्जुनानें अग्नीस भक्षणार्थ दिलें असतां, त्यांत हा सांपडला होता.तेव्हां,त्यानें याचें रक्षण केलें होतें ( भार० आदि० अ० २२८ ). पुढें यानें त्या उपकाराच्या उत्तीर्णतेसाठीं, त्यास एक सभा निर्माण करून दिली. ती सभा रत्नें व सुवर्ण यांचीच केवळ असून, तींत देव, गंधर्व इ० कांच्या. प्रतिमा, केवळ

ते देवादिकच बसले आहेत असा भास होण्याजोग्या निर्मिल्या होत्या, व स्थलावर जलाचा, जलावर स्थलाचा भास व्हावा असेंहि चातुर्य केलें होतें. ती सभा और-सचौरस सव्वाकोसाची असून, चौदा महिन्यांत यानें पूर्णतेस आणिली होती ( भार० सभा० अ० ३ ), व त्या अपूर्वसभेच्या संरक्षणार्थ यानें कांहीं कालपर्यंत तेथें आठसहस्र राक्षस ठेवून, देवदत्त नांवाचा शंख अर्जुनास, व वृषपर्व्याच्या वेळची एक नामांकित गदा भीमसेनास दिल्यावर आपण त्यांचा निरोप घेऊन बिंदुसरोवराकडे गेला.

**मयूर**–एक दानव.

**मयूरध्वज**–युधिष्ठिराचा अश्वमेधसंबंधीं अश्व, बभ्रुवाहनानें सोडिल्यावर मणिपुर नगरीहून निघाला तो याच्या रत्न ना० नगरीसमीप गेला. त्या वेळेस यानें आठव्या अश्वमेधास नर्मदातीरीं आरंभ केला होता. म्हणून याचा पुत्र सुचित्र अ० ताम्रध्वज, महापराक्रमी असून, आपल्या बहुलध्वज प्रधानासहित, आपल्या पित्याच्या अश्वरक्षणार्थ त्यासमागमें गेलेला विजयी होऊन परत आपल्या नगराकडे येत असतां, त्यानें हा पांडवांचा अश्व पाहून धरिला. त्यानिमित्त कृष्णार्जुनांशीं ताम्रध्वजाचें युद्ध होऊन, त्यानें सर्वांचा पराभव, आणि कृष्णार्जुनांस मूर्च्छित करून, त्यांचा अश्व घेऊन नगरांत प्रवेश केला.

ताम्रध्वज विजयी होऊन आल्याचें ऐकून, मयूरध्वजास आनंद झाला; परंतु दुसरा अश्व पाहून, पुत्रास पुसूं लागला कीं, हा अश्व कोणाचा; त्यानें सांगितलें, युधिष्ठिर म्हणून कोणी राजा आहे, त्याचा हा अश्व असून, यासमागमें कृष्णार्जुनादिक वीर संरक्षणार्थ आहेत, त्यांचा मी पराभव करून, हा अश्व आणिला आहे. हें त्याचें भाषण ऐकून, मयूरध्वजास वाईट वाटलें; कारण ताम्रध्वजास जरी युधिष्ठिरादिक अविदित होते, तरी हा स्वतः त्यास ओळखत होता.

इकडे कृष्ण सावध होऊन, त्यानें अर्जुनास सावध केलें, व ब्राह्मणवेष धारण करून, अर्जुनास शिष्य केलें. नंतर याच्या नगरांत जाऊन, सत्व पाहण्यासाठीं, यास, तुझें दक्षिणांग आम्हांस दे, म्हणून याचना केली. त्यावरून यानें आपलें शरीर कर्वतून देण्यास आरंभ करविला; बरेंच अंग कापून झालें तों राजाच्या वामनेत्रांतून अश्रु आले. तें पाहून ब्राह्मण जाऊं लागला; परंतु राजानें संकेतानें ब्राह्मणास कळविलें कीं, दक्षिणांगाचें ब्राह्मणकार्यानिमित्त जसें सार्थक झालें, असें वामांगाचें झालें नाहीं, म्हणून रुदन आलें. वस्तुतः शारीरदुःखानें रुदन आलें असें नाहीं. इतकें ऐकून कृष्णास संतोष होऊन, त्यानें आपलें मूळ रूप प्रकट केलें, व यांचें शरीर पूर्ववत् करून, राजास आलिंगन दिलें. मयूरध्वजानेंही त्यांचा सत्कार करून, आपला यज्ञ पूर्ण केला, व त्यासमागमें अश्व देवून साह्यास गेला. यास शिखिध्वज, बर्हिकेतु, मयूरकेतु, अशींहि नावें होतीं (जैमि० अश्व० अ० ४१–४६).

**मयोभुव**–अगस्त्यकुलांतील ऋषि.

**मरीचि**–स्वायंभुव मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र. याची स्त्री कर्दमकन्या कला, तिजपासून यास, कश्यप आणि पूर्णिमा असे दोन पुत्र झाले होते. तसीच दुसरी ऊर्णा ना० स्त्री होती. तिजपासून साहा पुत्र झाले होते ( १ ऊर्णा श० पहा ). पुढें सर्व ब्रह्मपुत्र मरण पावले. त्यांत हाही मरण पावला होता. अग्निष्वात्त ना० पितर, तेहि याचेच पुत्र होत.

२–ऋषभदेववंशीय सम्राट् राजास उत्कलेपासून झालेला पुत्र. यास बिंदुमती स्त्रीपासून, बिंदुमान् ना० पुत्र झाला होता.

३–वैवस्वत जें चालू मन्वंतर, यांत पूर्वीचे मानसपुत्र महादेवाच्या शापानें मरण पावल्यामुळें, ब्रह्मदेवानें त्यांस पुनः यज्ञाग्नींतून उत्पन्न केलें. येथें यास सुरूपा म्हणून कन्या होती ती, याच वेळच्या अंगिरा ऋषीस दिली होती, आणि पुत्र एकच कश्यप नांवाचा होता. याच्या कुलांत, हा स्वतः व कश्यप, हे दोघे मुख्य मंत्रद्रष्टे असून अवत्सार, नैध्रुव, नित्य, असित, देवल, असे मिळून सात होते ( मत्स्य० अ० १४४ ). याच्या वंशांतील सर्व ऋषि कश्यप शब्दावर विस्तारानें लिहिले आहेत ( २ कश्यप श० पहा ).

**मरीचिगर्भ**–हविष्मंत पितरांचा लोक.

२–दक्षसावर्णि मन्वंतरांतील देववि०.

**मरीची**–एक अप्सरा.

**मरु**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ध्रुवसंधिवंशीय शीघ्र राजाचा पुत्र, याचा पुत्र प्रसुश्रुत अ० प्रश्रुत.

२–( विदे० वं० ) हर्यश्व जनकाचा पुत्र. याचा पुत्र प्रदीपक अ० प्रतींधक.

३–मरुधन्व श० पहा.

**मरुत्**–मरुद्गण.

**मरुत**–( सो० वं० ) नहुषकुलोत्पन्न तुर्वसुकुलांतील करंधम राजाचा पुत्र. हा अनपत्य होता म्हणून, यानें पूरुकुलोत्पन्न रैभ्यपुत्र दुष्यंत राजा, त्यास पुत्र मानून आपलें राज्य दिलें होतें.

**मरुत्त**-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न अवीक्षित राजाचा पुत्र. हा, महान् पराक्रमी, शूर व यज्ञकर्ता असा होऊन गेला. यास अवीक्षित असेंही म्हणत. यानें यज्ञार्थ बृहस्पतीस बोलाविलें असतां त्यानें नाहीं म्हणून सांगितल्यावर, नारदाच्या सूचनेवरून, संवर्त ऋषीस आणले ( हा संवर्त बृहस्पतीचा भ्राता ) व यज्ञास आरंभ केला. हा यज्ञ यमुना नदीतीरिच्या प्लक्षावतरण-तीर्थी झाला ( भार० वन० अ० १२९ ). याच्या यज्ञांत विश्वेदेव सभासद, व मरुद्गणपरिवेष्टे (अन्न वाढणारे ) असे होते. याशिवाय अन्यही देवांचें साह्य होतें ( भार० शांति० अ० २९ ). यानें ब्राह्मणांस इतकी दक्षिणा दिली कीं, ती त्यांच्यानें नेववेना. ( भार० द्रोण० अ० ५५ ). याचा यज्ञ सिद्धीस न जावा म्हणून इंद्रानें केलेला उपाय व्यर्थ होऊन, तो गर्वरहित झाला ( भार० अश्वमे० अ० ५-६ ).पुढें याच्या यज्ञास विघ्न करावें, यास्तव रावण आला होता; परंतु यानें यज्ञदीक्षा घेतली होती म्हणून यास उठतां आलें नाहीं. तथापि रावण आपणच होऊन माघारा गेला ( वा० रा० उत्तर० स० १८ ). मरुत्त राजास दम या नांवाचा एकच पुत्र होता व याच्या मागें तोच राज्याधिकारी झाला.

**मरुत्वती**-प्राचेतसदक्षाची कन्या व द्वितीयार्थक धर्मऋषीची स्त्री.

**मरुत्वान्**-मरुत्वतीच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ.

**मरुदेव**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयसंभूत ध्रुवसंधिवंशीय सुप्रतीक अ० सुप्रतीप राजाचा पुत्र, याचा पुत्र सुनक्षत्र राजा.

**मरुद्गण**-दितीचा पुत्र हिरण्यकशिपु मरण पावल्यावर, तिला दुःख होऊन तिनें आपला पति कश्यपऋषि, त्यास प्रार्थना केली कीं, इंद्रास मारील असा मला पुत्र व्हावा. तें ऐकून त्यास वाईट वाटलें;तथापि त्यानें तिला एक कठीण व्रत सांगितलें; व म्हणाला, यांत मात्र अगदीं चुकूं नको, नाहीं तर भलतेंच होईल. तेव्हां तिनें तथास्तु म्हणून, उक्त नियमपूर्वक व्रतास आरंभ केला. त्यावरून इंद्रास भय होऊन तो बटुरूपानें तिची सेवा करीत व्यंगतेची मार्गप्रतिक्षा करीत असतां एकदां सूर्यास्तसमयीं ती निद्रित झाली आहे, हें व्यंग पाहून त्यानें तिच्या उदरांत प्रवेश केला, व गर्भाचे सात तुकडे केले. त्यावरून ते रडूं लागले म्हणून, इंद्रानें त्यास, 'मा रुद-मा रुद'--म्हणजे रडूं नका, असें म्हटलें व ते जिवंत आहेत असें समजून पुनः एकेकाचे सात सात तुकडे केले, तरी ते मेले नाहींत. त्यावरून हे दैत्य असून, अमर आहेत, अमर म्ह० देव आहेत, असें जाणून, इंद्रानें यांशीं सख्य केलें ( भाग० ६ स्कं० अ० १८ ). सांप्रत हे चालू मन्वंतरांतील सप्तविध देवांत आहेत ( भाग० ८ स्कं० अ० १३ ). या व्रताच्या आधीं कश्यपानें यांच्या उत्पत्तीसाठीं आपस्तंब ऋषीकडून पुत्रकामेष्टि करविली होती ( आपस्तंब श० पहा ).

**मरुद्वृद्धा**-भारतवर्षीय नदी.

**मरुधन्व**-सारस्वत, व बहुधान्यकदेश, त्यांच्यामध्यें असणारा देश.

**मरुभूमि**-मरुधन्वदेश तोच.

**मर्कटप**-ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**मर्कोट**-भारतवर्षीय क्षेत्र.

**मलज-मलद**-हा देश, व करूषक देश समीप आहेत. हे अयोध्या व मिथिला नगरी यांपासून दूर जरी तरी, कांहींसे मधोमध्य असत. या स्थानीं इंद्रास, वृत्रवधानें आलेलें मालिन्य जाऊन क्षुद्बाधा हरण झाली ( वा० रा० बाल० स० २४ ). हे दोनही देश, यांत ताटका राक्षसी येऊन राहिलेल्यानें कांहीं कालपर्यंत उध्वस्त झाले होते; परंतु दाशरथि रामानें, विश्वामित्रयागरक्षण-कालीं तिचा वध केल्यानें, पुनः यांत वसति झाली ( वा० रा० बाल० स० २६ ).

**मलंदरा**-भारतवर्षीय नदी.

**मलय**-ऋषभदेवाच्या नऊ खंडाधिपति पुत्रांतील एक. याच्या खंडास हेंच नांव आहे.

२-भरतवर्षांच्या नऊ खंडांतील चौथा.

३-मतंग पर्वताचें शृंगवि०. ( ऋष्यमूक श० पहा ).

४-भारतवर्षीय एक उपपर्वत. यापासून कृतमाला, ताम्रा, पुष्पजा आणि उत्पलावती, इ० नद्या निघतात (मत्स्य० अ० ११३ ).

**मल्ल**-दाशरथि रामाच्या सुज्ञ ना० मंत्र्याचा पुत्र.

**मल्लदेश**-याचे उत्तर आणि दक्षिणमल्ल असे दोन भेद होत.

**मसृण**-एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**महत्**-सामवेदोपनिषत्.

**महती**-पारियात्र पर्वतापासून निघालेली नदी.

**महर्लोक**-भूमीच्या ऊर्ध्व प्रदेशीं असणाऱ्या सात लोकांतील चवथा.

**महर्षि**-ब्रह्ममानसपुत्रांस संज्ञा.

**श्लोक.**

मरीचिरत्र्यंगिरसौ पुलस्त्यः पुलहः क्रतुः
भृगुर्वसिष्ठो दक्षश्च दशमस्तत्र नारदः ॥ २२ ॥

(भाग० ३ स्कं० अ० १२). (मत्स्य० अ० ३ श्लो० ६-७ ). मनुस्मृतींत दक्षाच्या स्थळीं प्रचेता असें म्हटलें आहे. मरीच्यादिक पुत्रांस, स्वायंभुव मन्वंतरांत ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें असतां, त्याच मन्वंतरांत त्यांस महादेवाचा शाप होऊन मरण आलें. म्हणून ब्रह्मदेवानें चालू मन्वंतरांत पुनः त्यांस उत्पन्न केलें.

श्लोक.

महादेवेन ऋषयः शप्ताः स्वायंभुवेंतरे ॥
तेषां वैवस्वते प्राप्ते संभवं मम कीर्तय ॥ ३ ॥
महादेवस्य शापेन त्यक्त्वा देहं स्वयं तथा ॥
ऋषयश्च समुद्भूतास्च्युते शुक्रे महात्मनः ॥ ६ ॥

( मत्स्य० अ० १९४ ). यांत भृगु, अंगिरा, आणि कवि, हे तीन पुत्र भारतांतील अनुशासन पर्वावरून वरुणरूपधारी महादेवाच्या यज्ञांत ब्रह्मदेव ऋत्विज असतां निर्माण झाले होते, व अवशिष्टांस त्यानें स्वतःच अग्नींतून उत्पन्न केलें होतें असें समजावें. सारांश, मरीच्यादिक महर्षि, दोनदोनदां ब्रह्ममानसपुत्रत्वानें आढळतात, त्याचें कारण महादेवाचा शाप होय.

**महस्वान्**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ध्रुवसंधि राजा, तद्वंशीय अमर्षण राजाचा पुत्र. याचा पुत्र विश्वस.

**महाकपाल**-दूषण राक्षसाचा अमात्य.

**महाकर्ण**-एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**महाकापि**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**महाकाय**-रुद्रगणांतील एक.
२-रावणपक्षीय राक्षस.

**महाकाल**-रुद्रगणांतील एक.
२-अवंति देशांतील वन आणि क्षेत्र.
३-बाणासुरास नांव.

**महाकाली**-महादेवाची शक्ति ( देवी भा० ३ स्कं० अ० ६ ).

**महागिरि**-भारतवर्षीय पर्वत.

**महागौरी**-विंध्याचलापासून निघणारी नदी.

**महाचाक्रि**-ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**महाजानु**- ,, ,,

**महांत**- ,, ,,

**महातल**-सप्त पातालांतील पांचवें. याची गणना बिलस्वर्गांत असून, यांत कद्रुपुत्र नाग राहतात.

**महादंष्ट्र**-रावणपक्षीय राक्षस.

**महादेव**-सर्व देवांत श्रेष्ठ जो ईश्वर तो. शिवास म्हणण्याची अत्यंत रूढी.

**महाद्युति**-रुद्र ( एकादशरुद्र श० पहा ).

**महाधृति**-( विदे० वं० ) विश्रुत जनकाचा पुत्र. वाल्मीकि रामायणांत यास महीधृक् म्हटलें आहे याचा पुत्र कृतिरात जनक.

**महानंदा**-एक मोठी नामांकित वेश्या. हिनें, वेश्यांस उक्त असलेल्या धर्माप्रमाणें चालून ईश्वरप्रसाद संपादिला होता ( स्कंद पु० ब्रह्मोत्तरखंड पहा ).

**महानदी**-अलकनंदेस नांव.
२-भारतवर्षीय नदी.

**महानस**-शाकद्वीपांतील पर्वत.

**महानाद**-भारतवर्षीय तीर्थ व क्षेत्र.
२-प्रहस्ताच्या चार अमात्यांतील एक ( वा० रा० युद्ध० स० ५८ ).

**महानाभ**-हिरण्याक्षास उपदानवीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**महानारायण**-अथर्वणवेदोपनिषत्.

**महानील**-कद्रुपुत्रनागांतील एक.

**महापद्म** ,, ,,
२-कुबेराच्या नवनिधींतील चौथा.

**महापक्ष**-अक्रूर यादवाच्या पुत्रांतील एक.

**महापार्श्व**-विश्रवा ऋषीस पुष्पोत्कटेपासून झालेल्या राक्षसांतील एक. रावणाचा सापत्न भ्राता. यास मत्त असेंही म्हटलेलें आहे ( वा० रा० युद्ध० स० ६९ ). हा, रावणाच्या अमात्यांतील एक असे ( वा० रा० सुंदर० स० ४९ ). यास युद्धकाळीं अंगदानें मारिलें ( वा० रा० युद्ध० स० ९९ ).

**महाबल**-शिवपार्षदांतील एक.
२-विष्णुपार्षदांतील एक.
३-दनुपुत्र दानवांतील एक.
४-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा तद्वंशीय हृदिक राजाच्या पुत्रांतील एक.
५-दुर्योधनपक्षीय राजा ( भार० उद्योग० अ० १९ ).

**महाबाहु**-दनुपुत्र एक दानव.
२-धृतराष्ट्रशतपुत्रांतील एक.

**महाभय**-अधर्मास निर्ऋती स्त्रीपासून झालेला पुत्र.

**महाभागा**-भारतवर्षीय नदीरूप तीर्थ.

**महाभीष**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न राजा ( याचें नांव वंशावळींत आढळत नाहीं ). यानें सहस्र अश्वमेध, व शत राजसूययज्ञ केले होते. एकदां हा सत्यलोकीं गेला असतां, तेथें यानें महर्षि, देवर्षि, इ० कांचा मोठा समाज बसलेला अवलोकन केला. संपूर्ण वेद, उपवेद, वेदांगें, नद्या, व पर्वत आदिकरून मूर्ति-

मान् व बद्धांजलि असे पाहिले. नंतर मर्यादेनें नमस्कार करून, हाही बद्धांजलि होऊन उभा राहिला असतां, ब्रह्मदेवांनीं आज्ञा केल्यावरून खालीं बसला. पुढें सभेस उत्थापन झालें. त्या वेळेस, यास गंगा अगदीं निकट दृष्टीस पडून तिजविषयीं कामबुद्धि उत्पन्न झाली, व गंगेसही याच्याविषयीं तसेंच झालें. त्यावरून दोघांसही शाप झाला कीं, तुम्हांस मृत्युलोकीं जन्म घडेल. तोच हा राजा पुढें शंतनु होऊन गंगा याची स्त्री झाली होती व अष्टवसु पुत्ररूपानें जन्मास आले होते ( भार० आदि० अ० ९६ ).

**महाभोज**-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय शशबिंदु राजाचा पुत्र. यास दहा सहस्र स्त्रिया, व प्रत्येकीस लक्ष लक्ष, याप्रमाणें पुत्र होते. त्यांत पृथुश्रवा इ० साहा पुत्र प्रमुख होते.

**श्लोक.**

तस्य पत्नीसहस्राणां दशानां सुमहायशाः ॥
दश लक्षसहस्राणि पुत्राणां तास्वजीजनत् ॥ ३ ॥
( भाग० ९ स्कं० अ० २३ ).

२-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय सात्वत राजाच्या सात पुत्रांतील कनिष्ठ. याचे वंशजांस भोज असें म्हटलेलें आहे.

**महामती**-द्वितीयार्थक बृहस्पतीच्या सात कन्यांतील कनिष्ठ.

**महामना**-( सो० वं० ) ययातिपुत्र अनुराजा, तद्वंशीय जनमेजय राजाचा पुत्र. यास, उशीनर आणि तितिक्षु, असे दोन पुत्र होते.

२-एक गंधर्व.

**महामाली**-खर राक्षसाच्या बारा अमात्यांतील एक.

२-रावणपक्षीय एक राक्षस.

**महामेघ**-याज्ञवल्क्य ऋषीचा मध्यम पुत्र. जन्मांतरीं दूषण राक्षस झाला ( १ चंद्रकांत श० पहा ).

**महारथ**-विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक ( वा० रा० बाल० स० ५७ ).

२-उपरिचर वसुराजाचा पुत्र बृहद्रथ त्यासच नामांतर.

**महारव**-एक यादव.

**महारोमा**-( विदे० वं० ) कृतिरात अ० कीर्तिरात जनकाचा पुत्र. याचा पुत्र स्वर्णरोमा जनक.

**महारौरव**-केवळ देहभरणावर दृष्टि देऊन, अधर्मी रत होणाऱ्यास प्राप्त होणारा नरक.

**महान्हाद**-रावणपक्षीय राक्षस.

**महालय**-भारतवर्षीय क्षेत्र.

**महालक्ष्मी**-विष्णूची शक्ति ( देवीभा० स्कं० अ० ६ ).

**महालिंग**-भारतवर्षीय क्षेत्र.

**महावशी**-( विदे० वं० ) कृतिसंज्ञक जनकाचा पुत्र.

**महावाक्य**-अथर्वणवेदोपनिषत्.

**महावीर**-प्रियव्रत राजाच्या दाहा पुत्रांतील चौथा. यानें परमहंसदीक्षापूर्वक अरण्यांत गमन केलें; कारण तो विरक्त होता.

२-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**महावीर्य**-( विदे० वं० ) बृहद्रथ अ० दैवराति जनकाचा पुत्र. याचा पुत्र सुधृति जनक.

२-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न मन्युराजा, त्याच्या पांच पुत्रांतील तिसरा. याचा पुत्र दुरितक्षय राजा.

**महाव्रत**-विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**महाश**-कृष्णास लक्ष्मणेपासून झालेला पुत्र.

**महाशंख**-कद्रुपुत्र एक नाग. हा, मार्गशीर्ष मासींच्या सूर्यासमागमें असतो ( ४ सह श० पहा ).

**महाशक्ति**-कृष्णास लक्ष्मणेपासून झालेला पुत्र.

**महाशाल**-हिमालयाच्या दक्षिणभागचें वनवि०हा हिमालयप्रथमार्थक समजावा.

**महाशिरा**-वरुणलोकांतील एक नाग.

२-एक ऋषिवि०.

**महाशोण**-भारतवर्षीय नद.

**महाश्मशान**-काशी क्षेत्र.

**महाश्व**-एक राजर्षि.

**महासरस्वती**-ब्रह्मदेवाची शक्ति ( देवि भा० ३ स्कं० अ० ६ ).

**महासेन**-कार्तिकेय.

**महाहय**-( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजित्, त्याच्या शतजित् पुत्राच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.

**महिता**-भारतवर्षीय नदी.

**महिष**-महिषासुर.

**महिषवाहन**-यम.

**महिषासुर**-अनुन्हाध दैत्याच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. तारकासुराच्या दहा सेनापतींतील एक तो हा. यास कार्तिकेयानें मारिलें ( भार० वन० अ० २३१ ). ( भार० द्रोण० अ० १६६ ).

२-रंभना० दानवास महिषीपासून झालेला पुत्र (१ रंभ श० पहा ). यानें हेमगिरीवर वायु भक्षण करून तप केलें. त्या योगानें ब्रह्मदेव प्रत्यक्ष होऊन यास वर माग असें म्हणाले. यानें अमरत्व मागितलें असतां, तें अप्राप्त आहे, दुसरें कांहीं माग म्हणून त्यांनीं म्हटलें. तेव्हां, हा म्हणाला कीं, स्त्रियांपासून तर मला भीति नाहीं, यासाठीं पुरुषांपासून मला मृत्यु नसावा,

इतकें या म्हणतांच ब्रह्मदेव तथास्तु म्हणून सत्यलोकीं गेल्यावर यानें आपल्या पदरीं दैत्यांस अधिकार दिले. ते असे-चिक्षुरास सेनापति करून ताम्रास धनाध्यक्ष केलें, आणि असिलोमा, उदग्र, बिडाल, बाष्कल, त्रिनेत्र, काल, अंधक, विरूपाक्ष, माहिराक्ष, उग्राक्ष, उग्रवीर्य, इ० कांस अन्य अधिकार दिले. नंतर यानें इंद्रादि देवांस युद्धेंकरून जर्जर केलें ( देवीभा० पंचम० अ० ६ ) ( मत्स्य० अ० १५१ ).

पुढें हा अजेय झाला, व प्राणिमात्रांस पीडाहि देऊं लागला, म्हणून अष्टादशभुजांनीं युक्त अशी आदिशक्ति यास मारण्याकरितां साकाररूप धारण करून प्रकट झाली. असें यानें श्रवण करून, आपला एक मंत्री तिजकडे पाठविला. तो जाऊन तिशीं कांहीं बोलून परत आल्यावर, यानें आपले कित्येक असुर युद्धास पाठविले. ते मेल्यावर हा स्वतःच तिजवर चालून गेला; परंतु तिच्या रूपानें मोहित होऊन, तूं मला वश हो, इ० भाषण करूं लागला. त्याविषयीं, तूं मला न वरिल्यानें मागून पश्चात्ताप पावशील अशा अर्थाची, सिंहलद्वीपींच्या चंद्रसेन राजाची कन्या मंदोदरी, तिची गाथा यानें सांगितली. त्यावर देवीनें यास असें उत्तर दिलें:—

श्लोक.

**मूर्खस्त्वमसि मंदात्मन् यः स्त्रीसंगं प्रकांक्षसि ॥**
**नरस्य बंधनार्थाय शृंखला स्त्री प्रकीर्तिता ॥ ३९ ॥**
**लोहबद्धोपि मुच्येत स्त्रीबद्धो नैव मुच्यते ॥**
**किमिच्छसि च मंदात्मन् मूत्रागारं च संलुवत् ४०**

( देवीभा० पंचम० अ० १६ ). नंतर देवीनें याचा लागलाच वध केला. इत्यादि कथा आहे ( देवीभा० ५ स्कं० अ० १-२० ). (भार०वन० अ० २३१ ).

**महिष्मती**-बृहस्पतीपासून शुभेस झालेल्या सात कन्यांतील एक.

**महिष्मान्**-( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजित्, तद्वंशीय हैहयकुलोत्पन्न सोहंजि राजाचा पुत्र. याचा पुत्र रुद्रश्रेण्य, नामांतरानें भद्रसेनक राजा.

**महीधृक्**-महाधृति जनकास नामांतर.

**महीनदी**-भारतवर्षीय नदी.

**महेत्थदेश**-शैरीषक देशाच्या पश्चिमेकडील देश. येथें पांडवांच्या वेळेस आक्रोश राजा होता. हा दिशाक्रम इंद्रप्रस्थ मध्य मानून येथें लिहिला आहे ( भार० सभा० अ० ३२ ).

**महेंद्र**-एक ब्रह्मर्षि ( २ अगस्त्य श० पहा ).

२-भारतवर्षीय एक उपपर्वत. यापासून त्रिभागा, ऋषिकुल्या, इक्षु, त्रिदिवा, अचला, ताम्रपर्णी, मूली, शर्वा आणि विमला इ० नद्या निघाल्या आहेत ( मत्स्य० अ० ११३ ).

३-कालंजर पर्वताशिखराचें नांव. येथें जामदग्न्य राम राहतो. येथें त्याच्या भेटीस युधिष्ठिर गेला होता ( भार० वन० अ० ११४ ).

**महेंद्रा**-भारतवर्षीय नदी.

**महेंद्राचल**-द्वितीयार्थक महेंद्र.

**महेश्वर**-महादेव.

२-शिवाचा एक पार्षद.

**महोदधि**-समुद्र.

**महोदय**-विश्वामित्राच्या शापानें निषाद झालेला वसिष्ठपुत्र ( वा० रा० बाल० स० ५९ ).

२-सोमवंशीय कुशनाभ राजा, त्यानें स्थापिलेलें नगर. हें कान्यकुब्ज देशाची राजधानी होतें ( वा० रा० बाल० स० ३२ ).

३-एक पर्वतशिखर. रावणाची शक्ति लक्ष्मणास लागून, तो लंकेंत मृततुल्य झाला असतां, यावरील औषधि आणण्यास मारुति गेला होता; परंतु औषधि नेऊं नको असें पर्वतदेवतेनें त्याशीं उद्धत भाषण केल्यावरून, त्यानें हें शिखर उचलून नेलें होतें. हें शिखर द्रोणागिरीचें किंवा कसें त्याचा निर्णय होत नाहीं.

**महोदर**-एक रुद्रगण.

२-एक ब्रह्मर्षि.

३-सुमाली राक्षसाच्या पुत्रांतील एक ( वा० रा० उत्तर० स० ११ ). हा रावणाचा मातुल होता, व अशोकवनिकाभंगकाळीं, यास मारुतीनें मारिलें होतें ( वा० रा० सुंदर० स० ४८ ).

४-विश्रवा ऋषीस पुष्पोत्कटेपासून झालेल्या पुत्रांतलि एक. हा रावणाचा सापत्न भ्राता व त्याचा सचिव असे. यास युद्धोन्मत्त असेंही म्हणत. यास युद्धांत नील वानरानें मारिलें ( वा० रा० युद्ध० स० ७० ).

५-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**महोदर्य**-कोणी एक राजर्षि.

**महौजा**-भारतीयुद्धांतलि पांडवपक्षयि राजा ( भार० उद्योग० अ० ४ ).

**महौदवाहि**-एक ब्रह्मर्षि.

**माकंदी**-पांचालांत द्रुपदराजानें स्थापिलेली नगरी.

**मागध**-इंद्रसावर्णिमन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षींतलि एक.

**माठर**-सूर्याचा एक पार्षद ( वा० रा० उत्तर० प्रक्षिप्त सर्ग २ ).

२–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

३–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

४–काम्यकवनाच्या दक्षिणेकडील उपवन.

५–भारतवर्षीय देश ( भार० कर्ण० अ० ७३ ).

**मांडवी**–सीरध्वज जनकाचा कनिष्ठ भ्राता कुशध्वज त्याची कन्या. ही दशरथ राजास कैकेयीपासून झालेल्या भरताची स्त्री.

**मांडव्य**–एक ब्रह्मर्षि. हा मोठा तपस्वी असे. पूर्वजन्मीं बाल्यावस्थेंत यानें, एका कीटास कंटकानें वेधिलें होतें, त्या दोषानें यावर चौर्यशंका येऊन, यास राजानें शूलावर चढविलें. त्यावरून यानें विचार केला कीं, असा दंड होण्यास माझा पूर्वदोष काय असावा, म्हणून हा, लिंगदेहानें ( वासनारूप देहानें ) यमाकडे गेला, व पुसूं लागला कीं, मला शूल प्राप्त होण्यास कारण काय ? यमानें यास याचें बाल्यावस्थेंतील कर्म सांगतांच, यानें उत्तर केलें कीं, अज्ञानेंकरून बालकास घडलेल्या शुभाशुभाचें पुण्यपाप नसतां, तूं असें केलेंस ? त्या अर्थीं तुला शतवर्षात्मक कालपरिमित पृथिवीवर शूद्रयोनींत वास करावा लागेल, असा त्यास शाप देऊन परत आला. तोच पुढें विदुर झाला ( भार० आदि० अ० १०७–१०८ ). पुढें चोर सांपडून, हा निरपराध असा ठरल्यावर, राजानें यास शूलावरून उतरविलें, व याचा सन्मान करून मार्गस्थ केलें; परंतु किंचित् शूलाग्र याच्या शरीरांत राहिल्यामुळें, तें जरी राजानें काढविलें, तरी यास अणिमांडव्य असेंच नांव पडलें.

**मांडिकर्णि**–दंडकारण्यांत राहणारा एक ऋषि. यानें दहा सहस्र वर्षें तप केल्यावर, इंद्रानें याच्या तपास विघ्न करण्यासाठीं पांच अप्सरा पाठविल्या. त्यास हा लुब्ध होऊन, यानें तप सोडिलें व त्यांसहवर्तमान गृहस्थाश्रम करीत ज्या सरोवरांत गुप्त राहिला, त्यास पंचाप्सर सरोवर असें नांव पडलें ( वा० रा० अर० स० ११ ).

**मांडुक**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**मांडुक्य**–अथर्वणोपनिषत्.

**माणिचर**–एक यक्ष. हा वैश्रवणाचा सचिव आणि त्यास प्रिय असा असे. हा, मंदराचलाच्या शिखरावर राहत असे (भार० वन०अ०१३९). यानें वैश्रवणासमागमें रावण युद्धास आला असतां, त्याशीं युद्ध केलें होतें ( वा० रा० उत्तर० स० १५ ).

**मातंग**–मतंगऋषीचा पुत्र.

२–त्रिशंकु राजास चांडालत्वामुळें पडलेलें नांव.

**मातंगिन**–एक ऋषि ( २ कश्यप श० पहा ).

**मातंगी**–कश्यपास क्रोधेपासून झालेल्या कन्यांतील एक.

**मातलि**–इंद्राचा सारथि, यास सुधर्मा नांवाची स्त्री, व तिजपासून गोमुख ना० पुत्र, व गुणकेशी कन्या, अशीं दोन अपत्यें झालीं होतीं (गुणकेशी श० पहा).

**मातृका**–द्वादशादित्यांतील अर्यमा आदित्याची स्त्री.

**मातेय**–ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**माथुर**–मथुरेच्या आसमंतात्भागींचा प्रदेश, व त्यांतील रहिवासी जन.

**मादि**–ब्रह्मर्षि ( ३ आंगिरा श० पहा ).

**माद्री**–मद्रदेशीय राजांच्या कन्यांस हें नांव साधारण असतें. शल्य राजाची भगिनी ती; हिचा विवाह पंडुराजाशीं झाला होता ( भार० आदि० अ० ११३–११४ ). ही कुंतीहूनही रूपानें फार सुंदर असे, त्यामुळें पंडुराजा शापदग्ध असतांही हिशीं संभोगास प्रवृत्त होऊन मरण पावला. त्याचें हिला वाईट वाटून हिनें आपले दोघे पुत्र नकुल आणि सहदेव कुंतीच्या स्वाधीन करून सहगमन केलें.

२–यदुकुलोत्पन्न सात्वत राजाचा पुत्र वृष्णि, त्याची स्त्री ती.

३–कृष्णाची स्त्री लक्ष्मणा ती; कारण हिचाहि पिता, मद्र राजांचा वंशजच होता.

**माधव**–उत्तममनूच्या पुत्रांतील एक.

२–वर्षांतील मासानुक्रमानें दुसरा मास. याची पूर्णिमा विशाखानक्षत्रयुक्त असल्ये म्हणून, यास वैशाख म्हणण्याची रूढि आहे. या मासांत सूर्यमंडलाधिपति अर्यमा आदित्य असून, त्यासमागमें पुलह ऋषि, गंधर्व नारद, पुंजिकस्थली अप्सरा, अथौजा यक्ष, कच्छनीर नाग, आणि प्रहेति राक्षस, इतके संचार करण्यास असतात ( भाग० १२ स्कं० अ० ११ ).

३–मधु यादवाचे वंशज ते सर्व. परंतु सात्यकि नांवावर विशेष रूढि ( भार० द्रोण० अ० ११७ ).

४–विष्णूस नांव.

**माधवी**–ययाति राजाची कन्या ( मत्स्य० अ० ३८). ( ३ गालव श० पहा ). गालवाचें कार्य झाल्यावर हिनें आपलें आयुष्य, पुढें सर्व तप करण्यांत घालविलें.

२–धर्मध्वज राजाची स्त्री, व तुलसीची माता.

३–( सो० वं० ) पूरुराजाचा पुत्र जनमेजय राजा, त्याची स्त्री.

**मांधाता**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न प्रसन्न अ० श्येनजित राजाचा पुत्र युवनाश्व त्याचा पुत्र. याची

उत्पत्ति अशी.–युवनाश्वास शंभर स्त्रिया असून, त्यांतून कोणासही संतति नव्हती.म्हणून त्यानें सहस्रावधि यज्ञ केले, परंतु कांहीं नाहीं असें पाहून, त्यानें उदास होत्साता मंत्र्यांकडे राज्यकारभार सोंपून अरण्यांत गमन केलें. तेव्हां अरण्यांत फिरत असतां, एके रात्रीं भार्गवाश्रमीं गेला. तेथें ऋषींनें याचा सत्कार करून भोजन दिलें. पुढें सर्व ऋषि निद्रित झाले असतां त्यांत हाही निद्रित झाला; परंतु तृषा लागल्यानें मध्यंतरीं जागृत होऊन उदक शोधूं लागला, तों त्यास वेदीमध्यें जलानें पूर्ण असा एक कलश दृष्टीस पडला; त्यांतील जल त्यानें प्राशन केलें, व निद्रेस गेला. प्रातःकालीं नित्याप्रमाणें ऋषि उठून स्नानसंध्या झाल्यावर वेदींत पाहतात तों, कलश रिकामा दृष्टीस पडला; त्यावरून यांतील जल काय झालें, अशी विचारपूस ते सर्व करितात तों, युवनाश्वही स्नानसंध्या आटपून तेथें आला व त्यानें, रात्रीं तें जल मी प्राशन केलें असें सांगितलें. तेव्हां ऋषि म्हणाले, हें तूं काय केलेंस ? कारण, तें जल पुत्रप्राप्ति करून देणारें अभिमंत्रित होतें. अस्तु, परंतु तुला आतां गर्भ राहिला आहे असें समज ( भार० वन० अ० १२६ ).

ऋषींनीं सांगितल्याप्रमाणें युवनाश्वास गर्भ राहून त्यानें पूर्ण कालीं पित्याच्या कुक्षीचा भेद केला, व तो बाहेर आला. परंतु दुग्धपानार्थ रुदन करीत असतां, युवनाश्वास चिंता पडली कीं, पुढें कसें करावें ? इतक्यांत इंद्र तेथें प्राप्त होऊन राजास म्हणाला, हा पुत्र ( मांधास्यति ) म्हणजे मला पिईल असें म्हणून त्यानें आपली अंगुलि त्याच्या मुखांत दिली व तेणेंकरूनच त्याची तृप्ति झाली. त्यामुळें त्यास **मांधाता** असें नांव पडलें ( भार० द्रोण० अ० ६२ ). ( भाग० ९ स्कं० अ० ६ ).

मांधाता मोठा झाल्यावर, तो सर्व विद्यांत पारंगत झाला. त्यास अजगव धनुष्य, व दिव्यास्त्रें, केवळ तपेंकरूनच प्राप्त झालीं. तेणेंकरून त्यानें अनेक राजे जिंकून, शत अश्वमेध, व शत राजसूय यज्ञ केले ( भार० शांति० अ० २९ ). यानें सर्व भूमि एका दिवसांत आपल्या सत्तेंत आणिली ( भार० शांति० अ० १२४ ).

हा मोठा दानशूर असे. यास पाहतांच दस्यु म्ह०चोर,त्रास पावून भयानें पळत,म्हणून यास त्रसद्दस्यु असेंहि नांव पडलें होतें. याला शशबिंदु राजानें आपली कन्या बिंदुमती भार्यार्थ दिली होती; तिचे ठायीं यापासून पुरुकुत्स, धर्मसेन नामांतरानें अंबरीष, आणि मुचुकुंद असे तीन पुत्र, व पन्नास कन्या झालेल्या सौभरी ऋषीस दिल्या होत्या ( सौभरी श० पहा ).

याच्या राज्यांत बारा वर्षें अवर्षण झालें असतां, यानें स्वतपोबलानें पर्जन्यवृष्टि करून सर्व प्रजा सुखी केल्या. एकदां यास दैवयोगानें सुरलोक जिंकावा अशी दुर्बुद्धि उत्पन्न होऊन हा स्वर्गास गेला असतां, इंद्रानें यास सांगितलें, अजून भूमीवर लवणासुर तुला जिंकणें राहिला आहे. यास्तव त्यास जिंकून मग मजकडे ये. त्यावरून हा मोठ्या सेनेसहित लवणासुरावर चालून गेल्यावर लवणानें रुद्रदत्त शूल यावर टाकितांच, याची संपूर्ण सेना दग्ध होऊन, हाही तत्काल मरण पावला ( वा० रा० उत्तर० स० ६७ ). याच्यामागें याचा ज्येष्ठ पुत्र पुरुकुत्स तो राज्यावर बसून अयोध्येंत राज्य करूं लागला.

२–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**माधुछंदस**–विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**माध्यंदिन**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**माध्यमा**–एक ऋषि.

**मानव**–ब्रह्मर्षि ( ३ आगरी श० पहा ).

**मानवकल्प**–ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील होऊन गेलेला विसावा कल्प ( ४ कल्प श० पहा ).

**मानवी**–भारतवर्षीय नदी.

**मानस**–ज्योतिर्भास लोकांत राहणारे पितरवि०

२–स्वर्गसंबंधीं देवांच्या वनांतील एक वन.

३–हिमालयावर वैद्युत शिखराच्या पायथ्याशीं असणारें सरोवर; यांतून सरयूनदी निघाली आहे.

४–प्रयागांतील तीर्थवि०

**मानससरोवर**–तृतीयार्थक मानस तेंच. हें ब्रह्मदेवानें एकेकाळीं मनानें निर्माण केलें. म्हणून यास असें नांव पडलें.

**मानसोत्तरपर्वत**–हा पर्वत,पुष्करद्वीपाचे जे रमणक आणि धातकी असे दोन भाग,त्यांच्यामध्यें असून, मेरूच्या आसमंतात् वलयाकार(वर्तुलाकार) स्थितीनें स्थित आहे. मेरूपासून याचें अंतर, सर्वत्र आसमंतात् एक कोटी, सत्तावन लक्ष, पन्नास सहस्र, इतकीं योजनें आहे, व याच्या अनुसारेंकरून, सूर्यरथाचें एक चक्र सदोदित फिरत आहे. याच्यावर चार दिग्पाळांच्या चार नगऱ्या क्रमानें आहेत. त्यांचीं नांवें अशीं.— आमच्या दिग्प्रत्ययानें पूर्वेकडे देवधानी, दक्षिणेस

संयमिनी, पश्चिमेस निम्लोचिनी आणि उत्तरेकडे विभावरी. यांतील उदयास्तव्यवस्थेविषयीं ( देवधानी श० पहा ).

**मानारि**–ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**मांबुधि**–विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**माया**–परमेश्वराची लीलारूप शक्ति.

**मायापुरी**–एक पुरीवि०

**मायावती**–शिवांनीं काम दग्ध केला असतां, त्याच्या रतिना० स्त्रीनें, द्वापारांतीं कृष्णाच्या उदरीं तो जन्मास येणार असें जाणून, व त्याच्या हातून शंबरासुराचा मृत्यु आहे, हें लक्ष्यांत आणून त्या असुरगृहीं हें नांव धारण करून, राहिली होती.

**मायावि**–मयासुरास हेमा अप्सरेपासून झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ ( वा० रा० उत्तर० स० १२ ). हा वालीच्या हातून मृत्यु पावला होता.

**मारीच**–मरीचि ऋषीचा पुत्र म्हणून, हें नांव कश्यप ऋषीस आहे.

२–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

३–दनुपुत्र दानवांतील एक. यास, पुलोमा व कालका, ह्या, वैश्वानर दानवाच्या दोन कन्या स्त्रिया होत्या, आणि त्यांपासून पौलोम व कालकेय असे पुत्र झाले होते.

४–सुंद राक्षसापासून ताटका राक्षसीस झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ ( वा० रा० बाल० स० २५ ). हा, दहा सहस्र गजांच्या बलानें युक्त असून, सुमाली राक्षसाच्या चार आमात्यांतील एक होता ( वा० रा० सुंदर० स० ११ ). हा, कांहीं कालपर्यंत आपल्या मातेसमागमें मलद आणि करूषक, या दोन देशांच्या मध्यें राहात असे, व त्यासमीपच राहणाऱ्या विश्वामित्र ऋषीच्या यज्ञास, आपल्या सुबाहु भ्रात्या-सहित विघ्न करीत असे. एकदां नित्याप्रमाणें हा तेथें विघ्न करण्यास गेला असतां, विश्वामित्रयागरक्षणार्थ आलेल्या रामचंद्रानें याच्या भ्रात्यावर बाण टाकलेला, त्यानें तो तात्काळ मरण पावून, त्याच्या पिसाऱ्यानें हा जो तेथून उडाला, तो कित्येक योजनांवर जाऊन समुद्रांत पडला. तेव्हांपासून हा रावणाश्रित होऊन लंकेंतच राहिला; कारण याची माता, तीही आधींच रामचंद्राच्या हातून मरण पावली होती म्हणून, पूर्वस्थळीं याचें कोणीच राहिलें नव्हतें.

पुढें थोडक्याच काळानें, सीता व लक्ष्मण यांसहित राम पंचवटींत येऊन राहिला; असें यानें ऐकून पूर्ववैराच्या स्मरणानें दोन राक्षसांस समागम घेऊन हा तेथें गेला, व मृगरूपानें आसमंतात संचार करूं लागला. तें कपट रामानें जाणून, तिघांवरही बाण टाकिले; तेणेंकरून दोन राक्षस तत्काळ मरण पावून, हा मात्र तेथून मोठ्या कष्टानें पळाला, तो पुनः रामाकडे कधींही आला नाहीं ( वा० रा० अरण्य० स० ३८–३९ ).

कांहीं कालानें रावणास, सीता हरण करून आणावी अशी बुद्धि उत्पन्न होऊन, तो याजकडेस आला, व शूर्पणखेच्या मुखानें ऐकिलेलें सीतेचें सौंदर्य, तसाच खरादिक राक्षसांचा वध, इ० वृत्त यास सांगून म्हणूं लागला कीं, तूं सुंदर मृगरूप धारण करून मजसमागमें पंचवटींत चल, आणि सीताहरणास मला साह्य हो. तें रावणाचें भाषण ऐकतांच याची मुखश्री उतरली, व हा त्याशीं याप्रमाणें बोलूं लागला. **श्लोक**–
''राघवं जनकजासमन्वितं लक्ष्मणेन सहितं त्वरान्वितः॥ आगतोहमथ हंतुमुद्यतो मां विलोक्य शरमेकमक्षिपत् ॥ २० ॥ तेन विद्धहृदयोहमुद्भ्रमन् राक्षसेंद्र पतितोस्मि सागरे ॥ तत्प्रभृत्यहमिदं समाश्रितः स्थानमूर्जितमिदं भयार्दितः ॥ २१ ॥ राममेव सततं विभावये भीत भीत इव भोगराशितः ॥ राजरत्नरमणीरथादिकं श्रोत्रयोर्यदि गतं भयं भवेत् '' ॥ २२ ॥ यांतील भाव रामबाणानें विद्ध होऊन समुद्रांत जाऊन मी पडलों इत्यादि वृत्त यानें सांगून म्हटलें कीं, ज्या शब्दापूर्वी र हें अक्षर येतें, असे जे राज, रत्न, रमणी, रथ, इत्यादि शब्द, ते सुद्धां माझ्या कानांत पडले तर मला भय उत्पन्न होतें;यास्तव रामाची गोष्ट देखील मज पुढें काढूं नको. त्यावरून शेवटीं रावणानें, तूं जर मला साह्य करणार नाहींस, तर मी तुला मारीन, असें यास म्हणतांच, हा निरुपायास्तव मान्य झाला ( वा० रा० अरण्य० स० ४०–४१ ).

सारांश, हा रावणासमागमें पंचवटींत गेला, व तेथें सुंदर मृगाचा वेष धारण करून, यानें सीतेस, आपल्यास अशा चर्माची कंचुकी असावी, एतद्विषयक लोभ उत्पन्न केला. त्यावरून राम यामागें लागून, त्यानें यास मारिलें. परंतु यानें मरणसमयीं 'लक्ष्मणा धांव, लक्ष्मणा धांव,' असा मायिक दीन शब्द केल्यावरून, सीतेनें तो शब्द ऐकिला, व तिनें लक्ष्मणास रामाकडे पाठविलें; त्या संधींत रावणानें तिचें हरण करून, तिला लंकेंत नेऊन अशोकवनिकेंत ठेविलें (वा० रा० अरण्य० स० ४२–४४ ). ( भार० वन० अ० २७८ ).

**मारीषा**–दहा प्रचेते त्यांची स्त्री. प्राचेतसदक्षाची माता. वार्क्षी हें नामांतर हिलाच होतें.

२–आर्यक नागाची कन्या, व यदुकुलोत्पन्न शूर राजाची स्त्री. हिला भोजा हें नामांतर होतें.

**मारुत**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

२– ,, ( ३ अंगिरा श० पहा).

३–पांडवपक्षाकडील मरुभूमिदेशीय राजे.

४–वायूस नांव.

**मारुतंतव्य**–विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक.

**मारुति**–वायुप्रसादानें अंजनेस झालेला जो हनुमान् पुत्र तो.

**मार्कंटि**–ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**मार्कंड**–एक ऋषि.

**मार्कंडेय**–स्वायंभुव मन्वंतरांतलि जो ब्रह्ममानसपुत्र भृगु, त्याच्या धाता ना० पुत्राचा पौत्र, व मृकंडऋषीचा पुत्र. शिववरेंकरून चौदा कल्प आयुष्य झालेलें, तें यासच असावें असें वाटतें.

२–एक ब्रह्मर्षि. हा प्रायः चालू मन्वंतरांतलि अंगिराकुलोत्पन्न असावा ( मत्स्य० अ० १६६ ). यानें, बहुत वर्षे तप केल्यानें भगवान् प्रसन्न झाले असतां, मला आपली माया कशी असत्ये ती पाहण्याची इच्छा आहे असें दर्शविलें, त्यावरून तथास्तु असें म्हणून भगवान् अंतर्धान पावले. कांहीं कालानें, नित्याप्रमाणें, हा आपल्या आश्रमांत बसला असतां, एकाएकीं मोठा वायु सुटला, व भराभरा चोहींकडून समुद्र वाहून पृथिवी जलमय झाली असें यास भासलें; वस्तुतः झालें नाहीं. तेव्हां त्या समुद्रजलांत, केवळ हा मात्र इतस्ततः संचार करूं लागला. तों त्यांत यास एक वटवृक्ष दृष्टीस पडला, व त्यासमीप याचेंही जाणें झालें; इतक्यांत एका वटपत्रावर कोणी सुंदर बालकानें शयन केलें आहे, असें यानें पाहून, त्यासमीप जात जात हा त्याच्या श्वासवाय्वाकर्षणानें उदरांत प्रविष्ट झाला; तेथें यानें पृथिवी, पुरें, ग्राम, नद्या, इ० बाहेरच्याप्रमाणेंच सर्व कांहीं पाहिलें ; इतकेंच नाहीं; तर आपण आपल्या आश्रमांत स्थित आहों असेंही पाहिलें; इतक्यांत पुनः त्या बालकाच्या श्वासाबरोबर हा बाहेर येऊन पाहतो तर, समुद्र, वटवृक्ष व तो बालक, इ० कांहींएक नसून, आपण आपल्या आश्रमांत स्वस्थ तप करीत आहों, असें यानें पाहिलें, व आश्चर्य पावून स्तब्ध बसला. सारांश, याप्रमाणें हा बसला असतां, तेथें पुनः भगवान् प्रकट झाले, व यास अनेक प्रकारचे वर देऊन अंतर्धान पावले (भाग० १२ स्कं० अ० ८–१०). युधिष्ठिरास अरण्यवासकाळीं अनेक इतिहास सांगितले, ते यानेंच असतील असें वाटतें ( भार० वन० अ० १८३–१९० ).

३–दशरथ राजाच्या उपऋत्विजांतील एक ( वा० रा० बाल० स० ७ ).

४–दाशरथिरामाच्या आठ धर्मशास्त्र्यांतील एक ब्राह्मण ( वा० रा० उत्तर० स० ७४ श्लो० ४ ).

**मार्गणप्रिया**–प्राधेच्या अप्सरा कन्यांतील एक.

**मार्जारि**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय सुधनु, तत्कुलोत्पन्न जरासंधपुत्र सहदेव, त्याच्या तीन पुत्रांतील मध्यम. याचा पुत्र श्रुतश्रवा.

**मार्तंड**–मृत अंडास, सचेतन करणारा परमात्मा तो. " मृतेंडे जायते यस्मान्मार्तंड इति चोच्यते ॥ " ( मत्स्य० ).

**मार्तिकावत**–एक नगर ( भार० मौसल० अ० ७ ).

**वार्तिकावतक**–भारतवर्षीय देश. येथें रेणुकेस जमदग्नीचा शाप झाल्यावेळीं, चित्ररथ राजा होता. पांडवांच्या वेळेस शाल्व राजा असे.

**मार्दमर्षि**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**मार्ष्टिंगली**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**माल**–भारतवर्षीय देश.

**मालती**–शत्रुघाती राजाची ज्येष्ठ स्त्री.

**मालव**–इंद्रप्रस्थास मध्य धरून, उत्तर व पश्चिम अशा दिशाभेदानें हा देश दोन प्रकारचा आहे. तो त्या त्या वर्णांत पहावा.

**मालवी**–मद्रदेशाधिपति अश्वपति राजाची स्त्री. सावित्रीची माता.

**मालायनि**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**मालावती**–कुशध्वज राजाची स्त्री, व वेदवतीची माता.

**मालिनी**–चंपा नगरीचें मूळ नांव.

२–एक अप्सरा.

३–वीरवर्मा ना० राजाची कन्या.

४–एक नदी ( वा० रा० बाल० स० ६८ ).

**माली**–सुकेश राक्षसास, देववतीपासून झालेल्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. यास वसुदा गंधर्वीपासून अनल, अनिल, संपाति, हर, पनस आणि प्रमति, असे सहा पुत्र झाले होते, त्यांस मालेय अशी संज्ञा असून, माली हा विष्णूच्या हातून मरण पावला होता ( माल्यवान् श० पहा ).

२–वृत्रासुरानुयायी एक असुर.

**मालेय**–माली राक्षसाच्या पुत्रांस संज्ञा.

**माल्यवान्**-सुकेश राक्षसापासून देववतीच्या ठायीं झालेल्या तीन पुत्रांतील एक. सुमाली आणि माली त्यांचा ज्येष्ठ भ्राता. यावें उभयबंधूंसहित ब्रह्मदेवाचें आराधन दीर्घकाल केलें. त्यावरून यास वर प्राप्त होऊन, त्रिकूट पर्वताच्या मस्तकावर तीस योजनें रुंद, व शंभर योजनें लांब, अशी नगरी जिला लंका म्हणतात, ती विश्वकर्म्याकडून बांधवून मिळाली; म्हणून हा सपरिवार तींत जाऊन राहिला. नंतर उभयबंधूसहित यास बलाढ्य पाहून, नर्मदा गंधर्वीनें, आपल्या सुंदरी, केतुमती आणि वसुदा, ह्या तीन कन्या अनुक्रमानेंच तिघांस दिल्या.

यास, सुंदरीपासून वज्रमुष्टि, विरूपाक्ष, दुर्मुख, सुप्तघ्न, यज्ञकोप, मत्त, आणि उन्मत्त इ० पुत्र, व अनला ना० कन्या झाली (वा० रा० उत्तर० स० ५). ती अनला विश्वावसु राक्षसाची स्त्री, व कुंभीनसीची माता होती. याचप्रमाणें इतर दोघांसही पुष्कळ संतति झाली असे. पुढें तिघांनीं उन्मत्त होऊन मनुष्यमात्रांस इतकी पीडा आरंभिली कीं, देवांचें यांशीं अनेक वेळां युद्ध झालें, व तितक्या वेळांही यांचा पराभव झाला इतकेंच नव्हे, तर एका युद्धांत माली विष्णूच्या हातून मरणच पावला; त्यामुळें यास भीति उत्पन्न होऊन, हा, सुमाली व सर्व परिवार यांसहित लंका सोडून पाताळांत जाऊन राहिला (वा० राम० उत्तर० स० ६-८).

आपला ऊर्जित काल कधीं येईल, व आपणास पृथिवीवर निर्भय संचार करण्यास कधीं सांपडेल, इ० विचार हा व याचा भ्राता करीत असतां, एकदां सुमाली गुप्तरूपानें पृथिवीवर येऊन पाहूं लागला तों लंकेंत मोठ्या ऐश्वर्यानें वैश्रवण नांदत आहे. त्यावरून त्यानें विश्रवा ऋषीस, आपली कन्या देण्याचें मनांत आणिलें; त्यांत हेतु हाच कीं, तिला विश्रव्यापासून पुत्र झाल्यास कदाचित् त्याकडे लंका आलीच तर, सहजीं आपणास तींत येऊन राहावयास सांपडेल. या मनांत आणलेल्या विचाराप्रमाणें, त्यानें आपली कन्या विश्रवा ऋषीस दिली, व थोड्याच काळानें तिला त्यापासून दशग्रीव इ० पुत्रही झाले (स० ९).

कांहीं काळानें रावणादिक मोठे झाले व तपेंकरून त्यांनीं ब्रह्मदेवास प्रसन्न करून, अनेक वरही संपादन केले. असें सुमालीनें पाहून प्रहस्त, विकट, अकंपन, कालिकामुख, धूम्राक्ष, दंड, सुपार्श्व, संन्हादि, प्रघस, व भासकर्ण इ० पुत्र त्याच्या साह्यास देऊन, कैकसीशिवाय राका, पुष्पोत्कटा, बलाका आणि कुंभीनसी, ह्या चारी कन्याही आणखी विश्रवा ऋषीसच दिल्या; त्यामुळें त्यांचे ठायीं झालेली प्रजा सहजींच रावणास साह्यभूत झाली. पुढें अल्प काळांतच रावणाच्या हातीं लंका येऊन, पातालांतील सर्व राक्षस तींत रहावयास आले, तेव्हां माल्यवान् व सुमाली हेही त्यांत प्रमुख म्हणून त्यांचें आगमन सहजच झालें. परंतु देवांशीं रावणाचा एकदां संग्राम झाला. त्यामध्यें सुमाली मरण पावून, हा मात्र जिवंत राहिला (स० २८).

माल्यवान् कधीं मेला तें कळत नाहीं. परंतु रावणानें सीतेस आणून अशोकवनिकेंत ठेविलें, तेथपर्यंत हा जिवंत होता; कारण रावणानें सीता परत द्यावी, अशा संबंधाचा याचा त्यास उपदेश आढळतो त्यावरून दिसते (वा० रा० युद्ध० स० ३५).

२-नील आणि निषध; या दोन पर्वतास स्पर्शून असणारा केतुमाल वर्षाचा उत्तरसीमारूप पर्वत.

३-किष्किंधेसमीप असणारा एक सामान्य पर्वत. वालिवधानंतर वर्षाऋतु संपेतो, यावर रामलक्ष्मण, हे उभयतां राहिले होते (वा० रा० किष्किं० स० २८). भारतांत व अध्यात्म रामायणांत यास प्रवर्षणगिरि असें म्हटलें आहे.

**मावेल्ल**-हरिवाहन राजाचें नामांतर.

**माषशरावय**-एक ब्रह्मर्षि (३ वसिष्ठ श० पहा).

**माहिषक**-भारतवर्षीय देश.

**माहिष्मती**-कार्तवीर्याची अनूपदेशसंबंधीं राजधानी.

२-सूर्यवंशीय दशाश्व राजाची राजधानी.

३-दक्षिण दिशेकडील नील राजाची मेकलदेशसंबंधीं राजधानी.

४-आणखी एक दक्षिणेकडील नगरी.

**माहीक**-भारतवर्षीय देश (भार० भीष्म० अ० ९).

**माहेंद्री**-देवधानी नगरीसच नांव.

**माहेय**-भारतवर्षीय देश (भार० भीष्म० अ० ९).

**माहेश्वरकल्प**-ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील पुढें येणारा एकूणतिसावा दिवस (४ कल्प श० पहा).

**मित**-(सो० वं०) पुरूरवा राजाचा पौत्र, व जय राजाचा पुत्र.

**मितध्वज**-(विदे० वं०) धर्मध्वज जनकाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. याचा पुत्र खांडिक्य जनक.

**मित्र**-आदित्य (द्वादशादित्य श० पहा).

**मित्रघ्न**-रामानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस (वा० रा० युद्ध० स० ४३).

**मित्रदेव**-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा (भार० कर्ण० अ० ९०).

**मित्रनंदन**–वृष्णिकुलोत्पन्न एक यादव.

**मित्रपद**–भारतवर्षीय तीर्थ.

**मित्रभानु**–एक राजर्षि. विशेष वृत्त आढळत नाहीं.

**मित्रयु**–भृगुकुलोत्पन्न एक ऋषि. याची कन्या मैत्रेयी असावी.

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नीलवंशांतील दिवोदास राजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. यास मैत्रेय आणि च्यवन, असे दोन पुत्र होते.

**मित्रवर्मा**–द्रोणाचार्यानें मारिलेला एक पांचाल.

२–दुर्योधनपक्षीय एक राजा ( भार० कर्ण० अ० २७ ).

**मित्रविंदा**–अवंत्य राजा जयसेन. यास वसुदेवभगिनी राजाधिदेवी, तिजपासून झालेली कन्या. हिचें स्वयंवर होत असतां, कृष्णानें हिला हरून हिशीं विवाह केला ( भाग० १० स्कं० अ० ५८ ). हिला कृष्णापासून वृक इ० दहा पुत्र झाले होते.

२–कुशद्वीपांतील नदी.

**मित्रसह**–सूर्यवंशीय कल्माषपाद राजा, त्यासच नामांतर.

**मित्रसेन**–अर्जुनानें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा.

**मित्रावर**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**मित्रावरुण**–मित्र आणि वरुण असे दोघे ते.

**मिथि**–निमिराजाचा देह मंथन केला असतां, त्यापासून जन्मलेला पुत्र तो.

**मिथिला**–वैजयंत नगरास मिथिराजामुळें पडलेलें नांव.

**मिश्रक**–भारतवर्षीय तीर्थ.

**मिश्रकेशी**–प्राधेच्या अप्सरा कन्यांतील एक.

**मिहिराक्ष**–महिषासुराच्या प्रधानांतील एक.

**मीढुष**–शक आदित्याचा पुत्र.

**मीढ्वान**–( सू० वं० ) नरिष्यंतकुलोत्पन्न दक्षराजाचा पुत्र. याचा पुत्र कूर्चराजा.

**मुकुट**–भारतवर्षीय तीर्थ.

**मुकुटा**–ऋष्यवान् पर्वतापासून निघालेली नदी.

**मुकुंद**–विष्णु.

२–कुबेराच्या नवनिधींतील साहवा.

३–शाल्मली द्वीपांतील एक पर्वत.

**मुक्तिक**–यजुर्वेदोपनिषत्.

**मुचुकुंद**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न मांधाता ना० राजास, बिंदुमतीपासून झालेल्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. हा पित्याप्रमाणेंच पराक्रमी होता, म्हणून देवदैत्यांचें युद्ध होत असतां, त्यांत देवांनीं यास आपल्या साह्यास बोलावून नेलें होतें. पुढें देवांस जय येऊन युद्ध समाप्त झाल्यावर, त्यांनीं यास [illegible] मोक्षावांचून काय पाहिजे तें मागण्याची यास आज्ञा केली. त्यावरून यानें पृथिवीवरील आपला सर्व परिवार व राज्य नष्ट झालें असें पाहून, व युद्धानें श्रमला होता म्हणून, मला निद्रा घेण्यास निवांत स्थल, निद्राभंग करणारास माझ्या दृष्टिपातानें मृत्यु, व लागलेंच विष्णुदर्शन इतकें घडावें असें मागितलें. त्याप्रमाणें त्यांनीं यास निद्रेस एक पर्वतगुहा दाखवून, इतर वरांविषयीं तथास्तु म्हटलें. मुचुकुंद ज्या गुहेंत निजला होता तो पवत कोणता, व निद्रा कधीं केली, त कांहीं आढळत नाहीं; परंतु हा दाशरथि रामाच्या पूर्वीचा एकेचाळिसावा पुरुष वंशावळींत आहे, त्यावरून चालू मन्वंतराच्या नवव्या दहाव्या पर्ययांत तरी हा निजला असावा असें वाटतें.

पुढें अठ्ठाविसावा पर्यय आरंभून द्वापाराच्या अंतीं कृष्णावतार झाला. त्या वेळीं कालयवन कृष्णावर चालून गेला असतां, कृष्णानें पराजय पावल्याप्रमाणें त्यास दाखवून, व तो मागें लागावा म्हणून बुद्धया पळत पळत निघून, मुचुकुंदाच्या गुहेंत प्रवेश केला, आणि त्याचा तेथें याकडून वध करविला ( कालयवन श० पहा ). ( भाग १० स्कं० अ० ५१—५२ ).

**मुंज**–द्वैतवनांत पांडव असतां, त्यांसमागमें होता ऋषि तो.

**मुंजकेतु**–पांडवांचा मित्र एक राजा.

**मुंजवट**–द्वैतवनांतील तीर्थ.

**मुंड**–चंडदैत्याचा कनिष्ठ भ्राता ( चंडमुंड श० पहा ).

२–भारतवर्षीय देश.

३–मुंडक शब्द पहा.

**मुंडक**–अथर्वणवेदोपनिषत्.

**मुदित**–दाशरथि रामाच्या सभेंतील एक सेवक.

**मुद्गल**–एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

२–अंगिरसकुलोत्पन्न कुरुक्षेत्रांत राहणारा ब्राह्मण. हा शीलोंच्छवृत्तीनें उपजीवन करणारा असून, इंद्रियनिग्रही व धर्मात्मा असा असे. हा प्राप्तान्नांतच ब्राह्मणास अन्नदान करी. एकदां दुर्वासा ऋषि याकडेस येऊन, त्यानें यास अन्न मागितलें असतां यानें दिलें; परंतु तो याचें सर्वही अन्न भक्षून गेला. याप्रमाणें पांच वेळां दुर्वासा तृप्त झाल्यामुळें, त्यानें यास, तूं उत्तम लोकास गमन कर असा आशीर्वाद दिला. त्यावरून तत्काळ विमान प्राप्त होऊन, देवदूत यास म्हणाला कीं, हे ब्रह्मन्, विमानांत आरोहण कर. तेव्हां यानें देवदूतास पुसलें, स्वर्गांत गुण व दोष कोणते आहेत ? त्या काळीं देवदूतानें गुण सांगून दोष

असा सांगितला कीं, पुण्य क्षीण झालें असतां, तेथून प्राप्यास पुनः मृत्युलोकीं पतन घडतें ( क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ). असें देवदूताचें भाषण श्रवण करून, पुनः यानें ब्रह्मलोकादि स्थानांची स्थिति त्यास विचारिली असतां, त्यानें उत्तर केलें, स्वर्गलोकापेक्षां तेथें सुख अपार आहे, व प्रायः पतनभीति नाहीं; कारण, तीं स्थानें उत्कृष्ट वैराग्याशिवाय कोणास प्राप्त होत नाहींत; परंतु कचित् तोही दोष येथें गोचर होतो ( जयविजय श० पहा ). तेव्हां यानें देवदूतास सांगितलें कीं, असें ज्या अर्थी आहे, त्या अर्थी तूं विमान घेऊन परत जा, मला त्या लोकीं येणें नाहीं. तर, ( यद्गत्वा न निवर्तंते ) म्हणजे ज्यास प्राप्त झालें असतां, पुनः परतणें नाहीं, तेथें जावें अशी माझी इच्छा आहे, म्हणून मी तोच प्रयत्न करणार. त्यावरून देवदूत परत गेला, व हा, तीव्रवैराग्यपूर्वक ब्रह्मविद्या संपादन करून, अक्षय्य अशा परब्रह्मभावास, कालेंकरून प्राप्त झाला ( भार० वन० अ० २६०–२६१ ).

३–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील राजा, तद्वंशीय भर्म्याश्व अ० भद्राश्व राजा, त्याच्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ. यास ब्रह्मिष्ठ ना० पुत्र असून, याच्या कुलांत मौद्गल्यसंज्ञक कांहीं ब्राह्मणही झालेले आहेत.

४–ऋग्वेदोपनिषत्.

**मुद्गलायन**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**मुनी**–वैवस्वत जें चालू मन्वंतर, त्यांतील कश्यपऋषीस प्राचेतसदक्षानें दिलेल्या तेरा कन्यांतील एक. हिजपासून जे गंधर्व उत्पन्न झाले, त्यांस मुनि अ० देवगंधर्व अशी संज्ञा होती ( १ देवगंधर्व श० पहा ). भारत आदिपर्व अध्याय १२३ श्लोक ५४–५७ यांमध्यें लिहिलेलीं नांवें—भार० आदि० अ० ६५ श्लो० ४२–४४ यांतील नांवांहून भिन्न आहेत. तथापि सोळा संख्येंत फेर नाहीं.

२–रैवतमन्वंतरांतील सप्तर्षींमधील एक.

३–दहा विश्वेदेवांतील एक.

**मुर**–एक नरकासुरानुयायी असुर, यास कृष्णानें मारिलें.

**मुरचीपत्तन**–किष्किंधेच्या पश्चिमेकडील एक नगरी(वा० रा० किष्किं० स० ४२ ).

**मुष्टिक**–वसिष्ठपुत्र यज्ञास गेले नाहींत, व त्यांनीं विश्वामित्र आणि त्रिशंकु राजा, यांचा उपहासही केला, म्हणून विश्वामित्रानें त्यांस चांडाल व्हाल असा शाप दिला. त्या चांडालांस पडलेलें नांव ( वा० रा० बाल० स० ५९ ).

२–बलरामानें मारिलेला कंससभेंतील एक मल्ल ( भाग० १० स्कं० अ० ४४ ).

**मुसल**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**मुहूर्त**–धर्मऋषीस मुहूर्तेपासून झालेले पुत्र.

**मुहूर्ता**–प्राचेतस दक्षानें धर्मऋषीस दिलेल्या दहा कन्यांतील एक. हिचे पुत्र मुहूर्तसंज्ञक देव.

**मूक**–वराहरूप धारण करून, किरात आणि अर्जुन यांच्या युद्धास कारण झालेला असुर ( इंद्रकील श० पहा ).

**मूर्तय**–( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न कुश अ० कुशिक राजाच्या चार पुत्रांतील दुसरा. यास कांहीं पुराणांत अमूर्तरजा, व कांहीं पुराणांत असूर्तरजा, असें म्हटलेलें आढळतें. यानें स्थापिलेल्या नगरास धर्मारण्य असें नांव होतें ( वा० रा० बाल० स० ३२ ).

**मूर्ति**–स्वायंभुव मन्वंतरांतील दक्षानें, आपल्या सोळा कन्यांतून धर्मऋषीस ज्या तेरा कन्या भार्यार्थ दिल्या होत्या, त्यांतील कनिष्ठ. ही, नर आणि नारायण या दोघां ऋषींची माता.

२–स्वारोचिष मन्वंतरांतल्या प्रजापतींतील एक. हा, वसिष्ठाचा पुत्र.

३–पुढें होणाऱ्या ब्रह्मसावर्णि मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

**मूर्द्धा**–बारा भार्गवदेवांतील एक ( ३ भृगु श० पहा ).

**मूल**–सोमभार्यांतील एक.

**मूलक**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अश्मक राजाचा पुत्र. हा परशुरामाच्या भयानें स्त्रियांच्या समुदायांत सतत लपून राही, त्यामुळें यास नारीकवच असें नांव पडलें. सूर्यवंशांत कुलाच्या वृद्धीस हाच मूळ झाला म्हणून मूलक असें नांव यास होतें. यास दशरथ ना० पुत्र आणि शतरथ नांवाचा पौत्र होता (भाग० ९ स्कं० अ० ९ ).

**मूलतापी**–भारतवर्षीय नदी, व एक तीर्थ.

**मूलप**–ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**मूलहर**– ,, ,,

**मूली**–महेंद्रपर्वतापासून निघालेली नदी.

**मूषकाद**–एक नागवि०

**मृकंड**–स्वायंभुव मन्वंतरांतील भृगुऋषीचा पौत्र, धाता ना० ऋषीचा पुत्र. याचा पुत्र मार्कंडेय.

**मृग**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

**मृगकांता**–मानससरोवरांतून निघालेली एक नदी.

**मृगकेतु**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**मृगधूम**–भारतवर्षीय तीर्थ.

**मृगमंदा**—कश्यपापासून प्राधेस झालेल्या कन्यांतील एक.

**मृगव्याध**—एक रुद्र ( एकादश रुद्र श० पहा ).

**मृगावती**—यमुनातीरींची सतीची विभूति.

**मृगी**—कश्यपास क्रोधेपासून झालेल्या कन्यांतील एक.

**मृग्या**—मानससरोवरांतून निघालेली नदी.

**मृड**—महादेवास नांव.

**मृडानी**—पार्वती.

**मृतपा**—दनुपुत्र दानवांतील एक.

**मृत्तिकावती**—एक नगरी ( भार० वन० अ० २५४ ).

**मृत्यु**—ब्रह्मदेवापासून उत्पन्न झालेली या नांवाची एक स्त्री. हिला ब्रह्मदेवांनीं जगाचा क्षय यथायोग्यकाळीं करीत जा म्हणून आज्ञा केली असतां, हिनें प्रार्थना केली कीं, प्राणिमात्रांस शोककारक असा हा अधिकार मजकडे नसावा; त्यांनीं सांगितलें, तें कांहीं होणार नाहीं, तथापि हिनें तप आरंभिलें. तपांतीं ब्रह्मदेव प्रकट झाले असतां, पूर्ववतच प्रार्थना केली; परंतु ते म्हणाले, हेंच काम तुला केलें पाहिजे. आतां तूं तप केलें आहेस, त्या अर्थीं साक्षात् तुजवरच मरणाचा आरोप न येतां, त्यास निमित्त रोग होत जातील; त्यावरून हिला ती आज्ञा मान्य करणें भाग पडून, तो अधिकार हिनें पत्करिला (भार० द्रोण०). हिचीच कन्या सुनीथा असावी.

२—क्वचित् यमास म्हणतात.

३—अधर्मास निर्ऋती स्त्रीपासून झालेला पुत्र.

४—या नांवाचा एक ऋषि. हा चालू मन्वंतरांत साहवा व्यास होऊन गेला ( व्यास श० पहा ).

**मृत्युंजय**—मृत्यूस जिंकल्यामुळें हें नांव शिवास आहे.

**मृदुर**—श्वफल्क यादवाच्या तेरा पुत्रांतील एक.

**मृदुविन्**— ,, ,,

**मेकल**—किष्किंधेच्या दक्षिणेकडील देश ( वा० रा० किष्किं० स० ४१ ). याची राजधानी माहिष्मती.

**मेकलकन्या**—नर्मदानदीस हें नांव आढळतें. परंतु त्याचें कारण कळत नाहीं. मला असें वाटतें, हें कारण, भगीरथाच्या संबंधानें, जसें गंगेस भागीरथी नांव पडलें, तसेंच कांहीं असावें.

**मेघ**—जलाची वृष्टि करणारे देववि० यांत साधारण मेघ आणि प्रलय मेघ असे दोन भेद आहेत. प्रतिवर्षीं वृष्टि करतात ते सामान्य मेघ, आणि ब्रह्मदेवाच्या अंतकाळीं वृष्टि करून सत्यलोकासहवर्तमान यच्चयावत् सर्वांस बुडवितात, ते प्रलय मेघ. यांची संख्या सात असून, नांवें आहेत तीं अशीं—**संवर्त, भीमनाद, द्रोण, चंड, बलाहक, विद्युत्पताक** आणि **शोण** ( मत्स्य० अ० २ ). ब्रह्मदेवाच्या नित्यप्रलयांत यांचें काम पडत नाहीं. केवळ समुद्र वाढून, भूलोक, भुवर्लोक आणि स्वर्लोक ( स्वर्गलोक ) तीनच लोक बुडतात. महर्लोक, जनोलोक, तपोलोक आणि सत्यलोक, हे चार लोक आहेत तसेच असतात. ते बुडण्याच्या समयीं मात्र हे प्रलयमेघ, वृष्टि करितात.

२—तारकासुरानुयायी एक असुर.

३—किष्किंधेच्या पश्चिमेस असणारा एक पर्वत ( वा० रा० किष्किं० स० ४२ ). यास सौवर्ण पर्वत असेंही नांव असें.

**मेघनाद**—एक देवगणवि०

२—इंद्रजिताचें मूळ नांव.

३—मेघवर्ण राक्षसास नामांतर.

४—भारतवर्षीय तीर्थ.

**मेघनिनाद**—द्वितीयार्थक मेघनाद तोच.

**मेघपुष्प**—कृष्णाच्या रथास चार अश्व असत, त्यांतील एक.

**मेघपृष्ठ**—प्रियव्रतपुत्र घृतपृष्ठ, त्याच्या सात पुत्रांतील तिसरा. याच्या वर्षास हेंच नांव.

२—क्रौंच द्वीपांतील तिसरा वर्ष.

**मेघमाल**—प्लक्षद्वीपांतील पर्वत.

**मेघमाली**—खर राक्षसाच्या बारा अमात्यांतील एक.

**मेघवर्ण**—घटोत्कचाचा पुत्र. हा पांडवांच्या अश्वमेधकाळीं श्यामकर्ण अश्व आणण्यास, व तो पत्रिका बांधून सोडल्यावर त्याचें संरक्षण करण्यास, बहुत उपयोगी पडला. यास क्वचित् मेघनाद असेंही जैमिनि अश्वमेधग्रंथांत म्हटलेलें आढळतें.

**मेघवान्**—दनुपुत्र दानवांतील एक.

**मेघवासा**—वरुणलोकांतील असुरवि०

**मेघवाहन**—इंद्र.

२—करूषकदेशीय सामान्य राजा.

**मेघवेग**—भारती युद्धांत अभिमन्यूनें मारलेला राजा(भार० द्रोण० अ० ४८ ).

**मेघसंधि**—( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न जरासंध राजाचा पौत्र, व सहदेवाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. युधिष्ठिरानें अश्वमेध केला, त्या काळीं यानें तो अश्व धरिला होता; परंतु अर्जुनानें याचा पराभव केल्यामुळें, यानें अश्व परत देऊन करभार दिला ( भार० अश्वमे० अ० ८२ ).

**मेदिनी**—मधुकैटभाच्या मेदानें व्याप्त झाल्यामुळें पृथिवीस पडलेलें नांव.

**मेदोहा**-भीषण राक्षसाचा पुरोहित.

**मेधा**-स्वायंभुव मन्वंतरांतील दक्षानें, धर्मऋषीस दिलेल्या सोळा कन्यांतील तेरा, त्यांतील एक हिची कन्या स्मृति.

**मेधातिथि**-प्रियव्रत राजाच्या दशपुत्रांतील आठवा. हा, पृथिवीच्या सप्त महाद्वीपांतील दधिसमुद्रानें वेष्ठित जें शाकद्वीप तेथील अधिपति होय. यानें आपल्या द्वीपाचे सात भाग आपल्या सात पुत्रांच्याच नांवानें करून, त्या प्रत्येकास तेथील तेथील आधिपत्य दिलें. त्यांचीं नांवें- **पुरोजव, मनोजव, पवमान, धूम्रानीक, चित्ररेफ, बहुरूप** आणि **विश्वाधार**, अशीं होतीं.

२-उपरिचर राजर्षीच्या यज्ञांतील एक ऋषि ( भार० शांति० अ० ३३६ ).

३-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्वपुत्र ऋतेयु, तत्प्रपौत्र कण्व राजर्षीचा पुत्र. याचे वंशज ब्राह्मण झाले.

४-चालू मन्वंतरांतील सत्रावा व्यास (व्यास श० पहा).

**मेधाविनी**-कुलिंद राजाची स्त्री; चंद्रहास राजाची माता.

**मेधावी**-बालधि ऋषीचा पुत्र; हा पर्वतायु अशा नांवानें प्रसिद्ध असे.

२-एक ब्राह्मण ( भार० शांति० अ० २७७ ).

३-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडव, तद्वंशीय सुनय राजाचा पुत्र याचा पुत्र. नृपंजय राजा.

**मेनका**-प्राधेच्या अप्सरा कन्यांतील एक. ही प्रस्तुत प्रतिवर्षी ज्येष्ठमासीं सूर्यासमागमें संचार करण्यास असत्ये ( ५ शुक्र श० पहा ).

२-ऊर्णायु गंधर्वाची स्त्री.

३-हिमालय पर्वताची स्त्री मेना, तिला नामांतर.

**मेना**-वैराज ना० पितरांची मानसकन्या, व हिमालय पर्वतदेवतेची स्त्री. हिला मैनाक आणि क्रौंच, असे दोन पुत्र, व अपर्णा, पर्णा, आणि एकपर्णा, अशा तीन कन्या होत्या ( मत्स्य अ० १३ ).

२-भारतवर्षीय नदी.

**मेरु**-सप्त महाद्वीपें, सप्त महासमुद्र, मानसोत्तर आणि लोकालोक पर्वत इ० ज्याच्या आसमंताद्भागीं वलयाकार ( वर्तुलाकार ) स्थितीनें स्थित आहेत, असा या सर्वांच्या मध्यभागीं, व इलावृताच्या केवळ मधोमध जो सुवर्णाचा पर्वत आहे तो. याची उंची चौऱ्यांयशी सहस्र योजनें असून, हा सर्वकाळ सर्व द्वीपादिकांस व त्यांतील सर्व भागांस ( सर्वेषामुत्तरे मेरुर्लोकालोकस्तु दक्षिणे ) या वाक्याप्रमाणें उत्तरेकडेस आहे. याच्या मस्तकावर लंबरेषेनें असें उंच ध्रुवमंडल असून, सूर्यचंद्रादिक मंडलें याच्या आसमंतात् पृथिवीच्या केवळ उपरिभागीं आपआपल्या गत्यनुरूप सर्वदा वर्तुलाकार गतीनें फिरतात. सारांश, मेरु हा, पृथिवीचें केंद्र म्हणजे मध्यावर्दूिच केवळ असून, यासभोंवते अगदीं निकट **मंदर, मेरुमंदर, सुपार्श्वक**, आणि **कुमुद**, असे चार अवष्टंभगिरि होत्साते, कर्णिकार अशा रीतीनें वीस पर्वत आहेत. त्यांचीं नांवें अशीं.—**केसर, कुरंग, कुरर, कुसुंभ, वैकंक, त्रिकूट, शिशिर, पतंग**, अ० **शिखर, रुचक, निषध, शिनिवास, कपिल, शंख, वैडूर्य, जारुधि, हंस, ऋषभ, नाग, कालंजर**, आणि **नारद** ( भाग० पंचम० अ० १६ ). ( देवीभा० अष्टम० अ० ६ ). याशिवाय आपण यज्ञकुंडाभोंवतीं परिस्तरणें घालितों, तशाप्रकारें यासभोंवते प्रत्येक दिशेकडे दोन दोन मिळून चारही दिशांचे आठ पर्वत आहेत ते असे— **जठर** आणि **देवकूट**, हे दोन पूर्वेस, **पवन** आणि **पारियात्र** हे दोन पश्चिमेस, **कैलास** आणि **करवीर** हे दोन आपण राहतों या अंगाकडे, आणि **त्रिशृंग** व **मकर** हे दोन उत्तरेस म्ह० मेरूच्या तिकडील अंगाकडे. हा दिशाक्रम पुराणकर्ते भरतवर्षांत राहणारे होते म्हणून, त्यांनीं आपल्या दिग्प्रत्ययानें लिहिलेला आहे असें समजावें. या आठ पर्वतांची प्रत्येकीं लांबी अठरा सहस्र योजनें, व रुंदी दोन सहस्र योजनें अशी आहे ( देवीभा० अष्टम० अ० ७ ).

मेरूच्या आसमंतात् प्रथम इलावृत आहे, त्याची आकृति चतुष्कोण असून, तिची मर्यादा करणारे आपण राहतों या अंगाकडील **निषधपर्वत**, व त्यापासून प्रदक्षिण मार्गानुरूप क्रमानें इतर अंगांकडे **गंधमादन, नील** आणि **माल्यवान्** असे चार पर्वत आहेत ( भार० भीष्म० अ० ६ ). ( भाग० पंचम० अ० १६ ).

याशिवाय **निषध** पर्वताच्या आपणाकडील अंगाकडे क्रमानें आलीकडे, **हेमकूट**, आणि **हिमालय** हे दोन पर्वत असून, त्यांमध्यें **हरिवर्ष, किंपुरुषवर्ष**, आणि **भरतवर्ष**, असे तीन भूभाग होत्साते, **गंधमादनापुढें भद्राश्ववर्ष** मात्र एक आहे. तसेंच, **नीलपर्वतापुढें श्वेत** आणि **शृंगवान्**. हे दोन पर्वत, व त्यामधील एकापुढें एक असणारे **रम्यकवर्ष, हिरण्मयवर्ष**, आणि कुरुवर्ष, हे तीन भूभाग असून, **माल्यवान्** पर्वतापुढेंहि एकच **केतुमालवर्ष** आहे. आणि यांच्या आसमंतात् वलयाकाराकृतीनें ( वर्तुला-

काराकृतीनें ) क्षार समुद्र असल्यामुळें, आपण ज्याच्या एक प्रदेशांत राहतों, हा भरतवर्ष, व तसाच मेरूच्या तिकडील आंगचा कुरुवर्ष, यांची आकृति धनुष्याकार आहे. हे जंबुद्वीपांतील सांगितलेले नऊ भाग, व क्षार समुद्र, यांच्या आसमंतात पुढें, इतर द्वीपें, समुद्र, मानसोत्तर व लोकालोक पर्वत वलयाकारच आहेत असें जाणावें.

या मेरूस म्हणजे मेरुदेवतेस, **मेरुदेवी, प्रतिरूपा, उग्रदंष्ट्री, लता, रम्या, श्यामा, नारी, भद्रा** आणि **देववीति** अशा नऊ कन्या होत्या. त्या त्यानें आग्नीध्राचे नऊ पुत्र **नाभि, किंपुरुष, हरिवर्ष, इलावृत, रम्यक, हिरण्मय, कुरु, भद्राश्व** आणि **केतुमाल,** यांस क्रमानें दिल्या असत. याशिवाय **आयती,** आणि **नियती,** अशा दोन असलेल्या कन्या, स्वायंभुव मन्वंतरांतील भृगुपुत्र एक **धाता,** आणि दुसरा **विधाता,** त्यांस दिल्या होत्या.

**मेरुदेवी**–मेरूची कन्या, व आग्नीध्रपुत्र नाभिराजर्षि त्याची स्त्री. हिला नाभिराजापासून **ऋषभदेव** ना० एकच पुत्र झाला होता.

**मेरुमंदर**–आपण राहतों या अंगाकडे जो मेरूचा एक अवष्टंभपर्वत आहे तो.

**मेरुसावर्णि**–धर्मसावर्णि श० पहा.

**मेष**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**मेश्रप**– ” ”

**मैत्रायण**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नलि, तद्वंशीय दिवोदासाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ.

**मैत्रायणि**–सामवेदोपनिषत्.

**मैत्रावरुण–वरुणि**–अगस्त्य ऋषि, व वसिष्ठ ऋषि त्यांस संज्ञा ( वा० रा० उत्तर० स० ५६–५७ ).

**मैत्री**–स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषीच्या १३ स्त्रियांतील एक. हिचा पुत्र प्रसाद.

**मैत्रेय**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

२–एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

३–एक ऋषि. हा कोणत्या कुळांतला तें कळत नाहीं; परंतु पराशर ऋषीचा शिष्य एवढेंच आढळतें. यानें एका प्रसंगीं दुर्योधनास उपदेश केला कीं, पांडवांशीं वैर वाढवूं नको; परंतु त्यानें उपदेशाचा तिरस्कार करून, उन्मत्तपणानें आपली मांडी याच्यापुढें थोपटिली; त्यामुळें यानें क्रोधेंकरून दुर्योधनास शाप दिला होता कीं, भीमाची गदा तुझ्या मांडीवर बसून तूं मरशील. त्याचप्रमाणें पुढें तो मेला ( भार० वन० अ० १० ). यानेंच विदुरास उपदेश केला होता.

४–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील, तद्वंशीय दिवोदासपुत्र मित्रयू, त्याचा पुत्र.

**मैत्रेयी**–याज्ञवल्क्य ऋषीच्या दोन स्त्रियांतील एक. ही ब्रह्मनिष्ठ होती.

२–सामवेदोपनिषत्.

**मैथिल**–मिथिराजाच्या संबंधानें विदेह देशासच म्हटलेलें आहे.

**मैथिली**–मैथिल राजांच्या कन्यांस नांव; परंतु सीतेविषयीं विशेष रूढि.

**मैंद**–सुषेण वानराच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. द्विविदाचा ज्येष्ठ सहोदर ( वा० रा० युद्ध० स० ७६ ). हे उभयतां भ्राते वालीची स्त्री तारा, तिचे बंधु म्हणून अंगदाचे मातुल होते. वालिवधानंतर, सीताशुद्धीसाठीं जे वानर सुग्रीवानें पाठविले, त्यांत भ्रात्यासहित हाहि गेला होता ( वा० रा० किष्किं० स० ४१ ). यानें रामायणयुद्धांत वज्रमुष्टि, यूपाक्ष, इत्यादि मोठमोठे राक्षस मारून रामाचें उत्तम साह्य केलें होतें.

**मैनाक**–हिमवान् पर्वतास मेनेपासून झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. पूर्वी इंद्रानें सर्व पर्वतांचे पक्ष छेदिले, त्या वेळेस यानें, आपले पक्ष छेदले जाऊं नयेत म्हणून, दक्षिणसमुद्रांत गुप्त राहून त्याचा आश्रय केला होता, व समुद्रानेंहि तो दिला होता; कारण पाताळांतून पृथिवीवर येण्यास जे कित्येक मार्ग असत, त्यांतील एक मार्ग दक्षिणसमुद्रांतून होता, तो यास तेथें आड बसवून बंद केला.

कांहीं कालानें मारुति सीताशुद्धीसाठीं चालला असतां, सगर राजाच्या पुत्रांनीं पृथिवी खणून आपणास गंभीर केलें, व तेव्हांपासून मीहि सागर नांवानें लोकांत प्रख्यात झालों, त्या सगरवंशांत राम जन्मला असून, त्याच्या स्त्रीच्या शुद्धीसाठीं मारुति चालला आहे, तेव्हां त्याचें आतिथ्य करणें, व त्यास विश्रांतीस स्थल देणें, हा आपला धर्म होय असें जाणून, समुद्रानें मैनाकास पाण्याच्यावर वाढून मारुतीचें आतिथ्य करण्यास सांगितलें त्यावरून हा वाढला; परंतु मारुतीस हें आपणास कांहींतरी विघ्न आलें आहे असें वाटून, त्यानें याचें एक शृंग पाडिलें. म्हणून मैनाकानें मनुष्यरूप धारण करून, मारुतीस सागराचें सर्व वृत्त निवेदन केलें. त्या काळीं मारुति संतोष पावून म्हणाला कीं, तूं मला सागराच्या आज्ञेनें विश्रांति द्यावी, व आतिथ्य करावें म्हणून आलास हें योग्यच आहे;

परंतु मी रामकार्यास निघालों असून अजून कार्य झाल नाहीं. त्यामुळें मला विश्रांति, व आहार करितां येत नाहीं. इतकें बोलून मारुतीनें याचें अभिवंदन केलें, व लंकेस गेला ( वा० रा० सुंदर० स० १ ).

२–दुसरा एक भारतवर्षीय पर्वत.

**मोदागिरि**–अंगदेशाच्या पूर्वेकडील एक पर्वत ( भार० सभा० अ० ३० ).

**मोदापुर**–उलूक देशाच्या उत्तरेकडील एक नगर. येथें पांडवांच्या वेळेस वामदेव आणि सुदामा, असे दोघे राजे होते ( भार० सभा० अ० २७ ).

**मोह**–ब्रह्मदेवापासून उत्पन्न झालेला पुत्र.

**मोहन**–नगरवि० ( भार० वन० अ० २५४ ).

**मोहिनी**–समुद्रमंथन होऊन, त्यांतून अमृत निघालें असतां, त्यानिमित्त देवदैत्यांचा कलह लागला, व अमृतकलश आपणाजवळ दैत्य घेऊन बसले, तेव्हां देवांच्या कल्याणासाठीं विष्णूनें धरिलेला स्त्रीरूप अवतार तो. हा, चाक्षुष मन्वंतरांत झाला होता ( भाग० अष्टम० अ० ८ ).

**मौंज**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु० श० पहा ).

**मौंजकेश**– " ( २ अत्रि० श० पहा ).

**मौंजवृष्टि**– " ( ३ अंगिरा श० पहा ).

**मौंजायनि**– " (१ विश्वामित्र श० पहा).

**मौद्गल्य**– " ( ३ अंगिरा श० पहा ).

२–जनमेजयाच्या सर्पसत्रांतील एक सदस्य ( सभासद).

३–दाशरथि रामाच्या सभेंत जे आठ धर्मशास्त्री असत, त्यांतील एक.

४–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न भर्म्याश्व राजाच्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ जो मुद्गल, त्याच्या वंशांत जे कोणी तपानें ब्राह्मण झाले त्यांस संज्ञा.

**म्लेच्छ**–अस्पष्ट भाषण करणाऱ्या,व ज्ञानविज्ञानशून्य ज्या जाति त्या यवन आणि म्लेच्छ, हे जरी वेदबाह्य आहेत, तरी ह्यांच्या जाति दोन असून, त्यांमध्यें बराच भेद असल्याचें ( भार० कर्ण० अ० ४५ श्लो० ३६ यावरून ) दिसतें. हे प्रायः पिशाच, राक्षस किंवा प्रेत, यांच्या अंशानें जन्मलेले असून, स्वच्छंदाचारवेष्ठित असतात (भार० शांति० अ० १८८). कौरवपांडवांचें युद्ध झालें त्यांत हे लोक बरेच होते असें भारतावरून दिसतें, आणि त्यावरुन कृष्णद्वैपायन व्यासास हे चांगल्या रीतीनें ऐकून जाणत होते; इतकेंच नव्हे, तर ते आमच्यांतील अडाणी लोक द्वैपायन हीं अक्षरें गाळून, व्यास कृष्ण एवढ्याच शब्दांतील, व्याकरण हा शब्द म्हणतांना जसें यियाकन म्हणतात, त्याप्रमाणें व्यास या स्थलीं यियास म्हणत, आणि कृष्ण या स्थलीं क्रष्ण बोलत, तो शब्द ऐकून ऐकून जीजास क्रष्ण म्हणतां म्हणतां जीजस क्राईस्ट शब्दोचार करीत परस्परांत त्याच्या वार्ता नेहमीं बोलत; आणि व्यासाची माता कुमारी, तसेंच त्यास शिष्य चार, हेंहि वृत्त त्यास चांगल्या प्रकारानें ठाऊक होतें, मात्र त्यांचीं नांवें तादृश त्यांच्या ध्यानांत राहिलीं नसावींत, तरी जैमिनि हा शिष्य व्यासासहि अंमळ भारी होता, त्यामुळें त्याच्या नांवाचा त्यांस विसर न पडल्यामुळें, त्याच्या गोष्टी वारंवार जॉन अशा नांवानें काढीत. आतां यावरून मला असें वाटतें कीं, पुढें त्यांच्यांत कोणी एकादा पुरुष उत्पन्न झाला असावा, आणि त्याच्यावर वर लिहिलेले व्यासाचे संबंध त्यांनीं बसविले असावेत. या माझ्या म्हणण्याचा मार्मिक लोक विचार करोत.

---

## य

**यकृल्लोम**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**यजुर्वेद**–चार वेदांतील दुसरा व त्याची मूर्तिमान् देवता. हा ब्रह्मदेवाच्या दक्षिणमुखांतून उत्पन्न झाला असून, यास धनुर्वेद हा उपवेद आहे ( १ वेद श० पहा ).

**यति**–ब्रह्मदेवाच्या अन्य मानसपुत्रांतील एक ( भाग० ४ स्कं० अ० ८ ).

२–विश्वामित्रऋषींच्या पुत्रांतील एक.

३–( सो० वं० ) आयुपुत्र नहुष राजा, त्याच्या साहा पुत्रांतील ज्येष्ठ. हा विरक्त होता.

**यदु**–( सो० वं० ) आयुपुत्र ययाति राजा, त्यापासून देवयानीच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. हा संपूर्ण यादवांचा मूळपुरुष असून, यानें पित्याची ( ययातीची ) जरा, ज्या अर्थानें घेतली नाहीं, त्यावरून हा अत्यंत सूक्ष्म विचारी होता असें दिसतें. तो अर्थ असा–सर्वही पुत्रांत हा ज्येष्ठ असून, ययातीची याच्यावर अत्यंत प्रीति असल्यामुळें, त्यानें यास आपली जरा घेण्याची आज्ञा केली. तेव्हां यानें, आपल्या तारुण्यग्रहणानें, आपल्या मातेशीं आपला पिता रममाण होणार,व तो झाल्यानें आपण पित्याची जरी आज्ञा मान्य केली असें होईल, तरी अंशतः मात्रागमन आपणास घडेल, म्हणून पित्यास म्हणाला कीं, ही जरा ग्रहण करणें मला नको, व सार्वभौम पदवी तीहि नको. असें ऐकून ययातीनें बरें म्हणून, यास सामान्य राज्य दिलें, तें यानें ग्रहण केलें व स्वस्थ राहिला.

यास सहस्रजित्, क्रोष्टा, नल आणि रिपु, असे चार पुत्र होते, व यानें अवधूताची (दत्तात्रेयाची) कृपा संपादन करून, त्यापासून ब्रह्मविद्या प्राप्त करून घेतली होती; त्यामुळें जरी यास सार्वभौम पदवी नव्हती, तरी याची मान्यता सर्व राजांत मोठी असे. याचा मृत्यु कधीं झाला त्याविषयीं ग्रंथांत कोठेंच उल्लेख आढळत नाहीं.

२–विदर्भ देशाचा एक राजा. यास प्रभा अ० सुमति ना० एक कन्या होती, व ती यानें, सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न सगर राजास दिली होती.

३–द्वितियार्थक उपरिचरराजाच्या पुत्रांतील एक.

४–वसुदेवास इला ना० स्त्रीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**यम**–कल्पारंभींचा दाक्षिणदिग्पाल, याची स्त्री धूमोर्णा असून, मानसोत्तर पर्वतावरील संयमिनी ना० नगरी, ती याची राहण्याची जागा असे. याच्या नांवावरुन दक्षिण दिशेस याम्या नांव पडलेलें, अजून जशाचें तसेंच चालत आहे.

२–विवस्वान् ना० आदित्यापासून, संज्ञा स्त्रीच्या ठायीं वैवस्वत मनु जन्मल्यावर, जें कन्यापुत्ररूप युग्म जन्मलें होतें, त्यांतील पुत्र तो. हा, विवस्वानाचा पुत्र म्हणून यासही वैवस्वत असें क्वचित् म्हटलें असून चालू मन्वंतरांत याजकडेस दाक्षिणदिग्पालत्व आहे. यानें नचिकेता ना० ब्राह्मणपुत्रास ब्रह्मविद्या दिली होती, त्यावरुन हा तत्संपन्न होता असें उघड दिसतें. हा पातकिजनांस शासन करणारा आहे म्हणून, यास दंडधर, काल, कृतांत, इ० नांवें आहेत. तसाच पुण्यवानांस सौम्य असल्यामुळें, धर्मराज असेंही यास म्हटलेलें आहे. मांडव्य ऋषीच्या शापानें हाच विदुररूपानें पृथिवीवर जन्मास आला होता (मांडव्य श० पहा).

**यमदूत**–विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक.

**यमलार्जुन**–वृक्षवि०. हे नारदशापानें जे कुबेरपुत्र स्थावरयोनि पावले होते ते.

**यमुना**–विवस्वान् आदित्यास कन्यापुत्ररूप जें युग्म झालें होतें, त्यांतील कन्या. ही यमाची भगिनी असून, यमुना नदीची मूर्तिमान् देवता होय.

२–भारतवर्षीय नदी (२ हिमालय श० पहा).

**ययाति**–(सो० वं०) आयुपुत्र नहुष राजा, त्याच्या साहा पुत्रांतील दुसरा. याचा ज्येष्ठ भ्राता यति, विरक्त असल्यामुळें परमहंस होऊन अरण्यांत गेल्यावर, हाच पित्याच्या मागें राज्याधिकारी झाला होता. एके काळीं मृगयेनिमित्त, हा अरण्यांत गेला असतां, तेथें यानें एक्या कूपांत शुक्रकन्या देवयानी पडलेली तिला पाहिलें. त्या वेळीं तूं कोण ? व येथें कशी पडलीस ? इ० पुसल्यावर तिनें आपलें वृत्त यास थोडक्यांत सांगून, यासही तूं कोण ? इ० विचारिलें असतां, यानेंहि आपलें वृत्त सांगून तिला बाहेर काढिलें (देवयानी श० पहा).

देवयानीस कूपाबाहेर काढून, ययातिराजा स्वनगरास परत गेल्यावर, तिकडे देवयानीस समजावून, व तुझा पिता तुला जेथें देईल, तेथें तुजसमागमें माझी कन्या शर्मिष्ठा, दासी होऊन येईल, इ० गोष्टी मान्य करून, वृषपर्व्यानें नगरांत नेल्यावर, देवयानीनें आपल्या पित्यास, ययातीनें मला कूपांतून बाहेर काढिलें इ० वृत्त सांगून म्हटलें कीं, माझा विवाह त्याशीं व्हावा. त्यावरून शुक्राचार्यानें ययाति राजास बोलावून आणून, त्यास देवयानी विवाहविधीनें दिली. नंतर कांहीं काळपर्यंत त्यास आपणाजवळ ठेवून घेऊन, देवयानीसहित मार्गस्थ करण्याच्या वेळेस, शुक्राचार्य म्हणाला, राजा, माझी प्रिय कन्या जी मी तुला दिली आहे, हिजसमागमें वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा दासी होऊन, ती आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें येत आहे; तर तूं तिजकडे अगदीं अवलोकन करूं नयेस; जर करशील, तर विद्वान् व तपस्विनी जी माझी कन्या देवयानी, तिचा तूं अपमान केल्यामुळें, अंशतः माझाच अपमान केलास असें होऊन, नसत्या अनर्थास प्राप्त होशील. त्यावरून यानें आपल्या आज्ञेप्रमाणें चालेन असें बोलून, शर्मिष्ठा दासीसहित देवयानीस घेऊन तो स्वनगरास आला.

पुढें हा, नीतिपूर्वक राज्य करून, आपल्या अशोकवनिकेंत देवयानीसहवर्तमान बहुत कालपर्यंत रममाण होत असतां, यास एकामागून एक **यदु** आणि **तुर्वसु**, असे दोन सुंदर पुत्र झाले. त्यावरुन हर्षयुक्त असतां, तिला न कळत तिकडे शर्मिष्ठेसही ययातीपासून **अनु**, **द्रुह्यु**, आणि **पूरु** असे तीन पुत्र झाले.

एकदां असें झालें कीं, देवयानी फिरत फिरत जेथें शर्मिष्ठा राहात होती, तेथें प्राप्त झाली, आणि पाहाल्ये तर एकाखालीं एक लहान लहान, असे तिघे पुत्र तेथें खेळत आहेत. तेव्हां तिनें शर्मिष्ठेस हे कोणाचे पुत्र म्हणून विचारिलें. त्यावरून शर्मिष्ठा अंतःकरणांत जरी भय पावली, तरी धैर्य धरून माझेच पुत्र असें उत्तर तिनें देवयानीस दिलें. तें ऐकून देवया-

नीनें पुसलें कीं, हे तूं कोणापासून कसे संपादन केलेस ? शर्मिष्ठा म्हणाली, माझा ऋतुकाल असतां, येथें कोणी ऋषि प्राप्त झाला होता. त्याची मी प्रार्थना करून त्याच्या प्रसन्नतेनें संपादन केले. तें तिचें सांगणें देवयानीस सत्य वाटलें; कारण राजापासून तिला पुत्र होण्याचा संभवच नाहीं असा तिचा त्याविषयीं दृढनिश्चय होता. आणि त्यामुळेंच ती त्या मुलांस कांहीं पदार्थ प्रीतीनें देऊन, शर्मिष्ठेस आनंद दर्शवींत होत्साती स्वमंदिरीं परत आली.

या गोष्टीस बरेच दिवस लोटून गेले असतां, देवयानीस शर्मिष्ठेच्या पुत्रांविषयीं विकल्पच नव्हता म्हणून, ती त्यांस पुनः पहावें, या हेतूनें राजासहित फिरत फिरत शर्मिष्ठेच्या स्थानास प्राप्त झाली. परंतु राजास पराकाष्ठेचें भय झालें कीं, आतां कसें होईल तें होवो; इतक्यांत शर्मिष्ठेच्या पुत्रांनीं, देवयानीसहित राजास आलेला पाहून, मातेस म्हटलें कीं, तो पहा तात ( बाप ) आला. ते शब्द कांहींसे देवयानीनें ऐकून, तिला संशय उत्पन्न झाला. तथापि निश्चयात्मक कळावें अशा आशयानें तिनें त्या पुत्रांस जवळ बोलाविलें, आणि ममतेनेंच पुसलें कीं, कायरे तुमचा पिता कोणता ? व तो कोठें आहे ? इतकें ती पुसत आहे तों राजानें त्या पोरांस माझें नांव सांगूं नका अशा प्रकारची नेत्रांनीं खूण केली; परंतु त्यांस ती कांहींच न समजून त्यांनीं आमचा पिता हा, असें म्हणून राजाकडे बोटें दाखविलीं. त्यावरून देवयानीचा निश्चय झाला कीं, हे पुत्र राजापासूनच शर्मिष्ठेस झाले.

मग देवयानीचा कोप काय पाहवा, तिनें लागलेंच शर्मिष्ठेस आपणासमोर बोलाविलें, आणि पुसलें, काय गे दुष्टे, हे पुत्र ऋषीपासून मीं संपादन केले, असें तूं मशीं असत्य भाषण करून वंचना केलीस. त्यास आतां सांग कीं, तो ऋषि हाच काय? शर्मिष्ठेनें नम्रतेनेंच उत्तर केलें, हे देवयानी, तूं ऋषिकन्या असतां तुझें पाणिग्रहण करण्यास ऋषीवांचून अन्य कोण समर्थ आहे ? यास्तव मीं जें ऋषीपासून पुत्र संपादिले म्हणून तुला सांगितलें, तें माझें भाषण असत्य नसून सत्यच आहे. असें तिचें भाषण ऐकून, देवयानी तिला, व राजाला कांहींच न बोलतां, क्रोधानें पित्याकडे जाण्यास निघाली. तें ययातीनें पाहून, त्यानें तिची बहुता प्रकारें प्रार्थना केली कीं, येवढा माझा अन्याय क्षमा कर; परंतु तिनें तें न ऐकून शुक्राचार्याकडे गमन केलें. तेव्हां ययातिही निरुपाय होऊन परम भयभीत असा तिच्या पाठोपाठच गेला.

देवयानीनें जातांच राजाचें कृत्य पित्यास निवेदन केलें. तें ऐकून शुक्राचार्यास अनिवार क्रोध आला, व देवयानीच्या मागें, त्यास अधोमुख उभा राहिलेला असा पाहून म्हणाला, मूर्खा, बोलला होतास काय आणि केलेंस काय ? अस्तु, असा ज्या अर्थी तुजकडून माझ्या कन्येचा अपमान झाला आहे, त्या अर्थी तुला जरा ग्रस्त करो. इतकें बोलतांच कांहीं अवकाशावांचून लागलाच ययातिराजा जराग्रस्त म्हणजे म्हातारपणानें व्याप्त झाला.

जरेनें ग्रस्त होतांच ययातीनें श्वशुराची (शुक्राचार्याची ) प्रार्थना केली कीं, देवयानीविषयीं विषयभोगाची वासना अजून माझी तृप्त झाली नसून जरेनें तर ग्रस्त केलें, यास्तव यास कांहींतरी उपाय सांगावा. तेव्हां शुक्राचार्य म्हणाले, असें असेल तर, ही जरा पुत्रास देऊन त्याचें तारुण्य तूं घ्यावेंस आणि आपली वासना पूर्ण करून घ्यावीस. त्यावर ययातीनें पुनः विनंति केली कीं, जो पुत्र माझी जरा घेईल, तोच माझ्या सार्वभौम पदवीस अधिकारी व्हावा. त्यास शुक्राचार्यानें अनुमोदन देतांच देवयानीस घेऊन ययाति हा तेथून निघाला, तो स्वनगरास परत आला.

ययाति राजा परत आल्यावर त्यानें कालेंकरून पुत्र तरुण झाले असें पाहून सर्वांस आपणासमीप बोलविलें, व त्यांनीं आपली जरा घेऊन, त्यांचें तारुण्य आपणास द्यावें अशी आज्ञा क्रमानेंच यदूपासून आरंभ करून सर्वांस केली; परंतु चौघांनीं ती अमान्य केली, असें पाहून सर्वांत कनिष्ठ पूरु, त्यानें पाहिलें कीं, जर मीहि आतां असेंच करीन, तर पित्यानें पुढें कोणाची आज्ञा करावी ? यास्तव यांत धर्म असो कीं अधर्म असो, असें म्हणून त्यानें आपलें तारुण्य पित्यास दिलें व त्याची जरा आपण घेतली. त्या तारुण्यानें ययातीनें देवयानीशीं यथेच्छ विषयसुख घेऊन वैराग्य प्राप्त झालें असतां, पुरूचें तारुण्य पुरूस देऊन, व त्यास सार्वभौमपद, व इतरांस राज्यें समर्पून आपली जरा घेत होत्साता, देवयानीसहवर्तमान हा तपार्थ अरण्यांत गेला. याच वेळेस यास एक माधवी कन्या झाली होती असें दिसतें ( ३ गालव श० पहा ). सारांश, तेथें यानें तपेंकरून देह शुष्क करून देवयानीसहित देहप्राणांच्या वियोगांतीं स्वर्गास गमन केलें ( भार० आदि० अ० ८४-९३ ). ( मत्स्य० अ० २४-३६ ).

कांहीं काळानें यास आत्मस्तुतीनें स्वर्गांतून पतन घडलें, त्यावरून याचे दौहित्र म्हणजे माधवीचे पुत्र अष्टक, प्रतर्दन, वसुमना, आणि शिबी, ते चौघे जेथें तपादिक कर्मे करीत होते, तेथेंच याचें दैवगतीनें येणें झालें. पुढें तेथें परस्परांचा संवाद होत असतां, माधवी, तीहि तेथें अकस्मात् प्राप्त झाली. पुढें तिनें आपले स्वतःचें, व चौघां पुत्रांचीं पुण्यें देऊन, यास पुनः स्वर्गी पाठविलें. ( भार०उद्योग०अ० १२०-१२३ ),

**यवक्रीत**–भारद्वाज ना० कोण्या एक्या ऋषीचा पुत्र. यास, व याच्या पित्यास उत्तम प्रकारचें अध्ययन नव्हतें: म्हणून उभयतांची मान्यता ऋषिमंडळांत तादृश नव्हती; यास्तव यानें अध्ययन केल्यावांचून सर्व वेद आपणास व पित्यास यावेत, अशा अर्थानें तप आरंभिलें. एकदा इंद्र पृथिवीवर फिरत असतां, त्यानें यास तप करितांना पाहून पुसलें कीं, हें तूं तप किमर्थक करीत आहेस ? त्यावर यानें इंद्रास आपला हेतु निवेदन केला. तो ऐकून इंद्र म्हणाला, गुरुसेवापूर्वक ध्यान कर, म्हणजे तुला वेद येतील, हा श्रम व्यर्थ करूं नको. इतकें बोलून तो गेला, तरी यानें तपच चालविलें. त्यावरून इंद्रानें ब्राह्मणाचें रूप धरून याच्या आश्रमासमीपच्या नदींत मुठीमुठीनें वाळू घेऊन टाकण्यास आरंभ केला. तें कृत्य यानें पाहून, त्यास पुसलें, ब्राह्मणा, तूं हें काय करीत आहेस ? त्यानें सेतु बांधितों आहे म्हणून उत्तर देतांच, हा त्यास म्हणाला, अशानें सेतु कसा होईल? ब्राह्मण म्हणाला, जर असें केल्यानें सेतु होणार नाहीं, तर गुरुसेवापूर्वक अध्ययन केल्यावांचून वेद तरी कसे येतील ? तें ब्राह्मणाचें भाषण ऐकून यानें हा इंद्र आहे असें ओळखिलें, व त्यास म्हणाला, बरें तर मी आतां तप समाप्त करितों. त्यावरून इंद्र प्रसन्न होऊन, यास त्यानें तुला वेद येवोत असा आशीर्वाद दिला, व तत्काळ अंतर्धान पावला.

पुढें यानें घरीं येऊन, झालेलें वर्तमान पित्यास कळवून म्हटलें कीं, आतां चला आपण सर्व ऋषींस जिंकूं. त्यांवर भारद्वाजानें याचा गर्व झाडावा, अशाविषयींचा बालधि ऋषि, व त्याचा पुत्र मेधावी, त्याचा इतिहास सांगितला. तो ऐकून यानें केलेला विचार रहित केला ( बालधि श० पहा ).

यवक्रीत, व याचा पिता, हे उभयतां जेथें राहत असत, त्यासमीपच विश्वामित्र ऋषीचा पुत्र रैभ्य ऋषि, आश्रम करून आपले दोघे पुत्र अर्वावसु आणि परावसु, व एक स्नुषा ( सून ) यांसहवर्तमान राहत असे, त्यामुळें, यांचा व त्यांचा स्नेहभाव असल्यामुळें, हा एके काळीं त्यांच्या आश्रमास सहजरीत्या गेला, परंतु रैभ्यऋषि, व त्याचे दोघे पुत्र, कोणीच आश्रमांत नसून, रैभ्याची सून ती मात्र एकटी तेथें असलेली यानें पाहिली. त्यावरून यास दुर्बुद्धि उत्पन्न होऊन तिला हा, आपणास तिनें अनुसरावें असें भाषण करूं लागला. तें तिनें याच्या शापभीतीनें मान्य करून यास अनुसरून मार्गस्थ केल्यावर स्नान केलें, आणि श्वशुर ( रैभ्य ऋषि ) आश्रमीं येतांच, त्यास याचें वृत्त निवेदन केलें.

रैभ्यानें असें याचें दुर्वृत्त ऐकून, लागलाच तो हवनास बसला, आणि त्यानें एक सुंदर स्त्री व एक राक्षस निर्माण करून, त्यांस अशी आज्ञा केली कीं, तुम्ही क्रमेंकरून एकामागून एकानें यवक्रीताकडे जावें, व आपआपलीं कार्यें करून परत यावें. त्या आज्ञेप्रमाणें ती स्त्री यवक्रीताकडे गेली, व त्यास मोहक भाषणांनीं मोह करून, तो अंगसंगास प्रवृत्त होत आहे तों, मागून राक्षस जाऊन पोहोंचला. त्यास पाहतांच यवक्रीत हा, पित्याच्या अग्निशाळेंत लपावें या हेतूनें तींत जाऊं लागला; परंतु अग्निशालेचा द्वाररक्षक, याच्या पित्याचा एक जन्मांध शूद्र सेवक होता, त्यानें यास न जाणून प्रतिबंध केला. त्या अवकाशांत, राक्षसानें यास धरून मारिलें, व निघून गेला.

यवक्रीतास राक्षसानें मारिलें, त्यावेळेस त्याचा पिता भारद्वाज आश्रमांत नव्हता, म्हणून त्यास हें वृत्त ठाऊक नसल्यामुळें, होमाची वेळा होतांच तो घरीं येऊन नित्याप्रमाणें स्नान करून होमशाळेंत गेला; परंतु प्रत्यहींच्या पाठाप्रमाणें त्या दिवशीं त्यास अग्नीनें उत्थापन दिलें नाहीं. तणेंकरून आज असें कां झालें म्हणून विस्मय होऊन, त्यानें लागलेंच द्वाररक्षक शूद्रास पुसलें कीं, कायरे ? आज येथें कोण आलें होतें ? त्यावरून त्यानें विनंति केली कीं, मघाशीं येथें एक राक्षस ( असेलसें वाटतें ) आला होता, व त्यानें कोणालासें मारलें. तें ऐकून भारद्वाज साशंक होऊन आश्रमासभोंवतें पाहूं लागला तों, यवक्रीत मरून पडला आहे. त्यास पाहून भारद्वाजास अनिवार शोक झाला, व त्यानें लागलेंच त्याचें दहन करून, ज्यानें माझ्या पुत्रास मारविलें असेल तो त्याच्याच पुत्राच्या हातून मरण पावो, असा शाप देऊन, आपणही अग्निप्रवेश करून देह त्यागिला.

भारद्वाजाच्या शापाप्रमाणेंच, पुढें कांहीं कारणानें

रैभ्य ऋषीचा वध परावसु ना० त्याच्या पुत्राच्या हातून झाला असतां, रैभ्याचा दुसरा पुत्र अर्वावसु परम सुशील होता; त्यानें उग्र तप करून देवास प्रसन्न केलें, व त्यांच्या प्रसादानें भारद्वाज व त्याचा पुत्र यवक्रीत, तसाच आपला पिता रैभ्य या तिघांस सजीव करून परावसूस ब्रह्महत्त्येपासून मुक्त केलें. त्यावरून परस्परांचा स्नेह अधिक वृद्धिंगत होऊन, पुत्रासहवर्तमान भारद्वाज ऋषि, अर्वावसूच्या उपकाराचें अभिनंदन करून, आपल्या आश्रमास गमन करितां झाला ( भार० वन० अ० १३५-१३८ ).

**यवन**-यवनदेशीय लोक. हे शूर व जाणते असतात, म्हणून म्लेंच्छांहून कांहींसे भिन्न दिसतात इतकेंच; वस्तुतः यांची गणना वेदबाह्यामध्येंच होय ( म्लेंच्छ श० पहा ).

**यवनदेश**-दक्षिण पश्चिम दिशाभेदानें दोन प्रकारचा, तो त्या त्या वर्णांत पाहावा.

**यवयस-यवया**-प्रियव्रतपुत्र इध्माजिव्ह, त्याच्या सात पुत्रांतील एक. याच्या वर्षास हेंच नांव आहे.

२-प्लक्षद्वीपांतील दुसरा वर्ष.

**यवस**-आठव्या सावर्णि मनूच्या पुत्रांत होईल एक पुत्र तो.

**यवक्षा**-भारतवर्षीय नदी.

**यवीनर**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्ति राजाचा पुत्र देवमीढ अ० द्विमीढ त्याचा पुत्र. याचा पुत्र कृतिमान्.

२-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिपुत्र अजमीढ, तत्पुत्र नीलवंशीय भर्म्याश्वाच्या पांच पुत्रांतील दुसरा.

**यशोदा**-हविष्मंत पितरांची मानसकन्या, सूर्यवंशीय अंशुमान् राजाची स्त्री. हिचा पुत्र दिलीप राजा.

२-गोकुलाधिपति नंदाची स्त्री.

**यशोधर**-दुर्मुख पांचालाचा पुत्र. यास दौर्मुखी असें म्हणत ( भार० द्रोण० अ० १८४ ).

**यशोवती**-एकावली ना० एका राजकन्येची सखी.

**यस्क**-एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**यक्ष**-देवयोनींतील जातिवि०. ब्रह्मदेवांनीं कांहीं प्राणी उत्पन्न केल्यावर, त्यांनीं, ' किं कुर्मः ' ( काय करूं ) असें त्यास पुसलें असतां, त्यानें, 'रक्षध्वं' ( प्राण्यांचें रक्षण करा ) असें म्हटलें. त्यांत कांहींकांनीं, 'यक्षाम' आणि कांहींकांनीं, ' रक्षाम ', असें उत्तर दिलें; तेच क्रमानें यक्ष व राक्षस झाले ( वा० रा० उत्तर० स० ४ ).

**यक्ष**-स्वायंभूव मन्वंतरांत रुचिना० ऋषीपासून आकूति भार्येच्याठायीं झालेला पुत्र. यास, स्वायंभू मनूनें रुचिऋषीपासून पुत्रिकाधर्माप्रमाणें त्याजवळून परत घेतलें होतें ( पुत्रिकाधर्म म्ह० आपली कन्या, तिला होईल पुत्र तो आपण घ्यावा अशा संकेतानें कोणेकास देणें ). यास दक्षिणा नांवाची स्त्री होती, व तिच्या ठायीं यापासून बारा देव उत्पन्न झाले होते. ते तुषित अशा नांवानें प्रख्यात होते ( तुषित श० पहा ). हा यज्ञ, विष्णूचा अवतार असून, त्याच मन्वंतरांत स्वर्गांतील इंद्रहि होता, आणि त्याच कारणामुळें, पहिल्या मन्वंतरांतील इंद्राणी दक्षिणा होती.

**यज्ञकेतु**-एक कौरव.

**यज्ञकोप**-रामानें मारिलेले रावणपक्षीय दोन राक्षस ( वा० रा० युद्ध० स० ९ आणि ४३ ).

**यज्ञपिंडायन**-ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**यज्ञबाहु**-प्रियव्रतराजाच्या दहा पुत्रांतील तिसरा. सुरोदानें वेष्टित जें शाल्मलीद्वीप, तेथील हा अधिपति होता. यानें आपल्या द्वीपाचे आपल्या पुत्रांच्याच नांवानें सात भाग करून, त्या प्रत्येकास तेथील तेथील अधिपति केले होते त्यांचीं नांवें-**सुरोचन**, **सौमनस्य**, **रमणक**, **देववर्ष**, **पारिभद्र**, **आप्यायन**, आणि **अविज्ञात**, अशीं होतीं.

**यज्ञवल्क्य**-याज्ञवल्क्य ऋषीचा पिता.

**यज्ञवराह**-श्वेतवराह श० पहा.

**यज्ञवाह**-अगस्त्यकुलोत्पन्न ऋषि.

**यज्ञशत्रु**-लंकेंतील एक राक्षस ऋषि.

**यज्ञसेन**-पृषत राजाचा पुत्र जो द्रुपद राजा त्याचें नामांतर.

**यज्ञहोत्र**-तिसरा उत्तम मनु, त्याच्या पुत्रांत होता एक पुत्र तो.

**याज**-याजोपयाज श० पहा.

**याजोपयाज**-यमुनेच्या तीरीं राहणारे काश्यपगोत्रोत्पन्न ऋषिपुत्र. हे उभयतां सहोदर असून, त्यांत याज ज्येष्ठ, व उपयाज कनिष्ठ होता. उपयाज परम निस्पृह असे, परंतु याज तसा नव्हता, म्हणूनच त्यानें द्रव्यलोभेंकरून द्रुपदाचा यज्ञ करून, त्यास द्रोणाचार्याला मारण्याजोगा धृष्टद्युम्न ना० पुत्र उत्पन्न करून दिला, त्यांतच कृष्णा ( द्रौपदी ) तीहि उत्पन्न झालेली होती ( द्रुपद श० पहा० ).

**यादव**-यदुराजाचे वंशज ते सर्व.

**यान**-स्वायंभुव मन्वंतरांतील वसिष्ठ ऋषीच्या सात पुत्रांतील एक.

**याम**-स्वायंभुव मन्वंतरांतील देववि०.

**यामी**-चालू मन्वंतरांतील धर्म ऋषीच्या दहा स्त्रियांतील एक. ही प्राचेतस दक्षाची कन्या. हिला स्वर्ग ना० पुत्र, व नागवीथी कन्या, अशीं दोन अपत्यें होतीं. यामीस, जामी असेंहि म्हटलेलें आढळतें.

**यामुनगिरि**-प्रथमार्थक हिमालयाचें शिखरवि०. पांडव गंधमादनावरून निघून, द्वैतवनाकडे येऊं लागले असतां, या शिखरावरील विशाखयूप ना० स्थळीं राहिले. तेथें एकदां भीमसेन अरण्यांत मृगयेस गेला असतां, अगस्त्यशापानें नहुषराजा अजगर होऊन पडला होता त्यानें यास ग्रासिलें. त्याच्या मुखांतून भीमसेनाच्यानें पुष्कळ प्रयत्न करूनही सुटवेना. इतक्यांत इकडे भीमास विलंब लागला असें पाहून युधिष्ठिर त्याच्या शोधास निघाला. आणि शोध करीत जातां जातां पाहतो तर, त्यास अजगरानें ग्रासिलें आहे. तेव्हां युधिष्ठिरानें अजगराची बहुत स्तुति केली. ती ऐकून अजगरानें मनुष्यवाणीकरून त्यास कांहीं प्रश्न केले. त्यांचीं उत्तरें युधिष्ठिरानें त्यास देतांच नहुषाची सर्पदेहांतून मुक्तता होऊन, तो स्वर्गास गेला व भीमसेनहि मोकळा झाला ( भार० वन० अ० १७८–१८१ ).

२–गंगा आणि यमुना, यांच्या मध्यभागीं असणारा एक पर्वत. याच्या पांयथ्याशीं पूर्वीं पर्णशाल ना० एक ग्राम होता.

**यामुनदेश**-पूर्वेस शूरसेन आणि पश्चिमेस ब्रह्मावर्तदेश, यांच्यामधील यमुनातीरस्थ देश ( भाग० १ स्कं० अ० १० ).

**यामुनि**-ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**यायावर**-जरत्कारु ऋषीस नामांतर.

**यास्क**-यस्क ऋषीचा पुत्र, व तद्वंशज तो ( ३ भृगु श० पहा ).

**याज्ञवल्क**-यज्ञवल्क ऋषि तोच ( ३ वासिष्ठ श० पहा ).

**याज्ञवल्क्य**-वसिष्ठकुलोत्पन्न याज्ञवल्कऋषि त्याचाच हा पुत्र असावा, आणि त्यामुळेंच यास हें नांव पडलें असावें. हा याज्ञवल्क्य, स्वयंभू ना० व्यासाचे जे संपूर्ण चारही वेदांचें अध्ययन करणारे चार शिष्य, त्यांत समग्र यजुर्वेद पढलेला जो वैशंपायन ऋषि, त्याचा शिष्य होता. वैशंपायनानें, यजुर्वेदाच्या शायशीं शाखा करून, त्या प्रत्येकीचें अध्ययन एकेका ऋषीस तो पढवीत असतां, जिला प्रस्तुत तैत्तिरीय शाखा असें नांव चालत आहे, तिचें अध्ययन याकडून करवीत होता; अर्थात् ती शाखा हा पढत होता.

तैत्तिरीय शाखा, म्हणायास मात्र शाखा होय, परंतु ती केवळ समग्र यजुर्वेदाचीच प्रतिमा असून, तिची म्हणणी अत्यंत मनोहर असल्यामुळें, याज्ञवल्क्यासच ती पढविण्याचें कारण असें होतें कीं, याज्ञवल्क्य, एकतर वैशंपायन ऋषीचा भागिनेय ( भगिनीचा पुत्र, भाचा ) असून शिवाय तो आचारसंपन्नही उत्तम होता.

एकदां असें झालें कीं, महान् महान् सर्व ऋषि एकत्र जमण्याचें कांहीं कारण उपस्थित होऊन, त्यांनीं अमुकस्थळीं अमुक वेळेस सर्वांनीं जमावें, जो न येईल तो ब्रह्मघ्न, असा नियम ठरवून सर्वांस संदेश पाठविले. त्यावरून सर्व ऋषि नियमित स्थळीं, नियमित वेळेस जमले; त्यांत, वैशंपायनऋषीस पाचारण असतां, कांहीं कारणास्तव त्याचें त्या समाजांत जाणें झालें नाहीं; त्यामुळें त्यास, ती नियमोल्लंघनरूप ब्रह्महत्या झाली. तिची निवृत्ति करण्यास त्यानें आपल्या सर्व शिष्यांस आज्ञा केली. ती सर्वांनीं मानून, ते तिच्या निवृत्तीस लागले. त्याप्रमाणें याज्ञवल्क्यानेंही लागावें असें नीट असून, तो वैशंपायनास म्हणूं लागला कीं, आपल्या पातकाची निवृत्ति करण्यास, हे इतर शिष्य बाल म्हणून असमर्थ असल्यामुळें,मीच स्वतः एकटा त्याची निवृत्ति करितों; कारण, मी त्यांहून वयानें मोठा असून सदृढही आहे. हें याज्ञवल्क्याचें भाषण, जरी दयेनें युक्त होतें, तरी इतर ब्राह्मणांचा अपमान करणारें असें असल्यामुळें, वैशंपायनास त्याचा कोप आला, व त्यानें यास लागलीच पढलेली शाखा परत देण्याची आज्ञा केली. ती ऐकून याज्ञवल्क्य भयभीत होत्साता, प्रार्थना करून म्हणूं लागला कीं, हा माझा अपराध क्षमा व्हावा, इतःपर मी असें करणार नाहीं. परंतु वैशंपायनानें सांगितलें, जर मी आज हा तुझा अपराध क्षमा करीन, तर हे सर्व ब्राह्मण मला पक्षपाती म्हणतील; कारण मी तुझा मातुल ( मामा ) आहें, यास्तव आतां विशेष कांहीं न बोलतां, झालेल्या आज्ञेप्रमाणें अध्ययन परत देऊन चालता हो; नाहींतर शापून भस्म करीन. हीं शेवटलीं अक्षरें यानें ऐकून, यास पराकाष्ठेचें संकट झालें, व ब्राह्मणांचा अपमान करणारें भाषण आपण कोठून बोललों, त्याचा पश्चात्तापहि झाला; परंतु उपयोग काय ? म्हणून मग यानें निरुपाय होऊन, विद्या परत दिली. त्याच याज्ञवल्क्य शाखेस पुढें तैत्तिरीय शाखा असें नांव पडलें.

पुढें याज्ञवल्क्यानें विचार केला कीं, आतां अध्ययनाविषयीं कसें करावें, दुसऱ्या कोणापाशीं जाऊन अध्ययन करावें तर, वैशंपायनासारखा गुरु पृथिवीवर मिळणें दुर्लभ आहे. असें आपल्या मनाशीं मनन करून, इतःपर पृथिवीवरील गुरूच आतां करणें नाहीं, असें मनांत आणून, यानें सूर्याराधनपूर्वक तपास आरंभ केला. तपाच्या अंतीं यास सूर्य प्रसन्न होऊन, त्यापासून यास जी वेदशाखा प्राप्त झाली, ती वाजसनी अशा नांवानें सांप्रत प्रसिद्ध आहे. पूर्वीचें अध्ययन याज्ञवल्क्यानें वैशंपायनास परत दिलें, त्यांतील मुख्य अर्थ असा समजावा कीं, तें अध्ययन परत देतांच, त्याची याज्ञवल्क्यास विस्मृति झाली. सारांश, वेदसंपादन करून, शिवाय सूर्यापासून यानें ब्रह्मविद्याही संपादन केली, व पुढें पृथिवीवर येऊन, यानें कात्यायनी आणि मैत्रेयी अशा दोन स्त्रियांशीं क्रमानें विवाह करून गृहस्थधर्माचें आचरण करीत आपल्या आश्रमांत समाधानानें राहिला.

पुढें याज्ञवल्क्यानें, पढून आलेल्या शाखेचें अध्ययन शिकविण्याचा क्रम चालविला.

### श्लोक.

ततः शतपथं कृत्स्नं सरहस्यं ससंग्रहम् ॥
चक्रे सपरिशेषं च हर्षेण परमेण ह ॥ १६ ॥
कृत्वा चाध्ययनं तेषां शिष्याणां शतमुत्तमम् ॥
विप्रियार्थं सशिष्यस्य मातुलस्य महात्मनः ॥१७॥

( भार० शांति० अ० ३१८ ).

तें अध्ययन विलक्षण हस्तस्वरांनीं युक्त पाहून, जसें तीन वेदांच्या पैल आदिकरून ऋषींस अप्रिय झालें, तसेंच शिष्यांसहवर्तमान वैशंपायन जो याज्ञवल्क्याचा मातुल त्यासहि झालें. म्हणून वेदाध्ययनसंबंधानें याची तादृश जरी प्रतिष्ठा झाली नाहीं, तरी ब्रह्मविद्यासंबंधानें याची कीर्ति फार पसरून, ती विशेषेंकरून विदेहवंशीय देवरात जनकाचा पुत्र बृहद्रथ ना० साहवा जनक ज्यास दैवराति असें म्हणत, त्याच्या श्रवणारूढ झाली ( यावरून कृष्णद्वैपायन व्यासाचा शिष्य जो वैशंपायन, त्याचा शिष्य याज्ञवल्क्य नव्हे; कारण कृष्णद्वैपायनाच्या वेळेस मिथिला नगरींत बहुलाश्व जनक राज्य करीत असून तो विदेहवंशीय पन्नासावा जनक होता ).

दैवराति जनक मुमुक्षु होता, व त्यास पूर्ण ब्रह्मनिष्ठ असेल तो ओळखून त्याला शरण जावें अशी इच्छी होती; म्हणून त्यानें यज्ञाच्या निमित्तानें अनेक ऋषींस बोलाविलें, त्यांत याज्ञवल्क्यासही बोलाविलें. समाजांत आलेले ऋषि, आश्वलऋषि, जरत्कारुपुत्र **आर्तभाग** ऋषि, भुज्युऋषि, ज्यास लाह्यायनि म्हणत असत तो, चाक्रायणसंज्ञक **उषस्त** ऋषि तो, कौषीतकसंज्ञक **कहोड**ऋषि, आरुणिसंज्ञक **उद्दालक**ऋषि, आणि वाचक्नवीसंज्ञक महाब्रह्मनिष्ठ **गार्गी** ना० एक परमहंसिनी स्त्री. यांशिवाय विदग्धाख्यसंज्ञक **शाकल्य**ऋषि, इ० अनेक होते.

तदनंतर दैवराति जनकानें, सुवर्णाचीं शृंगें इ० कांनीं युक्त गायी सिद्ध करून सर्व ऋषींस म्हणाला कीं, जो तुमच्यामध्यें श्रेष्ठ ब्रह्मनिष्ठ असेल, त्यानें ह्या गायी न्याव्या. तें राजाचें भाषण ऐकून सर्व ऋषि जरी ब्रह्मविद्यासंपन्न होते, तरी ते आपआपल्या मनाशीं असें म्हणूं लागले कीं, जर आपण उठावें तर आपण मात्र श्रेष्ठ ब्रह्मनिष्ठ, अर्थात् इतर नाहींत असें होऊन, इतरांचा अपमान होईल, म्हणून त्या शंकेनें उठण्यास कोणाचेंही धैर्य होईना. तें पाहून याज्ञवल्क्यानें, आपल्या प्रोक्तकारी ना० शिष्यास आज्ञा केली कीं, अरे, ह्या गायी याज्ञवल्क्य ना० ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण नेत आहे, असें तूं मोठ्यानें बोलत घरीं घेऊन जा. त्याप्रमाणें त्यानें गायी नेतांच, त्या सभेंत मोठी गडबड झाली, व याज्ञवल्क्याशीं प्रत्येकाचा निरनिराळा वाद होऊन, त्या सर्वांस याज्ञवल्क्यानें पराजित केलें. त्यावरून इतर ऋषि उपरम पावले असतांही, विदग्धाख्यसंज्ञक शाकल्य ऋषीनें ( ऋग्वेदांतील शाकल्यशाखा प्रवर्तकानें ), याची अतिशय निंदा केली; त्यामुळें तो मरण पावून, सर्व ऋषि आपआपल्या आश्रमीं गेल्यावर, जनकानें यापासून ब्रह्मविद्या संपादन केली असतां, हाही आपल्या आश्रमास निघून गेला.

### श्लोक.

स एवमनुशास्तस्तु याज्ञवल्क्येन धीमता ॥
प्रीतिमानभवद्राजा मिथिलाधिपतिस्तदा ॥ ९४ ॥
गते मुनिवरे तस्मिन्कृते चापि प्रदक्षिणं ॥
दैवरातिर्नरपतिरासीनस्तत्र मोक्षवित् ॥ ९५ ॥

( भार० शांति० ).

याज्ञवल्क्य गृहस्थाश्रम करीत असतां मैत्रेयी म्हणून जी त्याची दुसरी स्त्री होती, ती यापासून ब्रह्मविद्या संपादून, उत्कृष्ट ब्रह्मनिष्ठ झाली. हिला संतति मुलींच झाली नाहीं; कात्यायनीस मात्र चंद्रकांत, महामेघ

आणि विजय, असे तीन पुत्र यापासून झाले होते असें दिसतें, व त्या तिघांचा, चौदा सहस्र शिष्यां-सहवर्तमान, महादिवाच्या शापेंकरून राक्षसयोनीस जाण्याजोगा परिणाम झाला होता ( १ चंद्रकांत श० पहा ). याज्ञवल्क्यास, त्याचा मातुल वैशंपायन त्यानें अगदीं तोडून टाकिल्यामुळें, इतःपर मातुलगोत्राशीं आपला शरीरसंबंध मुद्धां घडूं नये म्हणून, त्यानें केलेला नियम ( असेलसें वाटतें, ) अजून सर्व वाजसनीशाखीय पाळितात.

२–विश्वामित्राच्या पुत्रांतील एक ऋषि.

**याज्ञसेनी**–द्रौपदीस नामांतर.

**याज्ञेय**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**युक्त**–पांचवा रैवत मनु, त्याच्या पुत्रांत होऊन गेलेला एक.

**युगंधर**–भारती युद्धांत मरण पावलेला एक सात्यकिपुत्र. हा पांडवांकडे होता.

२–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**युगप**–प्रथमार्थक देवगंधर्वांतील एक.

**युधाजित्**–केकयदेशाचा राजा अश्वपति त्याचा पुत्र. दशरथस्त्री कैकेयी तिचा भ्राता. रामलक्ष्मणादिकांचे मिथिला नगरींत विवाहसमारंभ जाहले, त्या काळीं हा आला होता, व पुढें अयोध्येस गेल्यावर यानें, भरत आणि शत्रुघ्न या उभयतांस स्वदेशीं नेलें होतें ( वा० रा० बाल० स० ७७ ).

२–सूर्यवंशीय ध्रुवसंधिराजाची दुसरी स्त्री लीलावती, तिचा पिता तो. हा अवंती देशाचा राजा होता ( ८ सुदर्शन श० पहा ).

३–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतपुत्र वृष्णि, त्याच्या दोन पुत्रांतील दुसरा. यास शिनि आणि अनमित्र असे दोन पुत्र होते.

**युधामन्यु**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय पांचाल (भार० उद्यो० अ० १७० ). हा स्वतंत्र युद्ध करणारा असून, याच्या रथाचे अश्व सारंग्या रंगाचे असत ( भार० द्रोण० अ० २३ ).

तथापि पुढें युधिष्ठिराचें चक्ररक्षकत्व याजकडेस होतें, व हा, युद्ध समाप्त झाल्यावर रात्रौ शिबिरांत निद्रित असतां, अश्वत्थाम्याच्या हातून मरण पावला होता.

**युधिष्ठिर**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय कुरुराजाचा पुत्र जन्हु राजा, तदन्वयसंभूत पंडु राजापासून पृथा अ० कुंती, तिच्या ठायीं झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.हा यमधर्माच्या मंत्रप्रभावानें जन्मला होता म्हणून, धर्मराज अशा नांवानें प्रसिद्ध असे. याचा स्वभाव पापभीरु, दयालु आणि प्राणिमात्रांशीं मित्रत्वसंपादक, असा असल्यामुळें याचा द्वेष कोणीहि कधींच करीत नसत, आणि त्याच कारणास्तव याला अजातशत्रु असें सर्व म्हणत.

यानें, कांहीं कालपर्यंत कृपाचार्यासमीप धनुर्विद्येचा अभ्यास केला होता, तथापि भीष्मानें द्रोणाचार्यांस आश्रयास ठेविल्यावर, त्यापासून याची ती विद्या पूर्ण झाली, तरी याची ख्याति रथविद्येंत विशेष असे. तीशिवाय यानें बर्बर भाषेचाही चांगला अभ्यास केला होता.

पुढें पांडव थोर झाले, व त्यांचा द्वेष दुर्योधनादिक करूं लागले, असें धृतराष्ट्रानें पाहून, परस्परांचा कलह अधिक न वाढावा अशा हेतूनें, त्यानें यास बंधूंसहवर्तमान वारणावत नगरांत ठेवण्याचें मनांत आणून, तेथें जाऊन राहण्याची आज्ञा केली. तीप्रमाणें हा तेथें जाऊन राहिला, परंतु ज्या स्थलांत राहिला होता, तें दुर्योधनानें हा जाण्यापूर्वींच असें सिद्ध करून ठेविलें होतें कीं, त्यानें त्वरेनें अग्नि घ्यावा, व हा त्यांत, बंधूंसाहित सत्वर दग्ध व्हावा. हा दुर्योधनाचा दुष्ट विचार विदुरास कळला होता म्हणून, त्यानें पांडवांस पोहोंचविण्याच्या निमित्तानें यासमागमें जाऊन तो यास बर्बर भाषेनें कळविला. यावरून, विदुरहि बर्बर भाषा जाणत होता असें उघड होऊन, तशा प्रकारें कळविण्याचें कारण असें होतें कीं, भीमादिकांस तो विचार इतक्यांतच कळूं नये. सारांश, विदुरानें जें वृत्त यास कळविलें, त्याचें उत्तर यानें मी समजलों, अशा अर्थाचें बर्बर भाषेनेंच दिलें ( हें बर्बर भाषेंत झालेलें उभयतांचें भाषण, व्यासांनीं त्या भाषेच्याच शब्दांनीं भारतांत लिहिलें असतें, तर चांगलें झालें असतें; कारण, त्यावरून ती भाषा कोणती, तिचा निर्णय आज चांगला करावयास सांपडता.)

आपली माता व बंधु यांसहवर्तमान, हा लाक्षागृहांत राहिला असतां, याच्या संरक्षणार्थ दुर्योधनानें पुरोचन ना० यवनास ठेविल्याप्रमाणें, तो याचें मोठ्या सावधपणानें रक्षण करीत असे, व द्वार सोडून कोठेंहि जात नसे. याप्रमाणें बरेच मासपर्यंत चाललें असतां, पुढें यानें अरण्यांत मृगयेस जाण्याचा पाठ घातला. एकदां हा मृगयेस गेला असतां, लाक्षागृहांतून बंधूंसहवर्तमान हा, बाहेर सुरक्षित निघावा, म्हणून ज्या खनकाकडून ( विवर कोरणाराकडून ) विदुरानें विवर कोरविलें होतें, त्यास, युधिष्ठिरास त्यानें

भेदून, विवर कोरल्याचें वृत्त, व त्याचा मार्ग कोणत्या अरण्यांत जातो तें सर्व वर्तमान कळवावें अशी आज्ञा केली होती. तीप्रमाणें त्यानें यास भेटून तें वृत्त कळविल्यावर, मार्गाचें अभिज्ञान करून दिलें. नंतर तो जातांच हा वारणावतांत परत स्वमंदिरीं आला.

युधिष्ठिर लाक्षागृहांत राहत असतां, याचा अन्नादिदानाचा क्रम चालू असल्यामुळें, याच्या येथें सर्वांस अन्न प्राप्त होई, म्हणून ज्यास काठें अन्न मिळत नसे, तो येथेंच येऊन भोजन करून जाई. असें होतां होतां, एक्ये सायंकालीं कोणी निषादी (भिल्लीण), आपल्या पांच पुत्रांसहित येऊन अन्न मागूं लागली असतां, त्यानें तें तिला देववून मार्गस्थ केलें, व त्याच रात्रीस विदुराची सूचना यानें भीमास कळवून पुरोचन गाढ निद्रित झाल्यावर एकसमयावच्छेदेंकरून लाक्षागृहास त्याकडून चारी अंगांनीं अग्नि लाववून, विवरमार्गानें आपले सर्व भ्राते व माता यांसहवर्तमान हा त्यांतून निघून गेला. इकडे लाक्षागृह पेटल्यामुळें पांडवांची अवस्था कशी झाली असेल, या चिंतेनें नागरिक लोक धांवाधांव करूं लागले; परंतु अग्नि शांत करण्यास कांहीं उपाय चालेना असें पाहून, स्तब्ध बसले. इतक्यांत सूर्योदय झाला व पांडवांचा ठिकाण कोठें नाहीं असें पाहून त्यांनीं अनिवार शोक केला; तथापि कित्येकांस पांडव दग्ध झाले नसावेत असा संशय होता; परंतु अग्नि शांत झाल्यावर त्यांस सात प्रेतें दिसलीं; म्हणजे एक पुरोचन यवनाचें, व साहा, पांच पुत्रांसहित भिल्लिणीचें, याप्रमाणें पाहून पांडव दग्ध झाले असा त्यांचाही निश्चय झाला. सारांश, हें वर्तमान हस्तिनापुरांत कळल्यावर, दुर्योधनादिक दुष्टांस आनंद होऊन इतरांस पराकाष्ठेचा शोक झाला.

तिकडे विवरमार्गानें युधिष्ठिर निघून अरण्यांत सुखरूप प्रविष्ट झाल्यावर तसाच पुढें निघाला तो त्यास मार्गांत नदी लागली. तेथें त्यास पार उतरण्यासाठीं विदुरानें आधींच नौका सिद्ध करून ठेविली होती म्हणून, तींत बसून तो ती नदी उतरून पलीकडे निर्विघ्नपणानें गेला. पुढें जातां जातां याचें जाणें हिडिंब राक्षसाच्या अरण्यांत होऊन, तो राक्षस भीमानें मारिला, व त्याची भगिनी हिडिंबा होती तिशीं युधिष्ठिर व कुंती यांच्या आज्ञेनें त्याचा विवाह झाला ( हिडिंब श० पहा ). नंतर युधिष्ठिर, माता व बंधूंसहवर्तमान विप्रवेषानें एकचक्रा नगरीस गेला असतां, तेथें भीमाच्या हातून बकासुराचा वध झाला ( २ बकासुर श० पहा ). नंतर तेथून निघून हा द्रुपदपुरास गेला. तेथें अर्जुनानें द्रौपदीस वरिलें ( द्रुपद श० पहा ). द्रौपदीनें पांडवांस वरिलें असें ऐकून, धृतराष्ट्रानें यास, लोकलज्जेस्तव हस्तिनापुरास पुनः सन्मानानें आणवून अर्धराज्याचा विभाग दिला; व याला खांडवप्रस्थांत नगर वसवून तेथें राहण्याची आज्ञा केली. तीप्रमाणें हा तेथें जाऊन राहिला ( इंद्रप्रस्थ श० पहा ).

नंतर यानें तेथें राजसूयना० मोठा यज्ञ केला. त्या काळीं दुर्योधनादिक, यानें बोलाविल्यावरून तेथें सर्व आले होते, म्हणून त्यांस याचें सर्व ऐश्वर्य दृष्टीस पडलें; परंतु त्याच्या अवलोकनानें दुर्योधनास अधिक मत्सर उत्पन्न होऊन, त्यानें द्यूताभिषेंकरून याची सर्व संपत्ति हरण केली, व याजकडून द्रौपदीही पणास लाववून तिला जिंकलें ( द्रौपदी श० पहा ). पुढें द्रौपदी व पांडव यांस धृतराष्ट्रानें मुक्त केल्यावर दुर्योधनानें, यानें, बंधु व स्त्रीसहवर्तमान द्वादश वर्षेपर्यंत वनवास, आणि एक वर्षपावेतों अज्ञातवास करावा असें ठरवून व त्यांत उमगल्यास पुनः बारा वर्षें वनवास, अशा नियमानें अरण्यांत घालविलें. त्यावरून हा इतर स्त्रिया, मुलें व कुंती, यांची राहण्याची व्यवस्था विदुरास कशी करायाची ती सांगून अरण्यांत निघून गेला ( भार० सभा अ० ७८ ).

हा अरण्यवासास गेला असतां, यासमागमें धौम्य पुरोहित तर होताच, परंतु त्याशिवाय नागरिक ब्राह्मणांचा मोठा समुदाय निघाल्यामुळें, यानें त्यांस परत जाण्याविषयीं पुष्कळ विनविलें; परंतु कोणी ऐकेनात, त्यामुळें निरुपाय होऊन, सर्वांस समागमें घेतलें, व कांहीं काळपर्यंत आरंभीं द्वैतवनांत राहून नंतर काम्यक वनांत प्रवेशला ( भार० वन० अ० २-३ ).

युधिष्ठिर अशा मोठ्या समुदायासहित अरण्यांत राहून फलें, मूलें व मृगमांस, यांवर आपणासहित सर्वांचा निर्वाह करीत असतां, नवे नवे ब्राह्मण व ऋषि यासमीप येऊन राहूं लागले; त्यामुळें यास त्यांच्या निर्वाहाची मोठी काळजी उत्पन्न झाली; परंतु धौम्य ऋषीनें, याजकडून सूर्याराधन करवून, यथेच्छ अन्न उत्पन्न होण्याजोगी त्यापासून स्थाली प्राप्त करवून दिल्यामुळें, सहस्रावधि ब्राह्मणभोजन करून आनंदानें राहूं लागले, असें पाहून हा त्या काळजींतून मुक्त झाला. याप्रमाणें हा आनंदांत राहात असतां, एकदां बंधूंसहित यास, हा आश्रमाकडे जात आहे असें पाहून, किर्मीर राक्षसानें निरर्थक आडविलें. त्यावरून त्याशीं

भीमाचें युद्ध होऊन त्यांत त्यानें त्यास मारिलें ( किर्मीर श० पहा ). नंतर अल्पच काळानें अर्जुन, नवीं अस्त्रें संपादन करण्यासाठीं इंद्रकीलशिखरावर गेला असतां, संपूर्ण समुदायासहित युधिष्ठिर हा, काम्यक वन सोडून द्वैतवनांत प्रवेशला ( भार० वन अ० २३–२६ ). तेथें कांहीं काळ राहून पुनः काम्यक वनांत आला ( भार० वन० अ० ३६ ). आणि तेथेंच राहिला आहे तों, याकडेस लोमश ऋषि येऊन, त्यानें वनवासदुःखपरिहारार्थ यास नलोपाख्यान सांगितलें ( ५ नल श० पहा ).

पुढें याजकडेस बृहदश्व ऋषि आला ( ३ बृहदश्व श० पहा ). त्यानंतर पुलस्त्य ऋषीनें यास तीर्थयात्रांचें वर्णन सांगितलें ( भार० वन०अ०८२–८५). धौम्यानें सांगितलेलें तीर्थयात्रांचें वर्णन ( भार० वन० अ० ८६–९० ) यांत पहा. नंतर लोमशानें यास तीर्थयात्रा सांगितल्या, व करविल्या ( भार० वन० अ० ९१–९४ ).

पुढें मार्गानें अगस्त्योपाख्यान आणि त्यानें केलेला इल्वलवध ( भार० वन० अ० ९६–९९ ); वज्राची उत्पत्ति व वृत्रासुराचा वध ( वन०अ० १००–१०१); पुनः अगस्त्योपाख्यान ( वन० अ० १०३–१०५ ); ऋष्यशृंगोपाख्यान ( ऋष्यशृंग श० पहा ); याप्रमाणें कित्येक इतिहास ऐकून युधिष्ठिरास श्रवण झाल्यावर त्याचें महेंद्राचलावर गमन ( ३ महेंद्र श० पहा ). तेथें असतां यास जमदग्निवध व कार्तवीर्योपाख्यान सांगून जामदग्न्य रामाचें महत्त्व कथन केलें ( कार्तवीर्य आणि १ जमदग्नि श० पहा ). त्यानंतर यानें सुकन्योपाख्यान श्रवण केलें ( १ च्यवन श० पहा ). मांधातोपाख्यान तेंहि ऐकिलें ( मांधाता श० पहा ). त्यापुढें श्येनकपोतीय आख्यान ( भार० वन० अ० १३०–१३१ ). अष्टावक्राख्यान, यवक्रीताख्यान, श्रवण केलें, ते ते शब्द पहा. नंतर याचा कैलासगिरींत प्रवेश ( अ० १३९ ). पुढें गंधमादनशिखरीं प्रवेश ( अ० १४०–१४५ ). तेथून नरनारायणाश्रमीं प्रवेश ( वन० अ० १५६ ). त्याच प्रवासांत जटासुराचा भीमाच्या हातून वध ( जटासुर श० पहा ). नंतर तेथून याचा पुनः गंधमादनीं प्रवेश ( भार० वन० अ० १५८ ). पुढें अर्ष्टिषेण ऋषीशीं नाचा झालेला संवाद. त्यापुढें कुबेरसेनापति मणिमानाचा, भीमानें केलेला वध ( २ मणिमान् श०पहा). अजगरापासून भीमाची मुक्तता ( १ यामुनगिरि श० पहा ). नंतर यास मार्कंडेयाचें आगमन व त्याशीं संभाषण. त्यांत मार्कंडेयानें यास मत्स्योपाख्यान ( भार० वन० अ० १८७ ); मंडुकोपाख्यान ( अ० १९२ ); नहुषचरित्र ( अ० १९५ ); शिबिचरित्र ( ६ शिबि श० पहा ); इंद्रद्युम्नोपाख्यान(अ० १९९); धुंधुमार आख्यान ( कुवलाश्व श० ); पतिव्रताआख्यान ( अ० २०५–२०६ ); स्कंदोत्पत्ति व केशीपराभव ( वन० अ० २२३ ); महिषासुरवध ( अ० २३१ ) मुद्गलोपाख्यान ( २ मुद्गल श० पहा ); इ० अनेक इतिहास कथन केले.

नंतर दुर्योधनानें याचा छल करावा, यानिमित्त दुर्वासा ऋषीस याजकडेस पाठविलें; परंतु त्यांत याच्या सत्वास हानि न होतां तो तृप्त होऊन परत गेला ( २ दुर्वासा श० पहा ). त्यापुढें जयद्रथाचें त्याच्याच कर्मानें निग्रह व मोचन ( ३ जयद्रथ श० पहा ). तदनंतर यानें रामचरित्र श्रवण करून (भार० वन० अ० २७३–२९१ ) सावित्रीआख्यानही श्रवण केलें ( ४ सावित्री श० पहा ).

याप्रमाणें यानें अनेक इतिहास श्रवण केल्यावर, ते ते ऋषि स्वकीयाश्रमास निघून गेले असतां, बंधूसहित हा अरण्यांत स्वस्थ आहे तों, एकदां असें झालें कीं, कोणी एका ब्राह्मणाच्या अरणि ( अग्निहोत्रांतील अग्नि उत्पन्न करण्याचीं काष्ठें ) कोणी हरण केल्या म्हणून तो ब्राह्मण याजकडेस आला, व अरणि आणून दे म्हणून म्हणूं लागला. त्यावरून यानें त्यास आश्वासन देऊन, भीमास त्याच्या गेलेल्या अरणि आणून देण्याची आज्ञा केली. तीवरून अरणि नेणाराचा शोध भीम करीत चालला आहे तों तृषेनें व्याकुळ होऊन आसमंतात् उदक पाहात असतां एक सरोवर त्याच्या दृष्टीस पडलें, म्हणून तेथें गेला, व हस्तपाद प्रक्षालन करून आतां जल प्राशन करणार इतक्यांत, तेथील समीपच्या वृक्षावर कोणी यक्ष होता, त्यानें भीमास हांक मारून म्हटलें कीं, माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दिल्याशिवाय तूं जलपान करूं नको, आणि इतक्यावर करशील तर मरशील. परंतु तृषा अतिशय लागली होती म्हणून, भीम त्याचें भाषण न ऐकतां, जलप्राशन करी असतांअसतांच निचेष्ट पडला. त्यास यावयास विलंब लागला असें युधिष्ठिरानें पाहून, त्याच्या शोधास अर्जुनास, व तोही लवकर येईना म्हणून, त्याच्या शोधास क्रमानें नकुळ व सहदेव यांस पाठविलें; परंतु त्या तिघांची भीमाप्रमाणेंच अवस्था झाल्यामुळें, त्यांचेंही येणें सत्वर होईना असें पाहून, स्वतः हा त्यांचा शोध करीत चालला. जातां जातां

तेंच सरोवर याच्याही दृष्टीस पडलें, म्हणून त्यासमीप गेला, आणि पाहतो तों चौघेही भ्राते निचेष्ट पडले आहेत. तेव्हां असें कां झालें असावें म्हणून यास चिंता झाली; परंतु जलप्राशन करून याचा विचार पाहूं असें यानें मनांत आणून, जल हातांत घेत आहे तों, वृक्षावरून पूर्ववत्च यक्षाचा शब्द झाला. त्यावरून यानें यक्षास म्हटलें, तुझे काय प्रश्न आहेत ते बोल, मी यथामतीनें त्यांचीं उत्तरें देतों. असें म्हणून यक्षानें जेवढे प्रश्न केले, त्या सर्वांचीं उत्तरें यानें जशीं द्यावयाचीं तशींच दिलीं ( भार० वन० अ० ३११-३१३ ).

यानें दिलेलीं उत्तरें यक्षानें श्रवण करून, त्यास संतोष झाला. व त्यानें आपलें रूप प्रकट केलें, आणि यास म्हटलें, युधिष्ठिरा, यमधर्म ज्यास म्हणतात तो मीच होय. ब्राह्मणाच्या अरणि हरण करून, तुशीं संभाषण व्हावें या हेतूनें मीच तुझ्या भ्रात्यांची अशी अवस्था केली, तर आतां सांग कीं, या चौघांतून मी कोणास सजीव करावें ? तें ऐकून यास पराकाष्ठेचें वाईट वाटलें. तथापि होत आहे यांतच निर्लोभपणानें न्याय्य तेंच बोलावें असें यानें मनांत आणून, यमधर्मास म्हटलें कीं, माझ्या पित्यास कुंती व माद्री अशा स्त्रिया दोन, म्हणून त्यांत कुंतीचा ज्येष्ठ पुत्र जसा मी विद्यमान आहें, तसाच माद्रीच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ जो हा नकुल तो सजीव व्हावा. तें याचें भाषण ऐकून, याचें अंतःकरण परम थोर खरें, असें पाहून यमधर्मास पराकाष्ठेचा आनंद झाला, व त्यावरून त्यानें ब्राह्मणाच्या अरणि यास देऊन, याचे चौघेही भ्राते सजीव करून तो अंतर्धान पावला. नंतर यानें चौघांही भ्रात्यांसहित हर्षानें आश्रमांत येऊन, ब्राह्मणास त्याच्या अरणि देऊन सन्मानपुरःसर मार्गस्थ केलें ( भार० वन० अ० ३१४ ).

पुढें वनवासाचीं द्वादशवर्षे पूर्ण झालीं असें यानें पाहून धौम्यपुरोहिताच्या अनुमतानें, पूर्व मत्स्यदेशीं विराटराजाच्या नगरींत अज्ञातवासार्थ जाण्याचा विचार केला ( भार० वन० अ० ३१५ ), व तेथें यानें कंक असें नामधारण करून वास्तव्य केलें (कंक श० पहा ). अज्ञातवास सरतांच हा, बंधूंसहवर्तमान प्रकट होऊन उपप्लव्य नगरांत राहिला, आणि दुर्योधनाकडे राज्याचा अर्धभाग द्यावा, असें बोलणें करण्याकरितां प्रथम यानें द्रुपदराजाच्या पुरोहितास हस्तिनापुरीं पाठविलें. तो जाऊन परत आल्यावर लागलेंच धृतराष्ट्रानें याजकडेस अन्याय्य निरोप सांगून संजयास पाठविलें असतां, यास अतिशय आश्चर्य व खेद उत्पन्न झाला ( ५ धृतराष्ट्र श० पहा ). नंतर कृष्णास साम करण्यास पाठविलें; परंतु त्यानें जातांना यास असें सांगितलें कीं, मी जातों व साम झाल्यास पाहतों, तथापि तूं युद्धाची सिद्धता करच, आळस अगदीं करूं नको ( भार० उद्योग० अ० ७२-७३). इतकें यास बोलून त्यानें भीमादिकांचीं अनुमतें घेतलीं, व हस्तिनापुरास गेला. नंतर तेथें त्यानें बहुतांप्रकारें धृतराष्ट्र व दुर्योधन त्यांस बोध केला; परंतु त्यापासून कांहीं निष्पन्न न होतां, युद्धावर परिणाम येऊन त्यास माघारेंच यावें लागलें (४ कृष्ण श० पहा ).

इकडे कृष्णानें जातांना सांगितल्याप्रमाणें अनेक राजांस बोलावणीं पाठवून, युधिष्ठिरानें युद्धाची सिद्धता केलीच होती; तथापि कृष्ण परत येतांच, व त्यानें दुर्योधन सेना सिद्ध करून कुरुक्षेत्रीं आल्याचें सांगतांच, हाही सैन्यांसहित कुरुक्षेत्रीं गेला ( भार० उद्योग० अ० १५१ ). त्याच अवकाशांत शल्य राजा याजकडेस येण्यास निघालेला, त्यास दुर्योधनानें मधल्यामधेंच आपणाकडे नेलें, त्यामुळें तो यास भेटून, पुनः परत दुर्योधनाकडे गेला ( शल्य श० पहा ).

युधिष्ठिर आपल्या हातांत माहेंद्र ना० धनुष्य वागवी. युद्धकाळीं त्याचा वाजविण्याचा शंख अनंतविजय ना० असून, रथास अश्व हस्तिदंती रंगाचे असत, व त्याच्यावर ध्वजस्थानीं सुवर्णाचा चंद्र आणि नक्षत्रगण यांचें चिन्ह असे. ज्या काळीं युद्धास आरंभ व्हावयाचा, त्या काळीं हा अश्वावर आरूढ होऊन, उभयसैन्यांच्या मध्यभागीं गेला, व प्रथम शंखनादानें सर्वांस सावध करून, नंतर मोठ्यानें असें बोलला कीं, कौरवांकडील ज्या योद्धयांस माझ्या पक्षाकडे येणें असेल, त्यांनीं अजून यावें, मी त्यांचा अंगीकार करीन. त्यावरून धृतराष्ट्राचा दासीपुत्र युयुत्सु, तो आपल्या सेनेसहित याकडेस आला ( भार० भीष्म० अ०४३). नंतर यानें आपल्या सेनेचें आधिपत्य धृष्टद्युम्नास देऊन, कौरवांचा सेनापति भीष्म, युद्धास येऊन त्यानें त्यास आरंभ करतांच, यानेंही आरंभ करविला.

भीष्मानें दहा दिवसपर्यंत मोठ्या नीतीनें युद्ध करून, तो शरपंजरीं पडला असतां, द्रोणाचार्याचें पंचदिनात्मक मोठें प्रखर युद्ध झालें. त्यांत अर्जुन संशप्तकांकडे गेल्यामुळें अभिमन्यूचा वध झाला ( २ अभिमन्यु श० पहा ). त्यावरून, यानें पराकाष्ठेचा

शोक केला, व आतां आम्हांस राज्य घेऊन काय कर्तव्य आहे असें म्हणून रुदन आरंभिलें. हें जाणून तेथें व्यास ( कृष्णद्वैपायन ) प्रकट झाले, व त्यांनीं याच्या शोकनिवारणार्थ, **अकंपन** राजाचा इतिहास ( १ अकंपन श० पहा ). **सुहोत्र** राजाचा इतिहास, **पौरव** राजा, **औशीनर शिबि**, **दाशरथि राम**, **भगीरथ**, **एलाविल दिलीप**, **मांधाता**, **ययाति**, **अंबरीष**, **शशबिंदु**, **गय**, **रंतिदेव**, **भरत**, **पृथु** आणि **जामदग्न्य राम**, या सर्वांचे क्रमानेंच एकेक अध्यायानें इतिहास सांगून म्हटलें कीं, असे असे मोठे पराक्रमी असतां, त्यांसही अनिवार दुःखें सोसावीं लागून, शेवटीं मृत्यूसही पात्र व्हावें लागलें; म्हणून मृत्यु अनिवार्य आहे असें जाणून, तूं अभिमन्यु-विषयीं शोक करूं नयेस असें बोलून अंतर्धान पावले ( भार० द्रोण० अ० ५६–७० ). व्यासांनीं सांगितलेल्या या इतिहासास भारतामध्यें षोडशराजिकाख्यान असें म्हटलें आहे.

द्रोणाचार्य मरण पावल्यावर, द्विदिनात्मक असें कर्णाचें युद्ध प्रवृत्त झालें. त्यांत कर्णापासून यास बरीच पीडा होऊन, हा शिबिरांत गेला असतां, कृष्णार्जुनांस रणांत न दिसल्यामुळें, ते याचा शोध करीत शिबिरांत आले. त्यावरून ते कर्णास मारून आले असें यास वाटून यानें अर्जुनाची इतकी प्रशंसा केली कीं, तिचें त्यास अतिशय आश्चर्य वाटलें. शेवटीं अर्जुनानें सांगितलें कीं, तूं रणांत कोठें दिसेनास, म्हणून तुला पाहण्यासाठीं आधीं इकडे आलों, अजून कर्णास मारिलें नाहीं. आतां येथून जाऊन मारणार ( भार० कर्ण० अ० ६६–६७ ). त्यावरून यानें अर्जुनाची अतिशय निर्भर्त्सना केली, ती अशी कीं, तूं मातेच्या उदरांतून पतन पावतास तर बरें होतें. अरे, तुझ्यानें अजून कर्णास मारवेना, तस्मात् तुला धिक्कार असो. हें गांडीव धनुष्य व्यर्थ कशास वागवितोस ? कोणाला देऊन कां टाकिनास. इत्यादि भाषणांनीं हा अर्जुनास ताडन करीत असतां, त्यास त्यांचा विशेष कोप आला नाहीं, ' परंतु गांडीव धनुष्य देऊन टाक ' या भाषणानें त्याला इतका कोप आला कीं, तो खड्ग उपसून यास मारण्यास धांवला; कारण, गांडीव धनुष्याची निंदा करणाराचा शिरच्छेद करण्याची त्याची प्रतिज्ञा होती. तें पाहून कृष्णानें यास धरिलें, व अधर्मांत धर्म कसा घडून धर्मांत अधर्म कसा घडतो, त्याविषयीं बलाक ना० व्याधाचा एक, आणि कौशिक ब्राह्मणाचा एक, मिळून दोन इतिहास सांगून त्याचें सांत्वन केलें ( २ बलाक, व २ कौशिक श० पहा ). नंतर कृष्णानें युधिष्ठिरावांचून अर्जुनाचीहि प्रतिज्ञा सिद्ध होण्यासाठीं त्यांस असें सांगितलें कीं, तूं कठोर शब्दांनीं युधिष्ठिरास ताडन कर म्हणजे झालें. त्यावरून अर्जुनानें तसेंच करून, लागलीच त्याची क्षमाहि मागितली, आणि त्याचा आशीर्वाद घेऊन, कर्णावर गेला व त्यास मारून यास तें वृत्त येऊन कळविलें, त्यावरून याचा संतोष जाहला ( १ कर्ण० श० पहा).

कर्ण मरण पावल्यावर युद्धाच्या अठराव्या दिवशीं, दुर्योधनानें शल्यास सैनापत्य दिलें असतां, त्यानें मोठ्या निकराचें युद्ध केलें; त्यांत याशीं त्याचा संग्राम झाला, व त्यास शेवटीं यानें मारिलें. त्याच दिवशीं अस्तमानीं दुर्योधन मरण पावून भारती युद्धाची समाप्ति झाली. नंतर यानें रणांत मरण पावलेले जे दुर्योधनादिक भ्राते आदिकरून वीर, त्या सर्वांचीं उत्तर कार्यें केलीं असतां, यास राज्याभिषेक झाला. परंतु ज्ञातिवधाचें पाप मला झालेलें कसें जाईल, त्याची यास मोठी चिंता झाली. तीविषयीं कृष्णानें यास बहुत बोध केला, परंतु याचें समाधान होईना. त्यावरून त्यानें यास भीष्माकडे नेलें, व त्याकडून याचें समाधान करविलें. भीष्मानें अनुशासनपर्व व शांतिपर्व यांच्या द्वारां यास अनेक इतिहास असे कथन केले कीं, जेणेंकरून वर्णाश्रम व त्यांचीं कर्में त्यांचा यास उत्तम बोध होईल, त्या सर्वांचा येथें संग्रह करितां येत नाहीं; तथापि सर्वांचें मूळ वर्णाश्रमविभाग व त्यांचे धर्म त्यांविषयीं भीष्मानें याला असें सांगितलेलें आहे.

**श्लोक.**

न विशेषोस्ति वर्णानां सर्वं ब्राह्ममिदं जगत् ॥
ब्रह्मणा पूर्वसृष्टं हि कर्मभिर्वर्णतां गतं ॥ १० ॥
कामभोगप्रियास्तीक्ष्णाः क्रोधनाः प्रियसाहसाः ॥
त्यक्तस्वधर्मा रक्तांगास्ते द्विजाः क्षत्रतांगताः ॥ ११ ॥
गोभ्यो वृत्तिं समास्थाय पीताः कृष्युपजीविनः ॥
स्वधर्मान्नानु तिष्ठंति ते द्विजा वैश्यतां गताः ॥ १२ ॥
हिंसानृतप्रिया लुब्धाः सर्वकर्मोपजीविनः ॥
कृष्णाः शौचपरिभ्रष्टास्ते द्विजाः शूद्रतां गताः ॥ १३॥
( भार० शांति० अ० १८८ ).

म्हणजे प्रथमारंभीं ब्रह्मदेवानें सर्व जगांतील मनुष्यें ब्राह्मणच उत्पन्न केलीं होतीं, परंतु तीं पुढें भिन्न भिन्न कर्मांनीं ( आचरणांनीं ) क्षत्रिय, वैश्य, व शूद्र, अशा नांवांस पावलीं. अशा प्रकारेंकरून हें आलेलें

क्षत्रियादिकत्व, त्यास पुनः ब्राह्मणत्व केव्हां येईल असें पुसशील तर, सांगतों ऐक.

**श्लोक.**

ब्राह्मण्यं तात दुष्प्राप्यं वर्णैः क्षत्रादिभिस्त्रिभिः ।।
परं हि सर्वभूतानां स्थानमेतद्युधिष्ठिर ।। ५ ।।
बव्हीस्तु संसरन् योनीर्जायमानः पुनः पुनः ।।
पर्याये तात कस्मिंश्चिद्ब्राह्मणो नाम जायते ।। ६ ।।
( भार० अनु० अ० २७ ).

तर मग, विश्वामित्र, वीतहव्य, इत्यादिकांस त्याच जन्मांत ब्राह्मण्य कसें प्राप्त झालें, अशी शंका असतां, तिचें उत्तर असें आहे कीं, क्षत्रियांस ब्राह्मण्य तपेंकरून त्वरित येतें असें बहुत उदाहरणावरून दिसतें; शूद्र, व त्यांच्या पलीकडील वर्णांस ब्राह्मण्य जन्मांतरावांचून अप्राप्य, असा श्लोकांतील भाव आहे; व त्याविषयीं भीष्मानेंच मतंगाचा इतिहास युधिष्ठिरास सांगितल्याचें प्रमाणहि आहे ( २ मतंग श० पहा ).

पुढें उत्तरायण लागून भीष्माचें निधन झालें असतां, युधिष्ठिरानें अश्वमेध आरंभिला. त्यांत यानें व्यासास ( कृष्णद्वैपायनास ) मुख्य आचार्यत्व देऊन, बकदाल्भ्य ऋषीस ब्रह्मा केलें होतें. आणि वामदेव, वसिष्ठ, गौतम, अत्रि, पराशर, भारद्वाज, जामदग्न्य, कहोड, भागुरि, रैभ्य, सुमंतु, कौंडिन्य, जातूकर्ण्य, गालव, सौभरि आणि लोमश. हे सोळा ब्राह्मण ऋत्विज करून विश्वामित्र, पुलह, धौम्य, आरुणि, उपमन्यु, वायुभक्ष, मधुच्छंदा आणि विभांडक, या आठांस यज्ञांतील द्वारपालत्व दिलें होतें. यज्ञाकरितां युधिष्ठिरास स्नान घालण्यासाठीं, कित्येक ब्रह्मर्षि व राजर्षि यांच्या चौसष्ट दंपत्यांनीं जान्हवीजलाचे सुवर्णकलश भरून आणिले. स्नानोत्तर यज्ञास आरंभ होतांच, त्यांत देवांनीं आपआपले हविर्भाग ग्रहण केले. अन्नदान व दक्षिणा यथेच्छ सर्वांस पोहोंचून यज्ञ समाप्त झाला असतां, चमत्कार झाला. तो असा—पूर्वी कोणी एका ब्राह्मणानें अन्नदान करून तन्निमित्त सोडलेल्या दानोदकांत लोळल्यानें ज्याचें अर्धांग सुवर्णाचें झालेलें असा नकुल ( मुंगूस ) तेथें प्रकट झाला, व युधिष्ठिरास म्हणूं लागला कीं, तुझ्या यज्ञांत राहिलेलें अर्धांग सुवर्णाचें होईल या आशेनें येथें आलों होतों, परंतु तें कांहीं झालें नाहीं. तें ऐकून यास, मी यज्ञकर्ता असा झालेला जो अभिमान, तो दूर होऊन याच्या अंगीं निराभिमानता येतांच, तो नकुल संपूर्ण सुवर्णाचा होऊन अदृश्य झाला. हा नकुल क्रोध होय (१ क्रोध श० पहा).

युधिष्ठिर राज्य करीत असतां, युवराजा भीमसेन असून, सेनापति अर्जुन होता. यानें सर्वत्र यथायुक्त धर्मस्थापना करून पस्तीस वर्षेपर्यंत मोठ्या नीतीनें राज्य केलें, व छत्तिसाव्या वर्षी कृष्णनिधन झालेलें श्रवण करून, हस्तिनापुरींच्या राज्यावर अर्जुनाचा पौत्र ( नातू ) परीक्षित् राजा यास स्थापून चौघे भ्राते व द्रौपदी यांसहवर्तमान हिमालयाकडे गेला व उत्तम लोकास प्राप्त झाला.

युधिष्ठिराचा स्वभाव कसा होता, त्याविषयीं आरंभीं सांगितलेंच आहे, म्हणून आतां पुनः सांगणें नको. याच्या आकृति इ० कांविषयीं असें लिहिलें आहे.

**श्लोक.**

य एष जांबूनदशुद्धगौरस्तनुर्महासिंहइव प्रवृद्धः ।।
प्रचंडघोणः पृथुदीर्घनेत्रस्ताम्रायताक्षः कुरुराज एषः।।५।।
( भार० आश्रमवासी० अ० २५ ). म्हणजे हा शरीरानें कांहींसा कृश असून, सुवर्णाप्रमाणें गौरवर्ण होता. नाक मोठें, व नेत्र विशाल असून ते आरक्त असे असत. यास दुर्गुण काय तो येवढाच होता कीं, हा द्यूतप्रिय असून तें खेळण्यास कोणी बोलाविलें कीं, मग हा नाहीं असें कधींच म्हणत नसे. त्यामुळें याच्या भ्रात्यांस पुष्कळच कष्ट सोसावे लागून, यासही त्यापासून अत्यंत कष्ट झाले. तथापि अवांतर गुणांनीं हा चांगला असल्यामुळें यास राज्य प्राप्त होऊन, भ्रात्यांसहित यास व सर्व प्रजेस मोठें सुख झालें.

**युद्धोन्मत्त**—लंकेंतील एक राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

३—महोदरासही हें नामांतर.

**युयुत्सु**—धृतराष्ट्राचा दासीपुत्र. हा शूर व महारथी होता. परंतु युद्धप्रसंगीं पांडवांकडे जाऊन मिळाल्यामुळें युद्धांत वांचला असतांही, याचें नांव कोणत्याच पक्षांत व्यासांनीं लिहिलें नाहीं.

**युयुधा**—( विदे० वं० ) वस्वनंत ना० जनकाचा पुत्र. याचा पुत्र सुभाषण जनक.

**युयुधान**—(सो० वं०) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय ज्यामघकुलोत्पन्न क्रथराजा, तदन्वयसंभूत सात्वतपुत्र वृष्णि, त्याचा वंशज अनमित्रपुत्र शिनि, त्याचा पौत्र व सत्यकाचा पुत्र जो सात्यकि त्यासच हें नाम होतें. यास शैनेय असेंहि भारतांत म्हटलेलें आढळतें. हा यक्षांशानें जन्मला होता ( भार० वन० अ० १३ ). यानें धनुर्विद्या अर्जुनापासून संपादिली होती. युद्धकाळीं याच्या रथाचे अश्व रुपेरी रंगाचे असत, असें

वर्णन आहे ( भार० द्रोण० अ० २३ ). कृष्ण साम करण्यास हस्तिनापुरीं गेला असतां, हा समागमें होता ( भार० उद्योग० अ० ८१-८३). याचें एकदां द्रोणाचार्याशीं असें विलक्षण युद्ध झालें होतें कीं, आचार्याच्या हस्तांतील धनुष्यें, कांहीं अवकाशावांचून एकामागें एक यानें शंभर तोडलीं. त्यावरून त्याच्या हस्तचापल्यास त्यानेंहि मान डोलविली होती (भार० द्रोण० अ० ९८ ).

द्रोणाचार्यानें केलेल्या व्यूहांत जयद्रथवधासाठीं कृष्णार्जुन गेले असतां, त्यांच्या साह्यासाठीं युधिष्ठिरानें यास पाठविलें होतें. तेव्हां व्यूहाचा भेद करून हा आंत आला असें पाहून, कौरवसैन्य यावर धांवलें, त्या काळीं यानें सर्वांचें निवारण करून, आठ सहस्र सातशें पांसष्ट यवनांचे वीर मारिले व कृष्णार्जुनांस जाऊन गांठिलें ( भार० द्रोण० अ० ११९ ). यास जय, कुणि, युगंधर, यौयुधान, इ० दहा पुत्र होते, व ते सर्व भूरिश्रव्यानें मारून, यासहि तो मारीत होता, परंतु त्यापासून यास अर्जुनानें सोडविलें होतें.

हा भारती युद्धांत वांचून नंतर पुष्कळ दिवस होता. पुढें जेव्हां सर्व यादव मरण पावले, तेव्हां यानें कृतवर्म्यास मारिलें असतां, त्याच्या पक्षपात्यांनीं उच्छिष्ट पानपात्रांनीं याचाहि प्राण घेतला ( भार० मौसल० अ० ३ ).

**युवनाश्व**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

२-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न इंदु राजाचा पुत्र. याचा पुत्र शावस्त राजा.

३-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न प्रसन्न अ० श्येनजित् राजाचा पुत्र. यास सौद्युम्नि असें म्हणत असत ( भार० वन० अ० १२६ ). यास शतस्त्रिया असून संतति नव्हती, म्हणून यानें अनेक यज्ञ केले; तथापि ती होईना, त्यामुळें हा उदास होऊन अरण्यांत फिरत असतां, याच्याच उदरांत गर्भ राहून यास मांधाता ना० पुत्र झाला होता ( १ मांधाता श० पहा ).

**यूथप**-धूम्रपराशरकुलोत्पन्न ऋषि.

**यूपकेतु**-सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न शत्रुघाती राजास नामांतर.

२- ( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न जन्हु राजा, तद्वंशीय प्रतीपपुत्र बाल्हिक, त्याच्या सोमदत्त ना० पुत्राच्या पुत्रांतील एक. हा भारती युद्धांत दुर्योधनाचा पक्ष धरून मरण पावला ( भार० द्रोण० अ० २५ ).

**यूपध्वज**-भारती युद्धांतील एक राजा ( भार० स्त्रीपर्व. अ० २४ ).

**यूपाक्ष**-मारुतीनें मारिलेला रावणसेनापति एक राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ४६ ).

२-मैंद वानरानें मारिलेला दुसरा एक राक्षस (वा० रा० युद्ध०स० ७५-७६ ).

**योग**-स्वायंभुव मन्वंतरांतील धर्म ऋषीस क्रियेच्या ठायीं झालेला पुत्र.

**योगकुंडलिनी**-मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**योगचूडामणि**-सामवेदोपनिषत्.

**योगतत्त्व**-मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**योगशिखा** ,, ,,

**योगेश्वर**-देवसावर्णि मन्वंतरांत होणारा विष्णूचा अवतार.

**योजनगंधा**-सत्यवतीस पराशरप्रसादानें प्राप्त झालेलें नांव.

**योधयान**-एक ब्रह्मर्षि ( कश्यप श० पहा ).

**यौयुधान-धानि**-युयुधान अ० सात्यकीचा पुत्र. हा युद्धांत वांचला होता, व यास युधिष्ठिरानें महाप्रस्थानास जातेसमयीं सरस्वतीतीरीं स्थापिलें होतें ( भार० मौसल० अ० ७ ).

**यौवनाश्व**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न युवनाश्व राजाचा पुत्र मांधाता तो ( भार० शांति० अ०२९).

२-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न मांधाता राजाचा पौत्र अंबरीष अ० धर्मसेन राजाचा पुत्र. याचा पुत्र हारीत राजा.

३-हस्तिनापुराच्या पूर्वभागीं असणाऱ्या भद्रावती नगरीचा राजा. ही भद्रावती कोणत्या देशाची राजधानी तें ग्रंथांत आढळत नाहीं, व भीमसेनानें राजसूययज्ञकाळीं केलेल्या दिग्विजयांतहि हिचें नांव नाहीं. हा मोठा पराक्रमी असून, याचा भ्राता सुदेव तोहि तसाच होता. या राजास प्रभावती ना० स्त्री होती, व पुत्र सुवेग नांवाचा होता.या राजाजवळ एक श्यामकर्ण अश्व असे, व हा त्याचें दहा अक्षौहिणी सैन्यानें संरक्षण करी.पांडवांनीं ज्या काळीं अश्वमेधाचा निश्चय केला, त्या काळीं त्यांस श्यामकर्ण अश्व कोठें मिळेल त्याची चिंता पडली.इतक्यांत व्यास प्रकट होऊन त्यांनीं यौवनाश्वाजवळ श्यामकर्ण अश्व असल्याचें सुचविलें. त्यावरून कृष्णाचें अनुमोदन घेऊन, वृषकेतु आणि मेघवर्ण यांसहित भीमसेन भद्रावतीस गेला.

तेथें भीमसेन गेल्यावर त्यानें, अश्व कोठें बांधिला असतो त्याचा शोध चालविला. इतक्यांत त्या दिवशीं अश्वास राजाज्ञेवरून बाहेर काढून नदीतीरीं आणीत आहेत असें त्यानें श्रवण केलें. त्यावरून तो वृषकेतु

व मेघवर्ण यांसहित एका उंच टेकडीवर उभा राहिला व अश्व कसा आणावा त्याविषयीं विचार करूं लागला. तेव्हां मेघवर्ण म्हणाला, अश्वास मी घेऊन येतों, असें बोलून त्यानें आपल्या राक्षसी मायेनें तेथें जाऊन अश्वास उचलिलें,व आकाशमार्गानें भीमासमीप त्यास घेऊन आला.

अश्व एकाएकीं गेलेला पाहून, त्याचें रक्षण करीत असलेल्या सैन्यांत मोठी गडबड झाली, व तें वृत्त लागलेंच यौवनाश्वास कळलें. त्यावरून तो सेना सिद्ध करून येतांच भीमसेन व वृषकेतु, मेघवर्णास अश्वाजवळ ठेवून उभयतां यांच्यावर चालून आले. त्यांत यौवनाश्वाचा उभयतांनीं पराभव करून सैन्यहि बरेंच मारिलें. तेव्हां यौवनाश्वानें तुम्ही कोण, व अश्व कायनिमित्त नेलात इ० पुसलें असतां, त्यांनीं युधिष्ठिराच्या यज्ञास अश्व पाहिजे म्हणून सांगितलें. त्यावरून यास आनंद होऊन, यानें त्रिवर्गांचा सत्कार केला, व पांच दिवस भद्रावतींत ठेवून घेऊन त्यासमागमें स्त्रियापुत्रांसहित अपार धन घेऊन, हस्तिनापुरास श्यामकर्ण अश्व घेऊन आला. हें पाहून युधिष्ठिरानहि याचा सत्कार करून आपणासमीप हर्षानें ठेवून घेतलं ( जैमिनि अश्व० अ० १–७ ).

---

# र

**रक्तबीज**–कोणी एक असुर. यानें दीर्घकालपर्यंत उग्र तप करून रुद्रास प्रसन्न केलें, व असा वर संपादन केला कीं, माझें रक्त पृथिवीवर पडलें असतां, प्रत्येक बिंदूपासून मतुल्यपराक्रमी असा असुर निर्माण व्हावा. त्यावरून शुंभनिशुंभवधकाळीं हा त्यास मिळाला असतां, याच्या रक्तापासून असंख्य राक्षस निर्माण होऊन युद्ध करूं लागले असें पाहून, कालिकेनें विक्राळ रूप धरिलें व याचा रक्तबिंदु भूमीवर न पडूं देतां याचा वध केला ( देवी भा० ५ स्कं०अ०२७–२९).

**रघु**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ऐलविल दिलीपाचा पौत्र, व दीर्घबाहु राजाचा पुत्र. हा सूर्यवंशांत इतका प्रख्यात होऊन गेला कीं, सूर्यवंश हें नांव बरेंच मागें पडून रघुवंश असें नांव चालू झालें. यानें दीर्घकालपर्यंत निष्कंटक राज्य केलें, व यास अज या नांवाना प्रसिद्ध असा एक पुत्र होता.

**रघुनंदन–रघुनाथ**–रघुकुलांत जन्मलेला जो दाशरथि राम, त्यास या नांवांनीं म्हणण्याची रूढि.

**रचना** एक दैत्यकन्या त्वष्टा नां० प्रजापतीची स्त्री.

**रजनी**–शाल्मलि द्वीपांतील नदी.

**रजी**–( सो० वं० ) पुरूरवा राजाचा पौत्र. आयुराजाच्या पांच पुत्रांतील तिसरा. नहुष राजाच्या कनिष्ठ भ्रात्यांतील एक. हा मोठा पराक्रमी असून यास पुत्र पांचशें असत. देवदैत्यांचें युद्ध होत असतां, इंद्रानें यास साह्यास बोलाविलें होतें. त्या वेळेस यानें, दैत्यांचा पराभव करून देवांस जय संपादन करून दिला. त्यावरून इंद्र, कृतज्ञपणानें यास म्हणूं लागला कीं, तुझें आयुष्य आहेपर्यंत तूंच इंद्रासनावर आरूढ हो. परंतु यानें तें म्हणणें मान्य केलें नाहीं. कांहीं काळानें हा मरण पावला असतां, याचे पुत्र इंद्राशीं कलह करूं लागले कीं,आमच्या पित्याचें संपादित इंद्रपद आहे,यास्तव तें आम्हास दे. त्यावरून इंद्रानें त्यांस बहुत प्रकारांनीं समजाविलें, परंतु ते ऐकतना. शेवटीं बृहस्पतीनें त्यांचा बुद्धिभेद करून संहार केला ( भाग० ९ स्कं० अ० १७ ). ( मत्स्य० अ० २४ ).

**रज्जुबाल**–जटायूच्या पुत्रांतील एक.

**रणक**–( सो० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्षान्वयांतील क्षुद्रकराजाचा पुत्र. यास कुलक असेंही म्हटलेलें असून, पुत्र सुरथ नांवाचा होता.

**रणंजय**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्षवंशीय कृतंजय राजाचा पुत्र. याचा पुत्र संजय राजा.

**रणश्लाघी**–एक रुद्रगणवि०

**रणाश्व**–बर्हणाश्व राजा तोच.

**रति**- एक अप्सरा.

२–कामदेव मदनाची स्त्री.

३–ऋषभदेववंशीय विभुराजाची स्त्री.

**रतिगुण**–प्राधेच्या पुत्रांतील एक ( २ देवगंधर्व श० पहा ).

**रंतिदेव**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्वपुत्र ऋतेयु, तद्वंशीय भरतपुत्र मन्यु राजा, त्याच्या पांच पुत्रांतील चौथा जो नरपुत्र संस्कृति राजा, त्यापासून सत्कृति भार्येच्याठायीं झालेल्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. यास सांकृति असेंहि म्हणत असत, व हा गुरु किं० गुरुधी राजाचा कनिष्ठ भ्राता होता ( भार० द्रोण० अ० ६७ ). ( वन० अ० २९४ ). (शांति० अ० २९). हा, परम शूर तर असेच; परंतु धर्मात्माहि उत्तम होता. त्याविषयीं असा इतिहास आढळतो—एकदां हा अरण्यांत तप करीत असतां, एके दिवशीं पाक सिद्ध झाल्यावर पंचमहायज्ञ करून भोजन करणार इतक्यांत, एक अतिथि प्राप्त होऊन त्यानें अन्न मागितलें. यानें त्यास तत्काळ भोजन देऊन तृप्त केल्यावर तो जातोच, दुसरा शूद्र अतिथि आला. त्यासहि अन्न

देऊन तृप्त केल्यावर, ज्याच्या समागमें कित्येक श्वान असा तिसरा अतिथि आला. त्यास सर्व अन्न देऊन तृप्त करून तो जात आहे तों, एक अति शूद्र आला, व दीन वाणीनें उदक मागूं लागला. त्या वेळेस याजवळ तेवढेंच अवशिष्ट होतें, व तेंही यानें त्यास संतोषानें देऊन म्हटलें, मी परमेश्वराजवळ दुसरें कांहीं मागत नाहीं, एक येवढेंच मागतों कीं, मला दुःख झालें तरी चिंता नाहीं, परंतु प्राणिमात्र सुखी असोत. इतकें म्हणतांच ब्रह्मादिदेव प्रकट होऊन, त्यांनीं यास तसेंच सामर्थ्य दिलें ( भाग० ९ स्कं० अ० २१ ).

**रत्ननगर**–मयूरध्वज राजाची राजधानी.

**रत्ना**–अक्रूर यादवाच्या स्त्रियांतील एक.

**रथकृत**–यक्षवि० ( ९ मधु० श० पहा ).

**रथचित्रा**–भारतवर्षीय नदी.

**रथंतरकल्प**–चालू ब्राह्ममासांतील चौथा होऊन गेलेला दिवस ( ४ कल्प श० पहा ).

**रथध्वज**–कुशध्वज राजाचा पिता (वेदवती श० पहा).

**रथप्रभु**–द्वितीयार्थक वीर शब्द पहा.

**रथराजी**–वसुदेवाच्या स्त्रियांतील एक.

**रथसेन**–भारतीय युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० २३ ).

**रथस्वन**–यक्षवि० ( ५ शुक्र श० पहा ).

**रथाध्वान**–रथप्रभु तोच.

**रथीतर**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

२–(सू० वं०) नभगकुलोत्पन्न एक राजर्षि त्याचा पुत्र.

**रंभ**–करंभाचा ज्येष्ठ भ्राता ( रंभकरंभ श० पहा ).

२–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न विविंशति राजाचा पुत्र, याचा पुत्र खनिनेत्र.

३–रामसेनेंतील एक वानर (वा० रा० युद्ध० स० २६).

४–( सो० वं० ) पुरूरवा राजाचा पौत्र. आयु राजाच्या पांच पुत्रांतील चौथा. याचा पुत्र रभस राजा.

**रंभकरंभ**–असुरजातीय हे दोघे भ्राते असत. ह्यांनीं पंचनदतीर्थीं उग्रतप आरंभिलें असतां, इंद्रास मोठी भीति उत्पन्न झाली, व तो यास अपाय करण्याची संधी पाहात असतां, एकदां करंभ स्नानास गेला, व पुष्कळ वेळ जलांत उभा राहिला, असें पाहून इंद्रानें ग्राहरूप ( मगराचें रूप ) धारण करून त्यास आंत ओढून नेऊन वधिलें. हें वर्तमान रंभास कळून तो क्रुद्ध झाला, व तपांतीं अग्नि प्रसन्न झाला असतां, मला त्रैलोक्यविजयी पुत्र व्हावा असें यानें मागितलें. त्यास तथास्तु असें वरप्रदान झाल्यावर, हा एकदां संचार करीत आहे तों एक महिषी याच्या दृष्टीस पडली. तींविषयीं तो कामुक होऊन यापासून तिला गर्भ राहिला. त्यावरून हा तिचें रक्षण करीत असतां, तिजवर कोणी एक महिष धांवला; म्हणून हा त्याचें निवारण करण्यास त्यावर चालून गेला; परंतु दैवगतीनें त्या महिषानेंच यास मारिलें, असें पाहून ती महिषी, जी तेथून पळत निघाली, ती मालवट म्हणून एक यक्षाचें स्थान होतें तेथें गेली. त्यावरून यक्षांनीं तिला आश्रय देऊन, व महिषाचा पराभव करून त्यास पिटून लाविलें, आणि याचें प्रेत आणून त्यांनीं दग्ध केलें, त्यासमागमें महिषीनें सहगमन केलें असतां, तिच्या उदरांतील गर्भास अग्नीनें वांचविलें. तोच महिषासुर पुढें प्रख्यातीस आला ( देवीभा० ५ स्कं० अ० २ ).

**रभस**–रामसेनेंतील एक वानर (वा०रा० युद्ध० स० ४).

२–रावणपक्षीय एक राक्षस ( वा० रा० युद्ध० स० ९).

३–(सो० वं०) आयुपुत्र रंभ त्याचा पुत्र. यास गभीर नांवाचा पुत्र होता.

**रंभा**–प्राधेच्या अप्सरा कन्यांतील एक. ही, कार्तिक मासांतील सूर्यासमागमें संचार करण्यास असते ( ३ ऊर्ज श० पहा ).

२–तुंबुरु गंधर्वाची जी स्त्री ती ( भार० उद्योग० अ० ११७ ).

**रमण**–धरना० वसूच्या पुत्रांतील एक.

**रमणक**–प्रियव्रतपुत्र यज्ञबाहु, त्याच्या सात पुत्रांतील तिसरा. याच्या वर्षास याचेंच नांव आहे.

२–शाल्मली द्वीपाच्या सात वर्षांतील तिसरा वर्षसंज्ञक भूभाग.

३–प्रियव्रतपुत्र वीतिहोत्र, त्याच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. हा, याच नांवाच्या वर्षाचा अधिपति होय.

४–पुष्करद्वीपाच्या वर्षसंज्ञक दोन भूभागांतील पहिला.

५–जंबुद्वीपाच्या अष्टउपद्वीपांतील एक (अष्टउपद्वीप श० पहा ). कृष्णानें कालीय नागास यमुनेंतून काढिल्यावर याच द्वीपांत पाठविलें होतें.

**रमणचीन**–हा देश चीन लोकांचाच आहे. परंतु याची सीमा कोठपासून कोठपर्यंत त्याचा शोध लागला नाहीं ( भार० भीष्म० अ० ९ ).

**रमा**–लक्ष्मी.

**रम्य**–एक राजर्षि. याची कन्या एकावली.

२–गोमतीनदीसमीपचा एक पर्वत ( वा० रा० ).

**रम्यक**–प्रियव्रतपुत्र आग्नीध्रास, पूर्वचित्ति अप्सरेच्या ठायीं झालेल्या नऊ पुत्रांतील पांचवा. यांस, मेरूची

कन्या रम्या ती स्त्री होती. आग्नीध्रानें जंबुद्वीपाचे नऊ भाग करून आपल्या पुत्रांस दिले, तेव्हां रम्यक वर्षाचें आधिपत्य यास दिलें होतें.

२–रम्यपर्वतासच म्हटलेलें आहे.

**रम्यकवर्ष**-आग्नीध्रपुत्र रम्य, त्याचा वर्ष तो. यास ग्रंथांतरीं श्वेतवर्ष असें नामांतर असून, याच्या उत्तरेस नीलपर्वत व दक्षिणेस श्वेतपर्वत क्रमानें आहेत, आणि पूर्वेस व पश्चिमेस क्षार समुद्र आहे ( भार० भीष्म० अ० ६ श्लोक ३७ ).

**रम्या**-मेरूच्या नऊ कन्यांतील पांचवी, आग्नीध्रपुत्र रम्यकाची स्त्री.

**रय**-( सो० वं० ) पूरूरवा राजास उर्वशीपासून झालेल्या साहा पुत्रांतील चवथा. यास एक ना० पुत्र होता.

**रवि**-आकाशांतील एक मंडल, व त्यावरील अधिकाऱ्याचें साधारण नांव.

२–सौवीरदेशीय एक राजा ( ३ जयद्रथ श० पहा ).

**रश्मिकेतु**-रावणपक्षीय एक राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ). हा रामाच्या हातून मेला ( युद्ध० स० ४३ ).

**रसकुल्या**-कुशद्वीपांतील नदी.

**रसा**-पृथिवीस नांव.

**रसातल**-सप्त पातालांतील किंवा सप्तविल स्वर्गांतील साहवा लोक. येथें ब्रह्मदेवाच्या मुखापासून उत्पन्न झालेली सुरभि राहत्ये. तिच्या दुग्धापासून तेथें क्षीरनिधि नांवाचा ऱ्हद झाला आहे. येथें फेनप नांवाचे मुनि राहतात. या लोकांच्या चारही दिशांस पूर्वादिक्रमानें सुरूपा, हंसिका, सुभद्रा, आणि सर्वकामदुघा, अशा चार सौरभेयी ( सुरभीच्या कन्या ) राहतात ( भार० उद्योग० अ० १०२ ). याशिवाय पणि ना० निवातकवच व कालकेय हेही येथीलच रहिवासी असत.

**रहस्या**-भारतवर्षीय नदी.

**रहूगण**-सिंधुसौवीर देशाचा प्राचीन राजा. हा मुमुक्षु होत्साता नरयानांत बसून कपिलाश्रमाकडे जात असतां याच्या यानवाहकांतील एक वाहक मार्गांत श्रांत झाला, म्हणून सेवकांनीं मार्गावर पडलेल्या जडभरतास धरून राजास न कळवितां यानास लाविलें. परंतु तो इतर वाहकांप्रमाणें त्वरेनें चालेना, त्यामुळें यानाची गति मंद होऊन तें डळमळूंहि लागलें. असें पाहून हा वाहकांस क्रोधपूर्वक बोलूं लागला. त्यांनीं विनंति केली कीं, हा नूतन यानवाहक सत्वर चालत नाहीं, तेव्हां आम्ही काय करावें ? त्यावरून रहूगण जडभरतास सर्वांबरोबर नीट चाल असें म्हणाला. तें याचें भाषण ऐकून, त्यानें यास जें उत्तर दिलें, तेणेंकरून रहूगण समजला कीं, हा कोणी तरी ब्रह्मनिष्ठ आहे. म्हणून वाहनाखालीं उतरून त्यास यानें नमस्कार केला, व शरण होऊन म्हणाला कीं, मला आत्मतत्त्वजिज्ञासा आहे; यास्तव मजवर कृपा करावी. तेव्हां जडभरतानें यास आत्मतत्त्वोपदेश केला, व हा कृतार्थ झाला ( भाग० ५ स्कं० अ० १०–१४ ).

**रक्षिता**-कश्यपापासून प्राधेस झालेल्या अप्सरांतील एक.

**रक्षोगणभोजन**-पुरुषास पशु कल्पून भैरवादिक देवतांस बली अर्पण करणारे, अथवा नरमांस भक्षण करणारे, त्यांस प्राप्त होणारा नरक. येथें ज्यांचा वध केला असतो, ते राक्षसरूपानें, मारणारास भक्षण करितात.

**रक्षोहा**-काम्यइष्टीस प्रशस्त जो अग्नि तो.

**राका**-स्वायंभुव मन्वंतरांतील अंगिरा ऋषीच्या चार कन्यांतील चौथी.

२–द्वादशादित्यांतलि धाता आदित्याची स्त्री.

३–सुमाली राक्षसास केतुमतीच्या ठायीं झालेली कन्या. ही विश्रवा ऋषीसच दिली होती.

४–शाल्मलीद्वीपांतील नदी.

**रागा**-बृहस्पतीपासून शुभेस झालेल्या सात कन्यांतलि एक.

**राघव**-रघुवंशजांस नांव; परंतु दाशरथि रामाविषयीं विशेष रूढि.

**राजकेशी**-तृतीयार्थक अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**राजनी**-भारतवर्षीय नदी.

**राजपुर**-कलिंग देशाची राजधानी. येथील राजा चित्रांगद.

**राजराज**-कुबेर.

**राजवर्तप**-ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**राजाधिदेवी**-सोमवंशीय शूर राजास मारीषेपासून झालेल्या पांच कन्यांतील कनिष्ठ. ही अवंत्य राजा जयसेन यास दिली होती.

**राजेय**-रजिराजाच्या पंचशत पुत्रांस संज्ञा.

**राज्यवर्द्धन**-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न मरुत्त राजाचा पुत्र दम त्याचा पुत्र, याचा पुत्र सुधृति.

**राधा**-विष्णूची एक शक्ति ( देवीभा० ९ स्कं० अ० १ ). ही, गोलोकांत कृष्णाची प्रियसखी अशी वर्णिलेली आहे. गोकुळांत कृष्णसखी राधा असल्याचें हरिदास इ० वर्णितात; परंतु सगळ्या भागवतांत तिचें

नांव कोठेंही नाहीं. जसें सुदामा ब्राह्मणाचें नांव नाहीं त्याप्रमाणें.

२–( सो० वं ) अनुकुलोत्पन्न अधिरथ सूताची स्त्री.

**राधिक**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढान्वयांतील जयसेन राजाचा पुत्र. याचा पुत्र अयुत.

**राधिका**–प्रथमार्थक राधा.

**राधेय**–राधेनें पालन केल्यामुळें कर्णास म्हणत असत.

२–याच राधेस जो एक औरसपुत्र होता तो. हा अभिमन्यूच्या हातून मरण पावला.

**राम**–जमदग्नि ऋषीस रेणुकेच्या ठायीं झालेल्या पांच पुत्रांतील कनिष्ठ. यास, जमदग्नीचा पुत्र म्हणून जामदग्न्य आणि हस्तांत परशु नांवाचें आयुध धारण करण्यानें परशुराम अशीं नांवें असत ( भार० द्रोण० अ० ७० ). यानें मातेचा व भ्रात्यांचा वध पित्याच्या आज्ञेनें केल्यावर यास जमदग्नीनें वर माग असें म्हटलें. तेव्हां यानें याप्रमाणें मागितलें.

**श्लोक.**

स वव्रे मातुरुत्थानमस्मृतिं च वधस्य वै ॥
पापेन तेन चास्पर्शं भ्रातॄणां प्रकृतिं तथा ॥ १७ ॥

हें जमदग्नीनें दिल्यावर यास त्यानें आणखी असें दिलें—

" अप्रतिद्वंद्वतां युद्धे दीर्घमायुश्च भारत ।।
ददौ च सर्वान्कामांस्तान् जमदग्निर्महातपाः ॥ १८ ॥

( भार० वन० अ० ११६ ). इतर चरित्र ( परशुराम श० पहा ).

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अजराजाचा पुत्र दशरथ, त्यापासून कौसल्येस विष्णूच्या अंशानें झालेला पुत्र. वाल्मीकऋषीनें शतकोटि चरित्र, भविष्यरूप लिहून ठेविल्याप्रमाणें, रावणादिक दुष्ट राक्षसांचा संहार करून, साधुजनांस सुखी करावें म्हणून हा अवतार, चालू मन्वंतराच्या चोविसाव्या पर्ययांत ( चौकडींत ) त्रेतायुगामध्यें झाला होता ( देवीभा० ४ स्कं० अ० १६ ). (मत्स्य० अ० ४७). अध्यात्मरामायणांत, हा अवतार अठ्ठाविसाव्या पर्ययांत झाल्याचें लिहिलें आहे, परंतु तें या कल्पास लागू नाहीं. कित्येक टीकाकारांचें असें मत आहे कीं, चोविसाव्या पर्ययांतील रामावतार, तो पूर्वकल्पांतील समजावा; पण तसें म्हणण्यानें नृसिंह, वामनादिक, तेही मग तसेच म्हणावे लागतील, व तसें झाल्यानें या कल्पांतील अवतारांची व्यवस्था न लागतां, एका अध्यात्मरामायणास मानून बहुमत बाधित करावें लागेल. यासाठीं तसें न करतां, बहुमत याच चालू कल्पाविषयीं घेऊन एकदेशी अध्यात्मरामायणाचें मत कल्पांतराकडे घालावें हेंच बरें.

दशरथ राजास, कौसल्येपासून जसा रामचंद्र झाला, त्याचप्रमाणें सुमित्रेपासून लक्ष्मण व शत्रुघ्न, असे दोन, आणि कैकेयीपासून एकच भरत, मिळून चौघे पुत्र झाले ( भार० वन० अ० २७४ श्लो० ८ ). ( देवी भा० तृतीय स्कं० अ० २८ श्लो० ४). राम जन्मला त्या दिवशीं चैत्रशुक्लपक्षींची नवमी होती ( ३ दशरथ श० पहा ).

राम मोठा झाल्यावर, दशरथ राजानें त्याचा व लक्ष्मणादिकांचा व्रतबंध करून, वसिष्ठ ऋषीकडून सांगवेदोपवेदांची शिक्षा देववून त्यांत त्यास उत्तम प्रकारें प्रवीण करविलें. या गोष्टीस बराच काळ लोटल्यावर, याच्या विवाहाची चिंता दशरथ करीत आहे तों, विश्वामित्र ऋषि आपल्या यज्ञाचें संरक्षण करावें यासाठीं रामचंद्रास मागून न्यावें म्हणून दशरथाकडे प्राप्त झाला, व त्यानें त्याजवळ रामास मागितलें. तेणेंकरून त्यास मोठें संकट झालें; कारण राम हा त्यास अत्यंत वृद्धावस्थेंत झाला होता. तथापि वसिष्ठानें समजावून सांगितलें कीं, विश्वामित्रास रामचंद्र देण्यास अनमान करूं नको. कां म्हणशील तर यज्ञसंरक्षणमिषानें, तो याच्या विवाहाची व्यवस्था करणार आहे. तें ऐकून दशरथानें हर्षित होऊन, विश्वामित्रास सत्कारपूर्वक राम दिला, व तो त्यास घेऊन निघतांच लक्ष्मण त्यासमागमें गेला.

विश्वामित्र, रामलक्ष्मणांस घेऊन निघाला तो सरयूनदीच्या तीरीं येऊन, त्यानें रामास क्षुधातृषांची बाधा न करणाऱ्या प्रथम बलातिबला ना० विद्यांचा उपदेश करून दंड, धर्म, काल, विष्णु, इ० चक्रें; वज्र, शूलवत्, ब्रह्मशिर, आग्नेय, वारुण, वायव्य इ० अस्त्रें; वरुण, धर्म, काल, इ० पाश; आणि मोदकी व शिखरी इ० गदा; त्यांचाही अनुग्रह केला. नंतर सत्यवान, सत्यकीर्ति, पराङ्मुख, अवाङ्मुख, लक्ष्य, अलक्ष्य, वैनिद्र, धन, धान्य, कामरूप, कामरुचि, जृंभक, इ० संहारहि कथन करून, त्यासहित तो सरयूनदीचें उल्लंघन करीत होतसाता, मलद आणि करूषक, या देशांचें अरण्य झालें होतें त्यांत प्राप्त झाला, व तेथें पूर्वी देश असतां अरण्य कसें झालें, त्याविषयीं ताटका राक्षसीच्या उपद्रवाचें कारण सांगून, तिला मारण्याची त्यानें यास आज्ञा केली. त्यावरून यानें, सुबाहुना० एका पुत्रासहित तिचा वध करून, मारीच ना० दुसऱ्या पुत्रास समुद्रांत उडविलें, व विश्वामि-

त्राचा याग सिद्धीस नेला ( ताटका श० पहा ).

विश्वामित्राचा यज्ञ समाप्त झाल्यावर, त्यानें रामास आपणाजवळ बराच कालपर्यंत ठेवून घेतलें. तों एके दिवशीं मिथिलानगरींहून दूत आला, व त्यानें विश्वामित्रास पत्र देऊन विनंति केली कीं, आपण स्वयंवराकरितां विदेहदेशास चलावें; कारण सीरध्वज जनक, सीता ना० कन्येचें स्वयंवर करीत आहे. तें ऐकून विश्वामित्रानें दूतास, तूं पुढें जा, मी मागून येतों असें सांगून मार्गस्थ केलें व रामास म्हणाला, तूं मजसमागमें चल. त्यावरून राम, लक्ष्मणासहित तथास्तु म्हणाला असतां, तो त्यास समागमें घेऊन मिथिलानगरीस जाण्यास निघाला. तेव्हां मार्गांतून जातांना, त्यानें रामास कालक्रमणेसाठीं आपल्या कुशवंशाचा इतिहास सांगितला; कारण मार्गांत तो प्रदेश म्हणजे कान्यकुब्जदेश त्यांस लागला होता. नंतर अस्तमानीं शोणानदीतीरीं राहून, दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं, तेथून विश्वामित्र निघाला तो, मध्यान्हकाळीं भागीरथीतीरीं आला. तेथें रामानें प्रश्न केल्यावरून विश्वामित्रानें त्यास भागीरथीचा इतिहास कथन केला. पुढें नौकाद्वारें तिचें उल्लंघन करून, विशाला ना० नगरीस प्राप्त झाल्यावर, तेथें त्या वेळेस सूर्यवंशीय दिष्टकुलोत्पन्न सोमदत्त राजाचा पुत्र, व जनमेजय राजाचा पिता, सुमति ना० राजा राज्य करीत असलेला, त्यानें विश्वामित्र आल्याचें ऐकून, त्यास सामोरें येऊन स्वमंदिरीं नेलें. तेथून सत्कार पावून, व त्या राजास, हे तुमचेच सूर्यवंशोत्पन्न दशरथ राजाचे पुत्र रामलक्ष्मण होत इ० वृत्तांत सांगून, तेथून विश्वामित्र निघाला, व मार्गांत त्यानें रामास, प्रस्तुत विशालानगरी जी तूं पाहिलीस, तेथें पूर्वी कुशप्लव ना० वन असून अदितीनें त्या स्थळीं सहस्र वर्षें तप केल्याचें व तपःप्रभावानें तिच्या मरुद्गणपुत्रांच्या उत्पत्तीचें वृत्त सांगितलें. इतक्यांत जातां जातां, त्यांस एक निर्मानुष अरण्य लागलें. तेव्हां रामानें हें वन असें कां म्हणून पुसलें असतां, त्यानें गौतमऋषि व त्याची स्त्री अहल्या, त्यांचा वृत्तांत सांगितला. तो ऐकून राम तिच्या दर्शनास गेला. तों असें झालें कीं, त्या शिलारूप होऊन पडलेल्या अहल्येवर रामाचे पदरजःकण उडून तिचा उद्धार झाला. नंतर विश्वामित्र ईशान्यदिशेस वळून, मिथिलेस जाऊन पोहोंचला ( वा० रा० बाल० स० २७–४९ ).

अध्यात्मरामायणांत अहल्योद्धार झाल्यावर, रामासहवर्तमान विश्वामित्र ऋषि भागीरथी उतरला असें आढळतें, त्याविषयीं त्यास पार उतरणारा जो नाविक ( नावाडी ) त्याची उक्ति रामास अशी आहे.

**–श्लोक–**

क्षालयामि तव पादपंकजं नाथ दारुदृषदोहो किमंतरम्॥
मानुषीकरणचूर्णमस्ति ते पादयोरिति कथा प्रथीयसि॥३
पादांबुजं ते विमलं हि कृत्वा पश्चात्परं तीरमहं नयामि ॥
नोचेत्तरी सद्युवती मलेन स्याच्चेद्विभो विद्धि कुटुंबहानिः

(अध्यात्मरा० बाल० स० ६). यांतील सारांशानें भाव असा कीं, तुझ्या पदरजःकणानें पाषाणाची जेव्हां स्त्री झाली, तेव्हां काष्ठाच्या नावेची नाहीं होणार कशावरून ? आणि तसें झाल्यानें, सध्यां माझी उपजीविकाच बंद होईल; यास्तव तुझे पाय धुवून नंतर तुला नावेवर बसवून पार करीन. ही उक्ति, वाल्मीकिरामायणाशीं जरी मिळत नाहीं, तरी कल्पभेदास्तव विरोध नाहीं असें समजावें. जसा नदीजलाचा प्रवाह आज ह्या अंगानें, व उद्यां दुसऱ्या अंगानें वाहूं लागला असतां, विरोध नाहीं त्याप्रमाणें.

विश्वामित्र ऋषि आला असें ऐकून, शतानंद पुरोहितासहवर्तमान सीरध्वजजनक, त्यास सामोरा गेला, व त्याचें पूजन करून, रामलक्ष्मणासहित त्यानें त्यास आपल्या मंदिरांत आणिलें. नंतर हे कुमर कोणाचे कोण, इ० पुसल्यावर, विश्वामित्रानें त्यास सर्व वृत्त निवेदन केलें. त्यावरून सीरध्वजानें रामास सीता, लक्ष्मणास उर्मिला व भरतशत्रुघ्न या उभयतांस मांडवी आणि श्रुतकीर्ति, अशा क्रमानें चौघांस चारी कन्या विवाह करून दिल्या ( सीरध्वज श० पहा ). विवाहसमारंभ झाल्यावर, अयोध्येस राम जाऊं लागला तेव्हां मार्गांत जामदग्न्य रामानें त्यास आडविलें, त्या कालीं त्याच्यांतील विष्णुतेज याच्यांत प्रविष्ट होऊन, तो स्वाश्रमीं निघून गेला असतां, हा सुखेंकरून अयोध्येंत प्रवेशला ( परशुराम श० पहा ).

**––बालकांडवृत्त समाप्त.––**

---

दशरथ राजा, स्त्रिया, पुत्र व स्नुषा, यांसहवर्तमान आनंदांत काळ घालवीत असतां, राजनीतींत रामाची दक्षता व कौशल्य पाहून, त्यास अतिशयच सुख झालें, व त्यावरून त्यानें असें मनांत आणिलें कीं, याच्यावर राज्यभार सोंपवून आतां आपण वृद्धावस्थेंत स्वस्थ राहावें, म्हणून त्यानें यास यौवराज्य देण्याची सिद्धता केली. हें वर्तमान कैकेयीस कळून, तिनें त्या समारंभास विघ्न केलें, व रामास अरण्यवासास पाठविलें ( ३ दशरथ श० पहा ). ( भार० वन० अ० २७७ ).

राम अयोध्येंतून अरण्यांत जाण्यास निघाला असतां, त्यासमागमें नागरिक लोकांचा मोठा समुदाय निघाल्यामुळें, तो रथांत न बसतां, जनासमागमें पादचारीच चालूं लागला. अस्तमानीं तमसा नदीच्या तीरीं जाऊन, तेथें संध्योपासन झाल्यावर जलपान करून निद्रित झाला. नंतर मोठ्या प्रातःकालीं उठून, जनांस चुकवून जाण्याच्या हेतूनें, युक्तीनेंच रथांत बसून वेदश्रुती, इ० नद्या उल्लंघन करीत दक्षिण दिशेकडे चालला ( वा० रा० अयो० स० ४५–४९ ). कोसल देशाच्या सीमेवर जातांच रामानें, अयोध्यानगरीस, व तिजमधील देवतांस, नमस्कार करून शृंगवेरपुरास प्राप्त झाला. तेथें गुहानें याचें आदरातिथ्य करून भागीरथी उतरवून दक्षिणतीरास पोंहोंचविलें (गुह श० पहा). नंतर राम तेथून निघून वत्स्य ना० देशांत प्राप्त झाला, व तेथें त्यानें लक्ष्मणाच्या अंतःकरणाची परीक्षा केली, तींत त्याचा निश्चय आपणासमागमें येण्याचा दृढ पाहून, त्यास अतिशय आनंद झाला ( वा० रा० अयो० स० ५३ ).

नंतर राम, लक्ष्मण व सीता यांसहित निघाला, व गंगायमुनांच्या संगमाजवळ प्रयागास येऊन, तेथें राहणाऱ्या भरद्वाज ऋषीस भेटला (३ भरद्वाज श० पहा). भरद्वाज ऋषीची आज्ञा घेऊन निघाल्यावर चित्रकूट पर्वतावर येऊन पर्णकुटिका करून तेथें सुखानें वास करून राहिला. तेथें राहात असतां, दशरथ मृत्यु पावल्याचें वृत्त यास समजून, याला अयोध्येस परत नेण्यासाठीं आलेला भरत भेटला, इत्यादि वृत्त ( १ चित्रकूट श० पहा ). भरत अयोध्येस परत गेल्यावर, अयोध्येचे अपार जन तेथें वारंवार येऊं जाऊं लागल्यामुळें तेथील ऋषींस उपद्रव होऊं लागला. त्यावरून राम, चित्रकूट पर्वत सोडून तेथून पुढें दक्षिणेस निघाला, व त्यानें अत्रिऋषि व त्याची स्त्री अनसूया, त्यांची भेट घेतली ( २ अत्रि श० पहा ).

**--अयोध्याकांडवृत्त समाप्त.--**

---

अत्रि ऋषीचा आश्रम सोडून, राम अरण्यांतून चालला त्या काळीं, त्यास ऋषींचे अनेक आश्रम आढळले. तेथें प्रत्येक आश्रमांत जाऊन त्या त्या ऋषीस वंदन करीत, व त्यांचे आशीर्वाद घेत पुढें चालावें. याप्रमाणें जाऊं लागला(वा०रा०अरण्य० स० १ ). अशा रीतीनें जातां जातां घोर अरण्य लागलें; त्यांत यास प्रथम राक्षस विराध भेटला, तेव्हां त्याचें याचें कांहीं संभाषण होऊन त्यास यानें सद्गति दिली ( विराध० श० पहा ). तेथून निघाल्यावर हा शरभंग ऋषीच्या आश्रमास गेला ( शरभंग श० पहा ). शरभंगाश्रमाहून निघाल्यावर सुतीक्ष्ण ऋषीच्या आश्रमाकडे चालला असतां, मार्गांत अनेक ऋषि भेटले व त्यांनीं राक्षसांच्या उपद्रवापासून आजपर्यंत किती तापस मरण पावले, ते यास कळण्याकरितां अस्थींचे पर्वतांप्रमाणें ढीग दाखविले. त्यावरून यानें, मी संपूर्ण राक्षसांचा संहार करून तुम्हास सुखी करीन असें बोलून, सुतीक्ष्ण ऋषीच्या आश्रमास त्यानें गमन केलें ( वा० रा० अर० स० ६–८ ).

सुतीक्ष्णाश्रमीं राम असतां, तेथें रामास सीतेनें शस्त्रधारणापासून धर्म किंवा अधर्म या विषयावर प्रश्न केला. त्यावर त्यानें उत्तर दिलें कीं, ब्राह्मणसंरक्षणार्थ शस्त्र धरणें क्षत्रियास अधर्म नाहीं, येऱ्हवीं आम्हीं शस्त्र न धरलें,तर ब्राह्मण आपलें संरक्षण करण्यास समर्थ नाहींत असें नाहीं, राक्षसांस शापानें ते दग्ध करण्यास समर्थ आहेत; परंतु संपादिलेल्या सुकृताचा ते असा व्यर्थ व्यय करीत नाहींत, म्हणून आम्हीच त्यांचें संरक्षण केलें पाहिजे ( वा० रा० अरण्य० स० ९–१० ). नंतर राम येथून निघाला, व पंचाप्सर सरोवरीं प्राप्त झाला, त्यांतून त्यास गायनाचा ध्वनि ऐकूं आल्यावरून आश्चर्य वाटलें, म्हणून तेथें समीपच राहणारा धर्मभृत ऋषि त्यास यानें त्याविषयीं प्रश्न केला असतां, त्यानें यास मांडिकर्णी ऋषीची कथा सांगितली ( मांडिकर्णी श० पहा ).

नंतर राम तेथून निघाला तो कोठें दहा, कोठें चार, कोठें दोन, कोठें अर्धमास, अथवा कोठें वर्ष असा रहात रहात, व भेटतलि ते राक्षस मारीत मारीत, यानें आपल्या अरण्यवासाचीं दहा वर्षे घालविलीं, व पुनः सुतीक्ष्ण ऋषीच्या आश्रमास येऊन, तेथून दक्षिणेस चार योजनांवर अगस्त्य ऋषीचा भ्राता राहात होता, त्याची भेट घेतली ( हा भ्राता अगस्त्याचा कोणता, व तो केव्हां कसा उत्पन्न झाला, त्याचा उल्लेख ग्रंथांत आढळत नाहीं ). येऱ्हवीं विचार करून पाहिलें तर, मित्रावरुणी वसिष्ठावांचून यास तिसरा भ्राताच नव्हता, म्हणून हा लेख कृतक (कोणी नवा घातलेला किंवा लेखकाचा प्रमाद होय ). नंतर तेथून एका योजनावर अगस्त्य ऋषीचा आश्रम होता, तिकडे राम चालला असतां, मार्गामध्यें त्यानें लक्ष्मणास अगस्त्याचा सर्व इतिहास सांगितला. सारांश, आश्रमाजवळ गेल्यावर, लक्ष्मणानें अगस्त्यास

राम आल्याचें कळविलें. त्यावरून त्यानें बाहेर येऊन रामास आंत नेलें, व त्याचें सीतेसहित उत्तम प्रकारेंकरून आदरातिथ्य केलें. पुढें त्यास अन्नांची प्राप्ति करून दिल्यावर मार्गस्थ केलें असतां, राम पंचवटीकडे चालला, व तेथें मार्गांत त्यास जटायूची भेट झाली ( वा० रा० अरण्य० स० १२-१४ ).

पंचवटीमध्यें रामचंद्र राहिल्यावर, तेथें शूर्पणखा आपल्या कर्मानें कर्णनासिकेचा छेद होऊन विटंबना पावली ( शूर्पणखा श० पहा ). नंतर ती खर ना० राक्षसाकडे गेली असतां, तो सकल सचिव आणि सैन्य यांसहित, रामाच्या हातून मरण पावला ( १ खर श० पहा ). खर मरण पावल्यावर शूर्पणखा लंकेस गेली, व तिनें, रामाच्या हातून खरादिकांचा वध, व आपलें विरूपकरण झाल्याचें वृत्त रावणास निवेदन केलें ( शूर्पणखा श० पहा ). त्यावरून रावण, मारीच राक्षसाकडे गेला. व त्यानें त्याकडून मृगरूप धारण करवून, आपण भिक्षु ( सन्यासवेषधर ) होऊन रामलक्ष्मणांस क्रमानेंच अरण्यांत घालवून सीतेचें हरण केलें इ०. ( पंचवटी श० पहा ). ( ४ मारीच श० पहा ). सीतेचें हरण झाल्यावर, रामलक्ष्मण तिच्या शोधास निघाले, तों त्यांस मार्गांत मरणोन्मुख झालेला जटायु आढळला. त्यावरून त्यापासून सीता रावणानें नेली, व तीनिमित्त माझी अशी अवस्था झाली, इ० वृत्त ऐकून घेऊन त्यानें प्राण सोडिला असतां, रामास आतिशय दुःख होऊन त्यानें त्याचा दहनादि संस्कार केला ( जटायु श० पहा ).

सीतेचें हरण झाल्यावर, राम पुनः अगस्त्याश्रमास आला, व तेथें त्यानें त्यापासून शैवी दीक्षा ग्रहण केली, असें पुराणांतरीं आहे. अस्तु; सारांश क्रौंचारण्याच्या पूर्व भागानें मतंगाश्रमाकडे जातां जातां, मार्गांत अयोमुखी भेटली. तिचें शासन करून (अयोमुखी श० पहा ) व कबंध राक्षसास मारून, त्यासही गति दिली ( कबंध श० पहा ). नंतर मतंगाश्रमीं राम गेला. तेथें शबरीनें त्याचें आतिथ्य केलें. ( शबरी श० पहा ). तें तिचें आतिथ्य ग्रहण करून तेथें असलेल्या सप्तसागरतीर्थीं दुसरे दिवशीं स्नान केल्यावर राम हा, लक्ष्मणासहित पंपा ना० सरोवरास आला ( वा० रा० अरण्य० स० ७५ ).

**—अरण्यकांड समाप्त.—**

पंपा सरोवरास राम येऊन पोहोंचल्यावर, त्याचें व लक्ष्मणाचें कांहीं सीताविषयक भाषण झालें. नंतर ते तेथून चालत चालत, व मार्गानें कांहीं संभाषण करीत करीत, कांहींसा ऋष्यमूकगिरिसमीप येऊन पोहोंचत आहे तों, सुग्रीवानें त्यास दुरून पाहिलें, आणि त्यावरून हे दोघे वीर कोणी तरी वालिपक्षीय असावेत, असें त्यास भासून भय उत्पन्न झालें ( वा० रा० किष्किंधा० स० १ ). पुढें त्यानें तें कोण आहेत व इकडे कां येतात, इ० परीक्षा करावी यासाठीं मारुतीस तिकडे पाठविलें ( स० २ ). मारुति रामलक्ष्मणासमीप येऊन, त्यानें रामाशीं इतकें विनयानें व चातुर्यानें भाषण केलें कीं, तेणेंकरून राम सुप्रसन्न होऊन, त्याच्या स्कंधावर बंधूसहवर्तमान आरूढ होत्साता, ऋष्यमूक पर्वतावर सुग्रीवाकडे गेला, व तेथें त्यास आपलें दुःख सांगून, व त्याचें ऐकून घेऊन त्याशीं त्यानें अग्निसाक्षिक सख्य केलें, आणि वालीच्या वधाची प्रतिज्ञा केली ( २ सुग्रीव, व २ वाली श० पहा ). वालीस मारून सुग्रीवास राज्यावर स्थापिल्यानंतर, पर्जन्यकाळ लागला म्हणून तो संपेपर्यंत राम प्रवर्षण अ० माल्यवान् ना० पर्वतावर राहिला ( वा० रा० किष्किंधा० स० २७ ). शरदृतु प्राप्त झाल्यावर, सुग्रीव भेटण्यास येईना असें पाहून रामानें लक्ष्मणास सुग्रीवाकडे पाठविलें ( स० ३० ). त्यावरून सुग्रीव, वानरसेनेची सिद्धता आधींच केल्यानें सावध होता म्हणून, तो तत्काळ रामाच्या भेटीस आला ( स० ३८ ) व त्यानें सीतेच्या शुद्धीसाठीं नील, सुहोत्र, शरारि, शरगुल्म, गज, गवाक्ष, गवय, वृषभ, सुषेण, मैंद, द्विविद, गंधमादन, उल्कामुख, जांबवान्, आणि हनुमान् इ० वानर अंगदासमागमें देऊन, त्यास दक्षिणदिशेकडे पाठविलें ( वा० रा० किष्किंधा० स० ४२ ).

**—किष्किंधाकांड समाप्त.—**

अंगद सकल वानरांस समागमें घेऊन दक्षिणदिशेकडे गेला. त्यांत मारुतीनें समुद्रोल्लंघन करून सीतेची भेट घेतली, व रावणाशीं संभाषण इ० करून, तेथून परत अंगदाकडे येऊन, त्यासहवर्तमान रामास येऊन भेटला ( भार० वन० अ० २८२ ) व त्यास सीतेकडील, तसेंच लंकेंतील साकल्य वृत्त त्यानें निवेदन केलें ( हनुमान् श० पहा ).

**—सुंदरकांड समाप्त.—**

सीतेची शुद्धि मारुति करून आला त्यावरून रामानें त्याचा बहुमानपूर्वक गौरव केला. नंतर मारुतीनें लंका

व तिच्यांतील दुर्गादिकांचें विस्तारपूर्वक वृत्त रामास कथन केलें. तें श्रवण करून नीलास सेनापतित्व देऊन, सुमुहूर्त पाहून रामचंद्र लंकेकडे जाण्यास निघाला, व लवकरच समुद्रतीरीं येऊन पोहोंचला ( वा० रा० युद्ध० स० १–५ ).

तिकडे लंकेंत रावणसभेमध्यें, मारुति सीताशुद्धि करून गेल्यावर बराच वादविवाद होऊन, बिभीषण रावणाविरुद्ध कांहीं बोलल्यामुळें त्याचा रावणानें अतिशय धिक्कार केला. त्यावरून तो, आपल्या अनल, पनस, संपाति आणि प्रमति, या चार राक्षस अमात्यांस समागमें घेऊन, सागराच्या तीरीं आला व अंतरिक्षांत उभा राहून, मी तुला शरण आलों आहें, अशी त्यानें रामास विनंति केली, व मी रावणाचा कनिष्ठ भ्राता असून, माझें नांव बिभीषण आहे, असेंहि सांगितलें. आतां मी शरण येण्याचें कारण असें आहे कीं, रामाचा द्वेष सोडून, त्याची स्त्री सीता, ती तूं त्यास परत द्यावीस असा मी त्यास बोध केला, परंतु तो त्यास न रुचून त्यानें माझा अतिशय धिक्कार केला. असें त्याचें भाषण ऐकून, त्यास आश्रय द्यावा किंवा नाहीं, अशाविषयीं सुग्रीवादिकांचा विचार चालला. त्यांत मारुतीनें सांगितलें कीं, हा प्रसन्नमुख दिसत असून, रावणापेक्षां रामाचें सामर्थ्य अधिक आहे, असा याचा निश्चय वालिवधावरून झाला आहे असेंही दिसतें. यास्तव यास आश्रय द्यावा असें मला वाटतें. त्यावरून तें म्हणणें, रामाच्या व सुग्रीवादिकांच्या मनास येऊन, रामानें त्यास अभय दिलें, व सांगितलें कीं, रावणास मारून तुला लंकेचा राजा करीन. त्यावरून तो खालीं उतरला, व रामास म्हणाला, रावणवधास मीहि आपल्यास साह्य देईन ( वा० रा० युद्ध० स० १७–१९ ).

याप्रमाणें विभीषणास आश्रय मिळाला असतां, रावणाकडून शुक नांवाचा दूत आला, व तो अंतरिक्षांत उभा राहून सुग्रीवास म्हणूं लागला कीं, तुला रावणाचा निरोप आहे तो असा,–मी रामाची भार्या हरण केली आहें, यांत तुझें हिताहित मुळींच कांहीं नाहीं, यास्तव तूं आपली सेना घेऊन किष्किंधेस परत जावेंस, न जाशील तर व्यर्थ प्राणास मुकशील. त्यावरून वानर त्यास धरून मारूं लागले, तेव्हां त्यानें रामाची प्रार्थना केल्यावरून, त्यास सोडिलें असतां, पुनः त्यानें सुग्रीवास तसेंच भाषण करून म्हटलें कीं, तुझें उत्तर रावणास काय सांगूं? सुग्रीव म्हणाला, रावणास असें सांग कीं, माझा भ्राता वाली, तो जसा दुष्ट असल्यामुळें प्राणास मुकला, तीच गति तुला होईल. त्यावरून शुक लंकेस परत गेला ( वा० रा० युद्ध० स० २० ).

शुक गेल्यावर समुद्रतरणाचा उपाय राम शोधूं लागला. त्यावरून समुद्र मूर्तिमान् येऊन रामास बोलला कीं, नल वानर विश्वकर्म्याच्या अंशानें जन्मला आहे, त्याकडून सेतुबंधन करवून लंकेस जा. इतकें बोलून समुद्र गुप्त झाल्यावर, रामानें नलास सेतुबंधनाची आज्ञा केली. तीवरून त्यानें दहा योजनें रुंदीचें प्रमाण धरून प्रथमदिवशीं चौदा योजनें, व दुसऱ्या दिवसापासून क्रमानें पांचव्या दिवसापर्यंत वीस, एकवीस, बेवीस, तेवीस, मिळून लांब शत योजनें, असा सेतु बांधिला. तो पाहून राम, सकल सेनेसहवर्तमान लंकेस गेला, व सुवेलाचलासमीप सेनेचा निवेश करून राहिला ( भार० वन० अ० २८३–२८४ ). ( वा० रा० युद्ध० स० २१–२४ ).

सेनेसहित राम सुवेलाचलीं येऊन उतरल्यावर, रावणाकडून शुक, सारण, शार्दूल इ० राक्षस गुप्तपणें येऊन, वानरवेषानें सेनेंत मिसळले, व सेनेची गणना करूं लागले. तें बिभीषणानें जाणून, त्यांस वानरांकडून तत्काळ धरविलें. त्यावरून ते शरण येऊन लंकेस परत गेले ( वा० रा० युद्ध० स० २५–२९ ). पुढें रामानें आपल्या सेनेंत पूर्वादिक दिशाक्रमानें द्वारकल्पना करून व्यवस्था केल्यावर, तो सुवेल पर्वतावर चढला, व त्यानें लंकेचें ऐश्वर्य अवलोकन केलें ( स० ३७–३९ ). त्या संधींत रावण गोपुरावर चढला होता, असें सुग्रीवानें पाहून उड्डान करून त्यासमीप गेला, व तेथेंच त्याशीं थोडें युद्ध करून माघारा परतला ( स० ४० ).

नंतर राजनीतीस अनुसरून, व बिभीषणाचें अनुमोदन घेऊन, रामानें रावणाकडे साम करण्यासाठीं अंगदास पाठविलें. त्यानें बहुत प्रकारांनीं रावणास बोध केला; परंतु तो त्यानें न ऐकतां त्यास धरण्याची चार राक्षसांस आज्ञा केली. तीवरून त्यांनीं त्यास धरितांच तो तेथून अंतरिक्षांत उडाला, व अंग झाडून राक्षसास खालीं पाडिलें, तेणेंकरून ते मरण पावले. असें पाहून व रावणाच्या प्रासादाचें ( मंदिराचें ) शिखर पाडून रामाकडे परतला, आणि साम होत नाहीं असें म्हणाला. त्यावरून रामानें युद्धाची सिद्धता करविली, व युद्धास आरंभ झाला ( वा० रा० युद्ध० स० ४१–४२ ). ( भार० वन० अ० २८५ ).

युद्धारंभीं राक्षस आणि वानर यांचें परस्पर कित्ये-

कांशीं द्वंद्वयुद्ध झालें. तें असें– अंगदाचें इंद्राजिताशीं, प्रजंघाचें संपातीशीं ( हा संपाति बिभीषणाचा अमात्य नव्हे ), हनुमंताचें जंबुमालीशीं, नलाचें प्रतपनाशीं, सुग्रीवाचें प्रघसाशीं, यांत इंद्रजित् शिवाय करून इतर राक्षस आपआपल्या योद्ध्याच्या हातून मरण पावले. लक्ष्मणानें विरूपाक्ष, रामानें अग्निकेतु, राश्मिकेतु, मित्रघ्न आणि यज्ञकोप, मैंदानें वज्रमुष्टि, नीलानें निकुंभ, द्विविदानें अशनिप्रभ, सुषेणानें विद्युन्माली, गजवानरानें तपन यास मारिलें ( वा० रा० युद्ध० स० ४३ ). याप्रमाणें थोडें युद्ध होऊन सायंकालीं युद्ध समाप्त झालें; परंतु राक्षसांनीं पुनः युद्धास आरंभ केला. त्यांत यज्ञशत्रु, महापार्श्व, महोदर, वज्रदंष्ट्र, शुक आणि सारण, हे रामाशीं युद्धास आले, व पराभव पावून लंकेस परत गेले. वर लिहिल्याप्रमाणें इंद्रजित् अंगदाशीं युद्ध करीत असतां, पराभव पावल्यामुळें गुप्त झाला, व रामलक्ष्मणांस नागपाशेंकरून त्यानें बद्ध केलें. त्यावरून त्यावर दहा वानर धांवले,परंतु तो गुप्त असल्यामुळें त्यांस न सांपडतां, त्यानें सुषेण, नील, अंगद, शरभ, द्विविद, मारुति, सानुप्रस्थ, ऋषभ, ऋषभस्कंध,इ० वानरांस मूर्च्छित पाडून लंकेंत प्रवेशला, व रावणापुढें आपला पराक्रम वर्णन करूं लागला (वा० रा० युद्ध० स० ४४–४५ ).

रामलक्ष्मण मूर्च्छित पडले असतां, त्यांस सावध करण्यासाठीं बिभीषणादिक विचार करीत आहेत तों, गरुड स्वतः येऊन त्यानें त्यांस सावध केलें ( स० ४६–५० ). नंतर दुसरे दिवशीं युद्ध झालें त्यांत रावणाचा सचिव धूम्राक्ष त्यास मारुतीनें मारिलें (स० ५१–५२ ), तिसरे दिवशीं अंगदानें वज्रदंष्ट्र इ० कांस मारिलें ( स० ५३–५४ ), चौथे दिवशीं मारुतीनें अकंपन इ० राक्षसांस मारिलें ( स० ५५–५६), पांचवे दिवशीं रावणाचा मुख्य प्रधान प्रहस्त नीलानें मारिला ( स० ५७–५८ ) व सहावे दिवशीं अकंपन, इंद्रजित्, अतिकाय, महोदर, पिशाच, त्रिशिरा, कुंभ, निकुंभ, आणि नरांतक, इ० महान् महान् राक्षस योद्ध्यांस समागमें घेऊन, स्वतः रावणच युद्धास आला असतां, बिभीषणानें रामास, हे आलेले रावणाचे अमुक अमुक होत, असें अभिज्ञान करून दिलें.त्यावरून त्याचें ऐश्वर्य,व संतति इ०पाहून आश्चर्य झालें.इतक्यांत सुग्रीव, गवाक्ष, ऋषभ, ज्योतिर्मुख, सुषेण, इ० वानर रावणसैन्यावर जाऊन पडले, व रावणाशीं मारुतीचें किंचित् मुष्टियुद्ध होऊन, नीलाशींहि त्याचें युद्ध झालें. नंतर रामाची आज्ञा घेऊन, लक्ष्मण रावणाशीं युद्ध करूं लागला. तें युद्ध मोठें भयंकर झालें व त्यांत लक्ष्मण रावणास आटोपेना असें त्यानें पाहून, क्रोधें-करून त्यावर ब्रह्मदत्त शक्ति टाकिली. तेणेंकरून तो मूर्च्छित पडला, असें जाणून त्यास उचलून लंकेस न्यावें अशा हेतूनें रावण त्यासमीप येऊन त्यास उचलूं लागला; परंतु तो त्याच्यानें उचलवेना; इतक्यांत मारुतीनें रावणास असा प्रबल मुष्टिप्रहार केला कीं, त्याचे गुडघे भूमीवर टेंकले जाऊन मुखांतून रक्तवमन होत होत मूर्च्छित पडला. त्या संधींत मारुतीनें लक्ष्मणास उचलून रामासमीप आणिलें. त्यास पाहून रामानें रोषेंकरून रावण सावध होतांच त्याचा किरीट छेदून भूमीवर पाडला, व त्याची इतकी निर्भर्त्सना केली कीं, तो हतदर्प होऊन लंकेंत प्रवेशला ( वा० रा० युद्ध० स० ५९ ).

रावण लंकेंत गेल्यावर त्यानें कुंभकर्णास जागृत केलें, व तो उठून लंकेंत रावणसमेंत चालला असतां वानर त्यास पाहून भयभीत झाले. इतक्यांत रामानें बिभीषणास हा कोण म्हणून पुसलें तेव्हां त्यानें रामास, त्याचें जन्मापासून सविस्तर वृत्त, व सामर्थ्य इ० वर्णनपुरःसर हा कुंभकर्ण म्हणून सांगतांच,नीलास सेनेची नीट व्यवस्था राखून युद्धास सिद्ध असण्याची रामानें आज्ञा केली ( स० ६१ ). पुढें रावणसमेंत जाऊन, रावणाशीं भाषण झाल्यावर कुंभकर्ण युद्धास आला, व तो रामाच्या हातून मृत्यु पावला ( कुंभकर्ण श० पहा ).

नंतर सातवे दिवशीं देवांतक, नरांतक, त्रिशिरा, अतिकाय, असे रावणाचे चौघे पुत्र, व महापार्श्व आणि महोदर, हे दोघे सापत्न भ्राते, रावणाकडून युद्धास आले, आणि सर्वहि युद्ध करून मरण पावले ( वा० रा० युद्ध० स० ६९–७१ ).

आठव्या दिवशीं इंद्राजित् अदृश्यरूपानें युद्धास आला, व एका प्रहरांत सदुसष्ट कोटि वानरांस मारून व रामलक्ष्मणांस मूर्च्छित करून लंकेंत प्रवेशला ( वा० रा० युद्ध० स० ७३ ). रात्र झाल्यावर बिभीषण आणि मारुति हातांत उल्का ( पेटलेलें काष्ठ ) घेऊन सैन्य शोधीत चालले, व सावध कोण आणि मूर्च्छित कोण ते पाहूं लागले. पाहतां पाहतां जांबवान् पडला होता त्यास त्यांनीं पाहिलें. व त्यानेंहि त्यांस पाहिलें, तेव्हां जांबवान् मारुतीस म्हणाला, तूं सत्वर हिमालयाच्या ऋषभ ना० शृंगावर जाऊन, त्यावरील संजीवनी, विशल्यकरिणी, सुवर्णकरिणी, आणि संधानी, या चार औषधि घेऊन ये. आज्ञेनें मारुति त्या घेऊन आला

असतां, रामलक्ष्मण आणि सर्व सैन्य त्याच्या योगानें सजीव झालें ( वा० रा० युद्ध० स० ७४ ).

नववे दिवशीं सुग्रीवाच्या आज्ञेनें बहुत वानर लंकेंत शिरून, तिचा विध्वंस करूं लागले असतां, रावणाच्याहि आज्ञेनें कुंभ आणि निकुंभ ( कुंभकर्णाचे पुत्र ) यूपाक्ष, शोणिताक्ष, प्रजंघ व कंपन, इ० राक्षस त्यांशीं युद्धास प्रवर्तून मरण पावले ( वा० रा० युद्ध० स० ७५–७७ ), व हे मेल्यावर मकराक्ष युद्धास आलेला, त्यास तर रामानेंच मारिलें ( स० ७८–७९ ).

दुसरे दिवशीं इंद्रजित् आला, व त्यानें बहुत वानर मारून, मायामय सीता ( मिथ्या सीता )वानरांस खऱ्याप्रमाणें दाखवून तिचा वध केला, आणि तेथून निघाला तो निकुंभिलेस जाऊन त्यानें गुप्त हवन आरंभिलें. त्यावरून तें वृत्त बिभीषणानें रामास कळवून, त्याच्या नाशार्थ लक्ष्मणास पाठविलें, त्यांत लक्ष्मणानें इंद्रजितास मारिलें ( १ इंद्रजित् श० पहा ). इंद्रजित् मरण पावल्यावर, जे वानर युद्धांत मरण पावले होते, व कित्येक मूर्च्छित झाले होते, त्या सर्वांस सुषेणानें ( वानरांतील वैद्यानें ) पूर्वोक्त औषधींच्या योगेंकरून सजीव व आरोग्य केलें ( वा० रा० युद्ध० स० ९२ ). त्यानंतर रावणाचें आणखी कांहीं सैन्य युद्धास आलें असतां, त्यांत रामानें असा चमत्कार केला कीं, राक्षसांस क्षणांत एक, व क्षणांत सहस्रावधि राम दिसावेत, त्यामुळें राक्षस भ्रांत होऊन, चकितासारखे अवलोकन करीत आहेत तों, दहा सहस्र रथ, अठरा सहस्र गज, चौदा सहस्र अश्वारोह, व कित्येक पदाति, एका मुहूर्तांत नष्ट करून, उर्वरितांस पळावयास लाविलें ( स० ९४ ).

युद्धास गेलेले राक्षस कांहीं मरण पावून, कांहीं भ्रांत होत्साते परत आले असें रावणानें पाहून तो गुप्तरूपानें जयश्रीच्या लोभेंकरून हवनास बसला; परंतु त्यास वानरांनीं विघ्न केल्यामुळें, तेथून रोषानें उठून महोदर, महापार्श्व, आणि विरूपाक्ष यांस समागमें घेऊन मोठ्या सैन्यासहित युद्धास आला(स०९५–९६). त्यांत सुग्रीवानें विरूपाक्ष आणि महोदर यांस मारिलें, व अंगदानें महापार्श्वास मारिलें (स०९७–९९). नंतर रावण रामासंमुख होऊन, उभयतांचें अनिवार युद्ध झालें. त्यांत बिभीषणावर त्यानें एक शक्ति टाकलेली लक्ष्मणानें मध्येंच त्रिधा खंडित केल्यामुळें, रावणानें क्रोधेंकरून मयासुरदत्त शक्ति पुनः बिभीषणावर सोडिली. तिचेंहि निवारण करावें म्हणून पुनः लक्ष्मण मध्यें आडवा आला असतां, ती महादुर्धर शक्ति त्याच्या वक्षस्थळावर पडून तो भूमीवर पडला, असें पाहून रावण लंकेंत प्रवेशला ( स० १००–१०१ ). इकडे लक्ष्मणास सुषेणानें पुनः सजीव करून सर्व वानरहि विशल्य केले ( स० १०२ ).

लक्ष्मण सावध झाला, व सर्व वानरहि शल्यरहित झाले, असें रावणानें ऐकून तो निराश झाला, व कुंभकर्ण, इंद्रजित्, इ० मोठमोठ्या वीरांचें स्मरण करून शोक करूं लागला. तथापि मग त्यानें तसेंच धैर्य धरिलें व युद्धास येऊन उभा राहिला. हा दिवस रावणाचा रणांत येण्याचा शेवटला होता, असें पाहून इंद्रानें त्या दिवशीं मातलीस आज्ञा केली कीं, तूं रणांत सत्वर रथ घेऊन जा, व रामास याच्यावर आरूढ कर. त्यावरून मातलि रथ घेऊन आला असतां, रामानें त्यावर आरोहण केलें, व त्या दिवशीं रामानें रावणाशीं मोठें तुमुल युद्ध केलें ( १०३ ). रावणाच्या सारथ्यानें मध्यंतरीं रावण भ्रांत झाला असें पाहून, रणांतून त्याचा रथ माघारा परतविला. त्यावरून रावणानें त्यास रागें भरून, पुनः रामासंमुख रथ आणविला ( स० १०४–१०५ ).

रावण, रामाशीं युद्धास आला असतां, त्यास दुश्चिन्हें होऊं लागलीं, त्यांची त्यानें गणना न करतां, युद्धास आरंभ केला. त्यावरून रामानेंहि इकडे मातलीस सावधपणानें सारथ्य करण्याविषयीं सुचविलें ( वा० रा० यु० स० १०७ ). नंतर उभयतांचें युद्ध आरंभलें, व रामानें प्रथमतः रावणाच्या रथाचा ध्वज तोडून, त्याचीं शिरें तोडण्यास आरंभ केला. परंतु शिरें तोडलीं कीं, पुनः उत्पन्न व्हावीं, म्हणून पुनः रामानें तोडावीं, असें शतवार झालेलें रामानें पाहून, अगस्त्य ऋषीनें दिलेल्या बाणाचा प्रयोग करून, त्याचें हृदय वेधिलें, व तें वेधितांच रावण गतप्राण होऊन भूमीवर पडला. पडतांच स्वर्गांत दुंदुभिवादन होऊन, रामावर देवांनीं पुष्पवृष्टि केली ( यु० स० ११० ). ( भार० वन० अ० २९० ). रावण मरण पावला असतां, बिभीषणास अनिवार दुःख झालें. त्याचें रामानें सांत्वन करून, रावणाची उत्तरक्रिया करण्याची आज्ञा केली ( स० १११ ). इतक्यांत मंदोदरी इ० स्त्रिया रणभूमीवर येऊन शोक करूं लागल्या. त्यांचेंहि रामानें सांत्वन करून, त्यांस लंकेंत पाठविलें ( स० ११२–११३ ). रावणाचें उत्तरकार्य झाल्यावर, बिभीषणास राज्याभिषेक करण्याची रामानें लक्ष्मणास आज्ञा केली. व सीतेस

रावण मारल्याचें वृत्त कळावें म्हणून, मारुतीस तिजकडे पाठविलें ( स० ११४ ). रामानें आज्ञा केल्याप्रमाणें लक्ष्मणानें बिभीषणास राज्याभिषेक केला. व मारुतीनें सीतेस रावणवधाचें वृत्त अशोकवनिकेंत जाऊन कळविलें. तें ऐकून सीता हर्षित होऊन, तिनें रामदर्शनाची इच्छा मारुतीस दर्शविली. त्याप्रमाणें मारुतीनें रामास तो तिचा हेतु येऊन कळविला ( स० ११५ ). रामानें सीतेस, आपणाकडे घेऊन येण्याविषयीं बिभीषणास आज्ञा केली. तीप्रमाणें त्यानें अशोकवनिकेंत जाऊन तिला मंगलस्नान करविलें, व वस्त्राभरणांनीं गौरवून शिबिकेंत बसवून रामाकडे आणिलें. नंतर ती येऊन रामाच्या पार्श्वभागीं उभी राहिली असतां, रामानें तिला दुःसह वाक्शस्त्रांनीं ताडन केलें. त्यावरून तिनें रामाचा हेतु ओळखून अग्निप्रवेश केला, व त्यांतून पुनः ती सुरक्षित बाहेर आली, असें पाहून इंद्रादिक देवांनीं रामाची स्तुति केली ( वा० रा० युद्ध० स० ११६–१२१ ).

नंतर रामानें इंद्रास आज्ञा केली कीं, मजकरतां कोट्यावधि वानर युद्धांत मृत झाले आहेत, त्यांस तूं अमृतवृष्टीनें सजीव करावेंस. त्यावरून इंद्रानें सर्वांस सजीव केलें. असें पाहून रामानें बिभीषणास सांगितलें कीं, आतां तूं लंकेंत स्वस्थ राज्य करावेंस, व सुग्रीवादिक वानरांनीं आपआपल्या स्थळास जावें. परंतु त्यांनीं विनंति केली कीं, आम्हीं अयोध्येंत तुझा राज्याभिषेक पाहण्यास इच्छितों, व तूं येथें मंगल स्नान करून नंतर अयोध्येस जावेंस असें म्हणतों. त्यावर रामानें उत्तर केलें कीं, भरतावांचून मला मंगलस्नान करणें नाहीं; मात्र तुमची इच्छा आहे त्या अर्थीं अयोध्येस चलावें. त्यावरून बिभीषणानें पुष्पकविमान आणविलें. तेव्हां रामचंद्र त्यांत सीता, लक्ष्मण, बिभीषण व सकल वानर त्यांसहवर्तमान आरूढ झाला, व त्यानें विमानदेवतेस अयोध्येकडे चलावें म्हणून आज्ञा केली ( वा० रा० युद्ध० स० १२२–१२४ ).

विमान अंतरिक्षांतून चालू झाल्यावर, रामानें सीतेस हा सुवेलाचल, ही युद्धभूमि, हा समुद्रावर बांधलेला सेतु, हा मी स्थापिलेला रामेश्वर ना० महादेव, हा महेंद्र पर्वत, व ही किष्किंधा नगरी पहा, म्हणून दाखवितांच, तिनें तें तें सर्व अवलोकन केलें. नंतर तिच्या इच्छेवरून सुग्रीवादिकांच्या स्त्रिया रामानें विमानांत घेतल्या व पूर्ववत् विमान चालू लागलें. असें पाहून, हा ऋष्यमूक पर्वत, हें पंपासरोवर, हा शबरीचा आश्रम, हें कबंधवधाचें स्थल, हा जटायुवट पहा म्हणून सांगितलें, व तेथें तेथें झालेलें जें जें वृत्त तेंही तिला कथन केलें. त्यापुढें पंचवटी, व गोदावरी नदी, शरभंग व अत्रि इ० यांचे आश्रम, विराधवधाचें स्थान, चित्रकूटपर्वत, यमुनानदी, भरद्वाजाचा आश्रम, भागीरथी नदी, शृंगवेरपुर, इ० दाखवून म्हणाला कीं, ती अयोध्या दूर दिसत असलेली पहा. असें ऐकून सीतेनें अयोध्येस नमस्कार केला ( वा० रा० युद्ध० स० १२५ ).

नंतर रामचंद्र भरद्वाजाश्रमांत उतरला, व चौदावें वर्ष पूर्ण होण्यास एकाच दिवसाचा अवधि होता म्हणून, त्यानें, आपण आलों हें सत्वर भरतास कळविण्यासाठीं त्याकडे मारुतीस पाठविलें. त्याप्रमाणें मारुति तिकडे गेला, व भरतास त्यानें, राम भरद्वाजाश्रमीं आला, उद्यीक तुला भेटेल म्हणून सांगितलें. त्यावरून त्यास पराकाष्ठेचा हर्ष होऊन, त्यानें मारुतीस आलिंगन दिलें, व शत्रुघ्नाकडून सर्व अयोध्यानगरी शृंगारविली. इकडे भरद्वाजानें केलेलें आतिथ्य स्वीकारून, राम एका क्षणांत नंदिग्रामीं आला. तेव्हां भरताची व त्याची भेट होऊन, परस्परांस जो आनंद झाला, तो वर्णन करितां येत नाहीं. भरतानें सुग्रीव, बिभीषण, इत्यादिकांस आलिंगनें दिलीं. नंतर रामानें कौसल्यादिक मातांस वंदन करून, वसिष्ठादिकांस वंदन केलें. याप्रमाणें होतांच भरतानें ज्या रत्नमय पादुका पूर्वी चित्रकूटपर्वतीं रामाच्या पायांस स्पर्शवून सिंहासनावर स्थापविल्या होत्या, त्या शत्रुघ्नाकडून आणवून त्याच्या पायांत घातल्या, आणि म्हणाला, जें राज्य तूं माझ्या ठायीं न्यासभूत केलें होतेंस, तें तुझें तुला अर्पण केलें आहे. असें म्हणून उगाच राहिला ( वा० रा० युद्ध० स० १२६–१२९ ).

भरतानें राज्य स्वीकारण्याची केलेली विनंति रामानें मान्य केली. नंतर श्मश्रुकृंतक आलेला पाहून, रामानें त्याकडून प्रथम भरताच्या जटा शोधविल्या ( विंचरून मोकळ्या करविल्या ). व मंगल स्नान घालविलें. नंतर क्रमानेंच लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण आदिकरून सर्वांस मंगलस्नानें करवून, रामानें स्वतः आपणहि स्नान केलें ( येथें सुग्रीव, बिभीषण इ० कांनीं मनुष्यासारखीं रूपें धारण केलीं होतीं ). रामाचें स्नान झाल्यावर भरतानें त्यास, व इतरांस वस्त्राभरणें दिलीं, आणि सर्वांस दिव्यान्नभोजन समर्पण केलें. नंतर अयोध्येंत राम प्रवेशला, त्या काळीं सह-

स्नावधि स्त्रिया, आपआपल्या मंदिरांतील उपरिभागीं उभ्या राहून, रामास आयुष्यवायनें करूं लागल्या. रामचंद्र रथांत बसला होता, व इतर सुग्रीवादिक गजांवर आरूढ झाले होते. अयोध्येंतील मुख्य मंदिरांत राम प्रवेशल्यावर, वसिष्ठांनीं सुमुहूर्त पाहून, रामाच्या राज्याभिषेकाची सिद्धता करविली. चतुःसमुद्रांचीं, व पंचशत नद्यांचीं जलें आणवून, रामास सर्व ऋषींनीं स्नान घातलें. नंतर अलंकार धारण करवून सिंहासनावर बसविलें. रामानें अभिषेक होतांच लक्षावधि अश्व, धेनु, वस्त्रें, आभरणें व तीस कोटि सुवर्णमुद्रा ( मोहोरा असतील ) दान केल्या. याप्रमाणें सोहळा झाल्यावर, साहा महिनेपर्यंत सुग्रीवादिकांस ठेवून घेऊन, नंतर गौरवून निरोप दिल्यावर सुग्रीव किष्किंधेस, व बिभीषण लंकेस गेला.

रामानें भरतास यौवराज्यावर स्थापिलें होतें. त्यानें दहा अश्वमेध व पौंडरिकादिक अनेक यज्ञ करून, राज्य इतक्या नीतीनें केलें कीं, कोणास अकालीं मरण, स्त्रियांस वैधव्य, कधींच अकरा सहस्र वर्षांत झालें नाहीं. चोर, अग्नि, सर्प, इ० कांची भीति कोणास नसे, व पर्जन्य वेळच्यावेळीं ज्यास जितका पाहिजे तितकाच पडे ( वा० रा० युद्ध० स० १३० ).

## —युद्धकांड समाप्त—

---

रामचंद्र, अयोध्येस येऊन कोसलदेशाचें राज्य करूं लागला असें श्रवण करून, अनेक ऋषींसहित तेथें अगस्त्यऋषि प्राप्त झाला. ते आलेले ऋषि याप्रमाणें.--कौशिक, यवक्रीत, गार्ग्य, गालव, कण्व, रैभ्य, आणि च्यवन, हे पूर्वदिशेकडील; आत्रि, स्वस्त्यात्रेय, नमुचि, प्रमुचि, सुमुख, विमुख, रिमुच, हे दक्षिण दिशेकडील; नृषङ्गु, कवषी, कौषेय, धौम्य, उपगु, कामठ, धूम्र, हे पश्चिमेकडील; वसिष्ठ, कश्यप, आत्रि, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि, भरद्वाज, हे उत्तर दिशेकडील; याप्रमाणें आलेल्या ऋषींस रामानें उत्थापन देऊन, त्यांस पूजा इत्यादिक समर्पिल्यावर स्वासनीं स्थित झाला असतां, अगस्त्यानें रामाची स्तुति केली कीं, तूं रावणवध केलास, हें महत्कार्य केलेंस ( वा० रा० उत्तर० स० १ ). त्यावर रामानें प्रश्न केला असतां, अगस्त्यानें पुलस्त्य आणि विश्रवा ऋषि, यांचें चरित्र कथन केलें ( स० २-३ ). सुकेश राक्षसाचा इतिहास सांगितला ( स० ४-८ ). रावण, कुंभकर्ण, बिभीषण, या तिघांची उत्पत्ति, त्यांचें तप, त्यांस वरदान, त्यांचा दिग्विजय, त्रैलोक्यास पीडा, इंद्रपराभव, त्यांचे विवाह, व मेघनादाची उत्पत्ति, त्याचा पराक्रम, तसेंच इंद्रजित् नांव पडण्यास कारण, इ० वृत्त सविस्तर सांगितलें ( स० ९-३० ). हें ऐकून, रामानें असा प्रश्न केला कीं, रावणाहून भूमीवर कोणी बलवान् होता कीं नाहीं ? त्यावरून सहस्रार्जुन, व वाली यांचे इतिहास अगस्त्यानें सांगितलें ( वा० रा० उत्तर० स० ३१-३४ ). नंतर रामानें असें पुसलें कीं, मारुति बलवान् असतां, त्यानें वाली व सुग्रीव यांचा कलह कां तोडला नाहीं अथवा शासन तरी कां केलें नाहीं ? त्यावर त्यास आपल्या सामर्थ्याच्या विस्मृतीचा शाप असल्याचा इतिहास सांगितला ( स० ३५-३६ ). व त्याच प्रसंगानें वालिसुग्रीवांची उत्पत्ति रामास समजावी एतदर्थ ऋक्षरजाख्यान, व रावणाचा श्वेतद्वीपांत उपहास, हाही अगस्त्यऋषीनें कथन केला ( प्रक्षिप्त सर्ग १--५ ).

रामाच्या वागणूकीचा नित्य क्रम होता तो असा.- प्रतिदिवशीं अरुणोदयापूर्वीं बंदिजनांनीं येऊन, मंगल गायनेंकरून त्यांस जागृत करावें. जागें होतांच त्यानें लागलेंच उठून बहिर्दिशागमन, हस्तपादमुखप्रक्षालन, स्नान करून संध्योपासन करावें. नंतर अग्निहोत्रकर्म झाल्यावर वसिष्ठ पुरोहित, व ब्राह्मण यांचें पूजन, मध्यान्हकालीं पुनः संध्या, ब्रह्मयज्ञ, व तर्पण करून, अतिथिपूजनोत्तर भोजन करावें, आणि सभेंत यावें. सभेंत येण्याच्या वेळेस लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, व कित्येक मांडलिक राजे ( चार देशांचें एक मंडल, त्यांचे आधिपति ते मांडलिक राजे होत ), त्यांनींहि आपलें नित्यकृत्य उरकून, आधींच येऊन उभयभागीं उभें राहावें, व रामचंद्र आला असतां, त्यासमागमें चालत सभेस येऊन, तो सिंहासनावर बसला म्हणजे, मग त्यांनीं यथायोग्यस्थळीं बसावें. नंतर रामानें राज्यकारभारासंबंधीं कार्यें, व जनांचीं कार्यें समाप्त झाल्यावर, कांहीं इतिहासांचें श्रवण करून, सायंकाल होतांच संध्योपासनादिक कृत्यें करून, अंतःपुरांत प्रवेश करावा ( वा० रा० उत्तर० स० ३७ ).

रामास राज्याभिषेक झाला, त्याकाळीं त्या समारंभास सीरध्वजादिक आप्त, व प्रतर्दनादिक मित्र ( इंद्रापासून ब्रह्मविद्या संपादन करणारा काशीपुरीचा राजा ) इ० राजे शिवाय करून, तीनशें मांडलिक आले होते. त्यावरून रामाची सत्ता संपूर्ण भरतवर्षावर जरी नसेल,

तरी भरतखंडाच्या बाहेर बरीच लांबवर होती असें दिसतें; कारण शत योजनें औरस चौरस प्रमाणाचे भरतखंडांत देश सातशेंच आहेत. तात्पर्य, अशा आलेल्या राजांस रामानें सन्मान करून राज्याभिषेक झाल्यावर मार्गस्थ केलें ( वा० रा० उत्तर० स० ३८). बिभीषणानें रामास दिलेलें पुष्पक विमान, तो पृथिवीवर होता तोंपर्यंत त्यासमीपच होतें. त्याच्या मागें तें कुबेराकडे गेलें ( स० ४१ ).

सीतेस रामापासून गर्भधारण होऊन, तिला ऋषींच्या आश्रमांत वास करावा असें वाटलें. त्यावरून, रामानें तिला वाल्मीकिऋषीच्या आश्रमांत नेऊन ठेविलें ( कुशीलव श० पहा. ) ( स० ४२–४८ ). नंतर सुमंत्रानें लक्ष्मणास, भृगुऋषीची स्त्री विष्णूनें मारिली, त्यावरून त्यानें विष्णूस शाप दिला होता कीं, तुलाहि मजसारिखाच स्त्रीवियोग होईल; तोच हा राम जन्मला आहे व स्त्रीवियोगाचा अनुभव घेत आहे, असा पूर्व इतिहास कथन केला ( दुर्वासदशरथसंवाद ). त्यानंतर रामानें लक्ष्मणास, ब्राह्मणांचें कार्य राजानें सत्वर पाहून, त्यांस मार्गस्थ करीत जावें, न केल्यास त्यांचा कोप होऊन हानि होत्ये, त्याविषयीं नृगराजाचा इतिहास सांगितला ( स० ५३ ५४ ). निमिराजाचा इतिहास, ब्राह्मणाचा अपमान होत जाऊं नये अशाविषयीं सांगितला ( स० ५५– ५७ ). ब्राह्मण सांगतील तसें वागत जावें, त्यांच्या आज्ञेबाहेर वागूं नये, वागल्यास हानि, अशाविषयीं ययातिराजाचा इतिहास सांगितला ( स० ५८–५९).

रामचंद्र राज्य करीत असतां, वादी व प्रतिवादी महाद्वारावर आले,असा वर्षांतून एकादा दिवस आला तर येई, इतकें राज्य सुरळीत चाललें होतें. प्रत्यहीं लक्ष्मणानें महाद्वारावर जाऊन, प्रायः हेंच सांगत सभेंत माघारें यावें कीं, महाद्वारावर कोणी वादी व प्रतिवादी नाहीं. याप्रमाणें राज्यव्यवस्था चालत असतां, एकदां एका श्वानाचा वाद असल्यामुळें तो महाद्वारीं येऊन उभा राहिला होता. तो वाद असा कीं, हा श्वान एकदां मार्गानें चालला असतां, समोरून कोणी भिक्षु ( संन्यासी ) येत होता. त्यास, हा आपणास चावावयास येतो असें वाटून त्यानें यास दंडानें मारिलें होतें. सारांश, हा श्वान उभा असतां, नित्याप्रमाणें लक्ष्मण महाद्वारावर आला, आणि पाहूं लागला तों वादी तर कोणी नाहीं, परंतु श्वान उभा आहे. तेवढ्यावरून लक्ष्मणानें याचा कांहींतरी वाद असावा असें अनुमान करून रामास कळविलें.रामानें तत्काळ बाहेर येऊन, श्वानास काय आहे म्हणून पुसतांच, त्यानें मनुष्याप्रमाणें भाषण करून सर्व वृत्त कळविलें. तें ऐकून रामानें, भिक्षूस काय दंड करूं म्हणून विचारिलें. श्वान म्हणाला, त्याला अल्प काळपर्यंत कुलपति करा म्हणजे झालें. कुलपति म्हणजे एकाद्या ग्रामाचा अधिकारी ( कुळकरणी ). त्याचप्रमाणें रामानें भिक्षूस दंड करून श्वानास मार्गस्थ केलें. कुळकरणीपणाचें काम भिक्षूस अयोग्य म्हणून, हा त्यास दंडच होय, असें यांतील तात्पर्य ( प्रक्षिप्त स० २ ). असाच एक, गृध्राचा व उलूकाचा वाद रामानें तोडला ( प्रक्षिप्त स० ३ ).

एकदां कित्येक ऋषींसहवर्तमान च्यवनभार्गव रामाकडे आला. त्याचा रामानें सन्मान केल्यावर, त्यानें, मधुराक्षसानें अतिशय पीडा जनांस दिल्याचें सांगितलें. त्यावरून रामानें त्याच्या नाशार्थ शत्रुघ्नास पाठविलें ( स० ६०–६४ ) (शत्रुघ्न श० पहा).

कांहीं कालानें एका ब्राह्मणाचा पुत्र अकालीं मरण पावला असतां, त्यानें तो रामाच्या महाद्वारीं आणून टाकिला. त्यावरून रामास वाईट वाटलें कीं, मी इतका जपून चालत असतां असें कसें झालें ? इतक्यांत ब्राह्मण बोलला, रामा, मुलगा उठला तर बरें; नाहीं तर प्राणत्याग करीन ( वा० रा० उत्तर० स० ७३ ). तें ऐकून,रामसभेंत मार्कंडेय,मौद्गल्य, वामदेव, काश्यप, कात्यायन, जाबालि, गौतम आणि नारद, असे आठ धर्मशास्त्रवेत्ते मंत्री असत. त्यांतील नारदानें रामास सांगितलें कीं, राष्ट्रांत कोणी तरी शूद्र तप करीत असावा, यास्तव त्याचा शोध व्हावा ( स० ७४ ). त्यावरून राम पुष्पकविमानांत बसला व चोंहोंकडे चारी दिशांस हिंडतां हिंडतां एक शंबुक नांवाचा शूद्र त्यास तप करीत असलेला दृष्टीस पडला. त्यास रामानें तत्काळ मारिलें, व मारतांच अयोध्येंत मृत झालेला ब्राह्मणपुत्र सजीव झाला ( जंबुक श० पहा ).

नंतर तसाच राम फिरत फिरत अगस्त्य ऋषीच्या आश्रमास गेला. तेथें त्यानें याचा सत्कार करून, एक अपूर्व रत्नमय कंकण यास दिलें. त्याविषयीं हें कोणाचें व आपणास कसें प्राप्त झालें, इत्यादि वृत्त रामानें पुसलें असतां, त्यानें मूळ इतिहास कथन केला ( ३ श्वेत श० पहा ). पुढें रामानें अश्वमेध केला. त्यांत अनेक ऋषि प्राप्त झाले असून, वाल्मीकि ऋषिही आला होता. त्यासमागमें कुशीलव हेही आले होते. त्यांकडून वाल्मीकीनें प्रत्यहीं वीस सर्ग, याप्रमाणें

रामायणकाव्य रामास समग्र ऐकविलें; तें त्यांनीं तंत्रीताल्युक्त मधुरस्वरानें इतकें उत्तम गायिलें कीं, रामानें त्या कुमरांस अठरा सहस्र सुवर्णमुद्रा देण्याची आज्ञा केली. परंतु त्यांनीं तें द्रव्य घेतलें नाहीं. हें अश्वमेधाचें चरित्र जैमिनी अश्वमेधांत लिहिलें आहे. येथें त्याचा विस्तार मुळींच नाहीं ( कुशीलव श० पहा ).

भूदेवीनें केलेलें सीतेचें ग्रहण, यावरुन राम निजधामास जाण्यापूर्वींच सीता अदृश्य झाली ( वा० रा० उत्तर० स० ९७ ). कालांतरानें कौसल्या, सुमित्रा, आणि कैकेयी मरण पावून स्वर्गीं गेल्या ( स० ९९ ).

पुढें युधाजितानें सांगितल्यावरुन, शैलूष गंधर्वाच्या तीन कोटी वंशजांचा पराभव करुन सिंधुदेश भरताकडून घेवविला. व तेथें तक्ष आणि पुष्कर या दोघां भरतपुत्रांस राज्याभिषेक केला, व लक्ष्मणाचे पुत्र अंगद आणि चंद्रकेतु यांस कारुपथ देशांत स्थापिलें ( ५ भरत श० पहा ).

रामचंद्रानें अकरा सहस्र वर्षें राज्य केल्यावर, ब्राह्मणाच्या रूपानें काल याकडेस आला, आणि मला तुशीं एकांतीं कांहीं भाषण कर्तव्य आहे असें म्हणाला. त्यावरुन रामानें तथास्तु म्हणून, लक्ष्मणास द्वारावर उभें करुन आज्ञा केली कीं, जर या एकांतांत तिसरा कोणी येईल, तर तो मला वध्य होईल असें समज. इतकें बोलून, राम आलेल्या ब्राह्मणांसहित एकांतीं गेला असतां, त्यानें तुमचें पृथिवीवरील काय कृत्य व्हावयाचें होतें तें सर्व झालें असल्यामुळें आतां तुम्ही स्वधामीं चलावें म्हणून प्रार्थना केली. तें भाषण रामानें मान्य केलें व आतां लवकरच येतों म्हणून त्यास सांगून निरोप देणार इतक्यांत, लक्ष्मण आंत येऊन त्यानें विनंति केली कीं, बाहेर दुर्वास ऋषि आले आहेत व ते आपल्या भेटीची इच्छा करीत आहेत. तें ऐकतांच रामानें ब्राह्मणरूपी कालाचा सत्कार करुन त्यास मार्गस्थ करितांच, तो अंतर्धान पावला असें पाहून, त्यानें बाहेर येऊन दुर्वासाचें दर्शन घेतलें, व त्यास यथेच्छ अन्नाचें भोजन देऊन वाटेस लाविल्यावर, स्वप्रतिज्ञेचें स्मरण होऊन, लक्ष्मणाविषयीं त्यास अनिवार दुःख झालें.

आमच्या एकांतांत तिसरा कोणी येईल तो मला वध्य होईल, अशी रामाची लक्ष्मणास निक्षून आज्ञा असतां, तो आंत गेला, त्याचें कारण झालें तें असें.— रामाचा व ब्राह्मणरूपी कालाचा संवाद चालला असतां लक्ष्मण द्वारावर उभा होता, तों तेथें एकाएकीं दुर्वास ऋषि प्राप्त झाला, व त्यास म्हणूं लागला कीं, राम कोठें आहे, तो मला सत्वर दाखीव. लक्ष्मणानें विनंति केली, एकांतांत राम असल्यामुळें क्षणभर अवकाश करावा, अथवा कांहीं आज्ञा असेल तर मला करावी. दुर्वास म्हणाला, राम मला तूं सत्वर दाखवितोस ? कीं, रघुवंश भस्म करूं ? हीं अक्षरें ऐकून, लक्ष्मणानें पाहिलें कीं, सर्व वंशक्षय व्हावा, त्यापेक्षां आपण एकट्यानेंच मरावें हें बरें, म्हणून तो आंत रामाकडे गेला. सारांश, वसिष्ठास रामानें हें वर्तमान कळविलें. तेव्हां त्यांनीं सांगितलें, तूं लक्ष्मणास दुर्भाषणांनीं ताडन कर म्हणजे त्याचा वधच केल्याप्रमाणें होईल. त्यावरुन रामानें तसें करितांच, लक्ष्मण अयोध्येंतून निघून सरयूतीरीं आला, व तेथें योगधारणा करुन स्वर्गीं गेला ( वा० रा० उत्तर० स० १०४–१०६ ).

लक्ष्मणाचें निधन श्रवण करुन, राम अत्यंत उदास झाला, व भरतास राज्यावर स्थापूं लागला; परंतु तो ऐकेना असें पाहून, कुशास अयोध्येच्या राज्यावर स्थापिलें, व लवास श्रावस्ती नगरींत स्थापिलें. नंतर शत्रुघ्नाकडे, इकडे झालेलें वृत्त कळविण्याकरितां दूत पाठविला असतां लागलाच तो मथुरेच्या राज्यावर पुत्रास स्थापून अयोध्येस आला. त्याचप्रमाणें किष्किंधेहून सुग्रीव अंगदास राज्यावर स्थापून येऊन पोहोंचला असतां, लंकेहून बिभीषणहि प्राप्त झाला. त्यांस आलेले रामानें पाहून, बिभीषणास व मारुतीस सांगितलें कीं, तुम्ही कल्प समाप्त होईपर्यंत पृथिवीवर रहावें. असें म्हणून त्यानें त्यांस जाण्याची आज्ञा दिली व वसिष्ठाकडून आपलें अग्निहोत्र सरयूतीरीं नेवविलें. नंतर आपण दर्भपाणि होत्साता, अयोध्येंतील जनांसहित सरयूतीरीं जातांच, तेथें आलेल्या विमानांत बसून तो निजधामास गेला ( वा० रा० उत्तर० स० १०७–१०९ ).

रामाच्या मागें अयोध्येंत कोणी राहिलें नाहीं, असा लेख आढळतो; परंतु तो विरुद्ध दिसतो; कारण जर असेंच झालें, अथवा होणार होतें, तर कुशास रामानें अयोध्येस कशाकरितां स्थापिलें, म्हणून कांहीं तरी लोक राहिले असें म्हटलें पाहिजे. मात्र कदाचित् राम निजधामास गेल्यावर कुशास तेथें चैन पडलें नसावें, आणि त्यामुळें त्यानें अयोध्या सोडिली असावी. म्हणून ती बहुत कालपर्यंत शून्य असून,

पुढें तिजमध्यें ऋषभ राजानें वसति केली असावी.

रामाची आकृति भव्य असे. त्याचे बाहु हत्तीच्या सोंडेप्रमाणें निमोळते असून, मुख, चंद्राप्रमाणें स्वच्छ, व नेत्र मोठे आणि आरक्त असत. अंगकांति, गौरवर्णांत कृष्णवर्णाची छटा, अशा प्रकारची श्यामवर्ण होती. तसेच हात, सरळ उभा राहिला असतां गुडघ्याखालीं पडणारे असत म्हणून, तो आजानुबाहु होता. श्लोक.—युवा श्यामो लोहिताक्षो मातंग इव यूथपः ॥ आजानुबाहुः सुमुखः सिंहस्कंधो महाभुजः ॥ ( भार० शांति० अ० २९ श्लो० ६० ).

यास, स्त्री एकच सीता नांवाची असून, तीवांचून इतर स्त्रिया मातेसमान असल्यामुळें, एकपत्नीव्रताविषयीं याची मोठी ख्याति होती. त्याचप्रमाणें हा एकवचनीहि होता. याची जन्मापासून सर्व वर्तणूक मनुष्यमात्रांस वळणाप्रमाणें ( कित्त्याप्रमाणें ) वळिवण्यासारखी अशीच सर्वमान्य आहे. तसाच हा विष्णूचा अंश असल्यामुळें, याच्या अंगीं अलौकिक सामर्थ्यहि होतें; परंतु वाल्मीकीच्या कथित भविष्याबाहेर यास चालणें नव्हतें म्हणून, सामान्य पुरुषांप्रमाणेंच हा वागतां दिसे, आणि त्याच कारणामुळें याला मर्यादावतार अशी म्हणण्याची लोकांत रूढि आहे.

याचें अध्यात्मविषयक ज्ञान किती अगाध,व निश्चयाचें असून, भाषणांत प्रौढता किती होती, हें रामगीता पाहिली असतां तेव्हांच ध्यानांत येतें. इतकें असून नित्यकर्मास व ईश्वरोपासनेस हा पराकाष्ठेचा जपणारा असा असे. ईश्वरोपासना करण्याविषयीं यानें अगस्त्य ऋषीपासून शैवीदीक्षा घेतली होती. शैवीदीक्षा म्हणजे आनंदरूप परमात्म्याच्या उपासनेची दीक्षा असा अर्थ.

यानें अकरा सहस्र वर्षेपर्यंत राज्य केल्याचें तर सर्वांस विदितच आहे.

**श्लोक.**

दश वर्षसहस्राणि दश वर्षशतानि च ॥
अयोध्याधिपतिर्भूत्वा रामो राज्यमकारयत् ॥ ( भार० शांति० अ० २९ श्लो० ६१ ). त्यापूर्वी याचें वय सुमारें चाळीस वर्षांचें असावेंसें वाटतें. याच्या मागें राज्य करणारे व वंशवर्धक कुश आणि लव असे यास दोन पुत्र होते, त्यांचीं नांवें वर ध्वनितार्थानें आलीं असल्यामुळें येथें स्पष्ट करून दाखविलीं आहेत.

—उत्तरकांड समाप्त.—

३–वसुदेवास रोहिणीपासून झालेला पुत्र तो ( बलराम श० पहा ).

**रामकपर्वत**–सुरभीपत्तनाच्या दक्षिणेकडील पर्वत. येथें पांडवांच्या वेळेस तिमिंगल राजा होता ( भार० सभा० अ० ३१ ).

**रामकृष्ण**–दाशरथिराम आणि कृष्ण असे दोघे त्यांस, किंवा बलराम आणि कृष्ण त्यांस संज्ञा.

**रामठ**–देश ( भार० सभा० अ० ३२ ). येथें हिंग पुष्कळ उत्पन्न होत होता असें वाटतें, व त्यावरून असें नांव पडलें असावें.

**रामतापिनी**–अथर्वण वेदोपनिषत्.

**रामरहस्य**– ,, ,,

**रामह्रद**–जामदग्न्यरामानें क्षत्रियांस मारून त्यांच्या रक्तानें भरिलेले डोह ते ( भार० वन० अ० ८३ श्लो० २७ ) ( २ कुरुक्षेत्र श० पहा ). पांडवांच्या वेळेस यांची गणना तीर्थांत होती.

**रामसीर**–भारतवर्षीय देश.

**रामाधिवास**–तीर्थवि०.

**रामेश्वर**–सेतुबंधासमीपचें क्षेत्रवि०.

**रावण**–वैवस्वत मन्वंतर जें प्रस्तुत चालू आहे, त्यांतील ब्रह्ममानसपुत्र पुलस्त्य ऋषीचा पौत्र, व विश्रवा ऋषीपासून कैकसी ना० भार्येच्या ठायीं झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. हा जन्मला तेव्हांपासूनच यास दहा शिरें असत, म्हणून दशग्रीव असें याचें मूळ नांव होतें. पुढें रावण असें पडलें ( वा० रा० उत्तर० स० ९ ). ( भार० वन० अ० २७३–२७४ ). वैवस्वत मन्वंतराच्या अकराव्या चौकडींत याचें जन्म झालें होतें ( लिंग० अ० ६३ ). याच्या घरीं सर्व देव कामें करीत असल्याचें वाल्मीकिरामायणांत नाहीं.

दशग्रीव अंमल मोठा झाला असतां, एकदां याचा सापत्नभ्राता वैश्रवण, आपला पिता जो विश्रवाऋषि त्याच्या दर्शनास आला, त्या काळीं कैकसीनें त्याचें अभिज्ञान यास करून देऊन म्हटलें कीं, तूं असें ऐश्वर्य संपादन कर. त्यावरून रावण तथास्तु म्हणून, कुंभकर्ण व बिभीषण या उभय भ्रात्यांस समागमें घेऊन, गोकर्णक्षेत्रीं येऊन घोर तप करूं लागला. तें तप यानें दहा सहस्र वर्षेपर्यंत अशा रीतीनें केलें कीं, सहस्र वर्षें पूर्ण होतांच एक मस्तक तोडून, त्याचें अग्नींत हवन करावें. याप्रमाणें यानें नऊ सहस्र वर्षांत नऊ मस्तकांचें हवन करून, शेष राहिलेल्या

एका मस्तकानें सहस्र वर्षें पूर्ण झाल्यावर, त्याही मस्तकाचे अग्नींत हवन करूं लागला. त्या काळीं यास ब्रह्मदेव प्रत्यक्ष होऊन बोलले कीं, काय इच्छा असेल तो वर माग. यानें विनंति केली, आपण अमरत्व तर कोणास देतच नाहीं, त्या अर्थी येवढेंच द्यावें कीं, देव, दैत्य, दानव, नाग, यक्ष, सुपर्ण, इ० कोणाच्याही हातून मला मृत्यु नसावा. मनुष्य तर मला तृणभूतच आहेत. त्यास ब्रह्मदेवांनीं तथास्तु म्हणून म्हटलें कीं, हें तुला दिलें आहे. आतां तूं मस्तकें तोडिलीं आहेस त्याविषयीं असें देतों कीं, तीं सर्व तुझीं पूर्ववत् होऊन, तूं कामरूपधर ( इच्छेस येईल त्याप्रमाणें रूप धारण करणारा ) होशील. इतकें ऐकून, व ब्रह्मदेव तेथेंच अंतर्धान पावले असें अवलोकन करून उभय भ्रात्यांसहि वर प्राप्त झाले असतां, त्यांस घेऊन श्लेष्मातक वनांत पित्याकडे आला ( वा० रा० उत्तर० स० १० ).

दशग्रीव, कुंभकर्ण आणि बिभीषण, हे आपले दौहित्र ( मुलींचे मुलगे ) ब्रह्मदेवापासून वर पावून, बलाढ्य झाले असें ऐकतांच, सुमाली राक्षस, मारीच, विरूपाक्ष, प्रहस्त आणि महोदर, यांस व अन्य कित्येक राक्षसांस समागमें घेऊन, यास येऊन भेटला, व उपदेश करून म्हणाला कीं, वैश्रवणाकडे जी लंका आहे, ती त्याच्या ऐश्वर्यासहित, कोणत्या तरी उपायानें तूं घ्यावीस. परंतु रावणानें उत्तर केलें, ज्येष्ठ भ्राता पित्यासमान असतां, तेथें अशी अमर्यादा कशी करावी ? त्यावरून प्रहस्तानें यास मोह उत्पन्न केला. तेणेंकरून याची वृत्ति बदलून, यानें प्रहस्तासच दूत करून, लंका मागण्यास वैश्रवणाकडे पाठविलें. वैश्रवणानें पित्याचें ( विश्रवाऋषीचें ) अनुमोदन घेऊन लागलीच लंका रावणाच्या स्वाधीन केली, व आपण निघून हिमालयाच्या कैलास ना० शिखरावर जाऊन राहिला. इकडे लंकेंत रावणास राक्षसांनीं राज्याभिषेक केला ( स० ११ ).

एकदां दशग्रीव पृथिवीवर फिरत असतां, त्यास मयासुर भेटला, व त्यानें हा पराक्रमी आहे असें पाहून, आपली कन्या मंदोदरी यास दिली. तशीच एक शक्तिहि दिली. तीच पुढें यानें युद्धकाळीं बिभीषणावर सोडिली असतां, लक्ष्मणास लागली. असो, याचा जसा विवाह झाला, असाच कुंभकर्णाचा व बिभीषणाचाहि झाल्यावर, यानें आपली भगिनी शूर्पणखा, ती विद्युज्जिव्हना० राक्षसास विवाह करून दिली ( वा० रा० उत्तर० स० १२ ). पुढें यानें कुंभकर्णास निद्रेची पीडा होत्ये असें पाहून, दोन योजनें लांब, आणि एक योजन रुंद अशी त्यास गुहा करून देऊन, आपण एकटाच सर्वत्र संचार करीत, जनांस अनेक प्रकारें पीडा देऊं लागला. हें वर्तमान वैश्रवणास कळल्यावरून, त्यानें याकडेस असें करूं नको, या अर्थाचा संदेश देऊन दूत पाठविला. त्या दूतास राक्षसांकडून रावणानें भक्षवून, आपण वैश्रवणाशीं युद्धास गेला ( स० १३ ).

राक्षस सैन्यासहित दशग्रीव वैश्रवणावर चालून जाऊन, त्यानें त्याच्या अलकानगरीस वेढा दिला, व यक्षांचा नाश आरंभिला. त्यावरून वैश्रवणानें आपण स्वतः युद्धास न येतां, संयोधकंटक ना० यक्षास रावणाशीं युद्धास पाठविलें. परंतु यानें त्याचा पराभव करून, सूर्यभानु ना० द्वारपालास ठार मारिलें, व नगरींत प्रवेश केला ( स० १४ ). त्यावरून वैश्रवणानें माणिचर अ० माणिभद्र, त्यास दशग्रीवावर पाठविलें. त्यास त्यानें मूर्च्छित केलें असें ऐकून शुक्र, प्रौष्ठपद, इ० मंत्री समागमें घेऊन, कुबेर रावणासंमुख स्वतः आला, व त्यास अनेक प्रकारांनीं धर्मोपदेश करूं लागला. त्याचा यानें अनादर करून, कामरूपधरत्वयोगानें वैश्रवणाशीं युद्ध आरंभिलें. त्यांत त्याचा यानें पराजय करून, पुष्पक विमानहरणपूर्वक लंकेस गमन केलें ( स० १५ ).

एकदां पुष्पक विमानांत बसून, रावण फिरत फिरत महादेवाच्या कैलासपर्वतावरील शरवण वनासमीप गेला. तेथें आंत गेल्यास स्त्रीत्व प्राप्त होतें, हें त्यास विदित असल्यामुळें तेथेंच उभा राहिला, व वनाच्या बाह्य प्रदेशीं यानें एकाएकीं नंदीस पाहिलें. त्याची आकृति वानरासारिखें मुख, व ऱ्हस्वभुज, अशी पाहून, उपहासपूर्वक हास्य केलें. त्यावरून त्यानें यास शाप दिला कीं, तुझा नाश वानरच करतील. या नंदीनें दिलेल्या शापानें रावण क्रुद्ध झाला, व कैलासशिखर उचलण्याचा यत्न करूं लागला. तें महादेवानें जाणून, आपल्या अलौकिक शक्तीनें शिखर दाबिलें. तेणेंकरून याचे हात खालीं सांपडून, मोठ्यानें ओरडूं लागला. शेवटीं निरुपाय होऊन, सामगायनेंकरून यानें शिवाचें स्तवन सहस्र वर्षें केलें. त्या स्तवनानें दिशा, रावित ( नादित ) झाल्यामुळें, महादेवानें यास रावण असें नांव ठेवून, स्तवनानें संतुष्ट होत्साता चंद्रहास नांवाचा खड्ग देऊन, याची तेथून

मुक्तता करतांच, हा लंकेस परत आला ( स० १६ ).

पुढें यास वेदवतीचा शाप झाला ( वेदवती श० पहा ). त्यानंतर हा मरुत्तराजाचा यज्ञ चालला असतां तेथें युद्धार्थ गेला. त्यावरून तो उठूं लागला परंतु संवर्तानें उठूं दिलें नाहीं. तें पाहून यास वाटलें कीं, मरुत्तराजा मला भ्याला, म्हणून मी मरुत्तास जिंकलें अशी गर्जना करीत परत लंकेस आला. ( वा० रा० उत्तर० स० १८ ). यानें सर्वत्र हिंडून अनेक राजे जिंकले, परंतु सूर्यवंशोत्पन्न अनरण्य-राजाशीं याचें युद्ध झालें. त्यांत त्यानें यास शाप दिला ( स० १९ ). एकदां नारदानें यास सांगितलें कीं, तूं यमास जर जिंकशील, तर बलवान् खरा. त्यावरून हा यमाकडे गेला, व त्याशीं सात अहोरात्रें युद्ध केलें. त्यांत यम, आपलें घोर रूप प्रकट करून, त्यास कालदंडानें मारणार इतक्यांत, ब्रह्मदेवांनीं पुढील भविष्य त्यास कथन केलें. त्यावरून तो एका-एकीं रावणासमोरून अंतर्धान पावला. परंतु रावणास तो मला भ्याला असें वाटून जयघोष करीत लंकेस परतला ( स० २०-२२ ).

यानंतर रावणानें पातालांतील नागांस जिंकलें, व मणिपुरींत एक वर्षपर्यंत निवातकवचाशीं युद्ध केलें. परंतु जय होईना, तेव्हां त्यांशीं याचें सख्यच झालें. त्यापुढें अश्मनगरच्या कालकेयांशीं याचें युद्ध झालें. त्यांत शूर्पणखेचा भर्ता विद्युज्जिव्ह, त्याचा याच्या हातून वध झाला. नंतर वरुण लोकांस हा गेला, परंतु तेथें वरुण नसल्यामुळें, त्याच्या सेनापतींनें आम्ही हरलों असें म्हटल्यावरून, हा लंकेस परत आला ( वा० रा० उत्तर० स० २३ ).

एकदां रावण बलीकडे पाताळांत गेला, व त्यास म्हणूं लागला कीं, तुम्हांस विष्णूनें बद्ध केलें आहे म्हणून मीं ऐकिलें, व त्यावरून तुम्हास सोडवावें यास्तव इकडे आलों आहें. तर तो विष्णु मला दाखवावा, म्हणजे मी त्याशीं युद्ध करून तुम्हास सोडवीन. तें रावणाचें भाषण ऐकून बलीनें, हिरण्यकशिपूच्या कानांतील एक कुंडल रावणास दाखवून हें उचल म्हणून सांगितलें. रावण तें उचलावयास गेला असतां, थोडें उचलितांच लागलाच खालीं पडला. तेव्हां बलीनें त्यास उचलून सांगितलें. असें कुंडल कर्णांत धारण करणारा जो हिरण्यकशिपु, त्यास विष्णूनें मारिलें. तेव्हां तूं विष्णूशीं युद्धास कसा टिकशील ? तथापि तुझी इच्छा असेलच तर, माझ्या महाद्वारावर जो पुरुष उभा आहे, तोच विष्णु आहे. त्याशीं जाऊन युद्ध कर. त्यावरून रावण लज्जित होऊन माघारा लंकेस आला ( प्रक्षिप्त स० १ ).

रावण जेव्हां जेव्हां बाहेर फिरावयास जाई, तेव्हां तेव्हां देव, दानव, गंधर्व, यक्ष, इत्यादिकांच्या ज्या ज्या सुंदर कन्या त्यास दृष्टीस पडत, त्यांस तो धरून पुष्पक विमानांत घाली, व लंकेंत आणून ठेवी. याप्रमाणें यानें शतावधि कन्या आणून ठेविल्या असून, त्या सर्व यास शाप देत असत. एकदां शूर्पणखा याकडे येऊन, तिनें याची अतिशय निर्भर्त्सना केली; कारण तिच्या भर्त्यास यानें मारिलें होतें. त्यावरून रावणानें चौदा सहस्र राक्षसांसहवर्तमान खर राक्षस हिच्या साह्यास देऊन, हिला दंडकारण्याचें राज्य दिलें, व संतुष्ट करून मार्गस्थ केलें ( वा० रा० उत्तर० स० २४ ).

पुढें रावणास मंदोदरीपासून प्रथमच मेघनाद ना० पुत्र झाला ( १ इंद्रजित् श० पहा ). कांहीं कालानें मधुराक्षसानें याची माऊस बहीण कुंभीनसी, तिला लंकेंतून चोरून नेऊन तिशीं विवाह केला. त्यावरून रावणास कोप येऊन त्यावर तो युद्धार्थ चालून गेला असतां, कुंभीनसीनें याची प्रार्थना करून युद्ध होऊं दिलें नाहीं, म्हणून त्याशीं याचें सख्य झालें ( स० २५ ). पुढें यानें एका अप्सरेवर बलात्कार केला. त्यावरून यास नलकूबराचा शाप झाला कीं, जर रावण इतःपर अकामा स्त्रीवर बलात्कार करील, तर त्याचा मस्तक सप्तधा भग्न होईल ( स० २६ ) ( भार० वन० अ० २८० ).

एकदां रावण इंद्राशीं युद्धास गेला असतां, त्यांत याचा मातामह सुमाली, सावित्र ना० वसूनें मारला. त्यावरून मेघनादानें पुढें होऊन, देवांशीं घोर युद्ध केलें, व इंद्रास बांधून लंकेस आणिलें ( स० २९-३० ). त्यापुढें रावण एकदां सहस्रार्जुनाकडे गेला असतां तो नर्मदेवर गेला आहे असें ऐकून तिकडे यानें गमन केलें, व मध्यान्हकाल झाला होता म्हणून स्नान करून शिवलिंगार्चनास बसला ( स० ३१ ). इतक्यांत नर्मदेचें पाणी वाढून, रावण त्यांत बराच बुडाला तरी पूजा समाप्त होईपर्यंत तो उठला नाहीं. नंतर पूजा समाप्त करून, पाणी कशानें वाढलें त्याचा शोध करूं लागला तों त्यास कळलें कीं, खालच्या अंगास सहस्रार्जुन क्रीडा करीत आहे. त्यावरून हा तिकडे जातांच, उभयतांचें युद्ध झालें. त्यांत सहस्रार्जुनानें यास बांधून माहिष्मतीस नेलें. तेथून पुलस्त्य ऋषीनें यास सोडवून लंकेस परत आणिलें ( स०

३२–३३ ). याचप्रमाणें वालीनेंहि यास धरून किष्किंधेस नेऊन अंगदाच्या पाळण्यावर बांधिलें असतां पुलस्त्यानेंच पुनः सोडविलें ( स० ३४ ). पुढें याचें श्वेतद्वीपांत गमन व उपहास इ०. ( प्रक्षिप्त स० ५ ).

अशा रीतीनें बहुत काल गेला असतां, चालू मन्वंतराच्या चोवीसाव्या पर्ययांत ( चौकडींत ) सूर्यवंशीय दशरथ राजा, त्याच्या कौसल्या ना० ज्येष्ठ भार्येच्या उदरीं अयोध्येंत विष्णूच्या अंशानें रामचंद्र जन्मास आला, व सीता आणि लक्ष्मण यांसहवर्तमान पित्राज्ञेनें त्याचें येणें दंडकारण्यांत होऊन पंचवटींत राहणें झालें. तें वर्तमान प्रथमतः रावणास अकंपन राक्षसानें कळविलें ( वा० रा० अरण्य० स० ३१ ). पुढें शूर्पणखेचें विरूपकरण झाल्यावर तिच्या निमित्त खरादि राक्षसांचा वध झाला असतां, तिनेंहि सीतेच्या सौंदर्यवर्णनपूर्वक तेंच वृत्त यास येऊन कळविलें. त्यावरून हा कोपाविष्ट होऊन, मारीचास समागमें घेऊन पंचवटींत गेला, व सीतेचें हरण करून तिला लंकेंत नेऊन ठेविलें ( १ खर ). ( ४ मारीच ). ( पंचवटी श० पहा ).

सीतेस रावण घेऊन चालला असतां, तिच्या निमित्त याचें जटायूशीं युद्ध झालें ( जटायु श० पहा ). रावण सीतेस घेऊन लंकेंत चालला असतां, तिनें आपले अलंकार उत्तरीय वस्त्रांत बांधून, पंपासरोवरासमीपच्या ऋष्यमूकपर्वतावर बसलेल्या पांच वानरांत टाकून दिले; तथापि रावणानें तिला लंकेंतील अशोकवनिकेंत नेऊन ठेविलें ( वा० रा० अर० स० ५४ ). पुढें तिनें आपणास वश व्हावें, अशा अर्थाचें तिशीं याचें भाषण, व त्यावरून याची तिनें केलेली निर्भर्त्सना ( स० ५५–५६ ).

पुढें सीतेची शुद्धि करण्यासाठीं, मारुति लंकेस येऊन अशोकवनिकेंत बसला आहे इतक्यांत रावण तेथें आला, व सीतेस पूर्ववतच भाषण करूं लागला, परंतु तिनें त्याचा अतिशय धिःकार केल्यामुळें, तो तिच्या वधास प्रवृत्त झाला. परंतु धान्यमालिनीनें त्याचें सांत्वन करून लंकेस परत नेलें (वा० रा०सुंदर० स० १८–२२ ). दुसरे दिवशीं रावणास अंस वर्तमान कोणी सांगितलें कीं, कोणी एक वानर येऊन, त्यानें अशोकवनिका भंगिली, व तेथील प्रासादरक्षकांस मारून, तोहि भग्न केला. त्यावरून त्यानें मारुतीस धरून आणावें म्हणून कित्येक राक्षस पाठविले. ते त्यानें मारिले असें ऐकून इंद्रजित् आला, व त्यास ब्रह्मास्त्रानें बद्ध करून लंकेस घेऊन गेला ( वा० रा० सुंदर० स० ४२–४८ ). पुढें रावणाशीं त्याचें भाषण, व परत किष्किंधेस गमन इ० वृत्तांविषयीं ( हनुमान् श० पहा ).

लंका दग्ध करून मारुति गेल्यावर, रावणसभेंत विचार ( वा० रा० युद्ध० स० ६–७ ). त्यांत राक्षसांनीं मनुष्यवेष धारण करावेत, व रामाकडे जाऊन भरतानें आम्हांस तुझ्या साह्यास पाठविलें आहे असें सांगून, वानरसेना त्यापासून दूर करावी, नंतर संधी पाहून त्याचा वध करावा अशी युक्ति वज्रदंष्ट्रानें काढिली. ती सर्व राक्षसांस आवडून, ते आनंदानें नाचूं लागले असें पाहून, बिभीषणानें सर्वांस रागें भरून आपआपल्या स्थळीं बसविलें व रावणास पुष्कळ बोध केला.त्यावरून रावणानें सभाविसर्जन करून सर्वांस घरीं जाण्याची आज्ञा दिली ( स० ८–१० ). त्यानंतर रावणास कुंभकर्णाचा उपदेश ( स० १० ). यावर बिभीषणानें राम हा कोण, व त्याचें सामर्थ्य काय, इ० वर्णन करून आणखी रावणास बोध केला ( स० १४ ). त्यांवर इंद्रजिताचें भाषण व त्याचें कुंभकर्णानें केलेलें खंडन ( स० १५ ). शेवटीं रावणानें बिभीषणाचा अतिशय धिःकार केल्यामुळें तो रामास शरण गेला ( स० १६ ).

रावणानें शुक राक्षसास पाठवून, रामाची सैन्यसंख्या किती, तिचा आकार आणविला, व सुग्रीवास, तूं रामास सोडून परत जा, अशा अर्थाचा निरोपहि पाठविला ( स० २० ). राम सुवेलाचलीं ससैन्य येऊन उतरल्यावर, रावण, शुकसारणांस घेऊन उच्च प्रासादावर चढला असतां, त्यांनीं यास प्रत्येक वानर, त्याचा पराक्रम, व तो किती सेनेचा अधिपति, इ०कांचें परिज्ञान करून दिलें ( वा० रा० युद्ध० स० २६–२८ ). पुढें रावणानें विद्युज्जिव्ह प्रधानाच्या साह्यानें, रामाचें मायामय शीर, व चाप, निर्माण करून सीतेस नेऊन दाखवून तिचा छळ करून पाहिला, परंतु ती वश झाली नाहीं ( स० ३१–३२). त्यावरून रावणाचा मातामह माल्यवान् राक्षस, त्यानें रावणास बोध केला; त्याचा त्यानें धिक्कार केला ( स० ३५ ). यानंतर रावणानें युद्धाची सिद्धता केली ती अशी–लंकेच्या पूर्वद्वारीं प्रहस्त, दक्षिणद्वारीं महापार्श्व व महोदर, पश्चिमद्वारीं इंद्रजित्, मध्यभागीं विरूपाक्ष, याप्रमाणें असंख्य सेनेसहित हे महावीर स्थापून आपण स्वतः शुकसारण व मोठी सेना तीसहवर्तमान उत्तरद्वारीं राहिला ( वा० रा० युद्ध० स० ३६ ).

युद्धास आरंभ झाल्यावर, प्रथम दिवशीं इंद्रजितानें लक्षावधि वानर मूर्च्छित पाडून, रामलक्ष्मणांस नागपाशानें बद्ध केलें, व मूर्च्छित करून परतला असतां, रावणास आनंद होऊन, त्यानें सीतेस पुष्पक विमानांत बसविलें, व त्रिजटेकडून त्यांची अवस्था तिला दर्शविली (स० ४६–४७). दुसरे दिवशीं रावणानें रामास पूर्ववत् स्वस्थ पाहून, त्याच्यावर धूम्राक्ष, वज्रदंष्ट्र, अकंपन, प्रहस्त इ० राक्षसांस समागमें सेना देऊन पाठविलें; परंतु ते सर्व तेथें जाऊन युद्ध करून मरण पावले (स० ५१–५७). युद्धाच्या साहव्या दिवशीं आपण स्वतःच युद्धास गेला, व पराभव पावून परतला ( स० ५९ ). सातव्या दिवशीं रावण सभेंत बसून पुढें कसें करावें तो विचार करूं लागला, व त्यास अनरण्य राजा, वेदवती, नंदी, इत्यादिकांच्या शापाचें एकदांच स्मरण होऊन, आपणास नरवानरांच्या हातून मरण्याचा प्रसंग येऊन पोहोंचला असें निश्चयात्मक वाटलें, व त्यावरून त्यानें कुंभकर्ण निद्रित होता, त्यास जागृत करण्याकरितां राक्षसास पाठविलें (स०६०). पुढें तो जागृत होऊन सभेस आला, व त्याचें याशीं कांहीं भाषण झाल्यावर, तो युद्धास जाऊन मरण पावला (कुंभकर्ण श० पहा ).

कुंभकर्ण मरण पावला असतां, विभीषणादिकांच्या बोधाचें त्यास स्मरण होऊन अनिवार दुःख झालें ( स० ६८ ). तें पाहून देवांतक, नरांतक, त्रिशिरा, आणि अतिकाय, हे चौघे पुत्र, महोदरादिकांस समागमें घेऊन, रावणाचें सांत्वन करून युद्धास गेले ( स० ६९ ). व ते सर्व युद्ध करून मरण पावले(स० ७२). त्यावर इंद्रजित् युद्धास गेला, व रामसेनेंतील सदुसष्ट कोटि वानर एका प्रहरांत मारून लंकेस परतला. तें पाहून रावणास आनंद झाला, व त्यानें पुनः कुंभ आणि निकुंभ या दोघांस असंख्य सेनेसहित युद्धास पाठविलें; परंतु त्यास, जय न येतां, ते सर्व मरण पावले ( स० ७३–७५ ). त्यानंतर मकराक्ष युद्धास गेला व तोहि मरण पावला ( स० ७८ ). नंतर निरुपाय होऊन आतां कोणास युद्धास पाठवावें असा रावण चिंतेंत पडला आहेः तों, इंद्रजित् रावणापुढें येऊन म्हणाला कीं, आपण शोक अगदीं करूं नये, आतां मीच युद्धास जातों, असें म्हणून तो युद्धास गेला, व लक्ष्मणाच्या हातून मरण पावला ( १ इंद्रजित् श० पहा ).

इंद्रजित् मरण पावला असें ऐकून, रावणास पराकाष्ठेचा शोक झाला, व क्रोधानें हातांत खड्ग घेऊन सीतेचा वध करण्यास निघाला, परंतु अविंध्य ना० सचिवानें, आपणासारख्यास स्त्रीवध करणें अनुचित होय, इ० अनेक वाक्यांनीं याचें सांत्वन करून यास माघारें परतविलें ( स० ९३ ). त्यावरून रावणानें लंकेंतील अशेष सैन्य युद्धास पाठविलें असतां, त्यांतील राक्षस बहुतेक मेल्यानें लंकेंतील घरोघरच्या राक्षसींत अनिवार शोक झाला ( स० ९४–९५ ).

याप्रमाणें पुत्रबांधव नष्ट झाले, व असंख्य सैन्यहि मरण पावलें, तरी यास जीविताशा सुटेना असें दिसतें, आणि त्यावरूनच तो शुक्राचार्यांकडे जाऊन, विनंति करूं लागला कीं, आपण आमचे गुरु असतां, आमचा असा पराजय व्हावा, हें आपणास योग्य दिसतें काय ? त्यावरून शुक्राचार्यानें यास एक मंत्र देऊन सांगितलें कीं, जर या मंत्राचा जप, तसाच होम निर्विघ्न सिद्धीस जाईल, तर तूं विजयी होशील. तें ऐकून यास मोठा हर्ष झाला, व आचार्यास वंदन करून लंकेंतील गुप्त स्थळांत अनुष्ठानास बसला. हें वर्तमान बिभीषणास कळतांच, त्यानें रामचंद्रास सांगून अंगदादिक वानर तिकडे पाठविले. त्यांनीं, सरमेनें ( बिभीषणाच्या स्त्रीनें ) दाखविल्या संकेताप्रमाणें रावण अनुष्ठानास बसला होता तेथें जाऊन त्यास विघ्न केलें; परंतु रावण आसन सोडून उठेना, म्हणून अंगद अंतःपुरांत गेला, व मंदोदरीस त्यानें ओढून आणून, याच्या समक्ष तिची विटंबना केली. तेव्हां तिनें अतिशय केलेला आक्रोश यानें श्रवण करून आसन सोडिलें, व अंगदादिकांस तेथून पळवून लाविलें. नंतर मंदोदरीचें समाधान करून हा युद्धास निघाला ( अध्यात्मरा० युद्ध० स० १० ).

यानें युद्धास निघतांना, जेवढी अवशेष सेना लंकेंत होती, तेवढी समागमें घेतली, व संपूर्ण प्रधानांसहवर्तमान रामासंमुख येऊन त्याशीं यानें अनिवार युद्ध केलें; परंतु त्यापासून रामास कांहीं व्यथा न होतां शेवटीं हा रामाच्या हातून मरण पावला ( २ राम श० पहा ). रावण मरण पावला त्यावेळेस त्याच्या वयाला चौदावी चौकडी आरंभली होती; कारण अकरावींत जन्म आणि चोविसावींत त्याचें मरण झालें होतें.

रावणाची शरीराकृति विशाल होती, तरी कुंभकर्णाइतकी नव्हती. यास दहा मुखें, व वीस हात, स्वाभाविक जन्मापासूनच असत. तथापि हा, कामरूपी असल्यामुळें, पाहिजे तेव्हां पाहिजे तें रूप

धारण करी. अंगाचा रंग केवळ काळा होता, म्हणून हा स्वाभाविकच भयंकर दिसे. शिवाच्या ठायीं जरी याची मोठी निष्ठा असे, तरी अभिचारकर्मी बुद्धि रत होती, म्हणून त्या भक्तीपासून याला समाधान झालें नाहीं. वेदामध्यें याची गति चांगलीच होती असें दिसतें; कारण, याच्या पूर्वी वेदामध्यें अध्याया-सारखे भाग नव्हते, त्यामुळें कोणतें प्रकरण कोठ-पासून कोठपर्यंत त्याची निवड होण्यास अडचण पडे. ती दूर व्हावी म्हणून, यानें चारहि वेदांत अध्याया-प्रमाणें खंड बांधलेले आहेत. याशिवाय ब्राह्मण, जीं वेदांचीं पदें म्हणतात, तीं यानेंच करून ठेविलेलीं असून, अध्ययनाच्या दृढीकरणासाठीं क्रम, घन व जटा, ह्यानेंच कल्पिलेल्या विकृति होत असें म्हणतात. यांत पदें यानेंच केलीं असल्याविषयीं माझ्या ऐकण्यांत एक उदाहरण आलेलें असें आहे—रावण ऋक्संहि-तेवर पदें लिहीत असतां, एक मंत्र त्याला असा आडळला कीं, त्यांत राम, हीं दोन अक्षरें लगत आलीं असून, प्रथमाक्षर पूर्वपदाच्या अंतीं व द्वितीयाक्षर उत्तर पदाच्या आरंभीं पद करतांना स्वाभाविकच तुटत असलेलें, प्रथमतः याच्या ध्यानांत न नेऊन, हीं दोन अक्षरें लगत येतात कीं काय असें यास वाटलें, व आल्यास काय करावें असा विचार पडला. इतक्यांत मंत्राचीं पदें पाडूं लागला; आणि पाहतों तर तीं अक्षरें एक पूर्व पदांत व एक उत्तर पदांत जाऊन सहजीं तुटलीं. तेणेंकरून यास पराकाष्ठेचा हर्ष झाला. यांत तात्पर्य, वाल्मीकीच्या भविष्याप्रमाणें होणारा जो रामावतार, त्याचेंच हें नांव असें यास वाटून, त्याशीं हा इतका विरोधानें वागत होता. हा मंत्र मी टिपून ठेवलेला, बहुधा माझ्या पुस्तकसंग्रहांत असेलसा वाटतो, पक्कें स्मरत नाहीं; कारण टिपल्याला वीस वर्षें सुमार झालीं आहेत.

**रावणि**–रावणाचे सर्व पुत्र ते; परंतु विशेष रूढि इंद्र-जिताविषयीं आहे.

**राष्ट्र**–( सो० वं० ) आयुराजाचा पुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या सुहोत्र ना० पुत्राचा पौत्र काशि नांवाचा राजा, त्याचा पुत्र तो. याचा पुत्र दीर्घतमा राजा.

**राष्ट्रपाल**–( सो० वं० ) नहुषकुलोत्पन्न यदुवंशांतील सात्वतकुलांत जन्मलेल्या उग्रसेनराजाच्या नऊ पुत्रांतील एक, कंसाचा कनिष्ठ भ्राता.

**राष्ट्रपालिका**–उग्रसेन राजाच्या कन्यंतील एक.

**राष्ट्रपाली**–वरचा श० पहा.

**राष्ट्रपिंडी**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**राष्ट्रभृत्**–प्रियव्रतवंशीय ऋषभदेवाचा पुत्र भरत, त्याच्या पांच पुत्रांतील दुसरा.

**राष्ट्रवर्धन**–दशरथराजाच्या आठ प्रधानांतील जो अर्थ-साधक प्रधान त्यासच नामांतर.

**राहु**–कश्यपऋषीपासून सिंहिकेस झालेल्या पुत्रांतील एक. हा प्रस्तुतच्या मन्वंतरांत आकाशामध्यें, सूर्यमंड-लाच्या वर व चंद्रमंडलाच्या खालीं असणारें जें (ता-मस )अंधःकारयुक्त राहुमंडल,तेथील अधिपति असून, याचें मंडल सूर्यमंडलगतीनें फिरणारें आहे. हें याचें मंडल जेव्हां फिरत फिरत चंद्रमंडलाच्या व याच्या मंडलाच्या कक्षेच्या ( परिभ्रमणमार्गवृत्ताच्या ) छेद-नबिंदुसमीप ज्याप्रमाणानें अल्प किंवा पूर्ण येतें, त्याच प्रमाणानें चंद्रग्रहण अल्प किंवा पूर्ण होतें. परंतु येथें जे लोक पृथिवी फिरत्ये म्हणून मानून तिची गति सूर्यमंडलाप्रमाणें कल्पितात, त्यांस सूर्यमंडलगतीनें फिरणाऱ्या राहूचें भान न होतां, चंद्रमंडलाआड पृथि-वीच आली असें वाटून,ते चंद्रग्रहणास पृथिवी कारण मानितात. याचप्रमाणें चंद्रगतीनें फिरणारें सूर्याच्या खालीं असलेलें केतूचें तामसमंडल, आपल्या व सूर्य-मंडलाच्या कक्षेच्या छेदनबिंदुसमीप ज्या काळीं ज्याप्र-माणें येतें,त्याकाळीं त्याचप्रमाणानें सूर्यग्रहण अल्प किंवा पूर्ण होतें. येथेंहि चंद्रमंडलगतीनें फिरणाऱ्या केतूचें भान न होऊन, सूर्यमंडलाआड चंद्रमंडलच आलें असें त्यांस वाटून, ते सूर्यग्रहणास चंद्रच कारण मानितात, आणि त्याची सिद्धि होण्यासाठीं सूर्यमंडलाखालीं चंद्रमंडल कल्पितात; परंतु हें मत श्रुतिविरुद्ध असल्यामुळें असत् होय. या विषयाचा प्रतिपादक,यज्ञेश्वर दैवज्ञकृत सटीक अथवा निदान मूळ संस्कृत विरोधमर्दन ग्रंथ, कोणास सांपडेल तर, तो त्यानें पाहून आपलें समाधान करून घ्यावें.

**राहुकर्णि**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**राहूगण**–गौतमांगिरसांतील एक कुल ( ३ अंगिरा श० पहा ).

**राज्ञी**–होऊन गेलेला पांचवा रैवत मनु, त्याची ही कन्या असून, विवस्वान् आदित्याच्या तीन स्त्रियांतील दुसरी.

**रिटि**–रुद्रगणांतील एक.

**रिपु**–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न यदुराजा, त्याच्या चार पुत्रांतील कनिष्ठ.

**रिपुंजय**–ध्रुवपुत्र शिष्टास सुच्छायेपासून झालेल्या चार पुत्रांतील एक.

२-(सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिराजा, त्याच्या दोन पुत्रांतील देवमीढवंशीय सुवीर राजाचा पुत्र, याचा पुत्र बहुरथ.

३-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिराजाचा पुत्र अजमीढ, तद्वंशीय सुधनुकुलोत्पन्न जरासंधवंशांतील शेवटचा राजा. विश्वजित् राजाचा पुत्र. पुरंजय असें यासच नामांतर होतें. या राजास याच्या शुनक ना० प्रधानानें मारून, आपल्या प्रद्योत ना० पुत्रास राजा केलें. रिपुंजयापासून पूरुकुलाचा औरस वंश नष्ट झाला. वर सांगितलेल्या प्रद्योताच्या वंशाकडे १३८ वर्षे राज्य होतें. पुढें तोहि वंश बुडून, शिशुनाग ना० राजांनीं ३६० वर्षे राज्य केल्यावर, तें बुडून मौर्यवंशजांनीं १३७ वर्षे राज्य केलें. त्यापुढें शौंग राजांनीं ११२ वर्षे व काण्वायन राजांनीं ३४५ वर्षे राज्य करून, ते बुडाल्यावर शूद्र राजे झाले ( भाग० १२ स्कं० ).

**रुक्म**-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय रुचक राजाच्या पांच पुत्रांतील दुसरा.

**रुक्मक**-वैश्वदेवकर्मांतील अग्नीस नांव.

**रुक्मकवच**-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा,तद्वंशीय रुचक राजाच्या पांच पुत्रांतील तिसरा.

**रुक्मकेश**-विदर्भदेशाधिपति भीष्मक राजाच्या पांच पुत्रांतील चवथा.

**रुक्मबाहु**-विदर्भदेशाधिपति भीष्मक राजाच्या पांच पुत्रांतील तिसरा.

**रुक्ममाली**-विदर्भदेशाधिपति भीष्मकराजाच्या पांच पुत्रांतील पांचवा.

**रुक्मरथ**-विदर्भदेशाधिपति भीष्मकराजाच्या पांच पुत्रांतील दुसरा. हा द्रौपदीस्वयंवरकाळीं पांचालपुरांत होता.

२-मद्रदेशाधिपति शल्यराजाचा ज्येष्ठ पुत्र ( भार० भीष्म० अ० ४७ श्लोक-४८ ). हा आपल्या शतबंधूंसहित कौरवांकडे असतां, त्यांसहवर्तमान अभिमन्यूनें यास मारिलें ( भार० द्रोण० अ० ४५ ).

**रुक्मवती**-भीष्मकराजाचा पुत्र रुक्मी, त्याची कन्या. हिला कृष्णपुत्र प्रद्युम्नानें हरण केलें होतें ( २ प्रद्युम्न श० पहा ).

**रुक्मांगद**-एक प्राचीन भगवद्भक्त राजा, याचें कुल आढळत नाहीं.

२-द्रौपदी स्वयंवरास गेलेल्या राजांतील एक ( भार० आदि० अ० १८६ ).

**रुक्मिणी**-विदर्भाधिपति भीष्मक राजास, लक्ष्मीच्या अंशानें झालेली कन्या. हिनें कृष्णास वरिलें होतें. त्याविषयीं इतिहास असा आढळतो.-ही एकेकाळीं उपवर असून पित्यासमीप सभेंत बसली असतां, कृष्णाचें रुप, गुण, व सामर्थ्य, कोणी वर्णिलेलें श्रवण करून, हिनें त्यास वरण्याचा निश्चय केला. तो हिच्या मातापित्यास, व चौघां बंधूंस रुचला. परंतु हिचा रुक्मी म्हणून जो ज्येष्ठ भ्राता होता,तो कृष्णाचा द्वेषी असल्यामुळें त्यास हा हिचा विचार न रुचून, त्यानें हिला शिशुपालास देण्याचा विचार करून, त्या विवाहाची सिद्धता केली. रुक्मी हा अंमळ कर्ता असल्यामुळें पित्याचें त्यापुढें कांहीं चालत नसे. याप्रमाणें हिनें पाहून, चिंतन करूं लागली कीं कसें करावें ? तों एक ब्राह्मण हिला आढळला. मग त्यासमागमें हिनें कृष्णास निरोप पाठविला, तो असा.-हे कृष्णा,तुझे गुण श्रवण करून, माझें अंतःकरण तुजकडे लागलें आहे. मी तुला मनेंकरून वरून हा माझा देह अर्पण केला आहे. तर तूं पंचाननानें ( व्याघ्रानें ) येवढें करावें कीं तुझी म्हणविलेली जी मी, त्या माझ्या देहाला चैद्य जो शिशुपाल ना० सृगाल ( जंबुक ) त्यानें स्पर्श करूं नये. विवाहाच्या पूर्व दिवशीं अंबिकेच्या दर्शनास जावें, असा आमच्या कुलांतील कुलाचार आहे, यास्तव तेथें माझें गमन होणार आहे. तर तूं कृपाकरून तेथें येऊन, चैद्यमागधादिकांस जिंकून, राक्षसविधीनें माझें हरण कर. इतक्यावर तूं न येशील, तर मी प्राणत्याग करून, सातांशतां जन्मांनीं तरी तुलाच वरीन. परंतु शिशुपालास स्पर्श करणार नाहीं. असा निरोप घेऊन, ब्राह्मण द्वारकेस कृष्णाकडे गेला, व त्यानें तो त्यास सविस्तर कळविला. तो ऐकतांच ब्राह्मणासहित कृष्ण रथारूढ होऊन, कुंडिनपुरास गेला. तेथें शिशुपाल येऊन, जरासंध, दंतवक्र, विदूरथ, पौंड्रकवासुदेव, इ० अनेक राजे विवाहसमारंभास जमले होते. तों इकडे द्वारकेंत बलरामास कोणी यादवांनीं कळविलें कीं, कुंडिनपुराहून येथें कोणी ब्राह्मण आला होता, त्यानें काय सांगितलें असेल तें असो, त्याससहित कृष्ण तिकडे गेला. त्यावरून बलराम मोठें सैन्य घेऊन त्याच्या पाठोपाठच निघालेला कृष्ण, रुक्मिणीचें हरण करून निघत आहे, व तेथें जमलेले राजे कृष्णास धरण्याचा यत्न करीत आहेत, तों जाऊन पोहोंचला. मग यादवांचें व जमलेल्या राजांचें मोठें युद्ध होऊन, त्यांत कृष्णबलरामांनीं सर्वांचा पराभव केला. तसेंच रुक्मीस ( रुक्मिणीच्या ज्येष्ठ भ्रात्यास )शासन करून, ( रुक्मी श० पहा ) रुक्मिणीच्या पित्यानें

विवाहसमारंभ उत्तम प्रकारानें करून यथायोग्य विवाहविधीनें कृष्णास रुक्मिणी दिली असतां, ती कृष्णासमागमें द्वारकेस गेली ( भाग० दशम० अ० ५२-५४ ).

रुक्मिणीस कृष्णापासून प्रद्युम्न इ०दहा पुत्र, व चारुमति ना०कन्या, मिळून अक्रा मुलें होतीं. कृष्णास जेवढ्या स्त्रिया होत्या,त्या सर्वांत ही प्रमुख असून कृष्ण निजधामास गेला असतां, त्याच्या देहासमागमें हिनें सहगमन केलें ( भार० मौसल० अ० ७ ).

**रुक्मी**-विदर्भ देशाचा अधिपति भीष्मक राजा, त्याच्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ. रुक्मिणीचा ज्येष्ठ भ्राता. यानें रुक्मिणीस तिच्या व मातापित्यांच्या इच्छेविरुद्ध शिशुपालास देण्याचा विचार केला असतां, तेथें द्वारकेहून कृष्ण येऊन त्यानें तिचें हरण केलें. तें पाहून हा क्रुद्ध होऊन, आपण आणविलेल्या राजांसहित त्याशीं अशा प्रतिज्ञेनें युद्धास गेला होता कीं, मी रुक्मिणीस माघारीं घेऊन येऊन तिचा विवाह शिशुपालाशीं करीन, न करीन तर, पुनः कुंडिनपुरांत ( पित्याच्या राजधानींत ) प्रवेश करणार नाहीं. पुढें याचें व कृष्णाचें युद्ध होऊन, त्यांत कृष्णानें यास धरिलें, व खड्गानें याचा शिरच्छेद करूं लागला. इतक्यांत रथांत असलेल्या रुक्मिणीनें, कृष्णाच्या पायां पडून यास सोडविलें. तथापि कृष्णानें यास विरूप करून सोडिलें असतां, हा,प्रतिज्ञेप्रमाणें कुंडिनपुरांत न जातां दुसरेंच एक भोजकट ना० नगर वसवून तेथें राहिला ( भाग० १० स्कं० अ० ५२-५४ )

पुढें यानें आपण कृष्णाहून बलाढ्य व्हावें अशाच हेतूनें असेल, गंधमादन पर्वतावर राहणाऱ्या कोणी किंपुरुषापासून चतुष्पाद धनुर्वेद, व माहेंद्र ना०धनुष्य संपादन केलें. त्याच्या योगानें हा मोठा बलाढ्य झाला होता. कांहीं काळानें भारती युद्ध प्रवृत्त झालें, त्यावेळेस हा, मोठ्या गर्वानें एक अक्षौहिणी सैन्य घेऊन प्रथम पांडवांकडे आला,व अर्जुनास म्हणूं लागला कीं, तूं या युद्धाचें भय मानूं नको, मी कौरवांस मारून तुला राज्यावर बसवितों. त्यावरून यास अर्जुन म्हणाला, मला मुळींच भय नसून, तुझ्या साह्याची मला इच्छाहि नाहीं. इतक्यावर रहा अथवा जा. तेव्हां हा विमनस्क होऊन दुर्योधनाकडे गेला, व तेथेंहि असेंच बोलला. परंतु त्यानेंहि याचा अंगिकार न केल्यामुळें, हा परत स्वनगरास आला ( भार० उद्योग० अ० १५८ ).

यास एक रुक्मवती ना० कन्या होती. ती यानें रुक्मिणीच्या प्रीतीस्तव प्रद्युम्नास दिली असून, पुत्र जो होता, त्याचें नांव ग्रंथांत आढळत नाहीं. त्याची कन्या रोचना, प्रद्युम्नपुत्र अनिरुद्धास दिली होती, त्या विवाहांत कांहीं कारणावरून बलरामानें यास मारिलें ( २ रोचना श० पहा ).

**रुक्मेषु**-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय रुचक राजाच्या पांच पुत्रांतील तिसरा.

**रुचक**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरिश्चंद्रवंशीय भरुक राजास नामांतर.

२-( सो० वं० )यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय उशना राजाचा पुत्र. यास रुक्मकवच असेंहि म्हणत असत. याला पुरुजित्, रुक्म, रुक्मेषु, पृथु आणि ज्यामघ, असे पांच पुत्र होते.

३-मेरुच्या कर्णिका पर्वतांतील एक पर्वत.

**रुचि**-या नांवाचा एक प्रजापति. स्वायंभू मनूनें यास आपल्या तीन कन्यांतील आकूती ना०कन्या पुत्रिकाधर्मानें दिली होती,म्हणून यास,यज्ञ आणि दक्षिणा असें जें कन्यापुत्ररूप मिथुन झालें होतें,त्यांतील पुत्र यज्ञ,यानें मनूस दिला होता व दक्षिणा ना० कन्या, तीच यज्ञास मनूनें मागितल्यावरून, यानें भार्यार्थ दिली होती ( भाग० ४ स्कं० अ० १ ).

२-एक अप्सरा.

**रुचिपर्वा**-कृति राजाचा पुत्र दुर्योधनपक्षीय राजा. यास सुपर्व्यानें मारिलें होतें.

**रुचिराश्व**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र बृहदिषु, तद्वंशीय सेनजित् राजाच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ. याचा पुत्र पार अ० विभ्राज राजा.

**रुद्र**-एकादश रुद्र प्रसिद्धच आहेत. हे चालू मन्वंतरांतल्या सप्तविधि देवांतील देव होत. यांची उत्पत्ति कोठें स्थाणु ना० ब्रह्मपुत्रापासून व कोठें धर्मऋषीपासून विकल्पानें लिहिलेली आढळते. परंतु मी येथें भारत प्रमाण धरून यांची उत्पत्ति लिहिली आहे. हे प्रायः भूतराक्षसादिकांचे जरी आधिपति म्हटलेले आढळतात तरी, तें आधिपत्य मुख्यत्वेंकरून निर्ऋति ना० रुद्राचें आहे.

२-सृष्टीची उत्पत्ति करण्यासाठीं ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेला प्रजापति. हा सृष्टि कशी करूं म्हणून रुदन करूं लागला, त्यामुळें यास रुद्र असें नांव पडलें. नंतर सृष्टि करतांना थांबला, म्हणून स्थाणु असेंहि नांव पडलें. पुराणांतून स्थाणु, रुद्र आणि शिव एकच, म्हणून गोंधळ केलेला आहे; परंतु शिव कांहीं रुद्र नव्हे, मात्र

स्तुति करतांना अनेक नांवांनीं त्याची स्तुति केली आहे, त्यांत हींहि नांवें आहेत इतकेंच.

**रुद्रकर्ण**–काशींतील स्थान व तीर्थवि०.

**रुद्रकोटि**–नर्मदेसंबंधीं अमरकंटक पर्वतावरील तीर्थवि०

**रुद्रशरप्रमोक्ष**–त्रिपुरवधकाळीं, महादेवानें ज्या स्थळीं उभें राहून त्रिपुरांवर बाण सोडिला तें स्थळ ( वा० रा० युद्ध० स० ७४ ).

**रुद्रश्रेण्य**–भद्रसेनक राजा तोच.

**रुद्रसर**–एक सरोवर.

**रुद्रसावर्णि**–पुढें होणारा बारावा मनु. यास ऋत असेंहि लोक म्हणतील. यास देववान, उपदेव, देवश्रेष्ठ इ० पुत्र होतील. स्वर्गामध्यें हरितादिक देव आणि त्यांचा स्वामी ऋतधामा इंद्र होईल. तपस्वी, तपोमूर्ति, आग्नींध्रक, इ० सप्तर्षि होतील व सत्यसहापासून सूनृतेच्या ठायीं स्वधामा ना० विष्णूचा अवतार होऊन, तो इंद्राचें साह्य करील ( भाग० अष्टम० अ० १३ ).

**रुद्रसेन**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० १५८ ).

**रुद्राणी**–प्रत्येक रुद्राची जी शक्ति ती.

**रुद्रावर्त** भारतवर्षीय क्षेत्र व तीर्थ.

**रुद्राक्ष**–सामवेदोपनिषत्.

**रुधिराशन**–खर राक्षसाच्या बारा अमात्यांतील एक.

**रुधिराक्ष**–लवणासुराचा मातुल ( कुशीलव श० पहा).

**रुमण**–रामसेनेंतील नामांकित वानर.

**रुमण्वान्**–जमदग्नीपासून रेणुकेस झालेल्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ. परशुरामाचा ज्येष्ठ भ्राता.

**रुमा**–तार ना० वानराची कन्या, सुग्रीवाची स्त्री.

**रुरु**–अष्टभैरवांतील दुसरा.

२–भृगुकुलोत्पन्न प्रमति ऋषीपासून, घृताची अप्सरेच्या ठायीं झालेला पुत्र. हा मोठा तपस्वी व विद्वान् होता. कोणी एका अप्सरेची प्रमद्वरा ना० कन्या, स्थूलकेश ऋषीनें पाळिलेली, ती याची स्त्री होती. एकदां ती निद्रित असतां सर्पदंश होऊन मरण पावली. ती यानें आपल्या अर्ध्या आयुष्याचा संकल्प करून सजीव केली. परंतु तेव्हांपासून हा सर्प पाहिला कीं, त्यास मारावें असें करूं लागला. त्यांत डुंडुभ ना० एका सर्पास मारीत असतां, त्यानें मनुष्यवाणीनें यास अनेक गोष्टी सांगून म्हटलें कीं, आमची जाति निर्विष आहे, यास्तव तूं विचार करून सर्पास मारीत जा. रुरुनें पुसलें, तुझें मूळ वृत्त काय आहे ? तेव्हां तो म्हणाला, मी पूर्वीचा सहस्रपात् ना० ऋषि आहे. एकदां माझ्या मित्रास, मी वस्त्राचा सर्प करून भेडाविलें, त्यावरून त्यानें मला शाप दिला कीं, तूं सर्प होशील. नंतर मी उःशाप मागितला असतां, रुरु ऋषीच्या दर्शनानें त्या योनींतून तुझा उद्धार होईल असें म्हटलें. त्याप्रमाणें हा आजचा दिवस उगवला आहे. इतकें बोलून, तो अदृश्य झाला ( भार० आदि० अ० ८—१२ ).

३–हिरण्याक्षाच्या वंशांतील एक असुर. याचा पुत्र दुर्गमासुर.

**रुशद्रथ**–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न तितिक्षु राजाचा पुत्र. याचा पुत्र हेम अ० सेन.

**रुशेकु**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या श्वाहि ना० पौत्राचा पुत्र. याचा पुत्र चित्ररथ.

**रुषंगु**–एक ऋषि ( भार० शल्य० अ० ३९ ).

**रुषद्गु**–एक राजर्षि.

**रूपवाहिक**–भारतवर्षीय देश.

**रूपा**–पारियात्र पर्वतापासून निघणारी नदी.

**रूपि**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**रेणु**–प्रसेनजित् ना० राजा तो. याची कन्या रेणुका, ती यानें जमदग्नि ऋषीस दिली होती.

**रेणुका**–रेणुराजाची कन्या, व जमदग्नीची स्त्री ( जमदग्नि श० पहा ).

**रेभ**–एक ऋषि व त्याचें कुल ( २ कश्यप श० पहा ).

**रेव**–( सू० वं० ) शर्यातिकुलोत्पन्न रेवतराजाचा पुत्र. यास ककुद्मि असेंहि म्हणत.

**रेवत**–( सू० वं० ) वैवस्वत मनूचा प्रपौत्र, शर्याति राजाचा पौत्र व आनर्त राजाचा पुत्र. यानें पश्चिम आनर्त देशांत कुशस्थलीं ( द्वारका ) या नांवाची नगरी स्थापून, तेथें आपलें राज्य दृढ केलें. यास, रेव अ० ककुद्मि नामानें शत पुत्रांत प्रमुख पुत्र होता व रेवती ना० एक कन्या होती. ती उपवर झाल्यावर कोणास द्यावी, असा याच्या मनांत विचार येऊन, हा, एकेकाळीं ब्रह्मदेवास तें पुसावें अशा अभिप्रायानें कन्येस घेऊन सत्यलोकास गेला. तेथें देव आणि ऋषि एकत्र होऊन कांहीं विचार करीत असल्यामुळें, यास क्षणभर बसावें लागलें. तेवढ्या अवकाशांत पृथिवीवरील भारतवर्षीय राजांच्या अनेक उलटापालटी होऊन, हा सत्यलोकीं गेला त्या वेळच्या पर्ययासहित, सत्तावीस पर्यय ( चौकड्या ) गत होत्सात्या अठ्ठाविसाव्या पर्ययाचें द्वापरयुग सरत आलेलें याला न समजून, ब्रह्मदेव स्वस्थ झाल्यावर यानें ही कन्या कोणास देऊं म्हणून विचारिलें. तेव्हां ब्रह्मदेवांनीं

पृथिवीवरील उलटापालटीचें यास वृत्त सांगून म्हटलें कीं,आतां प्रस्तुत कृष्णाचा ज्येष्ठ भ्राता बलराम आहे. त्यास ही कन्या विवाह करून दे. त्यावरून यानें भूलोकीं येऊन, ती रेवती कन्या बलरामास दिली, व आपण तपार्थ अरण्यांत गेला (भाग० ९ स्कं०अ०३).

**रेवती**–द्वादशादित्यांतील मित्र आदित्याची स्त्री.

२–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक, व प्राचेतस दक्षाची कन्या.

३–सूर्यवंशीय रेवत राजाची कन्या, व बलरामाची स्त्री.

**रेवा**–नर्मदानदीसच नांव.

**रैभ्य**–विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक ( भार० शांति० अ० ४९ श्लो० ५६ ). यास अर्वावसु, आणि परावसु असे दोन पुत्र असत (-यवक्रीत श० पहा ).

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्वपुत्र ऋतेयु राजा, त्याच्या सुमति ना० पौत्राचा पुत्र. याचा पुत्र दुष्यंत राजा.

**रैवत**–एकादश रुद्रांतील एक. भरतोक्त रुद्रांतील हें नामांतर कोणत्याचें, त्याचा निर्णय आढळत नाहीं.

**रैवतमनु**–प्रियव्रत राजर्षीस, कनिष्ठ स्त्रीपासून झालेल्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. चालू कल्पामध्यें हा, पांचवा मनु होऊन गेला ( भाग० ५ स्कं० अ० १ ). यानें कालिंदी नदीतीरीं उत्तम प्रकारचें तप केलें होतें ( देवीभा० १० स्कं०अ०८ ). याचें मन्वंतर याच्याच नांवानें प्रसिद्ध असे. अरुण, तत्वदर्शी, धृतिमान्, हव्यवान्, कवि, युक्त, निरुत्सुक, सत्व, निर्मोह आणि प्रकाशक असे धर्मवर्ति व पराक्रमी दहा पुत्र,–अर्जुन, बलिविंध्य, इ० नामांतरांनीं यास असत. याच्या मन्वंतरांत ऐंद्रबाहु, सुबाहु, पर्जन्य, सोमप, मुनि, हिरण्यरोमा आणि सप्ताश्व, असे सप्तर्षि–हिरण्यरोमा, वेदशिरा, ऊर्ध्वबाहु, इ० नामांतरांनीं असून, स्वर्गामध्यें भूतरय अ० अभूतरजस, हे देव आणि त्यांचा स्वामी विभु नांवाचा इंद्र होता. तसाच शुभ्रापासून विकुंठेच्या ठायीं वैकुंठ ना० विष्णूचा अवतार होऊन त्यानें इंद्राचें साह्य केलें होतें ( भाग० ८ स्कं० अ० ५ ). ( मत्स्य० अ० ९–११ ).

**रैवतक**–या नांवाचा द्वारकेसमीप असणारा पर्वत.

२–एक तीर्थवि०.

३–ब्रह्मर्षि.

**रैवस**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु० श० पहा ).

**रोचन**–देववि० ( तुषित श० पहा ).

२–स्वारोचिष मन्वंतरांत स्वर्गामध्यें होता इंद्र तो.

**रोचना**–वसुदेवाच्या स्त्रियांतील एक.

२–विदर्भ देशाधिपति भीष्मक राजा, त्याची प्रपौत्री,व रुक्मी राजाची पौत्री.हिच्या पित्याचें नांव कोठें आढळत नाहीं.ही,रुक्मी राजानें आपल्या भगिनीचें प्रिय करण्यासाठीं,तिचा पौत्र अनिरुद्ध, त्यास दिली होती. हिच्या विवाहकालीं कृष्ण,बलराम,प्रद्युम्न,सांब,इ० अनेक यादव आपआपल्या स्त्रियांसहवर्तमान भोजकोटपुरास आले होते. वसुदेव, उग्रसेन हेही असून, अनेक राजेहि जमले होते. पुढें विवाहाचा समारंभ सर्व यथास्थित झाल्यावर कलिंग राजा रुक्मीस म्हणाला कीं, बलरामास अक्ष्यविद्येचें व्यसन फार आहे, परंतु खेळायास चांगलें येत नाहीं. यास्तव त्याशीं द्यूत खेळून तूं त्यास जिंक. त्यावरुन रुक्मी बरें म्हणून, त्यानें बलरामास हाक मारिली, व खेळण्यास आरंभ केला. त्यांत बलरामानें जो जो पण लावून डाव टाकावा, तो तो त्यांनीं कपटानें जिंकावा. अशा रीतीनें बलरामाचें सर्व द्रव्य त्यांनीं जिंकिलें. तेव्हां बलराम मोठ्यानें म्हणाला, सत्य सोडूं नका. परंतु ते ऐकेनात. शेवटीं एक डाव बलरामानें टाकलेला वास्तविक जिंकला असता, ते नाहीं म्हणूं लागले. परंतु इतक्यांत आकाशवाणी झाली कीं, हा डाव बलरामानेंच जिंकिला आहे. असें असतां, त्यांनीं तें न ऐकून, आम्ही बलरामास जिंकलें असेंच म्हणूं लागले. त्यावरुन बलरामास क्रोध येऊन, त्यानें कलिंगराजास धरिलें, व त्याचे दांत पाडून, रुक्मी अंगावर चालून आल्यावरुन त्यास तर लागलेंच ठार मारिलें. नंतर कृष्ण तेथून सर्वांस घेऊन मुकाट्यानेंच द्वारकेस आला ( भाग० १० स्कं० अ० ६१ ).

**रोचनामुख**–गरुडानें मारिलेला एक असुर.

**रोचमान्**–दहा विश्वेदेवांतील एक.

२–अश्वमेध ना० पुरीचा राजा ( भार० सभा० अ० २९ ). हा भारती युद्धांत पांडवांकडे होता ( भार० उद्योग० अ० १७२ ).

३–उरगापुरीचा राजा ( भार० सभा० अ० २७ ). हाहि युद्धामध्यें पांडवांकडेच असून, यास कर्णानें मारिलें होतें (भार० कर्ण० अ० ५६). याच्या रथाचे अश्व निळ्या रंगाचे असत (भार० द्रोण० अ० २३).

४–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**रोचिष्मान्**–स्वारोचिष मनूच्या पुत्रांत होता एक पुत्र तो.

**रोधस्वती**–भारतवर्षीय नदी.

**रोपसेवकी**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप० श० पहा ).

**रोमपाद**–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न अंगवंशीय धर्मरथ अ० बृहद्रथ राजाचा पुत्र. यास लोमपाद व चित्र-

रथ, अशींहि नामांतरें असत. सूर्यवंशीय दशरथ राजा, त्याचा हा अत्यंत मित्र होता. रोमपादास चतुरंग ना० पुत्र व शांता नांवाची एक कन्या होती. ती शांता यानें ऋष्यशृंगास दिली होती ( ऋष्यशृंग श० पहा ).

२-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय ज्यामघ राजाचा पौत्र, व विदर्भ राजाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. यास पुत्र बभ्रु नांवाचा होता.

**रोमहर्षण**-पुराणवक्ता सूत नामा ऋषि तो. हा आपल्या वक्तृत्वशक्तीनें श्रोत्यांच्या अंतःकरणास सद्गदित करून, शरीरावर रोमांच उभे करी. म्हणून यास असें नांव पडलें होतें. यास लोमहर्षण असेंहि म्हटलेलें असून, याच्या पुत्रास रौमहर्षणि अ० सौति, असें म्हणत असत.

**रोहिणी**-प्राचेतस दक्षाच्या ६० कन्यांतील एक असून, सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक. ही सोमास अत्यंत प्रिय असे; त्यामुळें इतरांचा सहजच अनादर होई. एकदां इतर कन्यांनीं, याविषयीं पित्याकडे गार्‍हाणें केलें; त्यावरून दक्षानें यास समजावून सांगितलें कीं, इतःपर असें करूं नको; तरी त्यानें तें ऐकिलें नाहीं. शेवटीं हिला त्यापासून बुध पुत्र झाला. तेव्हां हिच्या इतर भगिनींनीं व सपत्नींनीं ( सवतींनीं ) पुनः पित्याकडे गार्‍हाणें केलें. त्यावरून त्यानें सोमास शाप दिला कीं, तूं क्षयरोगी होशील. ही क्षयकल्पना लोक सोममंडलावर कल्पितात; परंतु ती अगदीं चूक असून कलांच्या र्‍हासवृद्धींनीं व्याप्त सोममंडल अनादिसिद्धच ईश्वरानें ब्रह्मदेवरूपेंकरून निर्मिलेलें आहे.

२-द्वितीयार्थक सुरभीच्या दोन कन्यांतील कनिष्ठ. हिला विमला व अनला अशा दोन कन्या होत्या.

३-वसुदेवाच्या स्त्रियांतील एक. हिचा पुत्र बलराम मुख्य असून त्याशिवाय आणखीहि पुत्र होते.

४-कृष्णाच्या अष्ट नायिकांशिवाय एक स्त्री अधिक होती ती.

**रोहित**-लोहित ना० ऋषि, व त्याचें कुल तें ( १ विश्वामित्र श० पहा ).

२-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरिश्चंद्र राजास तारामतीच्या ठायीं झालेला पुत्र. यानें, पित्यास विश्वामित्रानें छळिलें असतां अनेक दुःखें सोशिलीं. यास, रोहितास्य असेंहि कोठें म्हटलेलें असून ( देवीभा० सप्तम० ) हरिश्चंद्राच्या मागें हाच, अयोध्येंत राज्य करूं लागला. यास हरित अ० वृक या नांवाचा एकच पुत्र होता. याच्या विशेष वृत्ताविषयीं ( शुनःशेप श० पहा ).

**रोहितक**-कर्णानें दिग्विजयांत जिंकलेला एक यवन राजा ( भार० वन० अ० २५४ ). हा लोहितक देशाचा राजा असावा.

**रोहितकदेश**-लोहित देश तोच.

**रोहितकपुर**-कार्तिकेयाचें नगर. येथील रहिवासी मत्तमयूरक. हें नगर हस्तिनापुराच्या दूर पश्चिमेस पांडवांच्या वेळेस होतें.

**रोहिताश्व**-द्वितीयार्थक रोहित तोच.

**रोही**-भारतवर्षीय नदी.

**रौक्ष्मायन**-एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**रौक्मिणेय**-रुक्मिणीचे प्रद्युम्नादिक पुत्र ते सर्व.

**रौच्य**-दक्षसावर्णि मनूस नामांतर.

**रौद्र**-शुक्राचार्यांच्या चार पुत्रांतील एक.

**रौद्रकर्मा**-धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक.

**रौद्राश्व**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अहंयाति राजाचा पुत्र. यास घृताची अप्सरेपासून ऋतेयु अ० औचेयु, कुक्षेयु अ० कक्षेयु, स्थंडिलेयु, कृतेयु, जलेयु, संततेयु, धर्मेयु, सत्येयु, व्रतेयु आणि वनेयु, असे दहा पुत्र झाले होते.

**रौप्यनाभ**-एक राक्षस.

**रौमहर्षणि**-रोमहर्षण सूताचा पुत्र जो उग्रश्रवा, ज्यास सौति म्हणत असत तो.

**रौरव**-कुटुंबभरणासाठीं अनेक प्रकारच्या हिंसा करणारा त्यास प्राप्त होणारा नरक.

**रौरवकल्प**-चालू ब्राह्ममासांतील होऊन गेलेला पांचवा दिवस ( ४ कल्प श० पहा ).

**रौहिण**-विश्वामित्रकुलोत्पन्न एक ऋषि, व त्याचा वंश.

**रौहिणेय**-सोमपुत्र बुध तो. बलरामासहि हें नांव आहे.

**रौहिण्यायनि**-ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**रौहित्यायनि**- ,, ( ३ भृगु श० पहा ).

**रौक्षक**-एक ऋषि, व त्याचें कुल ( १ विश्वामित्र श० पहा ).

---

## ल

**लंका**-जंबूद्वीपाच्या आसमंतात्, क्षार समुद्रांत जीं अष्ट उपद्वीपें आहेत, त्यांतील आठवें. हें कुमारीच्या दक्षिणेस आहे, व यामध्यें त्रिकुट अ० लंब नांवाचा एक पर्वत आहे.

२-सुकेश राक्षसाच्या माल्यवान् इ० तीन पुत्रांनीं, देवांस पीडा दिली असतां, विश्वकर्म्यानें भिऊन, त्यांच्या संतोषार्थ त्रिकूट पर्वताच्या शिरोभागीं, शत योजनें लांब, व तीस योजनें रुंद अशी एक नगरी

निर्माण करून दिली होती ती ( वा० रा० उत्तर० स० ५ ). येथें बंधूंसहवर्तमान माल्यवान् बहुत काळपर्यंत राहात असतां, विष्णूच्या भयानें त्यास ती सोडून पाताळांत जाऊन राहणें भाग पडलें. तेव्हांपासून ती शून्य पडली, व पुढें विश्रवा ऋषीच्या आज्ञेनें तेथें वैश्रवण ( कुबेर ) राहूं लागला. तो बहुत कालपर्यंत तेथें राहात असतां कांहीं काळानें रावण मोठा पराक्रमी होऊन, त्यानें ही नगरी युक्तीनेंच त्याजवळून घेतली, आणि तो रामाच्या हातून मरण पावल्यावर, हींत बिभीषण राज्य करीत राहूं लागला. तो चिरंजीव असल्यामुळें अजून तींत असून हा चालू कल्प समाप्त होईपर्यंत असणारच आहे.

३–लंकाद्वीपाची, व त्यांतील लंकानगरीची मूर्तिमान् देवता ती. सीताशुद्धीसाठीं मारुति लंकेस गेला त्या काळीं, हिचा व त्याचा कांहीं संवाद होऊन मग त्याचा आंत प्रवेश झाला ( वा० रा० सुंदर० स० ३ ).

**लंघती**–भारतवर्षीय नदी.

**लघ्वि**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**लज्जावती**–ऋष्यवान् पर्वतापासून निघालेली नदी.

**लता**–मेरूची कन्या, व आग्नीध्र राजाचा पुत्र इलावृत्त त्याची स्त्री.

२–शापानें मगरी झालेली एक अप्सरा ( नारीतीर्थ श० पहा ).

**लपेटिका**–भारतवर्षीय नदी.

**लंब**–लंबासुर शब्द पहा.

२–त्रिकूट म्हणून जो लंकेंतील पर्वत तो.

**लंबा**–प्राचेतसदक्षानें ज्या दहा कन्या धर्मऋषीस भार्यार्थ दिल्या होत्या, त्यांतील एक. हिला विद्योत नांवाचा पुत्र असून, घोषसंज्ञक असेहि कांहीं पुत्र होते.

**लंबायन**–ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**लंबासुर**–एक दैत्य. खर ना० दैत्याचा भ्राता ( मत्स्य० अ० १७२–१७६ ).

**लंबोदर**–स्थूल उदर असल्यामुळें गणपतीस नांव.

**ललाटाक्षी**–सीतासंरक्षणास असलेल्या राक्षसींतील एक.

**ललितक**–भारतवर्षीय तीर्थ.

**ललिता**–पार्वतीस नांव.

**ललित्थ**–भारतवर्षीय देश.

**लव**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न दाशरथि रामापासून सीतेच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील एक ( कुशीलव श० पहा ). रामानें यास, उत्तरकोसल देशांतील राज्यावर स्थापिलें होतें, म्हणून त्याची राजधानी शावस्ती अ० श्रावस्ती तींत हा राहात असे. याला सुमती आणि कंजानना अशा दोघी स्त्रिया होत्या.

**लवण** अ० **लवणासुर**–मधु राक्षसापासून कुंभीनसीस झालेला पुत्र तो. हा, जसजसा मोठा होत गेला, तसतसा प्राणिमात्रांस, व विशेषेंकरून तापसांस पीडा देऊं लागला. याचा पिता जो मधु, त्यानें आपल्या मरणकालीं, आपला रुद्रदत्त शूल यास देऊन सांगितलें कीं, तूं ब्राह्मणादिकांस पीडा अगदीं देऊं नयेस ( ४ मधु श० पहा ). परंतु यानें त्या आज्ञेचा भंग करून आपला क्रम चालविला. त्यावरून ऋषींनीं, याविषयींचें गाऱ्हाणें बहुत राजांजवळ केलें; परंतु कोणीहि राजा याच्या वधास समर्थ झाला नाहीं; मात्र मांधाता राजा एकदां याच्यावर चालून गेला होता, परंतु त्यासच यानें मारिलें ( १ मांधाता श०पहा ).

कांहीं काळानें दाशरथि राम, रावणास मारून अयोध्येंत राज्य करूं लागला असतां, च्यवनभार्गवादिक ऋषींनीं, याचें गाऱ्हाणें रामाकडे केलें. त्यावरून त्यानें याच्यावर शत्रुघ्नास पाठविलें. म्हणून शत्रुघ्न तेथें गेला; परंतु हा दैवयोगानें त्या दिवशीं शूल घरांत ठेवून आहारसंपादनार्थ अरण्यांत गेल्यामुळें शत्रुघ्नास ती संधी चांगली सांपडून, तो द्वारांतच अशा रीतीनें उभा राहिला कीं, आंत येऊन यास शूल घेतांच येऊं नये. त्यावरून याचें व त्याचें युद्ध होऊन, शत्रुघ्नानें यास मारिलें. मारतांच शूल रुद्राकडे जाऊन तेथून अदृश्य झाला ( वा० रा० उत्तर० स० ६८–६९ ).

**लवणाश्व**–पांडवांसमागमें अरण्यवासांत कांहीं काल असणारा ऋषि.

**लह्य**–भुज्युऋषीचा पिता.

**लक्षणा**–एक अप्सरा.

**लक्ष्मण**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न दशरथ राजापासून, सुमित्रेच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. याची रामावर अत्यंत प्रीति असून, त्याचीही यावर तसीच होती. म्हणूनच राम अरण्यांत गेला असतां,हा त्यासमागमें गेला होता. रामाची याच्यावर किती प्रीति होती तीविषयीं आढळतें, तें असें,–लंकेंत युद्धकाळीं रावणाची शक्ति यास लागून एकदां हा मूर्च्छित पडला असतां, रामानें याकरितां शोक करतांना असें म्हटलें आहे.

**श्लोक.**–

देशे देशे कलत्राणि देशे देशे च बांधवाः ।

तं तु देशं न पश्यामि यत्र भ्राता सहोदरः ॥
किन्तु राजेन दुर्धर्ष लक्ष्मणेन विना मम ॥ १४ ॥
( वा० रा० उत्तर० स० १०२ ). याच्याहि वागणुकीविषयीं तसेंच याप्रमाणें आढळतें. सीता रावणानें हरण करून नेल्यावर, तिनें, मार्गानें आकाशांतून जातां जातां आपल्या अंगावरील अलंकार, ऋष्यमूक पर्वतावर बसलेल्या सुग्रीवादिक पांच वानरांत टाकून दिलेले त्यानें राम आल्यावर त्यास दाखविले ते त्यानें आपण ओळखून, लक्ष्मणास ओळखण्यास सांगितलें. तेव्हां तो याप्रमाणें बोलला.

श्लोक.–

नाहं जानामि केयूरे नाहं जानामि कुंडले ॥
नूपुरेत्वभिजानामि नित्यं पादाभिवंदनात् ॥ २३ ॥
( वा० रा० किष्किं० स० ६ ). म्हणजे मी केयूर ( बाहुभूषण ) व कुंडलें ( कर्णभूषण ) इ०कांस जाणत नाहीं; परंतु नूपुर ( पादभूषण, तोरड्या, ) ह्या सीतेच्याच होत असें जाणतों; कारण, मी नित्य तिला नमस्कार करण्यास जेव्हां जात असें, तेव्हां त्या मी पाहात असल्यामुळें, चांगल्या ओळखतों. यावरून हा, जर सीतेशीं इतका मर्यादेनें व पूज्य बुद्धीनें वागत होता, तर रामाशीं किती वागत असेल, त्याचें अनुमान सहज होतें.

लक्ष्मण हा, रामास युद्धामध्यें पुष्कळ उपयोगी पडला. त्यानें अनेक राक्षसांस मारून, शेवटीं रावणाचा परम बलाढ्य पुत्र जो इंद्रजित् त्यासहि मारिलें ( १ इंद्रजित् श० पहा ). रावणास रामानें मारून, बिभीषणास लंकेच्या राज्यावर स्थापिल्यानंतर, हा रामासमागमें परत अयोध्येस आला, व त्यास राज्याभिषेक झाल्यावर, राम यास, यौवराज्य देत असतां, तें यानें न स्वीकारून, केवळ अन्यसेवाच करीत राहिला. यावरून हा वैराग्यशील असून ज्ञानाधिकारी असल्यामुळें, याच्याच प्रार्थनेवरून रामानें यास ब्रह्मविद्या कथन केली ( अध्या० रा० उत्तर० स० ५ ).

यास, सीरध्वज जनकाची औरस कन्या ऊर्मिला ती स्त्री असून, तिच्या ठायीं यापासून अंगद व चित्रकेतु असे दोन पुत्र झाले होते, व राम निजधामास जाण्यापूर्वीच, योगधारणेनें आपला देह विसर्जन करून हा स्वर्लोकास गेला.

३–( सो० वं० ) पूरुकु० दुर्योधनाचा पुत्र तो. हा अभिमन्यूच्या हातून भारती युद्धांत मेला ( भार० द्रोण० अ० ४६ ).

**लक्ष्मणा**– मद्रदेशीय एका सामान्य राजाची कन्या. हिनें कृष्णास वरिलें होतें ( भाग० १० स्क० अ० ८३ ).

२–धृतराष्ट्रपुत्र दुर्योधनाची कन्या. हिचें स्वयंवर आरंभलें असतां, कृष्णपुत्र सांबानें हिला हरून रथांत घातलें, व द्वारकेकडे जाण्यास निघाला. त्यावरून कौरव सक्रोध होऊन, कर्ण, शल, भूरि इ० त्याच्या मागें लागले, व त्यास धरून परत हस्तिनापुरास घेऊन येऊन प्रतिबंधांत ठेविलें. हें वर्तमान द्वारकेंत कळल्यावर यादव हस्तिनापुरास जाण्यास सिद्ध झाले असें पाहून बलरामानें सर्वांचें निवारण करून, आपण स्वतः एक उद्धवास मात्र समागमें घेऊन, हस्तिनापुरास आला, व नगराबाहेर उपवनांत उतरून, धृतराष्ट्रास आपण आल्याचें कळविण्यासाठीं उद्धवास त्यानें त्याकडे पाठविलें. त्याप्रमाणें उद्धवानें नगरांत जाऊन कळवितांच धृतराष्ट्र उपायन घेऊन त्यास भेटण्यास कौरवांसहित आला व उपायन पुढें ठेवून त्यास भेटून बसला.

नंतर बलरामानें सांगितलें, मला उग्रसेनानें तुह्माकडे अशाकरितां पाठविलें आहे कीं, तुह्मी सर्वांनीं मिळून एकट्या मुलास पराजित करून, प्रतिबंधांत ठेविलेंत, हें युक्त केलें नाहीं; यास्तव त्यास सत्वर सोडून द्यावें. त्यावरून धृतराष्ट्र बलरामासमक्ष बरें आहे असें म्हणून नगरांत गेला, व यादवांची निंदा करून म्हणूं लागला कीं, या यादवांस छत्र, सिंहासन, चामर, इ० नृपार्ह वस्तु नसलेल्या आम्ही त्यांस देऊन मोठेपणास आणिलें, असें असून, ते आज आम्हास आज्ञा करितात, हा केवढा चमत्कार ? हें भाषण बलरामास समजल्यावर, त्यानें क्रोधेंकरून हस्तिनापुराच्या बुडाशीं नांगर घातला, व आपल्या अलौकिक सामर्थ्यानें, तें पालथें घालण्यासाठीं तो नांगर किंचित् हालविला; तेणेंकरून नगर वांकडें होऊन, शतावधि घरें कोसळून पडलीं. असें पाहतांच कौरव भिऊन बलरामास शरण आले. म्हणून त्यानें नांगर काढिला. परंतु तेव्हांपासून हस्तिनापुर जेवढें वांकडें झालें, तेवढें तसेंचें तसेंच राहिलें. सारांश, कौरवांनीं, बलरामाचा सत्कार करून त्यास नगरांत नेलें, व लक्ष्मणेचा सांबाशीं विवाह करून त्यास बलरामाच्या स्वाधीन केलें. त्यावरून बलराम संतुष्ट होऊन, लक्ष्मणा व सांब यांस समागमें घेऊन द्वारकेस परत आला, व उग्रसेनास झालेलें वर्तमान सांगून मुलगा व स्नुषा त्याच्या स्वाधीन केली ( भाग० १० स्कं० अ० ६८ ).

लक्ष्मी– विष्णूची स्त्री.

**लक्ष्मीकल्प**-ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील विसावा होऊन गेलेला दिवस ( ४ कल्प श० पहा ).

**लांगल**-( सू० वं० ). इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्षान्वय-संभूत शुद्धोद राजाचा पुत्र. यास पुष्कल असें नामांतर असून, पुत्र प्रसेनजित् नांवाचा होता.

**लांगली**-भारतवर्षीय नदी.

**लालाटि**-एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**लालाभक्ष**-जो आपल्या स्त्रीस आपलें रेतःपान करवितो, त्यास प्राप्त होणारा नरक.

**लावकि**-ब्रह्मर्षि ( १ विश्वामित्र श० पहा ).

**लावकृत**-ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा. )

**लाह्य**--खालचा शब्द पहा.

**लाह्यायनि**-लाह्य ऋषीचा पुत्र जो भुज्यु ऋषि तो.

**लिखित**-शंख ऋषींचा सहोदर(शंख लिखित श० पहा).

**लिलि**-वीरवर्म्याच्या पुत्रांतील एक.

**लीलाढ्य**-विश्वामित्र ऋषींच्या पुत्रांतील एक.

**लीलावती**-ध्रुवसंधि राजाची दुसरी स्त्री. हिचा पुत्र शत्रुजित्.

२-मयूरध्वज राजाची स्त्री ( जैमि० अश्व० अ० ६३).

**लुब्ध**-एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**लेख**-चाक्षुष मन्वंतरांतल्या पंचविध देवांतील जाति-विशेषाचे देव.

**लैंद्राणि**-३ अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**लोकालोक**-सप्त महाद्वीपें, सप्त महासमुद्र, मानसोत्तर पर्वत, आणि आदर्शमय कांचनभूमि, इत्यादिकांस पोटांत घेऊन मेरूच्या आसमंतात् सर्वत्र बारा कोटि पन्नास लक्ष योजनांतरानें वलयाकार ( वर्तुलाकार ) स्थितीनें स्थित असा आहे पर्वत तो.

**श्लोक.**

कोटिद्वयं त्रिपंचाशल्लक्षाणि च ततः परम् ॥ महा-हेममयी भूमिर्दश कोट्यो वरानने ॥ ( स्कं० पु० ) म्हणजे मेरुपर्वतापासून द्वीपें व समुद्र यांची एका आं-गची लांबी, दोन कोटि त्रेपन्न लक्ष आहे. ती मेरूची व आसमंतात्च्या अवष्टंभादिक पर्वतांची स्थूलता न्यून करून अर्डीच कोटि, व कांचनमय सुवर्ण भूमि दहा कोटि मिळून साडे बारा कोटि योजनें आहे. इत-कीच लांबी दुसऱ्या आंगची, म्हणून एकंदर पंचवीस कोटि भूमि, या पर्वताच्या दोहों अंगांपर्यंत सूर्यप्रका-शानें प्रकाशित असलेली, आणि तितकीच याच्या बाहेरील दोहों बाजूंची अप्रकाशित म्हटलेली, म्हणून जरी पृथिवी अनंत मोठी आहे, तरी येवढ्याच गणनेनें तिचा व्यास पन्नास कोटि योजनें धरिलेला आहे.

**श्लोक-**

' अर्वाचीने तु तस्यार्धे चरंति रविरश्मयः ॥ परार्धे तु तमो नित्यं लोकालोकस्ततः स्मृतः ॥' ( लिंग० अ० ५३ ). म्हणजे ज्याच्या आंतल्या अंगांस प्रकाश व बाहेरल्या अंगास अंधःकार असतो, अतएव त्यास लोकालोक असें म्हटलेलें आहे. कारण लोक म्ह० प्रकाश व अलोक म्ह० अंधःकार, असा लोकालोक शब्दाचा अर्थ आहे. हा लोकालोक पर्वत सर्व द्वीपें व समुद्र यांस सर्वकाळ दक्षिणेस असून, मेरु उत्तरेस असतो, असें समजावें. " सर्वेषामुत्तरे मेरुर्लोकालोकस्तु दक्षिणे ( मत्स्य० अ० ११२ ). (भाग० ५ स्कं० अ०२०).

**लोकोद्धार**-भारतवर्षीय तीर्थ.

**लोपामुद्रा**-विदर्भ राजाची कन्या, व द्वितीयार्थक अग-स्त्यऋषीची स्त्री ती. हिला सत्यवती असेंहि नामांतर ग्रंथांत आढळतें. हिचा इतिहास असा आहे.-एकदां पितरांनीं अगस्त्यास सांगितलें कीं, तूं विवाह कर. त्यावरून तो करावा असें त्यानें मनांत आणून बहुत कन्या पाहिल्या; परंतु त्यास ती मनाजोगी सांपडेना म्हणून, स्वतपोबलानें त्यानें असा संकल्प केला कीं, एक कन्या निर्माण होवो. असें म्हणतांच विदर्भराजा पुत्रार्थ तप करीत होता, त्याच्या स्त्रीच्या उदरीं कन्ये-चा गर्भ राहून पूर्णकाल होतांच ती जन्मास आली. तिला पाहून हिच्या पित्यास असें कसें झालें म्हणून आश्चर्य वाटून, पुत्र व्हावयाचा असून कन्या झाली, ह्या मुद्रालोपास्तव त्यानें हिचें नांव लोपामुद्रा ठेविलें (हा, लोपामुद्रेच्या नांवाचा हेतु मूळांत नाहीं).

पुढें लोपामुद्रा दिवसेंदिवस वाढत जाऊन उपवर झाली असतां, तिचें स्वयंवर करावें असें राजानें मनांत आणून तद्विषयक सिद्धता केली; परंतु कसें असेल तें असो, तिला वरण्यास कोणाचेंहि धैर्य होईना. इतक्यांत तेथें अगस्त्य ऋषि प्राप्त झाला, व राजास त्यानें ही कन्या मला दे अशी याचना केली. त्यावरून राजा कसें करावें असा विचार करीत आहे तों, लोपामुद्रा आपणच होऊन पित्यास म्हणाली कीं, तुम्ही मला अगस्त्यऋषीस द्या, विचार करण्याचें कारण नाहीं. तेव्हां राजानें तिच्या हेतूप्रमाणें तिला अगस्त्यास विवाह करून दिलें असतां, विवाहसमारंभ होतांच ही त्यासमागमें त्याच्या आश्रमास गेली. हिला अगस्त्यापासून दृढास्य आणि दृढस्यु असे दोन पुत्र झाले होते.

**लोभ**-ब्रह्मदेवाच्या पृष्ठभागापासून उत्पन्न झालेल्या अध-र्माच्या संततींतील एक. यास पुराणांतरीं ब्रह्मपुत्र असेंहि

म्हटलें आहे; परंतु त्यांत तात्पर्य मिळून याचा संबंध ब्रह्मदेवाशींच आहे.

**लोमपाद**–प्रथम व द्वितीयार्थक रोमपाद श० पहा.

**लोमश**–एक ब्रह्मर्षि. हा एकेकाळीं इंद्रलोकीं गेला असतां, तेथें यानें अर्जुनास पाहिलें, तेव्हां इंद्रानें याचा सत्कार करुन सांगितलें कीं, अर्जुन हा नरावतार हें आपणांस विदित आहेच, यास मीं येथें आणवून, दैवी शस्त्रास्त्रें प्राप्त करुन देवविलीं आहेत. व आतां अल्पच काळांत याला मी पांडवांकडे पोहोंचविणार आहें. तर आपण भूमीवर गेल्यानंतर हें वृत्त युधिष्ठिरास कळवावें. त्यावरुन लोमश हा, तथास्तु म्हणून तेथून निघाला, व युधिष्ठिर होता त्या काम्यक वनांत आला. त्यास त्यानें पाहून, त्याचा सत्कार व पूजन करुन कोणीकडून येणें झालें म्हणून पुसलें. यानें इंद्रलोकींहून आलों, व अर्जुन तुह्मास सत्वरच भेटेल म्हणून सांगितलें ( भार० वन० अ० ४७ ).

यानें युधिष्ठिरास मजसमागमें तीर्थयात्रेस चल असें म्हटल्यावरुन, तो काम्यकवन सोडून भ्राते व द्रौपदी, तसेच कित्येक ऋषि यांस समागमें घेऊन, तीर्थयात्रेस निघाला असतां, मार्गांत यानें त्यास नीति व अनेक इतिहास ऐकविले, आणि जें जें तीर्थ दृष्टीस पडलें, त्याचा त्याचा महिमा सांगून त्यांत स्नानादिक करवून, महेंद्राचलावर आणिलें ( भार० वन० अ० ९१–११४ ). तेथें अकृतव्रणानें जामदग्न्याचा महिमा ऐकवून म्हटलें कीं, आपणां सर्वांस रामाचें दर्शन चतुर्दशीच्या दिवशीं होईल, मध्यें होणार नाहीं; तर तुम्ही सर्वांनीं तेथपर्यंत येथें राहावें. त्यावरुन हा तेथें राहिला असतां, चतुर्दशीस सर्वांस रामाचें दर्शन झालें. नंतर एक रात्र राहून, रामाची आज्ञा घेऊन लोमश तेथून पांडवांसहित निघाला, तो आगस्त्यादि तीर्थें अवलोकन करीत करीत प्रभासास आला. हें वर्तमान रामकृष्णांस कळून ते युधिष्ठिरास भेटून गेल्यावर, लोमशानें त्यांस यमुनातीरीं आणिलें. नंतर देवयजन ना० मांधाता राजाची यज्ञभूमि दाखवून, तेथून फिरत फिरत कैलासपर्वतासमीप आणिलें ( भार० वन० अ० ११७–१३९ ).

तेथून गंधमादनपर्वताच्या पायथ्याशीं लोमशऋषि येऊन पोहोंचतांच, तेथील सुबाहु ना० किराताधिपतीनें पांडवांसहित याचा आदरसत्कार करून, थोडे दिवस राहून घेतल्यावर लोमशानें गंधमादनावर चढण्यास आरंभ करितांच पांडवांहि तो चढूं लागले. परंतु तो चढतांना बहुतेक समुदाय थकला, असें पाहून, भीमानें घटोत्कचाचें स्मरण केलें. त्यावरुन तो तेथें तत्काळ प्रकट झाला, व त्यानें भीमाच्या आज्ञेवरुन एकसमयावच्छेदेंकरुन सर्वांस उचलून, क्षण होतो न होतो तों, नरनारायणाश्रमीं आणून सोडिलें ( भार० वन० अ० १४०–१४५ ).

नंतर लोमश ऋषि पांडवांस घेऊन, वृषपर्वा ऋषीच्या आश्रमास जाण्यास निघाला, व तो तेथें सत्रा दिवसांनीं जाऊन पोहोंचला, व सात रात्रि राहून, तेथून निघून सर्वांसह चतुर्थदिवशीं अर्ष्टिषेणाच्या आश्रमास आला ( भार० वन० अ० १५८ ). तेथें असतां धौम्य ऋषीनें युधिष्ठिरास सूर्यचंद्रादिकांच्या गति इ० विषयांचें व्याख्यान दिलें ( अ० १६३ ). इतक्यांत इंद्रानें तेथें आणून अर्जुनास पोहोंचविलें ( अ० १६४ ). अर्जुन गंधमादनपर्वतीं आल्यावर, लोमश ऋषि पांडवांसहित तेथें चार वर्षें राहिला. त्या वेळेस त्यांचीं वनवासाचीं सर्व मिळून दहा वर्षे भरलीं होतीं ( अ० १७६ ). पुढें लोमश ऋषि पांडवांस घेऊन पुनः नरनारायणाश्रमास आला, आणि तेथून निघाल्यावर ज्या किराताधिपति सुबाहूच्या राज्यांत पूर्वीं उतरला होता, तेथें येऊन, त्यानें आग्रह केल्यावरुन एक मास राहिला. तेथून निघाल्यावर यामुनगिरीवरील विशाखयूप ना० स्थळावरुन द्वैतवनांत सरस्वतीनदीतीरीं येऊन वर्षाऋतु घालविल्यावर कार्तिकी पूर्णिमा होतांच लोमशानें पांडवांस काम्यक वनांत आणून सोडिलें, व आपण आपल्या आश्रमास गमन केलें ( भार० वन० अ० १८१–१८२ ).

२–लंकेंतील एक रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

३–पलित मूषकाचा मित्र एक मार्जार.

**लोमहर्षण**–रोमहर्षण श० पहा.

**लोमायन**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**लोला**–मधु ना० राक्षस कुंभीनसीचा पति, त्याची माता (वा० रा० उत्तर० स० ६१).

**लोलार्क**–काशीपुरींतील स्थलवि०.

**लोलाक्षी**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**लोहजंघ**–पांडवांस राजसूय यज्ञामध्यें गृहकार्यांत साह्य करणारा राजा.

**लोहदंड**–भारतवर्षीय तीर्थ.

**लोहल**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**लोहवार**– ,, ,,.

**लोहित**-रोहित ना० ऋषि तोच.

२-एक नागवि०

३-सर्वौषधिगिरिसमीपचा एक पर्वत.

४-याच पर्वतावरील एक सरोवर.

५-खालचा लोहितक श० पहा.

**लोहितक**-भारतवर्षीय देश. हा काश्मीर देशाच्या उत्तरेकडे असणारा होय (भार० सभा० अ० २७ ). यास रोहितक देश असेंहि म्हटलेलें आहे व येथील राजा रोहितक ना० यवन असेल असें वाटतें.

**लोहिता-लोहितारणी**-द्वितीयार्थक: हिमालयापासून निघालेली नदी.

**लोहितार्ण**-प्रियव्रत राजाचा पुत्र घृतपृष्ठ, त्याच्या सात पुत्रांतील एक. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२-क्रौंच द्वीपांतील साहवा वर्ष.

**लोहिताक्ष**-जनमेजयाच्या सर्पसत्रांतील स्थापत्य ना० ऋत्विज असलेला ऋषि. यानें जनमेजयास पूर्वींच स्थलशुद्धि करतांना सांगितलें होतें कीं, या सत्रांत एक ब्राह्मण येऊन, तो तें तुजकडून समाप्त करवील (भार० आदि० अ० ५१ ).

**लोहित्य**-ग्रामवि०.

**लौगाक्षि**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ). तसाच एक अहर्वसिष्ठकुलांतील ऋषि व कुल.

**लौमहर्षणि**-रौमहर्षणि तोच.

**लौहित्य**-लोहित सरोवरांतून निघालेला नद. याच्या समीपच्या अरण्यास विशोक म्हटलेलें आहे ( भार० महाप्रस्थानिक० अ० १ ).

**लौहित्यपुर**-कर्वटदेशाच्या पूर्वेकडील नगर. याच्या पुढें म्लेंछराजे व पूर्वसमुद्रच पांडवांच्या वेळेस होता.

**लौक्षि**-एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**लौक्षिण्य**-एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

---

## व

**वक्र**-वक्रदंताचा भ्राता.

**वक्रदंत**-द्वितीयार्थक दंतवक्र तोच.

**वंग**-(सो० वं०) अनुकुलोत्पन्न सुतपा राजाचा पुत्र बलि, त्याच्या साहा पुत्रांतील दुसरा.

२-भारतवर्षीय देश. कौशिकी कच्छनिलय म्हणून जो पाणथळ प्रदेश वर्णिलेला आहे, त्याच्या पूर्वेस हा पांडवांच्या वेळेस होता. येथें समुद्रसेन आणि चंद्रसेन असे दोघे बंधु त्या वेळेस राजे असत. वंग देशास (बंगाल) असें नांव असेल तर, हा बंगाल देश मूळचा खरा, आतांचा गोचर तो नव्हे ( भार० सभा० अ० ३० ).

**वचक्नु**-एक ऋषि. गार्गी म्हणून जी प्रख्यात ब्रह्मनिष्ठ स्त्री होती तिचा हा पिता.

**वंजुला**-सह्याद्रि पर्वतापासून निघालेली नदी.

**वंजुलि**-विश्वामित्र कुलोत्पन्न एक ऋषि.

**वज्र**-विश्वामित्र ऋषींच्या पुत्रांतील एक.

२-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयांत जन्मलेल्या स्थल ना० राजाचा पुत्र जो वज्रनाभ तोच. याचा पुत्र खगण राजा.

३-(सो०वं०) यदुकुलोत्पन्न कृष्णाचा प्रपौत्र, प्रद्युम्नाचा पौत्र व अनिरुद्धाचा पुत्र तो. यादव मेले त्यांत हा मरण पावला नव्हता.

**श्लोक.**

वज्रस्तस्याभवद्यस्तु मौसलादवशेषितः ।। ३७ ॥

( भाग० दशम० अ० ९० ). कृष्णनिधन झाल्यावर अर्जुन द्वारकेस गेला तेव्हां, तो यास कृष्णाच्या स्त्रियांसहवर्तमान हस्तिनापुरास घेऊन आला, व याची इंद्रप्रस्थाच्या राज्यावर त्यानें स्थापना केली.

**श्लोक.**

दश षट् च सहस्राणि वासुदेवावरोधनं ॥

पुरस्कृत्य ययुर्वज्रं पौत्रं कृष्णस्य धीमतः ॥

इंद्रप्रस्थे ददौ राज्यं वज्राय परवीरहा ॥ ७ ॥

( भार० मौसल० अ० ७ ). यास वज्रनाभ असेंहि नांव असून, हा मेल्यावर याचा पुत्र प्रतिबाहु तो राज्यावर बसला.

४-किष्किंधेच्या पश्चिमेकडील एक पर्वत.

५-उपासंगधर ना० यादवाचा पुत्र.

६-इंद्राचें आयुधवि० याची उत्पत्ति कशी झाली, त्याविषयीं ( भार० वन० अ० १०० पहा ).

**वज्रकाय**-लंकेतील एक राक्षस.

**वज्रकूट**-प्लक्षद्वीपस्थ एक पर्वत.

**वज्रज्वाला**-वृत्रज्वाला शब्द पहा.

**वज्रदत्त**-प्राग्ज्योतिषपुरच्या भगदत्त राजाचा पुत्र. यानें पांडवांचा अश्वमेधीय श्यामकर्ण अश्व धरून, अर्जुनाशीं तीन दिवस युद्ध केलें व पराभव पावला ( भार० अश्वमे० अ० ७५-७६ ).

**वज्रदंष्ट्र**-अंगदानें मारिलेला रावणपक्षीय राक्षस.

**वज्रनाभ**-द्वितीय व तृतीयार्थक वज्र शब्द पहा.

२-दनुपुत्र एक दानव.

३-कृष्णाच्या हातांतील चक्राचें नांव. हें वरुणापासून आणून त्यास अग्नीनें दिलें होतें.

**वज्रपाणि**–वज्रधारण करण्यानें सांप्रतच्या इंद्रास नांव. अशा अर्थाचीं अनेक नांवें आहेत.

**वज्रबाहु**–कुंभकर्णानें भक्षिलेला रामसेनेंतील वानर (भार० वन० अ० २८७ ).

**वज्रमुष्टि**–मैंद वानरानें मारिलेला राक्षस (वा० रा० युद्ध स० ४३ ).

**वज्रवेग**–मारुतीच्या हातून मेलेला राक्षस ( भार० वन० अ० २८६ ).

**वज्रशाल्मलिकंटक**–अगम्य पश्वादिकांशीं गमन करणारास प्राप्त होणारा नरक.

**वज्रशीर्ष**–वारुणि भृगूच्या सात पुत्रांतील दुसरा. च्यवन ऋषीचा कनिष्ठ भ्राता.

**वज्रसूचिक**–सामवेदोपनिषत्.

**वज्रहनु**–कुंभकर्णाच्या पुत्रांतील एक.

**वज्रहस्त**–अर्जुनानें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा (भार० कर्ण० अ० ७७ ).

**वज्रांग**–मरुद्गण हे दैत्य असतां, इंद्रानें मारण्याच्या हेतूनें त्यांचे तुकडे केले असून अमर राहिले, व देवांनीं त्यांस त्यामुळेंच आपणांत मिळवून घेतलें. असें पाहून इंद्रास मारण्याकरितां, पुनः दितीनें कश्यपापासून हा संपादन केलेला पुत्र. हा इतका पराक्रमी होता कीं, यानें इंद्रास बांधून आपल्या मातेसमीप आणिल्यावर, तिला, यास मारूं किंवा कसें म्हणून पुसलें. इतक्यांत तेथें ब्रह्मदेव प्रकट होऊन, त्यांनीं यास इच्छित वर दिला, व इंद्रास सोडविलें. यास वरांगा ना० स्त्री असून, पुत्र तारकासुर अशा नांवानें प्रसिद्ध होता ( मत्स्य० अ० १४५ ).

**वज्राक्ष**–दनुपुत्र दानवांतील एक.

**वटेश्वर**–नर्मदेसंबंधीं तीर्थ.

**वडवा**–विवस्वान् आदित्याची स्त्री संज्ञा, तिनें अश्विनीचें रूप धारण केलें असतां त्या वेळेस पडलेलें नांव. हिलाच पुढें अश्वरूपधर सूर्यापासून अश्विनीकुमार अशा साधारण नांवाचे दोन पुत्र झाले होते.

**वडवाग्नि**–समुद्रांत राहून त्याचें जल शोषण करणारा अग्नि. हा बृहस्पतीची स्त्री तारा तिच्या साहा पुत्रांतील एक.

**वडवानल**–वडवाग्नि.

**वडवाप्रातिथेयी**–ब्रह्मचर्यव्रतानें राहणारी एक ब्राह्मणकन्या.

**वतंड**–एक ब्रह्मर्षि ( १ विश्वामित्र श० पहा ).

**वत्स**–ब्रह्मर्षि व त्याचें कुल ( ३ भृगु० श० पहा ).

२–जामदग्न्य रामाच्या भीतीनें, कोणी लपविलेला राजपुत्र. हा गायींच्या वत्सांत वृद्धि पावला म्हणून, यास असें नांव पडलें होतें ( भार० शांति० अ० ४९ ).

३–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढान्वयांतील सेनजित ना० राजाच्या चार पुत्रांतील चौथा.

४–वत्सासुर शब्द पहा.

५.–कोसलदेशीय कोणी सामान्य राजा. हा द्रौपदीस्वयंवरांत होता ( भार० आदि० अ० १८६ ).

**वत्सक**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न शावस्त अ० श्रावस्त राजाचा पुत्र, बृहदश्व राजाचा भ्राता. यास पुराणांतरीं वंशक असें नामांतर आढळतें.

२–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय शूर राजास मारीषेपासून झालेल्या दहा पुत्रांतील नववा. यास मिश्रकेशी अप्सरेपासून वृकादिक पुत्र झाले होते.

**वत्सद्रोह**–वत्सवृद्ध शब्द पहा.

**वत्सप्रीति**–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न भलंदन राजाचा पुत्र, याचा पुत्र प्रांशु ना० राजा.

**वत्सभूमि**–भारतवर्षीय देश ( भार० सभा० अ० ३० ).
२–भारतवर्षीय क्षेत्र.

**वत्सर**–उत्तानपादपुत्र ध्रुवराजा, त्यास भ्रमी ना० भार्येपासून झालेल्या दोन पुत्रांतील दुसरा. ध्रुवाच्या मागें हाच राजा झाला होता; कारण याचा ज्येष्ठ भ्राता उत्कल, तो विरक्त व अंतर्निष्ठ होता. यास स्ववींथी नांवाची स्त्री होती, व तिजपासून झालेले पुष्पार्ण, तिग्मकेतु, इष, ऊर्ज, वसु आणि जय, असे साहा पुत्र होते.

**वत्सला**–ही बलरामाची कन्या, व पंडुपुत्र अर्जुनाचा पुत्र जो अभिमन्यु, त्याच्या दोन स्त्रियांतील ज्येष्ठ. हिच्या विवाहाचा इतिहास असा आहे.—पांडव वनवासास गेल्यावर, दुर्योधनानें द्वारकेस शकुनीस पाठवून, आपल्या लक्ष्मण ना० पुत्रास त्यानें हिला द्यावें असा प्रयत्न केला. तो विचार बलरामास मान्य होऊन, त्यानें व रेवतीनें, शकुनीस होय म्हणून म्हटलें, आणि त्यास मार्गस्थ केल्यावर, ही गोष्ट बलरामानें कृष्णास कळविली; परंतु कृष्णानें पूर्वीच सुभद्रेनें म्हटल्यावरून, तिला वचन दिलें होतें कीं, ही तुझ्या अभिमन्यूस मी देईन. म्हणून, बलरामाचा विचार ऐकून, कृष्णास बरें वाटलें नाहीं; तथापि त्यानें, यांतच कांहींतरी युक्ति काढिली पाहिजे असें मनांत आणून बलरामास म्हटलें कीं, तर मग आतां लग्नपत्रिका सर्वांस लिहाव्या. तेव्हां बलराम म्हणाला, त्या तूंच लिही. त्यावरून कृष्णानें सर्वांस पत्रिका लिहिल्या. त्यांतच एक विदुरास लिहिली. त्याचें कारण असें होतें कीं, त्या वेळेस

सुभद्रा व अभिमन्यू हीं दोघें विदुराच्या घरीं होतीं. म्हणून विदुरास हें वृत्त कळण्यांत ऐतेंच त्यांस कळेल, व अभिमन्यु सावध होऊन तो द्वारकेस येईल. सारांश, ती लग्नपत्रिका पोहोंचतांच अभिमन्यु आपल्या मातेस समागमें घेऊन द्वारकेस येण्यास निघाला असतां, मार्गांत त्यास घटोत्कच भेटला. नंतर अभिमन्यूनें त्यास समागमें घेतलें, व द्वारकेस जाऊन गुप्त राहिला. पुढें घटोत्कच कृष्णास भेटून अभिमन्यु येथें आल्याचें वृत्त त्यानें सांगितलें. त्यावरून कृष्ण गुप्तपणें सुभद्रेस येऊन भेटला, व म्हणाला कीं, घटोत्कचानें आपल्या राक्षसी मायेनें, वत्सलेस उचलून इकडे आणावें, व तिकडे पुनः आपणच नवरी होऊन बसून लग्नसमयाच्या वेळेस प्रकट व्हावें आणि कौरवांस त्रासवून रिकामें हस्तिनापुरास लावून द्यावें, त्या अवकाशांत इकडे अभिमन्यूनें वत्सलेशीं विवाह करून घ्यावा. असें सांगून कृष्ण गेला असतां, घटोत्कचानें त्याचप्रमाणें करून, कौरवांची पराकाष्ठेची नासाडी करून, त्यांस हस्तिनापुरास हांकून दिलें, व इकडे अभिमन्यूचा वत्सलेशीं विवाह झाला. या गोष्टीनें बलरामास आलेल्या कोपाचें कृष्णानें सांत्वन करून, त्याकडून वत्सला व अभिमन्यु यांचा विवाहसमारंभ उत्तम प्रकारें करवून, वत्सलेस अभिमन्यु व सुभद्रा यांसमागमें मार्गस्थ केलें ( जैमिनी भार० वन० ).

**वत्सवृद्ध**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ध्रुवसंधिवंशांतील उरुक्रिय अ० उरुक्षव राजाचा पुत्र. यास वत्सद्रोह असें नामांतर असून, पुत्र प्रतिव्योम नांवाचा होता.

**वत्सार**–कश्यपऋषीच्या दोन पुत्रांतील पहिला ( २ कश्यप श० पहा ). अवत्सार असेंहि यास म्हटलेलें आढळतें.

**वत्सासुर**–कंसपक्षीय असुरवि०. हा, कृष्णाच्या नाशार्थ वृंदावनांत येऊन वत्सरूपानें गोवत्सांत शिरला. हें कपट कृष्णानें जाणून, यास कपित्थ ( कंवठीच्या ) वृक्षावर आपटून ठार मारिलें ( भाग० १० स्कं० अ० ११ ).

**वत्स्यदेश**–भागीरथीच्या दक्षिणतीरचा देश ( वा० रा० अयो० स० ५२ ).

**वंदना**–भारतवर्षीय नदी.

**वधूसर**–एक भारतवर्षीय नदी. भृगुऋषीची स्त्री पुलोमा, दंश राक्षस हरण करून चालला असतां, तिचा गर्भ मार्गांत च्युत झालेला च्यवन नांवानें प्रसिद्ध आहेच. त्याच्या तेजानें राक्षस भस्म झाल्यावर, पुलोमेच्या नेत्रांतून आनंदाश्रु निघाले. त्या प्रवाहाचें हें सरोवर म्हणून अशा नांवानें प्रसिद्ध आहे ( भार० आदि० अ० ६ ).

**वध्रदेश**–भारतवर्षीय देश (भार० भीष्म० अ० ९).

**वन**–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न उशीनर राजाच्या चार पुत्रांतील एक.

**वनस्पति**–प्रियव्रतपुत्र घृतपृष्ठ, त्याच्या सात पुत्रांतील सातवा. याच्या वर्षास हेंच नांव होतें.

२–क्रौंचद्वीपांतील सातवा वर्ष.

**वनायु**–दनुपुत्र एक दानव ( दनु० श० पहा ).

२–भारतवर्षीय महादेश.

**वनेयु**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्व राजाच्या दहा पुत्रांतील दाहावा.

**वन्हि**–अग्नि.

२–रामसेनेंतील वानर.

३–( सो० वं० ) ययाति राजाचा पुत्र तुर्वसु, त्याचा पुत्र. याचा पुत्र भर्ग.

४–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय सात्वतपुत्र अंधक त्याचा पौत्र, व कुकुरराजाचा पुत्र, याचा पुत्र विलोमा.

५–कृष्णास मित्रविंदेपासून झालेला पुत्र.

**वपु**–एक अप्सरा.

**वपुष्टमा**–परीक्षित् राजाचा पुत्र जनमेजय, त्याची स्त्री. ही सुवर्णवर्म्याची कन्या असून, जनमेजयापासून हिला शतानीक नांवाचा पुत्र झाला होता.

**वय**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**वयुन**–कृशाश्वऋषीस धिषणेपासून झालेल्या चार पुत्रांतील एक.

**वयुना**––अग्निष्वात्तपितरांची कन्या. ही ब्रह्मनिष्ठ असून हिची भगिनी धरिणी तीही तशीच होती.

**वररुचि**–नाटकशास्त्रप्रणेता एक ऋषि ( मत्स्य० अ० १० ).

**वरदा**–भारतवर्षीय नदी.

**वरा**– " "

**वरांगा-वरांगी**–वज्रांगदैत्यांस स्त्री असावी म्हणून ब्रह्मदेवांनीं निर्मिलेली स्त्री. हिनें आपल्या पतिसमागमें दुर्घट तप केलें होतें ( मत्स्य० अ० १४५ ).

**वराणसी**–भारतवर्षीय नदी.

**वरास्य**–सर्पास्य शब्द पहा.

**वराह**–ब्रह्मदेवाच्या नासिकेंतून हिरण्याक्षदैत्याच्या वधार्थ हा उत्पन्न होऊन यानें त्यास मारून पृथिवीचा उद्धार

केला ( भाग० ३ स्कं० अ० १२ ). चालू कल्प आरंभतांच यानें उत्पन्न होऊन पृथिवीस स्वस्थानीं स्थित केलें. या महत्कार्यामुळें या कल्पास वाराहकल्प नांव पडलें. यास आदिवराह, यज्ञवराह आणि श्वेतवराह अशीं तीन नामांतरें आहेत.

२–किष्किंधेच्या पश्चिम दिशेकडील एक पर्वत.

३–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**वराहकर्ण**–एक किन्नर.

**वराहकल्प**–वाराहकल्प शब्द पहा.

**वराहशैल**–मगध देशाचा सीमापर्वत.

**वरीयान्**–स्वायंभुव मन्वंतरांतील पुलह ऋषीच्या तीन पुत्रांतील एक.

२–पुढें होणाऱ्या सावर्णि मनूच्या दहा पुत्रांतील एक.

**वरुण**–कल्पारंभींचा पश्चिम दिग्पाल तो. हा जलाधिपति असून याची राहण्याची नगरी मानसोत्तर पर्वतावर निम्लोचिनी अ०सूपा अशा नांवानें प्रसिद्ध आहे व यास स्त्री होती तिचें नांव गौरी असें होतें( भार० उद्योग० अ० ११७ ). यानें चालू मन्वंतर आरंभण्याच्या संधीस ब्रह्मदेवास ऋत्विज करुन यज्ञ केला होता, किंवा महादेवानें याचें रुप धरुन केला असेंहि आढळतें. तें कांहीं कां असेना, वरुण नांवांत फेर नाहीं, हें अगदीं खरें आहे. त्या वेळेस अग्नींतून भृगु, अंगिरा आणि कवि, असे तीन ऋषि निर्माण झाले. त्यांस वरुणानें, अग्नीनें आणि ब्रह्मदेवानें क्रमेंकरुन पुत्रत्वानें ग्रहण केलें. म्हणून भृगु, तैत्तिरीय उपनिषदांत वरुणाचा पुत्र म्हटलेला आहे ( भार० अनु० अ०८५).

२–द्वादशादित्यांतील एक आदित्य तो. सांप्रत हा पश्चिम दिग्पाल असून, यास एक स्त्री ज्येष्ठा नांवाची व तिच्या ठायीं झालेले गौ आणि पुष्कर, असे दोन पुत्र होते. याशिवाय यास आणखी अधर्म व बल हे दोन पुत्र, व सुरा ना० कन्या आढळत्ये. अष्टावक्राशीं वाद होऊन त्यांत हरला असा एक बंदी म्हणूनही पुत्र आढळतो.हा प्रतिवर्षी आषाढमासचा सूर्य म्हणून वर्णिलेला आहे ( १३ शुचि श० पहा ). शीततोया ही एक स्त्री, यास आणखी आढळत्ये, व तिजपासून श्रुतायुध असा एक पुत्र झालेला पाहण्यांत येतो. ती शीततोया पृथिवीवरील नदी असून, तिच्या मूर्तिमान् देवतेनें तो संपादिलेला पुत्र असें समजावें.

३–मुनी म्हणून जी कश्यपस्त्री, तिच्या गंधर्वपुत्रांतील एक.

**वरुणस्रोतस्**–काम्यक वनाच्या दक्षिणेकडील पर्वत.

**वरुणा**–भारतवर्षीय नदी.

**वरूथ**–या नांवाचा एक ग्राम.

२–भरतपुत्र जो भरद्वाज राजा, त्यास नामांतर.

**वरूथप**–गोपविं० ( भाग० १० स्कं० अ० २२ ).

**वरूथी**–एक नदी ( वा० रा० युद्ध० स०१२७).

२–एक ब्रह्मर्षि.

**वरेण्य**–वारुणि भृगूच्या सात पुत्रांतील सहावा. यास विभु असेंहि नामांतर होतें.

**वर्कु**–वृष्णि ऋषीचा पुत्र जो वार्ष्णि तो.

**वर्गा**–शापानें मगरी झालेली अप्सरा ( नारीतीर्थ श० पहा ).

**वर्चा**–सोम ना० जो वसु त्याचा पुत्र.

२–एक यक्ष (१ तपस्य श० पहा ).

३–सुचेता ऋषीचा पुत्र. याचा पुत्र विहव्य.

**वर्धन**–कृष्णास मित्रविंदेपासून झालेला पुत्र.

**वर्धमान्**–क्रौंचद्वीपांतील एक पर्वत.

**वर्मक**–इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील देश, व तेथील राजा ( भार० सभा० अ० ३१ ).

**वर्मा**–एक ब्रह्मर्षि.

**वर्य**–राक्षस ( ५ नभ श० पहा ).

**वर्ष**–महाद्वीपांत केलेले असतात जे भूभाग तो प्रत्येक. जसे अजनाभ ( भरतवर्ष ), किंपुरुष, इ० नऊ जंबूद्वीपांत आहेत त्याप्रमाणें.

२–वसुदेवास उपदेवेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**वल्गुजंघ**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**वंशक**–प्रथमार्थक वत्सक तोच.

**वंशगुल्म**–नर्मदा आणि शोणनद यांच्या संगमांतील तीर्थ.

**वंशा**–प्राधेच्या अप्सरा कन्यांतील एक.

**वंशोकसारा**–भारतवर्षीय नदी. हिच्या तीरीं सुरभि ना० वन असून, तेथें कुबेरदूत हिरण्यशृंग राहतो.

**वंशोद्भेद**–भारतवर्षीय तीर्थ.

**वभ्रु**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**वसाति**–दुर्योधनपक्षीय भारती युद्धांतील योद्धा. चक्रव्यूहांत अभिमन्यु शिरला असतां, यानें अशी प्रतिज्ञा केली होती कीं, आज मी त्यास मारीन, न मारीन तर प्राण ठेवणार नाहीं. असें बोलून त्यासमोर गेला असतां, अभिमन्यूनेंच यास मारलें ( भार० द्रोण० अ० ४४ ).

२–वाहीकप्रदेशसंबंधीं देश, व तेथील लोक.

**वसामनी**–भारतवर्षीय नदी.

**वसिष्ठ**–स्वायंभुव मन्वंतरांतील ब्रह्मदेवाच्या दश मानसपुत्रांतील एक. हा ब्रह्मदेवाच्या प्राणवायूपासून झाला

होता, व यास कर्दम प्रजापतीनें आपल्या नऊ कन्यांतील आठवी अरुंधती भार्यार्थ दिली होती. याला, ऊर्जा म्हणून दुसरी स्त्री आढळत्ये, व तिला यापासून चित्रकेतु इ० साहा पुत्र झाल्याचें पाहण्यांत येतें (ऊर्जा श० पहा ). याची पहिली स्त्री अरुंधती, तिलाहि यापासून **हवींद्र, सुकृत, मूर्ति, आप, ज्योति, अय,** आणि **स्मय**, असे सात पुत्र असून, ते पुढल्या स्वारोचिष मन्वंतरांतील प्रजापति होते (भाग० ४स्कं० ). यांशिवाय सुकाली नांवाचे पितर तेहि याचेच पुत्र असत.

२–पूर्वीचे ब्रह्ममानसपुत्र महादेवाच्या शापानें मरण पावले असतां, ब्रह्मदेवानें चालू मन्वंतरारंभीं त्यांस पुनः उत्पन्न केलें. त्यांत हा, अग्नीच्या मध्यभागापासून उत्पन्न झाला होता ( महर्षि श० पहा ). येथें यास अक्षमाला नांवाची स्त्री होती असें दिसतें (भार० उद्योग० अ० ११७ ). चालू मन्वंतरांत सूर्यवंशीय इक्ष्वाकु राजानें, यास पौरोहित्यार्थ वरिलें होतें म्हणून त्याच्या मागें त्याच्या तीन पुत्रांतील दुसरा जो निमि राजा, त्यानेंहि यासच उपाध्याय करून, याच्या साह्यानें अनेक यज्ञ केले. एकदां यास, दुसरीकडे यज्ञास जाण्याच्या संधीस निमीनें येऊन म्हटलें कीं, मी आणखी यज्ञ आरंभीत आहें, तर आपण सत्वर चलावें. तेव्हां यानें सांगितलें, मी दुसरीकडे आमंत्रण घेतलें आहें, यास्तव प्रस्तुत तूं अवकाश करून, मी आल्यावर यज्ञास आरंभ कर. तें त्यानें न एकून गौतम ऋषीस उपाध्याय केले, व यज्ञ आरंभिला.पुढें हा दुसरेकडील यज्ञ समाप्त करून, निमीकडे आला, आणि पाहतो तर, यानें दुसरा उपाध्याय वरून, यज्ञ आरंभिलेला समाप्त करीत आणिला आहे. त्यावरून यास क्रोध येऊन, यानें त्यास, व त्यानें यास शाप दिला. तेणेंकरून दोघेहि मरण पावले ( १ निमि श०पहा ).

३–निमीच्या शापानें मरण पावलेल्या वसिष्ठास, अशी अवस्था प्राप्त झालेली पाहून, ब्रह्मदेवांनीं त्यास मग असें सांगितलें.—**श्लोक.**—मित्रावरुणयोः पुत्र वसिष्ठ त्वं भविष्यसि ॥

वसिष्ठेति च ते नाम तत्रापि च भविष्यति ॥
जन्मद्वयमतीतं च तत्रापि त्वं स्मरिष्यसि ॥ २२ ॥

( मत्स्य० अ० २०० ). म्हणजे तूं आतां मित्रावरुणाचा पुत्र होशील व तेथें तुला वसिष्ठ असेंच नांव प्राप्त होऊन पूर्वीच्या दोन जन्मांचें स्मरण राहील. सारांश, निमीच्या शापानें मरण पावलेला वसिष्ठ मित्रावरुणाचा पुत्र होऊन, वसिष्ठ अशाच नांवानें पुनः इक्ष्वाकु राजाचा पुत्र जो विकुक्षि अ० शशाद राजा, त्याच्या कुलाचा उपाध्याय झाला. येथें यास नारदभगिनी अरुंधती ती स्त्री असून, तिचे ठायीं यास शक्ति इ० शतपुत्र झाले होते. नंतर शक्तीपासून पराशर ऋषि झाला, व त्याचा पुत्र तोच कृष्ण द्वैपायन अशी याची वंशपरंपरा शुक त्याचे पुत्र इ० प्रकारानें वाढली.

**श्लोक.**

वसिष्ठस्तूपयेमेथ भगिनीं नारदस्य तु ॥
अरुंधतीं वरारोहां तस्यां शक्तिमजीजनत् ॥ ३० ॥
शक्तेः पराशरः पुत्रस्तस्य वंशं निबोध मे ॥
यस्य द्वैपायनः पुत्रः स्वयं ऋषि विष्णुरजायत ॥३१॥
( मत्स्य० अ० २०० ).

याच्या कुलांत याच्यासुद्धां मंत्रद्रष्टे ऋषि सात होते. ते असे-मुख्य स्वतः हा एक, २ शक्ति, ३ पराशर, ४ इंद्रप्रमति, भरद्वसु, मैत्रावरुण आणि कुंडिन ( मत्स्य० अ० १४४). याच्या कुलांत वंशमालिका चार आहेत, त्यांचीं नांवें-**वसिष्ठ, कुंडिन,** उपमन्यु आणि **पराशर**, या चहूंतील ऋषि, व प्रवर येणेंप्रमाणें–केवलवसिष्ठ–व्याघ्रपाद, औपगव, वैक्लव, शाद्वलायन, कपिष्ठल, औपलोम, अलब्ध, शठ, कठ, गौपायन, बोधप, दाकव्य, वाह्यक, वालिशय, वाग्ग्रंथि, आपस्थूण,शीतवृत्त, ब्राह्मपुरेयक, लोमायन, स्वस्तिकर, शांडिली, गौडिनी, वाडोहलि, सुमना, उपावृद्धि, चौलि, वौलि, ब्रह्मबल, पौलि, श्रवस, पौडव आणि याज्ञवल्क, हे सर्व **ऋषि वासिष्ठ** एवढ्या एकाच प्रवराचे. कुंडिनकुलोत्पन्न **वासिष्ठ, मैत्रावरुण, कौंडिन्य,** अशा तीन प्रवरांचे, उपमन्युकुलोत्पन्न शैलालय, महाकर्ण, कौरव्य, क्रोधि, कपिंजल, वालखिल्य, भागवित्तायन, कौलायन, कालशिख, कोरकृष्ण, सुरायण, शाकाहार्य, शाकधि, काण्व, उपलप, शाकायन, उहाक, माषशरावय, दाकायन, वालवय, वाकय, गौरथ, लंबायन, श्यामवय, क्रोडोदरायण, प्रलंबायन, औपमन्यव, सांख्यायन, वेदशेरक, पालंकायन, उद्गाह, बलेक्षु, मातेय, ब्रह्मबलि, पर्णागारि, हे सर्व ऋषि, **वासिष्ठ, ऐंद्रप्रमति** अ० **ऐंद्रप्रमदि, भरद्वसव्य**, अशा तीन प्रवरांचे. पराशरकुलोत्पन्न जे गौरपराशरादिक साहा भेदांचे ऋषि, त्यांचे **वासिष्ठ, शाक्त्य, पाराशर्य,** असे तीन प्रवर असतात.

या वासिष्ठ कुलांत मत्स्यपुराणावरून आणखी दोन भेदांचे ऋषि, असे आढळतात. औपस्थल, स्वस्थली, पालोह, लोहल, माध्यंदिन, उमाक्षति, पैप्पलादि,

विचक्षुष, त्रैशृंगायन, सैवल्क, आणि कुंडिन, हे ऋषि, **वासिष्ठ, जातूकर्ण्य, आत्रेय,** अशा तीन प्रवरांचे होते, आणि **शिवकर्ण, वय, पादप,** अशाहि तीन प्रवरांचे कांहीं ऋषि होते. या शेवटल्यांत वासिष्ठ असा प्रवर कां आला नसेल तो नसो.

हा वसिष्ठ, आपल्या आश्रमांत आश्रमधर्म चालवीत असतां, यास ते चालविण्यास कामधेनूचें उत्तम वल असें. त्यामुळें केव्हां कितीहि अतिथि प्राप्त झाले तरी, व कांहींहि त्यांनीं इच्छिलें तरी, त्यांचा सत्कार करून तें पुरविण्यास यास अडचण पडत नसे. एकदां असें झालें कीं, विश्वामित्र राजा सैन्यासहवर्तमान अरण्यांत मृगयेस आला असतां, तो या आश्रमांत आला. त्यास पाहून वसिष्ठानें त्याचें इतकें उत्तम आतिथ्य केलें कीं, सर्वांस उत्तम पात्रांत वाढलेलें असें दिव्यान्नाचें भोजन दिलें. तेव्हां विश्वामित्रानें, आश्रमांत पाक इ० करावा लागला नसून, हें अन्न आलें कोठून त्याविषयीं वसिष्ठास पुसलें. त्यानें कामधेनूच्या बलानें हें सर्व झालें, असें सांगितल्यावर, विश्वामित्र ती धेनु, यापाशीं मागूं लागला. वसिष्ठानें सांगितलें, ही धेनु तुला घेऊन कर्तव्य काय ? तूं राजा असून तुजजवळ द्रव्य असल्यामुळें तुला तिची गरज नसून, आम्ही अरण्यांत राहणारे व द्रव्यहीन म्हणून हिचा उपयोग आम्हांसच आहे. विश्वामित्र म्हणाला, तें कांहीं असो, ही धेनु आपण मला दिलीच पाहिजे, न द्याल तर मी बलात्कारानें नेईन. वसिष्ठ म्हणाला, बरें तर घेऊन जा. त्यावरून विश्वामित्र धेनूस नेऊं लागला असतां, तिनें आपल्या अंगापासून सैन्य निर्माण करून, याचा ससैन्य पराभव केला, व पुनः परत वसिष्ठाकडे आली. त्या वेळेस जें सैन्य निर्माण झालें तें असें–तिच्या पुच्छापासून पल्हव नांवाचे म्लेंछ, योनीपासून यवन, शेणापासून शबर, कासेपासून शक इ०, मूत्रापासून पौंड्र, किरात, सिंहल, बर्बर, खश, चिबुक, पुलिंद, चीन आणि केरल इ० उत्पन्न झाले होते. त्यावरून ब्रह्मबलापुढें क्षत्रियबलास धिक्कार असो, असें म्हणून त्यानें राज्य सोडिलें, व ब्रह्मबल संपादन करण्याच्या हेतूनें अरण्यांत तपश्चर्येस गमन केलें. हेंच यानें व विश्वामित्राचें वैर पडण्यास मूळ कारण झालें ( १ विश्वामित्र श० पहा ).

पुढें विश्वामित्र, तपःसंपन्न झाल्यावर वसिष्ठानें आपल्यास, हे ब्रह्मर्षे, असें म्हणावें, त्याविषयीं प्रयत्न करूं लागला; परंतु वसिष्ठ त्यास कांहीं केल्या तथापि असें म्हणेना. जेव्हां जेव्हां



राजर्षे म्हणूनच म्हणे, आणि जों जों वसिष्ठ तसें म्हणे, तों तों विश्वामित्र अधिक संतापे. याकरितां त्यानें वसिष्ठाचे शक्ति आदिकरून शत पुत्र राक्षसाकडून भक्षविले. त्याविषयीं यास जरी शोक झाला, तरी यानें त्यास ब्रह्मर्षि असें म्हटलेंच नाहीं.

पुढें वसिष्ठ पुत्रशोकानें अगदींच दग्धप्राय होऊन, त्यानें आपल्या शरीरास पाशबद्ध केलें, व बुडून मरावें, या हेतूनें एका नदींत उडी टाकिली; परंतु नदीनेंच यास पाशमुक्त करून बाहेर टाकिलें; त्यामुळें जरी हा विमनस्क झाला, तरी त्या नदीस विपाशा असें नांव पडलें, तें अजून चालत आहे. ( भार० वन० अ० १३० ). अशीच यानें पुनः एके वेळीं हैमवती नदींत उडी टाकिली; परंतु तिनेंहि शतप्रवाहरुपानें होऊन यास बुडविलें नाहीं, म्हणून तिलाहि शतद्रू असें नांव पडलेलें अजून चालत आहे. सारांश, कोणत्याहि प्रकारानें आपणास मरण येत नाहीं, असें पाहून हा उदास झाला, व एकेकाळीं आश्रम सोडून निघाला. त्यामागून शक्तीची स्त्री अदृश्यंति निघालेली यास विदित नसून हा पुढें चालला आहे तों यानें आपल्या मागें वेदध्वनीचा शब्द श्रवण केला. त्यावरून यानें मागें पाहिलें, व स्नुषा ( अदृश्यंति ) तिच्या पोटांतून वेदध्वनी निघत आहे असें पाहून, वंशतंतु छिन्न झाला नाहीं, तेणेंकरून हर्षित होऊन आश्रमास परत आला. तोच पुढें, अदृश्यंति प्रसूत होऊन जन्मास आलेला पुत्र पराशर अशा नांवानें प्रसिद्ध आहे.

चालू मन्वंतरांतील आठव्या पर्ययांत, हाच व्यास झाला असावा, व प्रतिवर्षीं आषाढमासीं सूर्यासमागमें संचार करणाराहि हाच असेल (व्यास श०पहा). व ( १३ शुचि श० पहा ).

याशिवाय प्रस्तुतच्या सप्तर्षींत तर निश्चयेंकरून हाच आहे.

४–विष्णुस्थल क्षेत्रांत राहणाऱ्या कौशिक ऋषींचा जो एक शिष्य तो.

५–हिमालयाच्या एका शिखरास वसिष्ठ पर्वत म्हणून जें नांव चालत आहे तो.

**वसिष्ठापवाह**–भारतवर्षीय तीर्थ.

**वसु**–प्राचेतस दक्षाची कन्या, व धर्मऋषीच्या दहा स्त्रियांतील एक. ही अष्टवसूंची माता.

२–अष्टवसु, चालू मन्वंतरांतील पांचवे देव.

३–दहा विश्वेदेवांतील तिसरा.

४–[illegible] राजाचा पुत्र हिरण्यरेता, त्याच्या सात

पुत्रांतील पहिला. याच्या वर्षास हेंच नांव आहे.

५–कुशद्वीपांतील पहिला वर्ष तो.

६–उत्तानपादवंशीय ध्रुवपुत्र वत्सरास, स्वर्वीथी भार्येपासून झालेल्या साहा पुत्रांतील पांचवा.

७–चतुर्थार्थिक पैल ऋषीचा पिता.

८–वसिष्ठकुलोत्पन्न भद्रऋषीचा पुत्र. यास उपमन्यु ना॰ पुत्र होता.

९–( सू॰ वं॰ ) नृगकुलोत्पन्न भूतज्योति राजाचा पुत्र, याचा पुत्र प्रतीक राजा.

१०–( सू॰ वं॰ ) नृगकुलोत्पन्न दुसऱ्या नृग राजाचा पुत्र.

११–( सो॰ वं॰ ) विजयकुलोत्पन्न कुशिक राजाच्या चार पुत्रांतील तिसरा.

१२–वसुमनासच म्हणत असत.

१३–( सो॰ वं॰ ) पूरुकुलोत्पन्न कृति राजाचा पुत्र. यासच पुढें उपरिचर असें नांव पडलें. यानें गिरिव्रजनगर स्थापिलें.

१४–वसुदेवास श्रीदेवेपासून झालेला पुत्र.

१५–कृष्णास सत्येपासून झालेला पुत्र.

१६–कृष्णानें मारिलेला मुरदैत्याच्या सात पुत्रांतील एक.

१७–चतुर्थार्थिक वसुमान् तोच.

१८–पुढें होणाऱ्या आठव्या सावर्णि मनूच्या दहा पुत्रांतलि एक.

**वसुचंद्र**–भारती युद्धांतील पांडवपक्षिय राजा (भार॰द्रोण अ॰ १५८ ).

**वसुद**–बारा भार्गव देवांतील एक.

२–( सू॰ वं॰ ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न पुरुकुत्सराजास, नर्मदा स्त्रीपासून झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यास संभूति नांवाचा पुत्र होता.

**वसुदा**–माली राक्षसाची स्त्री.

**वसुदान**–प्रियव्रत राजाचा पुत्र हिरण्यरेता, त्याच्या सात पुत्रांतील दुसरा. याच्या वर्षास याचेंच नांव आहे.

२–कुशद्वीपांतील दुसरा वर्ष.

३–भारतीयुद्धांतील पांडवपक्षीय राजा. यास द्रोणाचार्यानें मारिलें ( भार॰ द्रो॰ अ॰ १९० ).

४–भारती यु॰ दुसरा पांडवपक्षीय राजा. यासहि द्रोणाचार्यानेंच मारिलें ( भार॰ द्रोण॰ अ॰ २१ ).

५–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**वसुदेव**–( सो॰ वं॰ ) यदुकुलोत्पन्न सात्वतान्वयांत जन्मलेल्या शूरराजाच्या दाहा पुत्रांतील ज्येष्ठ. यास आनकदुंदुभि असें नांव असून, स्त्रिया वीस होत्या, त्या, संततिसहित येणेंप्रमाणें.—पहिली स्त्री **धृतदेवा**, तिला एकच विपृष्ठ नांवाचा पुत्र होता. २**शांतिदेवा**, तिलाश्रम, प्रतिश्रुत, इ॰ अनेक पुत्र होते. ३**उपदेवा**, तिला कल्प, वर्ष इ॰ दाहा पुत्र होते. ४ **श्रीदेवा**, तिला वसु, हंस, सुवंश, इ॰ साहा पुत्र होते. ५ **देवरक्षिता**, तिला गद इ॰ नऊ पुत्र होते. ६ **सहदेवा**, तिला पूरु, विश्रुत, इ॰ आठ पुत्र होते. ७ **देवकी**, तिला कीर्तिमान, सुषेण, भद्रसेन, ऋजु, संमर्दन, भद्र, संकर्षण, कृष्ण आणि सुभद्रा ना॰ कन्या, अशीं अपत्यें होतीं. ८ **पौरवी**, तिला सुभद्र, भद्र, भद्रबाह, दुमद, भूत, इ॰ बारा पुत्र होते. ९ **रोहिणी**, तिला बल अ॰ बलराम ( देवकीच्या गर्भातील, हा संकर्षण समजावा ), गद, सारण, दुर्मद, विपुल, ध्रुव आणि कृत, इ॰ पुत्र होते. १० **भद्रा**, तिला मुळींच संतति नाहीं. ११ **मदिरा**, तिला नंद, उपनंद, कृतक, आणि शूर, असे चार पुत्र होते. १२ **रोचना**, तिला हस्त, हेमांगद, इ॰ पुत्र होते. १३ **इला**, तिला उरुवल्क, यदु, इ॰ पुत्र होते. १४ **कौशल्या**, तिला केशि म्हणून एकच पुत्र होता. १५ **ताम्रा**, तिलाहि एकच सहदेव पु . १६ **वृकदेवी**, तिला अवगाहन आणि नंदक, असे पुत्र दोन होते. १७ **सुतनु**, तिला पुंड्र आणि कपिल. १८ **रथराजी**, तिला सौभद्र, भव आणि जरा ( हाच जरा दुष्कर्मानें व्याध झाला होता ). १९ **श्रद्धादेवी**, ती अनपत्य होती; आणि २० वैश्यजातीय स्त्री होती; नांव आढळत नाहीं. तिला कौशिक नांवाचा एक पुत्र होता. वसुदेवाच्या जन्मकाळीं देवांनीं दुंदुभि वाजविल्यामुळे, यास आनकदुंदुभि असें म्हणत असत. यानें स्यमंतपंचकक्षेत्रीं, एक यज्ञ केला होता ( भाग॰ १० स्कं॰ अ॰ ८४ ). याशिवाय याचें वृत्त कृष्णशब्दावर आलें आहे ( ४ कृष्ण श॰ पहा ).

**वसुभृत**–स्वायंभुवमन्वंतरांतलि वसिष्ठऋषीच्या सात पुत्रांतील पांचवा.

**वसुमती**–उपरिचरवसूनें स्थापिलेली नगरी. तिलाच पुढें गिरिव्रज नांव पडलें.

**वसुमना**–इक्ष्वाकुकुलोत्पन्न हर्यश्व राजा, त्यापासून ययातिराजाची कन्या माधवी, तिचेठायीं झालेला पुत्र (३गालव श॰पहा). यानें उत्तरकोसल देशांत, बृहस्पतिकथित राजनीतीप्रमाणें, उत्तमप्रकारें करून राज्य केलें होतें ( भार॰ शांति॰ अ॰ ६८ ). यास वामदेव-

ऋषींनींहि राजनीति सांगितली होती ( भार० शांति० अ० ९२–९४ ).

**वसुमान्**–वैवस्वतमनूच्या पुत्रांतील एक. हें नांव पुराणांतरीं आढळतें.

२–विदेहवंशीय एक जनक. वंशावळींत नांव नाहीं ( भार० शांति० अ० ३०९ श्लोक १–४ ).

३–( सो० वं० ) पुरूरवा राजाचा पौत्र, व श्रुतायु राजाचा पुत्र.

४–जमदग्नीपासून रेणुकेच्या ठायीं झालेल्या पांच पुत्रांतील एक.

५–कृष्णापासून जांबवतीस झालेल्या पुत्रांतील एक.

**वसुमित्र**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**वसुषेण**–अधिरथानें पाळिलेला जो पुत्र कर्ण, त्याचें मूळ नांव ( भार० वन० अ० ३०९ ).

२–दुर्योधनपक्षीय दुसरा एक राजा ( भार० कर्ण० अ० ३० ).

**वसुहोम**–अंगदेशाचा प्राचीन राजा. हा मुंजपृष्ठ पर्वतावर तप करीत असतां, मांधाता राजाचा व याचा संवाद होऊन, त्यानें यापासून दंडनीति संपादन केली होती ( भार० शांति० अ० १२२ ).

**वसोर्धारा**–अष्टवसूंतील एका वसूची स्त्री.

**वस्त्रा**–भारतवर्षीय नदी.

**वस्वनंत**– ( वि० वं० ) उपगुप्त जनकाचा पुत्र. याचा पुत्र युयुधा ना० जनक.

**वस्वोकसारा**–पूर्वदिग्पालाची माहेंद्री नगरी ती(मत्स्य० अ० १२३ श्लो० १९ ).

**वस्वौकसारा**–स्वर्धुनीच्या सप्त प्रवाहांतील पहिला.

२–विभावरी म्हणून जी उत्तरदिग्पालाची नगरी ती ( वा० रा० अयो० स० ९४ ).

३–भारतवर्षीय नदी.

**वहीनर**–अनीहराजा तोच.

२– ( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय दुर्दमन राजाचा पुत्र. याचा पुत्र दंडपाणि.

**वक्षोग्रीव**–विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक.

**वाकय**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**वागायनि**–एक ब्रह्मर्षि( ३ भृगु श० पहा ).

**वागींद्र**–प्रकाश ऋषीचा पुत्र. याचा पुत्र प्रमति ( वीतहव्य श० पहा ).

**वागीश्वरी**–वाणीची देवता सरस्वती ती.

**वाग्ग्रंथि**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**वाग्दुष्ट**–कौशिक ऋषीच्या सात पुत्रांतील एक (पितृवर्ति श० पहा ).

**वाग्धान**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**वाचक्नवी**–वचक्नु ऋषीची कन्या गार्गी ती.

**वाजश्रवस**–ब्रह्मर्षि.

**वाजसनि**–एक ऋषि.

**वाजिरत्न**–ऋषि.

**वाजिश्रवा**–एक ऋषि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**वाजी**–एक ब्रह्मर्षि.

**वाटधान**–पंचकर्पट देशाच्या पश्चिमेकडील देश ( भार० सभा० अ० ३२ ).

**वाटनदी**–भारतवर्षीय नदी.

**वाडोहलि**–ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**वाणी**–भारतवर्षीय नदी.

**वात**–एक राक्षस ( तपा श० पहा ).

**वातघ्न**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**वातवेग**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**वातस्कंध**–एक ब्रह्मर्षि.

**वातापि**–दनुपुत्र दानवांतील एक.

२–सैंहिकेयांतील चौथा, अगस्त्य ऋषीनें मारिला ( २ इल्वल श० पहा ).

३–ऱ्हाद दैत्यास धमनीपासून झालेला पुत्र.

**वात्यायन**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**वात्सतरायण**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा).

**वात्स्य**–एक ब्रह्मर्षि. हा,वत्स्य ऋषीचा पुत्र. जनमेजयसर्पसत्रांत सदस्य होता ( ३ भृगु श० पहा ).

**वात्स्यायन**–एक ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**वादुलि**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**वाद्भुतक**–अत्रिकुलोत्पन्न एक ऋषि, व त्याचें कुल ( २ अत्रि श० पहा ).

**वानीरमालिनी**–गयसीर पर्वतासमीपची नदी.

**वाम**–महादेव.

२–कृष्णापासून भद्रेस झालेला पुत्र.

**वामदेव**–महादेव.

२–प्रियव्रतपुत्र हिरण्यरेता, त्याच्या सात पुत्रांतील सातवा. याच्या वर्षाचें नांव हेंच.

३–कुशद्वीपांतलि सातवा वर्ष.

४–गौतमांगिरसांतील ऋषि व तें कुल ( ३ अंगिरा श० पहा ).

५–शाल्मलिद्वीपांतील पर्वत.

६–एक ऋषि. हा महान् तत्त्ववेत्ता होता. याचा इतिहास उपनिषदामध्यें असा आढळतो. पूर्वी कित्येक प्रजांनीं, सनकादिकांस असा प्रश्न केला कीं, वास्तविक सुखप्राप्तीचें साधन कोणतें, तें आम्हास सांगा.

तेव्हां आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान होणें हें साधन, असें त्यांनीं उत्तर देऊन गमन केलें. त्यावरून त्या प्रजा, त्याच साधनास लागाव्या असें असून तसें न होतां, दैवयोगानें मोहित होऊन, सकामकर्मोपासनेस अनुसरल्या. तें पाहून त्यांतीलच हा एक, यानें तसें न करितां, सनकादिकांच्या अनुग्रहाप्रमाणें ज्ञानसाधनच आचरलें,व अपरोक्ष साक्षात्कारास पावणार तों, आयुष्य सरल्यामुळें पुनः गर्भांत प्रवेश यास प्राप्त झाला, व तेथेंच पूर्ण अपरोक्ष साक्षात्कार होऊन, यानें तेथूनच प्रजांस उपदेश करणें आरंभिला. तो असा,–अहो प्रजाहो, मी पूर्वीचा तुमच्यांतीलच एक असून, सनकादिकांनीं सांगितल्याप्रमाणें ज्ञानसाधनाचें आचरण केलें, व अपरोक्ष साक्षात्कारास पावून सुखी झालों; तर तुम्ही मजप्रमाणेंच करून सुखी व्हा, उपेक्षा करूं नका. इतकें बोलून हा गर्भाबाहेर आला, व स्वकीयानंदानें तृप्त असा, पृथिवीवर संचार करूं लागला. तिकडे प्रजाहि यानें सांगितल्याप्रमाणें साधनास लागून कृतार्थ झाल्या.

७–दाशरथि रामाच्या आठ धर्मशास्त्र्यांतील एक.

८–एक ब्रह्मर्षि. याचे अश्व प्रथमार्थक परीक्षितपुत्र शल, त्यानें मागून नेले होते. त्याविषयीं ( १ शल श० पहा ).

९–मोदापुर नगराचा राजा (भार० सभा० अ० २७). हा सुदामा राजाचा ज्येष्ठ भ्राता असेल.

**वामदेवकल्प**–चालू ब्राह्ममासांतील होऊन गेलेला तिसरा दिवस ( ४ कल्प श० पहा ).

**वामन**–चालू मन्वंतरांत सातव्या पर्ययांतील त्रेतायुगांत, कश्यपापासून अदितीच्या ठायीं झालेला विष्णूचा अवतार ( मत्स्य० अ० ४७ ). (देवी भा० ४ स्कं० अ० १६ ). प्रस्तुत स्वर्गामध्यें जो पुरंदर इंद्र आहे, त्याचें साह्य करण्यासाठीं हा झाला होता. यानें त्याचें साह्य केलें तें असें–प्रन्हाद दैत्याचा पौत्र, व विरोचनाचा पुत्र, जो बलि ना० दैत्य, तो आपणास इंद्रपद प्राप्त व्हावें म्हणून, शतयज्ञीय दीक्षा घेऊन बसून, त्यानें नव्याण्णव यज्ञ निर्विघ्न समाप्त केले, व शंभराव्यास आरंभ करून, तोहि समाप्त करीत आणिला असतां, विष्णु, वामनरूपानें त्याकडे गेला, आणि म्हणूं लागला कीं, मला तीन पावलें भूमि दे. तें ऐकून बलीनें यास म्हटलें, हे वटो, तूं तीन पावलें भूमि मागितलीस, ती अगदीं अल्प आहे, यास्तव आणखी कांहीं माग. वामन म्हणाला, तीन पावलांहून अधिक मला कांहीं नको. या दानाविषयीं त्याचा शुक्राचार्यानें असा निषेध केला कीं, हा दान मागणारा विष्णु आहे, यास्तव यास दान देऊं नको; परंतु यज्ञांत दान मागणाराची इच्छा तृप्त न करणें अयोग्य जाणून, बलीनें तें न ऐकतां, याच्या हातावर तुला तीन पावलें भूमि दिली असें म्हणून उदक सोडिलें. तें सोडतांच वामन मोठा झाला, व एका पावलांत पृथ्वी, आणि दुसऱ्या पावलांत आकाश आटोपून, तिसरें पाऊल त्याच्या शरीरावर ठेवून त्यास पाताळांत घातलें ( २ बलि श० पहा ).

२–अष्टदिग्गजांतील दक्षिण दिग्गज.

३–कद्रुपुत्र नागांतील एक.

४–दाशरथि रामाच्या यज्ञांतील एक ऋत्विज.

**वामना**–एक अप्सरा.

**वामरथ्य**–द्वितीयार्थक अत्रीच्या कन्यावंशांतील एक ऋषि.

**वायु**–पंचमहाभूतांतील दुसऱ्या महद्भूताची देवता. ब्रह्मदेवांनीं यास कल्पारंभीं पश्चिम आणि उत्तर या दिशांमधील आधिपत्य दिलें होतें, म्हणून तीस वायव्य नांव पडलेलें अजून चालत आहे.

२–एक ब्रह्मर्षि ( भार० शांति० अ० ४७ ).

**वायुचक्र**–मंकणक ऋषीच्या सात पुत्रांतील एक.

**वायुज्वाल**– ,, ,,

**वायुबल**– ,, ,,

**वायुभक्ष**–युधिष्ठिराच्या अश्वमेधांतील सदस्य ( जैमिनि अश्व० अ० ६३ ).

**वायुमंडल**–मंकणक ऋषीच्या सात पुत्रांतील एक.

**वायुरेता**– ,, ,,

**वायुवेग**– ,, ,,

२–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**वायुहा**–मंकणक ऋषीच्या सात पुत्रांतील एक.

**वारणावत–वती**—एक नगरी. येथें पांडवास धृतराष्ट्रानें ठेविलें होतें. दुर्योधनानें करविलेलें लाक्षागृह याच नगरींत असून, येथूनच पांडव दग्ध न होतां सुरक्षित निघून गेले. हें नगर हस्तिनापुराच्या कोणत्या दिशेस असून किती दूर होतें, त्याविषयीं भारतांत कांहीं लिहिलें नाहीं.

**वारवती**–भारतवर्षीय नदी.

**वारवास्य**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**वाराणसी**–वरुणा आणि असी, या नद्यांसमीपचें क्षेत्र म्हणून, हें नांव काशीपुरीस आहे.

**वाराह**–प्रथमार्थक वराह शब्द पहा.

२–या नांवाचा एक असुर ( मत्स्य० अ० १७२ ).

**वाराहकल्प**–चालू ब्राह्ममासांतील प्रस्तुत चालला आहे कल्प तो ( ४ कल्प श० पहा ).

**वाराही**–सप्तमातृगणांतील पांचवी देवता.

२–तृतीयार्थक अंगिराकुलोत्पन्न दोघे ऋषि.

**वारिधार**–भारतवर्षीय सामान्य पर्वत.

**वारिमूल**–गेल्या चाक्षुष मन्वंतरांतल्या पंचविध देवांतील पांचवे देव ते.

**वारिसेन**–एक राजर्षि.

**वारुणतीर्थ**–काम्यक वनाच्या दक्षिण दिशेकडील तीर्थ.

**वारुणि**–चालू मन्वंतरांतील भृगुऋषि त्यास विशेषेंकरून म्हटलें आहे.

**वारुणिअंगिरा**–तृतीयार्थक अंगिरा तोच.

**वारुणिऋषि**–वरुणयज्ञांत उत्पन्न झालेला ऋषि. यास ब्रह्मदेवांनीं आपल्याकरितां पुत्रत्वेंकरून ग्रहण केलें होतें.

**वारुणिभृगु**–तृतीयार्थक भृगु तोच.

**वारुणी**–अगस्त्य ऋषीस संज्ञा आढळत्ये.

२–कश्यपापासून विनतेस झालेल्या कित्येक अन्यपुत्रांतील एक.

३–समुद्रमंथनकालीं त्यांतून निघालेली सुरा देवी ती.

**वार्त**–एक राजर्षि.

**वार्द्धक्षत्रि**–वृद्धक्षत्राचा पुत्र जयद्रथ, त्यास नांव ( भार० वन० अ० २६४ ).

**वार्द्धक्षेमि**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० उद्योग० अ० १७१ ).

**वार्ष्णायन**–धूम्रपराशरकुलोत्पन्न एक ऋषि.

**वार्ष्णि**–वर्कु ऋषीस नांव.

**वार्ष्णेय**–पंचमार्थक नलराजाचा सारथि.

२–वृष्णिकुलोत्पन्न सर्व यादवांस संज्ञा, कृष्णास म्हणण्याची विशेष रूढि.

**वार्क्षी**–वृक्षांची कन्या म्हणून मारीषेस नांव. ही दहा प्रचेत्यांची स्त्री.

**वालखिल्य**–स्वायंभुव मन्वंतरांतील क्रतु ऋषीपासून क्रियाभार्येच्या ठायीं झालेले ६०००० साठ सहस्र पुत्र ते.

२–तृतीयार्थक वसिष्ठकुलोत्पन्न एक ऋषि.

**वालवय**–ऋषि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**वालिशय**– ,, ,,

**वाली**–वरुण लोकांतील एक असुर.

२–किष्किंधेचा राजा ऋक्षरजा, त्याच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. ऋक्षरजा मरण पावल्यावर हा किष्किंधेचा राजा झाला होता, व याचा कनिष्ठ भ्राता सुग्रीव तो युवराजा असे. वाली हा, सुग्रीवानुमतें राज्य करीत असतां, एकदां रावण किष्किंधेस आला, व सुग्रीव इ० मुख्यमुख्यांस पुसूं लागला कीं, वाली कोठें आहे ? कां म्हणाल तर मला त्याशीं युद्ध कर्तव्य आहे. सुग्रीवानें उत्तर केलें, तुला युद्धास वालीच कशास पाहिजे ? मशींच तूं कां युद्ध करीनास ? इतकें बोलून वालीनें मारिलेल्या राक्षसादिकांचे त्यानें त्यास अस्थिसंचय दाखविले. त्यावरून रावण म्हणाला,असें आहे त्याअर्थी, मला त्यांशींच युद्ध केलें पाहिजे. असें ऐकून सुग्रीव म्हणाला, बरें तर, तो नुकताच दक्षिणसमुद्रीं स्नानास गेला आहे तिकडे जा. म्हणून रावण, वालीस पाहत पाहत दक्षिणसमुद्रीं गेला, तों तो त्यास दृष्टीस पडून, त्यास आपण न कळत धरावें, म्हणून जवळ जात आहे तों, वालीनेंच त्यास धरून कक्षेंत घातलें, व इतर समुद्रीं स्नान करून तो किष्किंधेस आल्यावर, न जाणल्याप्रमाणें बळेंच त्यांस पुसूं लागला कीं, तूं कोण ? व येथें कां आला होतास ? रावण लज्जित होऊन, त्यानें आपलें नांव सांगून म्हटलें, तूं मोठा बलाढ्य आहेस असें ऐकून तुशीं सख्य करावें अशा हेतूनें तुजकडे आलों होतों. वाली म्हणाला, बरें तर, तुझें माझें सख्य आहे. इतकें बोलून एक मासपर्यंत रावणास ठेवून घेऊन, नंतर त्यास जाण्यास वालीनें निरोप दिला ( वा० रा० उत्तर० स० ३४ ). वालीचें गोलभ गंधर्वाशीं सतत पंधरा वर्षे युद्ध ( गोलभ श० पहा ).

याचप्रमाणें याकडे एकदां दुंदुभि दैत्य युद्धास येऊन, तो वालीच्या हातून मरणच पावला, आणि तेव्हांपासून वालीस ऋष्यमूक पर्वत अगम्य झाला ( १ दुंदुभि श० पहा ). दुंदुभि मरण पावल्यावर त्याचा भ्राता मायावि, तो वालीशीं युद्धास आला. त्याशीं याचें बरेच दिवस युद्ध झालें. त्यांत तो पराभव पावून पळाला असतां, एका मोठ्या गुहेंत शिरला, म्हणून वाली त्यामागें लागला, व गुहेंत जातांना द्वारावर सुग्रीवास ठेवून आंत गेला. या गोष्टीस कित्येक मास लोटले तरी हा बाहेर येईना, त्यावरून सुग्रीव चिंताग्रस्त आहे तों, वालीनें मायावीस मारिल्यामुळें आंतून मोठा रक्ताचा प्रवाह आल्यामुळें, व वालीहि मायावी मेला असून सत्वर बाहेर न आल्यामुळें, सुग्रीवास वालीच्या मरणाची शंका येऊन, तो तेथून किष्किंधेस जाण्यास निघाला. निघतांना गुहा-

द्वारावर एक अत्यंत मोठी शिला त्यानें ठेविली, व किष्किंधेस येऊन झालेलें वर्तमान सर्वांस कळविलें. तें ऐकून सर्वहि दुःखी झाले, तथापि त्यांनीं, सुग्रीव नको म्हणत असतां, त्यांस राज्यावर बसविलें. या गोष्टीस बरेच दिवस लोटून, सुग्रीव सुखानें राज्य करीत आहे तों, वाली गुहाद्वारासमीप येऊन, त्यानें तेथें असलेली शिला फोडिली, व बाहेर येऊन पाहूं लागला तों तेथें सुग्रीव नाहीं. त्यावरून त्यास कांहींसें आश्चर्य वाटून किष्किंधेस आला, आणि तेथें सुग्रीवास राज्य करतांना पाहून, त्यास अनिवार कोप आला. त्या रोषांत त्याच्या अंगावर धांवून गेल्यानें, उभयतांचें मोठें युद्ध झालें. त्यांत सुग्रीव पराभव पावून तेथून पळाला तो, ऋष्यमूक पर्वतावर चढला; कारण वाली तेथें आल्यास त्यास मरण आहे, हें सुग्रीवास ठाऊक होतें. सुग्रीव ऋष्यमूकावर चढतांच पाठीस लागलेला वाली माघारा फिरला, व किष्किंधेंत येऊन, त्याची भार्या हरण करून पूर्ववत् राज्य करूं लागला. हेंच याचें व सुग्रीवाचें वैर पडण्यास कारण झालें. सुग्रीव ऋष्यमूकावर जातांच मारुति इ० त्याचे सचिव किष्किंधा सोडून त्याजवळच ऋष्यमूकावर येऊन राहिले.

पुढें सुग्रीवाचें रामाशीं सख्य होऊन, त्यानें वालीस मारिलें (२ सुग्रीव श० पहा). वालीस बाण लागून तो भूमीवर मूर्च्छित पडला असतां, राम त्यासमीप आला. नंतर कांहीं वेळानें तो किंचित् सावध होऊन, पाहूं लागला तों, राम हा आपणासमीप उभा आहे. त्यावरून त्यानें बोलण्यास उपक्रम केला. तो असा— रामा, तूं रघुवंशोत्पन्न क्षत्रिय असून, धर्मवेत्ताहि आहेस. असें असून माझें दुसऱ्याशीं युद्ध होत असतां व मी तुला, किंवा तूं मला, युद्धास हाक मारिली नसतां, वृक्षाआड उभा राहून तूं मला मारिलेंस, हा तूं केवळ अधर्म केलास. मी युद्धास निघालों त्याच वेळेस माझी स्त्री तारा, हिनें तुझें नांव सांगून, मला इकडे येण्याचा निषेध केला; परंतु मी तिला सांगितलें, रामच जर आला असेल, तर त्याशीं माझें सख्य घडेल. तें सर्व एकीकडे राहून, मला अधर्मानें मारिल्यामुळें, तूं केवळ आपल्या वंशास लांच्छन लावून घेतलेंस (वा० रा० किष्किं० स० १६-१७).

वालीचें भाषण ऐकून राम म्हणाला, या संपूर्ण भरतवर्षाचा राजा जो भरत, त्यानें स्थापिलेली धर्ममर्यादा पाळण्याविषयीं, आम्ही त्याचे केवळ अनुचर आहों, म्हणून अधर्म करणारास शिक्षा करणें आमचें कामच असल्यामुळें, भ्रातृभार्या हरण करणारा जो तूं, त्या तुला मारिलें हें युक्तच केलें. अतएव सूर्यवंशांत जन्मून मी त्यांस लांछन लाविलें, असें जें तुझें म्हणणें, तें केवळ कोपाधीन असल्यामुळें निरर्थकच होय. तें ऐकून वाली उगाच राहिला. येथें रामानें, राजे मृगयेस चालले असतां, ते पशूस संमुख विमुख पाहत नाहींत; अतएव तूं शाखामृग म्हणून, तुला हांक मारण्याचें प्रयोजन नसून, वृक्षाआड उभा राहून मारिलें हें युक्तच केलें, असें म्हटल्याविषयीं लेख आढळतो, तो कृतक होय; कारण जर वाली मृगच म्ह० पशुच असें राम समजत होता, तर भगिनी, भ्रातृभार्या, कन्या, यांशीं गमन करणें अधर्म, ही नीति पशूस सांगणें संभवत नाहीं. याचा विचरा सुज्ञांनीं करावा. सारांश, वाली पशु नव्हता, म्हणून त्यास, नीतिविरुद्ध चालल्यामुळें रामानें मारिलें व त्यानेंहि तें पदरीं घेतलें, असें समजावें. सारांश, मग वाली रामास कांहीं एक न बोलतां त्यानें त्यास विनंति केली कीं, मला आतां दुसरें कांहीं दुःख नाहीं, एक अंगदाविषयीं दुःख वाटतें, तर त्यास संभाळ, आणि सुग्रीवास भ्रात्याप्रमाणें वागवून, त्याकडून माझी स्त्री तारा तिचा अपमान होऊं देऊं नको. इतकें बोलून तो स्तब्ध राहिला (वा० रा० किष्किं० स० १८).

वाली पडला असें ऐकतांच तेथें तारा आली, व तिनें अनिवार शोक केला. त्यावरून सुग्रीवासहि पराकाष्ठेचें दुःख झालें (स० १९-२०). पुढें मारुतीनें त्यांचें सांत्वन केलें (स० २१). इतक्यांत वाली किंचित् सावध होऊन सुग्रीवास म्हणाला, तूं आतां अगदीं न करतां राज्यावर बैस, व तारेस आणि अंगदास संभाळ. इतकें त्यानें बोलून आपल्या कंठांतील इंद्रदत्त माला सुग्रीवास दिली, आणि प्राण सोडिला (स० २२). पुढें सर्वांनीं वालीचे गुण व पराक्रम आठवून जो शोक केला, तो ऐकून रामासही गहिंवर आला; तथापि त्यानें सर्वांचें तसेंच सांत्वन केलें (स० २३-२४). नंतर सुग्रीवानें वालीच्या देहाचें और्ध्वदेहिक कर्म करून, रामासमक्ष त्यास उत्तम गति दिली (स० २५).

**वालुकिनी**—भारतवर्षीय नदी.

**वालेय**—एक ब्रह्मर्षि (२ अत्रि श० पहा).

२—श्वेतपराशरकुलोत्पन्न एक ऋषि.

**वाल्मीकि**–एक ब्रह्मर्षि. हा पूर्वजन्मीं प्रचेते म्हणून जे दहा बंधु होते, त्यांतील शेवटचा प्रचेता होय (अध्यात्मरा० उत्तर० स० ७ ). हाच दहावा प्रचेता मरण पावून पुढें एका ब्राह्मणाच्या उदरीं जन्मास आला असतां, याचा पिता व माता अरण्यांत तपार्थ जाऊं लागलीं; त्या कालीं त्यांनीं यास एका अरण्यांत सोडिलें. पुढें यास कांहीं किरातांनीं पाहून, त्यांनीं याचें दयेनें संरक्षण केलें, आणि मोठा झाल्यावर धनुर्विद्येंत निपुण करून दस्युकर्म ( चोराचें कर्म )करायास लाविलें. तें कर्म हा करीत असतां, तेथें यास स्त्रीपुत्रादिक परिवार होऊन, त्यांच्या उदरभरणार्थ हा सतत पांथस्थांस लुटावें म्हणून अरण्यांत हिंडूं लागला, व त्या लुटीनें द्रव्य संपादन करून त्यांचा व आपला निर्वाह चालवूं लागला.

एकदां हा अरण्यांत फिरत असतां, त्या मार्गानें जाणाऱ्या कोणी महर्षींस यानें पाहिलें. म्हणून समीप जाऊन त्यांस म्हणूं लागला कीं, आपणाजवळ काय असेल तें सर्व येथें मला देऊन चालते व्हा. तेव्हां महर्षींस दया येऊन, त्यांनीं यावर अनुग्रह करावा अशा हेतूनें यास म्हटलें, अरे, तूं ज्यासाठीं येवढा व्याप व घोरकर्म करितोस, तीं स्त्रीपुत्रादिक या तुझ्या पातकास विभागी आहेत काय ? यास्तव घरीं जा, आणि त्यांस याविषयीं पूस, तोंपर्यंत आम्ही येथें उभे राहतों. हें त्यांचें भाषण ऐकून, यासहि तें सत्य वाटलें. हें केवळ त्यांच्या दर्शनाचेंच महात्म्य होय. तात्पर्य, हा तेथून घरीं आला, आणि त्यांनीं सांगितल्याप्रमाणेंच परिवारास पुसूं लागला. तेव्हां त्यांनीं विशेष न बोलतां इतकेंच म्हटलें कीं, " पापं तवैव तत्सर्वं वयं तु फलभागिनः " म्हणजे पाप तुझें तुला, आम्ही केवळ तुझ्या द्रव्याचे भोक्ते मात्र आहों. याप्रमाणें त्यांचें भाषण ऐकून, यास इतकें वाईट वाटलें कीं, यानें माघारें येऊन महर्षींस साष्टांग नमस्कार घातला, आणि मी शरण आलों आहें, मला कृतार्थ करावें अशी प्रार्थना केली. मग महर्षींनीं, भक्तांस रमविणारा म्हणून ज्या परमेश्वरास वेदामध्यें राम म्हटलें आहे, त्या रामनामाचाहि जप करण्यास, यास अधिकार नाहीं असें पाहून, मरा अशा उलट्या अक्षरांचा जप करायास सांगून ते तेथेंच अंतर्धान पावले. महर्षि जातांच हा तेथेंच इतका कालपर्यंत जप करीत बसला कीं, याच्या अंगावर वल्मीक ( वारूळ ) वाढलें, व पुढें त्याच महर्षींनीं यास त्यांतून काढिल्यामुळें, याला वाल्मीकि असें नांव पडलं ( वा० रा० बाल० स० १ ).

पुढें याची गणना ऋषींत होऊन हा तमसानदीतीरीं आश्रम करून राहिला. यासमीप अध्ययनादिक करीत असणारे अनेक शिष्य होते; परंतु त्या सर्वांत, भरद्वाज ऋषि मुख्य होता. एकदां हा नित्यक्रमाप्रमाणें नदीवर स्नानास गेला, व स्नान करीत आहे तों, समोर एका वृक्षावर यानें क्रौंच पक्ष्यांचें मिथुन पाहिलें. त्यांतील पुरुष स्वस्त्रीविषयीं कामासक्त झाला आहे अशा संधींत एका व्याधानें त्यास मारिलें. तेणेंकरून राहिलेल्या पक्ष्यास अत्यंत शोक होऊन, इकडे वाल्मीकीचेंहि अंतःकरण दयेनें व्याप्त होत्सातें एकाएकीं मुखांतून असें वाक्य निघालें.

**श्लोक.**

" मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ॥
यत्क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितं ॥ "

ही अनुष्टुप् छंदोबद्ध वाणी मुखांतून अकस्मात् निघाल्यानें, यासहि आश्चर्य वाटून स्नान करून जलाबाहेर आला. इतक्यांत ब्रह्मदेव प्रकट होऊन, यास म्हणाले, तूं आश्चर्य पावूं नको; या वाणीस माझीच इच्छा हेतु आहे; तर तूं आतां याच छंदानें स्त्रीविरहरूप असें काव्य कर, आणि तूं जसें वर्णन करशील, तसेंच तें सर्व पुढें घडून येईल; त्यांत एक अक्षरेंहि अन्यथा होणार नाहीं. इतकें बोलून ते अंतर्धान पावले असतां, त्यांच्या आज्ञेनुरूप, वाल्मीकि, ज्या परमेश्वराच्या नांवानें पावन झाला होता, तत्परच शतकोटि काव्य त्यानें रचिलें. त्यांतीलच सारांश, गायत्रीमंत्रवर्णविलासभूत चोवीस सहस्र काव्य, लवकुशांस जें त्यानें पुढें पढविलें, तें प्रस्तुत सर्वांच्या पाहण्यांत आहेच ( वा० रा० बाल० स० २ ). यास प्रचेता व प्राचेतस अशीं नांवें आढळतात, तीं पूर्वजन्मसंबंधानें होत असें समजावें. चालू मन्वंतरांत प्रथम काव्यकर्ता हाच होता म्हणून, यास आदिकवि असें लोकांत म्हणण्याची रूढि आहे.

**वासव**–इंद्रास नांव. या नांवाचें प्रयोजन आढळत नाहीं; परंतु याचा पिता वसुसंज्ञक कोणी पुरुष असावा असें वाटतें.

**वासवी**–उपरिचर वसुराजाची कन्या, जी व्यासमाता सत्यवती ती.

**वासाश्व**–वैश्यजातीय मंत्रद्रष्टा ऋषि ( मत्स्य० अ० १३४ ).

**वासुकि**–कद्रुपुत्र नागांतील एक.हा संपूर्ण सर्पांचा अधिपति आहे. याच्या स्त्रीचें नांव शतशीर्षा ( भार० उद्योग अ० ११७. श्लोक ७–१७ ). प्रति चैत्रमासाच्या सूर्यासमागमें हाच संचार करण्यास असतो( ९ मधु श० पहा ).जनमेजयाच्या सर्पसत्रांत याचीं पंधरा कुळें दग्ध झालीं होतीं. त्यांचीं नांवें कोटिश, मानस, पूर्ण, शल, पाल, हलीमक, पिच्छल, कौणप, चक्र, कालवेग, प्रकालन, हिरण्यबाहु, शरण, कक्षक आणि कालदंतक. हा सर्वदा भूषणरूपानें शिवाच्या अंगावर आश्रित झालेला आहे.

**वासुदेव**–संपूर्ण पदार्थमात्रांत वास्तव्य करून राहिलेला देव तो.

२–सामवेदोपनिषत्.

२–वसुदेवपुत्र जो कृष्ण त्यास म्हटलेलें आहे.

**वास्तु**–विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**वाहनप**–गौरपराशरकुलोत्पन्न ऋषि.

**वाहिनी**–भारतवर्षीय नदी.

**वाहिनीपति**–ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**वाहीक**–भूप्रदेशवि०.

**श्लोक.**

बहिष्कृता हिमवता गंगया च बहिष्कृता ॥
सरस्वत्या यमुनया कुरुक्षेत्रेण चाप्रिय ॥ ६ ॥
पंचानां सिंधुषष्ठानां नदीनां येंतराश्रिताः ॥
तान्धर्मबाह्यानशुचीन्वाहीकान्परिवर्जयेत् ॥ ७ ॥
शतद्रुश्च विपाशा च तृतीयेरावती तथा ।।
चंद्रभागा वितस्ता च सिंधुषष्ठा बहिर्गिरेः ॥३२॥
अरट्टा नाम ते देशा नष्टधर्मा न तान् व्रजेत् ।।
व्रात्यानां दासमीयानां वाहीकानामयज्वनां ॥ ३३ ॥

( भा०कर्ण० अ० ४४ ). यांत, पंचानां याचा संबंध–बहिष्कृता हिमवता इ० पांचांकडे आणि षष्ठानां याचा–चंद्रभागा वितस्ता च इ० साहांकडे समजावा. सारांश, द्वितीयार्थक हिमालयादिकांनीं बहिष्कृत ( त्यागिलेला ) प्रदेश, व चंद्रभागा इ० साहा नद्यांमधील प्रदेश, गमनास वर्ज्य होय,असा यांतील भाव. येथें प्रथमार्थक हिमालय असा अर्थ घेतां उपयोगी नाहीं; घेतल्यास त्यानें बहिष्कृत प्रदेश सर्वच होऊन अनवस्था होईल.

**वाह्यमय**–नीलपराशरकुलोत्पन्न ऋषि.

**विकट**–रुद्रगणवि०.

२–अंगदानें मारलेला एक राक्षस ( वा० रा० युद्ध० स० १२५ ).

३–धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक.

**विकटा**–या नांवाच्या अशोकवनिकेंतील दोघी राक्षसी ( वा० रा० सुंदर० ).

**विकंपन**–एक रुद्रगण.

**विकर्ण**–धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक. हा महारथि असून, संपूर्ण भ्रात्यांत मोठा न्यायी होता. त्याविषयीं असें आढळतें–ज्या काळीं द्रौपदीस सभेंत आणिलें, त्या काळीं तिनें हा धर्म कीं अधर्म, म्हणून सर्व सभासदांस पुसलें असतां विदुराप्रमाणेंच यानें हा अधर्म म्हणून सांगितलें. त्यामुळें दुर्योधनादिकांस हा, प्रिय नसून पांडवांस प्रिय होता. जेव्हां भीमाला युद्धसमयीं यास,प्रतिज्ञेप्रमाणें मारण्याचा प्रसंग आला, तेव्हां त्यास मोठें वाईट वाटलें; परंतु निरुपाय होऊन त्यानें यास मारिलें ( भार० द्रोण० अ० १३७ ).

**विकर्तन**–सूर्य.

**विकुंठा**–रैवत मन्वंतरांतील विष्ण्ववताराची माता.

**विकुक्षि**–इक्ष्वाकुराजाच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ. यास शशाद म्हणत असत ( शशाद श० पहा ).

**विकूट**–एक सामान्य पर्वत.

**विकृति**–रुद्रगण.

२–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तदन्वयसंभूत ज्यामघकुलोत्पन्न क्रथवंशीय जीमूत राजाचा पुत्र; यास, विमल असें नामांतर असून, पुत्र भीमरथ नांवाचा होता.

**विक्रांत**–वृष्णिकुलोत्पन्न एक यादव.

**विख्यात**–तेरा सैंहिकेयांतील एक.

**विघन**–रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६).

**विचख्नु**–एक राजर्षि ( भार० शांति० अ० २६५ ).

**विचक्षुष**–ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**विचारु**–कृष्णापासून रुक्मिणीस झालेल्या पुत्रांतील एक.

**विचित्र**–देवसावर्णि मनूच्या पुत्रांत होणार आहे पुत्र तो.

२–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**विचित्रवीर्य**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशसंभूत कुरुपुत्र जन्हुराजा, त्याच्या वंशांत जन्मलेल्या शंतनुराजापासून, सत्यवतीच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील दुसरा. याचा ज्येष्ठभ्राता चित्रांगद. चित्रांगद राज्य करीत असतां, एकदां युद्धास जाऊन चित्रांगद ना० गंधर्वाच्या हातून मरण पावल्यामुळें भीष्मानें यास राज्यावर स्थापिलें, व काशी राजाच्या जिंकून आणिलेल्या तीन कन्यांतून एक अंबा म्हणून होती ती परत गेली असतां, आंबिका व अंबा-

लिका, त्या दोघींशींच याचा विवाह केला. परंतु दैवयोगानें यास कांहीं अपत्य न होतां, अल्प वयांतच हा मरण पावला. त्यावरून सत्यवती याची माता व सापत्न भ्राता भीष्म, या दोघांस असा विचार पडला कीं, पुढें कसें करावें. इतक्यांत सत्यवतीस विचार सुचून, तिनें, कौमारदशेंत तिला झालेल्या कृष्णद्वैपायनपुत्राचें स्मरण केलें. तें करतांच तो लागलाच तेथें प्रकट झाला, व काय आज्ञा म्हणून मातेस पुसूं लागला. तेव्हां तिनें सर्व वर्तमान सांगून, त्याकडून याच्या दोनहि क्षेत्रांत धृतराष्ट्र आणि पंडु असे दोन पुत्र निर्माण करविले ( अंबिका व अंबालिका श० पहा ). याच विचित्रवीर्याच्या स्त्रियांची असलेली एक दासी, तिला व्यासापासून विदुर नांवाचा पुत्र झाला होता.

**विजय**–विष्णूच्या दोन द्वारपालांतील एक.

२–भारतवर्षीय तीर्थ.

३–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरिश्चंद्रवंशीय सुदेव राजाचा ज्येष्ठ पुत्र. सुतेजाचा ज्येष्ठ भ्राता. यास भरुक अ० रुचक नांवाचा पुत्र होता.

४–( वि० वं० ) जय ना० जनकाचा पुत्र. याचा पुत्र ऋत ना० जनक.

५–( सो० वं०, पूरुरवा राजाच्या साहा पुत्रांतील पांचवा. यास भीम ना० पुत्र होता.

६–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न पृथुलाक्षपुत्र बृहद्रथ, त्याचा प्रपौत्र व जयद्रथ राजाचा पुत्र. याचा पुत्र धृति.

७–दशरथ राजाच्या अष्ट प्रधानांतील एक प्रधान.

८–दाशरथि रामाच्या सभेंतील एक हास्यकार.

९–याज्ञवल्क्य ऋषीच्या तीन पुत्रांतील त्रिशिरा राक्षस झालेला पुत्र ( १ चंद्रकांत श० पहा ).

१०–पंडुपुत्र अर्जुनाच्या दहा नांवांतील एक नांव.

११–कृष्णापासून जांबवतीस झालेल्या पुत्रांतील एक.

१२–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**विजया**–विष्णूची व शिवाची शक्तिवि०.

२–केकय राजाची कन्या, माद्रीपुत्र सहदेवाची स्त्री. हिचा पुत्र सुहोत्र.

**विजिताश्व**–उत्तानपादवंशीय पृथुराजा, त्यापासून अर्चीस झालेल्या पांच पुत्रांतील पहिला. याचें मूळचें नांव काय तें आढळत नाहीं. हें नांव मात्र पडण्यास कारण झालें तें असें—पृथु राजा याचा पिता,. त्यानें नव्याण्णव यज्ञ समाप्त करून शंभराव्या अश्वमेधास आरंभ केला असतां, इंद्रानें गुप्तरूपेंकरून त्या अश्वाचें हरण केलें. तो अश्व इंद्रापासून यानें सोडवून आणिल्यामुळें यास हें नांव पडलें होतें. यास अंतर्हित (गुप्त) होण्याचीहि शक्ति होती.तीवरून अंतर्धान असेंहि दुसरें नांव पडलें होतें. याला शिखंडिनी आणि नभस्वती अशा दोन स्त्रिया असून, पहिलीस पावक, पवमान, आणि शुचि, असे तीन पुत्र, हे वसिष्ठशापानें जन्मास आलेले पूर्वींचे तीन अग्नि, आणि दुसरी नभस्वती, तिला एकच हविर्धान नांवाचा पुत्र होता ( भाग० ४ स्कं० अ० १९

**विटभूत**–वरुणलोकांतील एक असुर.

**वितत्य**–विहव्य ऋषीचा पुत्र. याचा पुत्र सत्यऋषि ( वीतहव्य श० पहा ).

**वितथ**–मरुद्गणांनीं सोमवंशीय भरतराजास दिलेला जो भरद्वाज ना० पुत्र, त्यासच हें नामांतर होतें.

**वितर्दन**–एक राक्षस ( वा० रा० युद्ध० स० ६४)

**वितल**–सप्तबिलस्वर्गांतील दुसरा. येथें हाटकेश्वर ना० महादेव आहे ( भाग० ५ स्कं० अ० २४ ).

**वितस्ता**–द्वितीयार्थक हिमालयापासून निघालेल्या सहा नद्यांतील एक. ही पश्चिम समुद्रास मिळत्ये.

**विताना**–सत्रायणऋषीची स्त्री. इंद्रसावर्णि मन्वंतरांतल्या विष्ण्ववताराची माता.

**विद**–एक ब्रह्मर्षि व कुल ( ३ भृगु श० पहा ).

**विंद**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

२–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. केंकयदेशाधिपति दोन भ्रात्यांतील ज्येष्ठ. हा सात्यकीच्या हातून मरण पावला होता ( भार० कर्ण० अ० १३).

३–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा, अवंतीदेशाधिपति दोन भ्रात्यांतील ज्येष्ठ. याचें युद्ध कुंतिभोजराजाशीं प्रथम चालून ( भार० भीष्म० अ० ४५ ) पुढें यास अर्जुनानें मारलें ( भार० द्रोण० अ० ९९ ).

**विदग्ध**–ऋक्शाखाप्रवर्तक शाकल्यऋषि तोच.

**विदंड**–द्रौपदीस्वयंवरांतील एक राजा, दंड राजाचा पिता ( भार० आदि० अ० १८६ ).

**विदर्भ**–प्रियव्रतवंशीय ऋषभ देवाच्या शत पुत्रांत नवखंडाधिपति जे नऊ पुत्र होते त्यांतील एक. याच्या खंडास हेंच नांव होत.

२–भरतवर्षांत जे नऊ खंड आहेत त्यांतील एक.

३–( सो० वं०, यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या वंशांतील ज्यामघ राजापासून, शैब्या अ० चैत्रा स्त्रीच्या ठायी झालेला पुत्र तो. यास भोजा स्त्रीपासून कुश, क्रथ आणि रोमपाद असे तीन पुत्र झाले होते.

४–भीष्मकराजाचा इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेकडील देश. ह

सुराष्ट्र देशाच्या पुढें दक्षिणेस असे. याची राजधानी मुख्य कुंडिनपुर असून भोजकट हेंही याच्या रुक्मी-पुत्राचें स्थापित एक नगर होतें ( भार० सभा० अ० ३१ ).

**विदल**–सूर्यवंशोत्पन्न ध्रुवसंधिराजाचा प्रधान.

**विंदानुविंद**–अवंतीदेशाधिपति जयसेन राजा, त्यास वसुदेवभगिनी राजाधिदेवी, तिच्या ठायीं झालेले दोन पुत्र ते. हे भारती युद्धांत दुर्योधनाकडे होते ( भार० उद्योग० अ० १६६ ).

२–केकय देशाधिपतींचे दोन पुत्र ते. हेही दुर्योधना-कडेसच होते.

**विदारण**–तृतीयार्थक जयद्रथाच्या साहा भ्रात्यांतील एक. ( भार० वन० अ० २६५).

**विदिशा**–पारियात्र पर्वतापासून निघालेली नदी.

**विदुर**–विचित्रवीर्याच्या दोघी स्त्रियांची दासी, तिच्या ठायीं कृष्णद्वैपायन व्यासापासून झालेला पुत्र ( भार० आदि० अ० १०५–१०६ ). दासीचें येणें व्यासाकडे कां व कसें झालें, त्याविषयीं असें आढळतें.–धृतराष्ट्र जन्मांध जन्मला, व पंडुहि रोगीच उत्पन्न झाला, म्हणून सत्यवतीनें आपल्या दोघी सुनांस पुनः व्यासा-कडे जाण्याची आज्ञा केली असतां, त्यांनीं न जातां दासीस पाठविलें, त्यामुळें असा प्रसंग येऊन विदुराची उत्पत्ति झाली. हा विदुर साक्षात् यमच शूद्रयोनींत मांडव्य ऋषीच्या शापानें जन्मास आला होता ( मांडव्य श० पहा ). विदुरास देवक राजाची कन्या पारशवी ती स्त्री असून, तीहि याच्याचप्रमाणें उत्पन्न झालेली होती. याची पांडवांवर लहानपणापासून अतिशय प्रीति असे. कारण त्यांचा पिता पंडु, ते लहान असतांच मरण पावला होता. वारणावतांत धृत-राष्ट्रानें पांडवांस पाठविलें, व दुर्योधनानें तेथें लाक्षागृह निर्मून त्यांस दग्ध करण्याचा विचार केला, तेव्हां यानें तें वृत्त युधिष्ठिरास बर्बर भाषेनें कळवून त्याला सावध केलें. इतकेंच नाहीं, तर त्यास बंधुसहित तेथून सुरक्षि-तपणें बाहेर काढण्यासाठीं विवर कोरविलें, व नदी-पार त्यांनीं व्हावें म्हणून नौकेचीहि व्यवस्था केली ( युधिष्ठिर श० पहा ).

विदुर हा परम नीतिमान् व निस्पृह असे त्यामुळें धृतराष्ट्र ज्येष्ठ असतांहि यास पराकाष्ठेचा मानी. या-विषयीं असें आढळतें. पांडव वनवास पूर्ण होऊन व अज्ञातवास सरून प्रगट झाल्यावर, धृतराष्ट्रानें संजयास अशा अर्थाचा निरोप सांगून युधिष्ठिराकडे पाठविलें होतें कीं, त्यांनीं राज्याचा अर्धभाग मागूं नये, आणि युद्धहि करूं नये. तो त्यानें युधिष्ठिरास जाऊन कळ-विल्यावर, त्यानें संजयाजवळ परत निरोप असा सांगितला.–युधिष्ठिर म्हणाला, संजया, पुत्रलोभें करून धृतराष्ट्रानें असें करणें योग्य नाहीं. अर्द्धराज्यावर आमची सत्ता असतां, तो नाहीं देत म्हणतो, परंतु आम्ही घेतल्यावांचून राहणार नाहीं. सामानें दिल्यास बरेंच आहे, न दिल्यास युद्ध करण्यास सोडणार नाहीं. तर तूं जा, आणि असाच निरोप धृतराष्ट्रास सांग. त्यावरून संजय माघारा हस्तिनापुरास आला, आणि त्या दिवशीं सायंकाळ झाला होता म्हणून धृतराष्ट्रास असें म्हणाला कीं, पांडवांकडून जो निरोप मीं आणिला आहे, तो उदयीक सर्वांसमक्ष सांगेन. इतकें बोलून तो घरीं गेला असतां, धृतराष्ट्रास मोठी भीति वाटली, व उद्यां संजय काय सांगतो कोण जाणें, म्हणून त्यास निद्रा येई-नाशीं होऊन, त्यानें रात्रीं विदुरास बोलाविलें, आणि संजय असं असें बोलून घरीं गेला म्हणून मला निद्रा येत नाहीं असें सांगितलें. त्यावरून विदुरानें धृतरा-ष्ट्रास नीति सांगितली, ती भारतामध्यें उद्योगपर्वांत अध्याय ३३–४१ पर्यंत नऊ अध्याय असून विदुर-नीति असें तिला नांव प्रसिद्ध आहे. याशिवाय यानें दुर्योधनासहि पुष्कळ बोध केलेला आहे (भार० उद्यो० अ० ६४–८७–९३ ).

कृष्ण साम करण्यास येऊन तो माघारा परत युधि-ष्ठिराकडे गेल्यावर, युद्धच उपस्थित झालें, व त्यांत संपूर्ण कौरव मरण पावून पांडवांस राज्य प्राप्त झालें असतां, हा कांहीं कालपर्यंत हस्तिनापुरांत होता. पुढें तीर्थयात्रा करण्यास निघून गेला. यानें अनेक तीर्थें व क्षेत्रें अव-लोकन केलीं. नंतर पुनः हस्तिनापुरास आला व धृत-राष्ट्र, गांधारी, आणि कुंती, यांस समागमें घेऊन हिमा-लयावर गेला. कांहीं काळानें उद्धवाची व याची गांठ पडून, त्यांत यानें कृष्णनिधन श्रवण केलें, व कृष्णानें मैत्रेय ऋषीकडे जाण्यास सांगितलेल्या निरोपाप्रमाणें यानें मैत्रेय ऋषीची गांठ घेऊन, हा कृतार्थ झाला असतां, अरण्यांत पिशाचवृत्तीनें हिंडूं लागला.

एकदां युधिष्ठिर धृतराष्ट्राच्या दर्शनास अरण्यांत आला असतां, त्यानें सर्वांस पाहून वंदनें केलीं, आणि विदुर कोठें आहे म्हणून धृतराष्ट्रास विचारिलें. त्यानें सांगितलें, तो अरण्यांतच अलीकडे फार करून असतो. पूर्वीं इकडे कधीं कधीं येत असे, परंतु आतां कधींच येत नाहीं. त्यावरून युधिष्ठिरास त्याच्या भेटीची उत्कंठा होऊन, त्यास शोधीत अरण्यांत चालला. तों त्यानें त्यास, नग्न असून तो एका वृक्षास टेंकून उभा

आहे असें पाहिलें. मग त्याच्या चर्येवरून अतिशय जवळ न जातां, युधिष्ठिरानें मी अमुक असें सांगून वंदन केलें; परंतु तो युधिष्ठिराशीं एक शब्द सुद्धां बोलला नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्यानें त्याकडे पाहिलें देखील नाहीं. त्यावरून युधिष्ठिर, हा आतां देहभान विसरला असें जाणून, तेथून माघारा परतला, व धृत-राष्ट्र, गांधारी आणि कुंति, यांचा निरोप घेऊन हस्तिनापुरास आला. तेथून पुढें थोड्याच काळानें विदुराचें देहावसान झालें.

सारांश, मांडव्य ऋषीच्या शापाप्रमाणें विदुरानें आपलीं शंभर वर्षे पूर्ण होतांच देहाचा त्याग केला, व पुनः पूर्ववत् आपल्या अधिकारावर गेला.

**विदुला**–सौवीर देशाच्या राजाची स्त्री. हिचा पति मरण पावल्यामुळें, व पुत्र लहान असल्यामुळें, सिंधु-देशाच्या राजानें हिचें राज्य घेतलें. पुढें हिचा पुत्र मोठा झाल्यावर, हिनें त्यास अनेक इतिहासांनीं युक्त असा क्षात्रधर्माचा उपदेश केला. त्या वीरश्रीनें त्यानें सिंधु राजापासून आपलें राज्य परत घेतलें. ह्या विदु-लेच्या पुत्राचें नांव संजय असें होतें ( भार० उद्यो० अ० १३३–१३६ ).

**विदुषा**–पारियात्र पर्वतापासून निघणारी भारतवर्षीय नदी.

**विदूरथ**–सोमवंशीय पूरुकुलोत्पन्न एक राजा. हा फारच प्राचीन काळचा होता; कारण, जामदग्न्यराम निःक्ष-त्रिय पृथिवी करीत हिंडत असतां, याच्या मातेनें यास ऋष्यवान् पर्वतावर राहणाऱ्या ऋषीच्या आश्रमांत सोडिलें होतें. पुढें परशुराम क्षत्रियांचा नाश करणें या कर्मापासून, उपरम पावून शूर्पारक देशांत गेल्यावर, हा पुनः पूरुकुलाची वृद्धि करणारा झाला. याच्या पित्याचें नांव आढळत नसून, यास कोणत्या नांवाचा पुत्र होता हें आढळत नाहीं. वंशावळींत तर याचें नांवच नाहीं ( भार० शांति० अ० ४९ ).

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न कुरुपुत्र जन्हुराजाचा पौत्र, व सुरथाचा पुत्र. याचा पुत्र सार्वभौम ना०राजा.

३–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतपुत्र वृष्णि, तद्वं-शीय दुसरा वृष्णि त्याचा पौत्र, व चित्ररथराजाच्या दोन पुत्रांतील दुसरा. याचा पुत्र शूर ना० राजा.

४–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय निर्वृत्ति राजास नामांतर.

५–दंतवक्र अ० वक्रदंताचा भ्राता. वृद्धशर्म्यापासून श्रुतदेवेस झालेला पुत्र. यास कृष्णानें मारिलें.

६–हंसध्वज राजाचा भ्राता.

**विदेह**–सूर्यवंशीय निमि राजा वसिष्ठ शापानें मरण पाव-ल्यावर, त्यानें पुनः देह स्वीकारिला नाहीं, म्हणून त्याच्या मिथि पुत्रापासून सर्व वंशास पडलेलें नांव.

२–इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडे असणारे भारतवर्षीय दोन देश. यांत पहिला गंडक देशाच्या पूर्वेस असून, दुसरा अपर पूर्व विदेहजनकवंशीय राजांचा प्रसिद्धच आहे.

**विदेहनगर**–अपर पूर्व विदेहाची राजधानी मिथिला नगरी ती.

**विद्य**–विश्वामित्रकुलोत्पन्न एक ऋषि.

**विद्याचंड**–कौशिक ब्राह्मणाचा पुत्र (पितृवर्ति श० पहा).

**विद्याधर**–देवयोनिवि० एक जाति.

**विद्युच्छत्रु**–एक राक्षस ( ४ सह श० पहा ).

**विद्युज्जिव्ह**–एक राक्षस, शूर्पणखेचा भर्ता. यास रावणानें मारिलें होतें.

२–रावणाचा एक प्रधान. रामाचें शिर व धनुष्य, माया-मयाकृतीचें यानेंच निर्माण करून रावणाकडून तें सीतेस दाखविलें होतें; परंतु सीता तें पाहूनहि राव-णास वश झाली नाहीं.

**विद्युता**–एक अप्सरा.

**विद्युत्केश**–हेति राक्षसाची स्त्री भया, तिच्या ठायीं हा झालेला पुत्र. यास संध्या ना० कोण्या स्त्रीची सालं-कटंकटा ना० कन्या ती स्त्री होती. तिला यापासून गर्भ राहिला असतां, तिनें तो मंदराचलावर टाकिला. त्याचें महादेवांनीं रक्षण करून, सुकेश असें त्यास नांव ठेविलें होतें ( वा० रा० उत्तर० स० ४ ).

**विद्युत्पताक**–प्रलयमेघांतील साहावा.

**विद्युत्पर्णा**–प्राधेस झालेल्या अप्सरांतील एक.

**विद्युत्प्रभ**–एक ऋषि ( भार० अनु० अ० १२५ ).

**विद्युत्प्रभा**–एक अप्सरा ( भार० उद्योग० अ० १११ श्लो० २१ ).

**विद्युद्दंष्ट्र**–रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० युद्ध० स० ७३ ).

**विद्युद्रूप**–लंकेंतील एक राक्षस (वा० रा० सुंदर० स०६).

**विद्युन्माली**–तारकासुराचा पुत्र, त्रिपुरांतील एका पुराचा अधिपति ( भार० कर्ण० अ० ३३ ).

२–तारकासुराचा मित्र एक असुर.

३–रामसेनेंतील एक वानर.

४–लंकेंतील एक राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

**विद्योत**–धर्मऋषीची पत्नी लंबा तिचा पुत्र. याचा पुत्र स्तनयित्नु.

**विद्योता**-एक अप्सरा.

**विद्रावण**-दनुपुत्र दानवांतील एक.

**विधाता**-ब्रह्मदेव.

२-स्वायंभुवमन्वंतरांतील ब्रह्मपुत्र भृगु, त्यापासून कर्दमकन्या ख्याति, तिच्या ठायीं झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा. मेरूची कन्या नियती, ती याची स्त्री असून, तिच्या ठायीं यास झालेला प्राण ना० पुत्र होता.

**विधि**-ब्रह्मदेव.

**विधु**-चंद्र.

**विधृति**-तामस मन्वंतरांतील देवांची माता.

२-(सू०वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशवंशीय खगण राजाचा पुत्र. याचा पुत्र हिरण्यनाभ.

**विंध्य अ० विंध्याद्रि**-भारतवर्षीय भरतखंडस्थ पर्वत. या पर्वताची मूर्तिमान् देवता, एकेकाळीं सूर्यचंद्रादिकांस असें म्हणूं लागली कीं, तुम्ही मेरूसभोंवतीं जसी प्रदक्षिणा करितां, अशी मजभोंवतीं करा. त्यांनीं उत्तर केलें. सृष्टि निर्माण करणारानें, आम्हास मेरूसभोंवता जो प्रदक्षिणेचा क्रम लावून दिला आहे, त्याप्रमाणें आम्हांस फिरणें भाग आहे. म्हणून या कामांत आम्ही स्वतंत्र अगदीं नाहीं. असें ऐकून हा वाढूं लागला, व इतका उंच वाढला कीं, यानें सूर्यादिकांच्या गतीचा रोध केला. त्यावरून देव व ऋषि याकडे आले, आणि म्हणाले, तूं असें करूं नयेस; परंतु हा तें कांहींच ऐकेना. म्हणून ते सर्व अगस्त्य ऋषींकडे जाऊन प्रार्थना करून म्हणाले कीं, विंध्याचल आपला शिष्य आहे, आणि त्यानें तर असें लोकोपद्रवकारक कृत्य आरंभलें आहे, तर त्यानें असें न करावें, याविषयीं बोध करणें आपणाकडे आहे. हें देवांचें व ऋषींचें भाषण ऐकून अगस्त्य ऋषि आपला आश्रम सोडून निघून याजकडेस आला. तेव्हां त्यास पाहतांच यानें साष्टांग नमस्कार घातला. असें पाहून, अगस्त्य यास म्हणाला, आम्हीं दक्षिणेकडून परत येऊंपर्यंत तूं असाच ऐस. इतकें बोलून अगस्त्य दक्षिणेकडेस गेले, व हा जा तेव्हांपासून दंडवत् पडला तो अजून पडलाच आहे. सारांश, हा पडल्यानें सूर्यादिकांच्या गतीस झालेला रोध मोकळा होऊन देव, ऋषि व इतर प्रजा त्या सर्वांस सुख झालें. हा पर्वत, द्वितीयार्थक हिमालयाच्या अलीकडे, आपण राहतों या अंगाकडेस आहे ( भार० वन० अ० ९६-९८). ( भार० वन० अ० १०३-१०५ ).

या पर्वतापासून निघालेल्या नद्या येणेंप्रमाणें.- तपती, तापी, पयोष्णी, निर्विंध्या, क्षिप्रा, ऋषभा, वेणा, वैतरणी, विश्वमाला, कुमुद्वती, करतोया, महागौरी, दुर्गमा आणि शीला, अशा आहेत ( मत्स्य० अ० ११३ ).

**विंध्यचुलिक**-भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**विंध्यावली**-बलि दैत्याची स्त्री.

**विंध्याश्व**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्ति राजाचा पुत्र अजमीढ, त्याच्या नील ना० पुत्राच्या वंशांतील मुद्गलकुलोत्पन्न इंद्रसेन राजाचा पुत्र. यास मेनका अप्सरेपासून, दिवोदास व अहल्या, असें मिथुन झालें होतें.

**विनत**-रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० युद्ध० स० २६ ).

२-या नांवाचा एक ग्रामवि०.

**विनता**-कश्यपऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक. हिला अरुण, गरुड, अरुणि, वारुणि, असे चार पुत्र आणि सौदामिनी ना० एक कन्या होती. यांशिवाय सुमुख, सुनामा, सुनेत्र, सुवर्चा, सुरुक आणि सुवल असे साहा पुत्र अधिक आढळतात (भार० उद्योग० अ० १०१). हिचा इतिहास आढळतो तो असा.-प्रथमतः अरुणाच्या वेळेस जेव्हां ही गर्भिणी झाली, तेव्हां लवकर प्रसूत होईना; म्हणून हिनें पूर्णकाळ झाला नाहीं तों अरुणास बलात्कारानें उदराबाहेर काढिलें. त्यामुळें तो पादरहित जन्मला, म्हणून त्यानें हिला शाप दिला होता कीं, तूं सपत्नीच्या ( सवतीच्या ) दास्यांत गुंतशील. त्याचप्रमाणें कद्रूच्या दास्यांत ही गुंतली, त्याचें कारण असें झालें.

एकदां हिचा व कद्रूचा सूर्यरथाच्या अश्वाचा रंग कसा आहे, त्याविषयीं वाद झाला. त्यांत हिचें म्हणणें श्वेतवर्ण आहे, व तें सत्यहि होतें. असें असून कद्रू म्हणाली, कृष्णवर्ण आहे, व तें आपलें भाषण सत्य व्हावें म्हणून तिनें आपल्या वासुकि इ० पुत्रांस आज्ञा केली कीं, तुम्ही सत्वर सूर्यलोकीं जाऊन अश्वाचा वर्ण श्वेत आहे, तो आपआपल्या विषानें काळा करून या. तें म्हणणें ते प्रथम ऐकेनात, म्हणून तिनें त्यांस शाप दिला कीं, तुम्ही पुढें या आज्ञाभंगानें कोणी राजा सर्पसत्र करील त्यांत भस्म व्हाल. तेव्हां ते सर्व भ्याले व उःशाप मागून, त्यांनीं सूर्यलोकीं जाऊन आपल्या विषानें अश्व काळा केला.

अश्व काळा होतांच कद्रू हिला ( विनतेला )

म्हणाली, तूं मजसमागमें सूर्यलोकीं चल. त्यावरून दोघी सूर्यलोकीं गेल्या, त्या काळीं हिनें तो अश्व काळा आहे असें पाहिलें. मग आपलें म्हणणें मिथ्या झालें असें पाहून, दोघींची परस्परांशीं प्रतिज्ञा होती कीं, हरेल तिनें दुसरीचें सहस्र वर्षे दास्य करावें. त्या प्रतिज्ञेप्रमाणें ही तिच्या दास्यांत गुंतली. पुढें हिची सुटका गरुडानें केली( भार० आदि० अ० २०–२२).

२–सीतासंरक्षणास असलेल्या राक्षसींतील एक ( वा० रा० सुंदर० स० २४ ).

**विनशन**–भारतवर्षीय सरस्वतीनदीसंबंधीं तीर्थ.

२–द्वितीयार्थक कुरुक्षेत्रास म्हटलेलें आहे.

**विनायक**–या नांवाचे रुद्रगण व त्यांचा अधिपति गणपति तो.

२–गरुडासहि कोठें कोठें म्हटलें आहे.

३–भारतवर्षीय एक क्षेत्र.

**विनाशन**–कश्यपापासून कालेस झालेल्या पुत्रांतील एक.

**विपाट**–विपाशा नदी.

**विपापा**–भारतवर्षीय नदी.

**विपाप्मा**–बृहस्पतीचा अग्निसंबंधानें पौत्र. निश्चवन ना० अग्नीचा पुत्र. याचें वास्तुकार्यांत प्राधान्य असल्याचें मत्स्यपुराणांत आहे.

**विपाशा**–भारतवर्षीय नदी ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**विपीत**–गर्दभीविपीत श० पहा.

**विपुल**–भारतवर्षीय क्षेत्र.

२–वसुदेवापासून रोहिणीस झालेल्या पुत्रांतील एक.

३–अर्जुनानें मारिलेला सौवीर देशसंबंधीं एक म्लेंच्छ राजा.

**विपृथु**–एक यादववि०.

**विपृष्ठ**–वसुदेवास धृतदेवेपासून झालेला पुत्र.

**विप्र**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय कुरुपुत्र सुधनु, त्याच्या कुलांतील जरासंधवंशांत जन्मलेल्या सृतंजय राजाचा पुत्र. याचा पुत्र शुचि ना० राजा.

**विप्रचित्ति**–दनुपुत्र दानवांतील ज्येष्ठ. हा अति बलवान् असून यास सिंहिका ना० स्त्री होती व तिच्याठायीं याला तेरा पुत्र झाले होते ( २ सैंहिकेय श० पहा ).

**विबुध**–विदेहवंशीय विश्रुत जनकास नामांतर.

**विभांड**–एक ब्रह्मर्षि ( भार० शांति० अ० ४७ ).

**विभांडक**–काश्यपगोत्रीय एक ऋषि. ऋश्यशृंगाचा पिता ( ऋश्यशृंग श० पहा ).

**विभावरी**–उत्तरदिग्पालाची नगरी. हिला वस्वौकसारा असेंहि नांव आहे ( २ वस्वौकसारा श० पहा ). या नगरीच्या मस्तकावर ज्या काळीं सूर्य येतो, त्या काळीं तेथें मध्यान्ह असून. पश्चिमदिग्पालाच्या निम्लोचिनी नगरींत सूर्यास्ताचा समय, पूर्वदिग्पालाच्या देवधानी नगरींत सूर्योदयाचा समय आणि दक्षिण दिग्पालाच्या संयमिनी नगरींत मध्यरात्र असते ( १ सूर्य श० पहा ).

**विभावसु**–सूर्य व अग्नीस नांव.

२–एक ऋषि. हा आपल्या सुप्रतीक ना० भ्रात्याच्या शापानें जलांत कूर्मयोनि पावून पडला होता ( ३ सुभद्र श० पहा ).

३–मुरदैत्याच्या सात पुत्रांतील कृष्णानें मारिलेला एक पुत्र तो ( मुर श० पहा ).

४–पांडवासमागमें अरण्यांत होता एक ऋषि तो.

**विभीषण**–( ३ बिभीषण श० पहा ).

**विभु**–देववि० ( तुषित श० पहा ).

२–ऋषभदेवाचा ज्येष्ठ पुत्र भरत राजा, त्यास दुसऱ्या पंचजनी स्त्रीपासून झालेल्या पुत्राच्या वंशांतील प्रस्ताव ना० राजास नियुत्सेपासून झालेला पुत्र तो. यास रति ना० स्त्री, व पृथुषेण नांवाचा पुत्र होता.

३–रैवत मन्वंतरांत स्वर्गामध्यें होता इंद्र तो.

४–स्वारोचिष मन्वंतरांतील विष्णूचा अवतार.

५–साध्य ना० देवांतील एक जो देव तो.

६–वारुणि भृगूच्या पुत्रांतील पुत्र, ज्यास वरेण्य असें म्हटलें आहे तो.

७–रात्रि युद्धांत भीमानें मारिलेल्या शकुनीच्या भ्रात्यांतील एक तो ( भार० द्रोण० अ० १५७ ).

**विभूति**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**विभ्राज**–बर्हिषद ना० पितरांचा लोक तो.

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पार ना० राजा त्याचें नामांतर.

**विमल**–वैवस्वत मनूचा पौत्र. इल राजाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ.

२–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय विकृति राजा तोच.

३–भारतवर्षीय तीर्थ.

**विमला**–ऋष्यवानपर्वतापासून निघालेली नदी.

२–महेंद्र पर्वतापासून निघालेली नदी.

३–सुरभीकन्या रोहिणी तिच्या दोन कन्यांतील एक.

**विमलेश्वर**–भारतवर्षीय तीर्थ.

**विमलोदका**–सरस्वतीनदीच्या सप्त प्रवाहांतील एक प्रवाह.

**विमुख**–एक ब्रह्मर्षि ( वा० रा० उत्तर० स० १ ).

**विमोचन**–भारतवर्षीय तीर्थ.

**वियति**–( सो० वं० ) नहुषराजाच्या साहा पुत्रांतील पांचवा.

**विरज**–ऋषभदेववंशीय त्वष्टा ना० राजास विरोचनेपासून झालेला पुत्र. यास, विषुची ना० स्त्री असून, शतजित् प्रमुख शतपुत्र. व एक कन्या होती.

२–स्वायंभुवमन्वंतरांतील मरीचि ऋषीचा पुत्र पूर्णिमा, त्याच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ.

३–चाक्षुषमन्वंतरांतल्या सप्तर्षींत, होता एक ऋषि तो.

४–आठव्या सावर्णिमन्वंतरांत होणाऱ्या देवांतलि एक प्रकारचे देव.

५–भारतवर्षीय तीर्थ.

**विरजस्क**–आठव्या सावर्णिमनूच्या होणाऱ्या पुत्रांतील एक.

**विरजा**–वारुणि कवीच्या सात पुत्रांतील साहवा.

२–सुस्वधा ना० पितरांची कन्या, व नहुष राजाची स्त्री. ( नहुष श० पहा ).

**विरजामित्र**–स्वायंभुवमन्वंतरांतल्या वसिष्ठ ऋषीच्या सात पुत्रांतील तिसरा.

**विराट**–विराटपुरुष जो परमेश्वर तो.

२–स्वायंभुवमनूसहि हें नांव आहे ( मत्स्य० अ० ३ श्लोक० ४४ ).

३–पूर्व मत्स्य देशाचा राजा. अज्ञातवास करण्यासाठीं या देशांत पांडव राहिले होते,व त्यांनीं आपलीं नांवें-रूपेंहि बदललीं होतीं. पांडव, पांचचे पांच पुरुष व द्रौपदी साहावी, अशाच रीतीनें जर येथें राहते, तर ते तत्काळ ओळखूं येते; परंतु पुरुष चार, एक नट, आणि एक स्त्री, असे असल्यामुळें, हे पांडवच असतील असा यास तर्क करितां आला नाहीं. या विराट राजास शतानीक, मदिराक्ष, विशालाक्ष, सूर्यदत्त, श्रुतध्वज, आणि श्रुतानीक असे साहा भ्राते असत. केकय राजाची कन्या सुदेष्णा ती याची स्त्री असून, तिचा भ्राता महाबलाढ्य कीचकनामा कैकेय,बंधूंसहित याचा सेनापति होता. याला शंख, श्वेत, आणि उत्तर असे तीन पुत्र असून, उत्तरा नांवाची एकच कन्या होती.

याचा श्याल कीचक,बल्लवाच्या हातून मरण पावला असतां, दुर्योधनास येथें पांडव असावेत असा तर्क झाला.कारण,कीचक सामान्य बलवान् नसून त्याच्याच बळावर विराट राजा अजिंक्य होता.सारांश,या तर्कावरून दुर्योधनानें मत्स्य देशावर दक्षिण अंगानें सुशर्माना० त्रिगर्ताधिपतीस पाठवून, याचीं गोधनें हरण करविलीं. त्यावरून सुशर्म्यावर जाण्यास विराट निघाला असतां त्यानें कंकास ( युधिष्ठिरास ) समागमें घेतलें, व त्याच्याच सूचनेवरून बल्लव ( भीमसेन) ग्रंथिक ( नकुल ) आणि तंतिपाल ( सहदेव ) त्यांसहि निघण्याची आज्ञा केली. याशिवाय विराटाचे सर्व बंधु, व उत्तर शिवाय करुन इतर पुत्र, तेही बरोबर होते ( भार० विराट० अ० ३० ).

नंतर विराट राजा मोठ्या सैन्यासहित सुशर्म्यावर गेला, व तेथें त्याशीं याचें मोठें युद्ध झालें. त्यांत असें घडून आलें कीं, सुशर्म्यानें विराटास धरलें व रथाशीं बांधून हस्तिनापुराकडे जाण्यास निघाला ( भार० विराट० अ० ३१—३२ ). हें कंकानें पाहून, बल्लवादिकांस सूचना केली कीं,आपण समागमें असतां विराटाची अशी अवस्था होऊं देणें योग्य नाहीं; यास्तव सत्वर धांवा व यास सोडवून परत आणा. त्यावरून बल्लवादिक सुशर्म्याच्या मागें धांवले, व त्याशीं अनिवार युद्ध करून, त्यास बांधून रथावर घातलें, आणि विराटास सोडवून कंकासमीप आणिलें. पुढें कंकानें गोधनें परत आणिलीं, व विराट राजाहि मुक्त होऊन परत आला, असें पाहून, सुशर्म्यास त्यानें बल्लवाकडून सोडून देवविलें. विराट राजानें, यांनीं आपणास सोडविल्याचा अतिशय उपकार मानून तो घरीं आला, व त्यांचा त्यानें मोठा सत्कार केला ( भार० विराट० अ० ३३—३४ ).

नंतर विराट स्वस्थ बसला आहे तों, उत्तरेकडून विजयी होऊन उत्तरहि येऊन पोहोंचला. नंतर अल्पच काळानें पांडव प्रकट झाले असतां, यास आश्चर्य होऊन व त्यांच्या उपकारानें लीन होऊन यानें, उत्तरेस अर्जुनानें वरावें म्हणून आग्रह केला; परंतु त्यानें तें अमान्य केल्यामुळें उत्तरा अभिमन्यूस विवाहविधीनें दिली.

भारती युद्धांत हा, बंधुपुत्रादिकांसहवर्तमान पांडवांकडे होता, व जयद्रथवधानंतर रात्रियुद्ध झाले, त्यांत द्रोणाचार्याच्या हातून हा मरण पावला ( भार० द्रोण० अ० १८६ ).

**विराडप**–एक ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**विराध**–चित्रकूट पर्वत सोडून, ऋषींचे अनेक आश्रम पाहात पाहात, रामानें, सीता व लक्ष्मण यांसहवर्तमान दंडकारण्यांत प्रवेश केला असतां, क्रौंचावट ना० वनांत त्यास हा राक्षस प्रथम भेटला. यानें राम, लक्ष्मण व सीता या तिघांस पाहतांच, एकाएकीं सीतेस उचलिलें, आणि तिला घेऊन दूर उभा राहून तेथून रामास पुसूं लागला कीं, तुम्ही कोण, व स्त्री-

सहवर्तमान एकाकी अरण्यांत फिरण्याचें कारण काय? रामानें सांगितलें, अयोध्येचा राजा दशरथ, त्याचा मी ज्येष्ठ पुत्र असून, माझें नांव राम आहे, हा माझा भ्राता, यास लक्ष्मण म्हणतात; व जनक राजाची कन्या सीता अशा नांवानें विख्यात, ती माझी स्त्री आहे. आम्ही पित्याची आज्ञा पालन करून तुम्हासारख्यांस शिक्षा करावी, म्हणून अशा घोर अरण्यांत प्रवेश केला आहे. इतकें बोलून राम त्यास पुसूं लागला कीं, तूं कोण आहेस तें सांग. त्यावरून विराध म्हणाला, जव ना० राक्षसापासून त्याची भार्या शतऱ्हदा तिचे ठायीं मी झालेला पुत्र असून, माझें नांव विराध प्रसिद्ध आहे. माझ्या या अरण्यांत कोणी मनुष्य कधींच प्रवेश करावयाचा नाहीं, असें असतां, तुम्ही येथें निर्भय संचार करीत आहां. तर आतां तुम्हास इतकेंच सांगतों कीं, ही स्त्री, तुम्हास परत मिळणार नाहीं; मात्र तुह्मां उभयतां भात्यांस मीं सोडिलें आहे. तर जीविताची आशा असल्यास येथून सत्वर गमन करा. राम म्हणाला, तूं आजपर्यंत तापसास अतिशय पीडा दिलीस, व ऋषीहि अनेक भक्षिलेस, यास्तव तुला शिक्षाच करणें योग्य आहे. इतकें बोलून रामलक्ष्मणांनीं त्यावर असे दोन तीव्र बाण सोडिले कीं, तो तत्काळ गतप्राण होऊन भूमीवर पडला. पडतांच त्याच्या शरीरांतून एक दिव्य पुरुष निघून, स्तवनपूर्वक रामास म्हणूं लागला कीं, मी तुंबुरु ना० गंधर्व पूर्वींचा असून, वैश्रवणाच्या शापानें ही योनि पावलों होतों. यांतून तूं माझा उद्धार केलास, तर आतां मला स्वर्लोकीं जाण्यास आज्ञा दे. असें बोलून यानें रामास शरभंग ऋषीच्या आश्रमाचा मार्ग दाखवून, आपण स्वर्लोकीं गमन केलें ( वा० रा० अरण्य० स० २-४ ).

**विरावी**-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**विरिंचि**-ब्रह्मदेव.

**विरुद्ध**-ब्रह्मसावर्णि मन्वंतरामध्यें होणारे देववि०.

**विरूप**-रुद्रगणवि०.

२-वरुणलोकांतील असुरवि०.

३-वारुणि अंगिराऋषीच्या आठ पुत्रांतील साहवा.

४-( सू० वं० ):नभगकुलोत्पन्न अंबरीष राजाच्या तीन पुत्रांतील एक. याचा पुत्र बृहदश्व.

५-कृष्णाच्या पौत्रांतील एक.

**विरूपाक्ष**-रुद्र, भारतोक्त अकरा रुद्रांत, हें नांव कोणत्यास त्याचा निर्णय होत नाहीं.

२-शिवाच्या नामावलींतील एक नांव.

३-एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

४-महिषासुराच्या मंत्र्यांतील एक असुर ( देवीभा० ५ स्कं अ० ११ ).

५-अशोकवनिकाविध्वंसकालीं, रावणानें पाठविलेल्या पांच सेनापतींतील एक. हा इतर चौघांसहित मारुतीच्या हातानें मरण पावला होता ( वा० रा० सुंदर० स० ४६ ).

६-युद्धकालीं लक्ष्मणानें मारिलेला एक राक्षस ( वा० रा० युद्ध स० ४३ ).

७-सुमाली राक्षसाचा अमात्य. युद्धांत सुग्रीवानें मारिला ( वा० रा० युद्ध० स० ९७ )

८-भीमपुत्र घटोत्कच राक्षस, त्याचा सारथि ( भार० द्रोण अ० १७५ ).

**विरोचन**-प्रल्हाददैत्याच्या पुत्रांतील एक. व बलिदैत्याचा पिता. हा एकेकाळीं सत्यलोकीं ब्रह्मदेवाकडे ब्रह्मात्मवस्तु तें कोणतें म्हणून पुसण्यास गेला असतां, प्रस्तुतचा स्वर्गांतील इंद्र जो पुरंदर, त्याची यास तेथें भेट झाली. नंतर याच्या मनांतून जें ब्रह्मदेवास विचारणें होतें, तोच प्रश्न इंद्रानें ब्रह्मदेवास केला व यानेंहि केला. तेव्हां ब्रह्मदेवांनीं दोघांस सारखाच उपदेश करून याचा विचार करा म्हणून सांगितलें. त्यावरून दोघेहि तेथून परतले, व इंद्र त्याचा विचार करून कृतार्थ झाला ( पुरंदर श० पहा ). तसा विचार यानें न करितां, आपल्याच मनानें सिद्धांत केला तो असा—

देह हाच आत्मा आहे, व हा देह अस्थिमांसाचा सर्वत्रांचा समानच आहे म्हणून, ब्राह्मणांस श्रेष्ठ म्हणणें संभवत नाहीं. जरी पुरुषार्थ चार असून, ब्राह्मणांनीं मोक्षपुरुषार्थ श्रेष्ठ म्हणून मानिला आहे, तरी माझ्या बुद्धीनें कामपुरुषार्थच श्रेष्ठ आहे. विचार करून पाहिलें तर असें दिसतें कीं, पापाचें फळ दुःख, व पुण्याचें फळ सुख, सर्वसंमत आहे. म्हणून जप, तप, देवतार्चन, प्रातःस्नान इ० करून भावी सुखाची जे इच्छा करितात, ते करोत; परंतु प्रस्तुत ते केवळ पापाचेंच फळया साधनांच्या मिषानें भोगितात असें समजलें पाहिजे. सारांश, भीरु जे ब्राह्मण त्यांच्या मार्गास विचारवानानें न विश्वासतां कधींहि अनुसरूं नये, इ० प्रकारचा निश्चय करून, हें मत यानें आपल्या अनुयायी दैत्यांस शिकविलें, व त्यांनीं तेंच मत कित्येक मनुष्यांस शिकवून त्यांच्याहि बुद्धीस मोह उत्पन्न केला.

त्यामुळें विरोचन हा अधोगतीस गेला. ह्या मतास याचा पुत्र बलि, तो अनुसरला नाहीं.

**विरोचना**–ऋषभदेववंशीय भौवनराजाचा पुत्र त्वष्टा त्याची स्त्री, व विरजराजाची माता (भाग० पंचमस्कं० अ० १५ ).

**विलोमा**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतपुत्र अंधक राजा, त्याचा प्रपौत्र, कुकुर राजाचा पौत्र, व वन्हिराजाचा पुत्र. याचा पुत्र कपोतरोमा.

**विवस्वान**–आदित्यांतील एक ( द्वादशादित्य श०पहा ). यास संज्ञा, राज्ञी, आणि प्रभा अशा तीन स्त्रिया असल्याचें वर्णिलेलें आहे. त्यांत संज्ञा ही, त्वष्टा म्हणून जो चालू मन्वंतरामध्यें विश्वकर्मा ( देवांचा शिल्पी ) आहे, त्याची कन्या म्हणून तिला त्वाष्ट्री असें म्हटलेलें आहे. तिला या विवस्वानापासून श्राद्धदेव (वैवस्वतमनु) यम, आणि यमुना, अशीं तीन अपत्यें झालीं होतीं. पुढें संज्ञेस विवस्वानाचें तेज सहन होईना म्हणून ती विवस्वानासमीप छायारूपानें राहून, वडवारूपानें ( घोडीच्या रूपानें ) दूर राहिली. कांहीं दिवसांनीं यापासून छायेस, सावर्णि,शनि आणि तपती,अशीं तीन अपत्यें झालीं. एकदां असें झालें कीं, यमानें कांहीं क्षुल्लक अपराध केला. त्यावरून छायेनें त्यास दुर्धर शाप दिला. तो ऐकून ही आपली माता नसावी, असा यमास संशय येऊन, हें शापाचें वृत्त त्यानें पित्यास ( विवस्वानास ) कळविलें. विवस्वानानें पाहिलें तों ही गोष्ट खरी आहे, म्हणून तो संज्ञेच्या शोधास गेला, व तिला गांठून वाजीरूप ( घोड्याचें रूप ) धरून तिला भेटला. तेव्हां तिनें यास ओळखिलें. त्यावरून उभयतांचा समागम झाला असतां यापासून तिला अश्विनीकुमार अशा साधारण नांवाचे दोन पुत्र झाले. तात्पर्य, हा, संज्ञेस घेऊन स्वलोकीं आला. याच्या संततींतील श्राद्धदेव तो मनु होऊन, त्याचेंच मन्वंतर प्रस्तुत चाललें आहे. यम दक्षिण दिग्पाल झाला, व यमुना ती नदीची देवता झाली. हें मन्वंतर सरल्यावर सावर्णि हा, आठवा मनु होणार, शनि, शनिमंडलावर अधिपति झाला असून, तपतीनें सोमवंशीय पूरुकुलोत्पन्न ऋक्ष ना० राजाचा पुत्र संवरण त्यास वरिलें. आणि अश्विनीकुमार ते देवांचे वैद्य झाले. हा विवस्वान् प्रतिभाद्रपदमासीं सूर्यमंडलाधिपति असतो असें जरी आहे, तरी सर्वकाळ प्राधान्य याचेंच आहे.

चालू जें वैवस्वत मन्वंतर, यांत ब्रह्मदेवानें मरीच्यादिक ऋषि उत्पन्न केले, नंतर मरीचीपासून कश्यपऋषि, कश्यपापासून बारा आदित्य, त्यांतील हा विवस्वान आणि मग विवस्वानापासून वैवस्वतमनु, त्यांत हा सर्व प्रकार जर झाला म्हणावा, तर मेळ कसा पडतो ? अशी शंका कोणी करूं नये; कारण, प्राचेतसदक्ष, चाक्षुषमन्वंतरांतील असून, त्यानें आपल्या साठ कन्यांतील तेरा कश्यपास दिल्या, असा लेख ज्या अर्थी आहे, त्या अर्थी चाक्षुषमन्वंतर समाप्त होण्याच्या संधीसच ही सर्व सिद्धता झाली असून, प्राप्त होणाऱ्या मन्वंतरांत त्यांची गणना दर्शविली असें समजावें. जसा मत्स्यावतार पूर्वकल्पाच्या अंतीं रात्रींत झालेला, चालू कल्पांतला म्हणून दर्शविला आहे, त्याप्रमाणें (मत्स्यावतार श० पहा ).

२–चाक्षुषमन्वंतरांत जे सप्तर्षि होऊन गेले, त्यांतील एक.

३–गरुडानें मारिलेला एक असुर.

**विविक्त**–प्रियव्रतराजाचा पुत्र हिरण्यरेता, त्याच्या सात पुत्रांतील साहवा. याच्या वर्षास हेंच नांव आहे.

२–कुशद्वीपाच्या सात वर्षांतील साहवा.

**विवित्सु**–धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक.

**विविंध्य**–चारुदेष्णानें मारिलेला शाल्वपक्षीय असुर.

**विविंशति**–(सू० वं०)दिष्टकुलोत्पन्न चाक्षुष राजा, त्याचा पुत्र. याचा पुत्र रंभराजा.

२–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**विशद**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिराजाच्या वंशांतील अजमीढपुत्र बृहदिषु, तद्वंशीय जयद्रथ राजाचा पुत्र. याचा पुत्र सेनजित् राजा.

**विशल्यकरिणी**–नर्मदेस मिळणारी एक सामान्य नदी.

**विशल्या**–भारतवर्षीय महानदी.

**विशसन**–दांभिकपणानें यज्ञ करणाऱ्यांस प्राप्त होणारा नरक.

**विशाख**–कार्तिकेयास नांव आढळतें ( भार० वन० अ० २२७ ).

२–कोणी एक ऋषि.

**विशाखयूप**–यामुनगिरीवरील स्थानवि०.या स्थळीं कांहीं दिवस पांडव राहिले होते ( भार० वन० अ०१७७).

**विशाखा**–सोमाच्या स्त्रियांतील एक.

**विशाल**–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न तृणबिंदु राजास अलंबुषा अप्सरेपासून झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. यानें विशाला, अशी आपल्या नांवानें नगरी स्थापिली होती. यास पुत्र होता, त्याचें नांव हेमचंद्र होतें.

२–लंकेंतील एक राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

३–कृष्णबलरामांचा गोकुलांतील एक सखा.

**विशालकर्ण**–या नांवाचा एक किन्नर.

**विशाला**–विशाल राजानें स्थापिलेली नगरी. येथें पूर्वी कुशप्लव नांवाचें वन होतें, व दाशरथिराम विश्वामित्राच्या यज्ञसंरक्षणार्थ गेला, त्या काळीं या नगरींत दिष्टकुलोत्पन्न सुमति राजा राज्य करीत होता.

२–बदरिकाश्रमास नांव ( भाग० पंचम स्कं० अ० ४ गद्य ५ ).

३–द्वितीयार्थक हिमालयापासून निघालेली नदी.

४–सरस्वती नदीच्या सप्त प्रवाहांतील एक प्रवाह.

**विशालाक्ष**–शिवपार्षदांतील एक.

२–पूर्वमत्स्य देशाधिपति विराटराजाच्या भ्रात्यांतील एक. कीचक मेल्यावर हा सेनापति होता ( भार० विराट० अ० ३२ ).

३–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

४–युधिष्ठिराच्या राजसूययज्ञांत होता एक राजा तो. वसुदेवानें स्यमंत पंचकक्षेत्रीं यज्ञ केला, त्या वेळेस हा तेथेंहि साह्यास होता ( भाग० १० स्कं० अ० ८२ ).

**विशालाक्षी**–वाराणसी क्षेत्रांतील सतीची विभूति.

**विशोक**–कर्णानें मारिलेला पांडवपक्षीय केकय राजाचा पुत्र तो ( भार० कर्ण० अ० ८२ ).

२–पंडुपुत्र भीमसेनाचा सारथि.

३–लोहित्य नदाच्या तीरचें अरण्य.

**विश्रवा**–स्वायंभुव मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र पुलस्त्यऋषि, त्यापासून कर्दम प्रजापतीची कन्या हविर्भुवा, तिच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील दुसरा.प्रथमार्थक अगस्त्य ऋषीचा कनिष्ठ भ्राता. याच्या स्त्रीचें नांव आढळत नाहीं. परंतु यास वैश्रवण अशा नामांतरानें सोम नांवाचा पुत्र होता. त्यास कुबेर असेंहि नांव आढळतें, व तो उत्तर दिग्पाल आहे ( १ वैश्रवण श० पहा ).

२–ववस्वत मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र पुलस्त्य ऋषि, त्यास तृणबिंदु राजर्षीची कन्या गौ, तिचे ठायीं झालेला पुत्र. या विश्रवा ऋषीस भरद्वाज ऋषीची कन्या देववर्णिनी, ती पहिली स्त्री असून तिजपासून वैश्रवण नांवाचाच पुत्र झाला होता ( २ वैश्रवण श० पहा ). विश्रवा ऋषीस दुसरी स्त्री कैकसी नांवाची होती. ती दशग्रीव, कुंभकर्ण, शूर्पणखा, आणि बिभीषण, त्यांची माता होती. यांशिवाय यास पुष्पोत्कटा, राका आणि बलाका, अशा तीन स्त्रिया होत्या. त्यांत पुष्पोत्कटा, महोदर, महापार्श्व, प्रहस्त, आणि कुंभीनसी त्यांची माता; राका, खर राक्षसाची माता; आणि बलाका, त्रिशीरा, दूषण आणि विद्युज्जिह्व, ह्यांची माता होती. ह्या शेवटल्या चार स्त्रिया राक्षसकन्या होत्या.

**विश्रुत**–( विदे० वं० ) देवमीढ जनकाचा पुत्र. याचा पुत्र महाधृति जनक. वाल्मीकि रामायणांत या विश्रुतास विबुध असें म्हटलें आहे.

२–नर्मदेसंबंधीं तीर्थवि०.

३–वसुदेवास सहदेवेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**विश्व**–एक गंधर्व ( १ तपस्य श० पहा ).

२–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**विश्वकर्मा**–स्वायंभुव मन्वंतरांतील एक प्रजापति. यानें आपली कन्या बर्हिष्मती, स्वायंभू मनूचा ज्येष्ठपुत्र प्रियव्रत राजा, त्यास दिली होती.

२–वैवस्वत मन्वंतरांतील प्रभास ना० वसूचा पुत्र. हा प्रस्तुत देवांचा शिल्पी आहे ( मत्स्य० अ० ५ ).यास त्वष्टा असेंहि नांव आहे ( ४ त्वष्टा श० पहा ).

**विश्वग**–स्वायंभुव मन्वंतरांतील मरीचि ऋषीचा पुत्र पूर्णिमा, त्याच्या दोन पुत्रांतील दुसरा.

२–(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न पृथु राजाचा पुत्र. यासच विश्वरंधि आणि विष्टराश्व, अशीं नामांतरें असून, चंद्र आणि आर्द्र अशा दोन नामांतरांचा इंदु ना० पुत्र होता.

**विश्वजित्**–बृहस्पतीपासून तारेस झालेल्या साहा पुत्रांतील तिसरा. याची गणना अग्नीमध्यें आहे.

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न कुरुपुत्र सुधनुवंशीय जरासंध राजा, तदन्वयसंभूत सत्यजित् राजाचा पुत्र. यास पूरंजय अथवा रिपुंजय ना० पुत्र. होता. यास याच्या शुनक ना० प्रधानानें मारून आपला प्रद्योत ना० पुत्र तो राजा केला होता ( ३ रिपुंजय श० पहा ).

**विश्वधार**–प्रियव्रत राजाचा पुत्र मेधातिथि, त्याच्या सात पुत्रांतील सातवा.याच्या वर्षास हेंच नांव होतें.

२–शाकद्वीपांतील सातवा वर्ष.

**विश्वपद**–क्षेत्रवि०.

**विश्वभुक्**–युधिष्ठिर होऊन जन्मलेला एक इंद्र.

२–बृहस्पतीपासून तारेस झालेल्या साहा पुत्रांतील चौथा. याची गणना अग्नींत आहे.

**विश्वमाला**–विंध्याचलापासून निघालेली नदी.

**विश्वरंधि**–द्वितीयार्थक विश्वग तोच.

**विश्वरूप**–ऋषभदेवाचा पुत्र भरत, त्याच्या पंचजनी ना० स्त्रीचा पिता.

२–वरुणलोकांतील एक असुर.

३–त्वष्टा ना० प्रजापतीपासून दैत्यांची भगिनी रचना, तिच्याठायीं झालेल्या दोन पुत्रांतील दुसरा.यास शिरें तीन होतीं म्हणून, त्रिशिरा अ० त्रिशीर्ष नांवानें

याची प्रसिद्धि होती. हा एका मुखानें सोमपान, एकानें सुरापान आणि एकानें वेदाध्ययन, याप्रमाणें करणारा असे. यानें दीर्घकालपर्यंत तप केलें, त्यामुळें इंद्रास भय वाटून, त्यानें याच्या तपास विघ्न करण्यासाठीं अप्सरा पाठविल्या असतां, त्यांनीं आपला होता तितका प्रयत्न केला; परंतु हा तपापासून चलन पावला नाहीं. सारांश, याचें तप सिद्ध झालें, व याची मान्यता चांगली वाढली.

एके काळीं असें झालें कीं, बृहस्पति देवलोकांतून कोठें गेल्यामुळें, इंद्रानें यास पौरोहित्यार्थ वरिलें, व भूलोकीं येऊन यज्ञास आरंभ केला. तो यथासांग सिद्धीस गेल्यावर, कांहीं अवकाशानें पुनः दुसऱ्या यज्ञास आरंभ केला. त्यांत कसें झालें असेल तें असो. हा, गुप्तपणानें दैत्यास हविर्भाग देऊं लागला, तो अशा रीतीनें कीं, मोठ्यानें मंत्र व स्वाहाकार म्हणून देवांस हविर्भाग द्यावा, आणि हळू मंत्र व स्वाहाकार म्हणून दैत्यांस भाग द्यावा. याचें कारण, दैत्य याचे मातुल असल्यामुळें मातृसंबंधानें याचा ओढा त्यांकडेस होता. याप्रमाणें होतां होतां, दिवसेंदिवस दैत्य बलवान् होऊं लागले, असें इंद्रास दिसून आलें. तेव्हां याचें कारण काय असावें, म्हणून तो याविषयीं शोध करीत असतां, याचें कपट इंद्राच्या ध्यानांत येऊन, क्रोधेंकरून त्यानें याच्यावर अस्त्र टाकून यास तत्काळ मारिलें (मूळांत वज्र टाकिलें असें आहे, परंतु त्या वेळेस वज्र मुळींच उत्पन्न झालें नव्हतें ). पुढें हा मरण पावला असतांहि, त्यास पाहून इंद्रास भय वाटूं लागलें, म्हणून त्यानें तक्षा ( विश्वकर्मा ) याजकडून त्याचीं तीनहि शिरें त्याच्या देहापासून अगदीं तोडून पृथक् करविलीं, त्या कार्याप्रीत्यर्थ इंद्रानें विश्वकर्म्यास यज्ञांत हविर्भाग देऊं केला ( भार० उद्योग० अ० ९ ).

हा इतिहास मी लिहीत असतां, मला यांतील कित्येक वाक्यांचा भारताशीं व उपनिषदांशीं मेळ दिसला नाहीं, म्हणून उपनिषत् प्रधान धरून, त्यांतील सारांश येथें घेतला आहे असें समजून, वाचणारांनीं शंकित होऊं नये.

**विश्वस**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलांतील कुशान्वयांत जन्मलेल्या महस्वान् राजाचा पुत्र. यास प्रसेनजित् ना० पुत्र होता.

**विश्वसह**–(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न वृद्धशर्मा राजाचा पुत्र. याचा पुत्र खट्वांग राजा.

**विश्वसृट्**–सकलविश्वाप्रत उत्पन्न करणारा ब्रह्मदेव.

२–सहस्रसंवत्सरात्मक यज्ञकर्ता कोणी एक राजर्षि (भार० वन० अ० ५२ श्लोक २४ ).

३–ब्रह्मसावर्णिमन्वंतरांतील विष्वक्सेनावताराचा पिता.

**विश्वा**–प्राचेतस दक्षानें धर्मऋषीस ज्या दाहा कन्या भार्यार्थ दिल्या होत्या, त्यांतील एक. ही विश्वदेवांची माता ( भाग० ६ स्कं० अ० ६ श्लोक ७ ).

२–भारतवर्षीय नदी.

**विश्वाची**–प्राधेच्या अप्सराकन्यांतील एक.

**विश्वात्मा**–विश्वाप्रत आधारभूत असा परमात्मा तो.

**विश्वामित्र**–( सो० वं० ) पुरूरव्याचा पुत्र विजय, तत्कुलोत्पन्न कुश अ० कुशिक राजाचा प्रपौत्र. कुशांबु राजाचा पौत्र आणि गाधिराजाचा पुत्र. हा, गाधीनें आपली कन्या सत्यवती ऋचीक ऋषीस दिल्यावर तिच्या योगानें, भृगुऋषीच्या प्रसादेंकरून आपल्या स्त्रीच्या ठायीं संपादन करविला होता. याचें जन्म ब्राह्मणकुलांत सत्यवतीच्या उदरीं व्हावयाचें असून, सत्यवतीनें आपला भक्षणीय अभिमंत्रित चरु मातेस दिल्यामुळें, याचें जन्म क्षत्रियकुलांत झाले ( ऋचीक श० पहा० ).तथापि हा पुनः तपःप्रभावानें ब्रह्मर्षित्व पावून ब्राह्मणांत मिसळला. त्याविषयींचा इतिहास असा आहे—

एकदां विश्वामित्र राजा, कांहीं सेना समागमें घेऊन अरण्यांत मृगयेस गेला असतां, मार्गांत वसिष्ठऋषीचा आश्रम आढळला. त्यावरून वसिष्ठाचें दर्शन घ्यावें असें त्याच्या मनांत येऊन तेथें गेला, व वसिष्ठास वंदन केलें. वसिष्ठानें याचा सत्कार करून सैन्यासहवर्तमान भोजनास राहून घेतलें, व यास कामधेनूच्या बळानें मिष्टान्नभोजन दिलें. त्या योगानें संतुष्ट होऊन यानें स्वनगरास जावें तें न जातां, वसिष्ठाजवळ कामधेनु मागूं लागला, व ती तो देईना म्हणून तिचें बलात्कारानें हरण करीत असतां, अत्यंत पराभव पावून खिन्न होत्साता नगरास गेला ( ३वसिष्ठ श०पहा ).

असा पराभव पावून विश्वामित्र स्वनगरास परत आल्यावर, त्यानें अल्पकाळानेंच आपल्या शतपुत्रांसहित अपार सैन्य समागमें घेऊन वसिष्ठावर चाल केली. तींत वसिष्ठाच्या हुंकारानें याचे नव्याण्णव पुत्र दग्ध झाले, व एक कसा तरी वांचला. त्यावरून विश्वामित्रास परम दुःख होऊन, तसाच तो तेथून निघून स्वनगरास गेला, व राहिलेल्या पुत्रास राज्यावर स्थापून, (या पुत्राचें नांव आढळलें नाहीं) हिमवान् पर्वतावर जाऊन यानें तेथें मोठें घोर तप आरंभिलें. त्यांत यानें अनेक शस्त्रास्त्रें संपादन केलीं, आणि

वसिष्ठाश्रमाकडेस येऊन, त्याच्यावर त्यांची वृष्टि चालविली. असें वसिष्ठानें पाहून, आपला ब्रह्मदंड हातांत घेतला व विश्वामित्रासमोर येऊन त्यानें जीं जीं अस्त्रें टाकिलीं, त्या सर्वांचा मोठें रूप धारण करून ग्रास केला. त्यावरून यास त्या दिवसापासून तर, ब्राह्मण्य संपादन करून घेण्याची अधिकच ईर्षा उत्पन्न झाली ( वा० रा० बाल० स० ५५-५६ ).

पुढें विश्वामित्रानें असा निश्चय केला कीं, इतःपर तपच करून ब्राह्मण्य संपादायाचें. त्यावरून याची स्त्रीहि यासमागमें निघाली, व यानें इतकें दीर्घ कालपर्यंत तप केलें कीं, याच्या तपास देवांनीं अनेक विघ्नें जरी केलीं, तरी त्यांतून युक्तिप्रयुक्तीनें आपणास राखून, यानें तें आपलें अनेक सहस्रवर्षात्मक तप सरतेशेवटीं सिद्धीस नेलें असतां, देवांनीं यास ब्रह्मर्षि असें म्हटलें; परंतु यानें प्रार्थना केली कीं, मला वसिष्ठांनीं ब्रह्मर्षि म्हटलें पाहिजे, तरच मी आपणास कृतकार्य मानीन. तेव्हां देव म्हणाले, कालांतरानें तीहि गोष्ट घडून येईल ( वा० रा० बाल० स० ५७ ).

नंतर विश्वामित्रानें आश्रम केला, तेथें त्यास याप्रमाणें पुत्र झाले-मधुच्छंद, देवरात ( शुनःशेप ), अक्षीण, शकुंत, बभ्र, कालपथ, याज्ञवल्क्य, स्थूण, महाव्रत, उलूक, यमदूत, सैंधवायन, वल्गुजंघ, गालव, वज्र, सालंकायन, लीलाढ्य, नारद, कूर्चामुख, वादुलि, मुसल, वक्षोग्रीव, आंघ्रिक, नैकदृक्, शिलायूप, शित, शुचि, चक्रक, मारुतंतव्य, वातघ्न, आश्वलायन, श्यामायन, गार्ग्य, जाबालि, सुश्रुत, कारीषि, संश्रुत्य, पर, पौरव, तंतु, कापिल, ताडकायन, उपगहन, असुरायण, मार्दमर्षि, हिरण्याक्ष, जंगारि, भूति, विभूति, सुत, सुरकृत, अरालि, नाचिक, चांपेय, उज्जयन, नवतंतु, बकनख, सेयन, यति, अंभोरुह, चारुमत्स्य, शिरीषि, गार्दभि, ऊर्जयोनि, उदापेक्षी, नारदि, इ०शत ( भार० अनु० अ० ४ ). याशिवाय माधवीपासून झालेला यास अष्टक म्हणून पुत्र होता. यांत गालव म्हणून जो पुत्र होता, त्याचें मूळचें नांव आढळत नाहीं; परंतु त्यास तें नांव पडण्यास जें कारण झालें, त्याविषयीं ( २ गालव श० पहा ).

गालवप्रभृति पुत्र, व आपली स्त्री, यांस आपण नसतां, ज्या सत्यव्रत ( त्रिशंकु ) राजानें अनावृष्टिकालीं वांचविलें होतें, त्याच्या उपकारास उत्तीर्ण होण्यासाठीं विश्वामित्रानें त्यास देहासहित स्वर्गास जाण्याची व तेथील भोग भोगण्याची इच्छा आहे असें जाणून त्याचें आचार्यत्व पत्करलें, व तो यज्ञ वराच सफळ केला. परंतु त्या कर्माचा वसिष्ठानें उपहास करून, यास ब्रह्मर्षि म्हणून म्हटलेंच नाहीं ( त्रिशंकु श० पहा ). सारांश, यानें जें जें करावें, त्यास त्यास वसिष्ठानें अमान्यच करीत जाऊन, ब्रह्मर्षिहि म्हणूं नये, त्यामुळें हाहि वसिष्ठाचा इतका द्वेष करूं लागला कीं, त्यानें जें म्हणावें, तें यानें मिथ्या करण्याविषयीं अनिवार यत्न करावा. याविषयीं वसिष्ठानें हरिश्चंद्र राजाची इंद्र लोकीं केलेली स्तुति यास न रुचून, यानें त्यांस सत्त्वापासून ढळवावें म्हणून अनिवार छळ केला; परंतु तो सत्त्वापासून ढळला नाहीं ( हरिश्चंद्र श० पहा ).

पुढें पुढें असें होत गेलें कीं, कोठें कोणी विश्वामित्राची गोष्ट काढिली कीं, त्यास वसिष्ठ मान डोलवूं लागला, व मुखानें असेंहि बोलूं लागला कीं, विश्वामित्रासारखा तपस्वी विश्वामित्रच. त्यावरून हरिश्चंद्र राजानें, वरुणास बली देण्याकरितां शुनःशेप घेतलेला, तत्संबंधीं यज्ञामध्यें विश्वामित्रास वसिष्ठानुमतें हौत्र करण्यास ( यज्ञांतील पूर्व दिशेकडील ऋत्विजपणाचें कर्म करण्यास ) योजिलें. तेणेंकरून यास पराकाष्ठेचा हर्ष झाला, व त्या यज्ञांत, यानें शुनःशेपास वांचविल्यावरून, त्यानें मी आतां पुत्र कोणाचा असें मोठ्यानें पुसलें असतां तेथें ब्रह्मा ना० ऋत्विजस्थानीं बसलेला वसिष्ठ त्यानें, तूं विश्वामित्राचा आतां पुत्र होस असें म्हटलें. तेणेंकरून विश्वामित्राचा तो हर्ष द्विगुणित झाला; कारण, शुनःशेप हा ब्राह्मणपुत्र असून, ज्या अर्थीं मी जो विश्वामित्र त्या माझा हा पुत्र वसिष्ठानें स्वमुखानें म्हटलें, त्या अर्थीं मी ब्रह्मर्षि असें त्यास खचित मानलें ( शुनःशेप श० पहा ). परंतु विश्वामित्राच्या तोंडावर त्यानें त्यास ब्रह्मर्षि असें अजून म्हटलेंच नव्हतें.

वसिष्ठऋषि आपणास आपल्या तोंडावर ब्रह्मर्षि कधीं म्हणेल, त्याची, यानें मार्गप्रतीक्षा इतका कालपर्यंत केली कीं, हरिश्चंद्र राजाच्या पुढें सूर्यवंशांत वीस राजे होऊन गेले व एकविसावा कल्माषपाद अयोध्येंत राज्य करूं लागला, तरी त्यानें यास याच्या समक्ष ब्रह्मर्षि असें म्हटलें नाहीं. मागें मात्र म्हणे. त्यावरून यानें क्रोधेंकरून कंटाळून, कल्माषपाद राजा राक्षसयोनि पावला होता त्याकडून वसिष्ठाचे शक्ति आदिकरून शत पुत्र भक्षविले; तरी यास वसिष्ठ, बरें किंवा वाईट कांहींच बोलला नाहीं, त्यावरून मात्र मग विश्वामित्र अगदीं थकून स्वस्थ बसला.

पुढें वसिष्ठाविषयीं याची द्वेषबुद्धि न्यून आहे किंवा नाहीं, ही परीक्षा करावी म्हणून यमधर्म, वासिष्ठाचें रूप धारण करून याकडे आला. व यापाशीं त्यानें अन्नाची याचना केली. तीवरून यानें अन्न सिद्ध केलें, व त्यास पाहूं लागला तों, तो कोठेंहि नाहीं, म्हणून त्याची मार्गप्रतीक्षा करीत उभा राहिला; परंतु वसिष्ठवेषधारी यम शंभर वर्षेपर्यंत आला नाहीं, तरी हा, तितका कालपर्यंत तप करीत उभाच होता. नंतर यम आला, आणि पाहतो तर हा, अन्न सिद्ध करून उभाच आहे. त्यावरून संतुष्ट होऊन, त्यानें नूतन केलेल्या अन्नाप्रमाणें अन्न उष्ण असलेलें पाहून त्याचें भोजन केलें, व यास ब्रह्मर्षि असें म्हणून अंतर्धान पावला. सारांश, पुढें वसिष्ठानेंहि यास ब्रह्मर्षि म्हटलें आणि तेव्हांपासून वसिष्ठाचें व याचें जें सख्य झालें, तें अजून आहे तसेंच आहे ( वा० रा० बाल स० ६५ ). याच शतवर्षात्मक कालांत तृतीयार्थक गालवानें याची उत्कृष्ट सेवा केली होती ( भार० उद्योग० अ० १०६ ).

आपल्या यज्ञाचें संरक्षण व्हावें म्हणून दशरथ राजापासून यानेंच रामलक्ष्मणांस मागून नेलें होतें, व ताटकेचा वध यानेंच रामाकडून करवून, अहल्योद्धार, सीतेशीं त्याचा विवाह होतांच हा तेथून निघून गेला. ( २ राम श० पहा ).

याच्या कुलांत यासुद्धां मंत्रद्रष्टे तेरा ऋषि झाले होते, त्यांचीं नांवें अशीं.—स्वतः विश्वामित्र, देवरात ( शुनःशेप ), मधुच्छंद, अघमर्षण, अष्टक, लोहित, ( रोहित ), भूतकील, मांबुधि, देवश्रवा, देवरत, धनंजय, शिशिर, शालंकायन ( मत्स्य०अ० १४४ ).

याच्या कुलाच्या वंशमालिका दहा आहेत, त्या अशा.—कुशिक, लोहित ( रोहित ), रौक्षक, कामकायन, अज, कत, धनंजय, अघमर्षण, पूरण, आणि इंद्रकौशिक. या प्रत्येकाचे प्रवर याप्रमाणें.—कुशिककुलोत्पन्न–दुसरा विश्वामित्र, वैकृति गालव, वतंड, सलंक, अभय, आयतायन, उलूप, औपगहय, पयोद, जनपादप, खरवाक्, हलयम, साधित, वास्तु आणि कौशिक, हे ऋषि, **वैश्वामित्र, दैवरात, औद्दल,** या तीन प्रवरांचे. लोहितकुलोत्पन्न-**वैश्वामित्र, आष्टक, लौहित;** अ० **वैश्वामित्र माधुच्छंदस, आष्टक;** किंवा **वैश्वामित्र, आष्टक;** अशा तीन तीन, किंवा दोनच प्रवरांचे होत. रौक्षककुलोत्पन्न–**वैश्वामित्र, गाथिन, रैवण;** किंवा **वैश्वामित्र, रौक्षक, रैवण;**–अशा तीन तीन प्रवरांचे कामकायनकुलोत्पन्न– देवश्रवा, सुजातेय, सौसुक, कारुकायन, वैदेहरात, कुशिक, इ० ऋषि, **वैश्वामित, दैवश्रवस, दैवरात,** अशा तीन प्रवरांचे. अजकुलोत्पन्न–धनंजय, कपर्देय, परिकूट आणि पाणिनि, हे ऋषि **वैश्वामित्र, माधुच्छंदस, आज,** अ० **आद्य,** अशा तीन प्रवरांचे. कतकुलोत्पन्न–**वैश्वामित्र, कात्य, आक्षील,** अशा तीन प्रवरांचे. धनंजयकुलोत्पन्न–**वैश्वामित्र, माधुच्छंदस, धानंजय.** अघमर्षणकुलोत्पन्न **वैश्वामित्र, आघमर्षण, कौशिक.** पूरणकुलोत्पन्न–**वैश्वामित्र, पूरण;** किं० **वैश्वामित्र, दैवरात, पूरण,** आणि इंद्रकौशिककुलोत्पन्न–**वैश्वामित्र, ऐंद्रकौशिक** अशा दोनच प्रवरांचे होत.

या दहांशिवाय, आश्मरथ्य, साहुल, गाथिन, वैणव, हिरण्यरेतस्, सुवर्णरेतस्, कपोतरेतस्, शालंकायन, घृतकौशिक, कथक आणि रौहिण, असेहि भेद असून, यांचे प्रवर क्रमानेंच याप्रमाणें असतात. वैश्वामित्र, आश्मरथ्य, वाधुल; वैश्वामित्र, साहुल, माहुल; वैश्वामित्र, गाथिन, रैणव; वैश्वामित्र, गाथिन, वैणव; वैश्वामित्र, हिरण्यरेतस्; वैश्वामित्र, सुवर्णरेतस्; वैश्वामित्र, कपोतरेतस्; वैश्वामित्र, शालंकायन, कौशिक; वैश्वामित्र, घृतकौशिक; वैश्वामित्र, कथक; आणि वैश्वामित्र, माधुच्छंदस, रौहिण.

कमलायजि, आश्मरथ्य, वंचुलि, यांचे प्रवर वैश्वामित्र, आश्मरथ्य, वंजुलि; आणि उदरेणु, कथक, उदावहि, शाट्यायनि, करीराशी, शालंकायनि, लावकि, मौंजायनि, हे ऋषि वैश्वामित्र, खिलखिलि, आज, या प्रवरांचेहि आढळतात.

हा विश्वामित्र, चालू मन्वंतरांत कार्तिकमासींच्या सूर्यासमागमें संचार करण्यास असून, ( ३ ऊर्ज श० पहा ) तसाच प्रस्तुतच्या सप्तर्षींतहि एक आहे.

२–याच कुलांतील दुसरा एक ऋषि.

**विश्वामित्रा**–भारतवर्षीय नदी.

**विश्वावसु**–प्राधेस झालेल्या गंधर्वांतील एक. हा श्रावणमासींच्या सूर्यासमागमें, संचार करण्यास प्रतिवर्षी असतो ( ५ नभ श० पहा ).

२–चित्रसेन गंधर्वाचा पुत्र. हाच शापानें कबंधराक्षस झाला होता ( भार० वन० अ० २७९ ).

३–जमदग्नि ऋषीपासून रेणुकीस झालेल्या पुत्रांतील एक.

४–माल्यवान राक्षसाची कन्या अनला, तिचा पति ( वा० रा० उत्तर० स० ६१ ).

**विश्वेदेव**–धर्मऋषीपासून विश्वा ना० स्त्रीच्याठायीं

झालेले दहा पुत्र ते. हे चालू मन्वंतरांत सप्तविध देवांत आहेत. यांचीं नांवें.—क्रतु, दक्ष, वसु, सत्य, कालकाम, मुनि, कुरज, मनुज, बीज, आणि रोचमान् ( मत्स्य० अ० २०२ ).

**विश्वेश्वर**–सकल जगताचा ईश्वर तो. काशींतील शिवाची विभूति.

**विषप्रस्थ**–नैमिषारण्यांतील तीर्थवि०.

**विषया**–धृष्टबुद्धि प्रधानाची कन्या, चंद्रहास राजाची स्त्री.

**विषूची**–ऋषभदेववंशीय विरज राजाची स्त्री.

२–ब्रह्मसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या विष्णूच्या अवताराची माता.

**विष्टराश्व**–विश्वग राजास नामांतर.

**विष्णु**–हरि शब्द पहा. व्यापक परमात्मा तो.

२–वैकुंठांत असणारा वैकुंठ ना० विष्णु तो.

३–द्वादशादित्यांतील एक आदित्य. हा कार्तिक मासांत सूर्यमंडलाधिपति होत असतो ( ३ ऊर्ज श० पहा ).

४–तृतीयार्थक भृगुकुलोत्पन्न ऋषि.

५–नित्यमुक्त विष्णूच्या जेवढ्या विभूति, त्यांवरहि या शब्दाचा प्रयोग होतो.

**विष्णुपद**–एक पर्वत.

२–निषध पर्वतावरील एक सरोवर, यांतून ज्योतिष्मती नदी निघालेली आहे.

**विष्णुपदी**–गंगेचें मूळ नांव ( देवी भा० ९ स्कं० अ० १३ ).

**विष्णुयशा**–ब्राह्मण, कल्क्यवताराचा पिता.

**विष्णुरथ**–गरुड.

**विष्णुरात**–पांडववंशीय परीक्षित् राजास नांव.

**विष्णुलोक**–नित्यमुक्त विष्णू जेथें साकारत्वानें राहतो, तो लोक. याला वैकुंठ असें कित्येक म्हणतात; परंतु वैकुंठ लोक भिन्न असून, तो यामागून उत्पन्न झालेला आहे.

**विष्णुवृद्ध**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न त्रसद्दस्यु राजाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. हा ब्राह्मण झाला.

**विष्णुवृद्धि**–विष्णुवृद्धच असावा ( ३ अंगिरा श० पहा).

**विष्वक्सेन**–विष्णूस नांव आहे.

२–एक ब्रह्मर्षि.

३–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र बृहदिषु, त्याच्या वंशांतील ब्रह्मदत्त राजास गौ अ० सरस्वती ना० स्त्रीच्या ठायीं झालेला पुत्र. याचा पुत्र उदक्स्वन राजा.

४–ब्रह्मसावर्णि मन्वंतरांत होणारा विष्णूचा अवतार.

५–इंद्रसावर्णि मनूस हेंहि नांव चालेल.

**विसर्जन**–यादवांतील एक कुल.

**विस्पष्ट**–इंद्रजिताचा अनुचर एक राक्षस ( भार० वन० अ० २८८ ).

**विहंगम**–खर राक्षसाच्या बारा अमात्यांतलि एक.

२–धर्मसावर्णि मन्वंतरांत होणारें देववि०.

**विहव्य**–वर्चा ऋषीचा पुत्र, याचा पुत्र विहव्य ( वीतहव्य श० पहा ).

**विक्षर**–कश्यपस्त्री दनायु, तिच्या पुत्रांतील एक.

**वीतहव्य**–( सू० वं० ) शर्यातिपुत्र हैहय राजा त्यास दहा स्त्रियांमिळून असणाऱ्या शतपुत्रांतील प्रमुख. यासहि शतपुत्र होते. यानें, सौदेवसंज्ञक काशाचा राजा दिवोदास, त्याला अनिवार त्रास देऊन राज्यावरून काढून टाकिलें, व आपण तेथें राहूं लागला. कांहीं काळानें त्याच्या प्रतर्दन ना० पुत्रानें, काशीस जाऊन याशीं एकट्यानेंच इतकें भयंकर युद्ध केलें कीं, याचे शंभरहि पुत्र युद्धांत मारिले, व यास मारावें म्हणून, यावर धांवला. त्यावरून हा पळाला व च्यवन भार्गवाच्या आश्रमांत शिरला. मागून आलेल्या प्रतर्दनानें वीतहव्यास माझ्या स्वाधीन करावें म्हणून ऋषीस विनंति करितांच, त्यानें त्यास येथें क्षत्रिय कोणी नाहीं, आम्ही सर्व ब्राह्मणच आहों असें सांगितलें. तेव्हां प्रतर्दन हा त्या ऋषीस याप्रमाणें बोलला.

**श्लोक.**

य एष राजा वीर्येण स्वजातिं त्याजितो मया ॥
ततस्तेनाभ्यनुज्ञातो ययौ राजा प्रतर्दनः ॥
भृगोर्वचनमात्रेण स च ब्रह्मर्षितां गतः ।। ७७ ॥

सारांश, प्रतर्दन तेथून निघून गेला, व हा ब्रह्मर्षित्व पावला. ब्रह्मर्षित्व पावल्यावर, यास गृत्समद ना० पुत्र झाला. गृत्समदाचा पुत्र सुचेता, त्याचा वर्चा,त्याचा विहव्य,त्याचा वितत्य,त्याचा सत्य, त्याचा संत,त्याचा श्रवा,श्रव्याचा तम,त्याचा प्रकाश,पुढें क्रमानें वागींद्र, प्रमति, रुरु, शुनक, आणि त्याचा शौनक, हे सर्व भृगुगोत्री समजावेत ( भार० अनु० अ० ३० ).

**वीति**–तृतीयार्थक भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**वीतिहव्य**–भृगुतृतीयार्थककुलांतील दोन ऋषि.

२–( विदे० वं० ) शुनक नांवाच्या जनकाचा पुत्र. याचा पुत्र धृति जनक.

**वीतिहोत्र**–प्रियव्रत राजाच्या दहा पुत्रांतील नववा. हा शुद्धोदानें ( गोड्या पाण्याच्या समुद्रानें ) वेष्टित जें पुष्करद्वीप तेथील अधिपति. यानें आपल्या द्वीपाचे

दोन भाग करून, त्या प्रत्येकास आपल्या दोन पुत्रांचींच रमणक आणि धाताकि हीं नांवें दिलीं, व तेथील आधिपत्य त्यांस क्रमानें दिलें.

२-( सू० वं० ) नरिष्यंतकुलोत्पन्न इंद्रसेन राजाचा पुत्र. याचा पुत्र सत्यश्रवा.

३-( सो० वं०) सहस्रार्जुनाचा प्रपौत्र, जयध्वज राजाचा पौत्र, व तालजंघ राजास झालेल्या शत पुत्रांतील ज्येष्ठ. हे शतपुत्र और्वाग्नीनें दग्ध होऊं लागले असतां, त्यांतून हा वांचला होता.

३-( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या काश्य ना० पौत्राच्या कुलांत जन्मलेल्या सुकुमार राजाचा पुत्र. याचा पुत्र भर्ग.

४-युधिष्ठिराच्या राजसूययज्ञांतील एक ऋषि.

**वीर**-तामस मन्वंतरांत होते देव ते.

२-भरद्वाज अग्नीस वीरेपासून झालेला पुत्र. यास रथप्रभु रथाध्वान, कुंभरेता, इ० नामें असून, शरयू ना० स्त्रीपासून सिद्धि नांवाचा पुत्र झाला होता.

३-कश्यपापासून दनायूस झालेल्या पुत्रांतील एक.

४-धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतलि एक.

५-कृष्णास सत्येपासून झालेल्या पुत्रांतलि एक.

६-कृष्णापासून कालिंदीस झालेल्या पुत्रांतील एक.

**वीरक**-एक शिवगण.

**वीरकरा**-भारतवर्षीय नदी.

**वीरकेतु**-द्रोणाचार्यांनें मारिलेला पांडवपक्षीय पांचाल ( भार० द्रोण० अ० १२२ ).

२-हंसध्वज राजाचा प्रधान सुमति, त्याचा पुत्र.

**वीरण**-सनकादिकांपासून ब्रह्मविद्या संपादन केलेला एक प्रजापति ( भार० शांति० अ० ३४८ ).

**वीरद्युम्न**-भूरिद्युम्न राजर्षीचा पिता.

**वीरधन्वा**-धृष्टकेतूनें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० १०७ ).

**वीरधर्मा**-भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० उद्योग० अ०४ ).

**वीरप्रमोक्ष**-भारतवर्षीय तीर्थ.

**वीरबाहु**-रामसेनेंतील वानर ( वा०: रा० किष्किं० स० ३३ ).

२-द्वितीयार्थक प्रवीर तोच.

३-चेदि देशाचा नलराजाच्या वेळचा राजा ( ५ नल श० पहा ).

४-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**वीरभद्र**-स्वायंभुव मन्वंतरांत दक्ष प्रजापतीच्या यज्ञनाशार्थ तेथें गेलेला एक शिवपार्षद. यानें त्या दक्षाचा वध केला होता ( भाग० ४ स्कं० अ० ५ ). चालू मन्वंतरांत हा मंगल ना० ग्रह झालेला असून, मंगलमंडलाचा अधिपति आहे.

**वीरमत्स्य**-भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**वीरवती**-भारतवर्षीय नदी.

**वीरवर्मा**-सारस्वत नगरीचा राजा. याच्या मालिनी ना० कन्येनें तप करून यमास वरिलें होतें. म्हणून यम तेथें राहून, याचें साह्य करीत असे. या वीरवर्म्यास सुभाल, सुरभ, लील, कुवल, आणि सरल, असे पांच पुत्र होते. पांडवांचा अश्वमेधीय अश्व, याच्या नगरासमीप आला असतां, यानें तो आपल्या पुत्रांकडून धरविला. त्यावरून कृष्णार्जुनाशीं याचा मोठा संग्राम झाला. त्यांत यमाच्या साह्यानें यानें अर्जुनाचा पराभव केला असें पाहून, कृष्णानें अर्जुनाशीं याचें सख्य कराविलें. त्यावरून यानें कृष्णार्जुनांस नगरांत नेऊन आदरसत्कारपूर्वक बहुत धन दिलें, व त्यांचें साह्य करण्यासाठीं त्यांबरोबर आपण स्वतः गेला ( जैमिनि० अश्व० अ० ४७-४९ ).

**वीरव्रत**-ऋषभदेववंशीय मधु ना० राजास सुमना स्त्रीपासून झालेला पुत्र. यास भोजा स्त्रीपासून मंथु आणि प्रमंथु असे दोन पुत्र झाले होते.

**वीरसेन**-पंचमार्थक नलराजाचा पिता.

२-कलिंग देशाचा राजा. याची कन्या मनोरमा ती सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न ध्रुवसंधि राजाची स्त्री.

३-कोसलदेशीय एक राजा.

४-युधिष्ठिराच्या राजसूययज्ञांतलि एक ऋषि.

**वीरा**-भरद्वाज ना० अग्नीची स्त्री.

२-भारतवर्षीय नदी.

**वीरिणी**-वीरणप्रजापतीची कन्या नड्वला, तिलाच नामांतर.

२-प्राचेतस दक्षाची दुसरी स्त्री.

३-पीवरीस नामांतर.

**वीर्य**-अक्रूराच्या पुत्रांतील एक.

**वीर्यवान**-बारा साध्यदेवांतील एक.

**वीर्यसह**-कल्माषपाद राजास नामांतर.

**वृक**-अग्नीस नांव.

२-उत्तानपादपुत्र ध्रुव, त्याचा पौत्र शिष्टास सुच्छायेपासून झालेल्या चार पुत्रांतील कनिष्ठ.

३-पृथुराजास अर्चीपासून झालेल्या पांच पुत्रांतील कनिष्ठ.

४-सूर्यवंशीय इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरित राजास नामांतर.

५-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न भरुक राजाचा पुत्र. याचा पुत्र बाहुक राजा.

६-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय शूर राजास मारीषेपासून झालेल्या दहा पुत्रांतील कनिष्ठ. यास दुर्वार्क्षीपासून तक्ष, पुष्कर, इ० पुत्र झाले होते.

७-वत्सक यादवास मिश्रकेशी अप्सरेपासून झालेल्या पुत्रांतील ज्येष्ठ.

८-द्रौपदीस्वयंवरांत असलेल्या राजांतील एक ( भार० आदि० अ० १८६ ).

९- द्रोणाचार्यानें मारिलेला पांडवपक्षीय पांचाल (भार० द्रोण० अ० २१ ).

१०-कृष्णास मित्रविंदेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

११-एक असुर. खालचा श० पहा.

**वृकदेवी**-वसुदेवाच्या स्त्रियांतील एक.

**वृकरथ**-अधिरथ सूताच्या पुत्रांतील एक. यास रात्रियुद्धांत भीमानें मारिलें (भार० द्रोण०अ०१५७).

**वृकल**-अक्रूर यादवाच्या पुत्रांतील एक.

**वृकस्थल**-कुरु देशांत असणारा ग्रामवि०.

**वृकासुर**-शकुनि ना० असुराचा पुत्र. याची कथा प्रायः भस्मासुराप्रमाणेंच आहे; कांहीं फेर आडळतो, विशेष कांहीं नाहीं ( भाग० दशमस्कं० अ० ८८ ).

**वृकोदर**-पंडुपुत्र भीमसेनास नांव.

**वृजिन्वान्-वृजिनिवान्**-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा-राजा त्याचा पुत्र. याचा पुत्र श्वाहिराजा.

**वृत्त**-ध्रुवपुत्र शिष्ट, त्याच्या चार पुत्रांतील तिसरा.

**वृत्तिरूपवती**-क्रौंचद्वीपांतील नदी.

**वृत्र**-वृत्रासुर शब्द पहा.

**वृत्राघ्नि**-पारियात्र पर्वतापासून निघणारी नदी.

**वृत्रज्वाला**-कुंभकर्णाची स्त्री वज्रज्वाला तीच.

**वृत्रहा**-प्रस्तुतचा पुरंदर ना० जो इंद्र, त्याला वृत्रासुरास मारिल्यावरून नांव. अशा अर्थाचीं पुष्कळ नांवें आहेत.

**वृत्रासुर**-कश्यपापासून दनायूस झालेल्या चार पुत्रांतील कनिष्ठ.

२-त्वष्टा ना० प्रजापतीचा पुत्र विश्वरूप त्यास इंद्रानें मारिल्यावर, त्याच्या नाशार्थ त्यानें अग्नीमध्यें हवन आरंभून यास उत्पन्न केलें, व इंद्रास मारण्याची आज्ञा केली. त्यावरून हा इंद्राशीं युद्धास गेला,व यानें त्यास गिळिलें. तेव्हां देवांनीं याच्याठायीं जृंभा ( जांभयी ) उत्पन्न केली. तिच्या योगानें याचें मुख पसरलें जाऊन इंद्र बाहेर निघाला. तथापि यानें पुनः देवांशीं युद्ध आरंभून त्यांचा पराभव केला. याप्रमाणें अनेक-वेळां झालें. त्यावरून इंद्र विचार करूं लागला कीं, यास आतां काय करावें. शेवटीं विष्णुकडून शोध होईल तर करून पहावा असें मनांत आणून, इंद्रानें त्यास याकडे पाठविलें. परंतु यानें उत्तर केलें, मला तसें करण्याचें अगत्य नाहीं, कारण मला कोणत्याहि पदार्थापासून मरणच नाहीं ( भार० उद्योग० अ० ९-१० ).

पुढें विष्णूनें इंद्रास असें सांगितलें कीं, दधीचऋषि जर आपल्या शरीराच्या अस्थि देईल, तर त्या तूं घेऊन विश्वकर्म्याकडून त्याचें वज्र करीव. आणि तें याच्यावर टाक म्हणजे हा मरेल. असें ऐकून, इंद्रानें देवांस दधीचऋषीकडे पाठविलें,व त्यांकडून त्यासमीप अस्थींची याचना करविली. त्या काळीं,देवांशीं त्याचा बहुत संवाद होऊन, त्यानें आपल्या अस्थि दिल्या. त्या घेऊन देव स्वर्गास आले, व विश्वकर्म्यानें त्याचें वज्र सिद्ध केलें.

वज्र सिद्ध होतांच इंद्रानें युद्धाची सिद्धता केली, व वृत्रासुरास बोलाविलें. त्यावरून याचा इंद्राशीं संग्राम प्रवृत्त झाला. हें युद्ध आरंभलें त्या काळीं चालू मन्वंतराच्या प्रथम पर्ययाचें त्रेतायुग होतें ( भाग० षष्ठ० अ० १० श्लो० १६ ). हें युद्ध होत असतां, इंद्राचा व याचा संवाद,अध्यात्मविषयपर अति उत्कृष्ट झाला. सारांश, उभयतांचें युद्ध एक संवत्सरपर्यंत होऊन ( भाग० षष्ठ० अ० १२ श्लो० ३३ ) शेवटीं हा इंद्राच्या हातून मरण पावला ( भार० वन० अ० १०१ ). हा वृत्रासुर पूर्वीचा चित्रकेतु राजा होय ( २ चित्रकेतु श० पहा ).

**वृंदारक**-अभिमन्यूनें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० ४७ ).

**वृंदावन**-यमुनेच्या तीरीं असणारें वन० ( भाग० १० स्कं० अ० १२ ).

**वृद्धगार्ग्य**-एक ब्रह्मर्षि ( भार० अनु० अ० १२५ ).

**वृद्धशर्मा**-वृद्धक्षत्र श० पहा.

२-( सू०वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ऐडविड राजाचा पुत्र. याचा पुत्र विश्वसह राजा.

३-करूषदेशीय राजा, यास वसुदेवभगिनी श्रुतदेवा ती स्त्री असून, पुत्र दंतवक्र अ० वक्रदंत नांवाचा होता.

**वृद्धसेना**-ऋषभदेववंशीय सुमति राजाची स्त्री. देवता-जिताची माता.

**वृद्धक्षत्र**-सिंधुदेशाचा राजा. यास वृद्धशर्मा असेंहि म्हणत असत. याला जयद्रथ नांवाचा पुत्र होता.जय-द्रथ उत्पन्न झाला त्या काळीं आकाशवाणी अशी झाली कीं, युद्धांत याचें शिर तुटून हा मरेल. ती ऐकून वृद्धक्षत्र मोठा सामर्थ्यवान् होता, म्हणून,

त्यानें पुत्रास असा वर देऊन ठेविला होता कीं, जो कोणी याचें शिर तोडून भूमीवर पाडील, त्याचें शिर तत्काळ शतधा भग्न होऊन तो मरण पावेल.

पुढें या राजानें जयद्रथ मोठा झाला असें पाहून, धृतराष्ट्राची कन्या दुःशला तिशीं त्याचा विवाह केला, आणि त्यास राज्यावर स्थापून आपण स्यमंतपंचकक्षेत्रीं जाऊन तप करीत राहिला. कांहीं काळानें कौरवपांडवांचें युद्ध प्रवृत्त होऊन, त्यांत जयद्रथाचें शिर अर्जुनास तोडण्याचा प्रसंग आल्यावेळीं वरील वरप्रदानाचें मर्म कृष्णानें अर्जुनास सांगितलें. त्यावरून अर्जुनानें जयद्रथाचें शिर तोडून, स्यमंतपंचकक्षेत्री याच्या मांडीवर नेमकें पाडिलें. तें यानें न ओळखून भूमीवर टाकतांच, हाच स्वतः मस्तक भग्न होऊन मरण पावला ( भार० द्रोण० अ० १४६ ).

**वृष**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतान्वयसंभूत सृंजयास राष्ट्रपालीपासून झालेल्या पुत्रांतील ज्येष्ठ.

२–कृष्णास सत्येपासून झालेल्या पुत्रांतील एक.

३–कृष्णापासून कालिंदीस झालेल्या पुत्रांतील एक.

**वृषक**–सुबल ना० गांधार राजा त्याच्या पुत्रांतलि एक. शकुनीचा भ्राता. हा, भारती युद्धांत अर्जुनाच्या हातून मरण पावला ( भार० द्रोण० अ० ३० ).

२–कलिंगदेशीय भानुमंत राजाचा भ्राता.

**वृषकंड**–द्वितीयार्थक कश्यपकुलोत्पन्न एक ऋषि.

**वृषका**–भारतवर्षीय नदी.

**वृषकेतु**–कर्णाचा पुत्र, यास भद्रावती ना० स्त्री असून, वृषध्वज असेंहि यास म्हणत.

**वृषक्राथ**–भारती युद्धांत मेलेला शकुनीचा भ्राता.

**वृषदंश**–भारतवर्षीय सामान्य पर्वत.

**वृषदर्भ**–सेदुक राजाचा मित्र एक राजा. हा सेदुकाप्रमाणेंच नीतिमान् असे. यास सेदुकानें एकदां सहजीं असें सांगितलें कीं, ब्राह्मणास सुवर्ण आणि रौप्य यांशिवाय दान देत जाऊं नये. या सांगण्यांत त्यानें इतर दानांची केवळ निवृत्तिच केली होती असें नाहीं, परंतु यास तसें वाटून, एकदां एक ऋषिपुत्र गुरुदक्षिणेनिमित्त याकडेस सहस्र अश्व मागण्यास आला, तेव्हां यानें त्यास सेवकांकडून बाहेर घालविलें. त्यावरून तो यास शाप देऊं लागला असतां, राजानें ( वृषदर्भानें ) त्यास आपल्या राज्याचें एका दिवसाचें उत्पन्न दिलें, व मार्गस्थ केलें. तें उत्पन्न सहस्र अश्वांच्या मौल्याहून अधिकच होतें ( भार० वन० अ० १९६ ).

२–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न औशीनर शिबि राजाच्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ. यासच क्वचित् वृषादर्भ अ० वृषादर्भि अशीं नांवें आढळतात. हा शिबीचा पुत्र म्हणून यास शैब्य असें म्हटलेलें आहे. हा राज्य करीत असतां, एक कपोत पक्षी ( पारवा ), श्येन पक्षी ( ससाणा ), मागें लागला म्हणून त्याच्या भीतीनें यास शरण आला. त्यास यानें अभय देऊन आपणाजवळ ठेवून घेतलें. इतक्यांत श्येपक्षी येऊन याजवळ कपोतास मागूं लागला. तेव्हां राजा म्हणाला, तूं दुसरें कांहीं माग; तें मी तुला देईन, परंतु कपोतास देणार नाहीं. श्येन बोलला, बरें तर, याच्या भारंभार तुझें मांस मला दे म्हणजे मी जातों. राजानें तें मान्य केलें, व कपोत्याच्या भारंभार अंगाचें मांस काढून तोलूं लागला, तों तो कपोत जड होत जाऊन राजाच्या अंगाचें प्रायः सर्व मांस सरत आलें. त्यावरून हे दोन पक्षी कोणी तरी देव आहेत असें यानें जाणून त्यांची स्तुति केली. तेव्हां ते उभयतां मूळरूप प्रकट करून यास पूर्ववत् करून आशीर्वाद देऊन अंतर्धान पावले ( भार० अनु० अ० ३२ आणि ९३ ).

**वृषध्वज**–महादेवाचा ध्वज वृषभाचा असल्यामुळें त्यास हें नांव.

२–एक राजर्षि ( देवीभा० ९ स्कं० अ० १५ ). याचा पुत्र रथध्वज. हा राजा जनकवंशांतील सीरध्वज जनकाच्या पूर्वींचा असावा. परंतु हें नांव मला वंशावळींत सांपडलें नाहीं.

३–वृषकेतु त्यासच हेंहि नांव आहे.

**वृषपर्वा**–कश्यपापासून दनूस झालेल्या दानवांतील एक. ययाति राजाच्या वेळेस हाच असुरांचा अधिपति होता. यास शर्मिष्ठा आणि चंद्रा अशा दोन कन्या असून, त्यांतून शर्मिष्ठा यानें ययाति राजाकडे देवयानीसमागमें दिली होती ( देवयानी श० पहा ).

२–नरनारायणाश्रमीं राहणारा एक राजर्षि ( भार० वन० अ० १५६ ).

**वृषभ**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न कार्तवीर्यार्जुनाच्या प्रमुख पांच पुत्रांतील तिसरा.

२–रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० किंष्किं० स० ४१ ). हा मारुतिसमागमें सीताशुद्धीस गेला होता.

३–गोकुलांतील एक गोप ( भाग० १० स्कं० अ० १८ ).

४–भारती युद्धांत मरण पावलेला शकुनीच्या भ्रात्यांतील एक ( भार० भीष्म० अ० ९० ).

५–मगध देशाचा सीमापर्वत.

**वृषभध्वज**-प्रथमार्थक वृषध्वज शब्द पहा.

**वृषभा**-भारतवर्षीय नदी.

**वृषवाहन**-महादेव.

**वृषस्रा**-भारतवर्षीय नदी.

**वृषसेन**-कर्णाच्या पुत्रांतील एक. याचा अभिमन्यूनें पराभव केला होता ( भार० द्रोण० अ० ४३ ). यासच पुढें अर्जुनानें मारिलें ( भार० कर्ण० अ० ८५ ).

**वृषादर्भ-दर्भि**-वृषदर्भ श० पहा.

**वृषामित्र**-पांडवांसमागमें द्वैतवनांत असणार ऋषि.

**वृष्टि**-आठव्या सावर्णि मनूच्या पुत्रांत होणारा आहे एक पुत्र तो.

**वृष्टिनेमि**-अक्रूराच्या पुत्रांतील एक.

**वृष्टिमान्**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय कविरथ राजाचा पुत्र. याचा पुत्र सुषेण.

**वृष्णि**-( सो० वं० ) यदुपुत्र सहस्राजित्, तद्वंशीय कार्तवीर्य राजाचा पौत्र, मधुराजाच्या शत पुत्रांतील ज्येष्ठ.

२-(सो० वं०) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय सात्वत राजाच्या सात पुत्रांतील चवथा. यापासून माद्री स्त्रीच्या ठायीं सुमित्र आणि युधाजित् असे दोन पुत्र झाले होते.

३-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय सात्वतपुत्र भजमान राजा, त्याच्या ज्येष्ठ स्त्रीपासून झालेल्या तीन पुत्रांतील कनिष्ठ.

४-( सो० वं० ) यदुपुत्र कोष्टा, तद्वंशीय सात्वतपुत्र वृष्णि त्याच्या कुलांत जन्मलेल्या अनमित्र राजाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. याचा पुत्र चित्ररथ एक आणि दुसरा श्वफल्क.

५-एक ब्रह्मर्षि, वर्कु ऋषीचा पिता.

**वेंकट**-भारतवर्षीय सामान्य पर्वत.

**वेगदर्शी**-रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० युद्ध० स० ३० ).

**वेगवान्**-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न बंधुमान् राजाचा पुत्र. यास बंधु अशा नांवाचा पुत्र होता.

२-कश्यपापासून दनूस झालेल्या दानवांतील एक. हा शाल्व राजाचा पक्ष धरून कृष्णाशीं युद्ध करीत असतां सांबाच्या हातून मरण पावला.

३-कृष्णास सत्येपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**वेणा**-विंध्याचलापासून निघालेली नदी.

२-भोजकट पुराच्या दक्षिणेकडील नदी.

**वेणी**-भारतवर्षीय नदी.

**वेणीमाधव**-प्रयाग क्षेत्रांतील विष्णूची विभूति.

**वेणुदारि**-कर्णानें दिग्विजयकाळीं जिंकलेला एक राजा ( भार० वन० अ० २५४ ).

**वेणुमती**-पारियात्र पर्वतापासून निघालेली नदी.

**वेणुहय**-( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न यदुराजाचा पुत्र सहस्राजित् त्याचा पौत्र, व शतजित् राजाच्या तीन पुत्रांतील मध्यम.

**वेण्या**-भारतवर्षीय नदी.

**वेतसिका**-भारतवर्षीय तीर्थवि०.

**वेताल**-एक रुद्रगण, पिशाचांचा आधिपति.

**वेत्रवती**-पारियात्र पर्वतापासून निघालेली नदी.

**वेद**-ब्रह्मदेवाच्या मुखापासून निघालेली स्वतःप्रमाण वाणी. हिचे ऋक्, यजु, साम, अथर्वण. असे चार भेद कल्पिलेले आहेत ( भाग० ३ स्कं० अ० १२ ). या चहूंस क्रमानें आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद, आणि स्थापत्य, असे चार उपवेदहि आहेत. हे ब्रह्मलोकीं ( सत्यलोकीं ) निरंतर मूर्तिमान् असतात.

**श्लोक**-

कदाचिन्नारदो योगी परानुग्रहवांछया ॥
पर्यटन् सकलान् लोकान् सत्यलोकमुपागमत् ॥ २ ॥
तत्र दृष्ट्वा मूर्तिमद्भिश्छंदोभिः परिवेष्टितं ॥
बालार्कप्रभया सम्यक् भासयंतं सभागृहम् ॥ ३ ॥
मार्कंडेयादिमुनिभिः स्तूयमानं मुहुर्मुहुः ॥
सर्वार्थगोचरज्ञानं सरस्वत्या समन्वितम् ॥ ४ ॥
चतुर्मुखं जगन्नाथं भक्ताभीष्टफलप्रदम् ॥
प्रणम्य दंडवद्भक्त्या तुष्टाव मुनिपुंगवः ॥ ५ ॥
( ब्रह्मांड पु० उत्तरखंड अ० ६१ ).

२-३ भृगुकुलोत्पन्न एक ऋषि, धौम्य ऋषीचा शिष्य, याचा शिष्य उत्तंक ऋषि.

**वेदबाहु**-कृष्णाच्या पौत्रांतील एक.

**वेदवती**-वृषध्वज जनकाचा पुत्र रथध्वज त्यास धर्मध्वज आणि कुशध्वज असे पुत्र दोन असून, त्यांतून कुशध्वजास लक्ष्मीच्या अंशानें मालावती ना० स्त्रीपासून एक कन्या झाली. तिनें जन्मतांच वेदध्वनि केला होता म्हणून, तिला वेदवती हें नांव प्रसिद्ध होतें. कुशध्वजानें ही विष्णूस द्यावी असें मनांत आणून, जो कोणी हिला मागायास येई, त्यास नाहीं म्हणून सांगे. असें होतां होतां शंभु नांवाच्या कोणी असुरानें हिला कुशध्वजाजवळ मागितलें. परंतु कुशध्वजानें देत नाहीं म्हणतांच, त्यानें कुशध्वजास मारून पलायन केलें. त्यावरून पतीच्या देहासमागमें वेदवतीच्या मातेनें, वेदवतीचें कसें होईल ही चिंता न करितां सहगमन केलें.

पुढें वेदवतीनें पिता व माता मरण पावलीं असें पाहून, पुष्करतीर्थी गमन केलें, व तेथें तप आरंभिलें. या गोष्टीस वरेच दिवस लोटले असतां, आकाशवाणी झाली कीं, तूं पुढील जन्मीं विष्णूस पावशील. त्यावरून हिला संतोष होऊन, ही तेथून निघाली, ती गंधमादनावर येऊन राहिली. एकदां ही तेथें असतां, रावण फिरत फिरत हिच्या आश्रमांत आला. त्यास पाहून हिनें त्याचें आदरातिथ्य उत्तम प्रकारचें केलें. त्यावरून रावण हिला पुसूं लागला कीं, तूं कोण? व तप किमर्थ करित्येस? तेव्हां हिनें आपलें सर्व वृत्त त्यास सांगितल्यावर रावण म्हणाला, तूं मला वर. तें त्याचें भाषण हिनें अमान्य केल्यावरून रावण हिला बलात्कारानें ओढूं लागला. तेव्हां हिनें त्याचें स्तंभन करून त्यास शाप दिला कीं, तूं पुढें माझ्याच हरणानें पुत्रबांधवासहित नष्ट होशील. इतकें बोलतांच रावण तेथून निघून लंकेस गेला, व हिनें आपला देह योगाग्नीनें दग्ध केला. हीच दुसऱ्या जन्मीं सीता होऊन रामाची स्त्री झाली असतां, रावणानें हिचें हरण करून, नाश पावला ( वा० रा० उत्तर० स० १७ ). ( देवी भा० ९ स्कं० अ० १५–१६ ).

**वेदशिर**–भारतवर्षीय तीर्थ.

**वेदशिरा**–स्वायंभुव मन्वंतरांतील भृगु ऋषीचा पुत्र विधाता त्याचा पौत्र, व प्राण ऋषींचा पुत्र.

२–स्वारोचिष मन्वंतरांत होऊन गेलेल्या सप्तर्षींतील एक.

३–रैवत मन्वंतरांत जे सप्तर्षि होऊन गेले, त्यांतील एकाचें नामांतर.

४–कृशाश्व ऋषीस धिषणेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**वेदशेरक**–तृतीयार्थक वसिष्ठकुलोत्पन्न एक ऋषि.

**वेदश्रुती**–तमसा नदीच्या दक्षिणेस असणारी एक नदी.

**वेदस्मृती**–पारियात्र पर्वतापासून निघालेली नदी.

**वेदाश्वा**– ,, ,,

**वेदी**– ,, ,,

२–ब्रह्मदेवाची शक्ति ( भार० उद्योग० अ० ११७ ).

**वेधा**–ब्रह्मदेव.

**वेन**–चक्षुर्मनूचा प्रपौत्र, उल्मुक राजाचा पौत्र, अंगराजास सुनीथेपासून झालेला पुत्र. हा अति दुष्ट होता, म्हणून ब्राह्मणांनीं यास शापून मारिलें. पुढें याचा देह मंथन करून, ऋषींनीं पृथु आणि अर्चि असें मिथुन उत्पन्न केलें. तींच परस्पर स्त्रीपुरुषें झालीं. (२ पृथु श० पहा).

**वेनवाजस्रजाक्ष**–चालू मन्वंतरांतील होऊन गेलेला बेविसावा व्यास ( व्यास श० पहा० ).

**वैकंक**–मेरूच्या कर्णिकापर्वतांतील एक.

**वैकर्णिनि**–३ भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**वैकर्णेय**–२कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**वैकर्तन**–सूर्यमंत्रप्रभावानें जन्मल्यामुळें हें नांव कर्णास असे.

**वैकर्ता**–कार्तवीर्य राजाच्या पुत्रांतील एकाचें नामांतर.

**वैकुंठ**–रैवत मन्वंतरांत झालेला विष्णूचा अवतार. विष्णूस वैकुंठ म्हणण्याचें हेंच कारण असावें.

२–यानें निर्मिलेला लोक. हा सत्यलोकांतच अंतर्भूत समजावा.

**वैकुंठकल्प**–चालू ब्राह्ममासांतील बेविसावा दिवस ( ४ कल्प श० पहा ).

**वैकृतिगालव**–प्रथमार्थक विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**वैक्लव**–३ वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**वैखानस**–वानप्रस्थ आश्रमांत असून नांगरल्यावांचून भूमींत उत्पन्न होणाऱ्या धान्यावर जे निर्वाह करणारे ऋषि, त्यांस हें नांव साधारण आहे.

**वैगायन**–तृतीयार्थक भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**वैचित्रवीर्य**–धृतराष्ट्र, पंडु, आणि विदुर, त्यांस संज्ञा.

**वैजभृत**–३ भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**वैजयंत**–क्षीरसमुद्रांत असणारा एक पर्वत (भार० शांति० अ० ३५० श्लो० ९ ).

२–इंद्राच्या प्रासादाचें साधारण नांव.

३–निमि ना० राजाची नगरी. हिलाच पुढें मिथि जो याचा पुत्र त्याच्या नांवावरून मिथिला नांव पडलें.

४–तिमिध्वज राजाच्या नगरीचें नांव. ही नगरी दक्षिणेमध्यें दंडकाच्या देशांत होती.

**वैणव**–प्रथमार्थक विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**वैतरणी**–यमलोकसंबंधी नदी.

२–विंध्याचलापासून निघणारी नदी. ही कलिंगदेशांतून वाहात जाऊन पश्चिमसमुद्रास मिळते तीच असेल.

**वैत्रकीयवन**–एकचक्रा नगरी समीपचें वन. यांत बकासुर राहात असे.

**वैदर्भा**–भारतवर्षीय नदी.

**वैदर्भी**–विदर्भराजाच्या कन्यांस साधारण नांव. लोपामुद्रा, रुक्मिणी याविषयीं विशेष रूढि ( भार० उद्योग० अ० ११७ ).

**वैदिश**–शत्रुघाति राजाचें नगर(वा०रा०उत्तर०स०१०८).

**वैदूर्य**–मेरूच्या कर्णिका पर्वतांतील एक.

**वैदेह**–निमि राजाच्या वंशजांस नांव.

२–वैश्यापासून ब्राह्मणीच्या ठायीं झालेला पुत्र तो.

**वैदेहरात**-विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**वैदेही**-विदेह राजांच्या कन्यामात्र त्या. सीतेविषयीं विशेष प्रसिद्धि.

**वैद्यनाथ**-भरतखंडस्थ क्षेत्र.

**वैद्युत**-प्रथमार्थक हिमालयस्थ कैलासशिखराच्या वायव्येकडील शिखर.

२-भरतखंडाच्या दक्षिणभागीं असणारा एक पर्वत.

**वैधृता**-धर्मसावर्णि मन्वंतरांतील विष्णूच्या अवताराची माता.

**वैधृति**-तामसमन्वंतरांतील देवांची माता.

२-धर्मसावर्णिमन्वंतरांत स्वर्गामध्यें होणारा इंद्र.

**वैन्य**-३ भृगुकुलोत्पन्न ऋषि.

२-वेनकुलोत्पन्न राजर्षि ( ५ अत्रि श० पहा ).

**वैभ्राज**-कुमुदपर्वतावरील वनास नांव (भाग० ५ स्कं० अ० १६ ).

२-शरयू नदीच्या तिरींचें वन (मत्स्य० अ० १२०).

३-विभ्रांजराजाचा पुत्र जो नीप राजा तो.

**वैमृगय**-२ कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**वैयाघ्रपद्य**-व्याघ्रपादऋषिकुलोत्पन्न ब्राह्मणांस संज्ञा.

३-युधिष्ठिरानें विराटराजास, आपलें नांव कंक म्हणून जसें सांगितलें होतें, तसेंच हेंहि सांगितलें होतें ( भार० विराट० अ० ७ श्लोक १२ ).

**वैयासकि**-शुकाचार्य.

**वैरपरायण**-तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**वैरा**-भारतवर्षीय नदी.

**वैराज**-चाक्षुष मन्वंतरांतल्या विष्णूच्या अवताराचा पिता.

२-या नांवाचे पितरवि०. यांची मानस कन्या मेना, ती हिमवान् पर्वताची स्त्री.

**वैराजकल्प**-चालू कल्प सरल्यावर आरंभेल जो सत्तावीसावा कल्प तो ( ४ कल्प श० पहा ).

**वैराट**-विराटराजाचे पुत्र. परंतु उत्तराविषयीं विशेष रूढि.

**वैराटी**-विराटाची उत्तरा ना० कन्या ती.

**वैरोचन-चनि**-विरोचन दैत्याचा पुत्र जो बलि तो.

**वैलेय**-द्वितीय अत्रिकुलोत्पन्न ऋषि.

**वैवश**-द्वितीय कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**वैवस**-तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**वैवस्वत**-विवस्वान् आदित्याचे पुत्र जे श्राद्धदेव, यम, शनि, त्या तिघांसहि संज्ञा.

**वैवस्वतमनु**-विवस्वान् आदित्यास संज्ञेपासून झालेल्या दोन पुत्रांतील जो पृथिवीवर मनु झालेला श्राद्धदेव तो. हा पूर्व कल्पांतील सत्यव्रतराजा होय (१ सत्यव्रत श० पहा ).

यानें बदरीवनांत अयुत (दहा सहस्र) वर्षेपर्यंत तप केलें होतें ( भार० वन० अ० १८७ ). हा चाक्षुष मन्वंतर सरण्याच्या संधीसच उत्पन्न होऊन, तें सरतांच मनु झाला. म्हणून याच्या कालसत्तेस वैवस्वतमन्वंतर नांव चालत आहे. याची गणना मंत्रद्रष्ट्यांत असून, हा, सांप्रतचा आद्यस्मृतिकार आहे. यानें रचलेल्या स्मृतीस ' मनुस्मृति ' हें साधारण नांव चालत आहे. यास कांहीं कालपर्यंत संतति नव्हती म्हणून यानें वसिष्ठास इष्टि करायास सांगितली. त्यावरुन वसिष्ठानें मित्रावरुणेष्टीस ऋत्विजांकडून आरंभ करविला. त्यांत मनूची स्त्री श्रद्धा तिनें होत्याकडून ( यज्ञांतील पूर्वदिशेच्या ऋत्विजाकडून ) कन्या होण्याचा प्रैष उच्चारविला. त्यामुळें पुत्र न होतां मनूस इला नांवाची कन्या झाली. परंतु वसिष्ठानें मनूच्या प्रार्थनेवरुन तिला पुरुषत्व आणिलें, तोच इलराजा प्रख्यात होता ( इल श० पहा ).

नंतर वैवस्वत मनूनें आणखी पुत्र असावेत म्हणून, शतवर्षेपर्यंत यमुना जलांत उभें राहून तप केलें. त्या योगानें त्यास **इक्ष्वाकु, नृग, शर्याति, दिष्ट, धृष्ट, करूशक, नरिष्यंत, पृषध्र, नभग** आणि **कवि** असे दहा पुत्र झाले ( भाग० ९ स्कं० अ० १ ). नाभाग, आणि वसुमान्, असेहि यास दोन पुत्र आढळतात; परंतु हीं नांवें वरच्यांतील कोणास तरी असावींत असें दिसतें. मनूचे वर लिहिलेले पुत्र, मत्स्यपुराणांत अन्य नामांतरांनीं आढळतात जरी, तरी तीं नांवें वरच्यांचींच होत.

या मन्वंतरांत स्वर्गामध्यें वसु, रुद्र, आदित्य, विश्वेदेव, मरुद्गण, अश्विनीकुमार आणि ऋभु असे सप्तविध देव असून, त्यांचा स्वामी पुरंदर नांवाचा इंद्र आहे. मत्स्यपुराणांत ऋभु ना० देवांच्या स्थानीं साध्य देव सांगितले आहेत इतकेंच; परंतु सात संख्येंत फेर नाहीं ( मत्स्य० अ० ९ ). तसेच कश्यप, अत्रि, वसिष्ठ, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि आणि भरद्वाज, हे या मन्वंतरांतील सप्तर्षि असून कश्यपापासून, अदितीच्या ठायीं वामन नांवानें झालेला विष्णूचा अवतार, त्यानें या इंद्राचें बलीस पाताळीं घालणें एतद्रूप साह्य केलें ( भाग० ८ स्कं० अ० १३ ).

**वैशंपायन**-चालू मन्वंतरच्या प्रथम पर्यायांतील ( चौकडींतील ) द्वापरयुगांत स्वयंभू नांवाचा पहिला

व्यास झाला होता, त्याच्या चार शिष्यांतील संपूर्ण यजुर्वेद पढलेला शिष्य. हा याज्ञवल्क्यऋषीचा मातुल होता, व तो याचा भागिनेय ( बहिणीचा मुलगा, भाचा ) असून यजुर्वेदांतील एका प्रमुख शाखेचें अध्ययन करण्याच्या संबंधानें शिष्यहि होता. याज्ञवल्क्यापासून यानेंच वेद माघारा घेतला ( याज्ञवल्क्य श० पहा ).

२–चालू मन्वंतरांतील जो प्रस्तुत अठ्ठाविसावा पर्यय चालला आहे, यांतील द्वापरयुगांत झालेला कृष्णद्वैपायन नांवाचा अठ्ठाविसावा व्यास, त्याच्या चार शिष्यांतील दुसरा. हा, तैत्तिरिऋषीच्या कुळांतील होता म्हणून, तैत्तिरीय शाखाध्यायी असे. इतिहास सांगण्यांत याची चांगली प्रख्याति होती असें फारकरून दिसण्यांत येते.

**वैशाल**–वैशालिक श० पहा.

**वैशालि**–तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**वैशालिक**–सूर्यवंशीय विशालराजाच्या कुलांत उत्पन्न होऊन, विशालानगरींत राज्य करणारे सर्व राजे ते.

**वैश्य**–कौशिकऋषीचा शिष्य.

**वैश्रंभक**–देवांचें वनवि०.

**वैश्रवण**–स्वायंभुवमन्वंतरांतील पुलस्त्यपुत्र विश्रवाऋषीचा पुत्र. याची आकृति भयंकर आहे म्हणून यास कुबेर असें म्हणतात; परंतु याचें मुख्य नांव सोम असें होय. याच्या स्त्रीचें नांव ऋद्धि असून, हा कल्पारंभापासून उत्तरदिग्पाल असल्यामुळें तिला सौम्या असें नांव पडलेलें अजून चालत आहे. हा संपूर्ण यक्षांचा आधिपति व देवांचा धनाध्यक्ष आहे. याचें उत्तानपादपुत्र ध्रुवाशीं त्याच्या सापत्न भ्रात्यानिमित्त मोठें युद्ध झालें होतें. याची सभा मोठी वर्णनीय असून, तींत नारदादिक महान् महान् ऋषि सतत असतात. नलकूबर ते याचेच पुत्र होत. हा उत्तरदिशेचा दिग्पाल अजून आहे तसाच असल्याचें, नारदयुधिष्ठिरसंवादावरून दिसतें, आणि त्यावरूनच याला राजराज असें नांव असेल. हेमकूटपर्वताच्या कैलासशिखरावर, याचें कधीं कधीं राहणें होत असतें. परंतु याची मुख्य नगरी मानसोत्तर पर्वतावरील विभावरी ना० ती होय.

२–चालू मन्वंतरांतील पुलस्त्यपुत्र विश्रवा ऋषि, त्यास भरद्वाजकन्या देववर्णिनी तिच्या ठायीं झालेला पुत्र. यास रुद्रप्रसादेंकरून राहण्यास प्रथमतः लंकानगरी मिळाली होती. तसेंच स्वेच्छागामी पुष्पक विमानहि मिळालें होतें. हा, रावण, कुंभकर्ण आणि बिभीषण, इ० कांचा सापत्न भ्राता असे म्हणून, ते राक्षसाधिपति असल्यानें यास यक्षाधिपति म्हटलें आहे, आणि त्यामुळेंच यास कुबेर म्हणत असतीलसें वाटतें. अध्यात्मरामायणांत हा धनेश वर्णिला आहे; परंतु तें संभवत नाहीं. असो. पुढें रावण बलाढ्य होऊन तो लंकेत राहूं लागल्यावर, हा प्रथमार्थक हिमालयाच्या कैलास ना० शिखरावर अलका नगरी वसवून राहूं लागला. याचा मंत्री प्रहास नांवाचा असून गौं, पुष्कर, शुक्र, प्रौष्ठपद, माणिभद्र, पूर्णभद्र, मणिमान्, मणिकंधर, मणिभूष, इ० अनेक अनुचर आहेत (वा० रा० उत्तर० स० १५ आणि २३ ). ( देवीभा० द्वादश० अ० १० ). ( भार० वन० अ० २७४ ).

**वैश्वानर**–शांडिल्यगोत्रोत्पन्न एक ऋषि. प्राणिमात्रांच्या शरीरांत राहून अन्न पचन करणारा, व ज्याच्या योगानें वैश्वदेवसंबंधीं अन्न देवांस प्राप्त होतें, त्या अग्नीचें देवतात्व यास असावेंसें वाटतें, आणि त्यावरून यास शांडिल्यगोत्रीय म्हणतात असें दिसतें.

२–एक दानव. यास उपदानवी, हयशीरा, पुलोमा व कालका, अशा चार कन्या होत्या.

**वैश्वानरि**–एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**वैष्णवी**–विष्णूची शक्ति, व सप्त मातृकांतील एक.

**वहायसी**–भारतवर्षीय नदी.

**वैहार**–मगध देशाच्या सीमापर्वतांतील एक.

**वैहीनरी**–तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**वोहलि**–एक ऋषि ( देवीभा० ११ स्कं० अ० २० )

**वौलि**–तृतीय वासिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**वौषढि** तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**व्यधाद्य**–तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**व्यग्रश्व**–एक राजर्षि.

**व्यश्व**– ”

**व्यंस**–द्वितीय सैंहिकेयांतील एक.

**व्याघ्र**–एक यक्ष ( १ नभस्य श० पहा ).

**व्याघ्रकेतु**–कर्णानें मारिलेला भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ५६ ).

**व्याघ्रदत्त**–द्रोणाचार्यानें मारिलेला पांडवपक्षीय पांचाल ( भार० उद्योग० अ० १७१ ).

२–भारती युद्धांतील मगधदेशीय राजपुत्र. हा दुर्योधनपक्षाकडे असून, यास सात्यकीनें मारिलें ( भार० द्रोण० अ० १०७ ).

**व्याघ्रपाद**–वासिष्ठकुलोत्पन्न ऋषि. याचे पुत्र उपमन्यु

आणि धौम्य ( भार० अनु० अ० १४ श्लोक ११२ ).

**व्यान**–शरीरांतल्या पंच प्राणांतील एक.

**व्यास**–मागील साहा मन्वंतरांत कशी स्थिति असेल ती असो. परंतु चालू मन्वंतरांत प्रत्येक पर्ययाच्या (चौकडीच्या ) द्वापरयुगांत एक एक व्यास झालेला आहे.

श्लोक.

द्वापरे प्रथमे व्यस्ताः स्वयं वेदाः स्वयंभुवा ॥
प्रजापतिर्द्वितीये तु द्वापरे व्यासकार्यकृत् ॥ २६ ॥
तृतीये चोशना व्यासश्चतुर्थे तु बृहस्पतिः ॥
पंचमे सविता व्यासः षष्ठो मृत्युस्तु द्वापरे ॥ २७ ॥
मघवा सप्तमे प्राप्ते वासिष्ठश्चाष्टमे स्मृतः ॥
सारस्वतश्च नवमे त्रिधामा दशमे तथा ॥ २८ ॥
एकादशे च त्रिवृषो भारद्वाजस्ततः परे ॥
त्रयोदशे चांतरिक्षो धर्माचापि चतुर्दशे ॥ २९ ॥
त्र्यय्यारुणः पंचदशे षोडशे तु धनंजयः ॥
मेधातिथिः सप्तदशे व्रती ह्यष्टादशे तथा ॥ ३० ॥
अत्रिरेकोनविंशेथ गौतमस्तु ततः परे ॥
उत्तमाश्चैकविंशेथ हर्यात्मा यश्च कीर्तितः ॥ ३१ ॥
वेनो वाजस्रवाजक्षस्तु सोमो न्यूपायणस्तथा ॥
तृणबिंदुस्तथा व्यासो भार्गवस्तु ततः परे ॥ ३२ ॥
ततः शक्तिर्जातुकर्णो कृष्णद्वैपायनस्ततः ॥
अष्टाविंशतिसंख्येयं कथिता या मया श्रुता ॥ ३३ ॥

( देवीभा० १ स्कं० अ० ४ ) म्हणजे पहिला व्यास स्वयंभू, २ प्रजापति, ३ उशना, ४ बृहस्पति, ५ सविता, ६ मृत्यु, ७ मघवा, ८ वसिष्ठ, ९ सारस्वत, १० त्रिधामा, ११ त्रिवृष, १२ भारद्वाज, १३ अंतरिक्ष, १४ धर्मा, १५ त्र्यय्यारुण, १६ धनंजय, १७ मेधातिथि, १८ व्रती, १९ अत्रि, २० गौतम, २१ हर्यात्मा–नामांतरानें प्रसिद्ध उत्तमा, २२ वेनवाजस्रजाक्ष २३ सोमन्यूषायण, २४ तृणबिंदु. २५ भार्गव, २६ शक्ति, २७ जातुकर्ण आणि २८ प्रस्तुतचा कृष्णद्वैपायन ( पराशराचा पुत्र ). आतां यापुढें "एकोनत्रिंशे संप्राप्ते द्रौणिर्व्यासो भविष्यति" ॥ २३ ॥ ( देवीभा० १ स्कं० अ० ४ ). या वचनाप्रमाणें द्रौणि अशा नांवानें द्रोणाचार्यांचा पुत्र अश्वत्थामा तो एकुणतिसाव्या पर्ययांत व्यास होईल. व्यास शब्दाचा अर्थ वेदविस्तार करणारा असा समजावा. यांनीं वेदांची झालेली अव्यवस्था व्यवस्थित करावी, हेंच यांचें काम आहे.

**व्युषिताश्व**–सोमवंशीय एक राजा. यास भद्रा नांवाची स्त्री असून, शाल्व, मद्र, इ० सात पुत्र होते.

**व्युष्ट**–उत्तानपादवंशीय पुष्पार्णास, दोषेपासून झालेल्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. यास पुष्करिणीपासून सर्वतेजस नांवाचा पुत्र झाला होता.

**व्यूक**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**व्यूढोर**–धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक.

**व्योम**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तदन्त्रयसंभूत ज्यामघकुलोत्पन्न क्रथवंशांत जन्मलेल्या दशार्ह राजाचा पुत्र. यास दाशार्ह असेंहि म्हटलेलें असून, पुत्र जीमूत नांवाचा होता.

२–व्योमासुर शब्द पहा.

**व्योमासुर**–मयासुराच्या वंशांतील एक असुर. यास कृष्णानें मारिलें होतें ( भाग० १० स्कं० अ० ३७ ).

**व्रज**–मथुरा नगरीसमीप असणारें गोपालाधिपति नंदाचें खर्वट ( खेडें ). ( भाग० १० स्कं० अ० ११ ).

**व्रती**–चालू मन्वंतरांत होऊन गेलेला अठरावा व्यास ( व्यास श० पहा ).

**व्रतेयु**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्व राजाच्या दहा पुत्रांतील नववा.

---

## श

**शक**–भारतवर्षीय देश व त्यांतील लोक. इंद्रप्रस्थ मध्य धरून, याचे पूर्व आणि पश्चिम दिशाभेदानें दोन भेद आहेत. ते त्या त्या अक्षरक्रमांत पहावे.

**शकटासुर**–कंसाचा अनुचर एक राक्षस. हा शकटाचें ( गाड्याचें ) रूप धारण करून कृष्णास मारण्यास आला होता, परंतु कृष्णानेंच यास मारिलें ( भाग० १० स्कं० अ० १२ ).

**शंकर**–कल्याण करणारा म्हणून हें नांव शिवास आहे.

२–एकादश रुद्रांतील ईश्वर ना० जो रुद्र त्यास नांव.

**शंकु**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न उग्रसेनाच्या ९ पुत्रांतील पांचवा.

२–या नांवाचा एक यादव.

३–कृष्णास सत्येपासून झालेल्या दहा पुत्रांतील एक.

**शंकुकर्ण**–शिवाच्या पार्षद गणांतील एक.

२–काशींतील एक स्थानवि०.

३–रावणाची अशोकवनिका संरक्षण करणारा एक राक्षस ( वा० रा० सुंदर स० १८ ).

**शंकुकर्णेश्वर**–भारतवर्षीय तीर्थ.

**शकुंत**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**शकुंतला**–विश्वामित्रास मेनका अप्सरेपासून झालेली

कन्या. हिला मेनकेनें मालिनी नदीच्या तीरीं सोडून देऊन स्वर्गास गमन केल्यावर, तेथें समीपच कण्व ऋषि राहत असे, त्यानें हिला पाहिलें. नंतर आश्रमीं आणून ममतेनें तिचें पालन केलें. यापूर्वी कण्व हिला घेऊन येईपर्यंत हिचें रक्षण शकुंतांनीं ( पक्ष्यांनीं ) केलेलें कण्वानें पाहिल्यावरून त्यानें त्या कारणास्तव हिचें नांव शकुंतला ठेविलें. पुढें ती हळू हळू मोठी होत चालली, व अप्सरेची कन्या असल्यामुळें सुरूपही दिसूं लागली.

एकदां कण्व नदीतीरीं नित्यानुष्ठानास गेला असतां सोमवंशीय पुरुकुलोत्पन्न दुष्यंत राजा मृगया करीत करीत येथें प्राप्त झाला. परंतु आश्रमांत कोणी दिसेना म्हणून बाहेर उभा राहून आंत कोण आहे म्हणून हांका मारूं लागला. त्या ऐकून ही बाहेर आली, व त्याच्या ऐश्वर्यावरून हा कोणी तरी राजा आहे, असें जाणून, त्याचें मोठ्या नम्रतेनें हिनें आदरातिथ्य केलें. त्यावरून दुष्यंत संतुष्ट होऊन, व हिच्या रूपानेंहि मोह पावून, जलप्राशन करून तिजला पुसूं लागला कीं, तूं कन्या कोणाची आहेस ? हिनें हळूच व मर्यादेनें उत्तर केलें, मी कण्व ऋषींची कन्या आहे. तेव्हां दुष्यंत मनांत म्हणूं लागला, कण्व तर ब्रह्मचारी असल्याचें मला विदित आहे, आणि माझें मन तर हिजवर गेलें आहे, तेव्हां ही त्याची प्रत्यक्ष कन्या नसून, क्षत्रियाचीच असावी. म्हणून हिला पुनः विचारूं लागला कीं, खरेंच सांग, तूं कन्या कोणाची ? त्यावरून हिनें आपल्या उत्पत्तीची कथा कण्वानें कोण्या ऋषीस सांगितलेली जशी ऐकिली होती तशीच दुष्यंतास सांगितली. ती ऐकून त्यास अतिशय हर्ष झाला; कारण त्याचें मन तिजविषयीं लुब्ध झालें होतें.

नंतर दुष्यंत हिला म्हणूं लागला, माझ्या मनांतून तुशीं पाणिग्रहण करावें असें आहे, तेव्हां तुझें मानस कसें आहे तें सांग. हिनें उत्तर केलें, आपण म्हणतां तें मला मान्य आहे; परंतु माझी याचना आपण कण्वाजवळ करावी, म्हणजे बरें पडेल. हें म्हणणें राजा अतिशय कामातुर झाला होता म्हणून ऐकेना. तेव्हां हिनें तुजपासून जो मला पुत्र होईल तो राज्याधिकारी झाला पाहिजे, असें त्याजकडून मान्य करवून त्याशीं गांधर्वविधीनें अनुसरण केलें. पुढें उभयतांचा समागम झाला, व हिला राजापासून गर्भ राहिला. नंतर दुष्यंत नगराकडे जावयास निघाला असतां, त्यानें हिला असें वचन दिलें कीं, मी तुला अल्पच काळानें शिबिका पाठवून हस्तिनापुरास घेऊन जाईन. इतकें बोलून तो स्वनगरास गेला.

राजा निघून गेल्यावर थोडक्याच वेळानें कण्वऋषि आश्रमीं आला असतां, शकुंतलेस त्याच्यापुढें येण्यास लज्जा वाटूं लागली; परंतु कण्वानें अंतर्दृष्टीनें तें तिचें, व राजाचें वृत्त जाणून अभयप्रदानपूर्वक शकुंतलेस म्हटलें, वत्से, भय पावूं नको, मला जी काळजी तुला कोठें द्यावी म्हणून होती, ती अनायासानें दूर झाली. तेणेंकरून मला आनंद झाला आहे. याप्रमाणें भाषण ऐकून ही निर्भय होत्साती त्यापुढें आली. पुढें पूर्ण मासांतीं शकुंतला प्रसूत होऊन दिव्य पुत्रास प्रसवली. तो पुत्र पित्याप्रमाणेंच शूर व चपल होऊन जसजसा वाढत चालला, तसतसा व्याघ्रादिक श्वापदांस धरून आणून आश्रमांत बांधून ठेवूं लागला. त्यावरून कण्वानें त्याचें नांव भरत असें पहिलें असतांही सर्वदमन असें ठेविलें, व आतां त्यास येथें ठेवूं नये असें मनांत आणून, त्यासहवर्तमान शकुंतलेस आपले शिष्य समागमें देऊन हस्तिनापुरास दुष्यंतराजाकडे पोहोंचतें करविलें.

शकुंतला पुत्रास घेऊन हस्तिनापुरास गेली असतां, राजा सभेंत होता म्हणून कण्वाच्या शिष्यांनीं तेथेंच तिला नेलें, व राजास ही तुझी स्त्री व पुत्र संभाळ असें सांगून ते माघारे परतले. कण्वाचे शिष्य जातांच शकुंतलेनें राजास वंदन केलें, आणि म्हणाली, तूं वचन दिल्याप्रमाणें ह्या तुझ्या पुत्रास मी घेऊन आल्यें आहें, तर मजसहित याचा अंगीकार कर. हें तिचें भाषण ऐकून जरी दुष्यंत राजानें तिला ओळखिलें, तरी बळानेंच तूं कोण व पुत्र कोणाचा येथें आणिलास, असें बाह्यात्कारी लोकलज्जेस्तव बोलूं लागला. त्यावरून शकुंतला क्रोधाविष्ट होऊन, मर्यादेनेंच तिनें राजास बहुत विनविलें; परंतु दुष्यंत राजा तें तिचें बोलणें कांहीं मनासच आणीना. म्हणून शकुंतला खेदयुक्त होऊन पुढें काय करावें असा विचार करीत आहे तों आकाशवाणी झाली कीं, राजा, तूं शकुंतला जी तुझी स्त्री, व तुजपासून झालेला हा पुत्र या उभयतांचें ग्रहण कर. त्यावरून राजानें पुत्रासहित हिचा अंगिकार केला, व सभासदांस म्हणूं लागला, जरी मी हिला ओळखिलें होतें, तरी अपरिचित स्त्रीचा मी अंगिकार केला, असा आपण मजवर अपवाद ठेवाल म्हणून मीं असें केलें. आतां हिचा मी अंगिकार करितों, असें

म्हणून त्यानें हिला पुत्रासहित अंगिकारून अंतःपुरांत नेलें व पुत्र जो भरत त्याचे उपनयनादिक संस्कार करून थोड्याच काळानें तो राजकार्यदक्ष इ० गुणांनीं युक्त पाहून त्यास दुष्यंतानें यौवराज्याभिषेक केला ( भार० आदि० अ० ६९-७५ ).

**शकुनि**—दनुपुत्र दानवांतील एक. याचा पुत्र वृकासुर ( भाग० १० स्कं० अ० ८८ ).

२-हिरण्याक्षाच्या चार पुत्रांतील दुसरा.

३-( सो० वं० ) यदुपुत्र कोष्टा, तद्वंशीय ज्यामघकुलोत्पन्न दशरथराजाचा पुत्र. याचा पुत्र करंभिराजा.

४-गांधारदेशाधिपति सुबलराजाचा पुत्र, गांधारीचा भ्राता. हा धृतराष्ट्राचा शालक व दुर्योधनादिक कौरवांचा मातुल होय. सुबलराजाच्या मागें हाच राज्याधिकारी झाला असे. हा स्वभावानें पराकाष्ठेचा दुष्ट असून, कपटद्यूत खेळण्यांत मोठा प्रवीण होता. यानें पांडवांची संपत्ति द्यूताच्या बळानें हरण करून दुर्योधनास मिळवून देऊन, त्यांस अरण्यांत घालविलें. हा भारती युद्धांत दुर्योधनाकडे होता, व सहदेवाच्या हातून मृत्यु पावला ( भार० शल्य० अ० २८ ).

**शंकुरोमा**—कद्रूच्या नागपुत्रांतील एक.

**शंकुशिरा**—वृत्रासुराचा अनुयायी एक असुर

**शंकुशिरोधर**—दनुपुत्र दानवांतील एक.

**शक्ति**—तृतीय वसिष्ठऋषीचा ज्येष्ठ पुत्र. हा वसिष्ठकुलांतील मंत्रद्रष्टा असे. कल्माषपाद राजानें वसिष्ठाचे शंभर पुत्र भक्षिले, त्यांत हा मरण पावला होता. यास अदृश्यंति नांवाची स्त्री असून, हा मरण पावला त्या वेळेस ती गर्भिणी होती. तीच प्रसूत होऊन पुढें पराशर ना० पुत्रास प्रसवली. चालू मन्वंतरांत सव्विसावा जो व्यास झाला होता तो हाच असें म्हणतां येत नाहीं; कारण चोविसाव्या पर्ययांत दाशरथि राम झाला, त्याच्या पूर्वीचा कल्माषपादराजा म्हणून हा पूर्वीच मरण पावला होता.

२-चालू मन्वंतरांतलि सव्विसावा व्यास ( व्यास० श० पहा ). हा अंगिराऋषिकुलांत जन्मला होता.

**शक्र**—इंद्राचें नांव; परंतु द्वादशादित्यांतील पूर्वदिग्पाल जो प्रस्तुतचा आदित्य तो. यास पौलोमी ना. असुरकन्या स्त्री असून, तिच्याठायीं झालेले जयंत, ऋषभ, आणि मीढुष असे तीन पुत्र होते. हा शक्रदेवांमध्यें असून, पुरंदर इंद्र याचा स्वामी आहे असें समजावें ( भाग० ६ स्कं० अ० १८ ).

**शक्रजित्**—रावणपुत्र इंद्रजित् याचें ना.

२-शोणाश्व ना० राजर्षीचा पुत्र.

**शक्रदेव**—कलिंगदेशाधिपति भानुमंत राजाचा पुत्र. यास भारती युद्धांत भीमानें मारिलें ( भार० भीष्म० अ० ५४ ).

**शक्रप्रस्थ**—इंद्रप्रस्थासच नांव.

**शंख**—उत्तम ना० तिसऱ्या मन्वंतरांतल्या सप्तर्षीतील एक. हा लिखित ऋषीचा भ्राता समजूं नये. निराळाच होय.

२-दनुपुत्र दानवांतील एक.

३-वरुणलोकांतील एक असुर.

४-कुबेराच्या नऊ निधींतील एक.

५-लिखित ऋषीचा भ्राता ( शंखलिखित श० पहा ).

६-मेरूच्या कर्णिका पर्वतांतलि एक.

७-पूर्वमत्स्याधिपति विराटराजा, त्याच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ ( भार० विराट० अ० ३१ ). हा युद्धामध्यें पांडवांकडे होता, व द्रोणाचार्यांच्या हातून मरण पावला.

**शंखचूड**—रामसेनेंतलि एक वानर ( वा० रा० उत्तर० स० ४० ).

२-विप्रचित्ति दानवाचा पौत्र व दंभासुराचा पुत्र. यानें जैगीषव्य ऋषीपासून विष्णुमंत्र ग्रहण करून, पुष्करतीर्थी अनुष्ठान केलें, व तें पूर्ण झाल्यावर ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें बदरीवनांत तप करणाऱ्या तुलसीकडे गेला. ही तुलसी, धर्मध्वजराजास माधवी भार्येपासून झालेली कन्या होती. ही विष्णूच्या प्राप्तीसाठीं तप करीत असतां, हा जेव्हां तिजकडे गेला, तेव्हां तिचा याशींच विवाह झाला. पुढें शंखचूडानें आपल्या तपोबलानें सर्वांचे अधिकार आपण घेऊन राज्य केलें; परंतु देवांचे अधिकार गेल्यामुळें त्यांनीं याशीं युद्ध चालविलें; त्यांत याचा पराभव होईना. तेव्हां विष्णूनें याचें रूप धारण करून तुलसीकडे गमन केलें, व तिला मी देवांचा पराभव करून आलों असें सांगून तिचें पातिव्रत्य नष्ट केलें. त्या दोषानें तत्काळ रणांत हा मरण पावला. हें कपट तुळसीस कळतांच जरी तिला विष्णूची प्रीति होती, तरी तिनें त्यास तूं शिलारूप होशील असा शाप दिला. ही कथा फार लांबट असून तींत विशेष तात्पर्य नसल्यामुळें येथें घेतली नाहीं ( देवीभा० ९ स्कं० अ० १७-२५ ).

३-कुबेराचा एक अनुचर. हा शापानें राक्षसयोनि पावला असून वृंदावनांत गेला असतां, कित्येक गोपींचें हरण. केल्यावरून कृष्णानें यास मारिलें होतें ( भाग० १० स्कं० अ० ३४ ).

**शंखपद**–दुसऱ्या स्वारोचिषमनूचा पुत्र ( भार० शांति० अ० ३४८ श्लो० ३७ ). स्वारोचिष मनूनें यास स्वतः विद्या पढविली होती. हा मनुष्यजातीय चार दिग्पाल भूमीवर आहेत, त्यांतील दक्षिण दिग्पाल आहे.

**शंखपाल**–कद्रूस झालेल्या नागांतील एक.

**शंखमेखल**–एक ब्रह्मर्षि.

**शंखलिखित**–शंख आणि लिखित हे दोघे ऋषि परस्पर भ्राते होते. हे उभयतांहि बाहुदानदीच्या तीरीं वेगळाले आश्रम करून राहात असत. एकदां लिखितऋषि, आपल्या ज्येष्ठ भ्रात्याच्या दर्शनानिमित्त निघाला व आरामांतून त्याच्या गृहांत प्रवेशला. परंतु चालतां चालतां आरामांतून त्यानें कांहीं पक्क फळें तोडिलेलीं हातांत असून, दर्शन झाल्यावर शंख भ्रात्याशीं कांहीं गोष्टी सांगत बसला आहे इतक्यांत, शंखाची दृष्टि फळांवर जाऊन त्यानें लिखितास पुसलें, हीं फळें तूं कोठून आणिलीस ? लिखितानें तुझ्या आरामांतील, म्हणून उत्तर देतांच, शंखऋषि म्हणाला, मला न पुसतां हीं फळें तूं घेतलीस, यास्तव तुला चौर्य घडलें आहे. तर तूं सुद्युम्न राजाकडे जा, आणि या अपराधाचें शासन आपणास करून घे. त्यावरून लिखित तथास्तु म्हणून राजाकडे गेला, व त्यास आपण केलेलें कर्म सांगून म्हणाला कीं, याची मला शिक्षा दे. राजानें उत्तर केलें, तुम्ही तुमचा अपराध स्वमुखानें मजकडे येऊन मला कळविलात, यास्तव तुम्ही आतां दोषरहित आहां; परंतु हें म्हणणें लिखित ऐकेना. त्यावरून राजानें त्याचे दोनही हस्त तोडविले. मग लिखितऋषि लागलाच तसाच निघून भ्रात्याकडे आला, व हात दाखवून म्हणाला, मी राजाकडून आपणास शासन करून घेऊन तुजकडे दाखविण्यास आलों आहें. शंख संतुष्ट होऊन म्हणाला, चांगलें केलेंस, तर आतां बाहुदेंत स्नान करून सत्वर परत ये. असें म्हणतांच, लिखितऋषि स्नानास गेला, व स्नानसमयीं तर्पण करावें लागतें, त्यासाठीं हात पाहूं लागला, तों ते पूर्ववत् झाले. हें वर्तमान सुद्युम्न राजास कळल्यावर, आपण ब्राह्मणास शिक्षा दिल्याचा जो खेद त्यास झाला होता, तो जाऊन आनंद झाला. तसाच शंखऋषीसहि आनंद होऊन, त्यानें लिखितास जाण्याची आज्ञा देतांच लिखित निघून स्वाश्रमास आला ( भार० शांति० अ० २३ ).

**शंखिनीतीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ.

**शंखोद्धार**–भारतवर्षीय क्षेत्र, व द्वारकेसमीप असणारें तीर्थ.

**शची**–सांप्रतच्या पुरंदर इंद्राची स्त्री. सांप्रतचा पूर्वदिग्पाल शक्र, त्याची ही स्त्री, हा पाठ अगदीं चुकीचा आहे.

**शठ**–दनुपुत्र दानवांतील एक.

२–रावणाच्या अनुचर राक्षसांतील एक.

३–एक यादव ( जैमि० अश्व० अ० १० ).

**शंडामर्क**–शंड आणि अमर्क असे हे उभय भ्राते. हे वारुणिकवीचे पौत्र, व उशनाऋषीचे पुत्र होत. हे उभयतां हिरण्यकशिपूच्या वेळेस, पिता तपार्थ गेल्यामुळें पौरोहित्य करीत होते, आणि त्यामुळेंच प्ऱ्हादास विद्या शिकविण्याचें काम यांजकडेस होतें ( मत्स्य० अ० ३३ श्लो० ८ ). ( भाग० ७ स्कं० अ० ५ ).

**शांडिल**–द्वितीय कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**शतकुंभा**–भारतवर्षीय नदी.

**शतकेसर**–शाकद्वीपांतील पर्वत.

**शतक्रतु**–कोणत्याहि इंद्रास, एकाप्रकारचे शंभर यज्ञ करून ती पदवी मिळविल्यामुळें नांव.

**शतगामि**–जटायूच्या पांच पुत्रांतील एक.

**शतचंद्र**–रात्रियुद्धांत भीमानें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० १५७ ).

**शतजित्**–ऋषभदेववंशीय विरजराजास विषूचीपासून झालेल्या शतपुत्रांतील ज्येष्ठ.

२–आश्विनमासींचा यक्ष ( ३ इष० श० पहा ).

३–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न यदुराजाचा पौत्र, सहस्रजित् राजाचा पुत्र. यास महाहय, वेणुहय, आणि हैहय असे तीन पुत्र होते.

४–कृष्णास जांबवतीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**शतज्योति**–चंद्रास संज्ञा.

**शततारका**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

**शतद्युम्न**–चक्षुर्मनूच्या पुत्रांतील एक.

२–( विदे० वं० ) भानुमान राजाचा पुत्र. याचा पुत्र शुचि ना० जनक.

३–एक राजर्षि. हा कोणत्या वंशांतील होता तें कळत नाहीं. परंतु मोठा दानशूर असे ( भार० शांति० अ० २३५ ). हा मौद्गल्यऋषीच्या प्रसादानें स्वर्गास गेला असे ( भार० अनुशा० अ० १३७ श्लोक २१ ).

**शतद्रु**–हैमवती नदीस पडलेलें नांव (३ वसिष्ठ श०पहा).

**शतद्रुति**–प्राचीन बर्हिराजाची सवर्णा ना० जी स्त्री तीच. हा प्रचेत्यांची माता.



**शतधनु**–तृतीयार्थक शतधन्वा तो.

**शतधन्वा**–शिवास नांव आहे.
२–एक राजर्षि ( भार० शांति० अ० ४ ).
३–( सो० वं० ( यदुकुलोत्पन्न हृदिक यादवाच्या पांच पुत्रांतील एक. कृतवर्मा इ० कांचा भ्राता.
४–कृष्णानें मारिलेला एक यादव ( स्यमंतकमणि श० पहा ).
५–सुमतीचा पुत्र ( हंसध्वज श० पहा ).

**शतधृति**–ब्रह्मदेवास नांव.

**शंतनु**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय कुरुपुत्र जन्हुराजा, तदन्वयसंभूत प्रतीप राजाच्या तीन पुत्रांतील मध्यम. हा पूर्वजन्मींचा महाभीष राजा होय. याचा पिता प्रतीपराजा मरण पावल्यावर, याचा ज्येष्ठ भ्राता देवापि राज्य करूं लागला; परंतु तो कुष्ठि(अंगावर कोड असलेला) असा होता म्हणून, प्रजांनीं त्यास राज्यावरून काढून शंतनूस राजा केलें ( १ देवापि० श० पहा ). पुढें शंतनु राज्य करूं लागला असतां, एके काळीं मृगयेनिमित्त अरण्यांत गेला होता, व तथें त्यानें एक सुंदर कन्या पाहिली ( ती गंगा होय ) व तिनें यास वरिलें. तिजपासून यास झालेले सात पुत्र ते तिनें पाण्यांत बुडविल्यावर आठवा भीष्म झाला, तो यानें बुडवूं दिला नाहीं, त्यामुळें ती पुत्रासहित अंतर्धान पावली. कांहीं काळानें तिनें भीष्मास सर्व विद्यांत निपुण करून याजवळ आणून देऊन स्वर्गी गमन केल्यावर, भीष्मास यानें यौवराज्य दिलें व सत्यवती नांवाची दुसरी स्त्री आपणास केली. पुढें तिजपासून यास चित्रांगद, आणि विचित्रवीर्य असे दोन पुत्र झाले. नंतर थोड्याच काळानें हा स्वर्गवासी झाला. शंतनु हा बहुतेक गुणांनीं चांगला होता, तरी त्याच्या अंगांत वर्णनीय गुण हा होता कीं, यानें ज्याच्या तनूस ( शरीरास ) हात लावावा, तो तत्काळ रोगी असला तरी निरोगी व्हावा; कारण ( शं ) म्हणजे कल्याण असा अर्थ आहे ( भार० आदि० अ० ९८–९९ ).

**शतपर्वा**–शुक्राचार्याची स्त्री.

**शतबल**–रामसेनेंतील एक, अनेक वानराधिपति ( वा० रा० किष्किं० स० ४३ ).

**शतबला**–भारतवर्षीय नदी.

**शतबली**–शतबल वानर तोच.

**शतमुख**–एक असुर ( भार० अनुशा० अ० १४ श्लो० ८६ ).

**शतयात**–भारतवर्षीय नदी.

**शतयूप**–केकयदेशीय राजा. यानें वृद्धपणीं आपल्या पुत्रास राज्य देऊन, वानप्रस्थधर्म आचरण्यासाठीं हिमालयावर गमन केलें, व हा तेथें राहात असतां धृतराष्ट्र तोहि गांधारीसहित तेथें गेला. त्यावेळीं, हा तेथें असून याचा त्याचा सहवास पुष्कळ दिवस होता ( भार० आश्रम० अ० १९ ).

**शतरथ**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न मूलकराजाचा पौत्र. दशरथाचा पुत्र. यास इलविल किंवा इडविड म्हणत असत. म्हणून यास जो पुत्र होता, त्यास ऐलविल किंवा ऐडविड म्हटलेलें आहे ( भार० द्रोण० अ० ६१ ).

**शतरुद्रा**–भारतवर्षीय नदी.

**शतरूप**–स्वायंभूमनूस संज्ञा.

**शतरूपा**–स्वायंभूमनूची स्त्री. ही ब्रह्मदेवाच्या वामांगापासून झाली होती. हिला सरस्वती असेंहि म्हटलेलें आहे.

**शतर्चन**–एक ब्रह्मर्षि.

**शतशीर्षा**–वासुकि नागाची स्त्री.

**शतशृंग**–शाल्मलि द्वीपांतील पर्वत.
२–पांडवांचें जन्मस्थान, हिमालयाचें शिखरवि०.

**शतह्रद**–दनूपासून झालेल्या दानवांतील एक.

**शतह्रदा**–जव ना० राक्षसाची स्त्री. विराध राक्षसाची माता.

**शताजित्**–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय सात्वतपुत्र भजमान् राजा, त्यास बाह्यकेपासून झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.

**शतानंद**–प्रथमार्थक गौतम ऋषीस अहल्येपासून झालेला पुत्र. हा विदेहवंशीय जनकसंज्ञक राजांचा पुरोहित ( वा० रा० बाल० स० ५१ ). दाशरथि रामाच्या विवाहकाळीं सीरध्वज जनकासमीप हाच पौरोहित्य करीत होता.
२–विंध्याश्व ना० पांचाल राजाची कन्या अहल्या, तिच्या ठायीं षष्ठार्थक गौतमापासून झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. चिरकारि ऋषीचा भ्राता. यास सत्यधृति ना० पुत्र असून, कृपाचार्याचा हा मूळ पुरुष होता.
३–सावर्णि मन्वंतरामध्यें सप्तर्षींत एक होणार आहे ऋषि तो.

**शतानिक**–पूर्वमत्स्याधिपति विराटराजाचा भ्राता(भार० विराट० अ० ३१ ). हा द्रोणाचार्याच्या हातून भारती युद्धांत मरण पावला ( भार० द्रोण० अ० २१ ).

२–नकुल पांडवापासून द्रौपदीस झालेला पुत्र. हा शिबिरांत निद्रित असतां, अश्वत्थाम्याच्या हातून मेला.

३–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय जनमेजय राजास वपुष्टमेपासून झालेला पुत्र. याचा पुत्र सहस्रानीक.

४–दुसरा एक पांडववंशोत्पन्न सुदास राजाचा पुत्र. यास सोमक नामांतर असून पुत्र दुर्दमन नांवाचा होता.

**शतान्हा**–भारतवर्षीय नदी.

**शताक्षी**–दुर्गेस पडलेलें नांव.

**शत्रुघाती**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अजपुत्र दशरथ राजाचा पौत्र. शत्रुघ्नास श्रुतकीर्तीपासून झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यास यूपकेतु असें म्हणत असत. ( भाग० ९ स्कं० अ० ११ श्लो० १३ ). मध्यें याला श्रुतसेन असें म्हटलें आहे. हा वैदिश ना० नगरींत राहात असे.

**शत्रुघ्न**–सूर्यवंशोत्पन्न एक राजा; परंतु हा कोणाचा पुत्र इ० कांहीं आढळत नाहीं. मात्र हा प्राचीन आहे.

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अजपुत्र दशरथराजा, त्यापासून सुमित्रेच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील कनिष्ठ, लक्ष्मणाचा कनिष्ठ भ्राता. हा, बाल्यापासून भरतास अनुलक्षून वर्तत असे. रामचंद्राचा विवाह झाला, त्यावेळेस याचाहि झाला. याच्या स्त्रीचें नांव श्रुतकीर्ती असून, ती सीरध्वजाचा कनिष्ठ भ्राता कुशध्वज त्याची कन्या होती. विवाह झाल्यावर भरतास त्याचा मातुल युधाजित् त्यानें केकयदेशीं नेलें असतां हाहि त्यासमागमें गेला होता, व तिकडून परत आल्यावर पूर्वींच मरण पावलेल्या दशरथाच्या और्ध्वदेहिक कर्मोत्तर भरत नंदीग्रामीं राहिला असतां, यानेंच रामाच्या नांवानें चौदा वर्षें उत्तम प्रकारें करून राज्य चालविलें होतें.

रामचंद्रानें चौदा वर्षें अरण्यवास करून रावणास मारून, तो परत अयोध्येस आल्यावर राज्य करूं लागला असतां, बहुत काल सर्वांचाहि आनंदांत गेला. त्या संधींत यास सुबाहु व शत्रुघाती असे दोन पुत्र झाले होते. एकदां यमुना तीराकडून कित्येक ऋषि येऊन लवणासुरानें दिलेल्या त्रासाचें वृत्त रामास सांगूं लागले; त्यावरून त्याच्या वधार्थ यानें स्वतः गमन केलें. कारण, लक्ष्मण व भरत या उभयतांनीं बहुत कष्ट सोशिले होते म्हणून, त्यांस रामाची आज्ञा असतां हाच पुढें होऊन मला पाठवा असें म्हणूं लागला. सारांश, रामाची आज्ञा होतांच हा अयोध्येहून निघाला तो तिसऱ्या दिवशीं वाल्मीकि ऋषीच्या आश्रमास येऊन पोहोंचला. तेथें पूर्वभागीं मोठमोठे भस्माचे ढीग पाहून, यानें ऋषीस त्यांविषयीं प्रश्न केला. तेव्हां त्यांनीं मित्रसह राजाच्या यज्ञाचें समग्र वृत्त यास कथन केलें ( वा० रा० उत्तर० स० ६५ ). शत्रुघ्न वाल्मीकीच्या आश्रमांत ज्या दिवशीं येऊन राहिला होता, त्याच रात्रीं सीता, लव आणि कुश अशा उभय पुत्रांस तेथें प्रसवली होती. दुसऱ्या दिवशीं शत्रुघ्न तेथून निघाला, व सातव्या दिवशीं कांचन अ० च्यवनऋषि त्याच्या आश्रमास यमुनातीरीं येऊन, तेथें त्यानें समीपच सेनेचा निवेश केला ( वा० रा० उत्तर० स० ६६ ).

नंतर लवणासुराच्या सामर्थ्याविषयीं यानें च्यवन भार्गवास प्रश्न केल्यावरून, त्यांनीं मांधाता राजाचा यास इतिहास सांगितला ( १ मांधाता श० पहा ). पुढें दुसऱ्या दिवशीं यानें लवणासुरास मारिलें ( लवणासुर श० पहा ). लवणास मारतांच तो प्रदेश निर्भय झाला असें पाहून, देवांनीं व ऋषींनीं शत्रुघ्नास आशीर्वाद देऊन वर मागण्यास आज्ञा केली असतां, यानें, हा देश चारी वर्णांच्या प्रजेनें युक्त होऊन येथील सेना शूर असावी असें मागितलें. त्यास त्यांनीं तथास्तु म्हटल्यावरून यानें त्या देशास शूरसेन असें नांव ठेवून, मधुपुरी नांवानें असलेल्या नगरीस मथुरा नांव देऊन ती त्याची राजधानी केली आणि हें वर्तमान रामास कळविलें. त्यावरून रामानें यास तेथील राज्याचा अभिषेक केला ( वा० रा० उत्तर० स० ७० ).

शूरसेन देशांत शत्रुघ्न बारा वर्षें राहिला असतां, एकदां त्याच्या मनांत रामास भेटावेंसें वाटून, तेथून निघाला तो वाल्मीकि ऋषीच्या आश्रमांत एक रात्र राहून, नंतर अयोध्येस येऊन रामास भेटला. पुढें उभयतांनीं, लक्ष्मण व भरत इ०कांसहित सुखानें कांहीं दिवस घालविल्यावर रामाज्ञेनें हा पुनः मथुरेस परत आला ( वा० रा० उत्तर० ७१–७२ ).

कांहीं काळानें राम निजधामास जाणार असें यानें ऐकिलें, व रामाकडूनहि दूत आले. त्यावरून सुबाहु ना० ज्येष्ठ पुत्रास तेथील राज्यावर स्थापून, व दुसरा पुत्र शत्रुघाती त्यास वैदिश नगरींत राहण्यास सांगून, आपण त्वरेनें अयोध्येस आला, व रामासमागमें परमगतीस प्राप्त झाला ( वा० रा० उत्तर० स० १०८ ).

३–लंकेंतील रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० युद्ध० स० ४३ ).

४–श्वफल्क यादवाच्या तेरा पुत्रांतील एक.

५–अक्रूर यादवाच्या पुत्रांतील एक.

**शत्रुंजय**–धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक.

२–अर्जुनाच्या हातून उभय बंधूंसहित मरण पावलेला कर्णाच्या पुत्रांतील एक ( भार० द्रोण० अ० ६२ ).

३–अश्वत्थाम्याच्या हातून मरण पावलेला द्रुपद राजाच्या पुत्रांतील एक ( भार० द्रोण०अ० १५६ ).

४–अभिमन्यूनें मारिलेला एक राजपुत्र ( भार० द्रोण० अ० ४८ ).

५–रामाचा आरोहण करण्याचा गज ( वा० रा० अयो० स० १५ ). याच नांवाचा रामसेनेंत दुसराहि एक गज होता ( वा० रा० अयो० स० ९७).

**शत्रुजित्**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ध्रुवसंधि राजास लीलावतीच्या ठायीं झालेला पुत्र ( ८ सुदर्शन श० पहा ).

२–( सो० वं० ) प्रथमार्थक प्रतर्दन राजाच्या नामांतरांतील एक नांव.

३–शोणाश्व राजर्षीच्या पुत्रांतील एक.

**शत्रुतपन–तापन**–दनुपुत्र दानवांतील एक.

**शत्रुसह**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**शत्रुसूदन**–दाशरथि रामाच्या सुज्ञ ना० मंत्र्याच्या दहा पुत्रांतील एक.

**शनि**–विवस्वान् आदित्यास छायेपासून झालेल्या दोन पुत्रांतील कनिष्ठ, सावर्णि जो पुढें आठवा मनु होणार आहे,त्याचा सहोदर. यास वैवस्वत असेंहि नांव असून, हा प्रस्तुत मन्वंतरांत शनिमंडलाचा आधिपति आहे. यास शनैश्चर असें म्हणतात.

**शंपाक**–हास्तिनापुरांत राहणारा एक दरिद्री ब्राह्मण. हा, लाभानें हर्ष, व अलाभानें खेद मानणारा नसे, म्हणून समाधानी होता असें दिसतें. याच्यावर भीष्माची मोठी भक्ति असे, त्यामुळें हाहि त्यास समाधानाच्या अनेक गोष्टी सांगे ( भार० शांति० अ० १७३ ).

**शंबर**–तिमिध्वज राजास म्हणत असत.

२–शंबरासुर श० पहा.

**शंबरासुर**–दनुपुत्र दानवांतील एक. कृष्णपुत्र प्रद्युम्नानें यास मारिलें ( २ प्रद्युम्न श० पहा ).

२–इंद्रानें मारिलेला एक असुर ( भार० सौप्तिक० अ० ११ ).

**शबरी**–एक भिल्लीण. ही पंपासरोवराच्या पश्चिमतीरीं राहणाऱ्या मतंगऋषीची दासी. रामचंद्र चित्रकूटपर्वतीं असतां मतंग दिव्यलोकास गेला, व जातांना हिला सांगून गेला कीं, रामचंद्र थोड्याच कालानें येथें येईल, त्याचें तूं आतिथ्य करून नंतर स्वर्गी ये. त्याप्रमाणें ही तेथें रामाची मार्गप्रतीक्षा करीत असतां, लक्ष्मणासहवर्तमान राम हिच्या आश्रमीं आला. त्यास पाहून हिनें त्याचें पूजन केलें, व वन्य फलें भक्षणास देऊन, मतंगाच्या वनांतील सप्तसागर ना० तीर्थ आदिकरून विशेष जें जें कांहीं होतें, तें तें सर्व दाखविलें. नंतर अग्नि प्रदीप्त करून हिनें रामास वंदन केल्यावर ऋष्यमूकपर्वतावर सुग्रीव राहतो त्यास भेट म्हणून सांगून देहत्याग केला व स्वर्गास गेली ( वा० रा० अर० स० ७४ ).

**शबल**–प्राचेतसदक्षास पुनः दुसरे दहा सहस्र पुत्र झाले त्यांतील प्रमुख ( २ दक्ष श० पहा ).

**शबलाक्ष**–एक ऋषि.

**शंबसादन**–केसरीवानरानें मारिलेला असुर.

**शंभु**–शिवाचें नांव.

२–( सू० वं० )नभगवंशीय अंबरीष राजाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ.

३–ज्यानें कुशध्वजराजास मारिलें तो असुर ( वेदवती श० पहा ).

४–शुक्राचार्यास पीवरीपासून झालेल्या पांच पुत्रांतील तिसरा.

५–ब्रह्मसावर्णिमन्वंतरांत स्वर्गामध्यें होईल दहावा इंद्र तो.

**शम**–स्वायंभुव मन्वंतरांतल्या धर्मऋषीचा पुत्र. हें नांव त्याच्या चौदा पुत्रांत कोणत्याचें असेल तें असो.

२–पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय कुरुपुत्र सुधनु, त्याच्या वंशांतील जरासंधकुलांत जन्मलेल्या धर्मसूत्र राजाचा पुत्र. याचा पुत्र द्युमत्सेन.

**शमठ**–गयाशिर पर्वतावर राहणारा एक ऋषि. हा तेथील ब्रह्मसर ना० सरोवराच्या समीप राहात असे. पांडव तीर्थयात्रा करीत लोमशऋषिसमागमें हिंडत असतां, याच्या आश्रमीं गेले होते. तेव्हां यानें गयाशिर नांव पडण्यास कारण गयराजाचा वृत्तांत सांगून, त्यांचें आदरातिथ्य करून त्यांस मार्गस्थ केलें ( भार० वन० अ० ९५ ).

**शमन**–यमधर्मास नांव.

**शमी**–कुरुकुलोत्पन्न शोणाश्व ( याचें नांव वंशावळींत नाहीं ) राजाचा पुत्र.

२–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न उशीनर राजाच्या चार पुत्रांतील तिसरा.

**शमीक**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय शूर

राजास मारीषेपासून झालेल्या दाहा पुत्रांतील आठवा. यास सुदामिनी स्त्रीपासून सुमित्र व अर्जुनपाल इ० पुत्र झाले होते. हा शमीक मोठा पराक्रमी असे.

२–अंगिरसकुलोत्पन्न एक ऋषि. यास गौ ना० स्त्रीपासून शृंगी नांवाचा पुत्र झाला होता. शमीक, स्त्री आणि पुत्र यांसहित अरण्यांत राहून तप करीत असतां पांडववंशीय परीक्षित् राजा, अरण्यांत एकेकाळीं मृगया करावयास आला. परंतु त्या दिवशीं त्यास मृग न सांपडून क्षुधा, तृषा, यांच्या योगानें श्रांत होऊन बसला आहे तों, अकस्मात् एक मृग त्याच्या दृष्टीस पडला. म्हणून त्यास त्यानें वेध केला; परंतु तसाच तो पळाल्यामुळें राजा त्यामागें लागला असतां, मृग दिसेनासा होऊन, त्याला एकाएकीं हा शमीकाचा आश्रम दृष्टीस पडला. मग तो पुढें न जातां तृषा लागली होती म्हणून, आश्रमाबाहेर उभा राहून आंत कोणी आहे काय ? म्हणून हांका मारूं लागला. परंतु शमीकाची स्त्री आश्रमांत नसून पुत्रहि समिधा व दर्भ आणावयास अरण्यांत गेला होता, त्यामुळें व शमीक निर्विकल्पध्यानयोगस्थ असल्यामुळें त्यास प्रत्युत्तर मिळालें नाहीं. म्हणून परीक्षित् किंचित् आंत गेला, आणि पाहतो तर ऋषि नेत्र झांकून बसला आहे. त्यावरून राजास, तो गर्वानें मशीं बोलला नाहीं, असें दुर्दैवानें वाटून, तेथें एका मृतसर्पाचें कलेवर पडलें होतें, तें धनुष्यकोटीनें उचलून त्यानें याच्या गळ्यांत घातलें, व तेथून निघून तो परत हस्तिनापुरास आला.

राजा हस्तिनापुरास गेल्यावर शृंगी आश्रमास आला आणि पाहतो तर पित्याच्या कंठांत मृतसर्प आहे. तेव्हां हा बुद्धिपुरःसर कोणी तरी घातला आहे असें त्यानें जाणून, शाप दिला कीं, ज्यानें हा सर्प माझ्या पित्याच्या कंठांत घातला असेल, तो आजपासून सातव्या दिवशीं सर्पदंश होऊन मरण पावेल. इतकें बोलून त्यानें तो सर्प पित्याच्या कंठाबाहेर काढिला. कांहीं वेळानें शमीक ऋषि देहभानावर येऊन पाहतो तर शृंगी विमनस्क होऊन बसला आहे. त्यावरून असा कां बसलास म्हणून पित्यानें पुसलें असतां, त्यानें सर्प आपल्या कंठांत कोणी घातला होता, व ज्यानें घातला त्यास मी असा शाप दिला म्हणून सांगितलें. तें पुत्राचें भाषण ऐकून शमीक म्हणाला, हें तूं चांगले केलें नाहींस; कारण हें कर्म करणारा परीक्षित् राजा मोठा धर्मात्मा असून, त्याच्या योगानें आपण या अरण्यांत निर्भय राहतो. अस्तु, आतां हें कृत्य त्याला सत्वर तरी कळवावें. असें शमीकानें मनांत आणून, आपला गौरमुख शिष्य त्याकडे पाठवून शापाचें वृत्त त्यास कळविलें ( भार० आदि० अ० ४०—४१ ). ( भाग० १ स्कं० अ० १८ ).

**शंयु**–बृहस्पतीपासून तारेस झालेला पुत्र. हा साहा पुत्रांत प्रमुख व अग्नींत गणनीय असा आहे. यास सत्या ना० स्त्रीपासून भरत आणि भरद्वाज असे दोन पुत्र व तीन कन्या झाल्या होत्या.

**शरगुल्म**–रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० किष्किं० स० ४१ ).

**शरजन्मा**–कार्तिकेयास क्वचित् म्हटलेलें आढळतें.

**शरदंडा**–कुरुजांगल देशांतील एक नदी.

**शरद्वान्**–गौतमऋषीचा प्रपौत्र. शतानंदाचा पौत्र, व सत्यधृतीचा पुत्र. हा अतिशय धनुर्विद्यानिपुण असे. म्हणून यास हें नांव होतें. याचा पुत्र कृपाचार्य व अन्य वंशज त्यांस शारद्वत आणि गौतम अशीं नांवें साधारण आहेत.

२–३ अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**शरभ**–रामसेनेंतील प्रख्यात वानर ( वा० रा० युद्ध० स० ३० ).

२–साल्वेय पर्वतावर राहणारा दुसरा एक वानर ( वा० रा० युद्ध० स० २६ ).

३–दनुपुत्र दानवांतील एक.

४–शकुनीच्या भ्रात्यांतील एक. रात्रियुद्धांत भीमानें यास मारिलें ( भार० द्रोण० अ० १५७ ).

५–शिशुपालाच्या पुत्रांतील एक. पांडवांचा अश्वमेधीय अश्व याच्या देशांत गेल्यावर यानें त्याचें पूजन करून सैनिकांचा सत्कार केला, व करभार देऊन मागस्थ केलें ( भार० अश्व० अ० ८३ ).

६–एक राजर्षि.

७–अथर्वणवेदोपनिषत्.

**शरभंग**–गौतमकुलोत्पन्न एक ब्रह्मर्षि. हा दंडकारण्यांत राहून तप करीत असतां, विराधानें सांगितल्यावरून सीता व लक्ष्मण यांसहवर्तमान राम याच्या आश्रमास आला. तेव्हां तेथें स्वर्गाहून इंद्र आला होता. तो जातांच ऋषीनें रामास आंत आणिलें, व त्याचें उत्तम प्रकारें आतिथ्य केलें. पुढें रामानें पुसलें कीं, मघाशीं आला होता तो कोण ? व येथें कां आला होता ? यानें सांगितलें, मला दिव्यलोकास चला म्हणण्यासाठीं तो इंद्र आला होता; परंतु तूं दंडकारण्यांत येणार असें मी जाणून गेलों नाहीं; तुझी मार्गप्रतीक्षा मी बहुत दिवस करीत आहें. आज तूं आलास येणें-

करून मी कृतार्थ झालों. असें म्हणून यानें अग्नींत प्रवेश केला, व दिव्यदेही होऊन दिव्यलोकास गेला ( वा० रा० अर० स० ५ ).

**शरयू**–वीर ना० अग्नीची स्त्री.

२–अयोध्येसमीपची सरयू नदी ती.

**शरवण**–हिमालयावरील शिवपार्वतींचें क्रीडावन. जो कोणी पुरुष या स्थळीं येईल, तो स्त्री होईल असा या स्थळास पार्वतीचा शाप होता. त्यामुळें चालू मन्वंतरारंभीं इलराजास, येथें जाण्यानें स्त्रीत्व प्राप्त झालें होतें ( मत्स्य० अ० ११ ). ( इल श० पहा. ).

**शरवा**–महेंद्र पर्वतापासून निघालेली नदी.

**शरारि**–मारुति इ० कांसमागमें दक्षिणदिशेकडे गेलेल्या वानरांतील एक ( वा० रा० किष्किं० स० ४१ ).

**शरावती**–भारतवर्षीय नदी.

**शरु**–एक गंधर्व.

**शर्करावर्ता**–भारतवर्षीय नदी.

**शर्कराक्षी**–३ भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**शर्मक**–इंद्रप्रस्थाच्या पूर्वेकडील देश व तेथील राजा ( सभा० अ० ३१ ).

**शर्मिष्ठा**–वृषपर्वा दानवाची कन्या. ही दासीपणा स्वीकारून देवयानीसमागमें गेली होती ( ययाति श० पहा ).

**शर्याति**–वैवस्वतमनूच्या दहा पुत्रांतील तिसरा. हा शूर असून वेदवेदांगांत इतका पारंगत होता कीं, यानें अंगिरा ऋषीच्या सत्रांत, दुसऱ्या दिवशींचें कर्म स्वतः केलें. यास उत्तानबर्हि, आनर्त, भूरिषेण, हे तीन; तसेच दुसरे दोन हैहय आणि तालजंघ, मिळून पुत्र पांच आणि सुकन्या नांवाची एक कन्या होती. ती च्यवनभार्गवाची स्त्री झाली ( १ च्यवन श० पहा ).

२–अक्रूरपुत्र एक यादव.

**शर्व**–महादेव.

**शल**–इक्ष्वाकुकुलोत्पन्न एक परीक्षित् ना० राजा, त्याच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. हा परीक्षित् कोणाचा पुत्र इ० वृत्त आढळत नाहीं. त्यास आयु ना० मंडूकाधिपतीची कन्या सुशोभना ती स्त्री असून, तिच्याठायीं त्यास तीन पुत्र झाले होते. त्यांतील शल हा एक. याचा इतिहास असा आढळतो कीं, पित्याच्या मागें हा राज्यावर बसला असतां, एके काळीं मृगयेस गेला होता. तेव्हां अरण्यांतून चालण्यानें अश्व इतके श्रांत झाले कीं, ते चांगले चालेनात, म्हणून हा सारथ्यास वारंवार अश्वांस लवकर चालीव म्हणून रागें भरून बोलूं लागला. त्यानें उत्तर केलें, अश्व श्रांत झाले आहेत, यास्तव चालत नाहींत;त्यास मीं काय करावें ? तरी याची किरकिर संपेना. शेवटीं सारथि त्रासून म्हणाला, राजा कधीं श्रम न पावणारे व सदोदित वायूप्रमाणें चालणारे हे वामदेव्य अश्व नव्हत. त्यावरून राजा त्यास पुसूं लागला, वामदेव्य अश्व म्हणजे काय ? तें मला सांग. मग सारथि कांहीं बोलेना, म्हणून हा त्यास मारूं लागला. तेव्हां त्यानें सांगितले कीं, या अरण्यांत वामदेव ना० ऋषि राहतो, त्याजवळचे अश्व कधींच श्रांत न होणारे असे आहेत, म्हणून मी आपल्या रथाचे अश्व वामदेव्य नव्हत असें म्हटलें. सारथ्याचें भाषण ऐकून राजा म्हणाला, असें आहे तर, मला त्याच्या आश्रमांत घेऊन चल. सारथ्यानें बरें म्हणून राजास वामदेवाच्या आश्रमांत नेऊन सोडिलें.

शलराजा तेथें पोहोंचतांच त्यानें ऋषीस वंदन केलें. त्यावरून ऋषीनें याचें स्वागत करून पुसलें, राजा, तूं आज इकडे कोणीकडे आलास ? हा म्हणाला; माझ्या रथाचे अश्व श्रांत झाले असून, आपणापाशीं अश्व आहेत म्हणून मीं ऐकिलें, त्यावरून इकडे आलों आहें. ऋषि म्हणाला, बरें आहे, घेऊन जा; परंतु एक महिन्याच्या आंत पुनः ते माझे मला परत कर. राजा तथास्तु म्हणून रथास अश्व जोडून निघाला तो अयोध्येस येऊन पोहोंचला. पुढें त्यानें अश्व फारच उत्तम आहेत असें पाहून, ते लोभानें परत न करतां तसेच ठेवून घेतले.

एक मास झाल्यावर, शलराजानें अश्व परत केले नाहींत असें पाहून,वामदेव ऋषीनें आपला आत्रेय ना० शिष्य त्याकडे अश्व मागण्यास पाठविला.त्यानें जाऊन शलराजाजवळ अश्व मागितले. तेव्हां शलराजा दुष्टच म्हणून त्यास बोलला कीं, असे अश्व ब्राह्मणापाशीं कशास पाहिजेत ? यास्तव मी अश्व देत नाहीं, असें आपल्या गुरुस जाऊन सांग. आत्रेय परत येऊन राजा अश्व देत नाहीं असें त्यानें सांगतांच, वामदेव स्वतः राजाकडे गेला व अश्व मागूं लागला. परंतु हा अश्व देईना; चार वृषभ अ० खर पाहिजे तर घेऊन जा असें म्हणूं लागला. त्यावरून वामदेवास क्रोध आला; तथापि यास त्यानें बहुत नीति सांगितली. परंतु तो कांहीं ऐकेचना असें पाहून, वामदेवानें चार राक्षस उत्पन्न करून राजावर सोडिले, आणि आपण आपल्या आश्रमास निघून गेला. इकडे राक्षसांनीं

राजास धरिलें व अश्व देतोस कीं मारूं म्हणून पुसलें. परंतु हा महामूर्ख असल्यामुळें मोठ्यानें ओरडून म्हणाला, अहो इक्ष्वाकुकुलोत्पन्नहो, कुलाचा नाश झाला तरी होऊं द्या; परंतु अश्व देऊं नका. इतकें बोलतांच राक्षसांनीं यास तत्काळ ठार मारिलें, व ते अंतर्धान पावले.

शल मरतांच, त्याचा कनिष्ठ भ्राता दल राज्यावर बसला, तरी त्यानें अश्व दिले नाहींत असें पाहून, वामदेव त्याकडेसहि आला, व अश्व मागूं लागला. त्यावरून दलास क्रोध येऊन, त्यानें सेवकास आज्ञा केली कीं, माझें धनुष्य व विषदिग्ध बाण सत्वर घेऊन ये, म्हणजे या ऋषीचा वध करितों. तें ऐकून वामदेव म्हणाला, त्या बाणानें तुझाच श्येनजित् पुत्र मरण पावो. त्यावरून पुत्र तत्काळ मरण पावला, तरी दल दुसरा बाण आणवूं लागला, म्हणून वामदेवानें त्याच्या सर्व शरीराचें स्तंभन केलें. तें पाहून राजपत्नीनें वामदेवास शरण होऊन झालेल्या अपराधाची क्षमा मागितली, व अश्व स्वाधीन केले. त्यावरून वामदेवानें श्येनजितास व दलराजास पूर्ववत् करून, अश्व घेऊन आश्रमीं गमन केलें ( भार० वन० अ० १९२ ).

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न कुरुपुत्र जन्हुवंशीय बाल्हीकपुत्र सोमदत्त, त्याच्या चार पुत्रांतील तिसरा. याचें दुर्योधनाशीं परम सख्य असल्यामुळें, त्याचा पक्ष धरून हा भारती युद्धांत मेला.

३–कंससभेंतील एक मल्ल. धनुर्यागकाळीं कृष्णानें मारिला ( भाग० दशम० अ० ४४ ).

४–सुयज्ञ प्रधानाच्या पुत्रांतील एक(कुशीलव श०पहा).

**शलभ**–एक दानव.

२–कर्णानें मारिलेला पांडवपक्षीय राजा ( भार०कर्ण० अ० ५६ ).

**शल्य**–मद्रदेशाचा अधिपति ( भार०आदि०अ० १३ ). याची भगिनी माद्री ती पंडु राजाची द्वितीय स्त्री होती, म्हणून हा नकुलसहदेवांचा मातुल होता. पित्याच्या मागें हाच राज्य करूं लागला. याच्या राजधानीस शाकल असें नांव असें.

पांडव अज्ञातवासांतून प्रकट झाल्यावर, ज्या काळीं युद्धाचा निश्चय झाला, त्या काळीं युधिष्ठिरानें यास आपल्या पक्षास साह्य करण्यासाठीं बोलाविलें. म्हणून हा स्वदेशाहून निघून पांडवांकडे येऊं लागला. परंतु दुर्योधनानें, यानें आपणाकडे यावें म्हणून याच्या येण्याच्या मार्गावर, व निवेश करण्याच्या प्रत्येक स्थलावर, कुरुदेशापासून मद्रदेशापर्यंत अशी व्यवस्था ठेविली होती कीं, हा ज्या स्थळीं जे पदार्थादिक इच्छील, तें यास तेथेंच प्राप्त व्हावें. त्यामुळें शल्यास व त्याच्या सैन्यास मार्गांत मोठें सुख झालें, आणि ही व्यवस्था पांडवांकडूनच असेल असें यास वाटून व्यवस्थापकांस म्हणूं लागला कीं, तुम्हास काय इष्ट असेल तें मागा. त्यावरून झटकन् दुर्योधन पुढें झाला; कारण याचा जेथें जेथें सेनानिवेश होई (सेनेचा तळ पडे) तेथें तेथें दुर्योधन गुप्तपणानें असेच. सारांश, दुर्योधन पुढें होऊन त्यानें याची प्रार्थना केली कीं, आपण मजकडेस यावें. त्यावरून यास जरी कांहीं अवघड वाटलें, तरी यानें त्यास तथास्तु असें म्हटलें, व कुरुक्षेत्रावर सेनेचा निवेश करून, मी युधिष्ठिरास भेटून सत्वरच येतों, असें म्हणून एकटाच निघून युधिष्ठिराकडे आला.

पांडव उपप्लव्य येथें राहिले होते तेथें शल्य जाऊन युधिष्ठिरास भेटला. तेव्हां त्यानें याचा मोठा सत्कार केला. पुढें शल्य म्हणाला, युधिष्ठिरा, मी तुजकडे येण्यास निघालों असतां, दुर्योधनानें मला युक्तीनें वश करून आपणाकडे वळवून घेतलें आहें, हें तुला कळावें म्हणून मी येथें आलों आहें. युधिष्ठिर म्हणाला, आपण दुर्योधनाचा पक्ष धरिलात, तेणेंकरून मला संतोषच आहे, व आपण त्यास वचन दिल्याप्रमाणें अवश्य त्याकडे जावें; परंतु माझें इतकेंच सांगणें आहे कीं, आपण आपलें अंतःकरण मात्र आम्हाकडे ठेवावें. असें ऐकून शल्य म्हणाला, हें तूं सांगावेंस असें नाहीं. दुर्योधनानें तुम्हास केलेले अपकार, व त्यांपासून तुम्हास झालेलीं दुःखें, मी सर्व जाणत आहें. परंतु आतां निश्चयात्मक ध्यानांत ठेवा कीं, त्या सर्व दुःखांची समाप्ति लौकरच होऊन, तुम्ही अपरिमित सुख पावाल, हा माझा तुम्हास आशीर्वाद आहे. तूं मात्र आतां झालेल्या दुःखाचें कांहीं मनांत आणूं नको, स्वर्गाधिपतिसारख्यांस देखील अनेक दुःखें सोसावीं लागलीं, मग आपणां मानवांस सोसावीं लागलीं याचें आश्चर्य काय ? त्यावर यानें युधिष्ठिरास वृत्रासुरचरित सांगून ( भार० उद्योग० अ० ९–११ ), नहुषचरितहि कथन केलें ( भार० उद्यो० अ० ११–१७ ). नंतर सर्वांस सुशब्दानें गौरवून, आपले भागिनेय नकुल सहदेव त्यांचेंहि समाधान करून हा परत दुर्योधनाकडे आला.

नंतर पांडव कुरुक्षेत्रावर सेनेसहित येऊन युद्धास आरंभ झाला, त्यांत भीष्माचे दहा व द्रोणाचे पांच दिवस युद्धाचे होऊन ते रणांत पडले असतां, कर्ण,

सैनापत्य पावला. त्याच्या दोन दिवसांतील एक दिवस गत झाल्यावर त्यानें दुर्योधनास सांगितलें, उद्यीक माझें सारथ्य शल्य करील तर पहा. त्यावरून दुर्योधनानें याची प्रार्थना केली; परंतु यास कोप येऊन हा स्वदेशास जाण्यास निघाला असतां, दुर्योधनानें याचें अनेक प्रकारांनीं नम्रता दाखवून सांत्वन केलें, म्हणून हा मान्य झाला, व कर्णाचें सारथ्य दुसरे दिवशीं यानें केलें, त्यांत उभयतांचीं कसकसीं भाषणें झालीं त्याविषयीं ( १ कर्ण श० पहा ).

कर्ण मरण पावल्यावर अश्वत्थाम्यानें सुचविल्यावरून दुर्योधनानें यास युद्धाच्या अठराव्या दिवशीं सेनापति केलें ( भार० शल्य० अ० ६ ). त्यावरून यानें प्रातःकालापासून दोन प्रहरपर्यंत युद्ध केलें. त्यांत युधिष्ठिराच्या हातून हा मध्यान्हसमयीं मरण पावला ( भार० शल्य० अ० १७ ). शल्यास रुक्मरथादिक शत पुत्र असत, व ते हा मरण्याच्या पूर्वींच अभिमन्यूनें मारिलें होतें.

**शल्यकर्तन—कर्षण**-शिलानदीच्या तीरींचें एक नगर ( वा० रा० अयो० स० ७१ ).

**शशबिंदु**-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय चित्ररथ राजाचा पुत्र. यास पृथुशब्दानें युक्त, व ज्यांत शतप्रमुख असे दहा सहस्र पुत्र होते. तथापि सर्वांमध्यें ज्येष्ठ असा यास महाभोज नांवाचा पुत्र होता (भार० शांति० अ० २०८ ). शशबिंदूस चैत्ररथ असेंहि नामांतर असे ( भार० शांति० अ० २९ ).

२-एक राजर्षि. कोणाचा कोण तें आढळत नाहीं(भार० द्रोण० अ० ६५ ).

**शशलोमा**-एक राजर्षि (भार० आश्रम० अ० २० श्लो० १४ ).

**शशांक**-चंद्र हें नांव शश ( ससा ) त्याचें चिन्ह चंद्रास असल्यामुळें पडलें आहे.

**शशाद**-( सू० वं० ) इक्ष्वाकुराजाच्या पुत्रांत ज्येष्ठ जो विकुक्षि, त्यास पडलेलें नांव. हें नांव पडण्यास कारण झालें होतें तें असें-एकदां याचा पिता इक्ष्वाकु त्यानें यास सांगितलें कीं, आज अष्टका ना० श्राद्ध कर्तव्य आहे, यास्तव अरण्यांत जाऊन मृग घेऊन ये. त्यावरून हा अरण्यांत गेला, व मृग मारून घरीं येण्यास निघाला. परंतु श्रांत झाल्यामुळें, यानें मारिलेल्या मृगांत काहीं शश ( ससे ) होते. त्यांतून एक शश भक्षण करून क्षुधा निवृत्त केली. नंतर घरीं येऊन उर्वरित मृग पित्यास समर्पण केले. ते वर्तमान इक्ष्वाकूस कळून, त्यानें यास बराच काळपर्यंत राज्यांतून काढून दिलें होतें, आणि तेव्हांपासून सशास खाल्याकारणानें यास शशाद नांव पडलें होतें ( भाग० ९ स्कं० अ० ६ ).



**शशिकदेश**-भारतवर्षीय देश (भार० भीष्म० अ० ९).

**शशिकला**-काशीराजा जो सुबाहु, त्याची कन्या सूर्यवंशीय सुदर्शनराजाची स्त्री ( ८ सुदर्शन श० पहा ).

**शंशपि**-तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**शाकटायन**- " "

**शाकटायनि**-तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**शाकटाक्ष**- " "

**शाकद्वीप**-पृथिवीच्या सप्तमहाद्वीपांतील साहावें. हें क्षीर समुद्राच्या बाह्य प्रदेशीं वलयाकार असून, याची रुंदी बत्तीस लक्ष योजनें आहे, व तितक्याच रुंदीच्या दधिमंडोदाचें यास वेष्टन आहे. प्रियव्रत राजर्षीचा पुत्र मेधातिथि, तो येथील स्वामी असून, त्यानें याचे वर्षसंज्ञक सात भाग करून, व ते ज्या ज्या पुत्रास द्यावयाचे, त्यांचींच नांवें त्यांस देऊन प्रत्येकास तेथील तेथील आधिपत्य दिलें ( १ मेधातिथि श० पहा). या द्वीपांत **ईशान**, **उरुशृंग**, **बलभद्र**, **शतकेसर**, **सहस्रस्रोत**, **देवपाल**, आणि **महानस**, हे सप्त महापर्वत; व **अनघा**, **आयुर्दा**, **उभयस्पृष्टी**, **अपराजिता**, **पंचपदी**, **सहस्रश्रुती** आणि **निजधृती**, अशा सात महानद्या आहेत ( भाग० पंचम० अ० २० ). ( देवीभा० ८ स्कं० अ० १३ ).

**शाकधि**-३ वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**शाकंभरी**-( १ दुर्गा श० पहा ).

**शांकर**-शंकरनिर्मित भारतवर्षीय तीर्थ.

**शांकरव**-३ भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**शाकल**-एक ब्रह्मर्षि.

२-या नांवाचा देश ( द्वीप असें मुळांत म्हटलें आहे ती चूक आहे ). हा इंद्रप्रस्थाच्या उत्तरेस बराच दूर असून, पांडवांच्या वेळेस येथें प्रतिविंध्य राजा होता ( भार० सभा० अ० २६ ).

३-मद्रदेशाची राजधानी व शल्याची नगरी ( भार० सभा० अ० ३२ ).

**शाकलायनि**-द्वितीय अत्रिकुलोत्पन्न ऋषि.

**शाकल्य**-एक ब्रह्मर्षि. यानें नऊशें वर्षेपर्यंत शिवाराधन केलें होतें, त्यायोगानें हा मोठा ग्रंथकार व सूत्रकार असा झाला होता ( भार० अनु० अ० १४ श्लोक १०० ). विदग्धाख्य संज्ञक ऋक्शाखाप्रवर्तक होय कीं दुसरा, याचा निर्णय आढळत नाहीं. अस्तु.

तो हा असो कीं दुसरा असो, याचा याज्ञवल्क्याशीं मोठा वाद होऊन त्यांत यानें त्याची पराकाष्ठेची निंदा केली होती. त्यामुळें हा याज्ञवल्क्याच्या कोपाग्नीनें दग्ध होऊन मरण पावला होता.

**शाकायन**–ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**शाकाहार्य**– ,, ,,

**शाकुंतलेय**–दुष्यंत राजापासून शकुंतलेस झालेला पुत्र जो भरत तो.

**शाकुनेय**–शकुनि ना० असुराचा अ० दुर्योधनमातुल जो शकुनि त्याचा पुत्र तो.

**शाक्य**– ( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्षवंशीय संजय राजाचा पुत्र. याचा पुत्र शुद्धोद.

**शाक्रयाण**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**शाख**–अनल ना० वसूच्या पुत्रांतील एक.

**शार्ङ्ग**–विष्णूचें धनुष्य.

**शाट्यायनि**० विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

२– यजुर्वेदोपनिषत्.

**शांडिली**–तृतीय वासिष्ठ कुलोत्पन्न ऋषि.

२–शांडिल्य ऋषीची कन्या. ही महातपस्विनी व पूर्व समुद्राच्या तीरीं ऋषभपर्वतावर राहत असे. एके काळीं गालव ऋषीस घेऊन गरुड येथें आला असतां हिनें उभयतांचा उत्तम प्रकारें सत्कार केला, व भोजन दिलें. पुढें रात्रीं निद्रित झाल्यावर पुनः उभयतांहि प्रातःकाळीं उठले व पाहातात तों गरुडाचे सर्व पक्ष गळून पडले आहेत. तेव्हां गालव गरुडास असें कां झालें म्हणून पुसूं लागला. गरुड म्हणाला, हिनें शिव विष्णु जेथें राहतात, त्या लोकीं वास करणें सोडून येथें व्यर्थ राहिली आहे, असें माझ्या मनांत आलें, त्यामुळें असें झालें असेल तर न कळे पुढें उभयतां हिला शरण आले, तेणेंकरून गरुड पूर्ववत् सपक्ष झाला ( भार० उद्योग० अ० ११४ ). हिचा केकय देशींच्या राजाची कन्या सुमना, तिशीं संवाद झाला होता ( भार० अनु० अ० १२२ ).

**शांडिल्य**–द्वितीय कश्यपकुलोत्पन्न ऋषि. याच्या कुलांतील एक ऋषि वैश्वानर ना० जो अग्नि आहे, त्याचें देवतात्व पावला आहे म्हणून, त्यास वैश्वानरच नांव चालतें.

२–अथर्वणवेदोपनिषत्.

**शांत**–प्रियव्रतपुत्र इध्मजिव्ह त्याच्या सात पुत्रांतील चवथा. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

२–प्लक्षद्वीपाच्या सात वर्षांतील चवथा.

३–आप ना० वसूच्या पुत्रांतील एक.

**शांतनव**–शंतनूचे पुत्र ते, परंतु भीष्माविषयीं विशेष प्रसिद्धि.

**शांतरय**–( सो० वं० ) आयुपुत्र अनेना तद्वंशीय धर्मसारथि राजाचा पुत्र.

**शांता**–सोमवंशीय यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या कुलांत जन्मलेल्या रोमपाद राजाची कन्या. ही त्यानें दशरथ राजापासून दत्त घेतली होती असें कोठें आढळतें. तें काय असेल तें असो; परंतु ही ऋष्यशृंगाची स्त्री हें मात्र खरें आहे (ऋष्यशृंग श० पहा ).

**शांति**–तुषित ना० देवांतील एक.

२–दक्षप्रजापतीनें धर्मऋषीस दिलेल्या तेरा कन्यांतील एक. हिचा पुत्र सुख.

३–कर्दम प्रजापतीस देवहूतीपासून झालेल्या नऊ कन्यांतील कनिष्ठ. ही अथर्वण ऋषीची स्त्री होती.

४–वारुणि अंगिरा ऋषीच्या आठ पुत्रांतील चवथा.

५–पूर्वेंद्रांतील एक. हा पंडुपुत्र होऊन जन्मास आला होता.

६–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील, त्याचा पुत्र. याचा पुत्र सुशांति.

७–कृष्णास कालिंदीपासून झालेल्या दहा पुत्रांतील एक.

**शांतिदेवी**–वसुदेवाच्या स्त्रियांतील एक. हिला श्रम, प्रतिश्रुत इ० पुत्र होते.

**शाद्वलायन**–३ वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**शांब**–आप ना० वसूच्या पुत्रांतील एक.

**शावस्त**–श्रावस्त श० पहा.

**शावस्ती**–श्रावस्ती श० पहा.

**शारदा**–सरस्वती.

२–भारतवर्षीय तीर्थ.

**शारद्वत**–गौतमांगिरसांतील एक कुल(३ अंगिरा श० पहा).

२–शरद्वत्पुत्र कृपाचार्य तो.

**शारद्वातिक**–३ भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**शारद्वती**–कृपाचार्याची भगिनी कृपी ती.

२– एक अप्सरा.

**शारीरक**–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**शार्कराक्षि**–३ भृगुकुलोत्पन्न ऋषि. शर्कराक्ष ऋषीचा पुत्र.

**शार्दूल**–रावणपक्षीय राक्षस, हा त्याचा हेर होता ( वा० रा० युद्ध० स० २० ).

**शार्दूली**–क्रोधेच्या कन्यांतील एक.

**शार्यात**–शर्यातिकुलोत्पन्न हैहयांतील एक कुल.

**शाल**–एक यादवास दुर्वाक्षीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**शालंकायन**–विश्वामित्राच्या वंशांतील एक ऋषि व कुल.

**शालंकायनि**–१ अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

२–विश्वामित्रकुलोत्पन्न एक ऋषि.

**शालकी**–एक यक्ष.

**शालायनि**–तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**शालाहलेय**–द्वितीय कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**शालि**–तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**शालिग्राम**–भारतवर्षीय क्षेत्र व तीर्थ.

**शालिशिरा**–मुनीस झालेल्या गंधर्वांतील एक.

**शालिसूर्य**–शालिहोत्रऋषीच्या आश्रमास नांव.

**शालिहोत्र**–कपिलऋषीचा पुत्र. हा अश्वशास्त्रप्रणेता होय. यानें रचिलेल्या ग्रंथास शाल्यहोत्र नांव आहे ( भार० वन० अ० २७१ श्लो० २७ ).

**शालूकिनी**–भारतवर्षीय नदी.

**शाल्मलिद्वीप**–पृथिवीच्या सप्तमहाद्वीपांतील तिसरें. हें इक्षुरसोदाच्या बाह्यप्रदेशीं असून, याची रुंदी चार लक्ष योजनें आहे, व यास तितक्याच रुंदीच्या सुरासमुद्राचें वेष्टन आहे. प्रियव्रतपुत्र यज्ञबाहु तो येथील अधिपति असून, त्यानें याचे वर्षसंज्ञक सात भाग करुन, व त्यांस आपल्या सात पुत्रांचींच नांवें देऊन, त्या प्रत्येकास तेथील तेथील आधिपत्य दिलें होतें(यज्ञबाहु श०पहा). या द्वीपांत **स्वरस, शतशृंग, वामदेव, कुंद, मुकुंद, पुष्पवर्ष, सहस्रश्रुति**, हे सप्त महापर्वत; आणि **अनुमती, सिनीवाली, सरस्वती, कुहू, रजनी, नंदा**, व **राका**, अशा सात महानद्या आहेत (भाग० ५ स्कं० अ० २० ). ( देवीभा० ८ स्कं० अ० १२).

**शाल्मली**–भारतवर्षीय केकयदेशांतील नदी ( वा० रा० अयो० स० ६८ ).

**शाल्यहोत्र**–अश्वशास्त्र ना० ग्रंथ.

**शाल्व**–शाल्वदेशीय एक राजा. हा असुरांशानें जन्मलेला असे. काशीराजाच्या तीन कन्यांचें स्वयंवर झालें, तेव्हां याचें भीष्माशीं मोठें युद्ध झालें असतां, त्यांत हा पराभव पावून स्वदेशास परत गेला होता. यास अंबेनें मनेंकरून वरिलें होतें, म्हणून ती भीष्मास पुसून याकडेस गेली होती; परंतु भीष्मानें जिंकून नेल्यामुळें यानें तिचा अंगिकार केला नाहीं. हा म्लेंच्छ सैन्य समागमें घेऊन भारती युद्धांत दुर्योधनास येऊन मिळाला होता व त्यांत सात्यकीच्या हातून मरण पावला ( भार०शल्य० अ० २० ).

२–हाही राजा शाल्वदेशीय होय. रुक्मिणीच्या विवाहकाळीं हा कुंडिनपुरास येऊन यादवांपासून पराभव पावला होता म्हणून त्यांचा अतिशय द्वेष करी. व कृष्णानें जरासंध आणि शिशुपाल यांस मारिल्यावर तर यानें अधिकच खवळून अयादवी भूमि करण्याच्या हेतूनें घोर तप आरंभून रुद्रास प्रसन्न केलें, व देवासुरमनुष्यांस अभेद्य असें विमान मागितलें. त्यावरुन रुद्रानें मयासुरनिर्मित विमान यास दिलें. नंतर हा, त्या विमानांत बसून, द्वारकेवर अंतरिक्षांतून येऊन, वृक्ष, शिला इ०कांची वृष्टि करूं लागला, असें पाहून सर्व यादव सिद्ध होऊन युद्धास निघाले. परंतु हा अंतरिक्षांत असल्यामुळें, व क्षणांत भूमीवर, क्षणांत पर्वतावर, क्षणांत अंतरिक्षांत, क्षणांत पूर्वादिक दिशांस, आणि क्षणांत अदृश्य, असा होऊं लागल्यामुळें, यादवांचा याच्यापुढें कांहींच उपाय चालेना. हें युद्ध आरंभलें तेव्हां बलराम तर द्वारकेंत नव्हताच, व कृष्णहि इंद्रप्रस्थास गेल्यामुळें नव्हता.

शेवटीं प्रद्युम्न पुढें झाला, व त्यानें शाल्वावर पुष्कळच अस्त्रवृष्टि केली, परंतु कांहीं उपाय चालेना. इतक्यांत शाल्वाच्या द्युमान् ना० प्रधानानें प्रद्युम्नास मूर्च्छित केलें. तरी तो सत्वर सावध होऊन, पुनः युद्ध करूं लागला. शाल्वाचा सेनापति क्षेमवृद्धि त्याचा सांबानें पराभव केला. अशा रीतीनें हें युद्ध सत्तावीस दिवस चाललें होतें. हें वर्तमान इंद्रप्रस्थीं कृष्णास कळलें, त्यावरुन तो त्वरें निघून द्वारकेस आला, व शाल्वाशीं अनिवार युद्ध करुन, तो अंतरिक्षांत असतांहि त्यास इतकें जर्जर केलें कीं, तोहि अत्यंत श्रमला होता म्हणून कांहीं वेळ अंतर्धान पावला.

नंतर शाल्वानें अंतर्धान पावून असें केलें कीं, कृष्णाच्या दूतासारखाच एक मायिक दूत निर्माण करुन त्यास त्यानें कृष्णाकडे पाठविलें. त्यानें कृष्णास येऊन सांगितलें कीं, शाल्वानें वसुदेवास बांधून नेल्यामुळें देवकीनें मला तुजकडे हें वर्तमान कळविण्यास पाठविलें आहे. इतकें दूताच्या मुखानें कृष्ण ऐकत आहे तों शाल्व, वसुदेवास खरोखऱ्याप्रमाणेंच कृष्णापुढें घेऊन आला, व कृष्णाची पुष्कळ निर्भर्त्सना करुन त्यासमक्ष त्यानें त्याचा शिरच्छेद केला. तो पाहून कृष्णास शोक झाला. व शोक करीत असतां असतांच पाहतो तर, तो दूत, वसुदेव आणि शाल्व तिघेहि नाहींसे झाले. त्यावरुन कृष्ण समजला कीं, हें सारें शाल्वानें कपट दाखविलें.

सारांश, सौभ विमानांत कृष्णानें शाल्वास पाहून, आपली गदा त्यावर सोडिली, व तें विमान अगदीं फोडून टाकिलें. तेणेंकरून शाल्व निराधार होऊन

भूमीवर आला असतां, कृष्णाचें व त्याचें मोठें युद्ध होऊन त्यांत सैन्यासहवर्तमान तो कृष्णाच्या हातून मरण पावला ( भाग० १० स्कं० अ० ७६-७७ ). ( भार० वन० अ० १४-२२ ). या शाल्वास अनुशाल्व ना० भ्राता होता ( अनुशाल्व श० पहा ).

३-भीमसेनानें मारिलेला एक राजा.

४-भारतवर्षीय देश. हा हस्तिनापुराच्या प्रायः पूर्वेस असावा असें वाटतें.

**शाल्वसेन**-भारतवर्षीय देश ( भार० भीष्म०अ० ९ ).

**शिखंडिनी**-उत्तानपादवंशीय विजिताश्व राजाची स्त्री. हिला पावक, पवमान, आणि शुचि असे तीन पुत्र होते.

२-द्रुपद राजाची कन्या. ही पूर्वजन्मीची काशी राजाची कन्या अंबा होय. हीच पुढें पुरुषत्व पावून, शिखंडी नाम पावली( शिखंडी श० पहा ).

**शिखंडी**-द्रुपद राजा पुत्रार्थ रुद्राराधन करीत असतां, त्यास वरप्रदान झालें कीं, तुला कन्या होईल व तीच कालानुसार पुरुषत्व पावून, भीष्मास युद्धांत मारील. त्यावरून द्रुपद राजा संतुष्ट होऊन स्वनगरास आला, व अल्पच काळानें त्याची स्त्री गर्भिणी होऊन कन्येस प्रसवली. परंतु द्रुपदानें कन्या झाली असें कोणास कळूं न देतां पुत्रच झाला म्हणून सर्वत्र स्फुट करून तिचे पुत्राप्रमाणेंच जातकर्मादिक संस्कार केले पुढें उपनयन झाल्यावर, धनुर्विद्या इ०कांत प्रवीण करून,विवाहकाल प्राप्त झाला असतां द्रुपदास मोठी चिंता प्राप्त झाली; परंतु त्याच्या स्त्रीनें धीर दिला कीं, वरदान अन्यथा व्हावयाचें नाहीं, यास्तव आपण एकादी राजकन्या पाहून विवाह करण्यास मागें पुढें करूं नये. त्यावरून द्रुपदानें धैर्य धरिलें, व आपण आपल्या पुत्राचा विवाह करणार असें वर्तमान त्यानें प्रकट केलें.त्यावरून पश्चिमदशार्ण देशाचा राजा हिरण्यवर्मा त्यानें आपली अतिसुरूप कन्या कृत्रिम शिखंडीस विवाहविधीनें दिली.

कांहीं काळानें हिरण्यवर्म्याची कन्या प्रौढ होऊन, तिला ऋतु प्राप्त झाला असतां, पतीसह एकांती गेली, आणि पाहत्ये तों, तो पुरुष नसून स्त्री आहे. मग ती त्यास कांहींच न बोलतां बाहेर आली, व आठ चार दिवस या गोष्टीस होऊं देऊन, श्वशुराज्ञेनें युक्तीनेंच माहेरीं जाऊन,तिनें हें वर्तमान पित्यास कळविलें. त्यावरून त्यास पराकाष्ठेचा कोप येऊन, तो द्रुपदपुराकडे सैन्य घेऊन येण्यास निघाला. परंतु मार्गी युक्तीनें शोध घ्यावा, केवळ कन्येच्याच सांगण्यावर जाऊं नये, असें त्यानें मनांत आणून, बारीक रीतीनें शोध घेतां त्यास कळलें कीं, शिखंडी हा खरोखरच स्त्री आहे. मग त्यानें दूतासमागमें द्रुपदास असें सांगून पाठविलें कीं, दुष्टा, मूर्खा, हें तूं काय केलेंस ? स्त्रीचा विवाह स्त्रीशींच कसा लाविलास ? अस्तु, आतां तुला या अपराधाचें शासन झालें पाहिजे, म्हणून मी येत आहें, तर युद्धास सिद्ध ऐस.

हिरण्यवर्म्याचा निरोप ऐकून द्रुपदाच्या तोंडचें पाणीच पळालें, आणि आतां पुढें काय करावें म्हणून तो मोठ्या विचारांत पडला; तथापि कांहीं धैर्य व कांहीं भीति मनांत धरून, त्यानें सरासरी निरोप देऊन हिरण्यवर्म्याकडे दूतास परत पाठविलें. हें वर्तमान शिखंडीस कळून तो जो नगरांतून मुकाट्यानेंच पळाला तो नीट एका घोर अरण्यांत शिरला, व तेथें निराहारपूर्वक त्यानें तप आरंभिलें. तेथें असा कांहीं चमत्कार झाला कीं, स्थूणाकर्ण ना० एक यक्ष त्या वनाचा स्वामी होता, तो एकाकीं एके दिवशीं फिरत असतां त्यानें यास निग्रहपूर्वक अनुष्ठान करतां पाहिलें. त्यावरून तो यासमीप येऊन पुसूं लागला कीं, तूं कोण ? व येथें अनुष्ठान किमर्थ करीत आहेस? तेव्हां यानें आपलें सर्व वृत्त त्यास कथन करून पुरुषत्वाची याचना केली. सारांश, स्थूणाकर्णास याची दया आली, व त्यानें सांगितलें, मी माझें पुरुषत्व तुला देऊन तुझें स्त्रीत्व घेतों; मात्र असें कर कीं, तूं पुरुषत्वानें तुझ्या नगरास जा, आणि तुझें जें कार्य संपादन करावयाचें असेल तें संपादून, पुनः येथें परत ये, आणि माझें पुरुषत्व पूर्ववत् मला दे. या तुझ्या कार्याकरितां तूं येथें परत येईपर्यंत मी या वनांतच राहतों. इतकें म्हणून त्यानें आपलें पुरुषत्व यास देऊन त्याचें स्त्रीत्व आपण घेतांच, शिखंडी तेथून निघाला तो मोठ्या हर्षानें पित्यास ( द्रुपदास ) येऊन भेटून, आपण पुरुषत्व संपादून आल्याचें वृत्त त्यास त्यानें निवेदन केलें ( भार० उद्योग० अ० १६५-१८७ ).

शिखंडी पुरुष होऊन आला असें ऐकतांच, द्रुपदास जो हर्ष झाला तो सांगतां येत नाहीं. इतक्यांत हिरण्यवर्मा सैन्यासहवर्तमान द्रुपदपुरास येऊन पोहोंचला. तो आलेला ऐकून, द्रुपदानें त्यास दूतासमागमें निरोप सांगून पाठविला कीं, आपणास मी पूर्वी आपल्याच दूतासमागमें परत निरोप पाठविला असून, आपण पुनः सैन्यासहित युद्धाच्या हेतूनें आलां. अस्तु..

वरें केलेंत, मजकडूनहि युद्धाची सिद्धता आहे; परंतु कन्येच्या सांगितल्यावर केवळ न जातां, आपण आधीं जामाताविषयीं आलेल्या संशयाचें अन्य स्त्रियांच्या द्वारां निराकरण करून घ्याल, तर उभयपक्षींहि चांगलें होईल. त्यावरून हिरण्यवर्म्यानें तरुण व सुरूप अशा कित्येक स्त्रियांकडून शिखंडीच्या पुरुषत्वाची परीक्षा करविली. तींत तो असावा तसा पुरुष आहेसा त्यांनीं निर्णय करून हिरण्यवर्म्यास जाऊन कळविलें. तेव्हां तो पराकाष्ठेचा लज्जित झाला, आणि कन्येस रागें भरून, नगरांत विनयानें येऊन द्रुपदाजवळ त्यानें झालेल्या गोष्टींची क्षमा मागितली. नंतर जामातास वस्त्रें, भूषणें, गज, अश्व, रथ, इ० अनेक वस्तु देऊन संतुष्ट केल्यावर, द्रुपदाचा निरोप घेऊन तो स्वदेशास परत गेला असतां, शिखंडी स्त्रीसहवर्तमान सुखाचा उत्तम प्रकारेंकरून अनुभव घेऊं लागला, व अल्पच काळांत त्याला क्षत्रदेव, ऋक्षदेव, इ० पुत्रहि झाले.

पुढें शिखंडीनें आपलें कार्य झालें असें पाहून, आपण वचन दिल्याप्रमाणें स्थूणाकर्णास त्याचें पुरुषत्व त्यास परत करण्याकरितां त्याच्या वनांत गमन केलें. परंतु तिकडे असें झालें होतें कीं, शिखंडीच्या स्त्रीत्वानें स्थूणाकर्ण आपल्या वनांत गुप्त राहात असतां तेथें कुबेराचें अकस्मात् येणें झालें. असें असून, स्थूणाकर्ण त्यास सामोरा गेला नाहीं, म्हणून कुबेरानें त्याच्या शोधास दूत पाठविले. त्यांनीं शोध घेऊन, व साकल्य वृत्त समजून कुबेरास तें निवेदन केलें. त्यावरून कुबेरानें त्यास आपणासमोर आणवून शाप दिला कीं, तूं असाच स्त्रीरूप राहा. स्थूणाकर्णानें विनंति केली, मी, ही गोष्ट केवळ परोपकारार्थ केली आहे, म्हणून मला इतका दंड नसावा.कुबेर म्हणाला, तर मग शिखंडी पृथिवीवर आहे तोंपर्यंत तूं स्त्री होऊन रहाशील, त्याच्या मरणानंतर पूर्ववत् पुरुष होशील. इतकें बोलून कुबेर गेला, व स्थूणाकर्ण वनांत राहिला आहे इतक्या संधींत, शिखंडी तेथें गेला, व त्याची स्तुति करून म्हणाला कीं, तुझ्या प्रसादानें माझें कार्य झालें, म्हणून मी तुझें पुरुषत्व तुला देऊन माझें स्त्रीत्व परत घेण्यास आलों आहें. असें शिखंडीचें भाषण ऐकून, स्थूणाकर्णानें त्यास आपणास झालेल्या शापाचें वृत्त सांगून म्हटलें, तूं आतां आपल्या नगरास स्वस्थपणें गमन कर. वचन दिल्याप्रमाणें तूं परत आलास, तेणेंकरून मी संतुष्ट झालों आहें. इतकें ऐकतांच शिखंडी हर्षित होऊन स्वनगरास परत आला व त्यानें झालेलें वर्तमान द्रुपदास निवेदन करून तो आनंदानें स्वस्थ राहिला ( भार० उद्योग० अ० १८८–१९२ ).

शिखंडी राज्यकार्यांत दक्ष असून, शस्त्रास्त्रांतहि चांगला प्रवीण होता. यास तुंबर ना० गंधर्वानें दिलेले अश्व, ते तो रथास जोडी. भारतीं युद्धांत हा द्रुपदासमागमें पांडवांकडेस होता, व भीष्माच्या मृत्यूस कारण झाला असे. भारती युद्ध समाप्त झाल्यावर अठराव्या दिवशीं हा शिबिरांत निद्रित असतां, अश्वत्थाम्यानें यास, अनेक वीर मारिले त्यांत मारिलें ( भार० सौप्तिक० अ० ८ ). शिखंडी मरण पावतांच स्थूणाकर्ण यक्ष पूर्ववत् पुरुषत्व पावला.

**शिखाग्रीवी**–तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**शिखावर्ण**–तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**शिखावर्त**–एक गंधर्व.

**शिखिध्वज**–एक राजा. चूडालेचा पति.

२–मयूरध्वजासहि या नांवानें ग्रंथांत म्हटलेलें आहे.

**शिखिवाहन**–मयूरवाहन जो कार्तिकेय त्यास म्हटलें आहे.

**शित**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**शितिकंठ**–नीलकंठ जो महादेव त्यासच हें नांव आहे.

**शिनि**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न दुष्यंतवंशीय मन्युपुत्र गर्गराजा, त्याचा पुत्र. हा गार्ग्यसंज्ञेनें युक्त असा तपेंकरून ब्राह्मण झाला.

२–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतान्वयांत जन्मलेला सात्वतपुत्र वृष्णि त्याचा पौत्र, व युधाजिताच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ.

३–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न वरील युधाजित् त्याच्या अनमित्र ना० दुसऱ्या पुत्राच्या तीन पुत्रांतील मध्यम. यास पुत्र सत्यक नांवाचा होता. हा शिनि मोठा शूर असे. वसुदेवदेवकींचा विवाह झाला, त्या काळीं बहुत राजे विघ्न करण्यास आले असतां, यानें सर्वांचा पराभव केला, व सोमदत्तास तर ठारच मारीत होता, परंतु करुणा येऊन यानें त्यास सोडून दिलें (भार० द्रोण० अ० १४४ ).

४–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतान्वयांतील अनमित्रपुत्र वृष्णि, त्याच्या कुलांत जन्मलेल्या शूरपुत्र भजमानाचा पुत्र. यास पुत्र स्वयंभोज नांवाचा होता.

**शिनिवास**–मेरूच्या कर्णिकापर्वतांतील एक.

**शिपिविष्ट**–महादेव.

**शिप्रा**–पारियात्र पर्वतापासून निघणारी नदी.

**शिवि**-पूर्वेंद्रांतील एक हा पांडवांत एक होऊन जन्मला होता.

२-चक्षुर्मनूस नड्वलेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

३-हिरण्यकशिपूच्या पुत्रांतील एक.

४-प्रल्हादाच्या पुत्रांतील एक.

५-भोजपुरनगरींतील राजा उशीनर, त्यास माधवीपासून झालेला पुत्र ( ३ गालव श० पहा ). यास औशीनर असेंहि म्हटलेलें असून हा राजा मोठा पराक्रमी होता ( भार० शांति० अ० २९ ).

६-( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न महामनाराजाचा पुत्र उशीनर,त्याच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ. यास वृषादर्भ, सुवीर, भद्र, केकय, आणि बृहद्गर्भ, असे पांच पुत्र असत; व हा राजा मोठा धर्मात्मा असे ( भार० द्रोण० अ० ५८ ).

या राजाचें सत्व पाहण्याकरितां ब्रह्मदेव ब्राह्मणरूपानें येऊन, त्यांनीं याच्या पुत्राचें मांस भक्षणास मागितलें. तेव्हां यानें बृहद्गर्भाचा वध करून त्यास पचविलें; परंतु ब्राह्मण कोठें नाहींसा झाला म्हणून हा तें मांसपात्र मस्तकावर घेऊन त्याचा शोध करीत आहे तों, तो ब्राह्मण अश्वागार,व कोशागार इ० कांस अग्नि लावून मुख्य राजमंदिरास अग्नि लावीत आहे असें यानें पाहिलें; परंतु याच्या मनांत कांहीं विकल्प न येऊन, प्रार्थना करून म्हणाला, हें मांस मी सिद्ध करून आणिलें आहें याचा स्वीकार व्हावा. ब्राह्मण म्हणाला, तें तूंच खा, मी खात नाहीं; त्यावरून राजा तें खाणार तों ब्रह्मदेव आपलें रूप प्रकट करून, याचा हात धरून बोलले, तूं दाता खरा आहेस. पुढें त्याचा पुत्र सजीव करून, व अश्वागारादिक पूर्ववत् करून देऊन ते अंतर्धान पावले ( भार० वन० अ० १९४ आणि १९७-१९८ ).

७-गोपति ना० राजाचा पिता.

८-भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा. यास रात्रियुद्धांत द्रोणाचार्यांनीं मारिलें (भार०द्रोण०अ०१५५).

९-भारतवर्षीय देश. हा पश्चिमदशार्ण देशाच्या पश्चिमेस असून, येथें पांडवांच्या वेळेस सुरथ नांवाचा राजा होता. येथील राजास शैब्य हें नांव साधारण असतें ( भार० सभा० अ० ३२ ).

**शिरीष**-एक ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

**शिरीषी**-विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक.

**शिलायूप**- ,, ,,

**शिलार्दनि**-द्वितीय अत्रिकुलोत्पन्न ऋषि.

**शिलास्थलि**-तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**शिलीन**-जित्वाऋषींचा पिता.

**शिव**-हरिहर शब्द पहा.

२-प्रियव्रतपुत्र इध्मजिव्ह, त्याच्या सात पुत्रांतील ज्येष्ठ. याच्या वर्षास हेंच नांव आहे.

३-प्लक्षद्वीपांतील साहवा वर्ष.

४-उत्तम मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक.

५-कोणत्याहि रुद्रास साधारण नांव.

६-तृतीय अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

७-नित्यमुक्त शिवाच्या सर्व विभूतींवरहि या शब्दाचा प्रयोग आढळतो.

**शिवकर्ण**-३ वासिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**शिवकारिणी**-अच्छोदक्षेत्रांतील सतीची विभूति.

**शिवकुंड**-भारतवर्षीय तीर्थ.

**शिवदूती**-पार्वतीची एक शक्ति.

**शिवधारा**-भारतवर्षीय तीर्थ.

**शिवमती**-तृतीय अंगिराकुलोत्पन्न एक ऋषि.

**शिवलिंग**-भारतवर्षीय क्षेत्र.

**शिवलोक**-नित्यमुक्त जो शिव, तो जेथें साकार होऊन राहतो, तो लोक. कलास शब्दाची प्रवृत्ति यावरहि आहे; परंतु ती युक्त नाहीं.

**शिवा**-शिवाची शक्ति.

२-अनलवसूची स्त्री.

३-भारतवर्षीय नदी.

**शिवोद्भेद**-भारतवर्षीय तीर्थ.

**शिशिर**-मेरूच्या कर्णिकापर्वतांतील एक.

२-धर ना० वसूच्या पुत्रांतील एक.

३-विश्वामित्रकुलोत्पन्न एक ऋषि.

**शिशिरगिरि**-हिमालय पर्वतास नांव ( भार० द्रोण० अ० २०२ ).

**शिशु**-कौशिकऋषींचा शिष्य एक ब्राह्मण.

**शिशुपाल**-( सो० वं० ) यदुपुत्र क्रोष्टा, तद्वंशीय ज्यामघपुत्र विदर्भ राजा, त्याचा रोमपाद ना० जो तृतीय व कनिष्ठ पुत्र, त्याच्या कुलांत जन्मलेल्या दमघोष राजाचा पुत्र. हा, वसुदेवभगिनी श्रुतश्रवा तिच्याठायीं झाला होता. हा, चेदिराजाचा वंशज म्हणून, यास चैद्य असेंम्हटलेलें आहे. हिरण्यकशिपूच्या अंशानें हा जन्मला होता.याचें ज्या काळींजन्म झालें,त्या काळीं यास तीन नेत्र व चार हात होते.यानेंजन्मतांच खरासारिखा कर्कशशब्द केला,त्यावरून चेदिराजास व त्याच्या स्त्रीस दुःख झालें.नंतर त्यांनीं याचा त्याग करावा

असें मनांत आणून, तो टाकण्यास सिद्ध झाले आहेत तों, आकाशवाणी झाली कीं, याचा त्याग करूं नका; कारण हा श्रीमान्, व बलवान् होईल. तो ऐकून मातापितरांनीं पुनः अपौरुषी वाणीस नमस्कार करून विचारिलें कीं, याचा मृत्यु कोणापासून आहे तें आम्हांस सांगावें. त्यावरून पुनः शब्द झाला, ज्याच्या मांडीवर यास ठेविलें असतां, याचे दोन भुज व तिसरा नेत्र गळून पडेल, तो याचा शत्रु समजा. सारांश, चेदिराजास असा चमत्कारिक पुत्र झालेला ऐकून, देशोदेशींचे राजे, दमघोषराजास भेटावयास येत, व तोहि या पुत्रास प्रत्येकाच्या मांडीवर देई.

हें वर्तमान द्वारकेंत कृष्णबलरामांस समजल्यावर, तेहि, दमघोषाची स्त्री, वसुदेवाची भगिनी असल्यामुळें, त्यांची आत होती म्हणून, तिला भेटून हा तिचा पुत्र पाहवा अशा हेतूनें शुक्तिमती नगरीस आले. त्यांनीं राजाची व आपल्या आतेची भेट घेतल्यावर, तिनें या पुत्रास बलराम, व कृष्ण यांच्या मांडीवर अनुक्रमानें दिलें. परंतु त्यांत कृष्णाच्या मांडीवर देतांच, शिशुपालाचे दोन भुज, व तिसरा नेत्र गळून पडला. तेव्हां श्रुतश्रवा भयभीत होऊन कृष्णास म्हणाली, देववाणीवरून याचा मृत्यु तुझ्या हस्तें निश्चित आहे. त्या अर्थी मला असें वचन दे कीं, मी यास मारणार नाहीं. कृष्ण म्हणाला, दैवी वाणी अन्यथा होणार नाहीं, यास्तव मी तुला असें वचन देतों कीं, याचे तुजकरितां मी शतापराध क्षमा करीन, त्यावरून तिला संतोष होऊन तिनें कांहीं दिवस त्यांस ठेवून घेतलें, व तेहि थोडे दिवस राहून, तिला पुसून परत द्वारकेस आले.

पुढें शिशुपाल दिवसेंदिवस वाढत जाऊन मोठा झाला, व पराक्रमीहि निपजला असें पाहून, विदर्भराजा भीष्मक, त्याच्या रुक्मी ना० ज्येष्ठ पुत्रानें आपली भगिनी रुक्मिणी ती, यास देण्याचा निश्चय केला. म्हणून दमघोष राजा सहपरिवार याच्या विवाहार्थ कुंडिनपुरास आला, व त्यानें तेथें येऊन, विवाहापूर्वीचीं जीं कर्में कर्तव्य होतीं तीं: सर्व केलीं: परंतु तो विवाह सिद्धीस न जातां, शिशुपाल हा अपमान पावून परत शुक्तिमतीस गेला.

कांहीं काळानें युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ इंद्रप्रस्थीं आरंभिला असतां, त्या समारंभास तेथें देशोदेशींचे राजे एकत्र झाले होते, त्यांत शिशुपालहि होता. त्या समयीं अग्रपूजा कोणास द्यावी, तीविषयीं वादविवाद होऊन, भीष्मानुमतें कृष्णास ती द्यावी असें ठरलें.

त्यावरून युधिष्ठिर कृष्णाची पूजा करूं लागला (भार० सभा० अ० ३६ ). ही गोष्ट शिशुपालास सहन न होऊन, तो भीष्माची व कृष्णाची निंदा करूं लागला. परंतु त्याचें कोणी ऐकेना असें पाहून, तो त्या सभेंत उभा राहून मोठ्यानें बोलूं लागला कीं, येथें देवर्षि, ब्रह्मर्षि, व राजर्षि असे मोठमोठे असतां, या गोपपुत्राची पूजा येथें होत आहे हें चांगलें नाहीं. इतकें बोलून भीष्मास अनेक दुर्वाक्यांनीं ताडन करूं लागला, व त्यामुळें याचे पक्षपाती राजेसुद्धां युद्धाविर्भावानें सभेंत उभे राहिले. असें पाहून भीमास अनिवार क्रोध येऊन तो शिशुपालावर धांवला, परंतु द्रोणाचार्यांनें त्यास धरून बसविलें असतां, भीष्मांनीं भीमास याच्या जन्मकाळचें वृत्त सांगून सांत्वन केलें कीं, तूं याच्या भाषणाकडे अगदीं लक्ष देऊं नको, याचा मृत्युकाळच समीप आल्यामुळें हा अशी बडबड करीत आहे. त्यावरून भीमसेन स्तब्ध राहिला. तेव्हां शिशुपालास, अधिक आवेश येऊन तो भीष्मास म्हणाला, तुम्ही भीमाचें निवारण कां करितां ? त्याला माझ्या अंगावर येऊं द्या, मी त्याचा प्राण घेतों कीं नाहीं पहा. इतकें बोलून पुनः भीष्मास म्हणूं लागला, हे मूर्खा, वृद्धा, नपुंसका भीष्मा, या सभेंत अनेक महान् महान् राजे असतां, तूं या गोपाच्या पोराची पूजा व स्तुति करून इतरांचा अपमान करतोस, या तुझ्या करण्यास म्हणावें तरी काय ? नंतर कृष्णास अनेक दुर्भाषणांनीं ताडन करीत म्हणूं लागला कीं, तूं केवळ नीच दास असून, मोठा दुर्मति आहेस. तुला राजा असें कोण म्हणत असतील ते म्हणोत, परंतु माझ्या मतें तूं राजा मुळींच नाहींस. जे मूर्ख तुझी पूजा करूं म्हणतात, त्यांचा पहा मी आतांच वध करितो. फार तर काय, परंतु तुझी इच्छा असेल तर, तूं मशीं युद्धास ये, म्हणजे तुझाहि वध करितों कीं नाहीं पहा. सारांश, जरासंधवधादिक अनेक कृत्यांच्या यानें कृष्णाच्या उखाळ्या पाखाळ्या काढून त्याची अनिवार निंदा केली.

इतका प्रकार होईपर्यंत कृष्ण अगदीं स्तब्ध बसून याचें सर्व भाषण ऐकत होता, व शिशुपालाचे शेवटचे शब्द ऐकून तो उगाच राहिल्यावर, मंद व मृदु वाणीनें त्यानें भाषणास आरंभ केला. तो असा.—अहो संपूर्ण ऋषि व राजे हो, हा शिशुपाल माझ्या पितृभगिनीचा पुत्र आहे, यानें आमच्या सात्वत कुलाचा द्वेष आरंभून आम्हास बहुता प्रकारें पीडा दिली. आमची द्वारकापुरी दग्ध केली, भोजराजा रैवतक पर्वतावर

क्रीडा करावयास गेला असतां, त्यास एकाकी पाहून बांधून नेलें. माझा पिता वसुदेव यज्ञ करूं लागला, तेव्हां यानें यज्ञिय अश्व मारून यज्ञास विघ्न केलें. बभ्रु ना० यादवाची भार्या, तसीच भरा, या दोघींचें अनीतीनें हरण केलें. याशिवाय माझ्या पश्चात् यानें माझे बहुत अपराध केले. त्या सर्वांची मीं पितृभगिनीस दिलेल्या वचनाकडे लक्ष देऊन क्षमा केली. प्रस्तुत तर भीष्मादिक श्रेष्ठ जनांचा व माझा अपमान तुम्हांसमक्षच केल्यामुळें याच्या शतापराधांची भरती होऊन गेली आहे. यास्तव आतां मी याचा अपराध सहन करणार नाहीं. इतकें बोलून त्यानें आपलें दिव्य चक्र शिशुपालावर सोडतांच, याचें मस्तक त्या सभेंत तत्काळ तुटून हा मरण पावला ( भार० सभा० अ० ४५ ). ( भाग० १० स्कं० अ० ७४ ).

शिशुपालास धृष्टकेतु, सुकेतु, करकर्ष, शरभ, इ० पुत्र, व करेणुमती ना० एक कन्या होती. ती हा मेल्यावर धृष्टकेतु, राज्यावर बसला असतां, त्यानें, युधिष्ठिराचा भ्राता नकुल त्यास दिली.

**शिशुमार**–स्वायंभुव मन्वंतरांतील एक प्रजापति. याची कन्या भ्रमी ती यानें ध्रुवास दिली होती.

**शिष्ट**–उत्तानपादपुत्र ध्रुव त्यास धन्या ना० दुसऱ्या स्त्रीपासून झालेला पुत्र. यास सुच्छाया स्त्री असून कृप, रिपुंजय, वृत्त आणि वृक, असे चार पुत्र होते ( मत्स्य० अ० ४ ).

**शिक्ष**–ऋषभ पर्वतावर राहणाऱ्या गंधर्वांतील एक.

**शीघ्र**–(सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ध्रुवसंधि राजाचा पुत्र सुदर्शन त्याचा पौत्र. अग्निवर्ण राजाचा पुत्र. याचा पुत्र मरुराजा.

**शीघ्रग**–संपातीच्या पुत्रांतील एक.

**शीततोया**–पुत्रार्थ वरुणाची स्त्री झालेली, पृथिवीवरील, याच नांवाच्या नदीची मूर्तिमान् देवता. हिचा पुत्र श्रुतायुध. हा भारती युद्धांत मरण पावला ( श्रुतायुध श० पहा ).

**शीतवृत्त**–एक ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा. )

**शीला**–विंध्याचलापासून निघणारी नदी.

**शुक**–ऋषभ पर्वतावरील एक गंधर्व.

२–कृष्णद्वैपायन व्यासाचा पुत्र. घृताची अप्सरा शुकीच्या रूपानें भूमीवर संचार करीत असतां, ती दिव्यरूप धारण केलेली व्यासाच्या दृष्टीस पडली. तिला पाहून व्यासाचें रेत पतन पावलें, तेथून झालेला हा पुत्र म्हणून यास असें नांव पडलें. हा पुत्र व्यासास शिवप्रसादानें झाला असून, हा उत्पन्नज्ञानीच जन्मला होता. परंतु यास किंचित् ज्ञानाभिमान होता म्हणून व्यासांनीं जनक राजाकडे आधीं जाऊन मग तुला हवें असेल तिकडे जा म्हणून आज्ञा केली. त्यावरून हा बहुलाश्व ना० जनकाकडे जाऊन ज्ञानाभिमानरहित झाला (भार० शांति० अ० ३२४–३२५). (देवीभा० १ स्कं० अ० १४ ).

कृष्णद्वैपायन व्यासांनीं, कृष्णचरित्रवर्णनपर केलेलें भागवत, यास पढविलें होतें. त्याविषयीं याची उक्ति अशी आहे—

श्लोक–

" इदं भागवतं नाम पुराणं वेदसंमितं ॥
अधीतवान् द्वापरेऽस्मिन् पितुर्द्वैपायनादहम् ॥ "

तेंच यानें पुढें, परिक्षित् राजास सांगितलें ( भाग० १ स्कं० अ० १९ ). शुकास बर्हिषद ना० पितरांची मानसकन्या पीवरी अ० वीरिणी ती स्त्री असून, कृष्ण, गौरप्रभ, शंभु, भूरिश्रुत, आणि जय असे पांच पुत्र. आणि कृत्वी अ० कीर्तिमती ना० एक कन्या होती, ती सोमवंशीय पूरुकुलोत्पन्न पार अ० विभ्राज राजाचा पुत्र नीप किं० अणुह राजा, त्यास दिली होती ( भाग० ९ स्कं० अ० २१ ). ( देवीभा० १ स्कं० अ० १९ ). ( मत्स्य० अ० १५ ).

३–इरावानानें मारिलेला शकुनीच्या भ्रात्यांतील एक ( भार० भीष्म० अ० ९० ).

४–रावणपक्षीय दोन राक्षस. त्यांत एक अमात्य असून एक हेर होता.

५–एक यादव.

**शुकनाभ**–रावणपक्षीय राक्षस (वा० रा० सुंदर स०६).

**शुकरहस्य**–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**शुकी**–कश्यपापासून ताम्रेस झालेल्या कन्यांतील एक.

२–प्रथमार्थक अनलेची कन्या.

**शुक्तिमती**–ऋष्यवान् पर्वतापासून निघालेली नदी.

२–चेदि देशाची राजधानी.

**शुक्तिमान्**–भारतवर्षीय उपपर्वत. हा भल्लाट देशाच्या पूर्वेस असून, यापासून काशिका, सुकुमारी, मंदगा, मंदवाहिनी, कृपा आणि पाशिनी, अशा नद्या निघतात ( मत्स्य० अ० ११३ ).

**शुक्र**–उत्तम मनूच्या पुत्रांतील एक.

२–वारुणि भृगूस पुलोमा स्त्रीपासून झालेल्या सात पुत्रांतील पांचवा. यास शतपर्वा ना० स्त्री असून, तिच्या ठायीं त्वष्टाधर, अत्रि, रौद्र आणि कर्मी, असे चार पुत्र झाले होते. हा असुरांचा पुरोहित असल्यामुळें प्रस्तु-

तच्या पुरंदर इंद्रानें आपली कन्या जयंती याला बुद्धिपूर्वक भार्यार्थ दिली होती, तिच्या ठायीं यास झालेली एक कन्या देवयानी प्रसिद्धच आहे. हा भृगुपुत्र भार्गव नांवानें ग्रंथांत आढळतो.

३–वैश्रवणाचा एक धनाध्यक्ष.

४–वारुणि कवीच्या आठ पुत्रांतील चौथा उशना, त्यास म्हटलेलें आहे.

५–वर्षांतील मासानुक्रमानें तिसरा मास. याची पूर्णिमा ज्येष्ठा नक्षत्रानें युक्त असते म्हणून यास ज्येष्ठ असें म्हटलेलें आहे. या मासांत सूर्यमंडलाधिपति मित्र ना० आदित्य असून, त्यासमागमें अत्रि ऋषि, मेनका अप्सरा, हाहा गंधर्व, तक्षक नाग, रथस्वन यक्ष, आणि पौरुषेय राक्षस, इतके संचार करण्यास असतात(भाग० १२ स्कं० अ० ११ ).

६–विष्णुपद पर्वतावर बसून, धर्मरथ राजासहवर्तमान यज्ञसंबंधीं सोमपान केलेला एक राजा ( मत्स्य० अ० ४८ ).

७–होणाऱ्या सावर्णि मनूच्या पुत्रांतील एक.

८–एक नाग ( १३ शुचि श० पहा ).

**शुक्राचार्य**–द्वितीयार्थक शुक्र तोच.

**शुक्ल**–उत्तानपादवंशीय हविर्धान राजास हविर्धानीपासून झालेल्या साहा पुत्रांतील तिसरा.

२–भारती युद्धांत कर्णानें मारिलेला पांडवपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ५६ ).

३–क्रौंच द्वीपांतील एक पर्वत.

**शुक्ला**–क्रौंच द्वीपांतील नदी.

**शुंग**–भरद्वाजांगिरसकुलोत्पन्न एक ऋषि.

**शुचि**–अग्नीस स्वाहेपासून झालेल्या चार पुत्रांतील तिसरा. सूर्याच्या उद्देशानें करावयाचें हवन यावर होतें म्हणून, यास सौर असें नामांतर आहे. हा वानप्रस्थास, पूज्य अग्नि म्हटलेला आहे.

२–उत्तानपादवंशीय विजिताश्व राजाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. हा पूर्वीचा अग्निपुत्र होय.

३–उत्तम मनूच्या पुत्रांतील एक.

४–वारुणि भृगूच्या सात पुत्रांतील तिसरा.

५–बारा भार्गवदेवांतील पांचवा.

६–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

७–( विदे० वं० ) शतद्युम्न जनकाचा पुत्र. याचा पुत्र सनद्वाजजनक.

८–( सो० वं० ) आयुपुत्र अनेना त्याचा पौत्र, व शुद्ध राजाचा पुत्र. याचा पुत्र त्रिककुत्.

९–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न  सुव्रतु, त्याच्या जरासंधवंशांत जन्मलेल्या विप्र ना० राजाचा पुत्र. याचा पुत्र क्षेम राजा.

१०–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतपुत्र अंधक,त्याच्या चार पुत्रांतील तिसरा.

११–इंद्रसावर्णि मन्वंतरांत स्वर्गामध्यें होणारा इंद्र.

१२–इंद्रसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सप्तर्षींतील एक.

१३–मासानुक्रमानें वर्षांतील चौथा मास. याची पूर्णिमा पूर्वाषाढा नक्षत्रानें युक्त असल्ये म्हणून, यास आषाढ असें म्हटलेलें आहे. या मासांत सूर्यमंडलाधिकारी वरुण ना० आदित्य असून, त्यासमागमें वसिष्ठ ऋषि, सहजन्या अप्सरा, हूहू गंधर्व, सहजन्य यक्ष, चित्रस्वन राक्षस, आणि शुक्र नाग, हे संचार करण्यास असतात ( भाग० १२ स्कं० अ० ११ ).

**शुचिका**–एक अप्सरा.

**शुचिस्मिता**–प्राधेच्या अप्सरा कन्यांतील एक.

**शुची**–कश्यपापासून ताम्रेस झालेल्या कन्यांतील एक.

**शुंडिक**–कर्णानें आपल्या दिग्विजयकाळीं जिंकलेला देश. ( भार० वन० अ० २५४ ). हा कोणीकडे होता तें आढळत नाहीं.

**शुद्ध**–( सो० वं० ) आयुपुत्र अनेनाराजा त्याचा पुत्र. याचा पुत्र शुचि ना० राजा.

२–इंद्रसावर्णि मन्वंतरांत होणार आहेत सप्त ऋषि, त्यांमध्यें एक होईल तो.

**शुद्धोद**–पुष्करद्वीपाच्या आसमंतात् असणारा गोड्या पाण्याचा महासमुद्र तो. हा चौसष्ट लक्ष योजनें रुंद असून याच्या आसमंतात् १० कोटी योजनें रुंदीची स्वर्णमयभूमि आहे.

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्षवंशीय शाक्यराजाचा पुत्र. याचा पुत्र लांगल अ० पुष्कल राजा.

**शुनक**–भृगुकुलोत्पन्न रुरुऋषीस प्रमद्वरा अप्सरेपासून झालेला पुत्र व त्याचें कुल तें. याचा पुत्र शौनकऋषि.

२–( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या गृत्समद ना० पुत्राचा पुत्र. याचा पुत्र शौनक राजा.

३–( विदे० वं० ) ऋतसंज्ञक जनकाचा पुत्र. याचा पुत्र वीतिहव्य जनक.

४–रिपुंजय राजाचा दुष्ट अमात्य. त्यानें यास मारून, आपल्या प्रद्योत पुत्रास राजा केलें ( ३रिपुंजय श० पहा ).

**शुनःपुच्छ**–भृगुकुलोत्पन्न अजीगर्त ना० ब्राह्मणाचा पुत्र. हा त्याच्या तीन पुत्रांत ज्येष्ठ होता.

**शुनःशेप**-भृगुकुलोत्पन्न अजीगर्त ना० ब्राह्मणाचा मध्यम पुत्र. याचा इतिहास आढळतो तो असा.-सूर्यवंशीय प्रसिद्ध हरिश्चंद्र राजा, त्याला बहुत कालपर्यंत संतति नव्हती म्हणून त्यानें वसिष्ठास प्रार्थना केली कीं, मला पुत्र होईल असें करा. त्यावरून त्यानें त्यास वरुणाचें आराधन करायास सांगितलें. हरिश्चंद्र लागलाच आराधनास बसला, व त्यानें कित्येक कालानंतर वरुणास प्रसन्न करून पुत्र मागितला. वरुणानें सांगितलें, तुला पुत्र होईल, परंतु तो झाल्यावर तूं त्यानेंच माझें यजन करावेंस. हें म्हणणें हरिश्चंद्रास जरी मान्य करणें अवघड वाटलें, तरी त्यानें तें मान्य केलें. त्यावरून वरुण तथास्तु म्हणून गेला असतां, हरिश्चंद्रास अल्पच काळांत पुत्र झाला, व त्यानें त्याचें नांव रोहित असें ठेविलें.

हरिश्चंद्रास पुत्र होतांच वरुण त्याकडे येऊन म्हणाला, राजा, तुला पुत्र झाला, आतां मला पुत्र अर्पून त्यानें माझें यजन कर. राजा म्हणाला, त्याला अजून दहा दिवस झाले नाहींत, यास्तव दहा दिवस होऊंदे. दहा दिवस होतांच वरुण आला, तेव्हां राजा म्हणाला, मास होऊंदे, मास होतांच वरुण आला असतां, दांत येऊंदे. याप्रमाणें चूडाकर्म ( शेंडी राखण्याचा संस्कार ) होऊंदे, उपनयन ( गुरुकडे वेदाध्ययनार्थ जाणें ) होऊंदे, समावर्तन (गुरुकडून अध्ययन करून परत येणें व सोडमुंज होणें ). होऊंदे, याप्रमाणें निमित्तें सांगून सांगून त्यानें वरुणास बरेच वेळां माघारें लाविलें. हें वर्तमान रोहितास कळल्यावर त्यानें विचार केला कीं, आपण येथें राहिल्यास आतां मात्र पिता आपल्याला निश्चयेंकरून वरुणास अर्पील. तर आपण येथून नाहींसें व्हावें हेंच बरें असें म्हणून तो अरण्यांत निघून गेला.

हरिश्चंद्राकडून वरुणाचा आशाभंग बहुत वेळां झालाच होता, व त्यावर रोहित पळून गेला, त्यामुळें असें झालें कीं, हरिश्चंद्रास जलोदरव्याधि उत्पन्न झाली. हें वर्तमान रोहितास अरण्यांत कळल्यावर, आपणानिमित्त आपल्या पित्यास व्याधि झाली आहे, त्या अर्थी आपण आतां नगरांत जाऊन वरुणास अर्पण व्हावें, व पित्यास व्याधिमुक्त करावें, असें त्यानें मनांत आणून, तो नगराकडे येण्यास निघाला. परंतु प्राण हा कोणास प्रिय नाहीं, म्हणून रोहितासच नसेल ? त्यामुळें जावें न जावें असें करीत आहे तों, अजीगर्त नांवाचा परमद्रव्यलोभी ब्राह्मण त्याच्या दृष्टीस पडला. त्यावरून रोहितानें सहजीं त्यास पुसलें कीं, तुला तीन पुत्र आहेत, यांतून एक, तूं मला द्रव्य घेऊन वरुणास अर्पिण्याकरितां देशील काय ? असें ऐकून लागलाच अजीगर्त द्रव्यलोभास्तव तथास्तु म्हणाला. म्हणून रोहितानें त्यास आपणासमागमें नगरांत आणून इच्छित द्रव्य दिलें, व त्यानें दिलेला शुनःशेप ना० मध्यम पुत्र घेऊन, हरिश्चंद्रास(पित्यास) दाखवून बोलला कीं, हा वरुणास अर्पण करून आपण व्याधिमुक्त व्हावें.

नंतर हरिश्चंद्रानें लागलीच यज्ञाची सिद्धता केली, व ऋत्विजांची योजना अशी केली कीं, विश्वामित्रास त्यानें होता ( हवन करणारा ) ऋत्विज करून अध्वर्यु जमदग्नि, व उद्गाता अयास्य ऋषि क्रमानें केले, तसाच वसिष्ठास ब्रह्मा करून यज्ञास आरंभ करविला. त्या यज्ञांत इंद्रानें हर्षेकरून हरिश्चंद्रास सुवर्णाचा रथ दिला ( भार० सभा० अ० १२).सारांश, शुनःशेपास पशु कल्पून त्यास यूपाशीं ( यज्ञस्तंभाशीं ) बांधून ठेविलें होतें, त्याची शामित्रकर्म ( मारण्याचें कर्म ) करण्याची संधी येऊन पोहोंचली, तेव्हां तो मोठ्यानें रडूं लागला. असें पाहून शामिता ( पशु मारण्याचें कर्म करणारा ) उपऋत्विज त्याच्यानें, त्याचा वध करवेना. तेव्हां अजीगर्त यज्ञ पाहण्यासाठीं तेथें राहिलाच होता, तो पुढें होऊन, मी याचा वध करितों असें म्हणाला असतां, त्याचा सर्वांनीं निषेध केला. तात्पर्य, विश्वामित्रास शुनःशेपाची अत्यंत दया येऊन, त्यानें त्यास वरुणाचा मंत्र उपदेशून त्याकडून त्याचा जप करवितांच तेथें वरुण प्रकट झाला,व त्यानें हरिश्चंद्रास,मला तुझा बली पावला,असें म्हणून त्यास व्याधिमुक्त केलें व यज्ञ समाप्त करवून तो अंतर्धान पावला. त्यामुळें शुनःशेपास देवरात असें नांव पडलें; कारण वरुणदेवानें त्याचें रक्षण केलें होतें.

वरुण संतुष्ट होऊन गेल्यावर शुनःशेपानें विचार केला कीं, इतःपर अशा निर्दय पित्याकडे मला जाणें तर नाहींच, तथापि सभासद सांगतील तसें करावें. याप्रमाणें मनांत आणून सर्वांस त्यानें असा प्रश्न केला कीं,आतां येथून मी आपणास कोणाचा पुत्र म्हणवावें, तें कृपा करून यथार्थ सांगा.त्यावर सभेंत बरीच भवति न भवती होऊन, वसिष्ठांनीं सांगितलें कीं, विश्वामित्रानें यास मंत्रोपदेश करून वांचविलें आहे, यास्तव हा विश्वामित्राचें पुत्रत्व पावला आहे.इतकें ऐकतांच हा विश्वामित्रासमागमें निघून गेला, व भृगुगोत्रोत्पन्न असून कौशिकगोत्री झाला. पुढें विश्वामित्रानेंहि

आपल्या पुत्रांत यास ज्येष्ठत्व दिलें असतां, विश्वामित्रकुलांत हा विख्यात मंत्रद्रष्टा झाला ( भार० अनुशा० अ० ३ ). ( देवीभा० सप्तमस्कं० अ० १४-१७ ).

**शुनी**-ऋष्यवान् पर्वतापासून निघालेली नदी.

**शुनोलांगूल**-अजीगर्ताचा कनिष्ठ पुत्र.

**शुभ**-स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषीपासून श्रद्धेस झालेला पुत्र.

**शुंभ**-निशुंभाचा ज्येष्ठ भ्राता ( शुंभनिशुंभ श० पहा ).

२-तारकासुराचा सेनापति ( मत्स्य० अ० १५१ ).

३-रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० उत्तर० स० ४० ).

**शुंभनिशुंभ**-शुंभ आणि निशुंभ हे दोन असुर उभयतां भ्राते होते. यांनीं पुष्करतीर्थीं अयुत वर्षेपर्यंत तप करून ब्रह्मदेवास प्रसन्न केलें व अमरत्व मागितलें. परंतु ब्रह्मदेवांनीं तें अमान्य करून दुसरें कांहीं मागा म्हणून म्हटल्यावरून, पुरुषव्यक्तीपासून आम्हास मृत्यु नसावा, असें त्यांनीं मागितलें. त्यास ब्रह्मदेव तथास्तु म्हणून अंतर्धान पावले असतां यांनीं त्रैलोक्यास पीडा आरंभिली. चंड, मुंड, रक्तबीज, धूम्रलोचन, इ० अनेक असुर यास येऊन मिळाले. नंतर त्या सर्वांनीं शुंभास राजा केलें, व आपण त्याच्या आज्ञेंत वर्तूं लागले. अल्पच काळांत शुंभानें भूमि जिंकून इंद्रलोकीं गमन केलें. व त्याचें पद हरण करून, लोकपालांचेहि अधिकार आपणाकडे घेतले. त्यामुळें ते ते देव गिरिकंदरांतून वास करून राहिले ( देवीभा० ५ स्कं० अ० २१ ).

शुंभाच्या त्रासानें देवांनीं बराच काळ अरण्यांत वास केला, व पुढें बृहस्पतीच्या अनुमतानें हिमालयावर देवीचें दीर्घकालपर्यंत स्तवन केलें. देवीनें प्रसन्न होऊन देवांस अभय दिलें, व लागलीच कालरात्रि अथवा कालि ना० शक्ति उत्पन्न करून तिला सिंहारूढ करून शुंभनिशुंभांच्या नगरावर पाठविलें. ती यांच्या नगरासमीप जाऊन मधुर व सुस्वर असें तिनें प्रथमतः तेथें गायन आरंभिलें,व रूपहि इतकें मनोहर धारण केलें होतें कीं, असुरांनीं त्यास पाहून तत्काळ मोह पावावा. इतक्यांत तिला चंडमुंडांनीं पाहिलें, आणि लागलेंच शुंभनिशुंभांस येऊन कळविलें. त्यावरून त्यांनीं आपला सुग्रीव ना० दूत तिला आपणाकडे घेऊन येण्याकरितां पाठविला. तो तिशीं कांहीं भाषण करून परतला, व शुंभनिशुंभांस असें सांगूं लागला कीं, ती स्त्री उत्तम आहे, परंतु तिचें म्हणणें, जो मला युद्धांत जिंकील त्यास मी वरीन असें आहे. ( देवीभा० ५ स्कं० अ० २२-२३ ). त्यावरून त्यांनीं तिला धरून आणावें म्हणून धूम्रलोचनास पाठविलें. त्यानेंहि तिशीं अनेक प्रकारें शृंगारपर भाषण केलें, व म्हणाला, तुझी इच्छा वाटेल त्यास तूं दोघांतून वर. तें ऐकून देवीनें त्याचा धिक्कार केला, व शेवटीं त्याचें तिशीं युद्ध होऊन तो तिच्या हातून मरण पावला. त्यापुढें चंडमुंड आले तेहि असेच युद्ध करून मरण पावले ( अ० २४-२६ ). पुढें रक्तबीजाचें तिशीं युद्ध होऊन तो मरण पावला असतां, निशुंभ युद्धास आला ( रक्तबीज श० पहा ). सारांश, निशुंभ मरण पावून शुंभहि मरण पावला ( देवीभा० ५ स्कं० अ० ३०-३१ ).

**शुभा**-बृहस्पतीच्या दोन स्त्रियांतील एक.

**शुभांगद**-द्रौपदीस्वयंवरांतलि एक राजा( भार० आदि० अ० १८६ ).

**शुभानन**-कद्रुपुत्र नागांतील एक.

**शुभ्र**-रैवत मन्वंतरांतल्या विष्णूच्या अवताराचा पिता.

**शुल्व**-उदंक ऋषीचा पिता.

**शुष्करेवती**-एक देवतावि०. ( १ अंधक श० पहा ).

**शून्यबंधु**-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न तृणबिंदु राजर्षीचा मध्यम पुत्र.

**शूर**-मगध देशाचा प्राचीन राजा. सू० वं० दशरथ राजाची स्त्री सुमित्रा तिचा पिता, व लक्ष्मणाचा मातामह.

२-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न कार्तवीर्य राजाच्या पुत्रांतलि एक. यास शूरसेन असेंहि म्हटलेलें आहे.

३-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतपुत्र वृष्णि तद्वंशीय दुसरा वृष्णि, त्याच्या विदूरथ ना० पौत्राचा पुत्र, चित्ररथाचा पुत्र. याचा पुत्र भजमान.

४-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतान्वयसंभूत अनमित्र राजा, त्याच्या वृष्णि ना० पुत्राच्या वंशांतील हृदिकपुत्र देवमीढ राजाचा पुत्र. यास,आर्यक नागाची कन्या भोजा अ० मारीषा ना०स्त्री असून,तिच्या ठायीं यापासून **वसुदेव** अ० आनकदुंदुभि, **देवभाग, देवश्रवसू, आनक, सृंजय, श्यामक, कंक, शमीक, वत्सक, वृक**, असे दहा पुत्र; व **पृथा, श्रुतदेवा, श्रुतकीर्ति, श्रुतश्रवा**, आणि **राजाधिदेवी**, अशा पांच कन्या मिळून पंधरा अपत्यें झालीं होतीं.यांत पृथा कुंतिभोजानें याजपासून दत्त घेऊन ती त्यानें पंडुराजास दिली होती. नंतर राहिलेल्या चार कन्यांतलि यानें **श्रुतदेवा**,करूषदेशीय राजा वृद्धशर्मा त्यास; **श्रुतकीर्ति**, केकयदेशाधिपति वृष्टकेतूस; श्रुत-

श्रवा, चेदिदेशीय दमघोष राजास; आणि राजाधिदेवी, अवंत्यराजा जयसेन त्यास दिली होती. या शूर राजाच्या कुलांतील यादवांस शौरि अशी संज्ञा असून विशेष प्रसिद्धि कृष्णाविषयीं असे.

५.–जयद्रथाचा मित्र एक राजा ( ३ जयद्रथ श० पहा).

६–वसुदेवास मदिरा स्त्रीपासून झालेल्या पुत्रांतील एक

८–कृष्णास भद्रेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**शूरतर**–एक राजा, हा मोठा बलाढ्य असून, यानें पटच्चर ना० राक्षसास मारिलें होतें. हा भारती युद्धांत पांडवांकडे असून, याच्या रथाचे अश्व हिरव्या रंगाचे असत ( भार० द्रोण० अ० २३ ).

**शूरभू–भूमि**–उग्रसेन राजाच्या कन्यांतील एक. ही वसुदेवभ्राता श्यामक त्याची स्त्री होती.

**शूरसेन**–देश. हा दक्षिणपश्चिमदिशाभेदानें दोन प्रकारचा. तो त्या त्या अक्षरक्रमांत पाहावा.

२–कार्तवीर्य राजाचा पुत्र जो शूर तोच.

३–कर्णानें मारिलेला भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ४८ ).

**शूर्पणखा–खी**–विश्रवा ऋषीस कैकसीपासून झालेली कन्या, दशग्रीव, कुंभकर्ण आणि विभीषण यांची भगिनी. ही उपवर-झाल्यावर, कालकेय असुरांचा अधिपति विद्युज्जिव्ह त्यास रावणानें हिला विवाह करून करून दिली होती. परंतु विद्युज्जिव्ह एका युद्धप्रसंगांत रावणाच्या हातून मरण पावला असतां, हिच्या संतोषार्थ हिला रावणानें दंडकारण्याचें राज्य दिलें, व १४.००० राक्षसांसहित खर राक्षस हिच्या साह्यास दिला (वा० रा० उत्तर० स० २३–२४ ).

दंडकारण्याचें राज्य मिळाल्यापासून ही तेथेंच राहूं लागली, व ऋषीस अनेक प्रकारें उपद्रव करून त्यांस भक्षूंहि लागली याप्रमाणें हिचा उपद्रव तेथें तापसांस दीर्घ कालपावेतों असतां, सीता व लक्ष्मण, यांसहवर्तमान राम दंडकारण्यांत येऊन गोदावरीच्या उत्तरतीरीं पंचवटींत राहिला होता त्यास, एके समयीं हिनें पाहिलें, व त्याच्या अप्रतिम सौंदर्यानें मोहित होऊन, सुंदर रूप धारण करून त्यासमीप आली व पुसूं लागली कीं, तूं कोण ? व स्त्रीसहवर्तमान तापसवेषानें अरण्य किमर्थ सेवन करतोस ? रामानें हिनें केल्या प्रश्नाचें संक्षेपानें उत्तर देऊन, हिला तूं कोण म्हणून विचारिलें. हिनें, मी रावणाची भगिनी असून माझें नांव शूर्पणखा आहे म्हणून सांगून रामास म्हटलें कीं, तूं मला आपली भार्या कर; कारण माझें मन तुझ्या सौंदर्यास लुब्ध झालें आहे ( वा० रा० अर० स० १७ ).

शूर्पणखेचें भाषण ऐकून राम हिला म्हणाला, मी सभार्य असल्यामुळें तूं निरर्थक दुःख पावशील, यास्तव माझा भ्राता लक्ष्मण सुरूप असून प्रस्तुत त्याची भार्याहि येथें नाहीं, यास्तव तूं त्यास वर. त्यावरून ही लक्ष्मणाकडे गेली, व म्हणूं लागली कीं, मला तूं आपली भार्या कर. लक्ष्मण म्हणाला, मी रामाचा दास असल्यामुळें तूं दासी होऊन दुःख पावावेंस, हें योग्य नाहीं. यास्तव तूं रामाचीच स्त्री हो. म्हणून ही पुनः रामाकडे आली, आणि म्हणूं लागली, ही तुझी स्त्री चांगली नाहीं. यास्तव हिला मी भक्षितें, म्हणजे मला तुझी स्त्री होण्यास बरें पडेल. त्यावरून रामानें लक्ष्मणास हिच्या विरूपकरणाची संज्ञा करितांच त्यानें खड्गेंकरून हिच्या कर्णनासिकेचा तत्काळ छेद केला, तेव्हां त्या वेदनेनें ती विव्हल होऊन, खराकडे रडत गेली व त्यास आपलें विरूप दाखविलें ( वा० रा० अर० स० १८ ).

त्यावरून खरानें चौदा सहस्र राक्षस रामावर पाठविले, व ते मरण पावले असतां, अमात्यांसहित आपण स्वतः जाऊन रामाच्या हस्तें मरण पावला ( १ खर श० पहा ). खर मरण पावला असें पाहून ही जनस्थानाहून निघाली, ती लंकेस गेली, व रावणाचा धिक्कार करून त्यास तिनें आपली अवस्था दाखविली व रामभार्या अति सुरूप आहे, तर तिचें हरण कर असा उपदेश केला. रावणानें तिच्या मुखानें सर्व वृत्त समजून घेऊन हिचें सांत्वन केलें, त्यावरून ही पुढें लंकेंतच राहिली ( वा० रा० अर० स० ३४ ).

**शूर्पणखी**–सीतासंरक्षणास असणाऱ्या राक्षसींतील एक ( वा० रा० सुंदर० स० २४ ).

**शूर्पारक**–भारतवर्षीय देश. हा इंद्रप्रस्थाच्या दूर अशा दक्षिणेकडे असणाऱ्या विदर्भ देशाच्या पश्चिमेकडे असावा. सहदेवाच्या दिग्विजयांत या देशाचें नांव आहे; परंतु त्या लेखावरून ती नीट कांहींच समजूत पडत नाहीं. अस्तु; तें कांहीं असो. जामदग्न्य रामानें निःक्षत्रिय भूमि करून ती सव त्यानें कश्यपास दिल्यावर पुनः तींत क्षत्रिय आढळला कीं मारावा, असें तो करूं लागला. म्हणून कश्यपानें त्यास दान दिलेल्या भरत वर्षाबाहेर जाऊन राहण्यास सांगितलें. त्यावरून त्यास हा देश, समुद्रानें एकाएकीं निर्मून दिला असतां, तो यांत येऊन राहिला.

**श्लोक**

ततः शूर्पारकं देशं सागरस्तस्य निर्ममे ॥ सहसा जामदग्न्यस्य सोपरांत महीतलं ॥६७ ॥ ( भार० शांति०

अ० ४९ ). कोंकण देशाचें भारतांत नांव आहे, परंतु प्रत्यक्ष यासच कोंकण म्हटलेलें त्यांत आढळत नाहीं, तरी हा देश कोंकणच होय.

२-भारतवर्षीय तीर्थ.

**शूलपाणि**-महादेवास शूल धारण करण्यानें नांव.

**शूलप्रोत**-एक नरक आहे.

**शृंगवान्**-कुरुवर्ष अ० ऐरावत वर्ष, त्याच्या उत्तरेकडे असणारा पर्वत. हा दोहोंकडे पूर्वपश्चिम समुद्रास स्पर्शून राहिला आहे.

२-एक सामान्य पर्वत. याच्या पायथ्याशीं शैलोद सरोवर आहे.

**शृंगवेरपुर**-भागीरथीच्या उत्तरतीरीं असणारें निषादांचें एक नगर ( २ गुह श० पहा ).

**शृंगी**-अंगिरसकुलोत्पन्न शमीक ऋषींचा पुत्र, परीक्षित राजास शाप देणारा तो ( २ शमीक श० पहा ).

**शेष**-कश्यपास कद्रूपासून झालेल्या नागांतील प्रमुख. यास अनंत असेंहि नांव आहे, व यास सहस्र फणा आहेत. हा निरंतर पातालांत राहतो, व याची एक कला क्षीरसमुद्रीं असून, तिच्यावर विष्णु आपल्या एका कलावतारानें सर्वदा शयन करीत वास करून राहिला आहे. संपूर्ण नागांस कामरूपधरत्वशक्ति ( इच्छेस येईल तसा देह धरण्याची शक्ति ) आहे तशी यासहि सहजीं आहे.

**शैखावत्य**-भीष्माकडून व शाल्वाकडून अंबा परतल्यावर ती या ऋषींच्या आश्रमांत तप करीत राहिली होती.

**शैनेय**-शिनिराजाचा पौत्र, व सत्यकाचा पुत्र जो सात्यकि, त्यास म्हणण्याची विशेष प्रवृत्ति.

**शैब्य**-शिबिदेशसंबंधीं राजे व तेथील इतर राहिवासी त्या सर्वांस संज्ञा. भारती युद्धांत पांडवांकडे या नांवाचा एक राजा होता ( भार० द्रोण० अ० ५५ ).

२-कृष्णाच्या रथाच्या चार अश्वांतील एकाचें नांव.

**शैब्या**-शिबिदेशसंबंधीं राजांच्या जेवढ्या म्हणून कन्या, तेवढ्यांस साधारण नांव. जशी हरिश्चंद्रराजाची स्त्री तारामती, कृष्णाच्या अष्टनायिकांतील मित्रविंदा, द्युमत्सेन राजाची स्त्री, व सत्यवानाची माता, आणि ज्यामघराजाची स्त्री, व विदर्भराजाची माता, यांस शैब्या म्हटलेलें आहे त्याप्रमाणें ( भाग० १० स्कं० अ० ८३ श्लो० ६ ). ( भार० वन० अ० २९८ श्लो० २ ).

२-भारतवर्षीय नदी.

**शैरीषक**-नकुलादिग्विजयांतील देश ( भार० सभा० अ० ३२ ).

**शैलालय**-ब्रह्मर्षि ( ३ वासिष्ठ श० पहा ).

२-भगदत्त राजाचा पितामह ( भार० आश्रमवासी० अ० २० श्लो० १० ).

**शैलिन**-शिलिनऋषींचा पुत्र जो जित्वा ऋषि तो.

**शैलूष**-बिभीषणाची स्त्री सरमा तिचा पिता. हा ऋषभपर्वतावर राहात असे.

**शैलोद**-शृंगवान् पर्वताच्या पायथ्यापाशीं असणारें सरोवर. यांतून शैलोदका अ० शैलोदा नदी निघालेली आहे.

**शैलोदका-शैलोदा**-नदी ( शैलोद श० पहा ).

**शैवल**-दंडकारण्याच्या दक्षिणेकडचा सीमाभूत पर्वत ( वा० रा० उत्तर० स० ७५ ).

**शैशिर**-ब्रह्मर्षि ( ३ आंगिरा श० पहा ).

२- ,, ( २ कश्यप श० पहा ).

३- ,, ( १ विश्वामित्र श० पहा ).

**शैशुपाली**-शुक्तिमती म्हणून जी शिशुपालाची नगरी ती ( भार० वन० अ० २५४ श्लो० १६ ).

**शोण**-प्रलयमेघांतील सातवा.

२-ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

३-भारतवर्षीय या नांवाचा एक मोठा नद. याला हिरण्यवाह असेंहि म्हटलेलें आहे.

**शोणसंगम**-शोणनद जेथें समुद्रास मिळतो तें स्थान.

**शोणा**-भारतवर्षीय नदी. ही अयोध्येहून मिथिलेस जातांना मार्गांत लागणारी होय.

**शोणाश्व**-कुरुकुलोत्पन्न एक राजा, वंशावळींत नांव नाहीं.

२-या नांवाचा एक यादव.

**शोणितपुर**-बाणासुराची नगरी. कोणीकडे होती, व कोणत्या देशाची राजधानी इ० ठिकाण आढळत नाहीं ( भाग० १० स्कं० अ० ६२ श्लो० ४ ).

**शोणिताक्ष**-रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

**शोणितोद**-एक गंधर्व.

**शौक्रतु**-ब्रह्मर्षि ( २ अत्रि श० पहा ).

**शौंग**-भारद्वाजांगिरसकुलोत्पन्न जो शुंगऋषीचा पुत्र त्यास विश्वामित्रकुलोत्पन्न शैशिरऋषीनें आपला पुत्र मानिलें म्हणून हा द्व्यामुष्यायण म्ह० द्विगोत्रीय आहे.

**शौनक**-भृगुकुलोत्पन्न रुरुऋषीचा पौत्र, व शुनकऋषीचा पुत्र. हा बह्वृच म्ह० आश्वलायन वर्णिलेला आहे ( भाग० १ स्कं० अ० ४ ).

२-( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या गृत्समद ना० पुत्राचा पौत्र, व शुनकराजाचा पुत्र.

**शौनकायन**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).
**शौरि**–कृष्णास शूरकुलोत्पन्नत्वामुळें नांव. विष्णूस म्हणण्याचें कारण आढळत नाहीं.
**श्याकार**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).
**श्यामक**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय शूरराजाच्या दहा पुत्रांतील एक. यास शूरभू अ० शूरभूमि स्त्री होती, व तिच्याठायीं हिरण्याक्ष, आणि हरिकेश असे झालेले दोन पुत्र होते.
**श्यामपराशर**–वसिष्ठकुलोत्पन्न पराशरऋषीचा वंशज व कुल. यांत पाटिक, वादरि, स्तंब, क्रोधनायन, आणि क्षेमि हे ऋषि प्रसिद्ध आहेत.
**श्यामवय**–तृतीय वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.
**श्यामा**–मेरूच्या नऊ कन्यांतील साहावी. ही आग्नीध्र राजाचा पुत्र हिरण्मय त्याची स्त्री होती.
**श्यामायन**–विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक.
**श्यामायनि**–तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.
**श्यामोदर**–द्वितीय कश्यपकुलोत्पन्न ऋषि.
**श्यावाश्व** अ० **श्यावास्य**–द्वितीय आत्रिकुलोत्पन्न ऋषि.
**श्येन**–ऋषि, वंश आढळत नाहीं.
**श्येनगामि**–खरराक्षसाच्या बारा अमात्यांतील एक..
**श्येनजित्**–दलराजाचा पुत्र ( १ शल श० पहा ).
२–सूर्यवंशोत्पन्न प्रसन्नराजास नामांतर.
**श्येनी**–कश्यपस्त्री ताम्रा तिच्या कन्यांतील एक.
२–विनतापुत्र अरुणाची स्त्री. संपाति, आणि जटायु या दोघांची माता.
३–ऋष्यवान् पर्वतापासून निघालेली नदी.
**श्रद्धा**–स्वायंभुवमन्वंतरांतल्या दक्षाच्या सोळा कन्यांतील पहिली, धर्मऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक. हिचा पुत्र शुभ.
२–स्वायंभुवमन्वंतरांतील कर्दमप्रजापतीच्या नऊ कन्यांतील तिसरी. ही देवहूतीपासून झालेली असून, त्या वेळच्याच अंगिराऋषीची स्त्री होती.
३–वैवस्वतमनूची स्त्री, तिचें हेंच नांव होतें.
**श्रद्धादेवी**–वसुदेवाच्या स्त्रियांतील एक.
**श्रद्धालु**–हंसध्वजराजाच्या प्रधानांतील एक.
**श्रम**–वसुदेवास शांतिदेवेपासून झालेल्या पुत्रांतील एक.
**श्रमदागेपि**–तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.
**श्रमिष्ठ**–अक्रूर यादवाच्या पुत्रांतील एक.
**श्रवण**– ,, ,,
२–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.
३–मुरदैत्याच्या सात पुत्रांतील एक. यास कृष्णानें मारिलें होतें.
**श्रवस**–तृतीय वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.
**श्रवा**–संतऋषीचा पुत्र. यास अर्चि, आणि तम असे दोन पुत्र होते.
**श्राद्धदेव**–विवस्वान् आदित्याचा पुत्र जो वैवस्वतमनु, त्यास नामांतर.
**श्रावस्त**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न इंदुराजाचा पौत्र, युवनाश्व राजाचा पुत्र. यानें श्रावस्ती नगरी स्थापिली. यास वत्सक अ० वंशक, आणि बृहदश्व, असे दोन पुत्र होते.
**श्रावस्ती**–श्रावस्त राजानें स्थापिलेली नगरी. ही कोसल अ० ईशान्यकोसल देशाची राजधानी होय. दाशरथि राम निजधामास गेल्यावर, त्याचा कनिष्ठ पुत्र लव, तो येथें राज्य करीत होता ( वा० रा० उत्तर० स० १०७ ).
**श्रावण**–दशरथानें गज अशा भ्रांतीनें रात्रीं मारिलेला वैश्यजातीय तपस्वी. याचें नांव वाल्मीकि रामायणांत नाहीं.
**श्री**–स्वायंभुव मन्वंतरांतील भृगुऋषीस ख्याति ना०भार्येपासून झालेली कन्या. धाता आणि विधाता, या दोघांची भगिनी, ही भृगूनें स्वतः उत्पन्न झाल्या काळींच विष्णूस दिली होती ( १ भृगु श० पहा ).
**श्रीकंठ**–महादेव.
**श्रीकुंज**–भारतवर्षीय तीर्थ.
**श्रीदामा**–रामकृष्णांचा गोकुलांतील गोपजातीय सखा ( भाग० १० स्कं० अ० १५ श्लोक २० ).
**श्रीदेवा**–वसुदेवाच्या स्त्रियांतील एक.
**श्रीनगर**–देवीचें स्थानवि० (देविभा० सप्तम०अ०३८). हें नगर प्रस्तुत मारवाडांत आहे तें किंवा दुसरें हें कळत नाहीं.
**श्रीपति**–विष्णु.
**श्रीपर्णी**–भारतवर्षीय नदी.
**श्रीपर्वत**–कोणीकडे आहे तो कळत नाहीं. बहुधा श्रीशैलच असावा.
**श्रीभानु**–कृष्णास सत्यभामेपासून झालेला पुत्र.
**श्रीमती**–अंबरीष राजाची कन्या. हिची इच्छा नारद आणि पर्वत ऋषि दोघेहि करीत असतां, दोघांस न मिळूं देतां विष्णूनेंच वरिली. हा विष्णु वैकुंठवासी समजूं नये.
**श्रीमान्**–आप ना० वसूचा पुत्र.

२-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न नीप अ० अणुह राजा, त्याच्या दुसऱ्या स्त्रीच्या शत पुत्रांतील ज्येष्ठ.

**श्रीरंग**-भारतवर्षीय तीर्थ.

**श्रीवत्स**-विष्णूच्या वक्षस्थलावरील चिन्ह.

**श्रीशैल**-भरतखंडांत दक्षिण दिशेकडे असणारा सामान्य पर्वत. येथें मल्लिकार्जुन नांवाचें ज्योतिर्लिंग आहे ( भार० वन० अ० २५४ श्लोक १४ ). हें स्थान शुक्तिमती शिशुपालाची नगरी, तिच्या समीप पूर्वी असेल.

**श्रुत**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न भगीरथ राजाच्या दोन पुत्रांतील एक.

२-( विदे० वं० ) सुभाषण जनकाचा पुत्र. याचा पुत्र जयनामा जनक.

३-कृष्णास कालिंदीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

४-द्रुपद राजाच्या पुत्रांतील एक. रात्रियुद्धांत अश्वत्थाम्याच्या हातून मेला ( भार० द्रोण० अ० १५६ ).

**श्रुतकर्मा**-धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक.

२-पंडुपुत्र सहदेवास द्रौपदीपासून झालेला पुत्र. हा महारथी होता ( भार० द्रोण० अ० २३ ). याचें सुदक्षिण ना० कांबोज राजाशीं युद्ध झालें ( भार० भीष्म अ० ४५). नंतर यास अश्वत्थाम्यानें शिबिरांत निद्रित असतां मारिलें.

**श्रुतकीर्ति**-विदेहवंशीय कुशध्वज राजाची कन्या. दशरथपुत्र शत्रुघ्नाची स्त्री ( वा० रा० बाल० स० ७३ ).

२-यदुकुलोत्पन्न शूर राजाची कन्या, वसुदेवाची भगिनी. ही केकेय राजा धृष्टकेतूची स्त्री.

३-पंडुपुत्र अर्जुनापासून द्रौपदीस झालेला पुत्र. हा महारथी होता ( भार० द्रोण० अ० २३ ). हा शिबिरांत निद्रित असतां अश्वत्थाम्याच्या हातून मेला.

**श्रुतंजय**-( सो० वं० ) पुरूरवा राजाचा पुत्र सत्यायु याचा पुत्र.

**श्रुतदेव**-मिथिला नगरींत बहुलाश्व जनक राज्य करीत असतां, त्या वेळेस तिजमध्यें राहणारा ब्राह्मण. हा जितेंद्रिय, सदाचारसंपन्न, व परमसमाधानी असा असे. परंतु बहुलाश्वास अगदींच विदित नव्हता. एकदां कृष्णाच्या मनांत आलें कीं,या ब्राह्मणाचें दर्शन घ्यावें, कारण हा महान् ब्रह्मनिष्ठ असल्याचें त्यास विदित होतें. म्हणून तो द्वारकेहून निघून याच्या घरीं आला असतां, यानें त्याचें उत्तम प्रकारें करून आदरातिथ्य केलें. व कित्येक दिवस राहून घेतलें. हें वर्तमान बहुलाश्वास कळतांच तो तेथें आला व तेव्हांपासून आपल्या नगरांत असा महान् ब्रह्मतत्त्ववेत्ता ब्राह्मण आहे, हें बहुलाश्वास कळलें. सारांश,बहुलाश्वास या गोष्टीचा फराच खेद झाला; परंतु कृष्णानें त्याचें समाधान केलें. नंतर बहुलाश्वानें कृष्णास ऋषींसहित आपल्या मंदिरीं येण्याची विनंति केलेली कृष्णानें मान्य केली,व योगबलानें दुसरें रूप धारण करून बहुलाश्वाच्या गृहीं ब्राह्मणासहित गेला. तेव्हां राजानें मोठ्या हर्षेकरून उभयतांचें पूजन केलें, आणि कित्येक दिवस राहून घेतलें.

तिकडे राजगृहीं कृष्ण, श्रुतदेव, आणि जनक, तिघांचा सुखसंवाद चालला असून, इकडे श्रुतदेवाच्या घरींहि उभयतांचा समाधानानें व सुखसंवादानें कालक्रमणा चाललीच होती. त्यांत कृष्ण श्रुतदेवास असें बोलला,आधीं मला ब्राह्मण प्रिय आहे,त्यांत तप,विद्या, संतोष, असल्यानें अधिक प्रिय होतो, आणि त्यांतहि आत्मज्ञानानें संपन्न असला तर मग अधिकाधिकच प्रिय. तात्पर्य तूं वरील सर्व गोष्टींनीं युक्त असल्यामुळें, अत्यंत प्रिय म्हणून मी येथें आलों. इत्यादिक प्रकारांनीं याची कृष्णानें स्तुति करून, इकडे याचा तिकडे बहुलाश्वाचा निरोप घेऊन द्वारकेस गमन केलें ( भाग० १० स्कं० अ० ८६ ).

२-कृष्णाच्या पौत्रांतील एक.

**श्रुतदेवा-वी**-शूर राजाची कन्या, व वसुदेवाची भगिनी. ही करूषदेशीय राजा वृद्धशर्मा, त्याची स्त्री होती.

**श्रुतध्वज**-विराट राजाच्या भ्रात्यांतील एक (भार०द्रोण० अ० १५८ ).

**श्रुतवर्मा**-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा (भार० कर्ण० अ० ७ ).

**श्रुतर्वा**-एक राजा. हा कोणत्या कुलांतला, व कोठें राहात असे, त्याविषयीं कांहीं आढळत नाहीं. मात्र इतकेंच आढळतें कीं, एकदां अगस्त्य ऋषि द्रव्ययाचनेनिमित्त याजकडे गेला असतां, यानें आपले आय आणि व्यय ( जमाखर्च ) त्यास दाखविले. त्यावरून यास समागमें घेऊन तो ब्रध्नश्व राजाकडे गेला होता ( भार० वन० अ० ९८ ).

**श्रुतविंदा**-कुशद्वीपांतील नदी.

**श्रुतश्रवा**-गरुडानें मारिलेला एक असुर.

२-शूर राजाची कन्या व वसुदेवाची भगिनी. ही चेदिराजा दमघोष त्याची स्त्री होती.

३-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ, तद्वंशीय कुरु-

पुत्र सुधनु, तदन्वयसंभूत जरासंधवंशांतील मार्जारि राजाचा पुत्र. याचा पुत्र अयुतायु.

४-जनमेजयाच्या सर्पसत्रांतील सदस्य. सर्पिणीपासून उत्पन्न झालेल्या सोमश्रव्याचा पिता.

**श्रुतश्री**-गरुडानें मारलेला एक असुर.

**श्रुतसेन**-शत्रुघाती राजास नामांतर.

२-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा (भार० कर्ण० अ० २७).

३-पंडुपुत्र भीमसेनापासून द्रौपदीस झालेला पुत्र. हा महारथी असे (भार० द्रोण० अ० २३). याचें कर्णाशीं एकदां बरेंच युद्ध झालें होतें (भार० भीष्म० अ० ४५). पुढें हा अश्वत्थाम्याच्या हातून शिबिरामध्यें निद्रित असतां मेला. यास सुतसोम असेंहि म्हटलेलें आहे.

४-(सो० वं०) पांडवकुलोत्पन्न परीक्षित् राजाच्या चार पुत्रांतील दुसरा, जनमेजयाचा कनिष्ठ भ्राता.

**श्रुतानीक**-विराट राजाच्या कनिष्ठ भ्रात्यांतील एक (भार० द्रोण० अ० १५८).

**श्रुतायु**-(सो० वं०) पुरूरवा राजाच्या साहा पुत्रांतील दुसरा. याचा पुत्र वसुमान् राजा.

२-(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशवंशीय सहस्राश्व राजा, त्याच्या कुलांतील चंद्र राजाचा पुत्र.

३-(विदे० वं०) अरिष्टनेमि जनकाचा पुत्र. याचा पुत्र सुपार्श्वक जनक.

४-अर्जुनानें मारलेला दुर्योधनपक्षीय राजा (भार० द्रोण० अ० ९३).

**श्रुतायुध**-द्वितीय वरुणापासून शीततोया ना० नदीच्या मूर्तिमान् देवतेस झालेला पुत्र. यास वरुणानें एक गदा अभिमंत्रित करून देऊन असें सांगितलें होतें कीं, ह्या गदेनें तूं पाहिजे त्यास जिंकून विजयी होशील; परंतु जो मुळींच युद्ध करीत नसेल, त्यावर मात्र ती टाकूं नको, नाहींतर तूंच मरशील. असें असून हा भारती युद्धांत दुर्योधनास येऊन मिळाला; कारण याची माता भूमीवरील नदी असल्यामुळें, हा पृथ्वीवरच रहात असे. सारांश, यानें कृष्णावर गदा टाकिली व आपणच मरण पावला (भार० द्रोण० अ० ९२).

**श्रुतावती**-पूर्वमन्वंतरांत कोणी भरद्वाज ना० ऋषि होता, त्याची ही कन्या होय. हिनें बदरी पाचनतीर्थी मोठें दुर्घट तप केलें, व त्या योगानें प्रस्तुतच्या पुरंदर इंद्राची शची अशा नांवानें भार्या झाली आहे (भार० शल्य० अ० ४८).

**श्रुति**-ब्रह्मर्षि (२ कश्यप श० पहा).

२-सामवेदाचें ब्रह्मदेवाच्या मुखापासून त्याच्या मानसपुत्रांस श्रवणानें जें ज्ञान त्यास नांव.

**श्रेणिमान्**-गोशृंग ना० पर्वतशिखरवासी राजा. हा भारती युद्धांत पांडवांकडे होता (भार० द्रोण० अ० २३). व त्यांतच कौरवपक्षीय वीरांच्या हातून मेला.

२-भीमानें दिग्विजयकाळीं जिंकलेला कुमारदेशाचा राजा (भार० सभा० अ० ३०).

**श्रोता**-श्रावणमासींचा यक्ष (५ नभ श० पहा).

**श्रौतश्रवस**-श्रुतश्रवेचा पुत्र म्हणून शिशुपालास नांव.

**श्लेष्मातक**-विश्रवा ऋषींचें नर्मदेच्या तीरचें तपोवन. येथें दशग्रीव इ० कांहीं काल राहात होते. पुढें लंकेंत जाऊन राहिले (वा० रा० उत्तर० स० १०).

**श्वफल्क**-अनमित्र ना० यादवाचा पौत्र, वृष्णीचा पुत्र, व चित्ररथाचा भ्राता. याचा इतिहास असा आढळतो कीं, एक काळीं काशीक्षेत्रांत अवर्षण झालें असतां, हा तेथें सहजीं गेला होता. तेव्हां तेथील राजास कोणी असें सांगितलें कीं, श्वफल्क हा महान् पुण्यवान् आहे, यास्तव तूं याचें पूजन कर. त्यावरून त्या राजानें यास बोलावून नेऊन याचें पूजन केलें, व आपली गांदिनी कन्या यास दिली. त्या योगानें तेथें वृष्टि होऊन, सर्वत्र सुभिक्ष झालें (भाग० १० स्कं० अ० ५७).

श्वफल्कास गांदिनीपासून अक्रूर, आसंग, सारमेय, मृदुर, मृदुवित्, गिरि, धर्मवृद्ध, सुकर्मा, क्षत्रोपेक्ष, अरिमर्दन, शत्रुघ्न, गंधमादन, प्रतिबाहु, असे तेरा पुत्र, आणि सुचीरा ना० कन्या, याप्रमाणें अपत्यें झालीं होतीं.

**श्वसृप**-तेरा सैंहिकेयांतील (सिंहिका पुत्रांतील) सातवा.

**श्वाफल्कि**-श्वफल्काचे सर्व पुत्र, परंतु अक्रूराविषयीं विशेष प्रसिद्धि (भार० ११ स्कं० अ० १२).

**श्वाविल्लोमापनयन**-या नांवाचें भारतवर्षीय तीर्थ.

**श्वाहि**-(सो० वं०) यदुपुत्र क्रोष्टा, त्याचा पौत्र, व वृजिनिवान् राजाचा पुत्र. याचा पुत्र रुशेकु राजा.

**श्वेत**-एक ऋषि. कुल आढळत नसून विशेष वृत्तहि कांहीं नाहीं.

२-विप्रचित्ति दानवाचा पुत्र (मत्स्य० अ० १७६ श्लोक ७).

३-प्राचीनकाळीं विदर्भ देशाचा राजा सुदेव ना० होता त्याचा हा पुत्र. पित्याच्या मागें हा राज्याधिकारी झाल्यावर यानें आपला कनिष्ठ भ्राता सुरथ,

त्यास यौवराज्य दिलें. यानें राज्य चांगल्या नीतीनें करून, पुढें अरण्यांत जाऊन तपानें तीन सहस्र वर्षांनंतर देहत्याग केला असतां उत्तम लोकास प्राप्त झाला; परंतु यास अन्नदान घडावें असें भूलोकीं घडलें नव्हतें, त्यामुळें तेथें क्षुधा बाधूं लागली. तिचें निवारण अगस्त्य ऋषींच्या प्रसादानें यानें भूलोकीं येऊन केलें ( वा० रा० उत्तर० स० ७८ ).

४–रामसाह्य करणारा एक वानर ( वा० रा० युद्ध० स० ३० ).

५–विराट राजाच्या पुत्रांतील एक. याचा भ्राता उत्तर, शल्यानें मारिला असतां, हा त्याशीं युद्ध करूं लागला, व शेवटीं भीष्माच्या हातून मरण पावला ( भार० भीष्म० अ० ४७–४८ ).

**श्वेतकल्प**–ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील होऊन गेलेला प्रथम दिवस ( ४ कल्प श० पहा ).

**श्वेतकी**–एक राजा, याचा वंश आढळत नाहीं. यानें इतके अपरिमित यज्ञ केले कीं, ब्राह्मणांस विश्रांति म्हणून तिळमात्र सांपडेना, हें एक; दुसरें धुरानें त्यांचे नेत्रहि पराकाष्ठेचे त्रासून गेले होते; इतक्यांत हा पुनः ब्राह्मणांकडे गेला, आणि विनंति करून म्हणाला, मी शतसंवत्सरात्मक यज्ञ करण्यास इच्छित आहें, तर आपण कृपाकरून चलावें. तेव्हां हा ज्यांज्यांकडे गेला, त्यांनीं त्यांनीं आम्हांस आतां सामर्थ्य नाहीं असेंच उत्तर दिलें. तथापि त्यांनीं यास असा विचार सुचविला कीं, तूं रुद्राचें आराधन कर, म्हणजे तो तुझें आर्त्विज्य ( ऋत्विजपण ) करील. त्यावरून हा तथास्तु म्हणून माघारा परतला, व षण्मासपर्यंत रुद्राराधन करून त्यास प्रसन्न केलें. परंतु त्यानें असें सांगितलें कीं, तूं द्वादश संवत्सरपर्यंत अग्नीमध्यें अखंड घृतधारा धरून, तिची सांगता झाल्यावर मग मजकडे ये, म्हणजे तुला कायतें सांगेन. त्या आज्ञेप्रमाणें यानें बारा वर्षेपर्यंत अग्नींत अखंड घृतधारा धरून, तें अनुष्ठान शेवटास लाविलें, व रुद्राकडे गमन केलें. त्यावरून रुद्रास आश्चर्य होऊन, तो यास याप्रमाणें बोलला.—

रुद्र म्हणाला, राजा, मी आज्ञा केल्याप्रमाणें तूं अनुष्ठान केलेंस तेणेंकरून मी संतुष्ट झालों आहें, परंतु मी देवांत गणनीय असल्यामुळें मला आर्त्विज्य करण्यास अधिकार नाहीं, यास्तव असें कर कीं, माझ्या अंशानें भूमीवर जन्मलेला दुर्वासा ऋषि आहे त्याकडे तूं जा, व त्यास विनंति कर, म्हणजे तो तुझें आर्त्विज्य करून, तुझा शतसंवत्सरात्मक यज्ञ सिद्धीस नेईल. याविषयीं मी त्यास सांगतों, त्यावरून राजा त्याकडेस गेला असतां, रुद्राज्ञेवरून त्यानें यास होय म्हटलें, व याचें आर्त्विज्य स्वीकारून, याचें शतसंवत्सरात्मक सत्र सिद्धीस नेलें; मात्र याच्या अपरिमित यज्ञांच्या योगानें, अग्निदेवतेस इतकें जाड्य झालें कीं, तिला पुढें अनेक औषधींनीं युक्त खांडववन भक्षण करावें लागलें ( १ अग्नि श० पहा ).

**श्वेतकेतु**–गौतमकुलोत्पन्न अरुणि ऋषीचा पौत्र, व उद्दालक ऋषीच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. हा बालपणीं उन्मार्गवर्ती असल्यामुळें, याचें बारा वर्षांचें वय होईपर्यंत उपनयन झालें नाहीं, म्हणून यास ब्राह्मणवर्णाच्या धर्मव्यवस्थेनुरूप व्रात्यत्व प्राप्त झालें होतें. सारांश उद्दालकास याच्या योगानें रात्रंदिवस चिंता लागली असून, शिवाय अपकीर्तिहि प्राप्त झाली होती. एकदां असें झालें कीं, हा शांत होत्साता पित्यासमीप बसला असतां, उद्दालकानें यास एकवार शेवटचा बोध करून पाहावा असें मनांत आणून, नीति सांगण्यास आरंभ केला. ती नीति उपनिषदांत असलेली येथें लिहितां येत नाहीं, म्हणून त्या श्रुतींशीं समतोल असलेलीं आत्मपुराणांतील वाक्यें येथें लिहितों.

**श्लोक.**

" लालनाद्बहवो दोषाः शासनाद्बहवो गुणाः ॥
शिष्यस्त्रीतनयादीनामिति यत्तन्मृषा नहि ॥ १ ॥
वैरिणी सा च विज्ञेया माता या लालयेत्सुतम् ॥
पितापि च यतः पुत्रो लालितो नरकं व्रजेत् ॥ २ ॥
आत्रिवर्षं सुतं माता शिक्षयेच्च ततः पिता ॥
तथापि साहितो नित्यमागर्भजननाष्टमम् ॥ ३ ॥
अतऊर्ध्वं सदाचार्यः शिक्षयेत्तं च कुत्रचित्॥
आषोडशं ततः सर्वे निवर्तंते हि यौवने ॥ ४ ॥
युवानं मित्रवन्नित्यं शिष्यं वाथ सुतं च वा ॥
शिक्षयेन्नैव दंडेन नीतिरेषा सनातनी ॥ ५ ॥
मातुः पितुश्च यः शिक्षामाचार्यस्य न चांधधीः ॥
गृण्हीयाद्यौवने प्राप्ते स क्लेशं याति दारुणम् ॥
इह राजाद्विजा भीतिर्यमजा परजन्मनि ॥ ६ ॥

यांतील सारांशानें भावः–शिष्य, स्त्री, आणि पुत्र यांच्या लालनांत ( लाड करण्यांत ) अतिशय दोष असून, शासनांत मोठा गुण आहे, जी माता, पुत्राचें लालन करित्ये ( लाड करित्ये ) ती केवळ त्याची शत्रु होय, तसाच लालन करणारा पिताहि नरकास प्राप्त होतो, हाच दोष गुरूनें शिष्याचे, व पतीनें स्त्रीचे लाड केल्यास समजावा. तीन वर्षांचा पुत्र होईपर्यंत त्यास शिक्षा मातेनें द्यावी, नंतर पित्यानें; अथवा गर्भा-

पासून आठ वर्षांचा होईपर्यंत उभयतांनीं, नंतर सोळावें वर्ष सरेपर्यंत उत्तम जो आचार्य त्यानें शिक्षा द्यावी. नंतर दंडानें त्यास शिक्षा देऊं नये अशी सतातन नीति आहे. जो कोणी अंधबुद्धि माता, पिता व आचार्य, यांची शिक्षा ग्रहण करीत नाहीं, तो भयंकर क्लेश पावतो; म्हणजे येथें राजादिकांपासून त्यास भय होऊन, मरणानंतर यमापासून भय होतें.

हा बोध, काय वेळेचा गुण असेल तो असो, श्वेतकेतूस ठसला, त्यावरून उद्दालकानें त्याचें उपनयन केलें असतां तो गुरुगृहीं जाऊन राहिला, व वेदवेदांगांत निष्णात होऊन पुनः परत घरीं आला परंतु 'मी ज्ञाता' असा यास कांहींसा गर्व असल्यामुळें हा सर्वदा स्तब्ध बसतो असें उद्दालकानें पाहून, एकदां यास प्रश्न केला कीं, 'एकाच्या विज्ञानेंकरून सर्वांचें विज्ञान,' हें कांहीं गुरुनें तुला सांगितलें आहे काय ?' असेल तर याचें उत्तर दे. हें पित्याचें भाषण यास कांहींच समजलें नाहीं, त्यामुळें गलिताभिमान होऊन हा पित्यास शरण आला. त्यावरून उद्दालकानें यास ब्रह्मविद्या, उपदेशिली. तिच्या योगानें हा पुढें उत्तम प्रकारचा ब्रह्मनिष्ठ झाला ( छांदोग्य उपनिषत् ).

श्वेतकेतु मोठा होईपर्यंत, बहुधा स्त्रीपुरुष पशूप्रमाणें मैथुनासक्त असत, म्हणून यानें तद्विषयक केलेले निर्बंध अजून बरेच चालत आहेत ( भार० आदि० अ० ११२ ).

२-जनमेजयाच्या सर्पसत्रांतील एक सदस्य.

**श्वेतपराशर**-पराशरवंशांतील एक कुल, यांतील आविष्ठायन, वालेय, स्वायष्ट, उपयव आणि इषिकहस्त हे प्रसिद्ध ऋषि होते.

**श्वेतपर्वत**-रम्यक वर्ष आणि हिरण्मयवर्ष यांच्या मध्यें असणारा महापर्वत. हा पूर्वपश्चिम समुद्रास स्पर्शून आहे ( भार० भीष्म० अ० ६ ). यावर प्रायः दैत्य राहतात.

२-हिमालयाच्या एका शिखरास नांव आहे.

**श्वेतभद्र**-या नांवाचा एक यक्ष.

**श्वेतवराह**-हिरण्याक्षास मारून पृथिवीचा उद्धार करण्यासाठीं झालेला अवतार. हा श्वेतवर्णाचा वराह होता म्हणून, यास असें नांव पडलेलें आहे. याच्या कल्पास 'वाराहकल्प' म्हणतात.

**श्वेतवर्ष**-रम्यक वर्षास नामांतर.

**श्वेतवाराह**-श्वेतवराह ज्या कल्पामध्यें झाला त्याचें नांव, व तोच कल्प प्रस्तुत चालला आहे म्हणून, "श्रीश्वेतवाराहकल्पे" असें सांप्रत संकल्पामध्यें म्हटलें जातें.

**श्वेतवाहन**-अर्जुनाच्या दहा नांवांतील एक.

**श्वेता**-कश्यपापासून क्रोधेस झालेल्या कन्यांतील एक.

**श्वेतारण्य**-कावेरीतीरींचें एक वन. येथें शंकरानें यमापासून मार्कंडेयास सोडविलें ( वा० रा० अर० स० ३० श्लो० २७ ).

**श्वेताश्वतर**-स्वयंभूपासून ब्रह्मविद्या संपादन केलेला ऋषि.

२-मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**श्वेतोग्रह**-धूमकेतूस संज्ञा ( भार० उद्योग० अ० ३७ श्लोक ४३ ).

## ष

**षठ**-ब्रह्मर्षि ( ३ वसिष्ठ श० पहा ).

**षडानन**-कार्तिकेयास नांव.

**षष्ठी**-स्कंदपत्नी देवसेना तीच ( देवी भा० ९ स्कं० अ० ४६ ).

**षाण्मातुर**-सहा कृत्तिकांपासून जन्म म्हणून, कार्तिकेयासच नांव.

**षोडशी**-यज्ञविशेषाचें नांव.

## स

**संकट**-चालू मन्वंतरांतील धर्मऋषीपासून, ककुभ नाम्नीस झालेला पुत्र. याचा पुत्र कीकट ( भाग० षष्ठ० अ० ६ ).

**संकल्प**-चालू मन्वंतरांतील धर्मऋषीपासून, संकल्पा स्त्रीस झालेले ह्या साधारण नांवाचे पुत्र ते.

**संकल्पा**-संकल्पसंज्ञक पुत्रांची माता.

**संकर्षण**-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतान्वयसंभूत वसुदेवापासून रोहिणीस झालेला पुत्र. हा प्रथमतः देवकीच्या गर्भांत असून, तिचा सातवा गर्भ होता. यास देवमायेनें उत्तम प्रकारें आकर्षित करून रोहिणीच्या उदरीं नेऊन घातलें. म्हणून यास असें नांव मुळीं होतें, बलराम मागून पडलें.

**श्लोक.**

" गर्भसंकर्षणात्प्राहुस्तं वै संकर्षणं भुवि ॥
रामेति लोकरमणाद्बलं बलवदुच्छ्रयात्"॥ १३ ॥
( भाग० १० स्कं० अ० २ ).

**संकिल**-वैश्यजातीय मंत्रद्रष्टा ( मत्स्य० अ० १४४).

**संकृति**-ब्रह्मर्षि ( आंगिरा श० पहा ).

२–( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या कुश ना० पौत्राच्या वंशांतील जयसेन राजाचा पुत्र. याचा पुत्र जय.

३–( सो० वं० ) नहुषकुलोत्पन्न पूरुराजा, तद्वंशीय रौद्राश्वपुत्र ऋतेयुकुलांतील भरतपुत्र मन्यु राजा, त्याचा पौत्र, व नलराजाचा पुत्र. यास गुरुधी आणि रंतिदेव, असे दोन पुत्र होते.

**सकौवाक्षि**–ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**सगर**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरिश्चंद्रवंशीय भरुक अ० रुचकराजाचा प्रपौत्र, वृकराजाचा पौत्र, व बाहुकराजाचा पुत्र, यास असें नांव कां पडलें त्याविषयीं ( १ बाहुक श० पहा ). सगरास, विदर्भ देशाचा राजा यदु, त्याची कन्या सुमति अ० प्रभा, आणि शिवि देशाचा राजा ( नांव आढळत नाहीं ) त्याची कन्या केशिनी अ० भानुमती, अशा दोन स्त्रिया होत्या. त्यांत पहिलीस साठ सहस्र, आणि दुसरीस असमंजा नांवाचा एकच, याप्रमाणें पुत्र झाले होते. हे पुत्र, यानें उभयभार्यासहित तप केल्यानें रुद्रप्रसादानें झालेले होते. यांत साठ सहस्र जे झालेले ते एकसमयावच्छेदेंकरुन एक अलाबू ( भोंपळा ) उदराबाहेर पडून त्यांतून निर्माण झाले असत. ते साठ सहस्रहि पराक्रमी निवून, असमंजा जो दुसरीचा एकच पुत्र, तो केवळ कोणी योगभ्रष्ट पुरुष जन्मास आलेला होता ( १ असमंजा श० पहा ).

सगरराजा मोठा पराक्रमी होता, यानें हैहय, तालजंघ इ० राजे जिंकून आपलें राज्य पुनः आपणास प्राप्त करुन घेतलें, आणि यवनादिक वेदबाह्य राजांस, विकृतवेष (भिन्नवेष अ० भिन्नरूप) असें करुन टाकिलें कीं, ते वैदिकधर्मी राजांहून तत्काळ वेगळे दिसण्यांत यावेत.

सगरानें अनेक यज्ञ करुन अश्वमेधहि शतावधि केले. त्यांतील एका अश्वमेधांतील श्यामकर्ण अश्व ( ज्याचें सर्व अंग केवळ शुभ्र आणि कान मात्र काळे ) असा अश्व तो इंद्रानें हरण केला, त्यावरुन साठ सहस्र सगरपुत्र, त्याचा शोध करुं लागले, परंतु त्याचा कोठें ठिकाण लागेना, म्हणून त्यांनीं समुद्र खणिला, तथापि अश्व त्यांत न सांपडतां, आणखी भूमि फिरतां फिरतां, कपिलाश्रमांत तो त्यांस सांपडला. तेव्हां अश्वहरणकर्ता हाच असावा असें त्यांस वाटून, तो समाधिस्थ असलेला ऋषि त्यास ते ताडन करुं लागले, इतक्यांत कपिलानें नेत्र उघडून सगरपुत्रांकडे पाहिलें, पाहतांच ते सर्व दग्ध झाले (भाग० ९ स्कं० अ० ८ ).

सगरराजा यज्ञदीक्षा घेऊन बसला असून,साठसहस्र पुत्रांचा तर तिकडे असा परिणाम झाला. आणि असमंजा पुत्र जवळ असावा, परंतु तो पूर्वीच अरण्यांत निघून गेला होता म्हणून,यज्ञसमाप्तीचें यास मोठें संकट पडलें. परंतु असमंजाचा पुत्र अंशुमान् पराक्रमी व विचारवान् होता. त्यानें तो अश्व मोठ्या युक्तीनें कपिलाच्या प्रसन्नतेनें घेऊन येऊन, याचा यज्ञ सिद्धीस नेवविला ( २ अंशुमान् श० पहा ).

सगरानें आपला यज्ञ पूर्ण होतांच, अंशुमानास राज्यावर बसवून, आपण तपार्थ अरण्यांत गमन केलें.

**संग्रामजित्**–पांडवांचा मित्र एक राजा.

२–कृष्णास भद्रेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**संजय**–सौवीर देशाचा राजा. विदुलेचा पुत्र ( विदुला श० पहा ).

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्ष राजाच्या वंशांत जन्मलेल्या रणंजय राजाचा पुत्र. याचा पुत्र शाक्यराजा.

३–(सो०वं०) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या सुहोत्र ना० पुत्राचा प्रपौत्र, कुश राजाचा पौत्र, व प्रति ना० राजाचा पुत्र. याचा पुत्र जयराजा.

–४( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील राजा, तद्वंशीय भर्म्याश्व राजाच्या पांच पुत्रांतील पांचवा.

५–जयद्रथमित्र एक राजपुत्र ( ३ जयद्रथ श० पहा ).

६–गवल्गण ना० सूताचा पुत्र. हा धृतराष्ट्र राजाचा सारथि होता. हा मोठा सत्यवक्ता व निस्पृह असे, म्हणून धृतराष्ट्रास बोध करण्यांत अगदीं मागें पुढें करीत नसे. युद्धांतील सर्व वृत्त घरबसल्याच यास व्यासप्रसादानें कळे, आणि तें जशाचें तसेंच हा त्यास सांगे (गावल्गणि श० पहा). हा धृतराष्ट्रास एकेवेळीं अतिशय निर्भर्त्सना करुन बोलला होता ( भार० द्रोण० अ० ८६ ).

**संजयंतिपुरी**–केरल देशाच्या दक्षिण अंगाकडे असणारी नगरी ( भार० सभा० अ० ३१ ).

**सजातंबि**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**सजीवि**–ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**संडदेश**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**सत्कर्मा**–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न अंगवंशीय पृथुलाक्षपुत्र बृहद्रथ, तदन्वयसंभूत धृतव्रतराजाचा पुत्र. यास, विवाहविधीनें वरिलेल्या ब्राह्मणीपासून अधिरथ नां-

वाचा पुत्र झाला होता, व तो सूतपणाची वृत्ति करीत असे.

**सत्कृति**-संकृति राजाची स्त्री. रंतिदेवाची माता.

**संत**-सत्यऋषीचा पुत्र, याचा पुत्र श्रवाऋषि ( वीतहव्य श० पहा ).

**संतति**-( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या काश्य ना० पौत्राच्या वंशांतील अलर्कराजाचा पुत्र. याचा पुत्र सुनीथराजा.

**संततेयु**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्व राजाच्या दहा पुत्रांतील साहवा.

**संतर्दन**-केकयदेशाधिपति धृष्टकेतु, त्यास वसुदेवभगिनी श्रुतकीर्ति तिच्या ठायीं झालेला पुत्र.

**संतान**-भारतवर्षीय क्षेत्र.

**संतानक**-सामान्य पर्वतवि० ( भार० उद्योग० अ० १११ ).

**सती**-ब्रह्ममानसपुत्र जो दक्षप्रजापति त्याच्या सोळा कन्यांतील कनिष्ठ. ही त्यानें भवास (शिवास) दिली होती. हिनें पित्यानें केलेल्या यज्ञांत आपला देह दग्ध केला होता ( १ दक्ष श० पहा ).

**संतोष**-बारा तुषित देवांतील एक ( तुषित श० पहा ).

२-स्वायंभुव मन्वंतरांतील धर्मऋषीचा पुत्र जो हर्ष तोच.

**सत्य**-सत्यलोक शब्द पहा.

२-सत्ययुग ( कृतयुग श० पहा ).

३-उत्तानपादवंशीय हविर्धान राजाच्या साहा पुत्रांतील पांचवा.

४-दहा विश्वेदेवांतील चौथा.

५-वितत्य ऋषीचा पुत्र. याचा पुत्र संत ऋषि ( वीतहव्य श० पहा ).

६-अंगिरस देवांतील एक.

७-भीमानें मारिलेला कलिंग राजाच्या दोन चक्ररक्षकांतील एक.

८-ब्रह्मसावर्णि मन्वंतरांत सप्तर्षींत एक होईल तो.

**सत्यक**-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय अनमित्र राजाचा पौत्र, शिनीचा पुत्र. याचा पुत्र सात्यकि.

२-कृष्णापासून भद्रेस झालेल्या पुत्रांतील एक.

३-सावर्णि मन्वंतरांत होणारे देववि०

**सत्यकर्मा**-सत्कर्मा राजा तोच.

२-दुर्योधनपक्षीय त्रिगर्त राजांतील एक. यास अर्जुनानें मारिलें होतें ( भार० शल्य० अ० २७ ).

**सत्यकाम**-जाबालऋषीस नामांतर.

**सत्यकेतु**-( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या काश्य ना० पौत्राच्या वंशांतील धर्मकेतु राजाचा पुत्र याचा पुत्र धृष्टकेतु.

**सत्यजित्**-चौथ्या तामस मन्वंतरांतील स्वर्गामधील चौथा इंद्र.

२-सूर्यासमागमें असणारा यक्ष ( ३ उर्ज० श० पहा ).

३-( सो० वं० ) पुरुकुलोत्पन्न जरासंधवंशीय सुनीथराजाचा पुत्र. याचा पुत्र विश्वजित्.

४-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय वसुदेवभ्राता आनकराजा, त्याचा ज्येष्ठ पुत्र.

५-द्रुपदराजाचा एक पुत्र, यास द्रोणाचार्यांनें मारिलें होतें ( भार० द्रोण० अ० २१ ).

**सत्यतपा**-एक ब्रह्मर्षि. हा एकेकाळीं आपल्या आश्रमद्वारापुढें उभा असतां, कोणी व्याधानें बाणेंकरून विद्ध केलेलें श्वापद, पळत गेलेलें यानें पाहिलें. इतक्यांत मागून ज्यानें त्यास विद्ध केलें होतें तो व्याध तेथें आला, व यास नमस्कार करून पुसूं लागला कीं, आपण इकडून एकादें श्वापद नुकेंच जातां पाहिलें काय ? त्यावर यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं, म्हणून व्याधानें पुनः पुसलें, तेव्हां हा त्यास याप्रमाणें बोलला—

**श्लोक—**

या पश्यति न सा ब्रूते या ब्रूते सा न पश्यति ॥
अहो व्याध स्वकार्यार्थी किं पृच्छसि पुनः पुनः॥४०॥

( देवीभाग० ३ स्कं० अ० ११ ). यांतील भावः-अरे व्याध, जी दृष्टि पाहात्ये मात्र, ती बोलत नाहीं म्हणजे तिला बोलतां येत नाहीं. आणि जी वाणी बोलत्ये ती पाहत नाहीं. यांत सारांश, जिला पाहतां येतें, त्याच दृष्टीला जर बोलतां येतें, तर सांगणें योग्य होतें, तसें नाहीं, तेव्हां वारंवार काय पुसतोस ? त्यावरून व्याध मुकाट्यानेंच निघून गेला.

**सत्यदेव**-भीमानें मारिलेला कलिंग राजाच्या दोन चक्ररक्षकांतील दुसरा.

**सत्यधर्मा**-धर्मसावर्णि मनूच्या दहा पुत्रांत एक होईल तो.

**सत्यधृति**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्ति राजाचा पुत्र देवमीढ अ० द्विमीढ, तद्वंशीय कृतिमान् अ० धृतिमान् राजाचा पुत्र. याचा पुत्र दृढनेमि राजा.

२-चिरकारी ऋषीचा भ्राता गौतमपुत्र शतानंद, त्याचा पुत्र. याचा पुत्र [illegible] ऋषि.

३-द्रौपदी स्वयंवरांतील एक राजा ( भार० आदि० अ० १८६ ).

४-पांचालकुलोत्पन्न द्रुपद राजाचा पुत्र. यास द्रोणाचार्यानें मारिलें ( भार० द्रोण० अ० २३ ).

**सत्यनामा**-अयोध्यानगरांत दशरथ राजाचें मंदिर ज्या स्थलीं होतें, त्याचें नांव.

**सत्यंभरा**-प्लक्ष द्वीपांतील नदी.

**सत्यभामा**-कृष्णाच्या अष्ट नायिकांतील एक. ही सत्राजित् राजाची कन्या होती व हिला १० पुत्र होते, ( ४ कृष्ण श० पहा. ) हिचा द्रौपदीशीं संवाद झाला असे ( भार० वन० अ० २३३ ) कृष्णनिधनानंतर हिनें सहगमन केलें ( भार० मौसल० अ० ७ ).

**सत्ययुग**-कृतयुग शब्द पहा.

**सत्यरथ**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न निबंधन राजाचा पुत्र, यास त्रिशंकु असें म्हटलेलें असून, पुत्र हरिश्चंद्र होता.

२-( विदे० वं० ) समरथ जनकाचा पुत्र. याचा पुत्र उपगुप्त जनक.

३-दुर्योधनपक्षीय जे संशप्तक त्रिगर्त पांच बंधु, त्यांतील एक ( भार० उद्योग० अ० १६६ ). यास अर्जुनानें युद्धांत मारिलें होतें ( भार० शल्य० अ० २७ ).

**सत्यलोक**-ब्रह्मदेव ज्या स्थानीं राहतात तो लोक. हा भूमीच्या ऊर्ध्वभागीं जे भूलोकापासून सात लोक वर्णिले आहेत, त्यांतील सर्वांवरील लोक. वैकुंठ, कैलास, हे दोन लोक याच्यावर असल्याचें पुराणांत आढळतें; परंतु तें वर्णन श्रुतिविरुद्ध असून, ते यांतच अंतर्भूत समजावेत. प्राकृत ग्रंथकार मेरुवरच सत्यलोक असल्याचें वर्णितात, परंतु तें वर्णन ब्रह्मदेवाचा दिवस अत्यंत मोठ्या असल्या कारणानें, अगदीं खोटें आहे.

**सत्यवती**-अगस्त्य ऋषीची स्त्री लोपामुद्रा तिला नामांतर.

२-द्वितीयार्थक अरुंधतीचा भ्राता जो नारद ऋषि याची स्त्री ( ३ नारद श० पहा ).

३-गाधिराजाची कन्या, व ऋचीक ऋषीची स्त्री ती. ही जामदग्नि ऋषीची माता होती.

४-उपरिचर वसुराजाची कन्या, ही जन्मांतरींची पितरांची कन्या, अच्छोदा समजावी. हिला कौमार दशेंत पराशर ऋषीपासून कृष्णद्वैपायनपुत्र झाला. हीच पुढें शंतनु राजाची स्त्री होऊन, चित्रांगद, आणि विचित्रवीर्य, अशा दोन पुत्रांस प्रसवली असे. हिच्या उत्पत्तीविषयीं ( २ उपरिचर श० पहा ).

**सत्यवर्मा**-संशप्तक जे त्रिगर्त पांच बंधु, त्यांतील एक.

**सत्यवाक्**-ब्रह्मर्षि.

२-मुनीस झालेल्या सोळा गंधर्वांतील एक. यास युगप असें नामांतर आहे.

३-चक्षुर्मनूपासून नड्वलेस झालेल्या अकरा पुत्रांतील एक. यास सत्यवान् असेंहि नामांतर असे.

**सत्यवान्**-तृतीयार्थक सत्यवाक् तोच.

२-शाल्वदेशाचा राजा द्युमत्सेन त्याचा पुत्र. यास बाल्यावस्थेंतहि अश्वांची भारी प्रीति असल्यामुळें हा मृत्तिकेनें अश्वांचीच चित्रें करून खेळे. भिंतीवर अश्वांचीच चित्रें पाहीं व लिही, आणि त्यावरून यास चित्राश्व असें लोक म्हणत ( भार० वन० अ० २९४ ). हा अश्वपति राजाची कन्या सावित्री तिचा पति असून, तिच्या योगानें अल्पायु असतां दीर्घायु झाला होता ( ४ सावित्री श० पहा ).

**सत्यव्रत**-पूर्वकल्पींचा एक राजा. ( मत्स्यावतार श० पहा ). नित्यकल्प झाल्यावर कशी स्थिति असते ती पाहण्याची यास इच्छा झाली होती म्हणून, मत्स्यानें यास नौका सिद्ध करण्यास सांगितली असून घेववतील तितके प्राणी नौकेमध्यें कर्मणुकीसाठीं घेण्यास आज्ञा केली होती. तीप्रमाणें प्रलय होण्याच्या संधीस यानें सिद्धता केली असतां, भूलोक, भुवर्लोक, आणि स्वर्गलोक, याप्रमाणें तीन लोक मात्र बुडून गेले. महर्लोक, जनोलोक, तपोलोक आणि सत्यलोक, हे चार न बुडतां तसेच होते. तेव्हां नौकारूढ हा राजा, प्रलयोदकांत संचार करूं लागला, व यास वचन दिल्याप्रमाणें पूर्वीचा मत्स्य यासमीप प्रकट होऊन, त्यानें या राजास जे अनेक इतिहास सांगितले, तद्वर्णनपर ग्रंथास प्रस्तुत मत्स्यपुराण म्हणतात. सारांश, वेदहरण करणारा हयग्रीव असुर, त्यास मत्स्यरूपी भगवंतानें मारून, त्यापासून वेद माघारे घेतले, व प्रलय सरला असतां, उठलेल्या ब्रह्मदेवाच्या स्वाधीन ते पुनः केले. नंतर मत्स्य, आतां तूं चालू कल्पामध्यें सातवा मनु होशील इतकें राजास बोलून अंतर्धान पावला.

**श्लोक**-

अतीतप्रलयापाय उत्थिताय स वेधसे ॥
हत्वाऽसुरं हयग्रीवं वेदान् प्रत्याहरद्धरिः ॥ ५७ ॥
स तु सत्यव्रतो राजा ज्ञानविज्ञानसंयुतः ॥
विष्णोः प्रसादात्कल्पेस्मिन्नासीद्वैवस्वतो मनुः ॥५८॥
( भाग० स्कंध० ८ अ० २४ ) ( मत्स्य० ).

ह्याच मूळाच्या आधारानें नौका सिद्ध करणाऱ्यास ( नोहा ) नांव ठेवून, म्लेंछांनीं आपल्या ग्रंथांत प्रलयाची कथा लिहिली आहे असें समजावें. परंतु तिला ना पूर्वापर संबंध, ना कालाची व्यवस्था.

२-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अरुण राजाचा पौत्र, व निबंधन राजाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यासच त्रिशंकु असें म्हटलेलें आहे.

३-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक. यास सत्यसंघ असें नामांतर होतें.

४-दुर्योधनपक्षीय जे संशप्तक त्रिगर्त त्यांतील एक.

**सत्यश्रवा**-( सू० वं० ) नरिष्यंतकुलोत्पन्न वीतिहोत्र राजाचा पुत्र, याचा पुत्र उरुश्रवाराजा.

२-( सो० वं० ) उपरिचर वसूचा पुत्र प्रत्यग्र, त्यास नामांतर होतें.

३-एक ब्रह्मर्षि.

४-अभिमन्यूनें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० ४५ ).

**सत्यसंध**-तृतीयार्थक सत्यव्रत तोच.

**सत्यसहा**-रुद्रसावर्णि मन्वंतरांत होईल विष्णूच्या अवताराचा पिता तो.

**सत्यसेन**-उत्तम मन्वंतरांत होऊन गेलेला विष्णूचा अवतार.

२-अर्जुनानें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा. ( भार० कर्ण० अ० २७ ).

३-नकुलानें मारिलेल्या कर्णाच्या पुत्रांतील एक. ( भार० शल्य० अ० ७० ).

**सत्यहित**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न उपरिचर वसूचा पौत्र, व वृहद्रथराजाचा पुत्र कुशाग्र, त्याच्या ऋषभ ना० पुत्राचा पुत्र. याचा पुत्र पुष्पवान्.

**सत्या**-ऋषभदेववंशीय वीरव्रत राजाच्या दोन पुत्रांतलि जो ज्येष्ठ मंथुराजा, त्याची स्त्री, भौवन राजाची माता.

२-शंयु ना० अग्नीची स्त्री.

३-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न उपरिचर राजाचा ज्येष्ठ पुत्र वृहद्रथ, त्याच्या दोन स्त्रियांतील एक. हिला अर्ध्या शकलानें जरासंध नांवाचा पुत्र झाला होता,

४-नग्नजित् राजाची कन्या नाग्नजिती तिचें नांव. हिला कृष्णानें वरिलें होतें. ( ४ कृष्ण श० ) पहा.

५-कृष्णपत्नी सत्यभामा, तिलाहि क्वचित् ह्मटलेलें आढळतें.

६- अयोध्येच्या मध्यभागींच्या पुरीचें नांव.

**सत्यायु**-( सो० वं० ) पुरुरव्याच्या साहा पुत्रांतील तिसरा. याचा पुत्र श्रुतंजय.

**सत्याषाढ**—एक ब्रह्मर्षि.

**सत्येयु**—( सो० वं० ) पुरुकुलोत्पन्न रौद्राश्व राजा, त्याच्या दहा पुत्रांतील आठवा.

**सत्येषु**—दुर्योधनपक्षीय जे संशप्तक त्रिगर्त पांच बंधु, त्यांतील एक.

**सत्राजित्**- ( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय अनमित्र राजाचा पुत्र निघ्न, त्याच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यानें आपली कन्या सत्यभामा कृष्णास दिली होती. व यास पुढें शतधन्व्यानें मारिलें होतें. ( स्यमंतकमणि श० पहा ).

(एकाच कुलांत उत्पन्न झालेले राजे,परस्पर विवाहास कसे योग्य होतात, अशी शंका सहजींच मनांत येते, तिचा परिहार असा आहे कीं, क्षत्रियांमध्यें कुलास पुरोहित भिन्न झाला म्हणजे त्यांचीं गोत्रें भिन्न भिन्न असतातच, आणि त्या पुरोहितगोत्रांच्या धोरणावरून ते आपआपलीं गोत्रें भिन्न मानून, संशयरहित, परस्पर विवाह करितात असें समजावें. )

**सत्रायण**-इंद्रसावर्णि मन्वंतरांतल्या विष्णूच्या अवताराचा पिता.

**सत्व**-रैवत मनूच्या दहा पुत्रांत होऊन गेलेला एक पुत्र तो.

**सत्ववत्** -एक ऋषि.

**सत्ववती**-भारतवर्षीय नदी.

**सद**-आंगिरसदेवांतील एक.

**संदंश**-जे कोणी सुवर्णादिक धातु चोरतात, त्यास तप्त केलेल्या सांडसानें यमदूत त्यांचें मांस तोडून यातना करितात, ह्मणून या नरकास हें नांव आहे.

**सदश्व**-एक ब्रह्मर्षि.

**सदस्यवान्**-ब्रह्मर्षि. ( ३ आंगिरा श० पहा ).

**सदस्योर्मि**-राजर्षि.

**सदाकांता**-भारतवर्षीय नदी.

**सादानीरा**-करतोया नदीस नामांतर.

**सद्यकल्प**-ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील होऊन गेलेला नववा दिवस. ( ४ कल्प श० पहा ).

**सद्योजात**-शिवाचें नांव अथवा त्याचा अवतार.

**संधि**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न ध्रुवसधिवंशीय प्रसुश्रुत राजाचा पुत्र. याचा पुत्र अमर्षणराजा.

**संध्या**-भारतवर्षीय नदी.

२-कोणी एक स्त्री. विद्युत्केश राक्षसाची स्त्री सालंकटंकटा तिची माता.

**सनक**–सर्व महर्षींच्या पूर्वी ब्रह्मदेवानें जे च्यार मानसपुत्र निर्माण केले होते, त्यांतील एक. हा च्यारहि भ्रात्यांसहित मोठा ब्रह्मनिष्ठ होता.

**सनत्कुमार**–वरील सनकाचा भ्राता.

**सनत्सुजात**–वरीलप्रमाणेंच. यानें धृतराष्ट्रास ब्रह्मविद्या कथन केली. ( भार० उद्योग० अ० ४२–४६ )

**सनंदन**–वरप्रमाणेंच.

**सनद्वाज**–( विदे० वं० ) शुचिसंज्ञक जनकाचा पुत्र. याचा पुत्र ऊर्ध्वकेतु जनक.

**सनातन**–सनत्सुजातास नामांतर.

**सनिवेश**–त्वष्टा प्रजापतीच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. विश्वरूपाचा भ्राता.

**सनीपदेश**–भारतवर्षीय देश. ( भार० भीष्म० अ० ९ )

**सन्नती**–( सो० वं० ) नीपराजाचा पुत्र ब्रह्मदत्तराजा त्याची स्त्री. हिला गौ आणि सरस्वती अशीं दोन नामांतरें होतीं ( पितृवर्ति श० ) पहा.

**संन्नतिमान्**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिराजाचा पुत्र देवमीढ, अथवा द्विमिढ, तद्वंशीय सुमतिराजाचा पुत्र. याचा पुत्र कृति ना० राजा.

**सन्नादन**–रामसेनेंतील एक प्रख्यात वानर. ( वा० रा० युद्ध० स० २७ ).

**सन्निहति**–भारतवर्षीय तीर्थ.

**संन्यास**–सामवेदोपनिषत्. चतुर्थाश्रम तर प्रसिद्ध आहेच

**संपाति**–कश्यपपुत्र जो अरुण त्याचा ज्येष्ठ पुत्र. हा महापराक्रमी होता. एकदां याची, व याचा कनिष्ठ भ्राता जटायु त्याची, अशी प्रतिज्ञा झाली कीं, आपणा उभयतांतून सूर्यमंडलास आधीं कोण जाऊन पोहोंचतो. तें पाहूं. त्यावरुन हा बरें म्हणून, यानें व जटायूनें उड्डान केलें. जातां जातां, जों जों सूर्यमंडळ जवळ जवळ येऊं लागलें, तों तों सूर्याच्या किरणांनीं दोघांस पीडा होऊं लागली. तरी संपाति वर होता ह्मणून, जटायूच्या प्रीतीस्तव त्यास पीडा न होण्यासाठीं त्यानें, आपल्या पंखांची त्यावर छाया धरिली व उडत जाऊं लागला; परंतु त्यांत असें झालें कीं, अगदीं सूर्यमंडळासमीप जाऊन पोहोचण्याच्या संधींत याचे संपूर्ण पक्ष एकाएकीं दग्ध होऊन हा जो तेथून कोसळला तो महेंद्रपर्वतावर पडला. जटायु मात्र पक्ष दग्ध न होतां माघारा फिरून भूमीवर संचार करीत राहिला. सारांश, उभय भ्रात्यांची तुटातूट होऊन, इकडे संपाति मूर्च्छा येऊन पडलेला बऱ्याच कालानें सावध झाला, व पाहूं लागला तों जटायु समीप नसून आपण दक्षिणसमुद्रीं आहों. नंतर पंख नसल्या कारणानें क्षुधानिवृत्ति करण्यासाठीं, हा, त्या पर्वतावरून खुर्डत खुर्डत चालला असतां, चंद्रमा ना० मुनि, त्याच पर्वतावर वास करणारा त्याची व याची गांठ पडली. तेव्हां मुनीनें तूं कोण म्हणून यास पुसलें, त्यावरुन यानें आपलें नांव सांगतांच मुनि म्हणाला, संपाते, अरे, तूं महापराक्रमी असा असतां,तुझी अशी अवस्था कशानें झाली? तेव्हां यानें झालेलें सर्व वृत्त निवेदन करून विनंति केली कीं, आतां पुढें मी कोणत्या उपायानें क्षुधेचें निवारण करावें तें सांगा. त्यावरून त्या मुनीनें, क्षुधा आणि तृषा, हे प्राणाचे धर्म आहेत, आणि आत्मा प्राणाचा साक्षी ( द्रष्टा ) आहे. तेव्हां दृश्याचे धर्म द्रष्टयास बाधक मुळींच होत नाहींत, येथून सांगण्यास आरंभ करून यास आध्यात्मविद्येचा उपदेश केला. सारांश, मुनीच्या बोधापासून याचें समाधान झालें. व समागमाच्या योगानें क्षुधातृषाहि निवृत्त होत गेली.

याप्रमाणें उभयतांच्या समागमास बहुत काल लोटला असतां, चंद्रमा मुनीनें परलोकास जाण्याचें मनांत आणून तो यास बोलला, संपाते, आतां थोडक्याच कालानें इक्ष्वाकुकुलांत राम उत्पन्न होऊन, तो पित्याची आज्ञा पालन करण्यानिमित्त बंधु व स्त्री,यांसहवर्तमान दंडकारण्यांत येईल. तेथें त्याची स्त्री चोरून रावण लंकेस घेऊन गेल्यावर, त्याचें सुग्रीवाशीं सख्य घडेल, व सुग्रीव तिच्या शोधाकरितां दक्षिणेस वानर पाठवील, परंतु त्यांस शुद्धि न लागल्या कारणानें, ते या समुद्रतिरीं प्रायोपवेशन ( अन्नोदकत्यागपूर्वक मरण्याचा निश्चय ) करून बसतील. त्या कालीं तुझी त्यांची भेट होऊन तूं त्यांस सीतेची शुद्धि यथार्थ सांगशील त्या योगानें तुझे पूर्ववत् होऊन तूं सुखी होशील. हें माझें तुला वरप्रदान आहे, इतकें बोलून चंद्रमा मुनि दिव्यलोकास गेला,व हा तेथेंच राहिला.

पुढें चंद्रमा मुनीनें सांगितल्याप्रमाणेंच अंगदप्रमुख वानर दक्षिणसमुद्रतीरीं येऊन प्रायोपवेशन करीत असतां, याची त्यांची भेट झाली, व जटायूच्या मरणाचा वृत्तांत यास कळून याला मोठें दुःख झालें. सारांश नंतर यानें अंगदादिकांस सीतेची शुद्धि सांगितली, ती सांगतांच याचे पक्ष पूर्ववत् झाले, असें पाहून आतां तुह्मी समुद्रोल्लंघनाचा उपाय पहा, इतकें त्यांस बोलून हा तेथून निघून गेला. संपातीचें वय किती होतें, तें कोठें आढळत नाहीं; परंतु असें खचित आहे कीं, तो जटायूहून मोठा होता, व त्यास सुपार्श्व, बभ्रु,

शीघ्रग, इ० अनेक पुत्र होते (अध्यात्म रा० किष्किं० स० ८ ).

२–किष्किंधेंत राहणारा एक वानर (वा० रा० किष्किं० स० ३३ ).

३–बिभीषणाच्या चार अमात्यांतील एक ( वा० रा० सुंदर० स० ३७ ).

४–लंकेंतील दुसरा एक रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

५–भारतीय युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**सप्तऋषि**–प्रत्येक मन्वंतरांत धर्मोपदेष्टे सात ऋषि होत असतात ते. यांमध्यें झालेले, प्रस्तुतचे व होणारे, त्या त्या मन्वंतराच्या नांवावर लिहिले आहेत ते पहावे.

**सप्तगोदावरी**–गोदावरी नदी सप्त प्रवाहांनीं समुद्रास मिळत्ये, म्हणून तिला हें नांव पडलेलें आहे.

**सप्तचरु**–भारतवर्षीय तीर्थ.

**सप्तजनाश्रम**–पंपासरोवर आणि किष्किंधानगरी, या दोहोंच्या मध्यभागीं पूर्वी कोणी सात ऋषि तप करीत होते, त्या कारणामुळें त्या स्थलास पडलेलें नांव ( वा० रा० किष्किं० स० १३ ).

**सप्तजित्**–दनुपुत्र दानवांतील एक.

**सप्तजिव्ह**–सात जिव्हा असल्यामुळें अग्नीस नांव.

**सप्तपाताल**–भूमीच्या अधोभागीं जे सात बिलस्वर्ग आहेत ते. त्यांचीं नांवें अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल आणि पाताल.

**सप्तपुरी**–अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवंती आणि द्वारवती अ० द्वारका.

**सप्तमहाद्वीपें**–जंबुद्वीप, प्लक्षद्वीप, शाल्मलिद्वीप, कुशद्वीप, क्रौंचद्वीप, शाकद्वीप, आणि पुष्करद्वीप. अशीं या पृथिवीवर सात महाद्वीपें आहेत तीं. या द्वीपांच्या वर्णनांत, नांवें कोठें कोठें मागेंपुढें अशीं आढळतात. परंतु बहुग्रंथसंमत हीं नांवें क्रमशः खरीं आहेत. यांशिवाय नांवें अव्यवस्थित आढळल्यास लेखकांचा प्रमाद झाला आहे असें समजावें. या प्रत्येक द्वीपाभोंवतीं एकेक समुद्र आहे.

**सप्तमहाद्वीपाधिपति**–प्रियव्रत राजाच्या दहा पुत्रांतून, तीन विरक्त असून तपास अनुसरल्यामुळें उरले जे आग्नीध्र, इध्मजिव्ह, यज्ञबाहु, हिरण्यरेता, घृतपृष्ठ, मेधातिथि, आणि वीतिहोत्र, असे क्रमानेंच जंबुद्वीपादिकांचे सात अधिपति ते.

**सप्तमहासागर**–क्षारसमुद्र ( खाऱ्या पाण्याचा सागर), इक्षुरसोद ( उंसाच्या रसाप्रमाणें ज्या जलाची रुचि मात्र असा सागर ), सुरासमुद्र ( मद्याप्रमाणें जलाची रुचि व तसाच गुण असा सागर ), घृतोद अ० घृतसमुद्र ( तुपाप्रमाणें रुचि व तसाच गुण अशा जलाचा सागर), क्षीरोद अ० क्षीरसमुद्र (दुग्धाप्रमाणें गुण व रुचि असा सागर ), दधिमंडोद अ० दधिसमुद्र ( दह्याच्या रुचीप्रमाणें जलाचा सागर ), शुद्धोद अ० शुद्धसमुद्र ( गोड्या पाण्याचा सागर ), असा एकेका द्वीपाभोंवता एकेक समुद्र आहे. मिळून पृथिवीवर सात महासागर आहेत. द्वीप जसें एकेकाहून द्विगुणित मोठें असतें, असाच प्रत्येक समुद्र रुंदीनें क्रमेंकरूनच द्विगुणित द्विगुणित मोठा असतो. आम्ही संपूर्ण पृथिवीचा शोध लावून तिला प्रदक्षिणाहि करून आलों असें जे म्हणतात, त्यांस अद्यापपर्यंत क्षारसमुद्राचें उल्लंघन झाल्याचें व अन्यद्वीपांत गेल्याचें त्यांच्या इतिहासांत कोठें आढळत नाहीं; तथापि आम्ही गेलों असेंच त्यांचें म्हणणें असेल, तर तशी प्रतीति कां होऊं नये ? प्रतीति हीच कीं, सुरासमुद्रांतून मद्य, शिसें भरभरून सर्वत्र यावें. तें अजून येत नाहीं, त्याचप्रमाणें दहीं, दूध, तूप, उंसाचा रसहि येत नाहीं, तेव्हां सर्व पृथ्वीचा शोध लागला हें म्हणणें संभवत नाहीं.

**सप्तमातृका**–ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी आणि चामुंडा.

**सप्तशृंग**–सह्याद्रि पर्वतावरील देवींचें स्थानविं०.

**सप्तसप्ति**–सात घोडे ज्याच्या रथास; त्यामुळें सूर्यास नांव.

**सप्तसागरतीर्थ**–मतंग ऋषीच्या आश्रमाजवळचें तीर्थ.

**सप्तसारस्वत**–सुप्रभा, कांचनाक्षी, विशाल, मनोरमा, ओघवती, सुरेणु आणि विमलोदका, असे सरस्वती नदीचे सात प्रवाह ज्या स्थळीं झाले आहेत, त्याचें नांव. येथें पूर्वी मंकणक ऋषीचा आश्रम होता (भार० शल्य० अ० ३७ ).

**सप्तस्रोततीर्थ**–सप्तर्षींच्या संतोषार्थ जेथें अलकनंदा सप्तप्रवाहरूप झाली आहे, त्याचें नांव. ( स्वर्धुनी श० पहा ).

**सप्तस्वर्ग**–भूलोक ( मृत्युलोक ), भुवर्लोक ( अंतरिक्षलोक ), स्वर्गलोक ( इंद्राचा लोक ), महर्लोक ( भृग्वादिक महर्षींचा लोक ), जनोलोक ( सनकादिकांचा लोक ), तपोलोक ( महातपस्वी व सिद्ध यांचा लोक ) आणि सत्यलोक ( ब्रह्मदेवाचा लोक ) हे लोक पृथिवीच्या ऊर्ध्वभागींचे समजावेत.

**सप्ताश्व**–सूर्य.

२–रैवतमन्वंतरांत जे सप्तर्षि होऊन गेले त्यांतील एक.

**संभल**–एक ग्राम, येथें राहणाऱ्या विष्णुयशा ब्राह्मणाच्या घरीं कल्क्यवतार होणार आहे ( भार० वन० अ० १९० ).

**सभानर**–( सो० वं० ) अनुराजाचा पुत्र. याचा पुत्र कालानल अ० कालनर.

**सभापति**–भूतकर्मा अशा नामांतराचा भारतीय युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. यास नकुलपुत्र शतानीक त्यानें मारिलें ( भार० द्रोण० अ० २५ ).

**संभूति**–चाक्षुपमन्वंतरांतील अजित् ना० विष्णूच्या अवताराची माता.

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न पुरुकुत्सराजाच्या दोन पुत्रांतील द्वितीय पुत्र जो वसुद राजा, त्याचा पुत्र. यास त्रिधन्वा नांवाचा पुत्र होता.

३–( सो० वं ) अनुकुलोत्पन्न जयद्रथ राजाची स्त्री, विजयराजाची माता.

**संभेद**–सिंधुसागरसंगमासमीचें तीर्थ.

**सभ्य**–पवमान अग्नीस संशतीपासून झालेल्या दोन पुत्रांतील पहिला.

**सम**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

२–हंसध्वजराजाचा पुत्र.

**समंग**–सरल झाल्यावर हें नांव अष्टावक्रास पडलें असावें ( भार० शांति० अ० २८६ ).

२–दुर्योधनाचा बल्लव ( आचारी ) ( भार० वन० अ० २३९).

**समंगा**–अष्टावक्र जींत स्नान करून सरल झाला, त्या मधुविलानदीस पडलेलें नांव ( भार० वन० अ० १३४ ).

**समंतर**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**समंथदेश**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**समरथ**–(विदे० वं०) क्षेमधी जनकाचा पुत्र. याचा पुत्र सत्यरथ जनक.

**संमर्दन**–( सो० वं ) यदुकुलोत्पन्न वसुदेवाच्या आठ पुत्रांतील पांचवा.

**समसौरभ**–जनमेजयसर्पसत्रांतील एक सदस्य (सभासद) ऋषि.

**समाधि**–एक वैश्य ( ९ सुरथ श० पहा ).

**समान**–शरीरस्थ पंचप्राणांतील नाभिस्थानींचा प्राण ).

**समानकल्प**–ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील होऊन गेलेला सत्रावा दिवस ( ४ कल्प श० पहा ).

**समितिंजय**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**समीक**–एक राजर्षि.

**समीची**–शापानें मगरी झालेली अप्सरा. ( नारीतीर्थ श० पहा ).

**समुद्र**–सागरदेवतेस नांव. याची स्त्री जान्हवी (भागीरथी) ( भार० उद्योग० अ० ११७ ).

**समुद्रसेन**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० उद्योग० अ० ४ ). याचा पुत्र चंद्रसेन, हाही युद्धांत पांडवांकडेस होता ( भार० द्रोण० अ० २३ ).

**सम्राट**–ऋषभदेववंशीय चित्ररथराजा, त्यास ऊर्णा ना० स्त्रीपासून झालेला पुत्र. यास उत्कला ना० स्त्री असून, मरीचि नांवाचा पुत्र होता.

**संयम**–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न धूम्राक्ष अ० धूम्राश्व राजा, त्याचा पुत्र. यास संजय असेंहि म्हटलेलें आहे, यास पुत्र सहदेव नांवाचा होता.

**संयमन**–दुर्योधनपक्षीय शलराजास नामांतर, याच्या पुत्रास सांयमनि म्हटलें आहे.

**संयमिनी**–आपण राहतों या दक्षिणभागाकडील मानसोत्तरपर्वतस्थ दक्षिण दिग्पाल जो यम, त्याची नगरी. हिच्या याम्योत्तरावर सूर्य आला असतां, तेथें मध्यान्ह होऊन, देवधानींत सूर्यास्त, सूषा अ० निम्लोचिनींत सूर्योदय, आणि विभावरींत मध्यरात्र होत्ये. ( १ सूर्य श० पहा ). ( भार० वन० अ० १६३ ).

**संयाति**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

२–( सो० वं० ) नहुषराजाच्या साहा पुत्रांतील तिसरा हा अनपत्य होता.

३–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न बहुगवराजाचा पुत्र, याचा पुत्र अहंयाति.

**संयोधकंटक**–वैश्रवणाचा अनुचर एक यक्ष ( वा० रा० उत्तर० स० १४ ).

**सरक**–भारतवर्षीय तीर्थ.

**सरघा**–ऋषभदेववंशीय बिंदुमान् राजाची स्त्री. मधुराजाची माता.

**सरद्वस्वि**–ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**सरमा**–रावणभ्राता बिभीषण त्याची स्त्री. सीता अशोकवनिकेंत असतां, ही तिला रामाचें कुशल वृत्त वारंवार जाऊन कळवी, व तिचें समाधान करी. ( वा० रा० युद्ध० स० ३३ ) ही शैलूष गंधर्वाची कन्या होय. हिला असें नांव पडण्याचें कारण हें आढळतें:—हिची माता मानससरोवरासमीप प्रसूत झाली असतां, त्याचें जल वर्षाकालामुळें इतकें वाढलें कीं, तें या बालकापर्यंत आलें. तेव्हां हिच्या मातेनें " भो सर मा

वर्धस्व " ( हे सरोवरा, वाढूं नको ) असें करुणा भाकून म्हटलें. त्यावरून जल वाढणें राहून हिचें संरक्षण झालें ( वा० रा० उत्तर० स० १२ )

**सरमाण**–सिंहिकापुत्रांतील एक.

**सरयु–यू**–भारतवर्षीय भरतखंडस्थ नदी. ही हिमालयावरील सरोवरांतून निघाली म्हणून हें नांव पावली. ही आग्नेय कोसल देश, व अंग इ० देशांतून वाहात जाऊन, भागीरथीस मिळालेली आहे असें आढळतें, अयोध्या नगरी हिच्याच कांठीं आहे. ( वा० रा० बाल० स० २४ ) शरयू हिलाच म्हटलेलें आहे.

**सरल**–वीरवर्म्याचा पुत्र.

**सरस्वती**–ब्रह्मदेवाची ज्ञानशक्ति व स्त्री. हिला सावित्री, व गायत्री अशींहि नांवें आहेत. वाणीची हीच देवता होय.

२–स्वायंभू मनूची जी शतरूपा ना० स्त्री ती. ही ब्रह्मदेवाच्या वामांगापासून उत्पन्न झाली होती. ही, दंडनीति इ०शास्त्रांची कर्त्री म्हटलेली आहे (भार०शांति० अ० १२२ ).

३–सप्तर्षींकरितां भागीरथी सप्तप्रवाहरूप झाली, त्यांतील एका प्रवाहाचें नांव.

४–द्वितीयार्थक हिमालयापासून निघालेली नदी. हिला कोठें भोगावती असेंहि म्हटलेलें आहे. हिचे सप्त प्रवाह होऊन त्यांत जो देश वसला आहे, त्याला सप्तसारस्वत असें साधरण नांव आहे. सप्तप्रवाहांचीं नांवें (सप्तसारस्वत श० पहा). ह्या नदीचा ओघवती ना० एक प्रवाह, कौरवपांडवांचें युद्ध ज्या कुरुक्षेत्रांत झालें, त्याजवळून पांडवांच्या वेळेस वाहत होता, व त्याला अरुणा नांवाची नदी मिळत असे, प्रस्तुतचें सांगवत नाहीं ( भार० शल्य० अ० ५ ).

५–गंगा आणि यमुना, यांच्या संगमांत तिसरी गुप्त नदी आहे ती.

६–शाल्मलीद्वीपांतील महानदी.

७–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

८–सो० वंशीय पूरुकुलोत्पन्न ब्रह्मदत्त राजाची स्त्री, व विष्वक्सेन राजाची माता. सन्नति हिचेंच नामांतर.

९–सावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या सार्वभौम ना०विष्णूच्या अवताराची माता.

**संरोचन**–गोमतीतीरासमीपचा लहानसा पर्वत. ( वा० रा० युद्ध० स० २६ ).

**सर्प**–भारतोक्त रुद्र ( एकादश रुद्र श० पहा ).

**सर्पदेवी**–भारतवर्षीय तीर्थ.

**सर्पमाली**–एक ऋषि.

**सर्वकर्मा**–ऋतुपर्ण राजाचा पुत्र जो नलराजा त्यास नामांतर. यास सर्वकाम असेंहि म्हटलेलें आढळतें. यास सुदास आणि अनरण्य, असे दोन पुत्र होते. हा शूद्राप्रमाणें थोडा वागला होता. त्यामुळें याला असें नांव पडलें होतें. ( भार० शांति० अ० ४९ ).

**सर्वकाम**–वरील शब्द पहा.

**सर्वग–गत**–भीमसेन पांडवापासून, काली ना० स्त्रीस झालेला पुत्र.

**सर्वतेजस्**–उत्तानपादवंशीय व्युष्ट राजास पुष्करिणी स्त्रीपासून झालेला पुत्र. यास आकूता भार्येपासून चक्षु नांवाचा पुत्र झाला होता. तोच चालू कल्पामध्यें साहवा मनू होऊन गेला.

**सर्वतोभद्र**–क्रौंचमहाद्वीपांतल्या सप्त महापर्वतांतील एक.

२–सुपार्श्व पर्वतावरील आराम तो.

**सर्वदमन**–दुष्यंतपुत्र जो भरत राजा त्याचें नामांतर.

**सर्वमंगला**–पार्वतीस नांव.

**सर्वसार**–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**सर्वहृद**–भारतवर्षीय तीर्थ.

**सर्वौषधि**–हिमालयस्थ कैलास शिखराच्या आग्नेयी दिशेकडील शिखरवि०.

**सलंक**–प्रथमार्थक विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**सवन**–प्रियव्रत राजाच्या दहा पुत्रांतून तिघे विरक्त झाले त्यांतील एक ( भाग० पंचम० अ० १ )

२–वारुणि भृगूच्या सात पुत्रांतील एक.

**संवरण**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र ऋक्ष, त्याचा पुत्र. यास तपती नांवाची स्त्री होती, व तिच्या ठायीं झालेला कुरु नांवाचा पुत्र होता.

**सवर्णा**–शतद्रुती जी दहा प्रचेत्यांची माता ती.

**संवर्त**–प्रलय मेघांतील पहिला.

२–स्वायंभुव मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र अंगिरा ऋषि, त्याच्या तीन पुत्रांतील तिसरा. यानें जेथें तप केलें होत, त्यास संवर्तवापी असें नांव पडलेलें आहे.

३–चालू मन्वंतरांतील अंगिरा ऋषि, त्याच्या आठ पुत्रांतील सातवा. मरुत्त राजानें यास नारदाच्या सांगण्यावरून पौरोहित्यार्थ वरिलें होतें, व मोठा यज्ञ केला होता.

**संवर्तक**–अग्निविशेषाचें नांव.

**संवर्तवापी**–भारतवर्षीय तीर्थ. येथें संवर्त ऋषीनें तप केलें होतें ह्मणून, त्यास हें नांव पडलें होतें.

**सविता**–भारतोक्त एक आदित्य (द्वादशादित्य श०पहा).

२–चालू मन्वंतरांत होऊन गेलेला पांचवा व्यास (व्यास श० पहा).

**संवेद्य**-भारतवर्षीय तीर्थ.

**संवेधस्**-ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**सव्यसाची**-दोनहि हातांनीं धनुष्यास बाण लावून सोडतां येत असल्यामुळें अर्जुनास पडलें होतें नांव तें.

**संशांति**-पवमान अग्नीची स्त्री सभ्य आणि आवसथ्य यांची माता.

**संशप्तक**-ज्यानें, मी युद्धांत अमुक योध्यास मारीन, न मारीन तर, ज्या गतीस पंचमहापातकी जातात ती गति मला होईल, अशी शपथ घेतली तो, हें नांव साधारण आहे; कारण जो अशी शपथ घेणारा तो संशप्तक होय. भारती युद्धांत दुर्योधनाकडून अर्जुनास-मागमें युद्ध करणारे दोन संशप्तक होते, एक त्रिगर्त राजाचे सुशर्मा, सुरथ, सुधनु, सुबाहु आणि सुधन्वा, असे पांच पुत्र; आणि सत्यवर्मा, सत्यरथ, सत्यव्रत, सत्येषु व सत्यकर्मा, हे पांच भिन्न भिन्न राजे, यांनीं अर्जुनास एका पाठीमागून एकानें युद्धास बोलाविलें, परंतु त्यानें या सर्वांसहि मारिलें (भार० द्रो०अ०१७).

२-दैत्यवि० यास अर्जुनानें वनवासकाळींच मारिलें ( भार० वन० अ० २३९ ).

**संश्रुत**-ब्रह्मर्षि ( १ विश्वामित्र श० पहा ).

**संश्रुत्य**- ,, ,,

**संसारमोचन**-भारतवर्षीय तीर्थ.

**संकृति**-ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा ).

**सस्मित्**-उत्तम मन्वंतरांत होऊन गेलेल्या सप्तर्षींतील एक.

**सह**-उत्तम मनूच्या पुत्रांत होता एक पुत्र तो.

२-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

३-कृष्णास लक्ष्मणेपासून झालेला पुत्र.

४-मासक्रमानें वर्षांतील नववा मास. याची पूर्णिमा मृगनक्षत्रानें युक्त असते, म्हणून यास मार्गशीर्ष म्हणतात. या मासांत सूर्यमंडलाधिपति अंशुमान् आदित्य असून, त्यासमागमें कश्यप ऋषि, उर्वशी अप्सरा, विद्युच्छत्रु राक्षस, महाशंख नाग, तार्क्ष्य यक्ष, आणि ऋतसेन गंधर्व, इतके संचार करण्यास असतात (भाग० १२ स्कं० अ० ११ ).

**सहजन्य**-आषाढमासींचा यक्ष. ( १३ शुचि श० पहा )

**सहजन्या**-प्राधेच्या अप्सराकन्यांतील एक ही आषाढमासींची अप्सरा. (१३ शुचि श० पहा).

**संहताश्व**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न निकुंभराजाचा पुत्र. यास कृताश्व अ० कृशाश्व, आणि रणाश्व अ० वर्हणाश्व, असे दोन पुत्र होते.

**सहदेव**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न धुवसंधिवंशीय दिवाक् अ० दिवाकर राजाचा पुत्र. याचा पुत्र भानुमान् अ० ध्रुवाश्व राजा. हा अभिमन्यूनें मारिलेल्या बृहद्बल राजापुढील वंशांतील राजा.

२-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न विशालवंशीय संयम अ० सृंजयराजाचा पुत्र. याचा पुत्र कृशाश्व.

३-( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, तत्पौत्र कुशराजा त्याच्या वंशांत जन्मलेल्या हर्यवनराजाचा पुत्र अहीन राजा.

४-(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न जरासंध राजाचा पुत्र. यास सोमापि, मार्जारि, आणि मेघसंधि, असे तीन पुत्र होते. हा भारतीय युद्धांत पांडवांकडे होता. याच्या रथाचे अश्व कर्बुर ( काबऱ्या ) रंगाचे होते असें वर्णन आहे. ( भार० द्रोण० अ० २३ ). यावें दुर्योधनपक्षीय बहुत वीरांशीं युद्ध झालें असे, व शेवटीं यास द्रोणाचार्यानें मारिलें. ( भार० द्रोण० अ० १२५ ).

५-एक ब्रह्मर्षि. कोणाचा कोण तें आढळत नाहीं.

६-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिपुत्र अजमीढ, त्याच्या नील ना० पुत्राच्या मुद्गल पांचालाच्या कुलांत जन्मलेल्या मित्रयुपुत्र च्यवनराजाचा पौत्र, व बृहद्रथ अ० सुदासराजाचा पुत्र. याचा पुत्र सोमक राजा.

७-वसुदेवास ताम्रेपासून झालेला पुत्र.

८-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पंडुराजाची दुसरी स्त्री माद्री, तिच्या दोन पुत्रांतील दुसरा, नकुलाचा कनिष्ठ भाता. हा मोठा योद्धा असे यानें धनुर्वेदाची शिक्षा द्रोणाचार्याजवळून घेतली होती, तथापि याची ख्याति खड्गयुद्धांत विशेष असे. यास द्रौपदीशिवाय, केकयदेशीय राजाची कन्या विजया ही स्त्री असून, द्रौपदीचे ठायीं श्रुतकर्मा, आणि विजयेच्या ठायीं सुहोत्र मिळुन दोन पुत्र होते. युधिष्ठिर इंद्रप्रस्थीं येऊन राहिल्यावर हाहि त्यांत आलाच होता. पुढें युधिष्ठिरानें राजसूययज्ञ केला, त्यांत त्यानें यास दक्षिण दिशेचा जय करून द्रव्य आणण्याची आज्ञा केली, ह्मणून हा तिकडे गेला, तो याचा दिग्विजय असाः-

युधिष्ठिराची आज्ञा घेऊन, सहदेव इंद्रप्रस्थाहून निघाला तो, कुरुदेशाच्या दक्षिणेस असलेला पहिला शूरसेन देश ( दक्षिणशूरसेन ) तेथें गेला, व तो देश त्यानें जिंकून, तेथून करभार घेतल्यावर, त्यापुढें दुसरा मत्स्य ( दक्षिण मत्स्य ) नांवाचा देश जिंकला. तेथून पुढें दक्षिणेस अधिराज्य ना० देशांत जाऊन

तेथील दंतवक्त्रराजास जिंकलें. तेथून सहदेव आग्नेयी दिशेकडे इतका वळला कीं, भीमानें पूर्वदिशेचा जय करितांना जे पुलिंद नगरचे सुकुमार आणि सुमित्र, असे दोन राजे जिंकले होते, ते यास आढळले. मग यानें त्यांपासून करभार घेतला नसावा, तेथून दक्षिणेकडे जी चाल केली, तींत हा अपरमत्स्य देशीं गेला, व पटच्चरदेशीय लोकांसहवर्तमान तो देश जिंकला. तेथून पुढें निषादभूमि जिंकून गोशृंग पर्वतावरील श्रेणिमान् राजा जिंकला. तेथून पुढें नरराष्ट्र देश जिंकून, कुंतिराष्ट्रदेशींच्या कुंतिभोज राजाकडे गेला. तो राजा कुंतीला, दत्त घेणारा म्हणून तिचा पिताच असल्यामुळें, त्यानें सहदेवास प्रीतिपूर्वक करभार दिला. नंतर तेथून सहदेव पुढें निघाला, आणि चर्मण्वती नदीच्या तीरीं येऊन पोहोंचला. त्या स्थळीं जंभक ना० असुराचा पुत्र रहात असे, त्याशीं कृष्णाचें वैर असल्यामुळें, त्यानें सहदेवाशीं युद्ध केलें. त्यावरून सहदेवानें त्याशीं संग्राम करून त्यास जिंकलें, व त्यापासून करभार घेऊन, पुनः पुढें दाक्षिणेचा मार्ग धरला सहदेव दक्षिणेकडे निघाला असतां, त्यास क्रमानेंच सेक आणि अपर सेक, असे दोन देश लागले ते जिंकून, व तेथील राजांपासून अनेक प्रकारचीं रत्नें करभारार्थ घेऊन त्यांसहित नर्मदाभिमुख होत्साता अवंती नगरीस आला. त्या वेळेस तेथें विंद आणि अनुविंद दोघे भ्राते मोठ्या सैन्यानें युक्त राजे होते, त्यांशीं सहदेवानें संग्राम करून त्यांस जिंकलें, व त्यांपासूनहि नानाविध रत्नें करार्थ घेऊन, भोजकट ना० नगरावर आला, तेथील भीष्मक नांवाच्या राजाशीं सहदेवाचें दोन दिवसपर्यंत युद्ध होऊन, त्यांत यानें त्यास जिंकिलें. नंतर कोसलाधिपति ( हा दक्षिणकोसल ) त्यास जिंकूण वेणानदीच्या तीरींचाहि राजा जिंकिला. तेथून कांतारक, प्राकोटक, नाटकेय, आणि हेरंबक, तसेच मारुध, व रम्यग्रामवासी इ० दुर्मार्गवासी लोक, नाचीन, अर्बुक, इ० कांसहित जिंकून, वाताधिप राजाहि जिंकिला. नंतर पुलिंदांस सहदेवानें जिंकिलें, व पांड्य देशाचा राजा सागरध्वज जिंकून सहदेव किष्किंधेस आला. तेथें मैंद आणि द्विविद त्यांशीं सात दिवसपर्यंत सहदेवाचें युद्ध झालें, व त्यांत ते पराभव पावले नसतांहि सहदेवावर संतुष्ट होऊन, त्यांनीं युधिष्ठिराच्या यज्ञास निर्विघ्नता असो अशा आशयानें त्यास करभार देऊन मार्गस्थ केलें. त्यावरून सहदेव तेथून निघून माहिष्मती नगरीच्या नील राजाकडे आला व तेथें मोठें भयंकर युद्ध झालें, त्यांत सहदेवास आपला पराभवच दिसूं लागला, तो असा कीं, सर्व सेना एकाएकीं दग्ध होऊं लागली. असें सहदेवानें पाहून हें कृत्य अग्नीचें आहे असें त्यानें जाणिलें, म्हणून शुचि होऊन तो अग्नीची स्तुति करूं लागला, तींत त्यानें असें म्हटलें, 'हे अग्ने ! हा राजसूययज्ञ, युधिष्ठिर जो करीत आहे, तो केवळ तुजकरितांच होय; तर तिकडे लक्ष्य देऊन काय करणें तें कर.' इत्यादि प्रकारांनीं सहदेवानें केलेली स्तुति, तिच्या योगानें अग्नि संतुष्ट होऊन त्यानें सहदेवाची सेना जळत होती तिची शांति केली, व त्यानें नील राजाकडून करभार देववून त्यास मार्गस्थ करविलें.

याप्रमाणें होतांच सहदेव तेथून मोठ्या हर्षानें निघाला, व त्रिपुरपुत्र त्रैपुर राजा असेल, तो, पौरव राजा, व कौशिकाचार्य ( गारुडविद्यानिष्णात )कोणी एक पुरुष, इ० कांस मोठ्या यत्नानें जिंकून, सुराष्ट्र देशास ( सुरत प्रदेशास ) सहदेव गेला. हा मूळचा खरा सुरत देश होय. येथील राजास त्यानें वश करून घेऊन तेथूनच विदर्भ देशाचा राजा भीष्मक, कुंडिनपुरांत न राहतां, रुक्मीनें वसविलेलें भोजकट नगर तेथें राहत असलेला, त्याकडे आपण इकडे आलों आहों असा संदेश पाठविला असावा. त्यावरून त्यानें कृष्णाच्या प्रीतीस्तव, पुत्रासहवर्तमान त्या संदेशाचा सत्कार करून अनेक रत्नें ज्यांत असा करभार सहदेवाकडे पाठविला. तो घेऊन सहदेव पश्चिम समुद्रतीरींच्या शूर्पारक देशास, तेथून दक्षिणेकडील तालाकट, व दंडकसंज्ञक सामान्य प्रदेशास जाऊन, तेथून तेथून कारभार घेऊन, समुद्रांतील द्वीपें व त्यांत राहणारे म्लेंछ, निषाद, पुरुषाद ( मनुष्यांस खाणारे लोक ), कर्णप्रावरण ( आपला कानच पांघरणारे, यावरून ज्यांचे कान इतके मोठाले असे लोक, ) कालामुख इ० म्हणायास मात्र मनुष्य, परंतु राक्षसोत्पन्नच, त्या सर्वांपासून सहदेवानें संदेशमात्रेंकरून करभार घेतला.

नंतर सहदेव पुनः पूर्वेकडे वळला असावा, आणि त्यानें कोलगिरि, सुरभीपत्तन, ताम्रद्वीप ना० प्रदेश, रामक पर्वत, तिमिंगल राजा, इ० कांस स्वाधीन करून घेऊन, एकपादपुरुष ( ज्यास पादेंद्रियाचा एकच अवयव, अर्थात् ज्यांस गुदद्वार नसेल असे लोक ), केरलवासी जन, संजयंति नगरी, पाषंडकपुर

आणि करहाटक, येथील जन, दूतद्वाराच वश करून त्यांकडून करभार आणविला. यापुढें पुनः दाक्षिणदिशेकडीलच देश असतील,दुसरा पांड्य देश,द्रवीड देश, उद्रकेरल, आंध्र (तैलंगण), तालवनवासी, कलिंगदेशवासी, उष्ट्रकर्णिक ( उंटासारख्या कानाचे लोक ), अटवी पुरी, व अन्य संपूर्ण यवनांच्या पुऱ्या, पूर्ववतच जिंकून तेथील तेथील राहिवाश्यांपासून करभार घेतला.त्यापुढें सहदेव कच्छ ना० प्रदेशास गेला (कच्छ म्हणजे जलासमीपचा प्रदेश ) व तेथून त्यानें बिभीपणाकडे लंकेस दूत पाठविले.

### श्लोक.

"ततः कच्छगतो धीमान् दूतान् माद्रवतीसुतः ॥
प्रेषयामास राजेंद्र पौलस्त्याय महात्मने ।।
बिभीषणाय धर्मात्मा प्रीतिपूर्वमरिंदमः ।। ७३ ॥
सचास्य प्रतिजग्राह शासनं प्रीतिपूर्वकम् ॥
तच्च कालकृतं धीमानभ्यमन्यत स प्रभुः ।। ७४ ।।
ततःसंप्रेषयामास रत्नानि विविधानि च ।।
चंदनागुरुकाष्ठानि दिव्यान्याभरणानि च ।। ७५ ॥
वासांसि च महार्हाणि मणींश्चैव महाधनान् ॥
न्यवर्तत ततो धीमान् सहदेवःप्रतापवान् ॥ ७६ ।।

( भार० सभा० अ० ३१ ). याचा अर्थः- सहदेवानें बिभीपणाकडे बुद्धिमान् दूत पाठविले. त्यावरून त्यानें त्यांचें अभिवंदन करून, व ही गोष्ट कालकृत झाली आहे असें समजून, अनेकधा वस्त्रें, रत्नें, इ० क सहदेवाकडे पाठविलीं. आतां हा लेख रामायणाशीं ताडून पाहातां असंभाव्य आहे तो असा.-

सीताशुद्धि करण्यासाठीं, ज्या काळीं अंगदप्रमुख वानर दक्षिणसमुद्रतीरीं गेले, त्या काळीं त्यांस समुद्र पाहून भीति उत्पन्न झाली, व आतां याचें उल्लंघन कसें करावें म्हणून विचार पडला, त्यावरून अंगद, वानरांस याप्रमाणें बोलला.

### श्लोक.-

भवंतोत्यंतबलिनःशूराश्च कृतविक्रमाः ।।
कोवात्र वारिधिं तीर्त्वा राजकार्यं करिष्यति ।। ४ ।।
एतेषां वानराणां स प्राणदाता न संशयः ।।
अतोत्तिष्ठतु मे शीघ्रं पुरतो यो महाबलः ।। ५ ।।
नंतर पुनः अंगद सर्वांस म्हणालाः-
उच्यतां वै बलं सर्वैः प्रत्येकं कार्यसिद्धये ॥
केन वा साध्यते कार्यं जानीमस्तदनंतरम् ।। ८ ।।
अंगदस्य वचः श्रुत्वा प्रोचुर्वीरा बलं पृथक् ॥
योजनानां दशारभ्य दशोत्तरगुणं क्रमात् ॥ ९ ॥
अंगदोप्याह मे गंतुं शक्यं पारं महोदधेः ॥
पुनर्लंघनसामर्थ्यं न जानाम्यस्ति वा नवा ॥ १२ ॥

( अध्यात्म० रा० किष्किं० स० ९ ). याचा अर्थः- आपण बलवान् आहां, तर हा समुद्र तरून जो कोणी राजकार्य साधील, तो सर्व वानरांचा प्राणदाता होईल. पुनः अंगद म्हणाला, एकेकाला समुद्र किती उल्लंघन करण्याचें सामर्थ्य आहे तें सांगा. त्यावरून एक म्हणाला, मी दहा योजनें जाईन; दुसरा, वीस योजनें; तिसरा, तीस योजनें; याप्रमाणें होत होत जांबवानानें मला नव्वद योजनें उडून जाण्याचें सामर्थ्य आहे म्हणून सांगितल्यावर, अंगद म्हणाला, मी शत योजनें उडून लंकेस जाईन; परंतु माझ्यानें परत येववेल किंवा नाहीं, तें मी जाणत नाहीं.

यावरून उड्डानशक्ति ज्यांच्या अंगीं स्वाभाविक, त्या वानरांस चोविसाव्या पर्यायाच्या त्रेतायुगांत समुद्रोल्लंघन करून लंकेस जाण्याची ही मारामार. असें असून अठ्ठाविसाव्या पर्यायाच्या द्वापरयुगांत मनुष्यास उड्डानशक्ति नसतां, तथे सहदेवाच दूत सहज गेले. काय ? वाः काय हा महत्त्वाचा लेख ! बरें, हे दोन लेख लिहिणारे भिन्न म्हणावेत, तर तसेंहि नसून, व्यासच हे लेख लिहिणारा आहे. म्हणून याविषयीं माझें म्हणणें असें आहे कीं, भारतांतील लेख कृतक आहे. ( कोणी धूर्तानें व्यासाकडे मूर्खपणा येण्यासाठीं नवा घातलेला आहे. ) ज्यानें हा लेख नवा घातला, त्यानें या गोष्टीच्या सिद्धीसाठीं परिहार तरी आपल्याकडून काय सावधपणानें दिला आहे तो पहा.

### श्लोक-

"तच्चकालकृतंधीमानभ्यमन्यत स प्रभुः" म्हणजे सहदेवाचा दूत लंकेस आला, तें येणें बिभीषणानें कालकृत ( त्या कालास तें योग्यच ) असें मानलें. परंतु त्या धूर्त बृहस्पतीस हा सुमार कसा राहिला नाहीं ? सुमार हाच कीं, त्रेतायुगांतील मनुष्यादिकांचें सामर्थ्य, प्रभाव इ० कांपेक्षां, द्वापरांतील सामर्थ्य इ० अधिक कीं उणें ? तर उणेंच होय. म्हणून तो त्याचा लेख असंभाव्यच. बरें, सहदेवाचा दूत नौकाद्वारें गेला म्हणावा तर श्लोकांत नौकेचेंहि नांव नसून, असल्या पराक्रमी दूताचें ग्रंथांत नांव कां बरें नसावें ? म्हणून हा लेख चोरटेपणाचाच होय.

तात्पर्य, मला असें वाटतें,कीं सहदेवानें पत्र लिहून बाणाग्रास बांधून, तो बाण त्यानें धनुर्विद्यासामर्थ्यानें बिभिषणाकडे लंकेस पाठविला असावा, व त्यावरून

त्यानें कदाचित् करभार पाठविला असेल तर असेल. याशिवाय सर्व गोष्टी कृतक होत. याप्रमाणें दक्षिण दिशा जिंकून, व अपरिमित द्रव्य घेऊन सहदेव इंद्रप्रस्थास माघारा आला, व आणिलेलें सर्व द्रव्य त्यानें युधिष्ठिरास निवेदन केलें ( भार० सभा० अ० ३१ ).

पुढें राजसूय यज्ञ समाप्त झाल्यावर, कांहीं कालानें दुर्योधनानें पांडवांची सर्व संपत्ति द्यूतमिषेंकरून हरण केली, आणि त्यांस वनवासास घालविलें, त्यांत हाहि वनांत गेला होता. नंतर अरण्यवास सरून, अज्ञातवासार्थ पांडव विराटगृहीं गेले, त्यांत हा तंतिपाल नाम धारण करून, त्याच्या अश्वशालेवर राहिला; कारण, अश्वचिकित्सा इ० कांत हा चांगलाच ज्ञाता होता. ( भार० विराट० अ० १० ). अज्ञातवास सरल्यावर कौरवपांडवांचें युद्ध उपस्थित झालें, त्यांत हा होता, याच्या रथाचे अश्व तित्तिरि पक्ष्याच्या रंगाचे असत, व ध्वजावर हंसाचें चिन्ह असे ( भार० द्रोण० अ० २३ ). युद्धकाळीं वाजविण्याचा जो याचा शंख असे, तो मणिपुष्पक नांवानें प्रसिद्ध होता.

संपूर्ण कौरव नष्ट झाले, व युधिष्ठिर राज्यावर बसला असून, त्यानें छत्तीस वर्षें राज्य केल्यावर निजधामास जाऊं लागला असतां, हा त्यासमागमें जाऊन, आपला देह मार्गांतच यानें टाकून स्वर्गास गमन केलें.

**सहदेवा**–देवक राजाची कन्या, व वसुदेवाच्या स्त्रियांतील एक. हिला पुरु, विश्रुत, इ० आठ पुत्र होते.

**सहरक्ष**–पावक ना० अग्नीचा पुत्र. याच्या पुत्राचें नांव क्रव्याद.

**सहस्य**–मासक्रमानें वर्षाचा दहावा मास. याची पूर्णिमा पुष्यनक्षत्रानें युक्त असत्ये म्हणून, यास पौष असें म्हटलेलें आहे. या मासांत सूर्यमंडलावर भग नांवाचा आदित्य अधिपति असून, त्यासमागमें संचार करण्यास ऋतु अ० आयु ऋषि, अरिष्टनेमि गंधर्व, ऊर्ण यक्ष, कर्कोटक नाग, स्फूर्ज राक्षस, आणि पूर्वचित्ति अप्सरा, अशा असतात (भाग० १२ स्कं०अ० ११).

**सहस्रचित्य**–केकय राजा शतयूप याचा पितामह(भार० अश्व० अ० २० ). यानें ब्राह्मणाकरितां आपल्या प्राणांचेंहि दान केलें होतें ( भार० अनु० अ० ९३).

**सहस्रजित्**–एक राजर्षि ( भार० शांति अ० २३५ ).

२–कृष्णापासून जांबवंतील झालेला पुत्र.

**सहस्रज्योति**–सूर्यास संज्ञा.

**सहस्रपात्**–ब्रह्मर्षि हा ऋषिशापानें डुंडुभजातीय सर्पयोनि पावला होता. व रुरुऋषि मार्गें जागत असतां, त्याचा व याचा संवाद होऊन पूर्वयोनीस प्राप्त झाला ( २ रुरु श० पहा ).

२–पांडवांसमागमें द्वैतवनांत होता जो कांहीं काळ ऋषि तो.

**सहस्रमुख**–शेषास, सहस्रमुखें असल्यामुळें नांव.

**सहस्रमुखरावण**–पुष्करद्वीपांतील सहस्र मुखांचा एक राक्षस ( वा० रा० अद्भुतो० स० १७ ).

**सहस्रवाक्**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**सहस्रश्रुति**–शाल्मलिद्वीपांतील एक महापर्वत.

**सहस्रस्रुति**–शाकद्वीपांतील महानदी.

**सहस्रस्रोत**–शाकद्वीपांतील महापर्वत.

**सहस्राजित्**–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न यदुराजाच्या चार पुत्रांतील ज्येष्ठ. याचा पुत्र शतजित्.

२–( सो० वं० ) यदुपुत्र क्रोश, त्याच्या कुलांतील सात्वतपुत्र भजमान्, त्यास दुसऱ्या स्त्रीपासून झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा.

**सहस्रानीक**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय परीक्षित राजाचा प्रपौत्र. जनमेजयाचा पौत्र, व शतानीकाचा पुत्र. याचा पुत्र अश्वमेधक राजा.

**सहस्रार्जुन**–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न कृतवीर्य राजाचा पुत्र जो कार्तवीर्य, त्यास सहस्र हस्त असल्यामुळें नांव.

**सहस्राश्व**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयांत जन्मलेल्या अहीनरराजाचा पुत्र. याचा पुत्र चंद्रावलोक राजा.

**सहानीक**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा(भार० द्रोण० अ० २५ ).

**संहार**–अष्टभैरवांतील एक.

**सहिष्णु**–स्वायंभुवमन्वंतरांतील ब्रह्मपुत्र पुलहऋषि, त्याच्या तीन पुत्रांतील एक.

२–चाक्षुषमन्वंतरांत जे सप्तर्षि होऊन गेले, त्यांत एक होता तो. हा वरचाच कीं दुसरा कोणी, त्याचा निर्णय आढळत नाहीं.

**सह्य**–सह्याद्रि शब्द पहा.

**सह्याद्रि**–भारतवर्षांतील भरतखंडांत असणारा पर्वत. ( भार० वन० अ० २८२ ). यापासून निघालेल्या नद्या येणेंप्रमाणें–गोदावरी, भीमरथी, कृष्णवेणी, वेण्या, कृष्णा, मंजुला, तुंगभद्रा, सुप्रयोगा बाह्या, कावेरी, इ० (मत्स्य० अ० ११३).

**संन्हाद**–हिरण्यकशिपूस कयाधूपासून झालेल्या पुत्रांतील एक. यास कृति नांवाची स्त्री होती, व तिजपासून पंचजन नांवाचा पुत्र झाला होता.

**संन्हादि**-एक राक्षस.

**संज्ञा**-कश्यपपुत्र विवस्वान् आदित्य त्याची स्त्री. ही त्वष्टाप्रजापतीची कन्या म्हणून त्वाष्ट्री नांवानेंहि ग्रंथांत वर्णिलेली आहे. ही श्राद्धदेव अ० वैवस्वतमनु यम, आणि यमुना, यांची माता होती. विशेष वृत्त ( १ विवस्वान् श० पहा ).

**सांकाश्या**-इक्षुमती नदीच्यातीरीं असणारी इंद्रदेशाची राजधानी. येथें दशरथाच्या वेळेस सुधन्वा राजा होता, त्यास कांहीं कारणास्तव सीरध्वजजनकानें मारून, आपला भ्राता कुशध्वज त्यास येथें स्थापिलें होतें ( वा० १० स० ७० ).

**सांकृति**-नरराजास संकृती स्त्रीपासून झालेला पुत्र जो रंतिदेव, त्यासच म्हटलेलें आहे.

**सांकृत्य**-ब्रह्मर्षि.(भृगु श० पहा ).

**सांख्यायन**-ब्रह्मर्षि गायत्रीमंत्राच्या देवतेचा हा उत्पादक असेल म्हणून तिचें हें गोत्र आहे.

२ ब्रह्मर्षि. ( ३ वसिष्ठ श० पहा ). हा, सनकादिकांचा शिष्य असून, परमहंसधर्माचा प्रवर्तक होता. (भाग०३ स्कं० अ० ८ ).

**सांग**-उत्तानपादवंशीय हविर्धान राजाचा पुत्र गयराजा. त्यास नामांतर होतें.

**सागर**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न सगर राजास वैदर्भी स्त्रीपासून झालेले ६०,००० साठ सहस्र पुत्र ते. यांच्या पित्याचा यज्ञांतील अश्व नाहींसा झाला म्हणून, हे त्याच्या शोधास गेले असतां तो कोठें सांपडेना म्हणून, त्यांनीं समुद्र खणिला, त्यामुळें त्यास प्रशस्त अवकाश मिळाल्यानें तो वृद्धिंगत झाल्यामुळें त्यानें आपल्यास यांचें नांव धारण केलें. तें नांव त्यास अजून चालत आहे. पुढें सगरपुत्रांस अश्व सांपडला, परंतु त्यांनीं कपिलाचा छल केला, तेणें-करून ते सर्व दग्ध झाले ( भार० वन० अ० १०७).

२-सगरपुत्रांमुळें समुद्रास पडलेलें नांव.

**सागरध्वज**-पांड्यदेशाधिपति, भारती युद्धांतील पांडव-पक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० २३ ). याचा पिता व बंधु या उभयतांस कृष्णानें मारिलें होतें, म्हणून द्वारकेवर चालला असतां, सुहृदांनीं यास जाऊं दिलें नाहीं.

**सात्यकि**-युयुधान शब्द पहा.

**सात्यायनि**-ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**सात्राजिती**-सत्राजित् राजाची कन्या सत्यभामा ती.

**सात्वत**-( सो० वं० ) अंशुपुत्र [illegible] कुलांतील क्रथवंशांत जन्मलेल्या आयु राजाचा पुत्र. यास भजमान, भजि, दिव्य, वृष्णि, देवावृध, अंधक, आणि महाभोज, असे सात पुत्र होते.

**सांदीपनि**-काश्य ना० ऋषीचा पुत्र, हा अवंती नगरींत राहत असे ( भाग० १० स्कं० अ०३१). कृष्ण आणि बलराम हे उभयतां उपनयन होतांच, वेदाध्ययनार्थ यासमीप जाऊन राहिले होते. यांच्या पूर्वी तेथें उत्तम वस्त्रें मिळण्याचा अभाव, म्हणून ज्यास कुचैल म्हणत तो ब्राह्मण अध्ययन करीत होता. त्यासहवर्तमान कृष्णबलरामांनीं वेदवेदांगें अभ्यासून, संपूर्ण कला संपादिल्यावर ब्रह्मविद्याहि संपादिली. नंतर 'गुरु-दक्षिणा मागा' असें उभयतांनीं म्हटल्यावरून, 'मृत झालेले पुत्र परत आणून द्या म्हणजे पुरे,' असें गुरु-पत्नीनें मागितलें, त्याप्रमाणें त्यांनीं पुत्र आणून दिले, व घरीं येऊन समावर्तन ( सोडमुंज ) केलें ( भाग० १० स्कं० अ० ४५ ).

**साधित**-ब्रह्मर्षि ( १ विश्वामित्र श० पहा ).

**साध्यगण**-तीन नेत्रांचे रुद्राचे चौऱ्यांपशी कोटि गण ते. ( मत्स्य० अ० ४ ).

**साध्यदेव**-तामस मन्वंतरांतील देववि०.

२-चालू मन्वंतरांतील सप्तविध देवांतले देववि०. हे, याच मन्वंतरांतील धर्मऋषीपासून साध्या ना० स्त्री-पासून झाले होते. त्यांचीं नांवें मन, उर्मनु, प्राण, नर, उपान, वीर्यवान्, चित्तहार्थ, अयन, हंस, नारायण, विभु, आणि प्रभु अशीं बारांचीं बारा होतीं ( मत्स्य० अ० २०२ ).

**साध्या**-प्राचेतस दक्षाची कन्या, धर्म ऋषीच्या दहा स्त्रियांतील एक. ही द्वितीयार्थक साध्य देवांची माता.

**सानुप्रस्थ**-रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० युद्ध० स० ४७ ).

**सांब**-जगन्माता, यास्तव जिला अंबा म्हणतात, त्या पार्वतीसहित जो महादेव शंकर त्यास म्हणतात.

२-बव्हृच एक ब्रह्मर्षि ( भार० आश्रम० अ० १० ).

३-कृष्णापासून जांबवतीस झालेला पुत्र. हा महारथी होता. त्याची स्त्री दुर्योधनकन्या लक्ष्मणा.

४-वृष्णिकुलोत्पन्न एक यादव. स्त्रीवेष घेऊन पिंडारक-क्षेत्रीं ऋषींचा छल करणारा हाच असेल. मूळांत जांब-वतीसुत सांब म्हटला आहे, परंतु असंभाव्य आहे; कारण तो त्या वेळेस पोर नव्हता.

**सांबवाह**-अगस्त्यगोत्रांतील एक कुल.

**सामवेद**-चार वेदांतील तिसरा. हा ब्रह्मदेवाच्या पश्चिम

मुखांतून गांधर्व उपवेदासहित निघालेला होय. ( १ वेद शब्द पहा ).

**साममलेमकी**-ब्रह्मर्षि ( ३ अंगिरा श० पहा )

**सायकायनि**- " "

**सायंकाल**-उत्तानपादवंशीय पुष्पार्णाचा पुत्र.

**सांयमनि**-दुर्योधनपक्षीय शलराजा, ज्यास संयमन ह्मणत असत त्याचा पुत्र. यास धृष्टद्युम्नानें मारिलें होतें. ( भार० भीष्म० अ० ६१ ).

**सायान्ह**-सायंकाल तोच.

**सारण**-लंकेंतील एक राक्षस ( वा ० रा० सुंदर० स० ६ ).

२-रावणाच्या अमात्यांतील एक ( वा० रा० युद्ध० स० २५ ).

३-यादववि०. ( भाग० १० स्कं० अ० ७६ ).

४-( सो० वं० ) वसुदेवास रोहिणीपासून झालेल्या सात पुत्रांतील एक.

**सारमेय**-श्वफल्क यादवाच्या तेरा पुत्रांतील एक.

**सारमेयादन**-पांथस्थांस लुटणाऱ्यांस, सातशेंवीस दातांच्या श्वानसमुदायांकडून ज्या स्थळीं यातना भोगावी लागत्ये, त्या नरकास नांव.

**सारवाह**-अगस्त्यगोत्रांतील एक ऋषि व कुल.

**सारस**-जटायूच्या पुत्रांतील एक.

**सारस्वत**-ब्रह्मर्षि. ब्रह्मकन्या जी सरस्वती तिचा हा वाक्संभवपुत्र, म्हणून यास असें नांव असून, हा स्वायंभुव मन्वंतरांतील वेदाचार्य होता. यास अपांतरतम व प्राचीनगर्भ असेंहि म्हटलेलें आहे.

**श्लोक.**

सरस्वतीमुच्चचार तत्र सारस्वतोभवत् ।।
अपांतरतमानाम सुतो वाक्संभवः प्रभुः ।। ३९ ।।
तेन भिन्नास्तदा वेदा मनोः स्वायंभुवेंतरे ॥
ततस्तुतोष भगवान् हरिस्तेनास्य कर्मणा ।। ४२ ।।
अपांतरतमाश्चैव वेदाचार्यः स उच्यते ।।
प्राचीनगर्भं तमृषिं प्रवदंतीह केचन ।। ६६ ।।

( भार० शांति० अ० ३३९ ) ( भाग० षष्ठ० अ० १५ ).

२-कोण्या एक्या आत्रि ऋषींचा पुत्र.

३-एक ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

४-अलंबुषा अप्सरेच्या दर्शनेंकरून दधीच ऋषीस झालेला पुत्र. याचें रक्षण ऋष्याज्ञेनें सरस्वती नदीच्या मूर्तिमान् देवतेनें केलें म्हणून यास असें नांव पडलें होतें. चालू मन्वंतराच्या [illegible] व्यास असावा; कारण त्या पर्ययांत वेदाचार्यत्व यानें केल्याचें दिसून येतें. त्याविषयीं असा इतिहास आढळतो.--एके काळीं द्वादशवार्षिक अवर्षण पडून, चारी वेदांचें वेदाध्ययन करणारे ब्राह्मण प्रायः नष्ट झाले; परंतु त्यांत यास, सरस्वती नदीनें मत्स्याच्या आहारानें वांचविलें, ह्मणून हा वांचून सुभिक्ष झाल्यावर, यानें साठ सहस्र ब्राह्मण वेदाध्ययनार्थ शरण आलेले त्यांस, यथापद्धतीनें शिष्य करून च्यारहि वेद पढविले होते. (भार० शल्य० अ० ५१)

५-कौशिक ऋषिच्या सात शिष्यांतील एक. ( वा० रा० अद्भुतोत्तर० स० ७ ).

६-भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा, इंद्रप्रस्थाच्या पश्चिमेस, पश्चिम मत्स्य देश आणि मरुभूमि देश, यांच्या मध्यें सरस्वती नदीच्या तीरीं वसलेला असल्याचें ग्रंथांत आढळतें, हा व सप्तसारस्वत प्रायः एकच असेल असें वाटतें. ( भार० १ स्कं० अ० १० ).

७-या नांवाचें भारतवर्षीय तीर्थ.

**सारस्वतकल्प**-दिवसक्रमानें ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील होऊन गेलेला बारावा दिवस. ( ४ कल्प श० ) पहा.

**सारस्वतपुर**-वीरवर्मा राजाचें नगर.

**सारिमेजय**-वृष्णिकुलोत्पन्न एक यादव.

**सार्द्धनेमि**-ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० ) पहा.

**सार्द्धसुग्रीवि**- ,, ,,

**सार्पि**-ब्रह्मर्षि. ( ३ भृगु श० पहा.

**सार्वभौम**-( सो० वं० ) नूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय कुरुपुत्र जन्हु राजा, त्याच्या विदूरथ ना० पौत्राचा पुत्र. यास जयसेन नांवाचा पुत्र होता.

२-आठव्या सावर्णि मन्वंतरांत होणारा विष्णूचा अवतार.

**सालंकटंकटा**-विद्युत्केश राक्षसाची स्त्री. संध्या ना० स्त्रीची कन्या.

**सालंकायन**-विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**सालडि**-ब्रह्मर्षि. ( ३ अंगिरा श० पहा ).

**साल्वेय**-पर्वतवि० ( वा० रा० सुंदर० स० २६ ).

**सावर्णि**-साठ सहस्र वर्षेंपर्यंत तप केलेला कोणी एक ऋषि. ( भार० अनु० अ० १४ ).

२-चालू मन्वंतर सरल्यावर पुढें होणारा चतुर्दश मनूंतील आठवा मनु. हा चाक्षुषमन्वंतरामध्यें सुरथ नांवाचा कोणी [illegible] देवीचा उपासक होता, तोच

विवस्वान्आदित्याचा पुत्र होऊन जन्मास आला. ( १ सुरथ श० पहा ). विवस्वान् आदित्यापासून छायेच्याठायीं याचें जन्म झालें होतें. यास धृति, वरीयान्, यवस, सुवर्ण, वृष्टि चरिष्णु, ईड्य, सुमति, वसु आणि शुक्र, असे निर्मोक इ०क नामांतरांनीं दहा पुत्र होतील. सुतपस्, विरज, आणि अमृतप्रभ, हे स्वर्गामध्यें देव होऊन, त्यांचा स्वामी विरोचनपुत्र बलिदैत्य, तो इंद्र होईल. गालव,दीप्तिमान्, जामदग्न्य-राम, द्रोणपुत्र अश्वत्थामा, शारद्वत ( कृपाचार्य ), ऋष्यशृंग,आणि सांप्रतचा आपला व्यास कृष्णद्वैपायन, हे सात याच्या मन्वंतरांत सप्तर्षि होतील. तसाच सरस्वती ना० ऋषिपत्नीच्या उदरीं सार्वभौम नामें-करून विष्णूचा अवतार होऊन, तो स्वर्गस्थ बलि ना० इंद्राचें साह्य करील. याच्या मन्वंतरास सावर्णि-मन्वंतर असें नांव चालेल ( भाग० अष्टम० अ० १३ ).

**सावर्णिक**-ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

**सांवर्तक**-प्रलयमेघांतील एक.

**सावित्र**-एक रुद्र. भारतोक्त रुद्रांतून हें नांव कोणत्याचें असेल तें असो.

२-एक वसु. अष्टवसूंत हें नांव कोणत्याचें तें कळत नाहीं. मात्र रावण देवाशीं युद्ध करीत असतां, यानें रावणाचा मातामह सुमाली राक्षस, त्यास मारिलें होतें ( वा० रा० उत्तर० स० २७ ).

३-कर्णास क्वचित् म्हटलेलें आढळतें.

**सावित्री**-ब्रह्मदेवाची स्त्री, "पितामहो जगन्नाथः सावित्री ब्रह्मणः सती ".

२-प्लक्षद्वीपांतील महानदी.

३-सामवेदोपनिषत्.

४-मद्रदेशाचा अधिपति अश्वपति ना० प्राचीन राजा त्याची कन्या, अश्वपति हा बहुत कालपर्यंत अनपत्य होता, म्हणून त्यानें सावित्री देवीचें अठरा वर्षेपर्यंत आराधन केलें, व त्याच्या समाप्तिकाळीं हवन करीत असतां, अग्नींतून सावित्री देवी प्रत्यक्ष प्रकट होऊन, राजास वर माग असें म्हणूं लागली, त्या काळीं राजानें पुत्रांची याचना केली. परंतु देवी म्हणाली, प्रस्तुत तुला कन्या मात्र होईल. इतकें बोलून ती अंतर्धान पावली, व त्याच दिवशीं राजाच्या ज्येष्ठ पत्नीस गर्भ राहिला. पुढें तो गर्भ हळू हळू वाढून यथाकालीं राजपत्नी प्रसूत झाली असतां, ती दिव्य अशा या कन्येस प्रसवली. ती अप्रतिम कन्या पाहून, तिचें राजानें जातकर्म ( बालक उत्पन्न झालें असतां करावें लागतें जें कर्म तें ) करून नामकर्महि केलें, व तिचें नांव सावित्री ठेविलें; कारण ती त्यास सावित्रीच्या प्रसादानें झाली होती. पुढें ही कन्या हळू हळू वाढून उपवर झाली, तेव्हां राजा तिच्या विवाहाविषयीं चिंता करूं लागला, व अनेक राजपुत्रांच्या ती दृष्टीस पडेल असें करूं लागला. परंतु जो जो राजपुत्र हिला पाही, तो तो हिच्या तेजास दिपून माघारा जाई. त्यामुळें हिचा विवाह होईना, म्हणून एकदां राजा हिला म्हणाला, सावित्रि, तूं दिवसेंदिवस मोठी होत चाललीस असून, कोणी राजपुत्र तर तुला वरण्याची इच्छा दर्शवीत नाहीं, यास्तव आतां तूं तरी देश हिंडून एकादा राजपुत्र वर, व जो तुला मान्य होईल त्याशीं मी तुझा विवाह करीन. त्यावरून सावित्री तथास्तु म्हणून, वृद्धमंत्री समागमें घेत होत्साती देश पाहण्यास निघाली. सावित्री देश पाहात फिरत असतां तिनें अनेक नगरें व तपोवनें पाहिलीं, आणि त्यांत तिनें द्युमत्सेन राजाचा पुत्र सत्यवान् मान्य करून पुनः परत पित्याकडे आगमन केलें ( भार० वन० अ० २९३ ).

देशपर्यटन करून, सावित्री परत आली, आणि आपण मान्य केलेला वर पित्यास कळवावा म्हणून त्याकडे गेली, परंतु तो नारदऋषीशीं कांहीं संभाषण करीत बसला आहे असें पाहून उभयतांस नमस्कार करून, तेथेंच अंमळ पलीकडे उभी राहिली. त्यावरून नारदानें पुसलें, राजा, ही तुझी कन्या कोठें गेली होती ? व हिचा विवाह अजून कां झाला नाहीं ? राजा म्हणाला, मी हिला वर पाहून येण्याकरितां, देशांतरीं पाठविलें होतें. तिकडून ही आतांच आली आहे, येथून पुढें हिच्या विवाहाचा विचार. त्यावरून नारदांनीं विचारिलें, तूं कोणता वर निश्चित करून आलीस तें सांग. तेव्हां वृद्ध मंत्री सांगूं लागला, "शाल्वदेशाचा राजा द्युमत्सेन ना० अंधअसून, दाया-दांनीं राज्यावरून काढून टाकिल्यामुळें प्रस्तुत अर-ण्यांत वास करून आहे. त्याचा सकल गुणांनीं युक्त, तसाच रूपवान् सत्यवान् ना० पुत्र आहे, त्यास सावि-त्रीनें वरिलें आहे. याप्रमाणें मंत्र्याचें भाषण ऐकून, नारद त्या राजपुत्राची स्तुति करीत बोलला कीं, "तो योग्य आहे खरा, परंतु त्याच्या ठायीं एक मोठाच दोष आहे, तो मला सांगण्याचें जरी कारण नाहीं, तरी सावित्रीच्या हिताकरितां सांगणें अवश्यक आहे." अश्वपति म्हणाला, " काय दोष असेल तो निःसंशय सांग." नारद बोलला, "तो संवत्सरायु आहे." (एकच

वर्ष सारें त्यास आयुष्य आहे ). त्यावरून राजा भय पावून सावित्रीस म्हणाला, "नारद बोलले हें तूं ऐकिलेंसच, यास्तव तूं दुसरा वर पहावास, हें मला योग्य दिसतें." सावित्रीनें उत्तर केलें, "आतां वरला तो वरलाच मग तो कसाहि असो; परंतु दुसऱ्यास म्हणून मी वरणार नाहीं." असें ऐकून नारद बोलले,"राजा, ज्या अर्थी हिचा असा निश्चय आहे, त्या अर्थी ही सत्यवानासच वरो. इतकें बोलून नारद निघून गेला ( भार० वन० अ० २९४ ).

पुढें अश्वपति राजानें विवाहसामग्री सिद्ध केली, आणि सावित्रीस समागमें घेऊन, परिवारासहवर्तमान ज्या तपोवनांत सत्यवान् होता तेथें गमन केलें, व व त्याच्या पित्यास ( द्युमत्सेनास ) आपल्या कन्येनें तुझ्या पुत्रास वरिल्यामुळें, मी तिचा त्याशीं विवाह करून देण्यासाठीं आलों आहे. म्हणून कळविलें. द्युमत्सेन म्हणाला, मी तर राज्यभ्रष्ट होऊन अरण्यांत अशा निकृष्ट स्थितींत वास करीत आहे, तेव्हां हा विवाह सुखकर कसा होईल ? अश्वपतीनें सांगितलें, हा सर्व विचार करूनच मी येथें आलों आहे; आतां त्याविषयीं कांहीं विचार करण्याचें राहिलें नाहीं, इतकें बोलल्यावर द्युमत्सेन तथास्तु म्हणतांच, अश्वपतीनें सावित्री सत्यवानास विवाह करून दिली, व चार दिवसपर्यंत चांगला समारंभ करून सावित्रीस तेथेंच ठेवून तो स्वनगरास परत आला. पिता परत जातांच सावित्रीनें अंधश्वशुराची ( सासऱ्याची ). सासूची व पतीची, देवाप्रमाणें सेवा चालविली. त्यायोगानें त्यांचा संतोष होत जाऊन, हिलाहि सुख होत गेलें. मात्र पतीच्या आयुष्याचें स्मरण झालें म्हणजे हिला अंतःकरणांत खेद होई; परंतु तो त्यास हिनें कधींच दर्शविला नाहीं ( भार० वन० अ० २९५ ).

याप्रमाणें सावित्री अरण्यांत असतां व आपल्या पतीचें आयुष्य स्मरण धरून मोजतां मोजतां, त्याचें आयुष्य आजपासून तीन दिवस राहिलें असें हिनें जाणलें, म्हणून मग तीन दिवसांत अन्न इ० कांहींच भक्षण न करतां अनशनव्रत केलें. चतुर्थ दिवशीं असें झालें कीं, आश्रमांत काष्ठें नाहींत म्हणून हातांत परशु घेऊन सत्यवान् अरण्यांत जाण्यास निघाला असें पाहून, सावित्रीनें सासूसासऱ्यांस विनंति केली कीं, पतीसमागमें मला अरण्यांत जाऊन वनाची शोभा पाहण्याची इच्छा आहे, यास्तव आज्ञा होईल तर जाईन; परंतु त्याच्या मरणाचा दिवस असल्याचें हिनें त्या उभयतांस, व पतीस, [illegible] नाहीं

त्यावरून द्युमत्सेनानें विचार करून तिला पतीसमागमें अरण्यांत जाण्याची आज्ञा दिली; कारण तिजवर त्यांची तशीच प्रीति होती. सारांश आज्ञा होतांच ती पतीसमागमें वनांत गेली ( भार० वन० अ० २९६ ).

अरण्यांत गेल्यावर सत्यवानानें काष्ठें तोडिलीं, तशींच उत्तम उत्तम फळें व मुळेंहि घेऊन आतां आश्रमाकडे परतावें तों, त्यास एकाएकीं मस्तकांत शूळ उत्पन्न झालासें वाटून, तेथेंच एका वृक्षाखालीं बसला, व सावित्रीस त्यानें मस्तकांत वेदना उत्पन्न झाल्याचें वृत्त सांगतांच, तिनें त्याचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें. घेतांच त्यास निद्रा लागली; कारण तो दिवस त्याच्या मृत्यूचाच होता. सावित्री पतीचें मस्तक मांडीवर घेऊन बसली आहे, इतक्यांत त्यास नेण्याकरितां तेथें स्वतः यम प्राप्त झालेला तिच्या दृष्टीस पडला, त्यास तिनें तर्ककरूनच तत्काळ ओळखून, पतीचें मस्तक वस्त्रांवर ठेवून, त्यास नमस्कार केला, व पुसूं लागली, आपण कोण ? व इकडे येणें काय हेतूनें केलें ? असें तिचें मृदु वाक्य श्रवण करून यमधर्म म्हणाला, यम असें ज्यास म्हणतात तोच मी असून, तुझ्या पतीचें आयुष्य सरल्यामुळें त्यास न्यावयास आलों आहे. सावित्रीनें पुसलें, प्राणिमात्रांस नेण्यास आपले दूत येत असतात असें मी ऐकतें. असें असतां येथें आपणच आलां त्याचें कारण काय ? यम म्हणाला, धर्मपरायण पुरुषास मीच स्वतः नेण्यास येत असतों. म्हणून माझें येणें झालें समज. इतकें बोलून यमानें सत्यवानाच्या लिंगदेहाचें ( वासनारूप सूक्ष्म देहाचें ) आकर्षण करून दक्षिण दिशेचा मार्ग धरिला. सावित्रीनें पति प्राणरहित झाला असें पाहून, त्याचा देह वस्त्रानें अच्छादित करून तशीच यमाच्या मागें निघाली. तेव्हां यम तिला म्हणाला, तूं मजमागें किमर्थ येतेस ? तर परत जा, आणि पतीचें और्ध्वदेहिक कर्म करून स्वस्थ रहा. या विषयावर देवीभागवतामध्यें यम, तूं आतां जाऊन दुसरा पति वर असें ध्वनितार्थानें सावित्रीस बोलल्याचें व त्यावर सावित्रीचें उत्तर असल्याचें असें आढळतेः—

--श्लोक--

" पतिव्रता चैकपतौ द्वितीये कुलटा स्मृता ।।
तृतीये धर्षणी ज्ञेया चतुर्थे पुंश्चलीत्यपि ॥ ४ ॥
वेश्या च पंचमे षष्ठे पुंगी च सप्तमेऽष्टमे ॥
तत ऊर्ध्वं महावेश्या साऽस्पृश्या सर्वजातिषु ॥ ५ ॥

( देवी[illegible] ). यांतील भावः-जीला

पति एक ती पतिव्रता, दोन पति करणारी ती कुलटा, तीन पति करणारी धर्षणी, चार पति करणारी पुंश्चली, पांच किंवा सहा पति करणारी वेश्या, सात किंवा आठ पति करणारी पुंगी, आणि यापुढें अनेकपतिका ती महावेश्या जाणावी, व मग ती सर्व जातींमध्यें स्पर्श करण्यास अयोग्य समजावी. (यमसावित्री संवाद.) याच भागवतामध्यें देवी गीता अध्याय ३५ यांत असें सांगितलें आहेः—

—श्लोक.—

श्रुतिस्मृतिभ्यामुदितो यः स धर्मः प्रकीर्तितः ॥
अन्यशास्त्रेण यः प्रोक्तो धर्माभासः स उच्यते ॥ १५ ॥
स्मृतयश्च श्रुतेरर्थं गृहीत्वैव च निर्गताः ॥
मन्वादीनां श्रुतीनां च ततः प्रामाण्यमिष्यते ॥ १६ ॥
अन्येषां शास्त्रकर्तॄणामज्ञानप्रभवत्वतः ॥
अज्ञानदोषदुष्टत्वात्तदुक्तेर्न प्रमाणता ॥ १७ ॥

यांतील भावार्थः—श्रुतिस्मृतींपासून उत्पन्न झाला तोच धर्म ह्मणावा. अर्थात् अन्य शास्त्रांपासून झाला तो धर्माभासच म्हणजे, (वाटावा धर्म परंतु असावा अधर्म) असा समजावा. श्रुतींच्या अर्थाचाच जींमध्यें संग्रह तिलाच स्मृति असें म्हणावें, म्हणून मन्वादिकांच्या स्मृति प्रमाण समजाव्या. इतर शास्त्रकारांच्या भाषणांत अज्ञानाचीच उत्पत्ति आहे, अत एव अज्ञानरूप दुष्ट दोषांमुळें त्यांच्या उक्तीला प्रमाणता नाहीं असें जाणावें.

याप्रमाणें सावित्री बोलून यमाच्या मागें चालली, तें यमानें तिचें भाषण ऐकून, व तिला आपणामागें येतां पाहून म्हटलें, पतिव्रते! माघारी जा, सावित्री म्हणाली, जिकडे पति तिकडेच स्त्री, म्हणून माझें येणें युक्तच आहे. इतकें बोलून तिनें यमाची बहुत स्तुति केली. ती ऐकून यम बोलला, तूं पतीचा प्राण शिवाय करून एक वर माग व माघारी जा. सावित्री म्हणाली, माझ्या अंध श्वशुराचे नेत्र पूर्ववत् व्हावे येवढें द्या. त्यावरून यम तथास्तु म्हणून पुढें चालला, तरी ही मागें येतच आहे असें त्यानें पाहून म्हटलें, आतां तूं मजमागें किमर्थ येत्येस? अशानें तुला श्रम मात्र होतील. तर आतां माघारी जा, तुला माघारी जातांना मार्गसंबंधीं श्रम न बाधोत, हा माझा तुला आशीर्वाद आहे, सावित्री म्हणाली, पतीसमागमें चालणाऱ्या स्त्रियांस श्रम मुळींच होत नाहींत. त्यावर आपला साधु पुरुषाचा समागम असतां श्रम हा शब्द सुद्धां काढणें नको. तें तिचें मृदु, आणि चातुर्यानें युक्त भाषण ऐकून, यमानें तिला दुसरा वर माग

ण्याची आज्ञा केली. तेव्हां हिनें श्वसुरास त्याचें राज्य त्यास प्राप्त व्हावें म्हणून मागितलें. तें तथास्तु म्हणून यम चालला तरी ही मागें येतच आहे असें त्यानें पाहिलें. सारांश, पित्यास शत पुत्र, व आपणास शत पुत्र हिनें पुढें मागून पतिहि मागितला. त्यावरून यमानें तुझा पति सोडिला असें म्हणून तेथेंच अंतर्धान पावला. यम अंतर्धान पावतांच सावित्री त्वरेनें सत्यवान् मृत होऊन पडला होता तेथें आली, व त्याचें शिर पूर्ववत् तिनें मांडीवर घेतलें; इतक्यांत त्यास चेतना येऊन तो सावध झाला, आणि उठून बसून म्हणूं लागला, आज मला निद्रा फार वेळ लागली असतां, मला कोणी पुरुष ओढून नेतो आहे असें वाटलें; परंतु त्यानें मला सोडितांच मी जागा झालों, तेव्हां हिनें झालेलें साकल्य वर्तमान त्यास निवेदन केलें. तें ऐकून त्यास हिच्या पातिव्रत्याचा आनंद होऊन, म्हणाला कीं, आतां आश्रमास लवकर चल, माझीं पितरें मजकरितां वाट पहात असतील. इतकें बोलतांच यासहित सावित्री आश्रमाकडे येण्यास निघाली (भार० वन० अ० २९७).

तिकडे आश्रमांत असें झालें कीं, यमाच्या वरप्रदानानें द्युमत्सेनाचे नेत्र पूर्ववत् होऊन, त्यास एकाएकीं चांगलें दिसूं लागलें. तेव्हां हें आज असें कशानें झालें म्हणून त्याला सानंदाश्चर्य झालें; परंतु सत्यवान् व सावित्री, आज उभयतां अरण्यांत गेलीं असून, त्यांस रात्र झाली तरी येण्यास इतका विलंब कां लागला, म्हणून चिंता करीत आहे तों त्यानें उभयतांस आलेलें पाहिलें. मग विलंबाचें कारण विचारतां झालेलें सर्व वर्तमान सावित्रीनें निवेदन केलें. तेणेंकरून द्युमत्सेन हर्ष पावून, दुसरे दिवशीं त्यानें सावित्रीकडून पारणें करविलें; कारण तिनें तीन दिवसपर्यंत कांहींच भक्षण केलें नव्हतें. सारांश, द्युमत्सेनास पूर्ववत् राज्य प्राप्त झालें, व अश्वपति राजास (सावित्रीच्या पित्यास) शतपुत्र झाले. कांहीं काळानें द्युमत्सेनानें सत्यवानास राज्यावर स्थापिलें असतां, त्यापासून सावित्रीस शतपुत्र झाले व तिनें त्यासहित चारशें वर्षें राज्य केलें (भार० वन० अ० २९८–२९९). हें सावित्रीचें आख्यान मत्स्य पुराणांतहि अ० २०७ पासून २१३ पर्यंत भारताप्रमाणेंच सात अध्यायांनीं वर्णिलेलें आहे.

**सावित्रीकल्प**—दिवसक्रमानें चालू ब्राह्ममासांतील होऊन गेलेला चोविसावा दिवस अ० कल्प. (४ कल्प ग्र० पृष्ठ )

**साम्ब**–एक राजर्षि.

**सासीस**–द्वितीय कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**साहदेवी**–सहदेवाचा पुत्र तो, परंतु पूरुवंशीय पांचाल कुलोत्पन्न सहदेवपुत्र सोमक राजा, त्याविषयीं विशेष प्रसिद्धि.

**साहरि**–तृतीयार्थक आंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**साहुल**–प्रथमार्थक विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**सिकताक्ष**–सिंधुदेशसंबंधीं सैंधवारण्यांतील तीर्थ.

**सिद्ध**–प्राधेच्या गंधर्वपुत्रांतील एक.

**सिद्धदेश**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**सिद्धपुर**–भारतवर्षीय क्षेत्र.

**सिद्धारण्य**–सिद्धदेशसंबंधीं अरण्य.

**सिद्धार्थ**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

**सिद्धाश्रम**–मलद आणि करूषक, या दोन देशांच्या मध्यभागीं असणाऱ्या अरण्यांतील आश्रमवि०. या स्थळीं कश्यप व अदिति कांहीं काळ उभयतां तप करीत होतीं, वामनावतार, जो चालू मन्वंतराच्या सातव्या पर्यायामध्यें झाला होता, त्याचें जन्म येथेंच झालें होतें. पुढें विश्वामित्र याचस्थळीं राहून यज्ञ करीत असतां, ताटका राक्षसी व तिचे दोघे पुत्र त्यास विघ्न करीत. त्यांचें निवारण विश्वामित्रानें रामलक्ष्मणांकडून करविलें, व आपला यज्ञ सिद्धीस नेला ( वा० रा० स० २९ ).

**सिद्धि**–वीर ना० अग्नीस शरयू भार्येच्या ठायीं झालेला पुत्र.

**सिंधु**–सप्तर्षींच्या संतोषार्थ भागीरथी सप्तप्रवाहरूप झाली त्यांतील एक प्रवाह तो.

२–भरतखंडस्थ एक नदी ( २ हिमालय श० पहा ).

३–पारियात्र पर्वतापासून जी नदी निघाली ती.

४–भारतवर्षीय देश. हा इंद्रप्रस्थाची पश्चिम दिशा अनुलक्षून मरुभूमि अ० मरुधन्व देश त्याच्या पश्चिमेस असल्याचें ग्रंथांत आढळतें. सौवीर देशाचें याला अगदीं सामीप्य असून, पांडवांच्या वेळेस येथेंच वृद्धक्षत्रपुत्र जयद्रथ राजा ( धृतराष्ट्राचा जामात ) राज्य करीत असे. हा सौवीर देशाच्या उत्तरेस असेल असें वाटतें; कारण सहदेवाच्या दिग्विजयांत याचें नांव नाहीं.

**सिंधुद्वीप**–(सू० वं०)इक्ष्वाकुकुलोत्पन्न भगीरथ राजाचा पौत्र, अंबरीष राजा त्याचा पुत्र, याचा पुत्र अयुतायु राजा.

**सिंधुसौवीर**–सौवीर देशास सिंधु देशाच्या सांनिध्यामुळें चालत असलेलें नांव.

**सिनीवाली**–कर्दम प्रजापतीची स्त्री देवहूति तिला नामांतर ( मत्स्य० अ० २३ ).

२–स्वायंभुव मन्वंतरांतील अंगिरा ऋषीस श्रद्धेपासून झालेली कन्या.

३–चालू मन्वंतरांतील बृहस्पतीपासून शुभा ना० भार्येच्याठायीं झालेल्या सात कन्यांतील एक.

४–द्वादशादित्यांतील धाता आदित्याची स्त्री.

५–शाल्मलिद्वीपांतील महानदी.

**सिंह**–कृष्णास लक्ष्मणेपासून झालेला पुत्र.

२–मुख्य ना० रामाच्या मंत्र्याच्या दहा पुत्रांतील एक. ( कुशीलव श० पहा ).

**सिंहकेतु**–एक राक्षस.

२–कर्णानें युद्धांत मारिलेला चेदिपुत्र पांडवपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ५६ ).

**सिंहचंद्र**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० १५८ ).

**सिंहपुर**–चित्रायुध राजाचें नगर ( भार० सभा० अ० २७ ).

**सिंहल**–जंबुद्वीपाच्या आसमंतात् जीं अष्ट उपद्वीपे आहेत, त्यांतील आपण राहतों या अंगाकडे दक्षिण समुद्रांत असणाऱ्या दोन द्वीपांतील पाहिलें. दुसरें उपद्वीप लंका प्रसिद्धच आहे. प्रस्तुत या सिंहलद्वीपास भूगोलवेत्ते लंका म्हणतात; परंतु ती चूक आहे. दशरथ राजाच्या वेळेस या सिंहलद्वीपाचा राजा चंद्रसेन होता. लंकेंत रावण होता, मिथिलेंत सीरध्वज जनक, इंद्रदेशांत सुधन्वा आणि मद्रदेशांत चारुदेष्ण राजाचा पिता ( नांव आढळत नाहीं ). याप्रमाणें राजे होते. भारतामध्यें सिंहल देशहि एक आढळतो, परंतु तो याहून निराळा असें प्रमाण सांपडत नाहीं.

**सिंहसेन**–द्रोणाचार्यानें मारिलेला पांडवपक्षीय गोपति ना० पांचालाचा पुत्र ( भार० द्रोण० अ० १५८ ). याच्या रथाचे अश्व श्वेत आणि रक्त अशा मिश्र रंगाचे असल्याचें वर्णन आढळतें(भार०द्रोण०अ०२३).

२–कर्णानें मारिलेला दुसरा पांडवपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ५६ ).

**सिंहिका**–कश्यप ऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक. ही प्रथमार्थक चार सैंहिकेयांची माता.

२–कश्यपास दितिपासून झालेली कन्या. ही, हिरण्यकशिपूची भगिनी असून विप्रचित्ति दानवाची स्त्री होती. ही द्वितीयार्थक तेरा सैंहिकेयांची माता होय. हिचा विशेष इतिहास असा आढळतो, मारुति समु-

द्रावरून सीताशुद्धीसाठीं चालला असतां, हिनें त्याची छाया, जी समुद्रोदकावर पडली होती, तिचें आकर्षण करून त्याची गति कुंठित केली. त्या योगानें मारुति हिच्या मुखांत पडला; परंतु तो बलाढ्य म्हणून त्यानें हिला मारून पूर्ववत् पुढें गमन केलें ( वा० रा० सुंदर० स० १ ).

**सीतवन**–भारतवर्षीय वनवि०.

**सीता**–विदेहवंशीय सीरध्वज जनकाची पालित कन्या. ही सीरध्वजास लांगलमुखानें ( नांगराच्या मुखानें ) क्षेत्र म्हणजे शेताच्या कर्षणकाळीं भूमींत सांपडली असून, पुढें हिचा विवाह दाशरथि रामाशीं झाला होता ( वा० रा० बाल० स० ६६ ).रामाशीं विवाह होऊन ही अयोध्येस आल्यावर, अल्पच काळांत रामास पित्याच्या आज्ञापालनार्थ अरण्यांत जाणें प्राप्त झालें, त्या वेळेस राम हिला आपणासमागमें नेईना, परंतु हिनें जिकडे आपण तिकडे मी असणें योग्य आहे असें म्हटल्यावरून त्यानें हिला समागमें नेलें होतें ( वा० रा० अयो० स० २६–३० ).

रामासमागमें ही अरण्यांत गेली असतां, तो जो जो आश्रम पाहून तेथें तेथें गमन करून मान पावे, त्याचप्रमाणें हीहि करून मान पावे. तसेंच राम, जीं जीं फलें मूलें, अथवा मृगमांस भक्षण करी, त्यांतून जें अवशेष राही, तें अमृततुल्य मानून ही भक्षण करी. हिनें अरण्यांत असतां रामास कधीं दुखाविलें नाहीं; परंतु रामाचें पादसंवाहन करणें, आणि मृदु वचनानें त्याच्या अंतःकरणास संतोषित करणें, अशीच वागे. पुढें राम जेव्हां पंचवटींत जाऊन राहिला, व तेथें त्यानें वनवासाचा बराच काळ क्रमिला, त्या वेळेस एकदां मारीच राक्षस सुवर्णरूप असा मृगवेष धारण करून, रावणाच्या सांगण्यावरून तेथें आला, त्या वेळेस हिनें याच्या चर्माची मला कंचुकी ( चोळी ) असावी अशी इच्छा रामास दर्शविली. म्हणून राम त्यामागें गेला. तसाच लक्ष्मणहि मागून हिनेंच पाठविला, त्यामुळें रावणास संधि सांपडून, त्यानें हिचें हरण केलें, व हिला आपल्या लंकेंतील अशोकवनिकेंत नेऊन ठेविलें.

ही, अशोकवनिकेंत असतां, हिच्या रक्षणनिमित्तानें मुख्यत्वेंकरून आपणास हिला वश करावें, अशा आशयानें रावणानें ज्या राक्षसी ठेविल्या होत्या, त्यांनीं सामोपचार व भीति, इ० बहुत प्रकार करून पाहिले; परंतु ही त्या सर्वांची अवगणना करूनच राहिली असे. एकदां राक्षसींनीं हिला इतकी भीति दाखवून त्रास दिला कीं, त्या दिवशीं हिनें गळफांस घेऊन प्राणत्याग करावा असें मनांत आणिलें; परंतु तेथें मारुति जाऊन पोहोंचला होता, त्यानें गुप्तरूपानें तिची अवस्था अवलोकन करून, सखेदांतःकरण होत्साता, तिला प्रत्यक्ष झाला, व रामाकडून तुझ्या शुद्धीसाठीं मी येथें आलों आहें असें सांगून, रामनामांकित मुद्रा त्यानें हिचें पुढें ठेविली. नंतर परस्परांचें परस्पर बरेंच भाषण होऊन, त्यानें हिला आश्वासन दिलें कीं, तूं कांहीं चिंता करूं नको, मी गेलों कीं, राम येथें लवकरच येऊन सपरिवार रावणाचा वध करून तुला अयोध्येस घेऊन जाईल. त्यावरून हिला धीर येऊन हिनें प्राणत्याग करण्याचा केलेला विचार रहित केला.

हिला संरक्षण करीत असलेल्या राक्षसींत त्रिजटा म्हणून एक वृद्ध राक्षसी होती, तीहि हिचें वारंवार सांत्वन करून इतर राक्षसींकडून पीडा होऊं देत नसे कारण ती सर्वांवर प्रमुख होती. तात्पर्य, मारुति सीताशुद्धि करून गेल्यावर पुढें राम लवकरच लंकेस आला व त्यानें रावणास सपरिवार मारून हिला अशोकवनिकेंतून आपणासमोर आणवून हिजकडून दिव्य करवून अंगिकारिलें, आणि हीसहित अयोध्येस गमन केलें. पुढें रामचंद्र सुखानें राज्य करीत असतां, बहुत शतकांच्या अंतीं रामापासून हिला गर्भधारण झालें, त्या संधींत एका रजकानें, हिच्या संबंधाचा रामावर कांहीं आरोप केला, तो रामाच्या कानीं येऊन, त्यानें हिचा त्याग केला.

पुढें ही वाल्मीकिऋषीच्या आश्रमांत राहून तेथें प्रसूत झाली, व लव आणि कुश, अशा दोन पुत्रांस एकसमयावच्छेदेंकरून प्रसवली. कालेंकरून हिच्या पवित्रतेविषयींचें वाल्मीकिनें सहस्रावधि जनांसंमुख दिव्य करून हिला पुत्रांसहवर्तमान रामाच्या स्वाधीन केलें व तो स्वकीयाश्रमास निघून गेला; मात्र इकडे सीताही एकाएकीं भूमि विदारून तींत अदृश्य झाली व रामापूर्वीच निजधामास गेली.

२–स्वर्धुनीच्या चार ओघांतील पूर्वदिशेकडील ओघ तो. हा गंधमादनपर्वतावरून भद्राश्व वर्षांतून जाऊन क्षारसमुद्रास जाऊन मिळाला आहे.

३–सप्तर्षींच्या संतोषार्थ भागीरथी सप्त प्रवाहरूप झाली. त्यांतील एक प्रवाह तो. हे सात प्रवाह. अलकनंदा ना० जोस्वर्धुनीचा प्रवाह, आपण राहतों या अंगाकडे वाहात आला आहे त्याचे समजावेत. याविषयीं मी चांगला निर्णय करून हें लिहिलें आहे.

४–अथर्वणवेदोपनिषत्.

**सीरध्वज**–( विदे० वं० ) र्‍हस्वरोमा ना० जनक राजाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. कुशध्वजाचा ज्येष्ठ भ्राता. सीरध्वजास सुमेधा नांवाची स्त्री होती, व हा स्वतः मिथिलेंत राज्य करीत असून, कुशध्वज सांकाश्या नगरींत राज्य करीत असे. ( ३ सुधन्वा श० पहा ). एके काळीं एका कृषीवलास ( शेतकऱ्यास ) क्षेत्राचें नांगरानें कर्षण करत्येवेळीं एक पेटी सांपडली, ती त्यानें सीरध्वजास आणून दिल्यावर उघडून पाहतां,तींत कन्या निघाली,मग जनकानें नांगरानें पडलेली जी भूमीस रेषा तिला संस्कृतांत सीता अशी संज्ञा असल्यामुळें; तींत ती कन्या सांपडली अशा हेतूस्तव तिला सीता असें नांव ठेविलें. यास ऊर्मिला म्हणून एक औरस कन्या असून पुत्र मुळींच नव्हता.

अल्पच काळांत सीता उपवर झाली असें पाहून यानें तिचें स्वयंवर आरंभिलें, त्यांत यानें, याच्या घरीं जें शिवचाप होतें, तें जो भंगील त्यास ही कन्या वरील अशी प्रतिज्ञा ठरवून, सहस्रावधि राजांस पत्रें लिहून स्वयंवरास बोलाविलें होतें. त्याप्रमाणें सर्व राजे, तसेच सन्मानपूर्वक बोलाविलेले अनेक ब्रह्मर्षि, तेथें प्राप्त झाले होते.त्यांत दशरथ राजास पत्र गेलें होतें परंतु तो आला नव्हता; कारण रामलक्ष्मणांस विश्वामित्रानें, यज्ञसंरक्षणार्थ आधींच मागून नेल्यामुळें त्याचें अंतःकरण स्वस्थ नव्हतें. परंतु रामलक्ष्मण, विश्वामित्र मिथिलेस गेला त्यासमागमें गेलेच होते, विश्वामित्र रामलक्ष्मणांसहवर्तमान मिथिलेस गेला असतां, जनक इतर ऋषींप्रमाणेंच त्यासहि सामोरा गेला, व नगरांत आणून पूजा केल्यावर पुसूं लागला कीं, हे दोघे कोणाचे पुत्र आहेत ? विश्वामित्र म्हणाला, हे दशरथ राजाचे पुत्र असून, मी माझ्या यज्ञसंरक्षणासाठीं, यांस दशरथाजवळून मागून आणिलें होतें. यांत रामानें ताटकेस मारून, व सुबाहूचाहि वध करून माझा यज्ञ सिद्धीस नेला. पुढें मी यांस अयोध्येस पोहोंचविणार तों, तुझें पत्र आलें, त्यावरून माहेशचाप कसें आहे तें अवलोकन करण्याचा यांचा हेतु दिसला म्हणून इकडे यांस घेऊन आलों. मार्गानें येत असतां यानें अहल्येचा उद्धार केला ( वा० रा० बाल० स० ५१–६५ ).

असें विश्वामित्राचें भाषण श्रवण करून; राजा म्हणाला, जर रामचंद्र माहेशचापाचा भंग करील, तर मी सीता यास समर्पण करीन, त्यावरून राजानें तें शतावधि सेवकांकडून सभेंत आणविलें, त्यास पाहून आलेले सर्व राजे भ्याले; परंतु राम पुढें होऊन, त्यानें तें सहज लीलेनें उचलिलें, आणि त्यास गुण चढवून तत्काळ त्याचा भंग केला. भंग करतांच जनकानें पत्र लिहून देऊन अयोध्येस दशरथ राजाकडे विवाहसमारंभास येण्यासाठीं दूत पाठविले. ( वा० रा० बाल० स० ६७ ). जनकाकडून पत्र आलेलें पाहून,दशरथास पराकाष्ठेचा हर्ष झाला,व तो लागलाच संपूर्ण स्त्रिया, भरत, शत्रुघ्न, वसिष्ठप्रमुख ब्राह्मण. आणि सेनेसहित कित्येक मंत्री समागमें घेऊन मिथिलेस आला. त्यास आलेला ऐकून सीरध्वज सामोरा गेला, व मोठ्या सन्मानानें त्यानें त्यास नगरांत आणिलें ( स० ६८–६९ ).

या समारंभास सीरध्वजानें आपला भ्राता कुशध्वज त्यास सांकाश्या नगरीहुन आधींच आणविलें होतें. त्यानें भरतशत्रुघ्नांस पाहून आपल्या दोन कन्या त्यांस द्याव्या असें मनांत आणून, सीरध्वजास तो विचार कळविला. तो त्यास रुचून, त्यानेंहि आपली औरसकन्या लक्ष्मणास देण्याचें योजून, कुशध्वजासहित तो दशरथ ज्या स्थळीं उतरला होता तेथें येऊन त्यानें हा मनांत आणिलेला विचार त्यास कळविला. त्यास त्याची, व वसिष्ठविश्वामित्रांची, संमति पडतांच एकाच मुहूर्तावर चारी विवाह व्हावे असें सर्वानुमतें ठरलें. नंतर सीरध्वजानें वाङ्‌निश्चय केला त्यांत त्यानें आपलें कुलगोत्र उच्चारून रामास सीता, व लक्ष्मणास उर्मिला देण्याचा त्रिवार उच्चार केला. त्याचप्रमाणें मांडवी भरतास, आणि श्रुतकीर्ति शत्रुघ्नास देण्याचा कुशध्वजानेंहि कुलगोत्रोच्चारपूर्वक त्रिवार उच्चार केला ( वा० रा० बाल० स० ७०–७१ ).

नंतर राम, लक्ष्मण,भरत, शत्रुघ्न,चौघांचेहि विवाह झाले. कित्येकदिवसपर्यंत तत्संबंधीं सोहळा होऊन असंख्य अश्व, रथ, गज, दास, दासी, रत्नें, भूषणें, वस्त्रें, व शिवाय द्रव्य, वरदक्षिणा समर्पण केल्यावर, वसिष्ठविश्वामित्रादिकांचा, तसाच स्त्रियांसहित दशरथाचा वस्त्रादिकांनीं गौरव करून मिष्टान्न भोजन दिल्यावर सर्वांस अयोध्येकडे सीरध्वजानें मार्गस्थ केलें. त्याचप्रमाणें आलेल्या इतर राजादिकांचा सत्कार करतांच तेहि संतोषानें स्वस्वस्थळीं गेले ( वा० रा० बाल० स० ७४ ).

**सुकंदक**—भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**सुकन्या**—सूर्यवंशीय शर्याति राजाची कन्या ( १ च्यवन श० पहा ).

२—मंकणक ऋषीची माता.

**सुकर्मा**—सोमवंशीय यदुकुलोत्पन्न श्वफल्क राजाचा पुत्र.

२—देवसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या देवांतील एका प्रकारचे देव.

**सुकाली**—पितृगणांतील एका भेदविशेषाचे पितर. हे वसिष्ठऋषीचे पुत्र असून शूद्र जातीचे पितर होत.

**सुकुंडल**—धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**सुकुमार**—( सो० वं० ) आयु राजाचा पुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या काश्य ना० पौत्राच्या वंशांतील धृष्टकेतु राजाचा पुत्र. याचा पुत्र वीतिहोत्र.

२—भीमसेनानें, पूर्वदिशा जिंकतांना जे पुलिंद नगरचे दोन राजे जिंकले त्यांतील एक ( भार० सभा० अ० २९ ).

**सुकुमारी**—शुक्तिमान् पर्वतापासून निघालेली भारतवर्षीय नदी.

**सुकृत्**—चाक्षुष मन्वंतरांतील एक प्रजापति.

२—उत्तानपादवंशीय पृथु राजास विजिताश्वादिक पांच पुत्र होते, त्यांतील एकाचें नामांतर.

३—ब्रह्मसावर्णि मन्वंतरांत जे सप्तर्षि होणार आहेत त्यांत एक होईल तो.

**सुकेतन**—( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या काश्य ना० पौत्राच्या वंशांतील सुनीथ राजाचा पुत्र, याचा पुत्र धर्मकेतु.

**सुकेतु**—(विदे० वं० ) नंदिवर्धन जनकाचा पुत्र याचा पुत्र देवरात जनक.

२—ताटका राक्षसीचा पिता. हा यक्ष होता.

३—रामाच्या सुज्ञ प्रधानाच्या पुत्रांतील एक ( कुशी-लव श० पहा ).

४—भारती युद्धांतील पांडवपक्षीय चित्रकेतु राजाचा पुत्र यास कृपाचार्यानें मारिलें होतें ( भार० कर्ण० अ० ५४ ).

५—द्रोणाचार्यानें मारिलेला पांडवपक्षीय शिशुपालाच्या पुत्रांतील एक.

**सुकेश**—विद्युत्केश राक्षसापासून, सालंकटंकटेस झालेला पुत्र. हा रुद्रगण झाला ( वा० रा० उत्तर० स० ४ ).

**सुकेशी**—अप्सराविं०.

**सुख**—स्वायंभुवमन्वंतरांतील धर्मऋषीपासून त्याच्या शांति ना० भार्येस झालेला पुत्र.

**सुखीनल**—( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय नृचक्षुराजाचा पुत्र. याचा पुत्र परिप्लव राजा. हाच सुखीबल अशा नामांतरानें पुराणांत आढळतो.

**सुगत**—पाखंडमार्गप्रवर्तक जो बौद्ध, अ० तन्मतानुयायी पुरुष तो.

**सुगति**—ऋषभदेववंशीय गयराजाचा पुत्र.

२—हंसध्वजराजाचा प्रधान.

**सुगंधा**—एक अप्सरा.

**सुग्रीव**—शुंभ आणि निशुंभ या उभय असुरांचा दूत ( देवीभा० ५ स्कं० अ० २३ ).

२—ऋक्षरजा ना० वानराच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. हा सूर्यापासून जन्मला असून वालीहून कनिष्ठ होता. हा पराक्रमी होता परंतु वालीइतका नव्हता. वालीचें व याचें पुष्कळकाळपर्यंत चांगलें ऐकमत्य होतें. असें असतां मायावि राक्षसाच्या युद्धसंबंधानें त्याचें याचें इतकें वितुष्ट पडलें कीं, याला त्यानें किष्किंधेबाहेर घालवून दिलें, त्यामुळें हा, आपल्या मारुति इ०साचिवांसहवर्तमान ऋष्यमूकपर्वताचा आश्रय करून राहिला ( २ वाली श० पहा ).

सुग्रीव ऋष्यमूकावर राहात असतां, तेथून त्यानें एकदां रामलक्ष्मणांस येतां पाहिलें. त्यावरून हे धनुर्धर कोण असावेत, व हे वालीचे प्रेषित असतील कीं काय ? अशी यास शंका येऊन, यानें त्यांकडे मारुतीस पाठविलें. त्यावरून मारुति त्यांसमीप जाऊन, त्यांशीं अत्युत्तम संभाषण करून त्यांस सुग्रीवासमीप घेऊन आला, व त्यांचें याचें ह्यानें अग्निसाक्षिक सख्य करविलें ( हनुमान् श० पहा ).

रामाशीं याचें सख्य झाल्यावर, यानें, रावण सीतेस लंकेंत नेत असतां तिनें वस्त्रखंडांत बांधून टाकिलेलीं भूषणें जतन करून ठेविलेलीं रामास दाखविलीं, तीं रामानें सीतेचींच म्हणून ओळखिलीं. पुढें रामानें सुग्रीवास विचारिलें कीं, वालीशीं तुझें वैमनस्य येण्यास कारण काय झालें ? त्यावरून सुग्रीवानें मागील मायावीच्या युद्धाचें समग्र वृत्त रामास कथन केलें. ( वा० रा० किष्किं० स० ८). त्यानंतर सुग्रीवानें वाली पराक्रमी कसा आहे त्याविषयीं, त्याचें दुंदुभीशीं झालेल्या युद्धाचें वर्णन सांगितलें. ( स० ११ ). सारांश, राम हा, वालीहून निःसंशय पराक्रमी आहे, असा सुग्रीवास विश्वास येऊन, तो त्याच्या अनुमतानें वालीशीं युद्धास गेला, व किष्किंधेसमीप जाऊन त्यानें वालीस युद्धास बोलाविलें. त्याकरून वाली किष्किंधेबाहेर आला, व

उभयतांचें मोठेंच युद्ध झालें त्यांत त्या दिवशीं रामानें वालीस न मारल्यामुळें सुग्रीव अत्यंत जर्जर होऊन, त्यापासून पलायन करून ऋष्यमूकावर चढला, त्यामुळें वाली परत गेला.

नंतर सुग्रीव रामास म्हणाला, मी वालीशीं युद्धास गेलों, तो केवळ तुझ्या आश्रयावर, असें असतां, मला वचन दिल्याप्रमाणें तूं त्यास मारिलें नाहींस, हें कसें? यास्तव मी मरावें, असेंच जर तुझ्या मनांत असेल,तर वालीच्या हातून जो मारविणार तो तूंच कां मारीनास? असें सुग्रीवाचें दीन भाषण ऐकून राम म्हणाला, सुग्रीवा, तसें अगदीं समजूं नको. आज असें झालें कीं, तुम्हीं उभयतां जेव्हां युद्ध करूं लागलां तेव्हां तूं आणि वाली मला अगदीं सारखे दिसलां. म्हणून मला शंका आली कीं, जर मी वाली असें समजून बाण सोडला, आणि तो तुला लागला तर मित्राचा घात होईल म्हणून बाण सोडला नाहीं. यास्तव आतां तुला मी कांहीं चिन्ह करितों, तर तूं आतां जा, आणि वालीस युद्धास बोलाव; म्हणजे मी वालीस मारितों. त्यावरून सुग्रीव युद्धास गेला, व त्यानें पूर्वीपेक्षांहि मोठ्यानें गर्जना करून वालीस युद्धास बोलाविलें ( वा० रा० किष्किं० स० १२ ),

सुग्रीवाची गर्जना ऐकून वाली तत्काळ किष्किंधेबाहेर युद्धास निघाला, त्यावरून तारा त्यास म्हणूं लागली कीं, आज तुम्हीं युद्धास जाऊं नये; कारण मला असें वाटतें, नुक्ताच काल सुग्रीव युद्धास येऊन त्यांत तो पुष्कळ जर्जर झाला असतां, पुनः आज जेव्हां युद्धास आला आहे, तेव्हां त्याला कोण्या तरी बलिष्ठाचा आश्रय मिळाला आहे. तर आतां असें करावें कीं, त्याला पूर्ववत् युवराज्य देऊन स्वस्थ रहावें हें बरें. वाली म्हणाला, आतां या प्रसंगीं तो युद्धास हांक मारीत असतां, मला तसें करतां येत नाहीं. यास्तव होणें असेल तसें होईल, परंतु मला युद्धास जाणें भाग आहे, तूं स्त्रीस्वभावानें भिऊन असें भाषण करित्येस, पण मी लवकरच त्याचा पराजय करून येतों, इतकें बोलून तो युद्धास आला, व रामानें त्यास मारिलें ( २ वाली श० पहा ).

वाली मरण पावला व त्याचें और्ध्वदेहिक झालें असें रामानें पाहून, सुग्रीवास किष्किंधेच्या राज्याचा अभिषेक लक्ष्मणाकडून करवून, अंगदास यौवराज्यावर स्थापविलें, आणि आपण पर्जन्यकाळ संपेपर्यंत प्रस्रवण ना० पर्वतावर लक्ष्मणासहित वास करून राहिला. ( किष्किं० स० २६-२७ ). सुग्रीवास राज्य प्राप्त झाल्यावर, त्यानें चार मासपर्यंत विषयसुखाचा यथेच्छ अनुभव घेतला. या चार मासांतच एकदां मारुतीनें सुग्रीवास असें सुचविलें कीं, रामानें प्रतिज्ञा केल्याप्रमाणें, वालीस मारून तुझी स्त्री व राज्य तुला प्राप्त करून दिलें, असें असून तूं आपल्या वचनाप्रमाणें, अजून त्याच्या स्त्रीच्या शोधाचा कांहींच विचार पाहात नाहींस हें काय? परंतु अशानें नाश पावशील. त्यावरून सुग्रीव कांहींसा शुद्धीवर येऊन, त्यानें मारुतीस सांगितलें, तूं मला स्मरण दिलेंस हें चांगलें केलेंस, तर आतां असें कर कीं पृथिवीवरील सर्व वानरांनीं एक पक्षाच्या आंत किष्किंधेस जमावें, जो न येईल तो शिक्षेस पात्र होईल अशीं आज्ञापत्रें लिहून दूत पाठीव. त्यावरून मारुतीनें तत्काळ तसेंच करून, पंधरा दिवसांत कोट्यावधि वानर जमा केले ( वा० रा० किष्किं० स० २९ ).

इकडे प्रस्रवणगिरीवर रामचंद्र चार महिने राहिला, त्या काळांत सुग्रीव रामाच्या भेटीस एक वेळ सुद्धां गेला नाहीं. असें त्यानें पाहून, आपल्या कार्याची त्यास विस्मृति झाली असें समजून तिकडे लक्ष्मणास पाठविलें ( किष्किं० स० ३२ ). परंतु तो क्रोधाविष्ट आलेला पाहून वानर भयभीत झाले, व अंगदास लक्ष्मण आल्याचें वृत्त त्यांनीं कळविलें, त्यावरून तो पुढें होऊन त्यानें लक्ष्मणास वंदन केलें, व त्याशीं कांहीं भाषण करीत आहे तों मारुति येऊन, त्यानें असंख्य वानर रामकार्यासाठीं सिद्ध आहेत, इतकें बोलून त्यास राजमंदिरीं मोठ्या सन्मानानें नेलें, तेथें तारेनेंहि त्याशीं कांहीं भाषण केलें, तें ऐकून लक्ष्मणास आलेला क्रोध सर्व गेला. इतक्यांत सुग्रीव पुढें आला, व लक्ष्मणाचा त्यानें सत्कार करून, तो मारुति आदिकरून कित्येक वानरांसहवर्तमान, लक्ष्मणासमागमें रामदर्शनास गेला ( वा० रा० किष्किं० स० ३४-३८ ).

सुग्रीवानें रामदर्शन घेतल्यावर लागलेंच त्यानें सीताशुद्धीसाठीं वानर पाठविले. त्यांत अंगदप्रमुख मारुति इ० दक्षिण दिशेकडे गेले, व मारुती सीताशुद्धि करून आला, ( हनुमान श० पहा ). मारुति सीताशुद्धि करून आल्यावर, राम वानरसैन्यासहवर्तमान समुद्र उतरून लंकेस गेला, व सपरिवार रावणास मारून, सीतेस घेऊन परत अयोध्येस गेल्यावर अकरा सहस्र वर्षे राज्य करून निजधामास जाऊं लागला असतां सुग्रीवहि, अंगदास किष्किंधेच्या राज्यावर

स्थापून त्यासमागमें स्वलोकास प्राप्त झाला ( २ राम श० पहा ).

३–कृष्णाच्या रथास चार अश्व असत, त्यांतील एकास हें नांव होतें.

**सुग्रीवी**–कश्यपापासून ताम्रेस झालेल्या कन्यांतील एक.

**सुघोष**–नकुल पांडवांचा युद्धसमयीं वाजविण्याचा शंख.

**सुचंद्र**–प्राधेस झालेल्या देवगंधर्वांतील एक.

२–सिंहिकेच्या चार पुत्रांतील एक.

३–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न हेमचंद्र राजाचा पुत्र, याचा पुत्र धूम्राक्ष.

४–याच नांवाचा एक यादव.

**सुचक्षु**–भागीरथीच्या सप्त प्रवाहांतील एक प्रवाह तो. यासच जंबुनदी म्हटलेलें कोठें कोठें आढळतें.

**सुचारु**–कृष्णापासून रुक्मिणीस झालेल्या पुत्रांतील एक.

**सुचित्ति**–तृतीयार्थक अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**सुचित्र**–द्रोणाचार्यानें मारिलेला चित्रवर्मा राजाचा पिता पांडवपक्षीय राजा.

२–ताम्रध्वज राजास नामांतर.

**सुचीरा**–श्वफल्क यादवास तेरा पुत्रांच्या मागून झालेली एक कन्या.

**सुचेता**–गृत्समदाचा पुत्र. याचा पुत्र वर्चा ना० ऋषि.

**सुच्छाया**–ध्रुवपुत्र शिष्ट त्याची स्त्री. हिला कृप, रिपुंजय, वृत्त, आणि वृक, असे पुत्र चार होते.

**सुजन**–बारा भार्गवदेवांतील एक.

**सुजन्य०** ,, ,,

**सुजय**–पांडवांच्या अश्वमेधास साह्य करणारा एक यादव ( जैमि० अ० १३ ).

**सुजातवक्र**–एक ऋषि.

**सुजाता**–उद्दालक ऋषींची कन्या. कहोड ऋषींची स्त्री, व अष्टावक्राची माता.

**सुजातेय**–विश्वामित्रकुलोत्पन्न एक ऋषि.

**सुतंजय**–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० २७ ).

**सुतनु**–वसुदेवाच्या स्त्रियांतील एक.

२–अक्रूराच्या स्त्रियांतील एक.

**सुतपस्**–सावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या देवांतील एक.

**सुतपा**–एक प्रजापति, हाच पुढें कृष्णपिता वसुदेव झाला होता.

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्ष राजाच्या तीन पुत्रांतील पहिला याचा पुत्र अमित्रजित्.

३–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न हेम अ० सेन राजाचा पुत्र. याचा पुत्र बलिराजा.

**सुतल**–सप्त बिलस्वर्गांतील तिसरा. येथें प्रस्तुत बलिदैत्य राहात आहे ( भाग० ५ स्कं० अ० २४ ).

**सुतश्रवा**–एक ब्रह्मर्षि.

**सुतसोम**–तृतीय श्रुतसेन तोच.

**सुतार**–अनुशाल्व राजाचा प्रधान.

**सुतीर्थ**–भारतवर्षीय तीर्थ.

**सुतीक्ष्ण**–एक ब्रह्मर्षि. अगस्त्य ऋषींचा शिष्य याच्या आश्रमांत कांहीं काळ राम राहिला होता.

**सुतेजन**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० १५८ ).

**सुतेजा**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरिश्चंद्रवंशीय सुदेव राजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ.

**सुत्रामा**–देवसावर्णि मन्वंतरांतील देवविशेष.

**सुंद**–उपसुंदाचा ज्येष्ठ भ्राता ( सुंदोपसुंद श० पहा ).

२–ताटका राक्षसीचा पति. यास सुबाहु आणि मारीच असे दोन पुत्र होते.

**सुदरिद्र**–पांचाल नगरींतील एक ब्राह्मण धृतिमान्, तत्त्वदर्शी, तपोत्सुक, आणि विद्याचंड, या चौघांचा पिता ( पितृवर्ति श० पहा ).

**सुंदरिका**–भारतवर्षीय तीर्थ.

**सुंदरी**–नर्मदा गंधर्वीच्या तीन कन्यांतील एक माल्यवान् राक्षसाची स्त्री ( वा० रा० उत्तर० स० ५ ).

**सुदर्शन**–विष्णूचें चक्र.

२–ऋषभ देवाचा ज्येष्ठ पुत्र भरत, त्यापासून पंचजनीस झालेल्या पांच पुत्रांतील तिसरा.

३–जंबुद्वीपास नामांतर.

**–श्लोक.–**

सुदर्शनं प्रवक्ष्यामि द्वीपं तु कुरुनंदन ॥
परिमंडलो महाराज द्वीपोसौ चक्रवत्स्थितः ॥ १३ ॥
( भार० भीष्म० अ० ५ ).

४–भारतवर्षीय सरोवर ( वा० रा० किष्किं० स० ४० ).

५–भारतवर्षीय एक सामान्य पर्वत ( वा० रा० किष्किं० स० ४३ ).

६–एक विद्याधर. एकेकाळीं हा अंगिरा ऋषींस हंसल्यावरून, तूं सर्प होशील असा त्यानें यास शाप दिला. त्यावरून अंबिकावनांत हा सर्प होऊन पडला असतां, यानें, नंद, गोपालांसहवर्तमान तेथें यात्रेस गेला होता त्यास गिळिलें. त्यावरून कृष्णानें याजपासून नंदास सोडवून याचा उद्धार केला ( भाग० दशम० अ० ३४ ).

७–सुदर्शनेस अग्निदेवतेपासून झालेला पुत्र. नृगवंशोत्पन्न ओघवान् राजानें आपली ओघवती कन्या यास दिली होती. ( भार० अनु० अ० २ ). हा राजा पराकाष्ठेचा अतिथिप्रिय असे, म्हणून यानें स्त्रीस असें सांगून ठेविलें होतें कीं मी अतिथीस कधींहि विमुख होत नसतों. यास्तव हें व्रत तुलाहि पाळिलें पाहिजे. तूं ह्मणशील मदीयत्वेंकरून जे पदार्थ ग्रहण केले जातात, तेवढेच मात्र अतिथि इच्छील तर अर्पून त्याचा संतोष राखावा हेंच कीं नाहीं ? तर असें नव्हे, जें हें प्रत्यक्ष शरीर अहंत्वानें तूं दृढ धरिलें आहेस, त्याचीहि प्रसंगोपात्त अतिथीनें याचना केल्यास, हेंहि तूं त्यास अर्पण करावेंस. त्यावरून मी आज्ञेप्रमाणेंच वागेन असें तिनें म्हणून पतिसहवर्तमान अतिथीचा संतोष करीत असतां, एकदां हा मृगयेनिमित्त अरण्यांत गेला अशी संधी पाहून, याचें सत्व पाहण्यास साक्षात् मृत्युच याच्या घरीं ब्राह्मणवेषानें प्राप्त झाला. तेव्हां ओघवतीनें पुढें होऊन याचा सत्कार केल्यावर विनंती केली कीं, पति अरण्यांत गेले आहेत यास्तव काय इच्छा असेल ती मला सांगावी म्हणजे मी पूर्ण करीन. ब्राह्मण म्हणाला, तूं माझी इच्छा पूर्ण करशील ? तिनें होय म्हटलें. तेव्हां अतिथि बोलला, तुझें शरीर उपभोगावें अशी माझी इच्छा आहे. तेव्हां हिनें उत्तम आहे असें म्हणून एकांतस्थानीं शय्या करून तेथें ब्राह्मणांस नेलें असतां, ब्राह्मण तिशीं संगत झाला. सारांश, उभयतांची रति चालली आहे, तों राजा अंतःपुरांत आला, व स्त्रीस हाका मारूं लागला, परंतु ब्राह्मणाची इच्छा तृप्त करण्यांत ती गुंतली होती म्हणून तिनें यास ना उत्तर दिलें व ना दारहि उघडिलें. नंतर ब्राह्मण तृप्त होतांच ही दार उघडून बाहेर आली. इतक्यांत अतिथि ब्राह्मण याच्या दृष्टीस पडला. तों तो ब्राह्मण याचें मन पाहण्यासाठीं यास म्हणूं लागला. राजा, आम्हीं उभयतांनीं परमानिंद्य असें परस्पर कर्म केलें आहे, यास्तव मला तूं दंड करण्यास योग्य आहेस. राजा म्हणाला, असें आपण बोलूं नये, ही स्त्री आपली दासी असून मीही आपला आज्ञाधारक सेवक आहें. यास्तव आपली इच्छा तृप्त होण्यांत कांहीं अंतर पडलें असल्यास आपणच आह्मांस शासन करावें. इतकें ऐकतांच मृत्यु संतुष्ट होऊन त्यानें आपलें रूप प्रकट करून म्हटलें, राजा, तूं मला जिंकलेंस, असें म्हणून त्याच्या स्त्रीस त्यानें अर्धभागानें पृथिवीवर नदीरूपानें स्थापून तिच्या राहिल्या अर्धभागासहित यास आपल्या स्वलोकीं नेलें.

८–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयांत जन्मलेल्या ध्रुवसंधिराजास, त्याची ज्येष्ठ स्त्री मनोरमा तिच्या ठायीं झालेला पुत्र. हा मोठा झाल्यावर याचें उपनयन भारद्वाज ऋषीनें करून, वेदवेदांगांची व धनुर्वेदाचीहि यास शिक्षा दिली. त्याचें कारण असें होतें.––

अयोध्यानगरीचा पुष्पराजा, त्याचा पुत्र पौष्य नामांतरानें ध्रुवसंधि, त्यास मनोरमा आणि लीलावती, अशा दोन स्त्रिया होत्या, आणि दोघींस सुदर्शन आणि शत्रुजित् असे क्रमानें पुत्र होते. एकदां ध्रुवसंधि अरण्यांत मृगयेस गेला असतां, सिंहाच्या हातून मरण पावला. तें वर्तमान अयोध्येंत कळल्यावर राजाचें और्ध्वदेहिक झालें. पुढें वसिष्ठ ऋषि व मंत्री यांनीं परस्परांशीं यथान्याय विचार करून सुदर्शनास राज्याभिषेकाचा विचार केला; कारण तो ज्येष्ठ स्त्रीचा पुत्र होता. इतक्या संधींत मनोरमेचा पिता कलिंगदेशाधिपति वीरसेन, व लीलावतीचा पिता अवंती देशाधिपति युधाजित्, अयोध्येस येऊन पोहोंचले. त्यांत युधाजित् सुदर्शनास राज्याभिषेक होऊं देईना. त्याचें कारण तो म्हणाला कीं शत्रुजित् सुदर्शनाहून ज्येष्ठ आहे. वीरसेनाचें म्हणणें त्याचें ज्येष्ठत्व काय उपयोगी ? ज्येष्ठ स्त्रीचा पुत्र तोच वयानें लहान असला तरी ज्येष्ठ होय. यास्तव वसिष्ठादिकांनीं योजिलेला विचार न्याय्य आहे. हें वीरसेनाचें म्हणणें युधाजित् ऐकेना. त्यावरून उभय राजांचें युद्ध आरंभून त्यांत मनोरमेचा पिता वीरसेन मरण पावला. असें पाहून युधाजितानें आपला दौहित्र शत्रुजित् त्यास राज्याभिषेक करून मनोरमा व तिचा पुत्र सुदर्शन यांस धरून प्रतिबंधांत ठेवावें किंवा मारावें अशा विचारानें त्यांस शोधूं लागला. हा त्याचा विचार विदल्ल ना० प्रधानास आधींच कळला होता, म्हणून त्यानें मनोरमेस तिच्या सुदर्शन पुत्रासहित अयोध्येंतून पळवून, भारद्वाज ऋषीस हें सर्व वृत्त कळवून त्याच्या आश्रमांत नेऊन ठेविलें होतें ( देवी भा० ३ स्कं० अ० १४–१५ ).

युधाजितानें, मनोरमा व सुदर्शन यांकरितां सगळी अयोध्या शोधिली, परंतु त्यांचा कोठें ठिकाण नाही असें पाहून त्यानें राज्याची उत्तम व्यवस्था ठेवून स्वदेशीं गमन केल्यावर थोड्याच काळानें त्याला समजलें कीं, सुदर्शन हा मातेसहवर्तमान भारद्वाज ऋषीच्या आश्रमीं आहे. त्यावरून तो तेथें गेला, व ऋषीस

म्हणूं लागला कीं, मनोरमा व सुदर्शन या उभयतांस माझ्या स्वाधीन करावें. ऋषीनें सांगितलें त्यांनीं माझा आश्रय केला आहे यास्तव मी त्यांस देणार नाहीं. युधाजित् म्हणाला, माझ्या शत्रूस आपण आश्रय देणेंच योग्य नव्हे. असें असून दिलात तर असो, परंतु, आतां मी मागत आहें त्या अर्थी त्यांस आपण माझ्या स्वाधीन करावें, न कराल तर मला बलात्कारानें नेण्याचा प्रसंग येईल. भारद्वाजानें उत्तर केलें, बरें आहे, सामर्थ्य असल्यास घेऊन जा. मज-कडून ना नाहीं ( देवीभा० ३ स्कं० अ० १६ ).

भारद्वाजाचें भाषण ऐकून युधाजित् कांहींसा शंकित झाला, व आपल्या प्रधानास पुसूं लागला,कसें करावें ? प्रधान म्हणाला, राजा, ऋषीनें ज्या अर्थी सामर्थ्य असल्यास घेऊन जा असें तुला म्हटलें आहे, त्या अर्थी तुझ्या शत्रूचें संरक्षण करण्यास तो खचित समर्थ आहे असें दिसतें. इतक्यावर तूं आग्रहास पडून बलात्कारास प्रवर्तक होशील,तर विश्वामित्राप्रमाणें परा-भव पावशील. त्यावरून त्यानें विश्वामित्र कोणापासून पराभव: पावला त्याविषयीं प्रधानास पुसल्यावरून, प्रधानानें वसिष्ठाची कामधेनु विश्वामित्रानें बलात्कारें-करून हरण केली असतां, तो वसिष्ठापासून पराभव पावल्याचा इतिहास सांगितला. त्यावरून युधा-जितानें मनांत आणिलेला विचार रहित करून ऋषीस वंदन केलें, व स्वदेशास जाण्याची आज्ञा मागितली तेव्हां भारद्वाज त्यास याप्रमाणें बोलला.—**श्लोक**-दया सर्वत्र कर्तव्या दैवाधीनमिदं जगत् ॥ ईर्षया किं नृपश्रेष्ठ यद्भाव्यं तद्भविष्यति ॥ २८ ॥ वज्रं तृणायते राजन् दैवयोगान्न संशयः । तृणं वज्रायते क्वापि समये दैवयोगतः ॥ २९ ॥ अर्थ–सर्वत्र दया असावी, हें संपूर्ण जग दैवाधीन आहे. कोणी निरर्थक ईर्षा(मत्सर) कोणाचा करूं नये. कारण जें होणार तें कधीं झाल्या वांचून राहायाचें नाहीं. दैव अनुकूल असलें तर, वज्रहि तृणाप्रमाणें होऊन जातें, प्रतिकूल असल्यास तृणच वज्राप्रमाणें होऊन मनुष्य अवश्य नाश पावतो. असें ऋषीचें बोधपर भाषण ऐकून युधाजित् अवंतीस गेला. सारांश, सुदर्शनाचे उपनयनसंस्कारादिक भारद्वाजानें केले म्हणून जें वर लिहिलें त्याचें कारण हें असें झालें होतें ( देवीभा० ३ स्कं० अ० १७ ).

सुदर्शनास बाळपणापासूनच आदिशक्तीची परा-काष्ठेची भक्ति असे, असें पाहून भारद्वाजानेंहि त्यास तत्संबंधीं सर्व विधि उत्तम प्रकारेंकरून समजावून दिला होता, त्याप्रमाणें हा, ती उपासना करीत असतां, यास ती इतकी सिद्ध झाली होती कीं, काशीचा राजा सुबाहु या नामेंकरून कोणी त्या वेळेस होता, त्याच्या शशिकला ना० कन्येस देवीनें तिच्या स्वप्नांत जाऊन यासच वरण्याची आज्ञा केली. तो स्वप्न शशि-कलेनें पाहून ती जागी झाली, व तिनें सर्व वृत्तांत आपल्या मातेस कळविला. तिनें राजास सांगितल्या-वर राजा म्हणाला, तो चांगला आहे खरा; परंतु राज्यभ्रष्ट असल्यामुळें मी ही कन्या त्यास कशी द्यावी? असें म्हणून त्यानें तिच्या स्वयंवराची सिद्धता करून अनेक राजांस त्या समारंभास बोलाविलें. तात्पर्य आपल्या मनोदयानुरूप आपला पिता करीत नाहीं, असें जरी तिला वाटलें, तरी तिनें आपला निश्चय ढळूं दिला नाहीं ( देवीभा० ३ स्कं० अ० १८ ). काशीराजानें स्वयंवराची सर्व सिद्धता केली, व राजेहि अनेक देशींचे जमत चालले असें शशिकलेनें पाहून गुप्तरूपानें एक ब्राह्मण तिनें सुदर्शनाकडे चित्रकूटपर्व-तावर पाठविला; कारण भारद्वाज त्या वेळेस तेथेंच राहात होता, त्या ब्राह्मणानें येऊन शशिकलेचा सर्व वृत्तांत स्वप्नासहित सांगून, तुम्हांस तिनें स्वयंवराक-रितां बोलाविलें आहे ह्मणून सांगितलें. त्यावरून शृंगवेरच्या किराताधिपतीकडून विदल्लप्रधानाच्या हस्तें एक रथ मागून आणवून सुदर्शन हा ब्राह्मणांसहवर्त-मान सुबाहूच्या नगरास आला. तेव्हां इतर राजांचा जसा सत्कार झाला, तसाच याचाहि होऊन यास राहण्यास स्थलादिकांचीहि योजना झाली (अ० १९)

नंतर स्वयंवराच्या दिवशीं सर्व राजे मंडपांत जमले, त्यांत अवंतीदेशाधिपति युधाजित् राजा, आपल्या शत्रुजित् ना० दौहित्रास ( मुलीच्या मुलास) अयोध्येहून घेऊन त्यांत आलाच होता, तो येऊन बसला, त्याचप्रमाणें सुदर्शनहि येऊन बसला. त्यास पाहून राजांचा व सुदर्शनाचा कांहीं संवाद झाला. इतक्यांत सुबाहु अंतःपुरांत कन्येकडे जाऊन तिला मंडपांत चल म्हणून म्हणूं लागला. परंतु तिनें मी मंडपांत येत नाहीं म्हणून पित्यास स्पष्ट सांगितलें. राजा म्हणाला, तूं मंडपांत चल व वरायाचें असेल त्यासच वर. त्या गोष्टींत माझा ना नाहीं, परंतु ती तें ह्मणणें कांहींच ऐकेना ( स० २० ) त्यावरून सुबाहु मोठ्या संकटांत पडला, व जमलेल्या राजांस आतां काय सांगावें अशी चिंता करूं लागला, तथापि त्यानें तसेंच धैर्य धरिलें, आणि मंडपांत येऊन सर्वांस विनयपूर्वक भाषण केलें कीं, आज मजवर सर्वांनीं अनुग्रह करून परत जावें; कारण

माझी कन्या आज मंडपांत येत नाहीं, उद्यां येईन म्हणत्ये, त्यावरून सर्व जमलेले राजे तथाऽस्तु म्हणून त्या दिवशीं राहत्या स्थळीं गेले.

राजे जातांच सुबाहु कन्येकडे आला व तिला म्हणूं लागला, तूं असें करशील हें मला ठाऊक नाहीं, मी हे राजे बोलाविले नसते तरी बरें झालें असतें, आतां उद्यां तरी तूं कसें करणार तें मला वास्तविक सांग. शशिकला म्हणाली, मी पूर्वींच आपणास सांगितलें होतें कीं, मला सुदर्शनास वरणें आहे, असें असून आपण आग्रहानें अन्य राजांस बोलाविलें यास मीं काय करावें ? अस्तु, उद्यां तरी मी मंडपांत येईन असें आपण समजूं नये. तर माझी आपणास इतकीच विनंति आहे कीं, आज रात्रीं माझा विवाह गुप्तरूपानें तुम्हीं सुदर्शनाशीं करावा, पुढील चिंता आपण अगदीं वागवूं नये; कारण जरीं सुदर्शन येथें एकटा आला आहे. तरी तो महासमर्थ असल्यामुळें आलेल्या राजांचा पराभव करून आपणास यत्किंचित्‌हि उपद्रव होऊं देणार नाहीं, असें निश्चयात्मक समजा. त्यावरून सुबाहूनें त्या रात्रीं सुदर्शनाशीं शशिकलेचा विवाह केला ( देवीभा० ३ स्कं० अ० २१–२२ ).

शशिकलेचा विवाह सुदर्शनाशीं सुबाहूनें केला, तें वर्तमान प्रातःकाळीं सर्व राजांस कळलें. त्यावरून ते अनिवार क्रुद्ध झाले, तथापि त्यांत युधाजित् अतिशयच क्रुद्ध होऊन, तो शत्रुजितास प्रमुख करून सर्व राजांसहित युद्धास सिद्ध झाला, आणि सुबाहूस त्यानें सांगून पाठविलें कीं, जर तुला असेंच कर्तव्य होतें, तर आम्हांस येथें कशाकरितां बोलाविलेंस ? यास्तव असा आमचा प्रसिद्धपणानें अपमान करणारा. जो तूं, त्या तुला शिक्षाच केली पाहिजे. तर आतां युद्धास ये. असें ऐकून सुदर्शनास पुढें करून सुबाहु तत्काळ युद्धासाठीं सर्व राजांसमोर आला. सारांश, सुदर्शनानें शक्तीचें स्मरण केलें व युद्ध करूं लागला, तों असें झालें कीं, शक्ति अनेक रूपांनीं प्रकट होऊन तिनें एका क्षणांत सर्व राजांचा पराभव केला, व युधाजित् आणि त्याचा दौहित्र शत्रुजित् त्यांस तर ठारच मारिलें ( देवीभा० ३ स्कं० अ० २३ ).

युधाजित् व शत्रुजित् मरतांच सर्व राजे सुदर्शनास शरण आले, व त्यांनीं यास या आदिशक्तीस आवरून आम्हांस तिचें माहात्म्य कथन कर अशी विनंति केली, ती ऐकून सुदर्शनानें शक्तीस प्रार्थना करतांच ती अंतर्धान पावली. नंतर यानें राजांस शक्तीचें माहात्म्य कथन केलें ( अ० २४ ). त्यावरून सर्व राजे संतुष्ट होऊन,त्यांनीं सुदर्शनाचा व शशिकलेचा प्रकट विवाह समारंभ पाहिला. नंतर सुबाहूनें सर्वांचा यथायोग्य सत्कार करून त्यांस मार्गस्थ केल्यावर, सुदर्शनासहि अपार द्रव्य, दासदासी, अश्वगजरथ, वस्त्रभूषणें, अलंकार, इ०कैंकरून, गौरवून, शशिकलेसहित त्यास मार्गस्थ करितांच, तो तेथून निघून भारद्वाजास येऊन भेटला, आणि त्याचा आशीर्वाद घेऊन अयोध्येस गेला असतां, मंत्र्यांनीं त्यास राज्याभिषेक केला. सुदर्शन राज्य पावल्यावर त्यानें आपल्या मातेप्रमाणेंच आपल्या लीलावती ना० सापत्न मातेचें संरक्षण केलें, त्यामुळें तिचा संतोष झाला. यास शशिकलेपासून अग्निवर्ण ना० पुत्र झाला होता ( देवीभा० ३ स्कं० अ० २५ ).

९–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

१०–सात्यकीनें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० ११८ ).

११–हंसध्वजराजाच्या पुत्रांतील एक.

**सुदर्शना**–सूर्यवंशीय दुर्योधन राजाची कन्या, व सप्तमार्थक सुदर्शन राजाची माता.

**सुदंष्ट्र**–रामसेनेंतील एक बलवान् वानर ( वा०रा०उत्तर० स० ३६ ).

**सुदक्षिण**–पांडवांच्या वेळेस कांबोज देशांत होता राजा तो. हा भारती युद्धांत दुर्योधनाकडे असून, पुढें अर्जुनाच्या हातून मरण पावला होता ( भार० द्रोण० अ० ९२ ). ( भार० सभा० अ० २७ ).

२–पौंड्रक वासुदेवाचा मित्र जो काशीचा राजा त्याचा पुत्र. याच्या पित्यास कृष्णानें मारलें होतें म्हणून, त्यास मारण्यासाठीं यानें रुद्राचें तीव्र आराधन केलें, तेणेंकरून रुद्र प्रसन्न झाला, आणि याचा हेतु ओळखून यास म्हणाला, तूं दक्षिणाग्नीचें अभिचारक्रमानें सेवन कर म्हणजे तो, अब्राह्मण्याचा ( ब्राह्मण अभक्ताचा ) तत्काळ नाश करील. इतकें बोलून तो अंतर्धान पावल्यावर, यानें दक्षिणाग्नीचें आराधान केलें. त्यावरून तो अग्नि तत्काळ द्वारकेवर गेला; परंतु कृष्ण ब्रह्मण्य असल्यामुळें माघारा उलटून यावर येऊन पडला त्यामुळें हाच मरण पावला. मूळांत कृष्णानें चक्र सोडल्याचें लिहिलें आहे; परंतु रुद्रवराप्रमाणें कृष्ण हा ब्रह्मण्य असतां, चक्र सोडण्याचें प्रयोजन दिसत नाहीं ( भाग० १० स्कं० अ० ६६ ).

**सुदक्षिणा**–प्रथमार्थक दिलीपराजाची स्त्री.

**सुदामा**–दशार्ण देशाचा राजा. हा चेदिदेशाचा राजा

वीरबाहु, आणि विदर्भ देशाचा अधिपति भीम अ० भीमक दमयंतीचा पिता,त्या उभयतांचा श्वशुर होता.

२–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ). याची राजधानी मोदापुर.

३–याच वरील देशाचा राजा तो, हा वामदेव राजाचा भ्राता असावा. हा भारती युद्धांत पांडवांकडे होता ( भार० द्रो० अ० २३ ).

४–भारतवर्षीय सामान्य पर्वत.

५–सीरध्वज जनकाचा मंत्री.

६–गोलोकांतील वर्णिलेला कृष्णाचा सखा.

**सुदामिनी**–वसुदेवाचा भ्राता शमीक त्याची स्त्री. सुमित्र व अर्जुनपालाची माता.

**सुदास**–( सू० वं० ) पूरुकुलोत्पन्न सर्वकाम अ० सर्वकर्मा ज्यास नलराजा असेंहि म्हटलेलें आहे, त्याचा पुत्र. याचा पुत्र मित्रसह राजा.

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र नील राजा तद्वंशीय मुद्गलपांचालवंशोत्पन्न च्यवन राजाचा पुत्र. यास बृहद्रथ असें नामांतर असून पुत्र सहदेव होता.

३–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय तिमि राजाचा पुत्र बृहद्रथ त्याचा पुत्र. यास शतानीक नांवाचा पुत्र होता.

४–एक यवनजातीय राजा. हा परम अविनयी (उद्धत) असल्यामुळें नाश पावला होता. वेनराजा व नहुष राजा इ० अविनयानें नष्ट झाले, त्या मालिकेंत याचें नांव आढळतें. त्यावरून हा बराच पुरातन होता असें दिसतें.

श्लोक—

वेनो विनष्टोऽविनयान्नहुषश्चैव पार्थिवः ॥
सुदासो यवनश्चैव सुमुखो निमिरेव च ॥ ४१ ॥
( मनुस्मृति. अ० ७ ).

**सुदिन**–भारतवर्षीय तीर्थ.

**सुदृष्ट**–भारतवर्षीय देश ( भार० भी० अ० ९ ).

**सुदेव**–एक देववि०. ( तुषित श० पहा ).

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरित अ० वृक राजाचा पौत्र, आणि चंप राजाचा पुत्र. यास विजय आणि सुतेजा असे दोन पुत्र होते.

३–विदर्भदेशाचा प्रायः दाशरथि रामाच्या वेळचा राजा. यास श्वेत आणि सुरथ असे दोन पुत्र होते ( वा० रा० उत्तर० स० ७८ ).

४–काशीचा राजा हर्यश्व त्यास नामांतर. याचा पुत्र दिवोदास.

५–नलदमयंतीच्या शोधास भीमक राजानें पाठविलेला ब्राह्मण ( ५ नल श० पहा ).

६–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतान्वयसंभूत देवक राजाच्या चार पुत्रांतील तिसरा.

७–अंबरीष राजाचा सेनापति. अंबरीष हा मरण पावून स्वर्गास गेला असतां, पूर्वींच मरण पावलेल्या या सुदेव सेनापतीस त्यानें तेथें उत्तम ऐश्वर्य भोगितां पाहिलें. त्यावरून त्यानें इंद्रास पुसलें, यास म्हणाया जोगे यज्ञ घडले नसतां, हा येथें कोणत्या पुण्यानें आला. इंद्र म्हणाला, यास घडावा असा युद्धयज्ञ घडल्यामुळें हा ऐश्वर्य भोगीत आहे. यांत तात्पर्य, न्यायानें जर युद्ध घडलें, तर त्यासही स्वर्ग प्राप्त होतो ( भार० शांति० अ० ९८ ).

८–यौवनाश्व राजाचा भ्राता. ( यौवनाश्व श० पहा ).

**सुदेष्ण**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

२–कृष्णापासून रुक्मिणीस झालेल्या पुत्रांतील एक.

**सुदेष्णा**–सोमवंशीय अनुकुलोत्पन्न बलिराजाची स्त्री.

२–पूर्व मत्स्यदेशाधिपति विराट राजाची स्त्री ( भार० विराट० अ० ३ ).

**सुंदोपसुंद**–हिरण्यकशिपूच्या वंशांतील निकुंभ नाम दैत्याचे पुत्र. या उभयतांनीं विंध्याचल पर्वतावर मोठें उग्र तप केलें. त्याच्या योगानें ब्रह्मदेवापासून यास असा वर मिळाला कीं, तुम्ही उभयतां एकमेकांस न माराल तोंपर्यंत अमर राहाल. त्यावरून हें संतुष्ट होऊन पृथिवीवर संचार करूं लागले. परंतु यज्ञयाग सिद्धीस जाऊं देईनात, असा जेव्हां अतिशय सर्वत्र त्रास झाला तेंव्हां हें गाऱ्हाणें इंद्राच्या कानापर्यंत जाऊन या उभयतांमध्यें कलह उत्पन्न होण्याकरितां त्यानें विश्वकर्म्याकडून एक अति लावण्यवती स्त्री निर्माण करविली. ती अशी कीं, पदार्थमात्रांतील तिल तिल सौंदर्याचीच ती केवळ प्रतिमा असल्यामुळें तिचें नांव तिलोत्तमा पडलें. पुढें तीस इंद्रानें आज्ञा केल्यावरून, ती या उभय बंधूंच्या दृष्टीस पडली. त्यामुळें दोघांचा तीकरितां कलह होऊन तें एकमेकांस मारून मेले ( भार० आदि० अ० २०९—२१२ ).

**सुद्यु**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न चारुपद राजाचा पुत्र. याचा पुत्र बहुगव राजा.

**सुद्युम्न**–चक्षुर्मनूस नड्वलेपासून झालेल्या अकरापुत्रांतील एक. यास क्वचित् प्रद्युम्न असेंहि म्हटलेलें आढळतें. शंख ऋषीचा भ्राता लिखित ऋषि, ज्याच्याकडे

घेऊन चौर्यकर्मविषयक जी हस्तच्छेदरूप शिक्षा ती घेता झाला तोच हा राजा. (शंखलिखित श० पहा)

२–वैवस्वत मनूचा पुत्र जो इलराजा त्यास हें नामांतर होतें.

**सुधनु**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय कुरुराजा, त्याच्या चार पुत्रांतील दुसरा. यास कोठें कोठें सुधन्वा असें म्हटलें असून, पुत्र सुहोत्र नांवाचा होता.

२–संशप्तकांतील एक राजा.

**सुधन्वा**–द्वितीयार्थक अंगिरा ऋषीच्या पुत्रांतील एक. हा एकदां केशिनी म्हणून राजकन्या होती, तिच्या गृहीं गेला असतां, तेथें प्रल्हादपुत्र विरोचन आला होता, त्याशीं परस्पर आपआपल्या श्रेष्ठत्वाचा वाद झाला असतां, त्यांत यानें त्यास जिंकलें होतें.

२–दाशरथि राम व त्याचे लक्ष्मणादिक भ्राते, या सर्वांस धनुर्विद्या शिकविणारा ब्राह्मण ( वा० रा० अयो० स० १०० ).

३–इंद्रदेशाचा राजा. यानें सीरध्वजासमीप सीतेविषयीं मागणें केलें असतां,त्यानें सांगितलें कीं,माहेश चापाचा माझ्या प्रतिज्ञेप्रमाणें भंग कर म्हणजे सीता तुला मी देतों. ती गोष्ट हा मान्य करीना, त्यामुळें जनकहि यास सीता देईना. म्हणून यानें मोठ्या सेनेसहित येऊन, मिथिला नगरीस वेढा दिला, आणि जनकास व त्याच्या प्रजेस अतिशय त्रास केला. त्यावरून जनकास क्रोध येऊन, त्यानें याशीं इतक्या निकराचें युद्ध केलें कीं, त्यांत यास ठार मारिलें, आणि याच्या देशाची राजधानी सांकाश्या नगरी तींत आपला भ्राता कुशध्वज त्याची स्थापना केली. या सुधन्व्यास कंबुग्रीव नांवाचा पुत्र होता (वा०रा० बाल० स० ७१).

४–दुर्योधनपक्षीय संशप्तक राजांतील एक.

५–प्रथमार्थक सुधनु तोच.

६–द्रोणाचार्यानें मारिलेला भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० १२२ ).

७–हंसध्वज राजाच्या पुत्रांतील एक.

**सुधर्मा**–पृथुराजाच्या वेळचा मनुष्यजातीय पूर्वदिक्पाल. ( मत्स्य० अ० ८ ).

२–इंद्रसारथि जो मातली त्याची स्त्री.

३–पूर्वदशार्ण देशाचा राजा. ( भार० सभा०अ०२९).

४–अक्रूराच्या पुत्रांतील एक.

५–दुर्योधनपक्षीय संशप्तक राजांतील एक.

६–दुर्योधनाचा पुरोहित ( उपाध्याय ). ( भार० शांति०अ०४० ).

**सुधामा**–प्रियव्रतपुत्र घृतपृष्ठ, त्याच्या सात पुत्रांतील चौथा. याच्या वर्षास नांव हेंच आहे.

२–क्रौंच द्वीपांतील चौथा वर्ष

३–चाक्षुष मन्वंतरांतील सप्तर्षींतील एक.

**सुधार्मिक**–केरल देशाचा अधिपति चंद्रहास राजाचा पिता तो.

**सुधृति**–( सू०वं० ) दिष्टकुलोत्पन्न राज्यवर्धन राजाचा पुत्र. याचा पुत्र नर ना० राजा.

२–( विदे ० वं० ) महावीर्य जनकाचा पुत्र याचा पुत्र धृष्टकेतु जनक.

**सुनंद**–विष्णूच्या पार्षदगणांतील एक.

**सुनंदन**–कृष्णाच्या पुत्रांतील एक.

**सुनंदा**–चेदि देशाचा राजा वीरबाहु त्याची कन्या.

२–नीलध्वज राजाची स्त्री. ( जैमि० अश्व० अ० ६१ ).

**सुनय**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय परिप्लव राजाचा पुत्र. याचा पुत्र मेधावि राजा.

**सुनसा**–भारतवर्षीय नदी.

**सुनक्षत्र**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न बृहद्बलवंशीय मरुदेव राजाचा पुत्र यास किन्नराश्व नामांतरानें पुष्कर नावाचा पुत्र होता.

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न जरासंधवंशीय निरमित्र राजाचा पुत्र. याचा पुत्र बृहत्सेन.

**सुनाभ**–विष्णूच्या चक्रास नांव.

२–लंकेंतील एक लहान पर्वत. ( वा० रा० सुंदर० स० ५६ ).

**सुनामा**–बलरामानें मारिलेला कंसाचा भ्राता.

**सुनीति**–उत्तानपाद राजाच्या दोन स्त्रियांतील ज्येष्ठ. हिला सुनृता असेंहि नामांतर आढळतें. हिला ध्रुव आणि कीर्तिमान् असे दोन पुत्र होते.

**सुनीथ**–एक राजर्षि.

२–( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या काश्य ना० पौत्राच्या वंशांतील संतति राजाचा पुत्र. याचा पुत्र सुकेतन.

३–( सो० वं० ) नहुषकुलोत्पन्न पूरुराजा, तद्वंशीयजरासंधवंशांतील सुबल राजाचा पुत्र, याचा पुत्र सत्यजित्.

४–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय सुषेण राजाचा पुत्र. याचा पुत्र नृचक्षु राजा.

**सुनीथा**–मृत्युदेवतेची कन्या, ही अंगराजाची स्त्री होती, व हिला वेन नांवाचा अतिदुष्टपुत्र झाला होता.

**सुनेत्र**–किष्किंधेंतील एक वानर. ( वा० रा० किष्किं० स० ३३ ).

**सुपर्ण**–गरुडाची माता विनता कद्रूच्या दास्यांत गुंतली

असतां, त्यानें सर्पांकरितां अमृतकलश आणण्यास स्वर्गी गमन केलें. व अमृतकलश मला द्यावा, अशी विनंति इंद्रास केली, ती इंद्रानें मान्य न केल्यामुळें, गरुडाचें इंद्राशीं युद्ध झालें, त्यांत तो आपणास, अजिंक्य आहेसा जाणून, इंद्रानें त्याच्यावर वज्र टाकिलें, तें दधीच ऋषीच्या अस्थींचें केलेलें जाणून त्याच्या सन्मानार्थ आपला एक पर त्यानें देवलोकांत टाकिला, व अमृतकलश पुनः लवकरच आणून देतों असें इंद्रास सांगून घेऊन गेला, त्या पडलेल्या पराच्या सौंदर्यानें सर्व देव चकित होऊन, त्यांनीं गरुडास सुपर्ण असें नांव दिलें, तेंच त्यास अजून चालत आहे.

२-मुनींस झालेल्या देवगंधर्वांतील एक.

३-एक ऋषि. ( भार० शांति० अ० ३४८ ).

४-क्रौंचद्वीपांतील एक पर्वत.

५-प्राधेच्या गंधर्वपुत्रांतील एक.

**सुपर्वा**-रुचिपर्वा ना० दुर्योधनपक्षीय राजा त्यास मारणारा एक पांडवपक्षीय राजा.

**सुपाटल**-रामसेनेंतील नामांकित वानर. ( वा० रा० किष्किं० स० ३३ ).

**सुपार्श्व**-हा पर्वत किंवा देश त्याचा निर्णय होत नाहीं.

२-मेरूच्या आधारभूत पर्वतांतील एक. ( भाग० ५ स्कं० अ० १६ ).

३-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्ति राजाचा पुत्र देवमीढ अ० द्विमीढ, तद्वंशीय दृढनेमि राजाचा पुत्र. यास सुमति ना० पुत्र होता.

४-भारतीय युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

५-रावणाच्या सचिवांतील एक.

**सुपार्श्वक**-( वि० वं० ) श्रुतायु जनकाचा पुत्र. याचा पुत्र चित्ररथ जनक.

२-अक्रूर यादवाच्या पुत्रांतील एक.

**सुपुष्पित**-( सू० वं० ) सुभव राजाचा पुत्र. याचें नांव वंशावळींत नाहीं. हा पांडवांच्या वेळेस कुलिंद देशाचा राजा होता.

**सुप्तघ्न**-रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० युद्ध० स० ९ ).

**सुप्रतीक**-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशवंशीय प्रतीकाश्व राजाचा पुत्र. याचा पुत्र मरुदेव. सुप्रतीकास सुप्रतीप असेंहि कोठें म्हटलेलें आढळतें.

२-एक ऋषि. हा याचा भ्राता विभावसु ऋषि त्याच्या शापानें गजयोनि पावला होता ( ३ सुभद्र श० पहा ).

**सुप्रतीप**-प्रथमार्थक सुप्रतीक तोच.

**सुप्रभ**-अग्नीपासून उत्पन्न झालेला एक ऋषि.

**सुप्रभा**-सरस्वती नदीच्या सप्त प्रवाहांतील एक.

२-स्वर्भानु दानवाची कन्या, व नमुचि ना० असुराची स्त्री.

३-एक ऋषिकन्या, अष्टावक्र ऋषीची स्त्री.

४-कृशाश्व प्रजापतीच्या दोन कन्यांतील एक, जयेची भगिनी ( वा० रा० बाल० स० २१ ).

**सुप्रभाता**-प्लक्षद्वीपांतील नदी.

**सुप्रयोगा**-सह्याद्रि पर्वतापासून निघालेली नदी.

**सुप्रवृद्ध**-सौवीरदेशीय एक सामान्य राजा.

**सुप्रिया**-प्राधेच्या अप्सरा कन्यांतील एक.

**सुबल**-गांधार देशाचा अधिपति. शकुनी आणि गांधारी यांचा पिता.यास वृषक,बृहद्बल इ० आणखीहि कित्येक पुत्र होते.

२-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न जरासंधवंशीय सुमति राजाचा पुत्र. याचा पुत्र सुनीथ राजा.

३-गोकुलांतील गोपवि०.

४-हंसध्वज राजाच्या पुत्रांतील एक.

**सुबालक**-ब्रह्मदत्त राजाच्या दोन मंत्री पुत्रांतील एक ( पितृवर्ति श० पहा ).

**सुबाहु**-रैवत मन्वंतरांतल्या सप्तर्षींत होऊन गेलेला एक.

२-प्राधेच्या अप्सरा कन्यांतील एक.

३-नलराजाच्या वेळेचा चेदि देशाचा राजा.

४-( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न शत्रुघ्नाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. शत्रुघ्नाच्या मागें हाच मथुरा अ० मधुरा तींत राजा झाला ( वा० रा० उत्तर० स० १०८ ).

५-काशीचा राजा. ध्रुवसंधि राजाचा पुत्र सुदर्शन, त्यास यानें आपली कन्या शशिकला दिली होती.

६-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

७-अक्रूर यादवाच्या पुत्रांतील एक.

८-भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. याचे हात युयुत्सूनें युद्धसमयीं तोडिले होते.

९-दुर्योधनपक्षीय संशप्तक राजांतील एक.

१०-हिमालयाच्या पायथ्यापाशीं असणारा एक किराताधिपति. युधिष्ठिर गंधमादनशिखरावर जात असतां, येतां व जातां यानें त्याचें उत्तम आतिथ्य केलें होतें. ( भार० वन० अ० १४० ).

११-ताटका राक्षसीच्या दोन पुत्रांतील एक. मारीचाचा ज्येष्ठ भ्राता.

१२-कृष्णास कालिंदीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

१३-रामसेनेंत एक वानर होता तो.

**सुबुद्धि**-बभ्रुवाहनाचा मंत्री.

**सुभग**-सुबल राजाच्या पुत्रांतील एक. यास रात्रि-युद्धांत भीमानें मारिलें ( भार० द्रोण० अ० १५७ ).

**सुभगा**-प्राधेच्या अप्सरा कन्यांतलि एक.

**सुभद्र**-प्रियव्रतपुत्र इध्मजिव्ह, त्याच्या सात पुत्रांतील तिसरा. याच्या वर्षास हेंच नांव आहे.

२-प्लक्षद्वीपांतलि तिसरा वर्ष.

३-दक्षिणसमुद्रतीरीं पूर्वी होता अत्यंत विशाल जो वटवृक्ष तो. सुप्रतीक आणि विभावसु हे दोघे परस्पर भ्राते, परस्परांस शाप देऊन, कूर्म आणि गज यांच्या योनि पावले असतां गरुडानें उदरशांति करण्यास्तव दोघांस दोहों हातांत धरून, भक्षण करावें या हेतूनें यासमीप आगमन करून तो यावर बसला होता. ( वा० रा० अर० स० ३५ ).

४-( सो० वं० ) वसुदेवास पौरवीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

५-कृष्णास भद्रेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**सुभद्रक**-रुद्रगणवि०.

**सुभद्रा**-वसुदेवास देवकीच्या ठायीं झालेली कन्या. ही कृष्णाच्या जन्मानंतर फार दिवसांनीं मागून जन्मली होती, व उपवर झाली असतां, बलरामानें हिला दुर्योधनास द्यावें असें मनांत आणलें होतें. परंतु मध्यंतरींच असें झालें कीं, पांडव इंद्रप्रस्थास द्रुपदपुराहून येऊन राहिल्यावर, अर्जुनास तीर्थयात्रेचा प्रसंग आल्या वेळीं, तो तीर्थयात्रा करीत फिरत फिरत द्वारकेस आला, त्या वेळेस कृष्णाची व त्याची नगराबाहेर एकांतीं भेट होऊन, सुभद्रा उपवर झाली असून ती तुला द्यावी असें माझ्या मनांत आहे. या कामास बलरामाच्या मनाचा कल निराळाच असल्यामुळें तूं केव्हां येशील म्हणून मी वाटच पहात होतों. त्यास आतां असें कर कीं, थोड्याच दिवसांत रैवतक पर्वतावर यात्रा भरून तेथें सर्व यादव जातील, त्यांत तूं येऊन सुभद्रेस हरण करावेंस, परंतु हा विचार पुढला होय. सध्या तूं वैराग्यशील वेषानें द्वारकेंत येऊन राहा, म्हणजे मीच तुझी प्रशंसा बलरामापुढें करून त्यास तुझ्या दर्शनास आणीन, त्या योगानें त्याची भक्ति तुजवर बसेल, व तो तुला घरीं आणील. मग युक्तीनेंच सुभद्रा तुझ्या सेवेस तो देईल असें मी करीन, मात्र तूं नासाग्रीं दृष्टि ठेवून सर्वदा स्थित असावेंस. स्त्रियांच्या मुखाकडे अगदीं पाहूं नयेस, म्हणजे हें कार्य साधेल. इतकें बोलून कृष्ण द्वारकेंत प्रवेशला.

कृष्ण जातांच, अर्जुनानें द्वारकेंत प्रवेश करून एकेस्थळीं नासाग्रीं दृष्टि ठेवून बसला. हें वर्तमान नगरामध्यें स्फुट होत होत बलरामास कळून तो त्याच्यादर्शनास गेला, व त्याची ती धारणा पाहून संतुष्ट होत्साता, त्यास त्यानें स्वमंदिरीं आणिलें. तेव्हां मोठाल्या स्त्रिया, व लहान लहान मुली सर्वच तेथें येऊन, त्यांनीं त्याचें दर्शन घेतलें, आणि सुभद्रा त्याच्या सेवेकडेहि प्राप्त झाली. इतक्यांत रैवतकपर्वतीं जाण्याची संधी येऊन, वैराग्यशील बोवास, बलरामानें रथांत बसाविलें, त्यांतच नित्यशः सेवेस सादर असणारी सुभद्राहि बसली. याप्रमाणें ऐतीच सिद्धता झालेली पाहून, कृष्णानें खूण करतांच, बोवांनीं रथ हांकून इंद्रप्रस्थाचा मार्ग धरिला.

हें वर्तमान बलरामास कळतांच, त्यानें त्यास धरून आणावें म्हणून कित्येक यादवांस पाठविलें, परंतु अर्जुनानें त्यांस पराभूत करून कोणाचा प्राणघात न करतां, सांगितलें कीं अर्जुनानें सुभद्रा नेली असें ऐकून तुम्हीं बलरामास जाऊन सांगा. त्यावरून रथांत असलेल्या सुभद्रेस आनंद होऊन यादव माघारे परतले, व बलरामास म्हणाले, तो तर अर्जुन आहे. असें ऐकून बलरामास अतिशय क्रोध आला; कारण सुभद्रेचें हरण त्यानें कपटवेषानें केलें. नंतर आपण त्यावर चालून जावें, व त्यास धरून आणावें, असें मनांत आणीत आहे तों, कृष्णानें सांगितलें, आतां असें करण्यांत काय अर्थ आहे ? अशानें कुंतीस ( आपल्या आतेस ) आपण विसरलों असें मात्र होईल. त्यावरून बलराम शांत झाला, व त्यानें अर्जुनास सन्मानपूर्वक परत आणवून, त्यास सुभद्रा उत्तम समारंभ करून विवाहविधीनें दिली. हिचाच पुत्र अभिमन्यु होय. ( भार० आदि० अ० २२१ ).

**सुभव**-सुपुष्पित राजाचा पिता.

**सुभानु**-कृष्णास सत्यभामेपासून झालेला पुत्र.

**सुभाल**- वीरवर्म्याच्या पुत्रांतील एक.

**सुभाषण**-( विदे० वं० ) युयुधा ना० जनकाचा पुत्र. याचा पुत्र श्रुत संज्ञक जनक.

**सुभूमिक**-सरस्वती तीरींचें तीर्थवि०.

**सुभ्रू**-वसुदेवापासूनरोहिणीस झालेल्या पुत्रांतील एकाचें नामांतर.

**सुमंगल**-द्वितीयार्थक अत्रिकुलोत्पन्न ऋषि व तत्संबंधीं कुल.

**सुमंडल**-भारतवर्षीय देश. हा अर्जुनानें केलेल्या दिग्विजयकाळीं जिंकला होता.



**सुमति**–प्रियव्रतवंशीय ऋषभदेवाचा पुत्र भरत, त्यास पंचजनी स्त्रीपासून झालेल्या पांच पुत्रांतील ज्येष्ठ. हा ऋषभदेवाची जी नग्न इ० प्रकारें राहण्याची चर्या, तीप्रमाणें वागत असे; त्यामुळें यास नास्तिक लोकांनीं देव अशी कल्पना केलेली आहे. या सुमतीस वृद्धसेना नांवाची स्त्री असे व तिच्या ठायीं त्यास देवताजित् नांवाचा पुत्र झाला होता ( भाग० ५ स्कं० अ० १५ ).

२–वरुण लोकांतील असुरवि०.

३–( सू० वं० ) नृगराजाचा पुत्र. यास भूतज्योति नांवाचा पुत्र होता.

४–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न विशालवंशीय सोमदत्त राजाचा पुत्र. याचा पुत्र जनमेजय. हा दाशरथि रामाच्या वेळेस दशरथ असतांच विशाला नगरींत राज्य करीत होता.

५–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्वपुत्र ऋतेयु, त्याचा पौत्र व अंतिभार राजाचा पुत्र. याचा पुत्र रैभ्य ना० राजा.

६–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिराजाचा पुत्र देवमीढ अ० द्विमीढ, तद्वंशीय सुपार्श्व राजाचा पुत्र. याचा पुत्र सन्नतिमान् राजा.

७–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय कुरुराजाचा पुत्र सुधनु, तदन्वयसंभूत जरासंधवंशीय धमत्सेन राजाचा पुत्र. यास सुबल नांवाचा पुत्र होता.

८–( सू० वं० ) सगरराजाची स्त्री वैदर्भी तीच. हीं साठ सहस्र सगरपुत्र जे सागर त्यांची माता. हिला प्रभा असें नामांतर आढळतें.

९–दाशरथि रामाचा पुत्र लव. त्याच्या दोन स्त्रियांतील ज्येष्ठ.

१०–युधिष्ठिराच्या राजसूययज्ञांतील एक ऋषि ( भाग० १० स्कं० अ० १४ ).

११–हंसध्वजराजाचा मुख्य प्रधान.

१२–अर्जुनपुत्र बभ्रुवाहनाचा सेनापति.

१३–होणाऱ्या आठव्या सावर्णिमनूच्या पुत्रांत एक होईल पुत्र तो.

**सुमंतु**–चालू मन्वंतरारंभीं जो पहिला स्वयंभु नांवाचा व्यास झाला होता, त्याच्या चार शिष्यांतील अथर्वणवेद पढणारा शिष्य ( सुमंतुनाथपैलेन तथा जैमिनिना च वै ) अशी याज्ञवल्क्याची उक्ति भारतांत आहे.

२–चालू पर्ययांतील द्वापारांत कृष्णद्वैपायन व्यासास होता याच नांवाचा शिष्य तो.

**सुमंत्र**–दशरथ राजाच्या अष्ट प्रधानांतील एक. राम अरण्यवासास गेला, तेव्हां भागिरथीपर्यंत त्यास पोहोंचविण्यास हाच गेला होता.

**सुमध्यमा**–मदिराश्व राजाची कन्या. ही त्यानें हिरण्यहस्तऋषीस दिली होती.

**सुमनस**–देवांचें साधारण नांव.

**सुमनसा**–ऋषभदेववंशीय भरत राजा, तत्कुलोत्पन्न मधुराजाची स्त्री, वीरव्रतराजाची माता.

**सुमना**–चक्षुर्मनुवंशीय उल्मुक राजाच्या साहा पुत्रांतील दुसरा.

२–वरुणलोकांतील एक असुर.

३–तृतीय वसिष्ठकुलोत्पन्न एक ऋषि.

४–कोणी एक राजर्षि.

५–केकय देशाच्या राजाची कन्या.

**सुमनु**–शांडिल्यऋषीचा शिष्य एक राजा ( भार० अनु० अ० १३७ ).

**सुमल्लिक**–भारतवर्षीय देश.

**सुमागध**–दाशरथिरामाच्या सभेंतील एक हास्यकार

**सुमाली**–वृत्रासुरानुयायी एक असुर.

२–रावणाचा मातामह एक राक्षस. याची स्त्री केतुमती, व कन्या कैकसी ( माल्यवान् श० पहा ).

**सुमित्र**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्ष राजाच्या तीन पुत्रांतील तिसरा. याचा पुत्र बृहत् अ० बृहद्राज.

२–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न सुरथ राजाचा पुत्र. हा या कुलांतील शेवटला राजा, व यास पुढें संतति नव्हती.

३–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतपुत्र वृष्णि, त्याच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ.

४–( सो० वं० ) वसुदेवाचा भ्राता शमीक, त्यास सुदामिनीपासून झालेल्या दोन पुत्रांतील पाहिला.

५–हैहयवंशीय राजा. हें हैहयकुल सूर्य किंवा सोमवंशांतलें तो निर्णय आढळत नाहीं. या राजाचा ऋषभ ऋषीशीं 'आशा' या विषयावर संवाद ( भार० शांति० अ० १२५ ).

६–कृष्णास जांबवतीच्या ठायीं झालेला पुत्र.

७–पुलिंदनगरच्या राजांत जे दोन भ्राते असत त्यांतील दुसरा.

८–अर्जुनानें मारिलेला पूर्वदिशेकडील एक राजा.

९–अर्जुनपुत्र अभिमन्यूचा सारथि.

**सुमित्रा**–दशरथ राजाच्या तीन मुख्य स्त्रियांतील दुसरी.

ही त्या वेळेस असणारा मगधदेशाधिपति शूरराजा त्याची कन्या होती. लक्ष्मण आणि शत्रुघ्न ते दोघे हिचे पुत्र होते.

**सुमुख**–नारदासमागमें मयसभा पाहण्यास इंद्रप्रस्थास आला होता ऋषि तो.

२–रामसेनेंतील एक वानर.

३–सुपर्ण जो गरुड त्याचा पुत्र ( भार० भीष्म० अ० ६ ).

४–एक अविनयानें नष्ट झालेला प्राचीन राजा (४सुदास श० पहा ).

**सुमुखी**–एक अप्सरा.

**सुमेधस्**–अगस्त्यकुलोत्पन्न एक ऋषि. यास सुमेधा म्हटलेलें आहे.

**सुमेधा**–एक ब्रह्मर्षि ( १ सुरथ श० पहा ).

२–सीरध्वज जनकाची स्त्री.

**सुह्म**–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न बलिराजाच्या साहा पुत्रांतील चवथा. हा बलीच्या सुदेष्णा ना० स्त्रीच्या ठायीं दीर्घतमा ऋषीपासून झाला होता.

२–पूर्व आणि उत्तर दिशाभेदानें भारतवर्षीय देश. हा दिशाक्रम इंद्रप्रस्थ मध्य मानून समजावा.

**सुयज्ञ**–तृतीय वसिष्ठ ऋषीचा पुत्र. दशरथाचें पौरोहित्य हाही कधीं कधीं करी.

२–दाशरथि रामाच्या सभेंतील एक मंत्री.

३–उशीनर देशाचा एक राजा. हा पांडवांच्या पूर्वीचा असावा ( भाग० ७ स्कं० अ० २ ).

**सुयोधन**– ( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न विकुक्षि राजाच्या अनेना ना० पुत्रास नामांतर.

२–युधिष्ठिर दुर्योधनास या नांवानें हाक मारीत असे.

**सुरकृत्**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**सुरजा**–प्राधेच्या अप्सरा कन्यांतील एक.

**सुरता**– ,, ,,

**सुरथ**–स्वारोचिष मन्वंतरांतील एक राजा. हा उत्तम गुणांनीं युक्त, व प्रजापालनतत्पर असा असे. परंतु याचा म्लेंच्छांशीं अतिशय विरोध पडून त्यांनीं याशीं मोठा दुर्धर युद्धप्रसंग केला. त्यांत याचा पराभव झाल्यामुळें, हा युक्तीनेंच अश्वारूढ होऊन पळाला, व एका घोर अरण्यांत प्रवेशला. जातां जातां राजधानीपासून तीन योजनें गेल्यावर, तेथें यानें सुमेधा ना० ऋषीचा एक सुंदर आश्रम पाहिला. नंतर अश्वाखालीं उतरून, आंत जाऊन ऋषीस वंदन केलें असतां, त्यानें याचा सत्कार करून, याचें सर्व वृत्तश्रवण केल्यावर यास आपणासमीप राहून घेतलें. हा पुढें राजा तेथें राहत असतां, समाधि नांवाचा कोणी एक वैश्य स्त्रीपुत्रादिकांनीं संपूर्ण द्रव्य घेऊन घरांतून घालवून दिल्यामुळें वैराग्य पावून तेथेंच येऊन राहिल्यावर, त्याचें व या राजाचें समदुःखास्तव सख्य झालें.

एकदां हे दोघे परस्परांशीं संभाषण करीत असतां, संसारांत अशीं विघ्नें कां येतात याच्यावर बोलणें निघून उभयतांहि ऋषीस पुसूं लागले. तेव्हां ऋषीनें सांगितलें, प्राणिमात्र कर्मपरतंत्र आहेत, म्हणून जसजसा कर्माचा ओघ असतो, तदनुसार सुखदुःखें भोगावीं लागतात. इतकें बोलून ऋषि म्हणाला, मला तुमच्या कर्मानुसार अशी अंतःकरणांत प्रेरणा होत आहे कीं, तुह्मी भगवती आदिशक्तीचें जर आराधन कराल, तर तुमच्या सकाम अ० कामनारहित बुद्धिप्रमाणें फल पावाल. त्यावरून उभयतांही तथास्तु म्हणाले असतां, त्यानें यांस देवीच्या अर्चनविधीचा उपदेश केला,त्याप्रमाणें दोघांनीं त्याचें आचरण भक्तिपुरःसर इतकें उत्तम केलें कीं, दोघांसहि देवी साक्षात् झाली, आणि काय इच्छा असेल तें मागा असें म्हणाली. त्यांत वैश्यानें स्वर्गगतीची इच्छा दर्शविली, आणि राजानें इहलोक ( भूलोक ) संबंधीं ऐश्वर्य इच्छिलें. त्यावरून देवीनें वैश्यास स्वर्गास पाठवून, राजास सांगितलें कीं, प्रस्तुत तुझें राज्य तूं पावून, जन्मांतरीं विवस्वान् आदित्याचा सावर्णि नांवानें पुत्र होऊन जन्मशील, व तेथें पुनः माझ्या अर्चनप्रभावानें वैवस्वतमन्वंतर सरल्यावर, सावर्णि नांवानें मनु होशील. इतकें बोलून ती अंतर्धान झाली ( देवीभा० ५ स्कं० अ० ३२–३५ ).

२–दाशरथिरामानें अश्वमेध केला, तेव्हां हा राजा चेदिदेशाची राजधानी शुक्तिमती तींत राज्य करीत असलेला; यानें रामाचा अश्व धरिला, व मारुति इ०-कांस बांधून ठेविलें,तेव्हां राम स्वतः जाऊन त्यानें यांस जिंकून अश्व, व मारुति इ० कांस सोडवून आणिलें ( जैमि० अश्व० अ० २ ).

३–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्षवंशीय रणक राजाचा पुत्र. याचा पुत्र सुमित्र.

४–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय कुरुपुत्र जन्हुराजा, त्याचा पुत्र. याचा पुत्र विदूरथ.

५–विदर्भदेशाधिपति सुदेव राजाचा पुत्र.

६–अश्वत्थाम्यानें मारिलेला द्रुपदराजाचा पुत्र ( भार० शल्य अ० १४ ).

७–सिंधुदेशाधिपति जयद्रथाचा पुत्र युधिष्ठिरानें अश्वमेध केला, त्या वेळेस अर्जुन याच्या नगरावर आला असें यानें ऐकतांच भीतीनें प्राण सोडिला होता; परंतु कृष्णानें यास सजीव करुन, अश्वमेधसमारंभासाठीं, याची माता दुःशला हीसहवर्तमान हस्तिनापुरास आणिलें होतें ( भार० अश्व० अ० ७८ ). ( जैमि० अश्व० अ० ६१ ).

८–दुर्योधनपक्षीय संशप्तक राजांतील एक.

९–जयद्रथाचा मित्र एक शिबिदेशीय राजा.

१०–भारतीयुद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा.

११–हंसध्वजराजाचा पुत्र.

**सुरथा**–अनुकुलोत्पन्न उशीनर राजाची स्त्री, व शिबिराजाची माता.

**सुरभ**–वीरवर्म्याच्या पुत्रांतील एक.

**सुरभि**–कश्यपऋषीच्या १३ स्त्रियांतील एक.

२–कश्यपऋषीची स्त्री क्रोधा तिच्या कन्यांतील एक. हिला रोहिणी आणि गंधर्वी अशा दोन कन्या होत्या.

३–वंशाकसारा नदीच्या तीरीचें वनवि०.

**सुरभिपत्तन**–सहदेवाच्या दिग्विजयांत त्यानें जिंकलेलें दक्षिण दिशेकडील एक नगर.

**सुरसन**–स्वर्गसंबंधी जीं देवांचीं वनें आहेत त्यांतील एक.

**सुरसा**–कश्यपऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक.

२–कश्यपस्त्री काला, तिच्या नऊ कन्यांतील एक.

३–भारतवर्षीय नदी.

४–मारुति समुद्र उल्लंघून लंकेस चालला असतां, त्याच्या बल आणि चातुर्याची परीक्षा पाहण्यासाठीं देवांनीं पाठविलेली एक स्त्री. ही राक्षसीच्या रुपानें मारुतीच्या मार्गात आड येऊन त्यास म्हणूं लागली कीं, माझ्या मुखांत प्रवेश कर. मारुति म्हणाला, मी रामकार्यार्थ जात आहें, यास्तव सीताशुद्धि करुन रामास कळविल्यानंतर तुझ्या मुखांत प्रवेश करीन. परंतु तिनें तें न ऐकून आपलें मुख दहा योजनें पसरिलें. असें पाहून मारुति द्विगुण झाला. अशाप्रमाणें ही,व तो, दहा दहा योजनें अधिक वाढतां वाढतां, मारुति एकाएकीं अंगुष्ठप्रमाण होऊन, तिच्या मुखांत प्रवेशून बाहेर निघाला, व तिला नमस्कार करुन म्हणाला, मी आतां जातों. त्यावरुन तिनें,तूं बलवान् आणि चतुर आहेस, अतएव रामकार्य साधिशील. तर तुझा जय असो, असा आशीर्वाद देऊन स्वर्गीं गमन केलें ( वा० रा० सुंदर० स० १).

**सुरा**–वरुणास ज्येष्ठेपासून झालेली कन्या.

२–समुद्रमंथनकालीं त्यांतून निघालेली देवता. ही मद्याची अभिमानिनी असून, प्रथमतः सुरांनीं हिला अमृत अशा बुद्धीनें स्पर्श केला म्हणून हिला हें नांव पडलें ( मत्स्य० अ० २४९ ).

**सुराजि**–रामसभेंतील हास्यकार.

**सुरायण**–तृतीय वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**सुरारि**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० उद्योग० अ० ४ ).

**सुराष्ट्र**–भारतवर्षीय देश. हा देश सहदेवानें दिग्विजयांत जिंकला होता. याच्या नैऋत्य दिशेकडे शूर्पारक देश आहे ( भार० सभा० अ० ३१ ). येथील लोक संकर जातीचे म्हणून भारतांत सांगितलें आहे ( भार० कर्ण० अ० ४५ ).

**सुरुचि**–उत्तानपाद राजाची कनिष्ठ स्त्री. हिचा पुत्र उत्तम.

२–माघमासांच्या सूर्यासमागमें असणारा यक्ष(तपा श० पहा ).

**सुरुपा**–चालू मन्वंतरांतील मरीचि ऋषीची कन्या व वारुणि अंगिरा ऋषीची स्त्री ( ३ अंगिरा श० पहा).

**सुरेणु**–सरस्वतीच्या सप्त प्रवाहांतील एक.

**सुरैषि**–तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**सुरोचन**–प्रियव्रतपुत्र यज्ञबाहु त्याच्या सात पुत्रांतील पहिला. याच्या वर्षास हेंच नांव आहे.

२–शाल्मलि द्वीपाच्या सात वर्षांतील पहिला.

**सुरोचि**–स्वायंभुवमन्वंतरांतल्या वसिष्ठ ऋषीच्या सात पुत्रांतील दुसरा.

**सुरोद**–सप्तमहासागरांतील तिसरा. याचें वेष्टन शाल्मलि द्वीपास असून याच्या आसमंतात् वलयाकार कुशद्वीप आहे. याची रुंदी चार लक्ष योजनें आहे.

**सुलभा**–प्रधान ना० राजर्षीची कन्या. ही महाज्ञानसंपन्न असून परमहंसदीक्षेनें पृथिवी फिरत फिरत जनक राजाच्या नगरास आली होती. तेव्हां त्याचा व हिचा ब्रह्मविषयपर उत्तम संवाद झाला होता. त्यांतील दिग्प्रदर्शनार्थ वाक्यें:—

—श्लोक—

अथ धर्मयुगे तस्मिन् योगधर्ममनुष्ठिता ॥
महीमनुचचारैका सुलभा नाम भिक्षुकी ॥ ७ ॥
तया जगदिदं कृत्स्नमटंत्या मिथिलेश्वरः ॥
तत्र तत्र श्रुतो मोक्षे कथ्यमानास्त्रिदंडिभिः ॥ ८ ॥
नास्मि वर्णोत्तमा जात्या न वैश्या ना वरा तथा ॥
तव राजन् सवर्णास्मि शुद्धयोनिरविप्लुता ॥ १८० ॥
प्रधानो नाम राजर्षिर्व्यक्तं ते श्रोत्रमागतः ॥

कुले तस्य समुत्पन्नां सुलभां नाम विद्धि माम्‌ ॥१८१॥ (भार० शांति० अ० ३२०). दोन श्लोकांचा अर्थ वर आलाच आहे, दुसऱ्या दोन श्लोकांत मी कोण म्हणून राजा पुसशील तर, तुझ्या जातीची क्षत्रियकन्या आहे, असें तिनें सांगितलें.

**सुलभामैत्रेयी**–कुणिर्गर्गाची कन्याच प्रायः असावी ( कुणिगर्ग श० पहा ).

**सुलोचन**–धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक.

**सुलोचना**–इंद्रजिताची स्त्री.

**सुवर्चला**–ऋषभदेववंशीय देवद्युम्नाचा पुत्र परमेष्ठी त्याची स्त्री.

२–परमेष्ठि राजाच्या प्रतीह ना० पुत्राची स्त्री, तिलाहि हेंच नांव होतें.

३–आदित्याची पत्नी ( भार० अनु० अ० १४६ ).

४–एक देवकन्या. ही ब्रह्मविद्यासंपन्न असून, हिनें, केलेल्या तत्संबंधीं प्रश्नांचीं उत्तरें, उद्दालक ऋषीचा पुत्र श्वेतकेतु त्यानें अगदीं यथास्थित दिल्यामुळें, यास वरिलें होतें.

**सुवर्चा**–एक ब्रह्मर्षि ( भार० वन अ० २९८ ).

२–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न रंभराजाचा पुत्र खनिनेत्र त्याचा पुत्र. यास करंधम असें मूळचें नांव होतें.

३–धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक.

४–अभिमन्यूनें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० ४८ ).

५.–तृतीय सुकेतूचा पुत्र.

**सुवर्ण**–कोणी एक तपस्वी.

२– एक गंधर्ववि०.

३–पुढें होणाऱ्या सावर्णि मनूच्या पुत्रांतील एक.

**सुवर्णरेतस्**–विश्वामित्रवंशीय एक कुल व ऋषि.

**सुवर्णवर्मा**–एक राजा. याची कन्या वपुष्टमा, ती अभिमन्यूचा पौत्र व परीक्षिताचा पुत्र त्याची स्त्री.

**सुवर्णष्ठीवि**–शैव्यपुत्र सृंजय राजा त्याचा पुत्र. याची जी भगिनी दमयंती ती नारदाची स्त्री होती. यास हे नांव पडण्याचें कारण असें होतें कीं, हा सुवर्ण अतिशय प्रसवत असे. त्यामुळें याच्या पित्यानें प्रजा अतिशय संपन्न केली होती. एकदां हा अरण्यांत मृगयेस गेला असतां सुवर्णलोभानें चोरांनीं यास मारिलें, त्यावरून राजास बहुत शोक झाला. इतक्यांत नारद (सृंजय राजाचा जमात) तेथें प्राप्त होऊन, त्यानें यास पूर्ववत् सजीव करून श्वशुरास शोकरहित केलें ( भार० द्रोण अ० ५५ ).

**सुवर्णशिरा**–वरुण लोकांतील गायक ( भार० उद्योग० अ० ११० ).

**सुवर्णाख्यतीर्थ**–विष्णु ऋषीच्या तपाचें स्थल.

**सुवर्णाभ**–स्वारोचिष मनूचा पुत्र शंखपद त्याचा पुत्र. ( भार० शांति० अ० ३४८ ).

**सुवर्णाक्ष**–काशींतील एक स्थानवि०.

**सुवर्मा**–धृतराष्ट्राच्या शत पुत्रांतील एक.

**सुवंश**–वसुदेवास श्रीदेवेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**सुवस्त्रा**–भारतवर्षीय नदी.

**सुवाक्**–पांडवांसमागमें होता द्वैतवनांत ऋषि तो.

**सुवामा**–भारतवर्षीय नदी.

**सुवासन**–ब्रह्मसावर्णि मन्वंतरांतील देववि०.

**सुवीर**–( सू० वं० ) इक्ष्वाकुपुत्र दशाश्व तत्कुलोत्पन्न द्युतिमान् राजाचा पुत्र, व दुर्जयराजाचा पिता (भार० अनु० अ० २ ).

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिराजाचा पुत्र देवमीढ, तद्वंशीय क्षेम्य राजाचा पुत्र, व रिपुंजयाचा पिता.

३–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न शिबिराजाच्या पांच पुत्रांतील दुसरा.

४–वसुदेवभ्राता देवश्रवा, त्यास कंसावतीपासून झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ.

**सुवेग**–यौवनाश्व राजाचा पुत्र.

**सुवेल**–हिमालयस्थ कैलासशिखराच्या ईशान्यदिशेकडील हिमालयाचें शिखर तें.

**सुवेलाचल**–लंकेंतील एक पर्वत.

**सुव्रत**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढ, तद्वंशीय कुरुपुत्र सुधनु, त्याच्या वंशांतील जरासंधकुलांतला क्षेमराजाचा पुत्र. याचा पुत्र धर्मसूत्र.

**सुशर्मा**–कर्णाच्या हातून मरण पावलेला पांडवपक्षीय राजा ( भार० कर्ण अ० ५६ ).

२–दुर्योधनपक्षीय संशप्तक राजा. पांडव अज्ञातवासांत असतां, विराटनगरावर हाच गेला होता. पुढें भारती युद्धांत अर्जुनानें यास मारिलें ( भार० शल्य० अ० ३० ).

**सुशांति**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न हस्तिपुत्र अजमीढ त्याच्या नील ना० पुत्राचा पौत्र व शांतीचा पुत्र. याचा पुत्र पुरुज.

**सुशोभना**–आयु ना० मंडूकाधिपतीची कन्या. इक्ष्वाकुकुलोत्पन्न वंशावळींत नांव नसलेल्या परीक्षित् राजाची स्त्री. शल इ० तीन पुत्रांची माता.

**सुश्रवा**–ऋषिवि०
**सुश्रुत**–विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक.
**सुषेण**–जमदग्नीस रेणुकेपासून झालेल्या पुत्रांतील एक.
२–एक वानर. यास मैंद आणि द्विविद असे दोन पुत्र व तारा ना० कन्या होती. ती यानें वालीस दिली असे ( वा० रा० युद्ध० स० ७६ ). ( भार० वन० अ० २८३ ).
३–याच नांवाचा रामसेनेंतील दुसरा एक वानर.
४–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्ष राजाच्या तीन पुत्रांतील दुसरा.
५–माघमासींचा गंधर्व ( तपा श० पहा ).
६–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय वृष्टिमान् राजाचा पुत्र. याचा पुत्र सुनीथ.
७–वसुदेवास देवकीच्या ठायीं झालेल्या आठ पुत्रांतील एक.
८–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.
९–उत्तमौजानें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ७५ ). ( शल्य० अ० ६ ).
१०–नकुलानें मारिलेला कर्णाच्या पुत्रांतील एक (भार० शल्य० अ० १० ). ( कर्ण० अ० ४८ ).
**सुषोमा**–भारतवर्षीय नदी.
**सुसंवृत्त**–भार० यु० दुर्योधनपक्षीय राजा ( भार० उद्योग० अ० १९ ).
**सुसामा**–युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांतील उद्गाता, हा धनंजयगोत्रोत्पन्न ऋषि होता.
**सुस्वधा**–आज्यप ना० पितरांसच नांव. हे कामदुघ लोकांत राहतात.
**सुहनु**–वरुणलोकांतील असुरवि०
**सुहस्त**–धृतराष्ट्रशतपुत्रांतील एक.
**सुहू**–उग्रसेनाच्या नऊ पुत्रांतील एक. कंसाचा कनिष्ठ भ्राता.
**सुहोत्र**–पांडवांसमागमें द्वैतवनांत होता ऋषि तो.
२–एक राजर्षि. हा परम दाता असे, म्हणून इंद्रानें याच्या राष्ट्रांत एक संवत्सरपर्यंत सुवर्णाची वृष्टि केली होती ( भार० द्रोण० अ० ५६ ).
३–रामसेनेंतील एक वानर.
४–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय कुरु राजाचा पुत्र सुधनु त्याचा पुत्र, याचा पुत्र च्यवन राजा.
५–( सो० वं० ) आयु राजाचा पुत्र क्षत्रवृद्ध त्याचा पुत्र. यास काश्य, कुश, आणि गृत्समद; असे तीन पुत्र होते.
६–पंडुपुत्र जो सहदेव त्याचा पुत्र.
**सुक्षत्र**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० २३ ).
**सुज्ञ**–दशरथ राजाचा एक मंत्री (कुशीलव श० पहा ).
**सुकरमुख**–जो राजा इ० अधिकारी, अदंड्यास दंड करितो; तो नरकामध्यें ऊंस शिजून जशी अवस्था पावतो, तशी स्थिति ज्या स्थळीं अनुभवितो; त्या नरकाचें नांव.
**सुचिमुख**–जो धनगर्वित होऊन मदांधपणानें त्याचा सद्व्यय करीत नाहीं, त्यास प्राप्त होणारा नरक.
**सुत**–पुराण सांगणारा जो लोमहर्षण तो, सौति अ० उग्रश्रव्याचा पिता.
२–रथ हांकणारा त्यास साधारण नांव.
३–कीचकास भारतामध्यें संबोधन आढळतें ( भार० विराट० अ० १५ श्लोक ४९ ).
**सूतपुत्र**–उग्रश्रव्यास म्हणण्याची रूढी.
२–आधिरथसूतानें पाळिलेला जो कर्ण, त्यास म्हणत असत.
३–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.
**सूनृता**–उत्तानपाद राजाची स्त्री सुनीति तिचेंच नामांतर.
२–उत्तम ना० मन्वंतरांतील विष्णूच्या अवताराची माता. द्वितीयार्थक धर्म ऋषीची स्त्री.
३–सत्यसहा ऋषीची स्त्री. रुद्रसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या विष्णूच्या अवताराची माता.
**सूर्मी**–अनुन्हाद ना० दैत्याची स्त्री.
**सूर्य**–सूर्यमंडलाची देवता. द्वादशादित्यांसाहि हें नांव प्रस्तुत साधारणपणानें आहे. हा सतत मेरूच्या आसमंतात् पृथिवीच्या वरचेवर फिरणारा आहे. याविषयीं जमदग्नि ऋषीचा व याचा भारतामध्यें संवाद असा आढळतो. एकेकाळीं जमदग्नीच्या मनांत सूर्यमंडलास विद्ध करावें असें येऊन, त्यानें धनुष्यावर बाण स्थापिला. तेव्हां सूर्य ब्राह्मणवेषानें त्यापुढें येऊन याप्रमाणें बोलला. **श्लोक.**—ततः सूर्यो मधुरया वाचा तमिदमब्रवीत् ॥ कृतांजलिर्विप्ररूपी प्रणम्यैनं विशांपते ॥३॥ चलं निमित्तं विप्रर्षे सदा सूर्यस्य गच्छतः ॥ कथं चलं भेत्स्यसि त्वं सदा यांतं दिवाकरम् ॥ ४ ॥ यांतील तात्पर्य—हे ब्रह्मर्षे, सदासर्वकाळ फिरणारा जो सूर्य-त्याचा भेद तूं कसा करतोस ? याच्यावर जमदग्नि असें बोलला. **श्लोक**—स्थिरं चापि चलं चापि जाने त्वां ज्ञानचक्षुषा ॥ माध्यान्हे वै निमेषार्धं तिष्ठसि त्वं दिवाकर ॥ ५ ॥ म्हणजे हे दिवाकर, तूं स्थिर आणि चल केव्हां असतोस तें मी ज्ञानदृष्टीनें जाणतों;

कसें तर, जरी तूं सर्वकाळ चल ( फिरणारा ) आहेस, तरी निमेषार्ध म्हणजे नेत्र मिटण्याचा जो स्वाभाविक व्यापार, तदुपलक्षित कालार्धप्रमाण तूं माध्यान्हकाळीं स्थिर असतोस अतएव त्या वेळेंत मी तुला वेधीन. हें भाषण सूर्यानें मान्य केलें, व पुनः असें म्हणाला—श्लोक.–ब्राह्मणेष्वार्जवं यच्च स्थैर्यं च धरणीतले ॥ सौम्यतां चैव सोमस्य गांभीर्यं वरुणस्य च ॥ ९ ॥ दीप्तिमग्नेः प्रभां मेरोः प्रतापं तपनस्य च । एतान्यतिक्रमेद्यो वै स हन्याच्छरणागतम् ॥ १० ॥ ( भार० अनु० अ० ९६). म्हणजे ब्राह्मणाच्या ठायीं जें आर्जव ( ऋजुत्व ) सरळपणा अ० प्रमाणिकपणा, पृथ्वीच्याठायीं स्थिरता, सोमाची सौम्यता, वरुणाची ( समुद्राची ) गंभीरता ( खोलपणा ), अग्नीची कांति, मेरूची प्रभा, तपन म्ह० सूर्य त्याचा प्रताप, इतक्यांचा अतिक्रम म्ह० अभावबुद्धीनें जो अनादर करतो, त्यास, शरणागतास मारल्याचें जें पातक आहे, तें पातक घडतें. इतकें बोलून सूर्य अंतर्धान पावला, व जमदग्नि स्वस्थ राहिला. सारांश, असा वैदिकसिद्धांत भारतांत वर्णन केला आहे म्हणून, पृथ्वी फिरणारी, व सूर्य स्थिर, असें कधींहि म्हणूं नये; कारण (अचिंत्याः खलु ये भावा न तांस्तर्केण साधयेत् ) असें ( भार० भीष्म० अ० ५ श्लोक १२) यांत आहे म्हणून ऋषींव्यतिरिक्त इतरांस चिंतन करण्यास अशक्य ज्या गोष्टी, त्या त्यांनीं तर्केंकरून कधींहि साधायास जाऊं नयेत. गेल्यास तसें करणें दोषयुक्त आहे.

आतां मेरूसभोंवता सूर्य फिरतो त्याविषयीं असें आढळतें:—

–श्लोक.–

मध्यगश्चामरावत्यां यदा भवति भास्करः ।
वैवस्वते संयमने उद्यन् सूर्यः प्रदृश्यते ॥
सुषायामर्धरात्रस्तु विभावर्यास्तमेति च ॥ २६ ॥
वैवस्वते संयमने मध्यान्हे तु रविर्यदा ॥
सुषायामथ वारुण्यामुत्तिष्ठन् स तु दृश्यते ॥ २७ ॥

इ०. यांतील भावः– भूमीवरील जी मानसोत्तर पर्वतस्थ इंद्राची मुख्य देवधानी संज्ञक अमरावती नगरी, तिच्या शिरोभागीं सूर्य फिरत फिरत आला असतां, तेथें मध्यान्ह होऊन, यमाच्या संयमिनी नगरींत सूर्योदय, वरुणाच्या सूषा नगरींत मध्यरात्र, व कुबेराच्या विभावरींत सूर्यास्त होतो. याचप्रमाणें संयमिनीवर सूर्य आला असतां देवधानींत अस्त, सूषा नगरींत उदय, आणि विभावरींत मध्यरात्र होत्ये. असाच क्रम पुढील नगऱ्यांतील उदयास्तादिकांचा समजावा ( मत्स्य० अ० १२३ ).

२–दनुपुत्र दानवांतील एक.

**सूर्यदत्त**–विराटराजाच्या भ्रात्यांतील एक (भार० विराट० अ० ३१ ). यास युद्धांत द्रोणाचार्यानें मारिलें.

**सूर्यध्वज**–द्रौपदीस्वयंवरांतील एक राजा ( भार० आदि० अ० १८६ ).

**सूर्यभानु**–रामसेनेंतील एक वानर.

**सूर्यभास**–अभिमन्यूनें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० द्रोण० अ० ४८ ).

**सूर्यवर्मा**–अर्जुनानें मारिलेला त्रिगर्त ( भार० अश्व० अ० ७४ ).

**सूर्यवर्चा**–मुनीना० कश्यपभार्येस झालेल्या देवगंधर्वांतील एक.

**सूर्यवंश**–सूर्याचा जो राजवंश तो. यांतील सर्व राजे आपआपल्या नांवाप्रमाणें त्या त्या वर्णक्रमांत आले आहेत.

**सूर्यवान्**–पर्वतवि०.

**सूर्यशत्रु**–लंकेंतील एक राक्षस.

**सूर्यात्म**–अथर्वणवेदोपनिषत्.

**सूर्यानन**–रामसेनेंतील वानर.

**सूर्याक्ष**– ,, ,,

**सूषा**–निम्लोचि म्ह० जी पश्चिमदिक्पाल वरुणाची नगरी तिलाच नामांतर.

**सूक्ष्म**–दनुपुत्र दानवांतलि एक.

**सृंगाल**–एक राजा ( भार० शांति० अ० ४ ).

**सृंजय**–उत्तम ना० जो तिसरा मनु, त्याच्या पुत्रांतील एक.

२–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न धूम्राक्षराजाचा पुत्र संयम त्यास नामांतर.

३–( सो० वं० ) अनुराजाचा पौत्र कालनर त्याचा पुत्र. याचा पुत्र जनमेजय.

४–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतान्वयसंभूत शूरराजाच्या दहा पुत्रांतील पांचवा. यास कंसभगिनी राष्ट्रपाली ती स्त्री होती, व वृष आणि दुर्मर्षण असे दोन पुत्र होते.

५–पांचाल म्हणून जे पांच भ्राते त्यांतलि संजय राजास नामांतर.

६–अंबा, अंबालिका, अंबिका, या तीन कन्यांचा मातामह होत्रवाहन राजा त्यास नामांतर.

७–शिबिदेशाचा राजा. याची स्त्री कैकेयी. नारद आणि पर्वत हे दोन ऋषि याचे मित्र असत. एकदां ते उभ–

यतां याजकडे येऊन म्हणूं लागले कीं, आमच्या मनांत तुझ्या गृहीं कांहीं कालपर्यंत राहावें असें आहे. तें ऐकून हा तथास्तु म्हणाला, व त्यांस एकांतस्थलाची योजना करुन देऊन आपली कन्या दमयंती त्यांच्या सेवेकडे दिली. तिला पाहून नारद म्हणाला, राजा, ही कोण आहे ? राजा म्हणाला, माझी कन्या असून वरार्थिनी ( वराची इच्छा करणारी अर्थात् उपवर परंतु अविवाहित )आहे. त्यावरुन नारदाच्या मनांत तीं आपणास स्त्री व्हावी असें आलें; परंतु ही मनांत आलेली गोष्ट त्यानें, उभयतांमध्यें जो नियम होता कीं, परस्परांच्या मनांत आलेलें परस्परांनीं परस्परांस सांगावें, त्याप्रमाणें नारदानें केलें नाहीं म्हणून, पर्वतानें त्यास शाप दिला कीं, तुझें मुख वानरासारिखें होईल.त्याचप्रमाणें पर्वतानें आपल्या मनांत ती कन्या वरावी असें आलेलें, लज्जेनें नारदास सांगितलें नसल्यामुळें, नारदानेंहि त्यास शाप दिला कीं, तुझें गमन इतःपर देवलोकांत होणार नाहीं. याप्रमाणें परस्पर शाप देऊन ते तेथें राहिले.कांहीं काळानें पर्वत ऋषि, पृथिवीसंचारार्थ गेला, व नारद विकृतमुख झालें असल्यामुळें तेथेंच राहिला.

पर्वतऋषि गेल्यावर दमयंतीनें विचार केला कीं, आपल्या पित्यास नारदानें आपणाविषयीं ही कोण असा केलेला प्रश्न, व त्यावरुन पित्यानें दिलेलें उत्तर यांचा निर्णय पाहतां, मी त्याची स्त्री व्हावें असा दिसतो, आणि तेंच कारण याचें विकृतमुख होण्यास कारण असावें असा माझा निश्चय होतो, त्या अर्थी हाच आपला पति होय, अशा भावानें तिनें त्याची इतकी उत्कृष्ट सेवा केली कीं, तिचें सत्व देवांनींहि पाहिलें असतां, त्यांत तीं ईषन्मात्र ढळली नाहीं. या गोष्टीस बरेच दिवस लोटल्यावर एके दिवशीं तिनें माझा विवाह नारदाशीं करावा असें मातेस कळविलें; मातेनें ती गोष्ट राजास ( आपल्या पतीस ) सांगितली. परंतु तो म्हणाला, विरुपमुख झालेल्यास ही कन्या मीं कशी द्यावी ? तसें करण्यांत लोक मला नांव ठेवितील, यास्तव मला तसें करतां येत नाहीं. त्यावरुन दमयंती निरुपाय जरी झाली, तरी तिनें आपली भावना यथापूर्व ठेवून त्याची सेवा चालविलीच.

या गोष्टीस बराच काळ लोटला असतां, पर्वत ऋषि पुनः फिरत फिरत तेथें आला, व नारदास त्यानें, तसेंच नारदानें त्यास, परस्पर शापमुक्त केलें, असें राजानें पाहून, कन्येच्या मनोदयानुरुप तिचा विवाह नारदाशीं केला ( भार० शांति० अ० ३०). ( देवीभा० षष्ठ० अ० २७ ). सुवर्णष्ठीवि म्हणून जो पुत्र, तो याच राजाचा होता ( सुवर्णष्ठीवि श० पहा).

**सृंजया**–सृंजय राजाची कन्या, व सात्वतपुत्र भजमान् त्याची ज्येष्ठ स्त्री.

**सृतंजय**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न जरासंधवंशीय कर्मजित् राजाचा पुत्र. याचा पुत्र विप्रराजा.

**सृष्टि**–उग्रसेन राजाच्या नऊ पुत्रांतील आठवा.

**सेक**–भारतवर्षीय देश. हा चर्मण्वतीनदीच्या दक्षिण तीरास आहे,व अपरसेक असाहि याचा आणखी एक भेद असल्याचें भारतांत लिहिलें आहे (भार० सभा० अ० ३१ ).

**सेतु**–( सो० वं० ) द्रुह्युपुत्र बभ्रुराजा त्याचा पुत्र. याचा पुत्र आरब्ध राजा.

२–लंकेस जाण्याकरितां, दाशरथि रामानें नल वानराकडून दहा योजनें रुंद, व शत योजनें लांब, असा करविलेला होता पाषाणमयमार्ग तो. हा समुद्राच्या तळापासून पाण्याच्या सपाटीच्या वरपर्यंत पाषाणांची भर भरुन केला नव्हता, तर तरत्या दगडांनीं केलेला होता म्हणून, समुद्रांत त्याची खूण अनुभवत नाहीं.

**सेदुक**–एक राजा ( १ वृषदर्भ श० पहा ).

**सैंद्रफेना**–भारतवर्षीय तीर्थ.

**सेन**–सोमवंशीय हेम राजास नामांतर.

**सेनजित्**–(सो०वं०) पूरुकुलोत्पन्न अजमीढपुत्र बृहदिषु तद्वंशीय विशद राजाचा पुत्र. यास रुचिराश्व, दृढहनु, काश्य आणि वत्स, असे चार पुत्र होते.

२–फाल्गुन मासींच्या सूर्यासमागमें असणारी अप्सरा ( १ तपस्य श० पहा ).

**सेनानि**–कार्तिकेयास नांव.

**सेनापति**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतलि एक.

**सेनाबिंदु**–भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजा (भार० द्रोण० अ० २३). यास कर्णानें मारिलें होतें. ( भार० कर्ण० अ० ४८ ).

२–देवप्रस्थ नगरचा अर्जुनानें दिग्विजयकाळीं जिंकलेला राजा ( भार० सभा० अ० २७ ).

**सेयन**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**सैतवाहिनी**–बाहुदा नदीस नामांतर.

**सैंधव**–सिंधु देशाच्या सर्व राजांस संज्ञा. परंतु जयद्रथाविषयीं विशेष प्रसिद्धि.

**सैंधवायन**–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

**सैंधवारण्य**–सिंधुदेशसंबंधीं अरण्य तें.

**सैन्य**–भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**सैरंध्रि**-द्वितीय कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**सैरंध्री**-अज्ञातवासकाळीं विराटगृहीं द्रौपदीनें धारण केलें होतें नांव तें ( कीचक श० पहा ).

**सैवल्क**-तृतीय वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**सैंहिकेय**-कश्यप ऋषीस सिंहिकेपासून झालेले राहु, सुचंद्र, चंद्रहर्ता आणि चंद्रप्रमर्दन, असे चार पुत्र ते.

२-विप्रचित्ति दानवापासून कश्यपकन्या सिंहिका हिरण्यकशिपु दैत्याची भगिनी, तिच्याठायीं झालेले व्यंस, कल्प, नल, वातापि, इल्वल, नमुचि, श्वसृप, अजन, नरक, कालनाभ, सरमाण, कालवीर्य, आणि विख्यात, असे तेरा पुत्र ते.

**सोम**-प्रथमार्थक वैश्रवण त्याचें मूळ नांव.

२-स्वायंभुव मन्वंतरांतील अत्रीचा पुत्र. हा चालू मन्वंतरापूर्वीचा सोममंडलाधिपति समजावा.

३-चालू मन्वंतरांतल्या धर्म ऋषीपासून वसुसंज्ञक भार्येच्या ठायीं झालेले जे वसु नांवाचे आठ देव त्यांतील एक. हा प्रस्तुत मन्वंतरांत सोममंडलाचा अधिपति आहे. **श्लोक.**- विवस्वानदितेः पुत्रः सूर्यो वैवस्वतेंतरे ॥ द्युतिमान् ऋषिपुत्रस्तु सोमो देवो वसुः स्मृतः ॥१७॥ ( लिंग० अ० ६१ ).

४-चालू मन्वंतरांतील अत्रिऋषीचा पुत्र. यापासून सोमवंशीय राजाची उत्पत्ति झाली होती. येथें शंका आहे ती अशी कीं, जर हा अत्रिपुत्र असून सोमवंशाचा मूळ पुरुष आहे, तर बुध हा पुत्र यासच झाला होता असें स्पष्ट दिसतें, आणि जर बुध याचा पुत्र आहे, तर तो रोहिणीपासून झाला हेंहि उघड आहे. रोहिणी तर प्राचेतसदक्षाच्या सत्तावीस कन्यांतील एक आहे. अर्थात् सत्ताविसांचा हाच पति झाला; कारण रोहिणीसहित सर्व कन्या दक्षानें एकासच दिल्या होत्या, याविषयीं प्रमाण आहे, म्हणून सोममंडलाधिपति हाच निःसंशय होता, आणि लिंगपुराणांतील वर लिहिलेल्या वाक्याप्रमाणें तर, सोममंडलाधिपति धर्मऋषीचा पुत्र सोम असें होतें, तेव्हां याविषयीं कसें ? तर मला असें वाटतें, चालू मन्वंतरांत प्रत्येक मासास सूर्यमंडलाधिपति जसा एकेक भिन्न भिन्न आदित्य भागवतावरून असतां, लिंगपुराणांत विवस्वान् ना० आदित्याचें मात्र एकट्याचेंच नांव प्रधान लिहिलें आहे, तसेंच उत्तरायण आणि दक्षिणायन क्रमानें हे दोन सोम, सोममंडलाचे क्रमानें अधिपति होत असतील, व तसा प्रकार असूनहि, लिंगपुराणांत अष्ट वसूंतील एक वसु प्रधान सांगितला असेल. आतां या गोष्टीस आधार जरी आज मला सांपडला नाहीं, तरी तो अन्य पुराणांत कोठें तरी असावाच, व असलाहि पाहिजे, याशिवाय व्यवस्था लागणार नाहीं. असो, या सोमास भद्रा आणि ज्योत्स्ना, अशा दोन कन्या होत्या; त्यांतून पहिली उतथ्य ऋषीची स्त्री असून, दुसरी वरुणपुत्र पुष्कराची स्त्री होती.

५-समुद्रमथनकाळीं त्यांतून निघालेला चंद्र तो. हा भूषणरूपानें महादेवाच्या मुकुटस्थानीं आहे.

६-उमेनें सहित असल्यामुळें शंकरास नांव आहे.

७-या नांवाची वल्ली, हिच्या रसाचें यज्ञप्रकरणांत प्रयोजन असतें.

**सोमक**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांचालवंशीय सहदेव राजाचा पुत्र, यास स्त्रिया शंभर असून, पुत्र जंतु अशा नांवाचा एकच होता. एकदां त्या जंतूस पिपीलिका ( मुंगी ) चावून तो इतका कासावीस झाला कीं, जसा काय आतां मरेलच. त्यावरून यास एकपुत्रिकाचें व निपुत्रिकाचें जिणें सारखेंच म्हणून बहुत शोक झाला. इतक्यांत तेथें समीप एक ब्राह्मण होता, त्यानें राजास असें सांगितलें कीं, जर तुला बहुत पुत्र असावेत अशी इच्छा असेल, तर या पुत्रास तूं पशु असें कल्पून मी सांगतों त्याप्रमाणें त्याचें अग्नींत हवन कर, म्हणजे त्यापासून जो धूम ( धूर )उत्पन्न होईल, तो तुझ्या शत स्त्रियांच्या घ्राणेंद्रियांत प्रवेशून त्या सर्वहि गर्भिणी होऊन शत पुत्रांस प्रसवतील. त्यावरून या राजानें तसें केलें, व त्यास शत पुत्र झाले. ते जंतु, पृषत, इ० नांवांनीं प्रसिद्ध होते. याच पृषताचा पुत्र द्रुपद राजा होता.

कांहीं काळानें हा राजा व तो ब्राह्मण दोघेहि कांहीं अंतरानें मरण पावून राजा स्वर्गास गेला, व ब्राह्मण नरकांत पडला. तें वर्तमान स्वर्गामध्यें या राजास कळतांच हा यमाकडे गेला, आणि विनंति करून म्हणाला, या ब्राह्मणास ज्या दोषानें ही अवस्था प्राप्त झाली आहे, तिला मुख्य निमित्त मी आहें, यास्तव याच्या वांटचा मी येथें यातना भोगितों, व याला आपण स्वर्गास पाठवावें. परंतु यम म्हणाला, ज्याचें पाप त्यानेंच भोगिलें पाहिजे असा जो नियम आहे, त्यास व्यत्यय येणार नाहीं. तथापि तूं सांसर्गिक पातकी मी आहें, असें कर्तृत्व आपल्याठायीं अहंतेनें वागवितोस, त्या अर्थी याच्या पातकाचा कांहीं भाग तुला भोगणें अवश्य असून युक्तहि आहे.

त्यावरून राजा स्वर्गास न जातां तेथेंच राहिला, व त्याकरितां आपण त्याच्या अर्ध्या यातना स्वतः सोसूं लागून, अर्ध्या त्याकडून भोगविल्यावर त्यास घेऊन सोमक हा स्वर्गास गेला ( भार० वन० अ० १२७-१२८ ).

२-भारती युद्धांतील पांडवपक्षीय राजसमुदाय.

३-कृष्णास कालिंदीपासून झालेल्या पुत्रांतील एक.

४-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय सुदास राजाचा पुत्र शतानीक, त्याचें नामांतर.

**सोमकल्प**-ब्रह्मदेवाच्या चालू मासांतील होऊन गेलेला एकोणिसावा दिवस अ० कल्प तो ( ४ कल्प श० पहा ).

**सोमकीर्ति**-धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक.

**सोमगिरि**-भारतवर्षीय सामान्य पर्वत.

**सोमतन्वि**-तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**सोमदत्त**-( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न कृशाश्वराजाचा पुत्र. याचा पुत्र सुमति.

२-( सू० वं० ) पूरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय कुरुपुत्र जन्हुराजा, तदन्वयसंभूत प्रतीपपुत्र जो बाल्हीक राजा त्याचा पुत्र. यास भूरिश्रवा, भूरि, शल आणि यूपकेतु असे चार पुत्र होते. यांत भूरिश्रव्याच्या उत्पत्तीचा इतिहास असा आहे.-पूर्वी वसुदेव आणि देवकी, या उभयतांचा विवाह झाला. त्या वेळेस शिनि ना० यादवाचें व याचें कांहीं कारणावरून युद्ध झालें. त्यांत शिनीनें याचे केंस धरून, यास भूमीवर पाडिलें व पादप्रक्षेप केला. तेणेंकरून यानें खिन्न होऊन रुद्राचें आराधन केलें, व शिनीची अशीच अवस्था करील असा पुत्र मागितला. त्याप्रमाणें वरदान होऊन, यास भूरिश्रवा पुत्र झाला. त्यानें शिनि मरण पावल्यामुळें असेल, त्याचा पौत्र सात्यकि, तो भारती युद्धांत त्याच्या झपाट्यांत आला असतां, त्यानें त्याची तशीच अवस्था केली ( भार० द्रोण० अ० १४४ ). पुढें सोमदत्त भारती युद्धांतच मरण पावला होता ( भार० द्रोण० अ० १६२ ).

**सोमदा**-उर्मिला ना० गंधर्वीची कन्या. ही चूलिसूनु ब्रह्मदत्त राजाची माता होती.

**सोमधेय**-भारतवर्षीय देश. हा पूर्वदिग्विजयकाळीं भीमानें जिंकला होता ( भार० सभा० अ० ३० ).

**सोमन्यूपायण**-चालू मन्वंतरांतील होऊन गेलेला तेविसावा व्यास ( व्यास श० पहा ).

**सोमप**-मानस ना० लोकांत रहाणार पितर. यांची मानसकन्या नर्मदा. हे भृगुकर्षाचे पुत्र असून, ब्राह्मणांस पूज्य आहेत.

**सोमपथ**-चंद्रलोकीं जाण्याच्या मार्गसंबंधीं लोक.

**सोमपान**-तीर्थवि०.

**सोमराजक**-गौतमांगिरसांतील एक कुल ( ३ अंगिरा श० पहा ).

**सोमवंश**-सोमवंशीय राजांचा वंश. यांतील नांवें वर्णक्रमानुरूप या ग्रंथांत आलीं आहेत.

**सोमवाह**-अगस्त्यकुलोत्पन्न ऋषि.

**सोमावित्**-एक राजा.

**सोमश्रवा**-श्रुतश्रवा ऋषीस नागिणीपासून झालेला पुत्र.

**सोमा**-एक अप्सरा.

**सोमापि**-( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न जरासंधपुत्र सहदेव, त्याच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.

**सोमोत्रायनि**-तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**सोमोद्भवा**-सोमपपितरांची कन्या म्हणून नर्मदेस नांव.

**सोहंजि**-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न हैहयवंशीय कुंतिराजाचा पुत्र. याचा पुत्र महिष्मान्.

**सौगंधिक**-हिमालयस्थ कैलासशिखराच्या ईशान्येकडील हिमालयाचेंच शिखरवि०.

२-कुबेराचें याच शिखरावरील वनवि०.

**सौचकि**-तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**सौचित्ति**-भारतीयुद्धांतील पांडवपक्षीय राजा ( भार० उद्योग० अ० १९६ ).

**सौजामि**-ऋषिवि०.

**सौति**-सूत पुराणिकाचा पुत्र उग्रश्रवा तो.

**सौदामिनी**-कश्यपापासून विनतेस झालेली कन्या.

**सौदास**-सुदासराजाचा पुत्र मित्रसह अ० कल्माषपादराजा तो.

**सौदेव**-सुदेवराजाचा पुत्र म्हणून दिवोदास राजास असें नांव होतें.

**सौद्युम्नि**-वैवस्वतमनूचा पुत्र जो इलराजा त्यास सुद्युम्न असें म्हणत, म्हणून त्याच्या पुत्रांस हें नांव असे.

२-युवनाश्वराजास नामांतर, यावरून हा कदाचित् सुद्युम्न ना० कोणी राजाचा पुत्र असावा.

**सौधिक**-तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**सौधृतेय**-सुधृतीचा पुत्र जो नरराजा तो. हा सूर्यवंशीय दिष्टकुलोत्पन्न नरराजा समजावा.

**सौपुरि**-तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**सौपुष्पि**-द्वितीयार्थक अत्रिकुलोत्पन्न ऋषि.

**सौबल**-सुबलराजाचा ज्येष्ठ पुत्र शकुनि तो.

**सौबुधि**–तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**सौभ**–शाल्वराजाचें अंतरिक्षांतील फिरतें विमानरूप नगर.

**सौभद्र**–वसुदेवास रथराजीपासून झालेल्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.

२–सुभद्रेचा पुत्र जो अभिमन्यु तो.

३–तीर्थवि० ( नारीतीर्थ श० पहा ).

**सौभपति**–शाल्व राजा.

**सौभरि**–एक ब्रह्मर्षि. यास एकदां अशी इच्छा झाली कीं विवाह करावा. म्हणून मांधाता राजाकडे जाऊन, त्यापाशीं यानें कन्येची याचना केली. परंतु हा वृद्ध असल्यामुळें राजानें सांगितलें कीं, आपण अंतःपुरांत जावें; व तेथें माझ्या कन्या आहेत, त्यांतून कोणी आपणास वरील तर पहावें. त्यावरून हा अंतपुरांत गेल्यावर स्वतपःसामर्थ्यानें दिव्य व तरुण असा देह धारण करून, त्यांच्या दृष्टीस पडून म्हणाला, या कन्यांत मला वरण्याची कोणाची इच्छा आहे काय ? त्यावरून सर्वच मी वरित्यें, मी वरित्यें म्हणूं लागल्या. तें वर्तमान राजास कळून त्यास आश्चर्य झालें. नंतर त्यानें सर्वहि कन्या यास विवाहविधीनें देतांच, हा सर्वांस घेऊन आपल्या आश्रमीं आला ( भाग० ९ स्कं० अ० ६). याचा आश्रम नर्मदेच्या तीरीं असून, युधिष्ठिराच्या अश्वमेधकाळीं, अश्वसंरक्षणार्थ त्यासमागमें अर्जुन असतां याची त्यास भेट झाली होती. त्यावेळेस यानें उद्दालक ऋषि, व त्याची स्त्री चंडी या उभयतांचा इतिहास सांगितला होता ( ३ अर्जुन श० पहा ).

**सौभाग्य**–ऋग्वेदोपनिषत्.

**सौमदत्ति**–सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा त्यास म्हणण्याची विशेष प्रवृत्ति ( भार० द्रोण० अ० १४२ ).

**सौमदेय**–सोमदा गंधर्वीचा पुत्र ब्रह्मदत्त तो.

**सौमनस**–पर्वतवि०.

**सौमनस्य**–प्रियव्रतपुत्र यज्ञबाहु त्याच्या सात पुत्रांतील दुसरा. याच्या वर्षास नांव हेंच आहे.

२–शाल्मलिद्वीपांतील दुसरा वर्ष.

**सौमित्रि**–सुमित्रेचे दोनहि पुत्र, परंतु लक्ष्मणाविषयीं विशेष प्रसिद्धि.

**सौम्य**–एक प्रकारचे पितर.

२–सोमपुत्र बुधास नांव.

३–युधिष्ठिराकडे मयसभा पाहण्यास आलेला एक ऋषि.

**सौर**–शुचि ना० अग्नीस नामांतर.

२–तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

३–सूर्यसंबंधीं जें सूक्त तें.

**सौरथ**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

२–सुरथाचा वंशज तो.

**सौरभेयी**–शापानें मगरी झालेली अप्सरा ( नारीतीर्थ श० पहा ).

**सौरि**–शनीस सूर्यपुत्र म्हणून संज्ञा.

२–तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**सौवर्ण**–भारतवर्षीय तीर्थ.

**सौवीर**–यवनांचा अधिपति एक राजा ( स्वतः यवन नव्हे ). यानें त्रिसंवत्सरात्मक एक यज्ञ केला होता. याचें अर्जुनाशीं कांहीं कारणानें युद्ध होऊन, त्यांत हा मरण पावला.

२–सिंधुदेशास लगत असणारा देश ( भाग० १ स्कं० अ० १० ). येथील नेत्रांजनाची मोठी प्रसिद्धि असे.

श्लोक—

सौवीरांजनमिदमेव चक्षुषोस्ते विन्यस्तं कनकशला-
कया मया यत् ॥ तन्नूनं मलिनमपि त्वदक्षिसंगाद्
ब्रह्मेंद्राद्यभिलषणीयतामियाय ॥ ( देवीमानसपूजा ).

**सौशल्य**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**सौश्रुति**–अर्जुनानें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा (भार० कर्ण० अ० २७ ).

**सौसुक**–विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**सौहसोक्ति**–तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**स्कंद**–कार्तिकेय.

२–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

**स्कंदस**–तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**स्तनकुंड**–गौरीशिखरावरील भारतवर्षीय तीर्थ.

**स्तनयित्नु**–विद्योताचा पुत्र.

**स्तनित**–तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**स्तंब**–श्यामपराशरकुलोत्पन्न ऋषि.

**स्तंभ**–स्वारोचिष मन्वंतरांतल्या सप्तर्षींत होऊन गेलेला ऋषि तो.

**स्तुति**–ऋषभदेववंशीय प्रतीह राजाच्या तीन पुत्रांतील पहिला प्रतिहर्ता, त्याची स्त्री अज आणि भूमा या दोन पुत्रांची माता.

**स्तुत्यव्रत**–प्रियव्रतपुत्र हिरण्यरेता, त्याच्या सात पुत्रांतील पांचवा. याच्या वर्षाचें नांव हेंच.

२–कुशद्वीपांतील पांचवा वर्ष.

**स्त्रीराज्यदेश**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ). अर्जुन श्यामकर्ण अश्वामागें त्याचें रक्षण करीत जात असतां, या देशांत अश्व गेला, व तो तेथील राणी प्रमीला तिनें धरिला. यावरून पांडवांच्या वेळेस येथें प्रमीला राणी होती.

**स्थंडिलेयु**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्व राजापासून घृताची अप्सरेस झालेल्या १० पुत्रांतील तिसरा.

**स्थल**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशान्वयवंशीय बल राजाचा पुत्र. याचा पुत्र वज्र अ० वज्रनाभ.

**स्थलपिंड**–तृतीय भृगुकुलोत्पन्न ऋषि.

**स्थाणु**–ब्रह्ममानसपुत्र एक प्रजापति. यानें प्रजा जरामरणरहित निर्मिल्या, त्यामुळें सृष्टि अतिशय वाढली, व पृथिवीवर राहण्यास स्थळहि पुढें मिळेल न मिळेल अशी विवंचना ब्रह्मदेवास पडून त्यानें यास सृष्टिकर्मापासून विराम पावण्यास सांगितलें. त्यावरून हा त्यापासून स्तब्ध होऊन थांबला म्हणून यास हें नांव पडलें.

२–ज्यास चलन नाहीं असा जो परमात्मा शिव तो.

**स्थाणुमती**–भारतवर्षीय नदी.

**स्थानेश्वर**– तीर्थ व क्षेत्रवि०.

**स्थापत्य**–अथर्वण वेदाचा उपवेद. यांत शिल्पविद्या इ० विषय आहेत.

**स्थूण**–विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

२–स्थूणाकर्ण शब्द पहा.

**स्थूणकर्ण**–पांडवांसमागमें द्वैतवनांत कांहीं काळ होता ऋषि तो.

**स्थूणाकर्ण**–शिखंडीस ज्यानें पुरुषत्व दिलें होतें तो यक्ष ( शिखंडी श० पहा ).

**स्थूलकेश**–प्रमद्वरा ना० कन्येचें पालन करणारा ऋषि.

**स्थूलगिरा**–एक ऋषि.

**स्थूलशिरा**–विश्वावसु गंधर्वास ज्यानें तूं कबंध ना० राक्षस होशील असा शाप दिला होता, तो ऋषि. ( भार० वन० अ० १३५ ). ( वा० रा० अर० स० ७१ ).

**स्थूलाक्ष**–एक ऋषि.

२–दूषण राक्षसाच्या चार अमात्यांतील एक ( वा० रा० अर० स० २३ ).

**स्नातप**–द्वितीय कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**स्फूर्ज**–एक राक्षस ( सहस्य श० पहा).

**स्मय**–वसिष्ठाच्या प्रजापतिपुत्रांतील एक.

**स्मर**-मदन. याचा नाश करण्यानें महादेवास स्मरहर, कामांतक, इ० अनेक नांवें आहेत.

२–मरीचिऋषीस ऊर्णेपासून झालेल्या ६ पुत्रांतील पहिला ( १ ऊर्णा श० पहा ).

**स्मृति**–स्वायंभुवमन्वंतरांतील धर्मऋषीस मेधेपासून झालेला पुत्र.

२–चालू मन्वंतरांतील अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

३–श्रुतींचें स्मरण करून जे मन्वादिकांनीं ग्रंथ लिहिले त्यांस नांव.

**स्यंदिका**–भारतवर्षीय नदी.

**स्यमंतकमणि**–यदुकुलोत्पन्न सत्राजित् राजास, सूर्यप्रसादेंकरून प्राप्त झालेला जो मणि तो. हा ज्या स्थळीं असेल, तेथें दुर्भिक्ष, रोग, इ० नसावेत, व प्रत्यहीं आठ भार सुवर्ण यानें प्रसवावें, असे याच्या अंगीं गुण होते. परंतु चांगल्या वस्तु पाळणारास त्यावर, अनेकांची दृष्टि असल्यामुळें अतिशय भय असतें, म्हणून ही गोष्ट स्वाभाविकच यापाशीं होती. " दिने दिने स्वर्णभारानष्टौ स सृजति प्रभो" ( भाग० १० स्कं० अ० ५६ श्लोक ११ ). भार म्हणजे आठ सहस्र तोळे असें समजावें, म्हणून या मण्यापासून सत्राजित्राजास प्रत्यहीं आठ भार ६४,००० चौसष्ट सहस्र तोळे सुवर्ण नित्य प्राप्त होत असे.

एके काळीं हा मणि कंठांत धारण करून, सत्राजित्राजा द्वारकेस आला असतां, त्याच्या तेजानें सर्व यादव आश्चर्य पावून कृष्णास पुसूं लागले कीं, हा कोण आहे ? कृष्ण, सत्राजित् राजा होय इतकें उत्तर देत आहे तों, तो सभेंत येऊन पोहोंचला. त्याचें आगतस्वागत कृष्णानें करून बसविल्यावर, मण्याविषयींचा वृत्तांत त्यास पुसला. तो त्यानें सांगितल्यावर प्रयत्नेंकरून त्याच्या साध्य वस्तूविषयीं कृष्णानें त्यास मुळींच कांहीं म्हणूं नये असें योग्य असतां, तो त्यास इतकेंच म्हणाला कीं, हा मणि उग्रसेनाजवळ राहणें योग्य आहे; कारण प्रस्तुत सर्व यादवांवर तोच प्रमुख आहे. हें कृष्णाचें भाषण सत्राजितास चांगलें न वाटतां, आला होता तसाच तो उठून आपल्या स्थळास निघून गेला.

या गोष्टीस बरेच दिवस लोटल्यावर, सत्राजिताचा भ्राता प्रसेन, तो हा मणि कंठांत धारण करून मृगयेस गेला असतां एका सिंहामागें लागून त्याच्या गुहेसमीप गेला. इतक्यांत त्यानें एकाएकीं उलटून प्रसेनास ठार मारिलें, व स्वस्थ उभा आहे तों, जांबवान् तेथें एकाएकीं प्राप्त झाला. त्यानें त्या मण्याचें अपूर्व तेज पाहून, तत्काळ सिंहास मारिलें, व मणि घेऊन तो आपल्या गुहेंत प्रवेशला. इकडे प्रसेन अस्तमानीं घरीं न आल्यामुळें सत्राजित् चिंताग्रस्त होऊन, त्यानें त्याच्या शोधास चोहोंकडे दूत पाठविले; परंतु तो अरण्यांत मरण पावला होता म्हणून, त्यांस

त्याचा शोध न लागतां ते सर्व माघारे आले. तेणें-करून माझ्या भावास नाहींसा करून कृष्णानेंच मणि नेला असावा असा संशय सत्राजितास आला.

ही गोष्ट फुटून येत येत कृष्णाच्या कानावर येऊन त्यास वाईट वाटलें, व हें नसतें अपयश आपणावर आलेलें काढून टाकण्याविषयींचा तो उपाय शोधूं लागला. तों त्यास असें स्फुरलें कीं, प्रसेन अरण्यांत जाऊन ज्या अर्थी नाहींसा झाला आहे, त्या अर्थी अरण्यांचाच चांगल्या रीतीनें शोध केला पाहिजे. असें म्हणून तो कित्येक यादवांस समागमें घेऊन अरण्येंच शोधीत चालला. जातां जातां एका अरण्यांत अश्वासहित मरण पावून पडलेला प्रसेन, एकाएकीं त्याच्या दृष्टीस पडला.परंतु त्याजवळ मणि नाहीं. नंतर यास कोणीं मारिलें असावें ? असें म्हणून आसमंतात् पाहात आहे तों, एक सिंह मरून पडलेला त्यानें पाहिला. तेथेंहि मणि नसून, आणखी कोणाचीं पावलें उमटलेलीं समीप आहेत, त्यावरून तर्क केला कीं, प्रसेनास सिंहानें, व सिंहास तिसऱ्यानेंच कोणी मारून मणि नेला यांत संशय नाहीं; म्हणून त्या पावलांच्या धोरणानें जाऊं लागला. जातां जातां तीं पावलें एका गुहेपर्यंत गेलेलीं त्यानें पाहिलीं. त्यावरून सर्व याद-वांस गुहेच्या द्वारासमीप बसवून, आपण एकटाच तींत प्रवेशला. ती गुहा आंत बऱ्याच लांबीची होती, तीमुळें त्यास जाण्यास वेळ लागून शेवटीं आंत एक विस्तीर्ण मंदीर त्याच्या दृष्टीस पडलें. मग त्या मंदि-रांत निर्भयपणें प्रवेशून पाहूं लागला तों तें मंदिर ऋ-क्षाचें असून, पूर्वी पाहिलेला मणि, एका ऋक्षाशि-शूच्या पाळण्यावर टांगलेला त्यानें पाहिला. सारांश, तेथें असलेल्या ऋक्षांत कृष्ण आल्यामुळें हा कोण आला अशी गलबल होऊन जांबवान् बाहेर आला. त्याच्या प्रौढपणावरून कृष्णानें त्यास म्हटलें कीं, आमच्या घरचा हा मणि तुमच्या घरीं आला आहे, तर तो आमचा आम्हास परत द्यावा. परंतु तें कृष्णाचें म्हणणें जांबवान् ऐकेना; त्यामुळें त्याशीं कृष्णाचें अठ्ठावीस दिवसपर्यंत बाहुयुद्ध झालें. त्यांत जांबवान् थकून म्हणाला कीं, आतां युद्ध पुरें. ही एक माझी कन्या जांबवती मी तुला भार्यार्थ देतों, ती व हा मणि घेऊन स्वस्थळास जा. त्यावरून कृष्ण तथास्तु म्हणून त्यानें जांबवती विवाहविधीनें वरिली, आणि मण्या-सहवर्तमान तिला घेऊन, तो गुहाद्वाराशीं यादवांस बसविलें होतें तेथें आला ( हा जांबवान् रामाच्या वेळचा असें म्हणतात ).

इकडे द्वारापाशीं बसलेल्या यादवांनीं तेथें बसून कृष्णाची मार्गप्रतिक्षा बारा दिवस केली, व तो येईल तेव्हां येवो, आपण किती दिवस बसावें असें म्हणून त्यांनीं द्वारकेस गमन केलें, त्यामुळें त्यास तेथें कोणीच यादव भेटला नाहीं. म्हणून कृष्ण तेथून त्वरेनें निघून द्वारकेस आला. आणि त्यानें सभा करून सत्राजितास, आपण एकवार द्वारकेस येऊन जावें. शंका मनांत आणूं नये असा निरोप पाठविला. त्यावरून तो सभेस आला असतां, कृष्णानें प्रसेनाची अवस्था व मण्याची झालेली व्यवस्था इ० वृत्त त्यास सांगून मणि त्याच्या स्वाधीन केला. त्यावरून सत्राजितानें तो मणि घेतला, परंतु त्यास तो घेण्यास अतिशय लज्जा झाली; तथापि घेऊन घरीं आला, आणि प्रसेनाचें और्ध्व-देहिक झाल्यावर, त्यानें मनांत आणिलें कीं, कृष्णास आपली कन्या सत्यभामा देऊन हाच मणि त्यास अर्पण करावा, व त्याशीं सख्य जोडावें. आणि हें मनांत आणिल्याप्रमाणें त्यानें लागलीच सिद्धता करून कृष्णाशीं पूर्ववत् सख्य केलें ( क्षत्रियांमध्यें एका कुलांतील जरी राजे असले, तरी त्यांच्यांत पुरोहित भिन्न झाल्यानें ते परस्परांशीं विवाह करितात असें समजावें ).

नंतर कृष्णानें तो मणि सत्यभामेजवळ ठेविला असतां थोड्याच दिवसांत हस्तिनापुराहून असें वर्तमान आलें कीं, कुंतीसहवर्तमान पांडव लाक्षागृहांत दग्ध झाले; त्यावरून सत्यभामेस कृष्णानें सत्राजिताच्या घरीं पोहोंचविलें, आणि आपण बलरामासहित मोठ्या त्वरेनें निघून हस्तिनापुरास गेला. तों इकडे त्याच्या मागें द्वारकेंत वर्तमान झालें तें असें. अक्रूर आणि कृतवर्मा हे दोघे शतधन्वा ना० कोणीएका यादवाकडे येऊन ( हा शतधन्वा कृतवर्म्याचा भ्राता नव्हे, दुसराच ) त्यास म्हणाले कीं, सत्राजितानें आम्हास सत्यभामा देण्याचा विचार केला असतां, ती त्यानें कृष्णास दिली, तेव्हां ती तर आतां आम्हास मिळणेंच नाहीं, परंतु मणि कृष्णाकडे गेलेला आम्हास मिळावा अशी इच्छा आहे; यास्तव असें कर कीं, प्रस्तुत मणि सत्यभामेजवळ असून, ती त्यासहित सत्राजिताच्या घरीं आहे, तर तूं तेथें जाऊन मणि आणून आम्हास देशील तर पहा. त्यावरून त्यानें कांहीं विचार करावा तो न करितां, तत्काळ तो युक्तीनेंच सत्राजिताकडे गेला, आणि त्यास निजल्या जागीं ठार मारून मणि घेऊन आला.

पित्याची अवस्था सत्यभामेनें पाहून, व मणिहि गेला असें जाणून, शोकाकुलित होत्साती द्वारकेहून जी निघाली, ती हस्तिनापुरास कृष्णाकडे आली. कृष्ण, पांडवांचा ठिकाण लागून व ते सुरक्षित आहेत असें विदुराच्या मुखानें ऐकून, नुकताच स्वस्थ झाला होता, तों सत्यभामा तेथें जाऊन पोहोंचली. त्यावरून कृष्णानें येण्याचें कारण विचारितां तिनें झालेलें वर्तमान त्यास सांगितलें. त्यावरून कृष्ण आणि बलराम तिला घेऊन द्वारकेकडे येण्यास निघाले, व त्वरेनें मार्गाचें अतिक्रमण करून द्वारकेस येऊन पोहोंचतात तों शतधन्व्यानें अक्रूराच्या स्वाधीन मणि करून द्वारकेंतून पलायन केलें. हें वर्तमान कृष्णबलरामास कळून ते दोघेहि त्याच्या पाठीस लागले. शतधन्वा वांकडा तिकडा जो पळत सुटला तो आनर्त देशाहून विदेहदेशास गेला. इतका दूर पळाला, तरी कृष्ण बलराम या उभयतांनीं त्याची पाठ सोडिलीच नाहीं, त्यामुळें व मिथिलेसमीपच्या उपवनासमीप त्याचा अश्व उरीं भरून मरण पावल्यामुळें, कृष्णानें व बलरामानें त्यास गांठिलें, व क्रोधानें आधीं त्याचा शिरच्छेद करून मग मणि पाहूं लागले तों त्याजवळ मणि नाहीं.त्यावरून दोघांसहि आश्चर्य होऊन, बलराम कृष्णास म्हणाला, यानें मणि दुसऱ्या कोणाजवळ तरी निःसंशय ठेविला आहे, तर तूं द्वारकेस जा, आणि याचा सूक्ष्म दृष्टीनें शोध कर, तोंपर्यंत मी जनक राजास भेटून येतों. इतकें बोलून कृष्ण द्वारकेकडे निघतांच, बलराम जनक राजाकडे गेला. तेथें बलराम असतां, दुर्योधनानें तेथें येऊन त्यापासून गदायुद्धाचीं शिक्षा घेतली ).

शतधन्व्यास मारून कृष्ण द्वारकेस येतो तों अक्रूर द्वारकेंतून पळून काशीस गेला, व तेथें त्यानें सहस्रावधि मोठमोठालीं कामें केलीं, त्यांत एक घाट जो बांधला आहे, त्यास अक्रूरघाट असें नांव अजून चालत आहे. सारांश, कृष्ण द्वारकेस आला आणि मण्याचा शोध करूं लागला, तों त्यास कळलें कीं, मी येण्यापूर्वीच येथून अक्रूर पळाला आहे. त्यावरून कृष्णानें अनुमान केलें कीं, मणि खचित अक्रुराजवळ आहे. परंतु तो पळून गेला कोणीकडे, त्याचा शोध काढतां, तो काशीमध्यें असल्याचें कृष्णास समजलें. नंतर कृष्णानें त्याकडे सामोपचारानें निरोप धाडिला कीं, तूं भीति न धरितां द्वारकेस ये, आणि सर्व यादवांस तुजजवळ असलेला मणि दाखीव, म्हणजे झालें. कारण शतधन्व्यास मारून मी मणि आणिला असा सर्वांस संशय आहे, तो त्यांचा गेला पाहिजे. त्यावरून अक्रूर द्वारकेस आला, व त्यानें आपणाजवळ असलेला मणि सर्वांस दाखविला. तेणेंकरून यादव निःसंशय झाले. नंतर कृष्णानें जरी पुनः मणि अक्रूराजवळ दिला, तरी त्यापासून उत्पन्न होणारें सुवर्ण, प्रयासावांचून कृष्णासच प्राप्त होऊं लागलें ( भाग० १० स्कं० अ० ५६-५७ ).

**स्यमंतपंचक**-परशुरामानें क्षत्रियांस मारून त्यांच्या रक्तानें भरिलेले जे पांच डोह त्यांस नांव. हे रामऱ्हद या नांवानें प्रसिद्ध असून ऋचीकादिक पितरांच्या आशीर्वादानें जलरूप झाले ( भार० वन० अ० २ ). यासमीपच कांहीं अंतरावर कौरवपांडवांचें युद्ध झालें ( भार० वन० अ० ८३ श्लोक २७).

**स्यूमरश्मि**-कपिलाच्या प्रसादानें ब्रह्मतत्त्वसंपन्न झालेला ऋषि ( भार० शांति० अ० २६८-२६९ ).

**स्रष्टा**-ब्रह्मदेव.

**स्वधा**-स्वायंभुव मन्वंतरांतील दक्षप्रजापतीच्या सोळा कन्यांतील एक. ही त्यानें पितरांस दिली असून, ती त्यांस कव्य पोहोंचविणारी आहे. वयुना आणि धरिणी त्या दोन हिच्याच कन्या होत.

**स्वधामा**-रुद्रसावर्णि मन्वंतरांत होईल विष्णूचा अवतार तो.

**स्वयंप्रभा**-हेमा ना० अप्सरेची सखी. हेमेस मयासुरानें एक स्थळ निर्माण करून तेथें ठेविलें, व तिशीं रममाण झाला. पुढें इंद्रानें मयासुरास तेथून हांकून लाविलें, व हेमा तीहि स्वर्गास गेली. तेव्हां तिनें हें स्थळ या स्वयंप्रभेस दिलें. ही तेथें बराच काळ राहात होती. पुढें अंगदादिक वानर सीताशुद्धीसाठीं लंकेस चालले असतां, हिची व त्यांची भेट होऊन, हिनें त्यांचा सत्कार केला, व नेत्र मिटण्यास सांगून त्यांस समुद्रतीरीं पोहोंचवितांच, आपणहि रामाचें दर्शन घेऊन स्वर्गास गेली ( वा० रा० किष्किं० स० ५०-५२ ).

**स्वयंभू**-ब्रह्मदेव, विष्णु, आणि शिव, या तिघांसहि म्हटलेलें आहे. तथापि ब्रह्मदेवाविषयीं विशेष प्रसिद्धि. २-चालू मन्वंतराच्या प्रथम पर्ययांतील व्यास ( व्यास श० पहा ). यानें वेदाचे ऋगादिक चार भेद असलेले पैल, वैशंपायन, जैमिनि, आणि सुमंतु, या चौघांस क्रमेंकरून पढविले होते. याज्ञवल्क्यापासून यजुर्वेदाची शाखा परत घेऊन तित्तिरि ऋषीस दि-

त्याची झालेली खटपट, वर लिहिलेल्या व्यासशिष्य वैशंपायनाच्या वेळेस झाली होती.

**स्वयंभोज**-( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतवंशीय शिनींचा पौत्र वृष्णि, तदन्वयसंभूत शिनी राजाचा पुत्र. यास हृदिक नांवाचा पुत्र होता.

**स्वरस**-शाल्मली द्वीपांतील पर्वत.

**स्वराष्ट्रदेश**-भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९).

**स्वरूप**-वरुणलोकांतील एक असुर.

**स्वर्ग**-पृथिवीच्या ऊर्ध्वभागीं जे सप्तलोक आहेत, त्यांतील तिसरा.

२-चालू मन्वंतरांतील धर्म ऋषीस यामी ना० भार्येपासून झालेला पुत्र. याचा पुत्र नंदी.

**स्वर्णप्रस्थ**-जंबुद्वीपाच्या आसमंतात् असणाऱ्या आठ उपद्वीपांतील एक.

**स्वर्णरोमा**-( विदे० वं० ) महारोमा ना० जनकाचा पुत्र. याचा पुत्र ऱ्हस्वरोमा जनक.

**स्वर्धुनी**-आकाशांतून मेरुपर्वतावर आलेली नदी. ही अलकनंदा, सीता, भद्रा, आणि चक्षु अशा चार प्रवाहांनीं चहूं दिशांस वाहात गेलेली आहे. यांमध्यें अलकनंदा ना० प्रवाह आपण राहतों या अंगाकडे वाहात आहे, व तो सप्तर्षींच्या संतोषार्थ सप्तप्रवाहरूप झालेला आहे. त्यांचीं नांवें वस्वौकसारा, नलिनी, सरस्वती, सीता, सिंधु, सुचक्षु, अ० जंबुनदी, आणि गंगा, यांतील गंगेसच पुढें भागीरथी, जान्हवी, इ० नांवें पडलीं, असें समजावें ( भार० भीष्म० अ० ६ ). या प्रवाहांचा पुराणांतून व भारतांत भारी घोंटाळा आहे; परंतु मीं येथें बहुमतानें त्याची नीट व्यवस्था लाविली आहे.

**स्वन्ह**-तुषितसंज्ञक देवांतील एक ( तुषित श० पहा ).

**स्वर्भानु**-दनुपुत्र दानवांतील एक. यास राहु असेंहि क्वचित् म्हटलेलें आहे. हा देवांचें रूप धारण करून, सूर्य आणि चंद्र यांच्यामध्यें मोहिनीरूपानें विष्णु देवमंडळीस अमृत वाटीत असतां बसला होता. तें कपट विष्णूनें जाणून आपल्या चक्रानें याचें मस्तक उडविलें; परंतु याच्या पोटांत अमृत गेल्यामुळें हा केवळ मरण न पावतां, शिर आणि कबंध ( धड ) यांस राहु आणि केतु अशीं नांवें पावून ग्रहांत गणिला गेला. ही गोष्ट जरी चाक्षुष मन्वंतरांत झाली होती, तरी राहु आणि केतु यांचीं मंडळें अनादिसिद्ध असल्यामुळें ग्रहणें होण्यास विरोध नाहीं.

२-कृष्णापासून कालिंदीस झालेला पुत्र.

**स्वर्वीथी**-उत्तानपादवंशीय ध्रुवपुत्र वत्सर त्याची ही स्त्री. हिला पुष्पार्ण इ० साहा पुत्र होते.

**स्वश्रव**-तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**स्वसृप**-कौशिकऋषीच्या सात पुत्रांतील एक ( पितृवर्ति श० पहा ).

**स्वस्ति**-एक ऋषि.

**स्वस्तिकर**-तृतीय वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**स्वस्तितर**-तृतीय अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**स्वस्त्यात्रेय**-अत्रिवंशज ऋषि.

**स्वस्थली**-तृतीय वसिष्ठकुलोत्पन्न ऋषि.

**स्वक्ष**-भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**स्वाती**-सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

**स्वादूदक**-सप्तमहासागरांतील सातवा ( १ शुद्धोद श० पहा ).

**स्वांभःसेतु**-हा अग्नि उदक उत्पन्न करणारा आहे, व यज्ञामध्यें सोमरसाचें जें हवन करितात तें हाच घेणारा आहे.

**स्वायंभूमनु**-स्वयंभू जो ब्रह्मदेव त्याच्या दक्षिणांगापासून निर्माण झालेला पुरुष. हा चतुर्दश मनूंतील पहिला मनु असून ब्रह्मदेवाच्याच वामांगापासून उत्पन्न झालेली **शतरूपा** ना० कन्या, ती याची स्त्री होती. तिला कोठें कोठें सरस्वती व अनंती असेंहि म्हटलेलें आहे. या मनूस **प्रियव्रत**, आणि उत्तानपाद, असे दोन पुत्र, व **आकूती, देवहूती,** आणि प्रसूती, अशा तीन कन्या होत्या. त्यांत आकूती यानें **रुचि**ऋषीस, देवहूती **कर्दम**प्रजापतीस, व प्रसूती **दक्ष**प्रजापतीस, अशा अनुक्रमानें दिल्या होत्या; तथापि रुचिऋषीस दिलेली आकूती पुत्रिकाधर्मानें दिली होती म्हणून, तिला झालेलें यज्ञ आणि दक्षिणा हे मिथुन, त्यांतील यज्ञास या मनूनें आपल्यास पुत्रत्वें ग्रहण करून दक्षिणा कन्या तीच रुचि ऋषीकडून कन्यादानविधानानें घेऊन त्याची स्त्री केली होती.

या मनूच्या कालसत्तेस स्वायंभुवमन्वंतर असें नांव असून, याच्या मन्वंतरांत त्या वेळचे ब्रह्ममानसपुत्र मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु. आणि भृगु, हे धर्मोपदेष्टे सप्तर्षि होते. पुत्रिकाधर्मानें रुचि ऋषीपासून घेतलेला यज्ञ ना० पुत्र तो स्वर्गांत इंद्र होता, व त्याची स्त्री दक्षिणा ती इंद्राणी असून, त्यांपासून झालेले तोष, प्रतोष, इ० बारा तुषितसंज्ञक पुत्र, ते स्वर्गांत देव होते ( तुषिता नाम ते देवा आसन् स्वायंभुवेंतरे ). ( तुषित श० पहा ).

( भाग० ८ स्कं० अ० १३ ). ( मत्स्य० अ० ९ ). या मन्वंतरांत इंद्रास साह्य करणारा अवतार पृथक् झाला नव्हता.

**स्वायष्ट्र**–श्वेतपराशरकुलोत्पन्न ऋषि.

**स्वारोचिषमनु**–स्वायंभूमनूची कालसत्ता म्हणजे पहिलें मन्वंतर सरल्यावर, दुसरा झालेला हा मनु. हा अग्नीपासून स्वाहा ना० स्त्रीस झालेल्या चार पुत्रांतील कनिष्ठ होता. यास नभ, नभस्य, प्रसृति आणि भानु, असे चार पुत्र द्युतिमान्, सुषेण रोचिष्मान् , इ० नामांतरांनीं झाले होते, व याच्या मन्वंतरांत दत्त, निश्चवन, स्तंभ, प्राण, कश्यप, और्व, आणि बृहस्पति हे धर्मोपदेष्टे सप्तर्षि असून, हवींद्र, सुकृत, मूर्ति, आप, ज्योति, अय आणि स्मय, हे सात वसिष्ठपुत्र प्रजापति होते. स्वर्गामध्यें पूर्व मन्वंतरांतलेच तुषित नांवाचे देव असून, त्यांचा स्वामी मात्र रोचन नांवाचा इंद्र होता. तसाच वेदशिरा ऋषीपासून तुषिता स्त्रीच्याठायीं झालेला विभु ना० विष्णूचा अवतार, तो त्या इंद्रास साह्य करणारा होता ( भाग० ८ स्कं० अ० १३ ). ( मत्स्य० अ० ९ ).

**स्वाहा**–स्वायंभुवमन्वंतरांतील दक्षप्रजापतीच्या सोळा कन्यांतील चौदावी. ही त्यानें अग्नीस दिली होती. ही देवांस हविर्भाग पोहोंचविणारी देवता असून,हिला पावक, पवमान्, शुचि, व स्वारोचिष, असे चार पुत्र होते. यांत पहिले तिघे अग्निवंशांत गणनीय असून, चौथा दुसरा मनु झाला होता.

२–चालू मन्वंतरांतील बृहस्पतीपासून तारेस झालेली कन्या. हीच वैश्वानर ना० वैश्वदेवसंबंधीं अग्निदेवता, त्याची स्त्री असेल असें वाटतें. हिला काम, अमोघ आणि उक्थ, असे तीन पुत्र होते.

**स्विष्टकृत्**–चालू मन्वं० बृहस्पतीपासून तारेस झालेल्या साहा पुत्रांतील एक.

---

## ह

**हनुमंत**–हनुमान् शब्द पहा.

**हनुमान्**–केसरी वानरापासून, त्याची स्त्री अंजना तिला झालेला पुत्र. हा मरुत् म्हणजे वायु, त्याच्या प्रसादेंकरून झाला होता म्हणून, यास मारुति हें नांव अति प्रसिद्ध व मूळचें आहे. हनुमान् हें पुढें पडलें, त्याविषयीं इतिहास असा आढळतो.—हा ज्या काळीं जन्मला, त्या काळीं तीनिशें योजनें उडाला, व फल अशा बुद्धीनें तेथून सूर्यमंडळाकडे चालला, असें पाहून इंद्रानें याच्यावर वज्र टाकिलें. तेणेंकरून याचा वाम हनु भग्न होऊन भूमीवर पडला. तें पाहून वायु रुष्ट झाला, त्यामुळें इंद्रादिदेवांनीं त्याची स्तुति करून यास सावध केलें, आणि वर दिला कीं, इतःपर माझ्या वज्रापासून याला भीति व पीडा होणार नाहीं. असें बोलून इंद्र गेला असतां, वायूनें यास आणून अंजनेच्या स्वाधीन केलें, आणि तेव्हांपासून यास हनुमान् असें नांव पडलें ( वा० रा० किष्किं० स० ६६ ).

हनुमान् मोठा झाल्यावर अत्यंत पराक्रमी निवडला. त्यावरून सुग्रीवाशीं त्याचें अत्यंत सख्य जडलें. त्यामुळें हा मग नेहेमीं त्यासमीपच राहूं लागला.याची गणना सुग्रीवाच्या सचिवांत वरिष्ठ कोटींत होती; कारण हा बलवान् असून मोठा बुद्धिमान् आणि अतिशय प्रामाणिक असे.

मारुति सुग्रीवासमीप ऋष्यमूक पर्वतावर असतां, रामलक्ष्मण उभयतां भ्राते सीतेचा शोध करीत फिरत फिरत पंपा सरोवरावर आले; त्यांस सुग्रीवानें पाहिल्यावरून, भय पावून ते कोण ? व इकडे काय हेतूनें आले आहेत ? त्याविषयींचा शोध करण्यासाठीं त्यांकडेस मारुतीस पाठविलें. तेव्हां मारुति बटुवेषानें त्यासमीप गेला, आणि त्यांस पुसूं लागला. तें असें.— आपण दोघे कोण आहां ? मला असें वाटतें, आपण सूर्यचंद्रच पृथिवीवर या रूपानें संचार करीत आहां; कारण आपलीं तेजें दिव्य दिसतात, राजचिन्हें तर तुमच्या अंगीं स्पष्ट असून त्रैलोक्यरक्षणाविषयीं आपण समर्थ आहां, असें तुमचीं शस्त्रास्त्रें सतेज असल्यावरून दिसून येतें. असे सुचिन्ह व समर्थ असून आपल्या शरीरावर अलंकार असणें योग्य असून ते कां नाहींत ? बरें, तापसवेषास्तव अलंकार नसल्यास तो तरी आपणास धरण्याचें कारण काय ? मी इतकें विचारीत असतां आपण मशीं भाषण कां करीत नाहीं ? माझें वृत्त कळल्यावर उत्तर द्यावें असा हेतु असेल तर सांगतों कीं, हा जो समोर ऋष्यमूक पर्वत दिसत आहे. याच्यावर सुग्रीव ना० वानरांचा अधिपति वाली ना० ज्येष्ठ भ्रात्याच्या भयानें दुःखित झालेला राहतो, त्याची इच्छा आपणाशीं सख्य करण्याची असल्यामुळें त्यानें मला आपणाकडे पाठविलें आहे. कारण मी त्याचा सचिव आहें, व माझें नांव मारुति असें आहे. इतकें बोलून हा स्तब्ध राहिला.

हनुमंताचें सर्व भाषण ऐकून, रामास इतका संतोष

झाला कीं, तो लक्ष्मणास याप्रमाणें म्हणाला, लक्ष्मणा! हें या बटूनें केलेलें भाषण तूं संपूर्ण ऐकिलेंस ना ? पहा, याच्या भाषणांत अशुद्ध शब्द एकहि आला नाहीं. त्यावरून सर्व व्याकरणग्रंथ हा उत्तम प्रकारें करून पढला आहे यांत संशय नाहीं. समग्र भाषण शुद्ध असून त्यांत आणखी माधुर्य तरी किती ? म्हणून असे सचिव ज्या राजाजवळ आहेत, त्याची कार्यसिद्धि कां होणार नाहीं ? अवश्यमेव होईल; असें बोलून राम उगाच राहिला असतां, रामाच्या भाषणावरून सुग्रीवाशीं सख्य करण्याचें त्याच्या मनांत आहे असें लक्ष्मणानें जाणून, त्यानें अयोध्येहून निघाल्यापासून येथपर्यंत आल्याचें वृत्त मारुतीस संक्षेपानें सांगून म्हटलें कीं, आम्ही सुग्रीवाचें नांव ऐकून ओळखतों, व त्याचाच शोध करीत येथपर्यंत आलों आहों (वा० रा० किष्किं० स० ३ ). त्यावरून मारुतीस आनंद होऊन त्यानें बटुवेष टाकिला, व मूळरूप धारण करून उभयतांस स्कंधावर घेऊन पंपासरोवराहून उड्डाण करून सुग्रीवासमीप आला. पुढें रामाचें व सुग्रीवाचें सख्य झालें, व रामानें वालीस मारून सुग्रीवास राज्याभिषेक केल्यावर सुग्रीवानें चातुर्मास्यपर्यंत यथेच्छ विषयसुखानुभव घेऊन, तो काल अतिक्रांत होतांच सीताशुद्धीसाठीं सर्वत्र वानर पाठविले ( २ सुग्रीव श० पहा ). त्यांत अंगदप्रमुख मारुतीसहित दहा वानर दक्षिणेकडे जाऊं लागले तेव्हां रामानें मारुति चतुर आणि बलवान् पाहून, यापाशीं आपल्या नामानें युक्त मुद्रिका सीतेस दाखविण्यासाठीं दिली. ती घेऊन हा दक्षिण दिशेकडे अंगदासमागमें गेला ( वा० रा० किष्किं० स० ४९ ).

सकल वानरांसहित मारुति दक्षिण दिशेस चालला असतां, त्यास मध्यें कंडुक ऋषीचें अरण्य लागून, एक्या भेटलेल्या राक्षसास यानें मारिलें. नंतर पुढें चालला तों, स्वयंप्रभेची गांठ पडली व तिनें यास सर्वांसहित समुद्रतीरीं एका क्षणांत नेऊन सोडिलें. तेथें हा विंध्यपर्वताच्या पादावर चढून गेला. पुढें अंगद विचार करूं लागला कीं, आपण सुग्रीवाच्या आज्ञेनें निघालों त्यास एक मास झाला, तरी अजून सीतेचा शोध लागत नाहीं, तेव्हां कसें करावें. असेंच माघारें जावें तर प्राणांत शिक्षा भोगावी, यास्तव आतां प्रायोपवेशनेंकरून येथेंच प्राणत्याग करावा हें बरें. त्यांत तार वानर म्हणूं लागला कीं, प्राण जो द्यावा त्यापेक्षां स्वयंप्रभेच्या गुहेंत जाऊन स्वस्थ बसावें, परंतु मारुति म्हणाला, हें करणें अगदीं अनुचित होय, यास्तव समुद्रोल्लंघनाचाच विचार करून सीतेची शुद्धिच होईल असा विचार पहा. याप्रमाणें परस्परांचीं परस्परांशीं भाषणें चालली आहेत तों संपातीनें या सर्वांस दुरून पाहिलें, आणि भक्ष्य प्राप्त झाला तेणेंकरून मनांत हर्ष पावून हळू हळू यांकडेस येऊं लागला. त्यास पाहून अंगदास अतिशय वाईट वाटलें, व तो सर्वांस याप्रमाणें बोलूं लागला कीं, आपण ज्या कार्यासाठीं निघालों, तें कार्य न करितां हा जो पक्षिराज येत आहे, याच्या मुखांत निःसंशय पडून मरणार, तस्मात् आपणास धिक्कार असो. जटायु जसा रामकार्यार्थ मरण पावला, तसें मरण जर आपणास येतें, तर चांगलें झालें असतें. अस्तु, आतां बोलून काय उपयोग ? आलेल्या प्रसंगास सादर झालें पाहिजे, हें मात्र खरें आहे. हें भाषण संपातीच्या कानीं पडलें, व जटायूचें नांव ऐकून, तो अंगदास पुसूं लागला कीं, माझ्या कनिष्ठ प्रिय भ्रात्याचें नांव आज मी बहुतां दिवसांनीं श्रवण केलें, त्यास त्याच्या गोष्टी करणारे तुम्ही कोण आहां ? व येथें काय हेतूनें आला ? त्यावरून अंगदानें नम्र होऊन सांगितलें कीं, सुग्रीवानें आम्हास सीताशुद्धीसाठीं पाठविलें, परंतु अजून आह्मास तिचा शोध लागला नाहीं, यास्तव मरण्याचा निश्चय केला आहे. जटायु रामकार्यार्थ मरण पावला, तसें मरण आम्हास आलें नाहीं, ह्या खेदास्तव त्याचें नांव काढिलें; परंतु तूं कोण आहेस तें सांग. त्यावरून संपातीनें मागील आपला व जटायूचा सर्व वृत्तांत सांगून म्हटलें, तुम्ही समुद्रतरणाचा विचार करा; कारण सीता लंकेंत आहे ( १ संपाति श० पहा ).

याप्रमाणें बोलून संपाति निघून गेल्यावर, अंगदानें कोणास किती बळ आहे, तें त्यानें सांगावें असें सर्वांस म्हटलें. त्यावरून गज वानर म्हणाला, मी १० योजनें उड्डाण करीन, गवाक्ष म्हणाला, मी २० योजनें जाईन, शरभ ३० योजनें, ऋषभ ४०, गंधमादन ५०, मैंद ६०, द्विविद ७०, सुषेण ८० आणि जांबवान् ९० योजनें जाईन असें म्हणाला. याहून अधिक नाहीं; कारण, मी आतां फारच वृद्ध झालों आहें. पूर्वी मी तरुण असतां वामनावतार झाला त्या काळीं त्यानें बलीचें दानोदक हातांवर पडतांच त्रिविक्रम ( त्रैलोक्यास आक्रमण करणारें ) रूप धारण केलें, त्यांस मीं एकवीस प्रदक्षिणा केल्या होत्या. परंतु तें सामर्थ्य आज राहिलें नाहीं. यावर अंगद म्हणाला, मी १००

योजनें जाईन; परंतु माझ्यानें परत येववेलच असें निश्चयात्मक सांगवत नाहीं. शेवटीं जांबवान् म्हणाला, तूं आमचा नियामक आहेस, यास्तव आम्हीं तुला पाठविणेंच योग्य नाहीं. तर इकडे ये असें म्हणून, अंगदासहित जांबवान् मारुतीकडे येऊन, व त्याच्या पराक्रमाचें वर्णन करून म्हणाला कीं, सीतेची शुद्धि करून सर्व वानरांस प्राणदान देणें तुजवांचून कोणाच्यानें होणार नाहीं; यास्तव विलंब न करतां लंकेस जा व सीतेची शुद्धि करून सत्वर ये ( वा० रा० किष्किं० स० ६७ ).

जांबवानाचें भाषण श्रवण करून मारुति तथास्तु म्हणाला, व उड्डान साधण्यासाठीं मोठें रूप धारण करून महेंद्र पर्वतावर उभा राहिला. तदनंतर हृदयस्थ असून सर्वव्यापी जो परमात्मा त्याच्या चराचर विभूतींस नमस्कार करून लंकेस जाण्यासाठीं त्यानें उड्डान केलें; त्या वेळेस समुद्रजलावर तीस योजनें लांब व दहा योजनें रुंद अशी त्याची छाया पडली. हें छायेचें लिहिलेलें प्रमाण भर दोनप्रहरचें किंवा पूर्वोत्तर काळींचें याविषयीं वाल्मीकि रामायणांत कांहीं उल्लेख नाहीं. अस्तु. पुढें उड्डानावर उड्डान घेऊन चालला आहे तों, मैनाक पर्वत यास विश्रांति देण्यास मध्यें आडवा झाला ( १ मैनाक श० पहा ). त्याचें अभिनंदन करून पुढें चालला तों सुरसा आड आली ( ४ सुरसा श० पहा ). तिनें हा बुद्धिमान् व बलवान् आहे असें जाणून आशीर्वाद देऊन गमन केल्यावर, हा पूर्ववत् पुढें चालला, तों सिंहिकेनें याच्या छायेचें आकर्षण करून तिच्या योगानें यास समुद्रांत पाडिलें, म्हणून यानें तिचा नाशच केला ( २ सिंहिका श० पहा ). सारांश, मग तेथून जें यानें उड्डान केलें, तों एकाच भरारीनें लंकेस जाऊन पोहोंचला ( भार० वन० अ० २८२ ). ( वा० रा० सुंदर० स० १ ).

मारुति लंकेच्या बाहेर जाऊन उतरल्यावर थोड्याच वेळांत रात्र होऊन चांदणें पडलें, असें पाहून हा सूक्ष्मरूप धारण करून तींत प्रवेशूं लागला. इतक्यांत लंकेच्या देवतेनें यास पाहून तींत जाण्याविषयीं प्रतिबंध केला. त्यावरून मारुतीनें तिचा पराभव करून आंत गमन केलें, व लंकेची शोभा पाहात चालला. त्यांत यानें यच्चयावत् राजमार्ग पाहिले. नानाप्रकारचीं गोपुरें, अनेक उपवनें, क्रीडास्थानें, कोशागारें, सर्व अवलोकन केलीं. अश्व, रथ, गज, पदाति, शस्त्रागृहें, यानगृहें, तींहि संपूर्ण अवलोकिलीं. तदनंतर एक योजन लांब व अर्द्ध योजन रुंद असें रावणाचें स्वतःचें मंदिर पाहिलें, व आंत प्रवेशून तो स्त्रीसहवर्तमान मंचकावर निद्रित झालेला पाहून तेथून बाहेर पडला, व संपातीनें सांगितल्याप्रमाणें, त्यानें मग इकडे तिकडे न जातां सीता अशोकवनिकेंत आहे असें निश्चयात्मक जाणून तिकडील मार्ग धरिला ( वा० रा० सुंदर० स० २–१३ ).

अशोकवनिकेंत मारुति येऊन पाहूं लागला तों, तेथेंहि अनेक प्रासाद ( मंदिरें ), अनेक वापी, व फलपुष्पांनीं युक्त असे लक्षावधि वृक्ष पाहून लंकेचें ऐश्वर्य पाहिल्यानें आधींच विस्मित झालेला, अधिक विस्मय पावला. याप्रमाणें पाहात पाहात चालला आहे तों, एका विस्तीर्ण शिंशपा ( शिसवी ) वृक्षाखालीं पीतवस्त्र परिधान केलेली, राक्षसींनीं वेष्टिलेली, एकवेणी ( तीन पेडांची वेणी न घातलेली ), उपवासानें कृश झालेली, मलिन, दुःखित व ध्यानस्थ, अशी दिव्य स्त्री पाहिली. तिच्या तेजावरून व मुख्यत्वें दुःखित मुद्रेवरून, हीच सीता असा मारुतीचा निश्चय होऊन त्यास अत्यंत हर्ष झाला. नंतर मारुति तिजकडेस अवलोकन करीत शिंशपावृक्षावर बसला आणि मनांत म्हणूं लागला कीं, रामास हिजकरितां जो शोक होत आहे, तो यथार्थ होय; कारण ही तशीच गुणवती, पतिव्रता, आणि सुंदर दिसत्ये. असा विचार करीत बसला आहे तों प्रभात होण्याचा संधि आला ( वा० रा० सुं० स० १४–१७ ).

त्या प्रातःकाल होण्याच्या संधीस शतावधि स्त्रियांनीं वेष्टित, व पुरुष म्हणावयास कायतो एक शंकुकर्ण मात्र समागमें आहे, अशा रावणास मारुतीनें अशोकवनिकेकडे येतां पाहिलें. त्यावरून पुढें काय होतें तें पाहून मग काय करणें तें करावें, असें मनांत आणून तो स्वस्थ बसला, तों रावण सीतेसमीप येऊन पोहोंचला, व आपल्या सामर्थ्याचें तसेंच ऐश्वर्याचें वर्णन करून, तिनें आपणांस वश व्हावें म्हणून तिची प्रार्थना करूं लागला. सीता तो येतांच त्याजकडेस पाठ करून बसली, आणि त्याचें बोलणें झाल्यावर म्हणाली, तुला अनेक स्त्रिया असतां तूं माझी इच्छा करतोस; परंतु हें तुला कल्याणकारक नाहीं. तूं अजून मला रामचंद्राच्या स्वाधीन कर. न करशील तर तुझा विनाशकाल समीप आला आहे असें जाण. सीतेचें भाषण ऐकून रावण म्हणाला, मी जेव्हां जेव्हां इकडे येतो, तेव्हां तेव्हां, तूं माझी निंर्भर्त्सनाच करित्येस, त्यावरून इतका क्रोध मला येतो

कीं, तुझा वधच करावा; परंतु माझी प्रीति तुजवर अतिशय असल्यामुळें करवत नाहीं; तथापि आतां तुला खचित सांगतों कीं, यापुढें दोन महिन्यांच्या आंत तूं मला वश न होशील, तर प्रातराशाकरितां ( सकाळच्या न्याहारीकरितां ) मी तुझ्या शरीराचा सूदाकडून ( पाककर्त्याकडून ) पाक करवून तुला भक्षीन. त्यावरून सीतेस अतिशय क्रोध येऊन तिनें त्याची इतकी निर्भर्त्सना केली कीं, तो खड्ग उपसून तिला तत्काळच मारण्यासाठीं तिच्या अंगावर धांवला; परंतु धान्यमालिनीनें त्याचें निवारण केल्यावरून तो शांत होऊन स्वमंदिरीं गमन करिता झाला ( वा० रा० सुंदर० स० १८–२२ ).

रावण गेल्यावर एकजटा इ० तिच्या संरक्षणास असणाऱ्या राक्षसींनीं तिला बहुता प्रकारें भीति दाखविली. त्या योगानें तिला अनिवार रुदन आलें व ती त्या राक्षसींस इतकेंच म्हणाली कीं, तुम्ही मला तोडा, चिरा, अथवा सगळीच गिळा; परंतु माझा पादांगुष्ठहि रावणास स्पर्शणार नाहीं. तेथें सर्व शरीर कोठून स्पर्शेल? इतक्यांत त्रिजटा प्राप्त झाली, व तिनें सर्व राक्षसींचें निवारण केलें. त्यावरून त्या सर्व जरी एकीकडे झाल्या, तरी तिला स्वस्थ न वाटून, तिनें आपली दीर्घ वेणी सोडिली आणि कंठास फांस घालणार तों तिचा वामनेत्र व वामभुज एकाएकीं स्फुरण पावले ( स० २३–२९ ). मारुति शिंशपावृक्षावर बसून, हें सर्व कृत्य पाहात होताच; त्यानें विचार केला कीं, जर मी आतां अशा समयास हिचें सांत्वन न करीन, तर ही निःसंशय प्राण सोडील. परंतु हिचें सांत्वन कसें करावें? प्रकट व्हावें तर ही मला राक्षसी माया म्हणून विश्वासेल कीं नाहीं कोण जाणे! दुसरें राक्षसींनीं मला पाहिल्यास, त्या जाऊन रावणास कळवितील. सहस्रावधि राक्षस जरी मजवर चालून आले, तरी मी त्यांस भीत नाहीं, परंतु तसें करून श्रम पावावें, त्यापेक्षां सामोपायानेंच मी येथें आलों,हें हिला आधीं कळावें म्हणजे पुरें.असा विचार करून, तो सूक्ष्मरूपानेंच सीतेस उद्देशून याप्रमाणें भाषण करूं लागला.

सकल गुणांनीं युक्त अयोध्येचा राजा दशरथ, त्याचा ज्येष्ठ पुत्र राम, पित्याच्या आज्ञापालनास्तव आपली सीता ना० भार्या व भ्राता लक्ष्मण यांसहवर्तमान अरण्यांत आला. तेथें त्यानें अनेक राक्षस, व जनस्थानीं खरदूषण इ० दुष्ट असुर, त्यांचा संहार केला. तें वैर मनांत धरून रावणानें युक्तीनें त्याची स्त्री हरण केली.त्यावरून तो भ्रात्यासहवर्तमान तिचा शोध करीत करीत चालला असतां, रावणानें तिचें हरण केलें असें त्यास जटायूच्या मुखानें कळलें. नंतर तो दक्षिण दिशा अनुलक्षून येत येत पंपासरोवरीं प्राप्त झाला. त्यावरून कारणवशात् ऋष्यमूक पर्वतावर राहणाऱ्या सुग्रीव ना० वानराधिपतीशीं त्याचें सख्य होऊन, त्याचा भ्राता परंतु वैरी जो वालीनामा वानर त्यास रामानें मारून सुग्रीवास किष्किंधेच्या राज्यावर स्थापिलें. त्या उपकारास्तव सुग्रीवानें त्या रामाच्या भार्येच्या शोधार्थ सर्व दिशांस वानर पाठविले. त्यांत दक्षिणेकडे आलेल्या वानरांतील एक वानर शतयोजनें समुद्र उल्लंघून लंकेस मी प्राप्त झालों आहें. मला मारुति असें प्रसिद्ध नांव असून, हनुमानहि म्हणतात. त्या मी येथें येऊन रामाच्या मुखानें जसें तिचें वर्णन ऐकिलें, त्याप्रमाणें त्या सीतेस आज मीं पाहिली, इतकें बोलून मारुति स्तब्ध झाला.

याप्रमाणें शिंशपा वृक्षांतून निघालेली वाणी सीतेनें श्रवण करून तिला अतिशय विस्मय झाला; कारण यापूर्वी अशी वाणी त्यांतून निघालेली तिनें कधींच ऐकिली नव्हती; व त्यावरून मी स्वप्न तर पाहात नाहीं ना? असें ती आपल्या मनाशीं म्हणूं लागली, व वारंवार वृक्षाकडे पाहूं लागली. परंतु कोणी दिसेना, म्हणून ती याप्रमाणें म्हणाली कीं, ज्या कोणी हें या प्रसंगीं मला अमृततुल्य रामचरित्र श्रवण करविलें असेल, तो महात्मा मज अभाग्येस दृश्य होवो. इतकें ऐकतांच मारुतीनें प्रत्यक्ष होऊन तिला वंदन केलें, व तिजपुढें उभा राहिला. त्यास पाहून वृक्षस्कंध जो तिनें प्राण देण्यासाठीं प्रथम धरिला होता तो सोडिला व ती खालीं बसली. नंतर उभयतांचें कांहीं भाषण झालें; परंतु सीता पुनः विचारांत अशी पडली कीं,पूर्वीं जसा रावण भिक्षुरूपानें मजकडे आला होता,तसें तर हें कपट नसेल? असें मनाशीं म्हणून ती त्यास म्हणाली,मशीं वारंवार वंचना करून मला संतप्त करतोस यांत तुला लाभ काय?त्यावरून मारुती समजला कीं, ही अजून मला विश्वासत नाहीं. म्हणून तो तिला म्हणाला, हे देवि, मी वास्तविकच रामदूत आहें, याविषयीं अगदीं संशय धरूं नको. असें म्हणून रामानें अभिज्ञानार्थ दिलेली मुद्रा त्यानें तिजपुढें ठेविली व म्हणाला, माझ्या स्कंधावर आरोहण करून रामाकडे येण्याची इच्छा असेल तर चल; परंतु सीता म्हणाली, मारुते, रामानें येथें येऊन मला न्यावें यांत

जशी त्याची कीर्ति होईल, तशी असें करण्यांत होणार नाहीं; यास्तव तूं जाऊन त्यास एक मासाच्या आंत घेऊन ये, तोंपर्यंत मी कसेंहि करून प्राण धारण करितें. इतकें बोलून तिनें रामास दाखविण्यासाठीं आपल्या वेणींतील चूडामणि दिला, व आणखीहि कांहीं खुणेच्या गोष्टी सांगून त्यास जाण्यास आज्ञा दिली ( वा० रा० सुंदर० स० ३०-४० ).

सीतेची आज्ञा घेऊन मारुति निघाल्यावर दूर जाऊन विचार करूं लागला कीं, येथें आल्याप्रमाणें एक कार्य तर शेवटास लागलें, परंतु रावणास न भेटतां आपण परत जाणें योग्य नाहीं, यास्तव त्यास भेटण्याचा कांहीं उपाय करावा असें बोलून, अशोकवनाच्या कांहीं भागाचा त्यानें विध्वंस केला, व सहस्र स्तंभयुक्त असलेला प्रासाद ( राजवाडा ) एका क्षणांत मोडून टाकून, तेथील समग्र रक्षकांस ठार मारिलें. त्यावरून राक्षसी सीतेस पुसूं लागल्या, हा वानर कोण आहे ? तिनें उत्तर केलें, राक्षसी- माया तुमची तुम्ही जाणत असाल, मी काय सांगूं ? सारांश, हें वृत्त राक्षसींनीं रावणास कळवितांच त्यानें क्रोधानें किंकर नांवाच्या ऐशीं सहस्र राक्षसांस मारुतीवर पाठविलें; त्या सर्वांचा त्यानें संहार केला असतां, विरूपाक्ष, यूपाक्ष, दुर्धर्ष अ० दुर्धर, प्रघस, आणि भासकर्ण, हे पांच सेनापति ससैन्य रावणानें धाडिलेले सर्व मारुतीनें मारिले. पुढें रावणपुत्र अक्ष येऊन तोहि मरण पावल्यावर, इंद्रजित् आला व त्यानें महत्प्रयासानें ब्रह्मास्त्रप्रयोगेंकरून ( मारुतीनें बुध्या बांधूं दिल्यामुळें) त्यास बांधून रावणासंमुख नेलें ( वा० रा० सुंदर० स० ४१-४७ ). व त्यास रावणापुढें उभें करून जें कांहीं बोलला, त्याविषयीं व्यासांनीं असें लिहिलें आहे.

श्लोक-

सभांतरस्थस्य च रावणस्य तं पुरो निधायाह बलारिजित्तदा ॥
यद्युक्तमत्रार्थ विचार्य मंत्रिभिर्विधीयतामेष न लौकिको हरिः ॥

( अध्यात्म रा० सुंदर० स० ४ श्लो० ४ ). यांतील भाव, सभेच्या ठायीं स्थित जो रावण, त्यापुढें मारुतीस उभें करून इंद्रजित् असें बोलला, हे आर्य(श्रेष्ठा), याविषयीं जें युक्त असेल त्याचा मंत्र्यांसहवर्तमान विचार करून जें करणें तें करावें; कारण आपण जे लौकिक ( सामान्य ) वानर पाहतों तसा हा नाहीं, अर्थात् हा वानर अलौकिक ( अद्भुत ) आहे असें तात्पर्य.

पुढें यानें रावणाशीं बोधपर असें उत्तम भाषण करून, रावणानें यास मारण्याकरितां याच्या पुच्छास अग्नि लावून सोडिलें असतां, यानें लंकेचा कांहीं भाग दग्ध करून पुनः सीतेकडे गमन केलें, आणि तिची आज्ञा घेऊन रामाकडे परत जाण्यासाठीं अरिष्ट ना० पर्वतावर उभा राहून पूर्ववत् मोठें रूप धारण करून जो उडाला, तो एकाच उडीनें अंगदादिक वानर जेथें होते, त्या महेंद्रपर्वतावर येऊन उभा राहिला ( ४ अरिष्ट श० पहा ). मारुतीच्या प्रफुल्लित मुखश्रीवरून, यानें सीतेस अवलोकन केलें, असें सर्व वानरांनीं जाणून त्यांस परम हर्ष झाला [ वा० रा० सुंदर० स० ५७]. नंतर जांबवानानें वर्तमान विचारलें असतां, मारुतीनें इकडून गेल्यापासून पुनः परत येईपर्यंत जेवढें झालें, तेवढें सर्व सांगितलें. तेणेंकरून सर्व हर्षित झाले. नंतर अंगद सर्वांस घेऊन अल्पच दिवसांत किष्किंधेसमीपच्या मधुवनांत प्राप्त झाला, व तेथील रक्षक दधिवक्त्र निवारण करीत असतां त्यास न मानून, सर्वांनीं मधुरसाचीं फळें यथेच्छ भक्षण केलीं. तें वर्तमान दधिवक्त्रानें सुग्रीवास कळविलें. त्यावरून सीतेचा शोध निश्चयेंकरून लागला असें त्यानें अनुमान करून, त्या सर्वांस आपणाकडे पाठवून देण्याविषयीं त्यास आज्ञा करून मधुवनाकडे परत पाठविलें. तो जाऊन अंगदास म्हणाला, सुग्रीव तुम्हां सर्वांस पाहण्याची इच्छा करीत आहे, तर तुम्ही सत्वर जाऊन त्यास भेटावें. त्यावरून अंगदप्रमुख सर्व वानर रामलक्ष्मण व सुग्रीव यांस येऊन भेटले [ वा० रा० सुंदर० स० ५८-६३ ].

नंतर जांबवान् पुढें होऊन, त्यानें मारुतीनें सांगितल्याप्रमाणें सर्व वृत्त रामचंद्रास निवेदन केलें, व त्यानें आणिलेला सीतेच्या वेणींतील चूडामणि रामापुढें ठेविला. तो पाहून रामास पराकाष्ठेचा आनंद होऊन, त्यानें सुग्रीवास लंकेकडे निघण्याची सिद्धता करावयास सांगितली. त्यावरून संपूर्ण वानरसेना सिद्ध होतांच; तासहवर्तमान रामचंद्र लक्ष्मणासहित समुद्रतीरीं प्राप्त झाला. सेतुबंधन होऊन राम लंकेस गेल्यावर मारुतीनें त्याचें साह्य बहुतप्रकारें केलें. तें असें कीं, प्रसंगानुरूप सहस्रावधि राक्षस मारिले, वानरांस सजीव करण्याकरितां ऋषभपर्वतादिकांवरील कित्येक वेळां औषधि घेऊन आला [वा० रा० युद्ध० स० ७४],लक्ष्मणास रावणाची शक्ति लागली,त्या प्रसंगीं कालनेमीचा वध करून यानें औषधिबलानें त्यास सजीव केलं [वा० रा० युद्ध० स० १०२]. रावणास मारून बिभीषणाची

लंकाराज्यावर स्थापना केल्यानंतर, राम अयोध्येस गेला, व तेथें त्याचा राज्याभिषेक होईपर्यंत हा तेथें होताच. पुढें जरी सुग्रीवादिक वानर आपआपल्या स्थळीं गेले, तरी हा रामासन्निधच राहिला, व त्याची सेवा करून त्यास यानें इतकें संतुष्ट केलें कीं, रामानें यास प्राणाहूनहि अधिक जी ब्रह्मविद्या, ती यास देऊन, पुढें गुरुत्व करण्याविषयींचाहि अधिकार दिला. त्याविषयीं व्यासांनीं असें लिहिलें आहे—

श्लोक.

इदं रहस्यं हृदयं ममात्मनो मयैव साक्षात्कथितं तवानघ ॥
मद्भक्तिहीनाय शठाय न त्वया दातव्यमैंद्रादपि राज्यतोधिकं ॥

( अध्या० रामायण ). यानंतर रामचंद्र निजधामास जाऊं लागला तेव्हां यास पृथिवींवर कल्पसमाप्तीपर्यंत राहण्याची आज्ञा केल्यामुळें, हा अजून तीवर आहे ( वा० रा० उत्तर० स० १०८ ).

याचें राहणें जरी गंधमादन नांवाच्या हिमालयशिखरावर असल्याचें भारतांत आहे, तरी तें सतत नाहीं; कधीं कधीं असून नेहेमीं म्हटलें म्हणजे किंपुरुषवर्षांत आहे; आणि तेथील लोकांस हा सर्व काळ रामचरित ऐकवीत आहे· असें भागवतामध्यें सांगितलें आहे. यानें जें रामायण रचिलें आहे, त्याची नाटकरामायण या नांवानें प्रसिद्धि आहे.

**हयग्रीव**–पूर्वकल्पाच्या रात्रींत झाला होता जो असुर तो ( मत्स्यावतार श० पहा ).

२–हयग्रीव ना० दैत्याच्या वधार्थ झाला होता विष्णूचा अवतार तो.

३–एक दैत्य. यानें उग्रतपेंकरून देवीस प्रसन्न करून मला माझ्याच नांवाचा जो पुरुष असेल, त्याच्याच हातून मात्र मृत्यु असावा असें मागितलें होतें. त्यावरून यानें पुढें प्राणिमात्रास पीडा आरंभिली असतां, यास मारण्यासाठीं विष्णूचा अवतार· झाला होता, व त्यानें यास मारिलें होतें ( देवीभा० १ स्कं० अ० ५ ).

४–वृत्रासुरानुयायी एक असुर ( म० अ० १७२ ). ( भाग० ६ स्कं० अ० १० ).

५–क्षात्रधर्मानुरूप युद्ध करून स्वर्गास गेलेला एक राजर्षि ( भार० शांति० अ० २४ श्लो० २३–२४ ).

६–अथर्वणवेदोपनिषत्.

**हयशिरा**–एक असुर. प्रायः तृतीयार्थकच हयग्रीव असावा ( भार० शांति० अ० ३४७ ).

२–षष्ठार्थक ऋतुदानवाची स्त्री.

**हर**–शिव ( हरिहर श० पहा ).

२–एक रुद्र. भारतोक्त रुद्रांत हें नांव कोणत्याचें असेल तें असो.

३–कश्यपापासून दनूस झालेल्या दानवांतील एक.

४–माली राक्षसाच्या पुत्रांतील एक, व बिभीषणाचा अमात्य.

५–रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० युद्ध० स० २७ ).

**हरप्रीति**–द्वितीयअत्रिकुलोत्पन्न ऋषि.

**हरि**–विष्णु ( हरिहर श० पहा ).

२–ऋषभदेवास जयंतीपासून झालेल्या नऊ पुत्रांतील एक.

३–तामसमन्वंतरांत झालेला विष्णूचा अवतार. यानें गजेंद्र आणि नक्र त्यांचा उद्धार केला होता.

श्लोक—

तत्रापि जज्ञे भगवान् हरिण्यां हरिमेधसः ॥
हरिरित्याहृतो येन गजेंद्रो मोचितो ग्रहात् ॥ ३० ॥
( भाग० ८ स्कं० अ० १ ).

४–तामस मन्वंतरांतील देवांमधील एक देवविं०.

५–तृतीयार्थक अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

६–अकंपन राजाचा पुत्र ( १ अकंपन श० पहा ).

७–रावणपक्षीय एक राक्षस.

८–कर्णानें मारिलेला पांडवपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० ५६ ).

**हरिकेश**–शिवास नांव आहे.

२–पूर्णभद्र ना० यक्षाचा पुत्र. यानें शिवाराधनेंकरून काशी क्षेत्राचें क्षेत्रपालत्व उद्भ्रम आणि संभ्रम, या उभय रुद्रगणांचें आधिपत्य, आणि अन्नदातृत्वसामर्थ्य असे तीन वर मिळविले होते ( मत्स्य० अ १७९ ).

३–वसुदेवभ्राता श्यामक त्याच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ.

**हरिजटा**–सीतासंरक्षणास असलेल्या राक्षसींतील एक.

**हरिणी**–तामस मन्वंतरांतल्या विष्णूच्या अवताराची माता.

**हरित**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरिश्चंद्र राजाचा पौत्र व रोहिताचा पुत्र. यास वृक असें नामांतर असे, व पुत्र चंप नांवाचा राजा होता.

२–रुद्रसावर्णि मन्वंतरांत होणारे देवविं०.

**हरिताश्व**–सूर्य.

**हरिमित्र**–या नांवाचा एक ब्राह्मण.

**हरिमेधा**–परमात्मा ( भाग० ११ स्कं० अ० २९ ).

२–तामस मन्वंतरांतील विष्णूच्या अवताराचा पिता.

३–ब्रह्मर्षि. याची कन्या ध्वजवती ( भार० उद्योग० अ० ११० ].

**हरिलोमा**–रामसेनेंतील वानर [ वा० रा० युद्ध स० ७३ ).

**हरिवर्मा**–( सो० वं० ) तुर्वसुकुलोत्पन्न राजा. याचा पुत्र एकवीर राजा.

**हरिवर्ष**–प्रियव्रतपुत्र आग्नीध्र राजास पूर्वचित्ति अप्सरेपासून झालेल्या ९ पुत्रांतील तिसरा. यास मेरुकन्या उग्रदंष्ट्री ही स्त्री असून, जंबुद्वपांतील हेमकूट आणि निषध या दोन पर्वतांमधील जो याच नांवाचा भूभाग तेथील आधिपत्य होतें ( भाग० ५ स्कं० अ० २; भार० भी० अ० ६ ).

२–जंबुद्वीपांत जे वर्षसंज्ञक नऊ भूभाग आहेत, त्यांतील हरिवर्ष राजाचा भूभाग तो. हा आपण ज्या भरत वर्षांत राहतों याच अंगाकडे, आपल्या उत्तरेस असणाऱ्या किंपुरुष वर्षाच्या उत्तरेस आहे.

**हरिवाहन**–इंद्रास व गरुडास नांव.

२–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न उपरिचर वसूच्या पुत्रांतील एक. यास कोठें मावेल्ल असें म्हटलेलें आहे.

**हरिश्चंद्र**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अरुण राजाचा प्रपौत्र, निबंधन राजाचा पौत्र, आणि सत्यव्रत अ० त्रिशंकु राजाचा ज्येष्ठ पुत्र. त्रिशंकु राजा विद्यमान असतांच यास अयोध्येचें राज्य करणें भाग झालें ( त्रिशंकु श० पहा ). यास शत स्त्रिया होत्या, त्यांत जीच्या जिला तारामती असें प्रसिद्ध नांव होतें, ती ज्येष्ठ होती ( देवी भा० ७ स्कं० अ० १४ ). ( भार० सभा० अ० १२ ). याला पुढें रोहित अ० रोहितास्य ना० पुत्र झाला. तो कसा झाला इ० वृत्तांताविषयीं ( शुनःशेप श० पहा ).

हरिश्चंद्र हा वसिष्ठासमागमें शिष्यधर्मानुरूप चांगल्या रीतीनें वागे; आपल्या पित्याप्रमाणें ( त्रिशंकूप्रमाणें ) वागत नसे, त्यामुळें वसिष्ठाचें प्रेम याच्यावर असावें असें असे. एकदां वासिष्ठ इंद्रसभेस गेला असतां सहजीं गोष्टी निघाल्यावरून त्यानें याची होती तशीच कृति वर्णन करून स्तुति केली, ती तेथें असलेल्या विश्वामित्रास सहन न होऊन तो म्हणाला, ज्यानें वरुणाशीं बहुतवेळां वंचना केली, अशा कपटी हरिश्चंद्राची इतकी स्तुति कशास पाहिजे ? तथापि वसिष्ठ स्तुति करतां राहीना. त्यावरून विश्वामित्रास कोप येऊन त्यानें प्रतिज्ञा केली कीं, हरिश्चंद्राच्या सत्वशीलपणाची परीक्षा करण्यास किती उशीर ? मी सत्व पाहात असतां जर तो त्यांत टिकला, तर मी केलेलें कांहीं तप तुम्हास प्राप्त होवो, न टिकला, तर तुमचें तप मला येवो. याप्रमाणें बोलून विश्वामित्र गेला असतां वसिष्ठहि आपल्या आश्रमास गेला ( देवीभा० ७ स्कं० अ० १७ ).

पुढें हरिश्चंद्रास सत्वापासून ढळविण्यास विश्वामित्र संधि पाहात असतां, एकदां मृगयेनिमित्त याचें अरण्यांत गमन झालें असें त्यानें पाहून, तेथें एक मायिक वराह( डुकर )उत्पन्न करून,त्याकडून वनांतील प्राणी इत्यादिकांस मोठी पीडा आरंभविली. तें हरिश्चंद्र अवलोकन करून त्यामागें लागला; परंतु तो यास अतिशय दूर नेऊन एकाएकीं अदृश्य झाला, तेव्हां हरिश्चंद्र थकून तेथें विश्रांति घेत बसून विचार करूं लागला कीं, आपण किती दूर आलों ? व पुनः नगराकडे कोणत्या मार्गानें जावें ? तों यानें तेथें अकस्मात् एका ब्राह्मणास पाहिलें. त्यासमागमें एक पुत्र व एक कन्या होती. ( हा ब्राह्मण विश्वामित्रच होऊन आला होता.) सारांश, राजानें त्यास वंदन केलें, व नगराचा मार्ग विचारिला. त्यावरून ब्राह्मणानें तूं कोण इ०प्रश्न केले असतां, राजानें त्यांचीं सर्व उत्तरें दिलीं ( देवीभा० ७ स्कं० अ० १८ ).

नंतर ब्राह्मण म्हणाला, राजा, तूं येथें अनायासें प्राप्त झाला आहेस, त्या अर्थी या समीपच्या तीर्थी स्नानदान केल्याशिवाय जाऊं नयेस, व तुझ्या सारख्यास जाणें योग्यहि नाहीं, यास्तव स्नानास चल. नंतर मी तुला तुझ्या नगराचा मार्ग दाखवीन. त्यावरून हरिश्चंद्र तथास्तु म्हणून त्या तीर्थी स्नानास गेला. स्नान झाल्यावर देवऋषिपितृतर्पण करून ब्राह्मणास म्हणाला, दक्षिणा मागावी. ब्राह्मण म्हणाला, हा मजसमागमें माझा पुत्र आहे,व ही कन्या दुसऱ्या एका ब्राह्मणाची असून त्याच्या मनांतून यास द्यावी असें आहे; परंतु त्या ब्राह्मणास हिचें कन्यादान करण्यास द्रव्यसामर्थ्य नसल्यामुळें त्यानें तशीच मजजवळ देऊन तुह्मीच लग्न करून द्या असें म्हटलें आहे. परंतु मीहीं त्याचप्रमाणें द्रव्यहीन आहे. यास्तव या उभयतांचें लग्न करून देशील, तर तुला मोठें पुण्य घडेल. तें सर्व यास खरें वाटून यानें त्यांचा विवाह केला, व ब्राह्मणास म्हणाला, आणखी कांहीं मागा. ब्राह्मण बोलला, मी दक्षिणा मग मागेन,

परंतु आधीं तूं, या माझ्या पुत्राचा विवाह केला आहेस यास दक्षिणा दे. राजा म्हणाला, उत्तम आहे, मागा. ब्राह्मणानें सांगितलें, तुझें सर्व राज्य यास दे म्हणजे झालें. तें ब्राह्मणाचें भाषण ऐकून यास मोह पडून तत्काल यानें राज्याचें उदक त्याच्या हातावर सोडलें ( ग्रंथांतरीं स्वप्नांत राज्याचें दान केलें असें आहे ). तें कांहीं असो, राज्यदानाचें उदक यानें ब्राह्मणाच्या हातांवर सोडलें येवढें तात्पर्य त्यांत खरें आहे. पुढें ब्राह्मण राजाची बहुत स्तुति करून म्हणाला, राजा, तूं महादाता, असा जो मी तुझा लौकिक ऐकिला होता तो सत्य आहे. अस्तु, आतां मला दक्षिणा काय देतोस ? राजा म्हणाला, मागा; परंतु प्रस्तुत मात्र मजजवळ देण्यास नाहीं. ब्राह्मण बोलला, कांहीं चिंता नाहीं, सावकाश कां देईनास; अडीचभार सुवर्णाचें उदक सोडून ठेव म्हणजे झालें. राजानें उदक सोडतांच, पुत्र व स्नुषेसहवर्तमान ब्राह्मण तत्काळ अदृश्य झाला. त्यावरून राजा विस्मय पावून अश्वारूढ होऊन चालला असतां, कित्येक दिवसांनीं याच्या मंत्र्यांनीं यास गांठून, नगरास नेलें; परंतु यास राज्य करणें गोड वाटेना. वारंवार अरण्यांतील ब्राह्मणास राज्यदान आपण केलें तें याच्या मनांत उभें राहूं लागलें. याप्रमाणें याचें औदासिन्य पाहून तारामतीनें त्याचें कारण विचारिलें. परंतु यानें तें कांहींच तिला सांगितलें नाहीं. याप्रमाणें थोडेच दिवस गेले तों, तोच अरण्यांतील ब्राह्मण अकस्मात यांजकडेस आला. त्यास पाहतांच यानें सांगितलें, ब्राह्मणश्रेष्ठा, हें सर्व राज्य तुझें आहे तें तूं संभाळ. आतां अडीचभार सुवर्ण देणें राहिलें,तें मीं तुला अवकाशानुरूप प्रविष्ट करीन. इतकें त्याशीं बोलून तारामतीस व पुत्रास म्हणाला, आपल्या त्रिवर्गाच्या देहावांचून या ब्राह्मणास मी सर्व कांहीं अर्पण केलें आहे, यास्तव मजसमागमें तुम्हीं चलावें. तें राजाचें भाषण ऐकून, राजा नगराबाहेर जाऊं लागला असतां, तीं यासमागमें निघालीं, असें नागरिकांनीं पाहून त्यांस जो शोक झाला, तो सांगतां येत नाहीं ( देवी भाग० ७ स्कं० अ० १९ ).

स्त्री व पुत्र यांसहवर्तमान हरिश्चंद्र अयोध्येहून निघाला तो काशीस गेला, आणि तेथें विचार करूं लागला कीं, ब्राह्मणाचें अडीचभार वीस सहस्र तोळे सुवर्ण देण्यास काय उपाय करावा ( ही संख्या कित्येक कोटि सुवर्ण अशाप्रकारें कोणी मूर्खानें असेल किंवा पढतमूर्खानें असेल, ताळा न पडण्याजोगी भलतीच लिहिली आहे ). इतक्यांत त्याच्या मनांत आलें कीं, स्त्रीपुत्रांस विकून जें मौल्य येईल तें ब्राह्मणास देऊन नंतर राहिलेल्या मौल्यांत स्वतः आपण कोठें तरी विकलें जावें, व त्याच्या दक्षिणेची भरती करावी ( अ० २० ). नंतर त्यांस विकण्यास चौकांत घेऊन उभा राहात आहे तों, रूपांतरानें कालकौशिक नाम धारण करून, विश्वामित्र तेथें आला, आणि त्यानें दोघांस विकत घेऊन हरिश्चंद्रास ठरविलें होतें तितकें द्रव्य त्यानें दिलें, व बालकासहित त्या स्त्रीस सत्वर चल म्हणून ताडन करीत आपल्या गृहीं नेलें. तारामती व रोहित गेलीं व द्रव्य पुढें घेऊन हरिश्चंद्र बसला आहे, इतक्यांत विश्वामित्र आला, आणि म्हणाला, राजा, दक्षिणा आण. त्यावरून यानें हीं घ्यावी असें म्हटलें. विश्वामित्र म्हणाला, हें द्रव्य तूं कोठून आणिलेंस ? व शेष राहिल्याची भरती केव्हां करणार तें सांग. राजा बोलला, स्त्रीपुत्रांस विकून हें द्रव्य आणिलें असून अवशिष्टाची भरतीहि लवकरच करितों. त्यावरून विश्वामित्रानें याची बरीच निर्भर्त्सना केली, आणि म्हणाला, असो, हें द्रव्य तर मी नेतोंच, पण शेष राहिल्याची भरती आज अस्तमानपर्यंत झाली पाहिजे, न झाल्यास मी तुला शाप देईन ( अ० २१—२२ ).

नंतर हरिश्चंद्र वाराणसीच्या हट्टांत ( बाजारांत ) उभा राहून, वारंवार मोठ्यानें ओरडून म्हणूं लागला कीं, अमुक संख्यांक द्रव्य देऊन मला कोणी दास्यत्वासाठीं विकत घ्या;परंतु इतकें द्रव्य यास देऊन घेतो कोण ? ( हरिश्चंद्रावर अशा या आलेल्या संकटप्रसंगीं, काशीमध्यें राजा कोण होता.तें कळत नाहीं ). सारांश, यास कोणीहि तेथें घेईना. इतक्यांत विश्वामित्रानें एका सधन चांडालाच्या मनांत प्रेरणा केल्यावरून तो तेथें आला, व मी तुला, तूं म्हणतोस तितकें द्रव्य देऊन विकत घेतों असें म्हणूं लागला. परंतु हरिश्चंद्राच्या मनास तें प्रशस्त न वाटून, त्याशीं कांहींच तो बोलेना. इतक्यांत विश्वामित्र तेथें येऊन म्हणाला, हा चांडाल ( काशींतील श्मशानभूमिरक्षक तुला इष्ट द्रव्य देत असतां तूं कां घेत नाहींस ? दिवस अगदीं थोडा राहिला आहे, यास्तव विचार कर, गांठ मशीं आहे. राजा विश्वामित्रास लीन होऊन म्हणाला, महाराज, मी सूर्यवंशीय क्षत्रिय असतां चांडालास विक्रीत कसा होऊं ? कोणी ब्राह्मण अथवा क्षत्रिय मला विकत घेईल,तर त्यांत माझा संतोष आहे.

आपण म्हणाल ते तुला विकत घेण्यास कोणी उभे राहत नाहींत, तर असें करा कीं, आपणच मला विकत घेऊन आपला दास करा. विश्वामित्र म्हणाला, बरें तर, तूं माझा दास, आतां माझी आज्ञा तुला मान्य करणें भाग आहे. ती अशी कीं, तूं माझा दास असल्यामुळें मी तुला या चांडालास विकतों, तर तूं यासमागमें जावेंस. त्यावरून हरिश्चंद्र निरुपाय होऊन, त्यानें चांडालापासून द्रव्य घेतलें व विश्वामित्रास देऊन त्यास नमस्कार करून तो चांडालासमागमें निघून जाऊं लागला तों आकाशवाणी झाली कीं, राजा, तूं विश्वामित्राच्या ऋणापासून मुक्त झालास ( देवीभा० ७ स्कं० अ० २३ ).

विश्वामित्र जातांच तो प्रवीर अ० वीरबाहु ना० चांडाल हरिश्चंद्रास घेऊन घरीं गेला, आणि त्यानें त्यास श्मशानभूमींत जाऊन रहा, व जीं प्रेतें येतील, त्यांचीं वस्त्रें व द्रव्य घेऊन मजकडे आणून देत जा, असें म्हणून खुणेसाठीं आपला दंड त्याच्या हातांत देऊन तिकडे पाठविलें. त्याप्रमाणें हा त्या दुर्गंध स्थलांत मोठ्या दुःखानें राहून, ती त्याची सेवा त्यानें द्वादश मासपर्यंत केली ( अ० २४ ).

बाराव्या मासाच्या अंतीं कालकौशिक ब्राह्मणरूपी विश्वामित्रानें रोहितास तो अरण्यांत दर्भ समिधा आणायास गेला असतां, तेथें एका सर्पास आज्ञा करून दंश करवून मारविलें. तें वर्तमान सहचारी बालकांनीं तारामतीस येऊन कळवितांच ती शोक करीत, त्याकडे जाण्याविषयीं कालकौशिकास आज्ञा मागूं लागली. त्यानें हें कार्य करून मग जा, तें कार्य करून मग जा, असें करीत करीत मध्यरात्रीच्या सुमारास तिला त्याकडे जाण्याची आज्ञा दिली. नंतर ती तेथें जाऊन शोक करीत आहे तों, विश्वामित्र पाठोपाठ कित्येक नागरिकांस समागमें घेऊन तेथें गेला, व त्यानें सर्वांस दुरून तिचें अभिज्ञान करून देऊन म्हटलें, पाहिलींत ना, ही पोरें खाणारी राक्षसी ? तर आतां चला पुढें, आणि तिला धरा. इतक्यांत दिवस उगवला असतां सर्वांनीं तीसमीप जाऊन तें पुत्राचें प्रेत तिच्याकडून तिच्याच मस्तकावर देववून, तिला ठार मारवावें अशा हेतूनें वीरबाहु चांडालाकडे आणिलें. त्यानें सर्व वृत्त समजून घेऊन तिला मारण्याची हरिश्चंद्रास आज्ञा केली. हरिश्चंद्रानें स्त्रीवध करणें निंद्य आहे इ० सयुक्तिक भाषणांनीं वीरबाहूची बहुत समजूत केली, परंतु तो तें कांहीं न ऐकतां माझी आज्ञा तुला प्रमाण आहे, यास्तव हिचा वध केलाच पाहिजे असें म्हणूं लागला. तेव्हां हरिश्चंद्र निरुपाय होऊन त्यानें खड्ग उपसला, आणि तारामतीस म्हणाला, तूं, हे लोक म्हणतात त्याप्रमाणें राक्षसीच असशील तर तुला माझें कांहींच म्हणणें नाहीं; परंतु मानुषी असशील, तर तुझा कोणी संरक्षणकर्ता असल्यास त्याचें स्मरण कर. तारामती म्हणाली, माझें दैव सर्वपरी मला विमुख झालें आहे, त्यामुळें हा मरण पावलेला प्रत्यक्ष माझा पुत्र असतां, मी वास्तविक याच्या मरणानें याकरितां शोक करणारी असून, याला भक्षण करणारी राक्षसी ठरल्यें. पुत्राचा पुत्र जाऊन मजवरहि मरणाचा प्रसंग आला. आपत्तिकालीं स्त्रीचें रक्षण पतीनें करावें तर तोहि मला अंतरून चांडालाच्या सेवेंत गुंतला असल्याचें मी ऐकल्यें. तेव्हां आतां स्मरण कोणाचें करूं ? पुत्र तर मला सोडून गेलाच आहे, व मीहि आतां मरणार; म्हणून विधात्यास प्रार्थना करित्यें कीं, जन्मोजन्मीं हरिश्चंद्र राजासारिखा पति, रोहितासारखा पुत्र, वसिष्ठासारिखा गुरु, आणि विश्वामित्रासारखा याचक मिळो, असें म्हणून तिनें आपली मान खालीं केली. ते तिचे निर्वाण शब्द ऐकून हरिश्चंद्र स्तब्ध झाला, व विश्वामित्राच्या पोटांत दयेचा उमाळा येऊन तो प्रगट होऊन त्यानें हरिश्चंद्राच्या हस्तांतील खड्ग घेऊन भूमीवर टाकिला. सारांश, रोहितास सजीव करून हरिश्चंद्र, तारामती आणि रोहित, यांच्या परस्पर भेटी करविल्यावर त्या सर्वांस त्यानें अयोध्येस नेऊन राज्यावर स्थापिलें, व आपली तपश्चर्या वसिष्ठास अर्पण करून, हरिश्चंद्राची स्तुति करीत आपल्या आश्रमास निघून गेला. पुढें हरिश्चंद्रानें बराच काळपर्यंत राज्य करून, रोहितास राज्याभिषेक केल्यावर अयोध्येंतील जे जन येण्यास सिद्ध झाले, त्यांस समागमें घेऊन तारामतीसहित स्वर्गास गमन केलें. या प्रकारेंकरून हरिश्चंद्राचें हें यश शुक्राचार्यानें गायिलें आहे ( देवीभा० ७ स्कं० अ० २४-२७ ). हें हरिश्चंद्राख्यान देवीभागवतांत सविस्तर खरच, परंतु भारी असंगत आहे; त्याची थोडक्यांत संगति लावून मीं व्यवस्थेनें लिहिलें आहे. म्हणून, यांत झालेल्या न्यूनाधिक्याचा दोष मला कोणी देऊं नये. कारण मार्कंडेय पुराणादिक ग्रंथांतरांचा आधार पाहून ही व्यवस्था लिहिली गेली आहे.

**हरिश्रावा**—भारतवर्षीय नदी.

**हरिहय**—इंद्र, सूर्य, स्कंद, यांस नांव.

**हरिहर**—विष्णु आणि शिव असे दोघे ते. या उभयतांमध्यें नामभेद मात्र आहे. रूपांत भेद नसून ऐक्यरूपानें उभयतां ईश्वरच आहेत; कारण तत्पदाख्य जो ईश्वर, तोच सात्विक प्रकृतीचा अंगिकार करून निमित्त कारण, आणि तामस प्रकृतीचा अंगिकार करून विवर्तोपादान कारण, या जगतास झाला, असें उपनिषद्वागरूप ब्रह्मविद्याशास्त्रांत सांगितलें आहे. मृगजलाच्या उत्पत्तीस रश्मिरूपानें विवर्तोपादान कारण, आणि मध्यान्हकाल एतद्रूपानें निमित्त कारण जरी सूर्य होतो, तरी दोनहि कारणांनीं एक तोच, तसा हरिहर उभय नामांनीं एक ईश्वरच असा निश्चयात्मक सिद्धांत समजून, सूर्य जसा महदाकाशाश्रित असतो, तसा ईश्वर परब्रह्माश्रित समजावा. सारांश, हरिहर अ० विष्णु, शिव, यांचें मूळरूप अशा प्रकारचें असून ईश्वरत्वास्तव उभयतांहि नित्यमुक्त आहेत. नित्यमुक्त म्ह० ब्रह्मदेवाप्रमाणें जीवत्वास येऊन नंतर मुक्त झालेले असे नव्हत, सदा सर्वकाळ मुक्तच. जीवत्वास येऊन नंतर मुक्त होतात त्यांस जीवन्मुक्त म्हणतात, म्हणून ब्रह्मदेवाची गणना जीवन्मुक्तांत असून, तो पृथिवीवरील सर्व जीवनमुक्तांचा मुकुटमणि आहे.

हीं जीं हरिहरांचीं मूळरूपें सांगितलीं, हेंच हरिहर स्वकीय इच्छेनें जलकरकान्यायेंकरून (पर्जन्याच्या गारांप्रमाणें) विग्रह धारण करून आपणच आपलाले लोक निर्मित होत्साते त्यांत राहिले आहेत. जगताच्या उत्पत्तीस निमित्त विवर्तोपादान हेतुरूप जे मुख्य दोन उपाधि, ते सुद्धां यांनीं ब्रह्मदेवाकडेसच सोंपविल्यामुळें, स्त्रीपुत्रादिक गौण उपाधि यांस नाहींत हें उघडच असून, यांच्या लोकांत ब्रह्मदेव आणि सनकादिक चौघे भ्राते त्यांची मात्र गति आहे, इतर भेदबुद्धि व मत्सरी जे भृग्वादिक त्यांची नाहीं.

जे जीव, या दोघांमध्यें भेदबुद्धि न ठेवितां निर्मत्सरबुद्धीनें अत्युत्तम वैराग्यपूर्वक यांची उपासना (केवळ एकाकार वृत्तीनें ध्यानधारणा) करतात, ते यांच्या लोकीं पुण्यतारतम्यानुरूप सलोकतादिक मुक्ति पावून पतनावांचून ब्रह्मकैवल्य पावतात. त्यांत अंतर किंवा ब्रह्मनिष्ठाविषयीं भेदबुद्धीनें त्याचा अनादर झाल्यास, तत्काल पतन पावतात. याविषयीं जयविजयांचें उदाहरण प्रमाण आहेच.

यांनीं जगदुत्पत्तीची शक्ति जशी ब्रह्मदेवास दिली आहे, तशीच त्याच्या बाह्यांतर पालनसंहाराचीहि दिली आहे. असें असतां प्रसंगोपात्त आंतरविषयीं तो कदाचित् असमर्थ झाल्यास हे तत्काल तेथें प्रकट होऊन त्याचें साह्य करितात. उदाहरणार्थ ( २ हंस श० पहा ). सारांश, विषयोन्मुख जीवांस, स्वरूपोन्मुख करणें येवढाच काय तो यांस उपाधि होय, अन्य नाहीं. अन्य ज्या भृग्वादिकांनीं यांस लत्ताप्रहारादिक केल्याच्या गोष्टी आहेत, त्या यांच्या नसून, विभूतिरूप अवतारांच्या समजाव्या.

**हरी**—कश्यपास क्रोधेपासून झालेल्या नऊ कन्यांतील एक.

**हरोद्भेद**—भारतवर्षीय तीर्थ.

**हर्मचंद्र**—क्षेत्र.

**हर्यज्वायन**—एक ब्रह्मर्षि.

**हर्यवन**—( सो० वं० ) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या कुश ना० पौत्राच्या वंशांतील कृतराजाचा पुत्र. याचा पुत्र सहदेव.

**हर्यश्व**—प्राचेतस दक्षानें दुसऱ्या वेळेस जे दुसरे दहा सहस्र पुत्र निर्माण केले होते, त्यांतील प्रमुख.

२—सुदेवराजाचें नांव.

३—( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुवलाक्ष राजाचा प्रपौत्र, दृढाश्वाचा पौत्र, आणि प्रमोदराजाचा पुत्र. याचा पुत्र निकुंभराजा.

४—( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अनरण्य राजाचा ज्येष्ठ पुत्र. यास माधवीपासून वसुमना ना० पुत्र झाला होता ( ३ गालव श० पहा ]. याची मुख्य विवाहित स्त्री दृषद्वती व तिला यापासून झालेला पुत्र अरुण राजा समजावा.

५—( विदे० वं० ) धृष्टकेतुजनकाचा पुत्र, याचा पुत्र मरु ना० जनक.

**हर्यश्वि**—नीलपराशरकुलोत्पन्न ऋषि.

**हर्यक्ष**—उत्तानपादवंशीय पृथुराजास अर्चीपासून झालेल्या पांच पुत्रांतील तिसरा.

**हर्यात्मा**—उत्तमा ना० व्यासास नामांतर.

**हर्ष**—संतोष द्वितीयार्थक तोच.

२—कृष्णास मित्रविंदेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

**हलधर**—बलरामास नांगर ना० आयुध धारण करण्यानें नांव.

**हलमय**—विश्वामित्रकुलोत्पन्न ऋषि.

**हलायुध**—हलधर.

**हविर्धान**—उत्तानपादवंशीय विजिताश्व राजास नभस्वतीपासून झालेला पुत्र. यास हविर्धानी अ० धिषणा स्त्रीपासून बर्हिषद ( दुसरा प्राचीनबर्हि ), गय अ० सांग, शुक्ल, कृष्ण, सत्य, आणि जितव्रत, असे साहा पुत्र झाले होते.

**हविर्धानी**-हविर्धानराजाची स्त्री धिषणा तीच.

२-समुद्रमथनकाळीं त्यांतून निघालेली धेनु, तिला नांव.

**हविघ्न**-एक राजर्षि.

**हविर्भुवा**-कर्दमप्रजापतीस देवहूतीपासून झालेल्या नऊ कन्यांतील एक. ही स्वायंभुवमन्वंतरांतल्या पुलस्त्य-ऋषीची स्त्री होती.

**हविष्पंद**-विश्वामित्रऋषीच्या पुत्रांतील एक.

**हविष्मंत**-मरीचिगर्भ लोकांत राहणारे पितर. हे अंगिरा ऋषींचे पुत्र व क्षत्रियांस पूज्य आहेत.

**हविष्मती**-बृहस्पतीस शुभेपासून झालेल्या सात कन्यांतील पांचवी.

**हविष्मान्**-ब्रह्मसावर्णि मन्वंतरांतल्या सप्तर्षीतील एक.

२-अंगिरस देवांतील एक.

**हवींद्र**-वसिष्ठऋषीच्या पुत्रांतील एक. हा स्वारोचिष-मन्वंतरांतल्या प्रजापतींत होता.

**हव्यवान्** -रैवतमनूच्या पुत्रांतील एक.

**हव्यवाह**-धर ना० वसूच्या पुत्रांतील एक.

२-पवमान् अग्नीचा पुत्र तो.

**हव्यवाहन**-अग्नीस साधारण नांव.

**हव्यसूद**-पशुमारणकर्मामध्यें जो अग्निप्रधान आहे तो.

**हंस**-ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांतील एक विरक्त पुत्र.

२-एकदां सत्यलोकामध्यें ब्रह्मदेवास सनकादिकांनीं कांहीं अध्यात्मविषयक प्रश्न केला, त्याचें उत्तर, त्या वेळेस ब्रह्मदेवाची बुद्धि कार्यांतरानें विक्षेप पावली होती म्हणून त्याच्यानें झालें नाहीं, असें पाहून तेथें तत्काळ विष्णु शिवरूपी ईश्वर हंसपक्ष्याच्या रूपानें प्राप्त झाला, व सनकादिकांच्या संशयरूप ग्राहाचा नाश करून, त्याच्या पीडेपासून त्यांस त्यानें संरक्षिलें ( भाग० ११ स्कं० अ० १३ ).

३-ब्रह्मदेव, विष्णु, आणि शिव, यांस व गुरूस साधारणपणानें नांव.

४-कश्यपापासून अरिष्टेस झालेल्या पुत्रांतील एक. हा गंधर्व आहे.

५-बारा साध्यदेवांतील नववा.

६-डिंभराजाचा ज्येष्ठ भ्राता ( हंसडिंभक श० पहा ).

७-वसुदेवास श्रीदेवेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

८-मेरूच्या कर्णिकापर्वतांतील एक.

९-यजुर्वेदोपनिषत्.

**हंसकेतु**-हंसध्वज शब्द पहा.

**हंसचूड**-एक यक्ष.

**हंसजिव्ह**-ब्रह्मर्षि ( ३ भृगु श० पहा ).

२- " ( ३ अंगिरा श० पहा ).

**हंसडिंभक**-हंस आणि डिंभक हे दोघे परस्पर भ्राते व करूषक देशाचे राजे. हे शस्त्रानें अवध्य असल्यामुळें पराक्रमी असून, जरासंध राजाचे प्रधान असत. यांचें बळ जरासंधास चांगलेंच होतें. एकदां कृष्णबलरामांशीं जरासंधाचें युद्ध चाललें असतां, हंसास मूर्च्छा येऊन तो भूमीवर पडला. तो बराच वेळ सावध झाला नाहीं, त्यावरून तो डिंभकास मरण पावलासें वाटून, त्यानें यमुनेंत प्राण दिला. हें वर्तमान हंसास कळून त्यानेंहि तसेंच करून जीव दिला. अशा रीतीनें शस्त्रावांचून यांचा मृत्यु झाला.

**हंसतीर्थ**-प्रयागांतील भागीरथीच्या पूर्वभागींचें तीर्थ.

२-नर्मदेसंबंधीं एक तीर्थ.

**हंसध्वज**-चंपकानगरीचा राजा. यानें पांडवांचा अश्वमेधीय अश्व धरिला होता. यास विदूरथ, चंद्रसेन व चंद्रकेतु इ० भ्राते, आणि सुरथ, सुधन्वा, सुदर्शन, सुबल, आणि सम, असे पांच पुत्र असत. सुमति, सुगति, तुष्ट, आणि श्रद्धालु, हे याचे मंत्री असून, शंखलिखित उपाध्याय होते. याच्या पदरीं सेना पुष्कळ होती, व हा जातीनेंहि मोठा पराक्रमी होता. यानें अश्व धरिल्यावर सर्वांस अशी आज्ञा केली कीं, उद्यीक अमुक वेळेस सर्वांनीं समरभूमीवर प्राप्त व्हावें, यांत ज्याकडून अंतर होईल, त्यास तप्ततैलकटाहांत टाकलें जाईल. त्यावरून नियमित वेळीं समरांगणीं सर्व येऊन उभे राहिले.

इकडे हंसध्वज समरभूमीस येऊन, त्यानें सुमति आदिकरून मंत्रि, व त्याचे वीरकेतु, तीम्ररथ, आणि शतधन्वा इ० पुत्र, तसेच आपले भ्राते व पुत्र या सर्वांस पाहिलें. परंतु त्यांत सुधन्वा आला नाहीं असें पाहून त्यास पराकाष्ठेचा कोप आला. तिकडे सुधन्व्याचा वृत्तांत असा झाला होता कीं, तो युद्धाची सिद्धता करून, व मातेचा आणि कुवला ना० भगिनीचा निरोप घेऊन, प्रभावती ना० आपल्या पत्नीकडे गेला असतां, ती त्या दिवशीं ऋतुस्नात ( ऋतुकालांतून आंग धुवून शुद्ध झालेली ) अशी असल्यामुळें तिनें माझा मनोरथ पूर्ण करून नंतर जावें असें म्हटलें, व हा, आतां अवसर नाहीं असें म्हणूं लागला असतां, त्याविषयीं धर्मशास्त्राचें प्रमाण दाखवून, माझा मनोरथ भंग करण्यांत तुम्हास दोष घडेल, असें प्रतिपादन केलें. त्यामुळें त्याचा निरुपाय होऊन, तिचे मनोरथ पूर्ण करण्यास गुंतल्यानें विलंब लागला. सारांश,

पुढें सुधन्वा समरभूमीस येतांच हंसध्वजानें आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें त्यास तप्ततैलकटाहांत टाकिलें; परंतु त्यांत, तो ईश्वरप्रसादानें मरण पावला नाहीं, म्हणून राजानें त्यास बाहेर काढिलें. पुढें त्यानें कृष्णार्जुनाशीं मोठें दुर्धर युद्ध केलें. त्यांत अर्जुनाचा पराभव होण्याचा प्रसंग पाहून, कृष्णानें या राजाशीं त्याचें सख्य करविलें इ० (जैमि० अश्वमे० अ० १७–२१).

**हंसपथ**–भारतवर्षीय देश ( भार० भीष्म० अ० ९ ).

**हंसपांडुर**–प्रयागासमीपचें तीर्थ.

**हंसप्रपतन**–भारतवर्षीय तीर्थ.

**हंसी**–भगीरथ राजाची कन्या. हीस त्यानें कौत्सऋषीस दिलें होतें.

**हस्त**–सोमाच्या सत्तावीस स्त्रियांतील एक.

२–वसुदेवास रोचनेपासून झालेल्या पुत्रांतील ज्येष्ठ.

**हस्तिदान**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

**हस्तिनापुर**–सोमवंशीय पूरुकुलोत्पन्न हस्तिराजा, त्यानें स्थापिलेलें नगर ( बृहत्क्षत्रस्य पुत्रोभूद्धस्तीयद्धस्तिनापुरं ) ( भाग० ९ स्कं० अ० २१ श्लोक २० ). परंतु ग्रंथांतरावरून याला पूर्वीपासूनच हस्तिनापुर नांव चालत होतें असें दिसतें. तें असें कीं, अत्रिपुत्र सोम एकदां या अरण्यांत विहार करीत असतां, एका हत्तीस एका पक्ष्यानें येऊन एकाएकीं सहज उचलून नेलेलें त्यानें पाहिलें. त्यावरून त्यास या भूमीविषयीं आश्चर्य होऊन जें नगर तेथें स्थापिलें तें हें असून, येथें हस्तिराजापूर्वींचे सोमवंशीय राजे राज्य करीत असल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. म्हणून असें म्हटलें पाहिजे कीं, हें नगर हस्तिराजानें वाढविलें असावें. आपण भूमीचें खनन करीत असतां, जसें तिचें मोठें ढेंकूळ वरील गवत इ०कांसहित तीहून कांहींसें सोडवून भिन्न करितों, तसें दुर्योधनाच्या वेळेस हें सर्व नगर बलरामानें करून ठेवलेलें, निमिचक्रराजा यांत राज्य करीत असतां, भागीरथीच्या बलवत्तर प्रवाहानें वाहून गेलें ( निमिचक्र श० पहा). यास नागपुर, गजपुर, इ०अर्थांचीं अनेक नांवें आहेत.

**हस्तिपृष्ठक**–एक नगर ( वा० रा० अयो० स० ७१ ).

**हस्तिमुख**–लंकेंतील रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

**हस्तिसोमा**–भारतवर्षीय नदी.

**हस्ति**–( सो० वं० ) पूरुकुलोत्पन्न रौद्राश्वपुत्र ऋतेयु, तद्वंशीय बृहत्क्षत्र राजाचा पुत्र. यास अजमीढ, द्विमीढ अ० देवमीढ, आणि पुरुमीढ, असे तीन पुत्र होते. हस्तिनापुर यानेंच मोठें करून वाढविलें होतें.

**हहा**–हाहा शब्द पहा.

**हाटकेश्वर**–वितल ना० बिलस्वर्गांत भोगावती नदीच्या तीरीं असणारी शिवाची विभूति ( भाग० ५ स्कं० अ० २४ ). ( जैमि० अश्व० अ० ३९ ).

**हारहूण**–भारतवर्षीय देश. हा पांडवांच्या वेळेस पश्चिम आनर्त देशाच्या पूर्वेस असल्याचें भारतांत आहे ( भार० सभा० अ० ३२ ).

**हारिकर्णि**–तृतीयार्थक अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**हारित**–भारतवर्षीय तीर्थ.

**हारितायन**–द्वितीयार्थक कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**हारीत**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न मांधाता राजाचा पप्रौत्र, अंबरीषाचा पौत्र, आणि यौवनाश्व राजाचा पुत्र.

२–अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

**हार्दिक्य**–( सो० वं० ) हृदिक राजाच्या पुत्रांस संज्ञा. परंतु कृतवर्म्याविषयीं विशेष प्रासिद्धि.

**हालाहल**–चौदा रत्नांमध्यें समुद्रांतून उत्पन्न झालेलें विष. हें समुद्रांतून निघालें त्या काळीं देवासुरांस मोठें भय उत्पन्न होऊन,ब्रह्मा आणि विष्णु यांसहवर्तमान ते सर्व शिवाकडे येऊन, या विषापासून आमचें रक्षण करावें, अशी त्यांनीं विनंति केली.

**श्लोक**–

निर्मथ्यमानादुदधेरभूद्विषं महोल्वणं हालहलाव्हमग्रतः ॥ भीताः प्रजा दुद्रुवुरंग सेश्वरा अरक्ष्यमाणाः शरणं सदाशिवम् ॥१९॥ तीं त्यांची प्रार्थना ऐकिल्यावर महादेवानें त्यांस अभयपूर्वक निरोप दिला, व पार्वतीशीं असें भाषण केलें.

**श्लोक**–

तद्वीक्ष्य व्यसनं तासां कृपया भृशपीडितः
सर्वभूतसुहृद्देव इदमाह सतीं प्रियां ॥ ३६ ॥
अहो बत भवान्येतत् प्रजानां पश्य वैशसं ॥
क्षीरोदमथनोद्भूतात्कालकूटादुपस्थितं ॥ ३७ ॥
आसां प्राणपरीप्सूनां विधेय मभयं हि मे ॥
एतावान्हि प्रभोरर्थो यद्दीनपरिपालनं ॥ ३८ ॥
अभक्षयन महादेवः कृपया भूतभावनः ॥
यच्चकार गले नीलं तच्च साधोर्विभूषणं ॥ ४३ ॥
निशम्य कर्म तच्छंभोर्देवदेवस्य मीढुषः ॥
प्रजा दाक्षायणी ब्रह्मा वैकुंठश्च शशंसिरे ॥ ४५ ॥

( भाग० ८ स्कं० अ० ७ ). यांतील थोडा भावार्थ–

तें प्रजांस प्राप्त झालेलें दुःख अवलोकन करून, कृपेनें अत्यंत व्याप्त होत्साता तो संपूर्ण भूतांचा सुहृत् ( मित्र ) देव आपल्या सती ना० प्रियेस असें बोलता झाला. (वत हा शब्द खेदवाची समजावा. येथें पार्वतीला, स्वायंभुवमन्वंतरांत सती व दाक्षायणी नांव होतें, तो संबंध चाक्षुष मन्वंतरांत समुद्रमथन झालें, त्यांत उत्पन्न झालेल्या विषसंबंधीं भाषणांत जोडला आहे. पुराणांतून गोंधळ आहे तो हा असा,–वस्तुतः येथें पार्वती म्हणणें युक्त होतें ). हे पार्वति, यांच्या प्राणरक्षणासाठीं, यास अभय होईल तें मला केलें पाहिजे; कारण, दीनांचें रक्षण करणें हेंच प्रभूचें कर्तव्य आहे. असें बोलून तें विष महादेवानें प्राशन केलें. त्या योगानें, तो श्रेष्ठ म्हणूनच तें त्यास नीलकंठरूपानें भूषण झालें. नंतर तें त्याचें अद्भुत कर्म श्रवण करून संपूर्ण प्रजा, दाक्षायणी ( पार्वती ), ब्रह्मा, आणि वैकुंठ म्हणजे विष्णु, त्याचें स्तवन करिते झाले. या इतिहासांतील शिव, विष्णु, विभूतिरूप समजावेत, मुख्य समजूं नयेत; कारण, त्यांस पार्वती अ० सती इ० नांवांच्या स्त्रिया नाहींत. इतकेंच नव्हे, तर त्यांस मुळींच स्त्रिया नाहींत. कारण ते ऊर्ध्वरेते व ईश्वर आहेत.

२–शिव, विष्णु दोघांनीं मिळून मारिलेला दैत्य(देवभा० ७ स्कं० अ० २९–३० ).

**हाविर्धानि**–बर्हिषद अ० दुसरा प्राचीनबर्हि त्यास.हविर्धानीचा पुत्र म्हणून म्हटलेलें आहे.

**हासिनी**–एक अप्सरा.

**हास्तिक**–द्वितीयार्थक कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**हास्तिनपुर**–हस्तिनापुर त्यासच म्हटलेलें आहे.

**हाहा**–चालू मन्वंतरापूर्वीचा गंधर्व.

२–कश्यपापासून प्राधेस झालेल्या गंधर्वांतील एक. हा प्रतिज्येष्ठ मासींच्या सूर्यासमागमें संचार करण्यास असतो ( ५ शुक्र श० पहा ).

**हिंगुला**–ज्वालामुखी देवीचें स्थान ( देवीभा० ७ स्कं० अ० ३८ ).

**हिडिंब**–लाक्षागृहांतून पांडव वाचून बाहेर पडल्यावर फिरत फिरत या राक्षसाच्या अरण्यांत आले. हा राक्षस कोणाचा कोण इ०कांविषयीं ग्रंथांत कांहीं उल्लेख नाहीं. येथें पांडव आल्यावर वाटेंतील चालण्याच्या श्रमानें व जागरणानें त्यांस निद्रेनें व्यापिल्यामुळें, भीमशिवाय करून सर्व निद्रिस्त झाले. त्यांस यानें दुरून पाहून; आपणाकडे भक्षणार्थ घेऊन येण्यासाठीं, आपली भगिनी हिडिंबा तिला त्यांजकडेस पाठविलें; त्यावरून ती भीम बसला होता तेथें आली, आणि त्याच्या रूपानें मोहित होऊन, त्यापुढें सुंदर स्त्रीवेषानें जाऊन म्हणूं लागली, मी हिडिंब राक्षसाची भगिनी असून, त्यानें मला इकडे पाठविलें आहे. परंतु तुझें उत्तम रूप पाहून, मला तुमचा सर्वांचा वध करावासा वाटत नाहीं आणि हिडिंब तर मला विलंब लागल्यानें आतांच धांवत येऊन तुम्हास मारील; यास्तव मी तुम्हां सर्वांस कोठें तरी दूर घेऊन जात्यें; पण तूं माझा अंगीकार करावास, अशी माझी इच्छा आहे. तें तिचें भाषण ऐकून भीमसेन म्हणाला, मी तुझा अंगीकार करणार नाहीं, तूं येथून सत्वर निघून जा; आमच्या रक्षणास आम्ही समर्थ आहों.

याप्रमाणें भीम तिला जा म्हणे, व ती माझा अंगीकार कर म्हणे, असें चाललें आहे तों हिडिंब तेथें आला, आणि त्यानें तें तिचें बोलणें ऐकिल्यामुळें तिला म्हणाला, कायगे ? मी तुला इकडे कशाकरितां पाठविलें होतें ! अस्तु, तूं याला आतां पति करणार काय ? बरें तर, आतां आधीं मी यास मारून नंतर तुझाहि प्राण घेतों पहा. इतकें बोलून भीमाच्या अंगावर धांवला. तेव्हां भीमाचें व याचें मोठेंच बाहुयुद्ध झालें, त्यायोगानें युधिष्ठिरादिक जागे झाले. इतक्यांत भीमानें यास ठार मारिलें ( भार० आदि० अ० १५२–१५४). पुढें भीम हिलाहि मारूं लागला असतां, हिडिंबा कुंतीस शरण होऊन, तिनें आपला हेतु तिला कळविला. त्यावरून कुंतीच्या व युधिष्ठिराच्या आज्ञेनें भीमानें तिला वरिलें ( भार० आदि० अ० १५५ ).

**हिडिंबा**–हिडिंबराक्षसाची भगिनी. हिनें भीमास वरिलें होतें, व कुंती इ० कांच्या आज्ञेनें ही त्यास बराच काळपर्यंत कोठेंशी घेऊन गेली होती. त्या वेळेसच भीमापासून हिला घटोत्कच पुत्र झाला होता.

**हिमप्रस्थ**–कौरवपांडवांची युद्धभूमि जें कुरुक्षेत्र, त्यासमीपभागींचें स्थलवि०. अरुणा आणि सरस्वती नदीचा ओघवती ना० प्रवाह. यासमीपच वाहत असे (भार० शल्य० अ० ५).

**हिमवान्**–हिमालय पर्वत.

**हिमालय**–अजनाभ अ० भरतवर्ष त्याच्या उत्तरेस आणि हैमवत अ० किंपुरुषवर्ष त्याच्या दक्षिणेस म्हणजे त्या उभयवर्षांच्या मध्यभागीं सीमाभूत पर्वत आहे तो. याची पूर्वपश्चिम लांबी ( अशीतिश्च सहस्राणि योज-

नानि विशांपते ) ऐशीं सहस्र योजनें असून, हा पूर्व-पश्चिम अनुक्रमें दोहोंकडे समुद्रास स्पर्शून राहिला आहे. श्लोक–अवगाढा ह्युभयतः समुद्रौ पूर्वपश्चिमौ॥ हिमवान् हेमकूटश्च निषधश्च नगोत्तमः ॥ ( भार० भीष्म० अ०६ श्लो० ३–४ ). ( मत्स्य०अ०११२). अलकनंदेच्या सप्तप्रवाहांतील गंगा ना० प्रवाहाचा उगम, मूळ या पर्वतापासून असून, तें उद्गम स्थळ भरतखंडाचें दक्षिणटोंक जें कन्याकुमारी, त्यापासून सहस्र योजनें दूर आहे ( ३ कुमारी श० पहा ). अर्थात् हा पर्वत कुमारीपासून नीट उत्तरेकडे सहस्र योजनें इतक्या अंतरावर आहे. हें जें सहस्र योजनें ( चार सहस्र कोस ) दक्षिणोत्तर रेषेचें प्रमाण, हा प्रस्तुतच्या भूगोलवेत्त्यांचा उत्तर ध्रुवापासून दक्षिण ध्रुवापर्यंत गोल पृथिवीचा आंस अ० व्यास म्हटला तरी चालेल. म्हणून त्यांस अस्मदितिहासोक्त भूमीचा पूर्ण शोध लागला नाहीं; कारण ज्या प्रमाणांनीं येव-ढीच काय ती पृथिवी असें त्यांनीं निश्चित केलें आहे, तीं प्रमाणें पंच दोषांनीं व्याप्त आहेत, त्यांचीं नांवें, मदमोहादिक मानसदोष, पित्तकामलादिक शारीरदोष, काणत्वादिक नेत्रदोष, दूरत्वादिक अर्थ-दोष, आणि काचादिक यंत्रदोष.

असो. युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ केला, त्या काळीं त्यानें अर्जुनास उत्तर दिशेचा जय करण्यास पाठविलें असतां, त्यास हा पर्वत, कोणत्या देशाच्या पुढें लागला, त्याविषयीं असें आढळतें. श्लोक–लोहान् परमकांबोजानृषिकानुत्तरानपि ॥ सहितांस्तान्महाराज व्यजयत्पाकशासनिः ॥ २५ ॥ ऋषिकेष्वपि संग्रामो बभूवातिभयंकरः ॥ तारकामयसंकाशः परस्त्वृषिक-पार्थयोः ॥ २६ ॥ स विजित्य ततो राजन्नृषिकानुत्त-रानपि ॥शुकोदरसमांस्तत्र हयानष्टौ समानयत्॥२७॥ स विनिर्जित्य संग्रामे हिमवंतं सनिष्कुटं ॥ श्वेतपर्वत-मासाद्य न्यविशत्पुरुषर्षभः ॥ २९ ॥ ( भार० सभा० अ० २७ ). यांतील भाव स्पष्टच आहे; तथापि तात्पर्य सांगतों. लोहदेश व परम कांबोज देश यांस जिंकल्यावर अर्जुन उत्तरेकडे ऋषिक ( रशिया ) देशांत गेला, व तेथील राजाशीं त्याचा भयंकर संग्राम झाला, शेवटीं त्या राजास जिंकून त्यानें त्या-पासून कर घेऊन पुढें जात जात हिमालयाच्या श्वेत-शिखरावर गमन करून, तेथील प्रदेश जिंकला. या-वरून पांडवांच्या वेळेपर्यंत या हिमालयावर जाण्यास पायवाट होती. समुद्र मुळींच मध्यें नव्हता असें उघड दिसतें. सांप्रत पश्चिम समुद्र वाढून, त्यानें मधील प्रदेश निमग्न केला आहे.

या हिमालयाची जी मूर्तिमान् देवता, तिची स्त्री मेना असून, मैनाक आणि क्रौंच असे दोन पुत्र, व अपर्णा, पर्णा, आणि एकपर्णा याप्रमाणें तीन कन्या तिला यापासून झाल्या होत्या.

२–युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ केला तेव्हां भीमसेन पूर्व-दिशा जिंकीत चालला असतां ईशान्य दिशे-कडे कांहीं वळल्या वेळीं हा हिमालय त्यास लागला होता. लोक प्रस्तुत जो हिमालय पाहून येतात, तो हाच, याविषयीं प्रमाण.

श्लोक.

ततो गोपालकक्षं च सोत्तरानपि कोसलान् ॥ मल्लानाम-धिपं चैव पार्थिवं चाजयत्प्रभुः ॥ ३ ॥ ततो हिमवतः पार्श्वं समभेत्य जलोद्भवं ॥ सर्वमल्पेन कालेन देशं चक्रे वशं बली ॥ ४ ॥ ( भार० सभा० अ० ३० ). नंतर दक्षिणेकडे वळून, पूर्वेस भीमसेन पुष्कळ दूर गेला होता, त्याविषयीं त्याच्या नांवावर त्याचा दिग्विजय लिहिला आहे तो पहावा, व त्यावरून त्या वेळेस वंगालचा उपसागर मुळींच नव्हता असें जाणावें. सारांश, पूर्वापार समुद्रास स्पर्शून असण्याचें जें लक्षण, तें या हिमालयावर नसल्यामुळें, मुख्य हिमालय हा नव्हे.

या पर्वतापासून निघालेल्या नद्या येणेंप्रमाणें:— भागीरथी ( प्रथमार्थक हिमालयावरून गंगेस भगीरथ घेऊन येत असतां, मार्गांत ती त्याच्या पितरांचा उद्धार करून गुप्त झाली असावी, व या पर्वतावर पुनः प्रकट होऊन पुढें वाहूं लागली असावी ). सिंधु, सरस्वती ( भोगावती ), शतद्रु, चंद्रभागा, यमुना, सरयू, इरावती ( ऐरावती ), वितस्ता, वि-शाला, देविका, कुहू, गोमती, धूतपापा, बाहुदा, दृषद्वती, तृतीया, कौशिकी, निश्चला, गंडकी, इक्षु ( इक्षुदा ), लोहिता ( लोहितारणी ), कृतमाला इ० ( मत्स्य० अ० ११३ ).

**हिमोदक**—अगस्त्य ऋषीच्या वंशांतील कुलवृद्धि कर-णारा एक ऋषि.

**हिरण्मय**–प्रियव्रतपुत्र आग्नीध्र, त्याच्या नऊ पुत्रां-तील साहवा. आग्नीध्रानें जंबुद्वीपाचे नऊ भाग वर्ष अशा संज्ञेचे करून, त्यांतील एका भागाचें आधिपत्य यास दिलें होतें, व त्यावरून याच्या भागास याचेंच नांव पडलेलें अजून चालत आहे.

२–जंबुद्वीपाच्या नऊ वर्षांतील साहावा वर्ष. हा, याच्या उत्तरेकडे असणाऱ्या श्वेत ना० महापर्वताच्या व दक्षिणेकडे असणाऱ्या शृंगवान् पर्वताच्यामध्यें असून पूर्व आणि पश्चिम दिशांकडे अनुक्रमानें क्षारसमुद्रास स्पर्शून आहे.

**हिरण्यकशिपु**–कश्यप ऋषीपासून झालेला पुत्र ( एक एव दितेः पुत्रः ) या भारतांतलि वाक्यावरून हा आपल्या मातेस एकटाच झाला होता, म्हणून हिरण्यक्ष ना० भ्राता यास मुळींच नव्हता. यानें दीर्घकालपर्यंत तप करून ब्रह्मदेवास प्रसन्न केलें असतां, तो यास प्रत्यक्ष होऊन वर माग असें म्हणूं लागला, तेव्हां यानें घराच्या आंत व बाहेर, दिवसास व रात्रीस, नर आणि पशु, शस्त्र व अस्त्र, तसाच सजीव आणि निर्जीव पदार्थ, इ०कांपासून मला मृत्यु नसावा असें मागितलें. तें यास ब्रह्मदेवानें देऊन सत्यलोकीं गमन केल्यावर यानें सर्व त्रैलोक्य जिंकिलें. देवादिकांस अनेक प्रकारें पीडा देऊन, ऋषि व राजे यांचे यज्ञयाग सिद्धीस जाऊं देईना. असें यानें बहुत कालपर्यंत राज्य केलें ( भाग० ७ स्कं० अ० ३–४( मत्स्य० अ १६०–१६२ ).

याला जंभासुराची कन्या कयाधु ती स्त्री असून, तिजपासून प्रल्हाद, अनुऱ्हाद, संऱ्हाद, ऱ्हाद, शिबि, आणि बाष्कल, इ० पुत्र होते. हा, चालू मन्वंतराच्या चौथ्या पर्यायांतील सत्ययुगांत विष्णूच्या नृसिंह ना० अवताराच्या हातून, वरप्रदानांत ज्या अडचणी होत्या, त्यांस कोठेंहि बाध न येतां मरण पावला.

२–कश्यपास दनूस झालेल्या दानवांतील एक. हाहि मोठा पराक्रमी होता, व यानें देव, असुर, मनुष्य, यांवर एक अर्बुद ( दहा कोटी वर्षें ) सत्ता करून राज्य केलें होतें. त्याच्या स्त्रीचें नांव आढळत नाहीं, मात्र पुत्र मंदार ना० दानव असल्याचें कळतें (भार० अनु० अ० १४ ).

**हिरण्यगर्भ**–ब्रह्मदेवादिक तिघां देवांस म्हटलेलें आहे.

२–कपिल महामुनीस नामांतर ( भार० शांति० अ० ३४९ श्लो० ६५ ).

**हिरण्यधेनु–धेनुक**–निषादाधिपति ( मत्स्यघ्न अ० कोळ्यांचा राजा ) एकलव्य ना० निषादाचा पिता.

**हिरण्यनाभ**–( सू० वं० ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न विधृति ना० राजाचा पुत्र. याचा पुत्र पुष्प राजा. हा प्रथमार्थक जैमिनीचा शिष्य असून, त्यापासून यानें सामवेदांतील कित्येक शाखांच्या संहितांचें अध्ययन केलें होतें. व त्यांतील कांहीं संहिता, पूरुकुलोत्पन्न सन्नतिमान् राजाचा पुत्र कृतिराजा, त्यासहि दिल्या होत्या.

**हिरण्यपुर**–पौलोम व कालकेय ना० असुरांचें नगर.

**हिरण्यबाहु**–द्वितीयार्थक कश्यपकुलोत्पन्न ऋषि.

**हिरण्यबिंदु**–प्रथमार्थक हिमालय पर्वतावरील तीर्थवि०.

२–कालंजर पर्वतावरील अगस्त्यऋषींचा जो आश्रम त्याचें नांव.

**हिरण्यरेतस्**–विश्वामित्रकुलांतील वंशवर्धक ऋषि.

**हिरण्यरेता**–ब्रह्मदेव आणि अग्नि यांस नांव.

२–प्रियव्रत राजाच्या दहा पुत्रांतील पांचवा. हा घृतोदानें ( घृतसमुद्रानें ) वेष्टित जें कुशद्वीप त्याचा अधिपति होता. यानें आपल्या द्वीपाचे वर्षसंज्ञक सात भाग करून, व त्यांस क्रमानें आपल्या सात पुत्रांचींच नांवें देऊन विभागून दिले होते. त्या सातांचीं नांवें अशीं.—**वसु, वसुदान, दृढरुचि, नाभिगुप्त, स्तुत्यव्रत, विविक्त,** आणि **वामदेव.**

**हिरण्यरोमा**–रैवतमन्वंतरांतल्या सप्तर्षींतलि एक.

२–मनुष्यजातीय चार दिक्पालांतलि उत्तरदिक्पाल.

३–रुक्मिणीचा पिता भीमक अ० भीष्मक त्याचें नामांतर ( भार० उद्योग० अ० १५८ )

**हिरण्यवर्मा**–पश्चिम दशार्ण देशाचा राजा. यानें आपली कन्या द्रुपदराजाचा पुत्र शिखंडी त्यास दिली होती. या वृत्ताविषयीं ( शिखंडी श० पहा ).

**हिरण्यवाह**–तृतीयार्थक शोण शब्द पहा.

**हिरण्यशृंग**–प्रथमार्थक हिमालयाचें शिखर. हें कैलासशिखराच्या उत्तरेस आहे.

२–कुबेराचा दूत. वंशौकसारा नदीच्या तीरीं जें सुरभीवन आहे, तेथें याचें राहणें असे, व यास सुमहान, अमितौजा, आणि सुविक्रम असे तीन मित्र असत.

**हिरण्यष्ठीव**–प्लक्षद्वीपस्थ पर्वतांतील एक.

**हिरण्यहस्त**–मदिराश्व राजाची कन्या सुमध्यमा तिचा पति.

**हिरण्याक्ष**–चालू कल्पाच्या आरंभीं झाला होता एक महाबलाढ्य असुर तो. हा स्वायंभुव मन्वंतरांतील कश्यपाचा पुत्र असावा. हा भूलोकास पाताळांत घेऊन चालला असतां, वराहानें यास मारून पृथिवीचा उद्धार केला, व तिला पूर्ववत् जेथील तेथें स्थापिलें.

२–विश्वामित्र ऋषीच्या पुत्रांतील एक.

३–मयासुराची कन्या उपदानवी तिचा पति ( चालू मन्वंतर ).

४–( सो० वं०) वसुदेवभ्राता श्यामक, त्याच्या दोन पुत्रांतील पहिला.

हिंस्र–कौशिक ऋषीच्या पुत्रांतील एक ( पितृवर्ति श० पहा ).

हुत–तृतीयार्थक आंगिराकुलोत्पन्न ऋषि.

हुतभुक्–अग्नि, अशा अर्थाचीं त्यांस अनेक नांवें आहेत.

हुहु–हूहू शब्द पहा.

हूण–रानटी म्लेंछजातीय मनुष्य.

२–त्यांचा जो देश तो.

हूहू–चालू मन्वंतरापूर्वीचा कोणी गंधर्व देवल ऋषीच्या शापानें हा जलामध्यें नक्र झाला होता. पुढें गजेंद्राच्या संबंधानें याचाहि त्यासमागमें हरि ना० विष्णूच्या अवतारानें उद्धार केला.

२–कश्यपापासून प्राधेस झालेल्या गंधर्वांतील एक. हा प्रति आषाढमासीं सूर्यासमागमें संचार करण्यास असतो ( १३ शुचि श० पहा ).

हृदय–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

हृदीक–( सो० वं० ) यदुकुलोत्पन्न सात्वतान्वयांतील स्वयंभोज ना० यादवाचा पुत्र. यास देवबाहु, शतधनु ( शतधन्वा ), महाबल, कृतवर्मा आणि देवमीढुष असे पांच पुत्र होते.

हृद्य–एक ब्रह्मर्षि.

हृषीकेश–देहमात्रांतील इंद्रियांचा स्वामी ईश्वर तो. विष्णूविषयीं विशेष प्रसिद्धि.

हेति–प्रहेतीचा ज्येष्ठ भ्राता. कालाची कन्या भया, ती यास स्त्री होती व तिच्या ठायीं यापासून विद्युत्केश नांवाचा याला पुत्र झाला होता ( वा० रा० उत्तर० स० ४ ).

२–चालू मन्वंतरांत चैत्रमासींच्या सूर्यासमागमें असणारा यक्ष ( ९ मधु श० पहा ). हा, वर सांगितलेला तोच किंवा दुसरा, त्याविषयीं निर्णय आढळला नाहीं.

३–वृत्रासुरानुयायी एक असुर.

हेम–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न रुषद्रथ राजाचा पुत्र व सुतपा राजाचा पिता जो सेन तोच.

हेमकूट–किंपुरुष वर्षाच्या उत्तरेस आणि हरिवर्षाच्या दक्षिणेस असा, या उभय वर्षांचा सीमाभूत पर्वत. हा पूर्वेकडे व पश्चिमेकडे क्षारसमुद्रास स्पर्शून आहे. यास एक कैलास नांवाचें शिखर असून, त्यावर कधीं कधीं वैश्रवण येऊन रहात असतो. याच्या पृष्ठभागावरील सरोवरांतून सरस्वती नामक नदी निघत्ये. हीच मुख्य हिमालयावर येऊन द्वितीयार्थक हिमालयावर प्रकट झाली असावी.

२–रामसेनेंतील एक वानर ( वा० रा० युद्ध० स० ३० ).

हेमचंद्र–( सू० वं० ) दिष्टकुलोत्पन्न तृणबिंदु राजाचा पुत्र विशाल त्याचा पुत्र. याचा पुत्र सुचंद्र.

हेमनेत्र–एक गंधर्व.

हेमा–अप्सरा. हिची सखी स्वयंप्रभा.

२–भारतवर्षीय नदी.

हेमांगद–वसुदेवास रोचनेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

हैडिंबेय–हिडिंबेचा पुत्र म्हणून घटोत्कचास म्हणत.

हैमवतवर्ष–किंपुरुषवर्षास नामांतर.

हैमवती–हिमवान् पर्वताची कन्या म्हणून पार्वतीस नांव.

२–कौशिक ऋषीची स्त्री ( ४ कौशिक श० पहा ).

३–हिमालयापासून निघणारी नदी. हिलाच पुढें शतद्रू नांव पडलें ( ३ वसिष्ठ श० पहा ).

हैरण्वती–हिरण्मय वर्षांतील एक नदी ( भार० भीष्म० अ० ८ ).

हैहय–( सू० वं० ) शर्यातिकुलोत्पन्न एक राजा. यास स्त्रिया दहा व शत पुत्र होते, त्यांत वीतहव्य ज्येष्ठ होता.

२–( सो० वं० ) आयुकुलोत्पन्न यदुराजाचा पौत्र, व शताजित् राजाच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ. याचा पुत्र धर्म.

३–( सो० वं०) तुर्वसुकुलोत्पन्न हरिवर्मा राजाचा पुत्र.

होत्रक–( सो० वं० ) विजयकुलोत्पन्न कांचन राजाचा पुत्र. याचा पुत्र जन्हु राजा.

होत्रवाहन–काशीराजाचा श्वशुर. यास संजय असेंहि म्हणत असत. हा अंबा इ० तिघी भगिनींचा मातामह ( आईचा बाप ).

२–पांडवांसमागमें द्वैतवनामध्यें होता कांहीं कालपर्यंत ऋषि तो.

ऱ्हादिका–ऋक्ष्यवान् पर्वतापासून निघणारी नदी.

ऱ्हादिनी–काम्यक वनाच्या उत्तरेस असणारी नदी.

ऱ्हस्वकर्ण–रावणपक्षीय राक्षस ( वा० रा० सुंदर० स० ६ ).

ऱ्हस्वरोमा–( विदे० वं० ) महारोमा राजाचा पौत्र, व स्वर्णरोमा जनकाचा पुत्र. यास सीरध्वज आणि कुशध्वज असे दोन पुत्र होते.

ऱ्हाद–हिरण्यकशिपूस कयाधूपासून झालेल्या पुत्रांतील एक.

ऱ्हादिनी–सुदामापर्वतासमीपची नदी. ही बहुधा त्यापासूनच निघाली असावी (वा० रा० अयो० स० ७१).

ऱ्ही–स्वायंभुवमन्वंतरांतील दक्षप्रजापतीनें धर्मऋषीस दिलेल्या तेरा कन्यांतील एक. हिचा पुत्र प्रश्रय.

क्ष

क्षत्ता–विदुरास नामांतर.

क्षत्र–एक यादव.

क्षत्रंजय–धृष्टद्युम्नाच्या पुत्रांतील एक. हा भारतीयुद्धांत मरण पावला (भार० द्रोण० अं० १०).

क्षत्रदेव–शिखंडीचा पुत्र. हा भारती युद्धांत पांडवांकडे होता. याच्या रथाचे अश्व वर्णनीय होते (भार० द्रोण० अ० २३). दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण त्याच्या हातून हा मरण पावला.

क्षत्रधर्मा-वर्मा–(सो० वं०) आयुपुत्र क्षत्रवृद्ध, त्याच्या कुश ना० पौत्राच्या वंशांतील जय राजाचा पुत्र.

२–धृष्टद्युम्नाच्या पुत्रांतील एक. यास द्रोणाचार्यांनें मारिलें (भार० द्रोण० अ० १२५).

क्षत्रवृद्ध–(सो० वं०) आयुराजाच्या पांच पुत्रांतील दुसरा, नहुषराजाचा कनिष्ठ भ्राता. याचा पुत्र सुहोत्र.

क्षत्रोपेक्ष–श्वफल्क यादवाच्या तेरा पुत्रांतील एक.

क्षपणक–पाखंडमताचा पुरुषवि०.

क्षपाविश्वकर–तृतीयार्थक अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

क्षमावंत–देवलऋषीच्या दोन पुत्रांतील एक. प्रत्यूष ना० वसूचा पौत्र.

क्षारकर्दम–आपल्या विद्या, तप, धन, कुल, इत्यादिकांच्या योगानें दुसऱ्यास जो तुच्छ करणारा त्यास प्राप्त होणारा नरक.

क्षारोद–जंबुद्वीपासभोंवता वलयाकार (कंकणाकार) क्षार जलाचा समुद्र आहे तो. हा सप्तमहासागरांत पहिला असून याची रुंदी लक्ष योजनें आहे, व यास बाहेरून प्लक्षद्वीपाचा वेढा आहे.

क्षिप्रा–विंध्याचलापासून निघणारी नदी.

क्षीर–तृतीयार्थक अंगिराकुलोत्पन्न ऋषि.

क्षीरा–भारतवर्षीय नदी.

क्षीरावती– ,, ,,

क्षीरोद–सप्तमहासागरांतील पांचवा. हा क्रौंचद्वीपासभोंवता वलयाकार असून याची रुंदी सोळा लक्ष योजनें आहे, व यास वेष्टून असणारें यापुढें शाकद्वीप आहे.

क्षुद्रक–(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न अंतरिक्षराजाच्या पुढील वंशांत जन्मलेल्या प्रसेनजित् राजाचा पुत्र. याचा पुत्र रणक अ० कुलकराजा.

क्षुद्रभृत–स्वायंभुव मन्वंतरांतल्या मरीचिऋषीच्या साहा पुत्रांतील एक. हा कृष्णावतारीं त्याच्या पूर्वी जन्मलेल्या साहा भ्रात्यांत जन्मून कंसाच्या हातून मरण पावला होता.

क्षुधि–कृष्णास मित्रविंदेपासून झालेल्या पुत्रांतील एक.

क्षुप–ब्रह्मदेवाच्या शिंकेपासून उत्पन्न झालेला एक प्रजापति (भार० शांति० अ० १२२).

क्षुभ्य–तृतीयार्थक भृगुकुलोत्पन्न ऋषि.

क्षुरिका–मुख्य यजुर्वेदोपनिषत्.

क्षेम–प्रियव्रतपुत्र इध्मजिव्ह, त्याच्या सात पुत्रांतलि पांचवा. याच्या वर्षास हेंच नांव चाल्तें.

२–प्लक्षद्वीपाच्या सात वर्षांतील पांचवा वर्ष.

३–स्वायंभुवमन्वंतरांतील धर्मऋषीपासून तितिक्षेस झालेला पुत्र.

४–भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा (भार०आदि० अ० ६७.). यांत हा क्रोधवश ना० असुर त्याच्या अंशानें जन्मला होता असें लिहिलें आहे.

५–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न जरासंधवंशीय शुचि ना० राजाचा पुत्र. याचा पुत्र सुव्रत राजा.

क्षेमक–भारती युद्धांतलि पांडवपक्षीय राजा. हा कोठील कोण तें कांहीं आढळलें नाहीं.

३–(सो० वं०) पूरुकुलोत्पन्न पांडववंशीय निमि राजाचा पुत्र. हा पांडवांच्या वंशांत शेवटला राजा होऊन गेला; कारण याची संतति पुढें कोठेंच सांगितलेली आढळत नाहीं.

क्षेमंकर–पश्चिमत्रिगर्तदेशीय राजा (३ जयद्रथ श० पहा).

क्षेमदर्शी–उत्तरकोसलदेशाचा राजा. याचे अमात्य अतिशय वाईट असत; त्यामुळें हा अतिशय त्रासला असतां कालकवृक्षीय ना० कोणी ब्राह्मणानें, युक्तीनें सर्वांचें शासन करून यास सुखी केलें. विदेहवंशीय एका जनकराजाची कन्या याची स्त्री होती (भार० शांति अ० १०६).

क्षेमधन्वा–(सू० वं०) इक्ष्वाकुकुलोत्पन्न कुशाच्या पुढें जन्मलेल्या पुंडरीक राजाचा पुत्र. यास देवानीक नांवाचा पुत्र होता.

**क्षेमधी**–( विदे० वं० ) चित्ररथजनकाचा पुत्र. याचा पुत्र समरथ ना० जनक.

**क्षेमधूर्ति**–भारतीयुद्धांतलि पांडवपक्षीय राजा ( भार० द्रोण अ० २५ ).

२–भीमसेनानें मारिलेला दुर्योधनपक्षीय राजा ( भार० कर्ण० अ० १३ ).

**क्षेममूर्ति**–धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक, हा भीमसेनाच्या हातून मेला.

**क्षेमवृद्धि**–शाल्वराजाचा सेनापति ( २ शाल्व श०पहा ).

**क्षेमशर्मा**–भारती युद्धांतलि दुर्योधनपक्षीय राजा.

**क्षेमा**–एक अप्सरा.

**क्षेम्य**–( सो० वं० ) नहुषकुलोत्पन्न पूरुराजा, तद्वंशीय हस्ती राजाचा पुत्र देवमीढ अ० द्विमिढ त्याच्या कुलांत जन्मलेल्या उग्रायुध राजाचा पुत्र. यास सुवीर ना० पुत्र होता.

**क्षौमि**–श्यामपराशरकुलोत्पन्न ऋषि.

---

## ज्ञ

**ज्ञ**–सोमपुत्र बुध, त्यास या नांवानें कोठें कोठें व्यवहार करितात.

**ज्ञाति**–( सो० वं० ) अनुकुलोत्पन्न एक राजा, याचें नांव वंशावळींत नाहीं.

**ज्ञानपावन**–भारतवर्षीय तीर्थ. हें अमुक स्थळीं असल्याचें निश्चित आढळलें नाहीं, म्हणून भरतवर्षांत इतकेंच लिहून ठेविलें आहे.

**ज्ञानसंज्ञेय**–ब्रह्मर्षि ( २ कश्यप श० पहा ).

समाप्त,

